शतकांपासून अज्ञानांत, दारिद्र्यांत व निराशेंत
असलेल्या बहुजन समाजाचा प्रतिनिधि
" ग्या न बा "
यांस हें लिखाण अर्पण केले आहे.

न. वि. गाडगीळ

# पहिल्या आवृत्तीचे निवेदन

......हा प्रयत्न सर्वसामान्य वाचकांसाठीं आहे. शक्य तितक्या सोप्या भाषेंत, सोप्या पद्धतीनें विषय चर्चिला आहे. या करण्यांत शाब्दिक काटेकोरपणा नसेल पण वाचकांना विषय समजण्यास सुलभता खास आहे. कल्पना व विचार समजून देणें हेंच ध्येय डोळ्यापुढें ठेवून लिहिलें आहे. अधिकारी व्यक्तींना कांहीं विचार पटणार नाहींत, कांहीं दोषही सांपडतील. त्याबद्दल मी एवढेंच म्हणूं इच्छितों कीं, या लिखाणामुळें उत्तम व नमुनेदार ग्रंथ या विषयावर झाल्यास, सर्वांत जास्त आनंद मला होईल. हीं धुळाक्षरें आहेत व तींहि एका सामान्य व्यक्तीनें काढलेलीं आहेत. या विषयाची माहिती व गोडी मराठी जनतेंत उत्पन्न व्हावी, तिला आपल्या दुःखाचें व दारिद्र्याचें कारण, दैव नसून मानवी कायदे, मानवी संस्थारूपी दैत्य हे आहेत, व त्यांचा संहार, जगांतील व्यवहार, ज्ञानानें केल्यास होऊं शकतो हा विश्वास उत्पन्न व्हावा हा मुख्य उद्देश या लिखाणाचा आहे. सुखाचें मूळ अखेरीस अर्थ आहे, परंपरागत धर्म नव्हे. धर्माचें तत्त्व अंधारांतील गुहेंत नाहीं. समाजाची धारणा करणारा धर्म, अर्थ व तत्संबंधींच्या व्यवहारांवर स्थापन झालेला आहे. ज्यामानानें समाजांतील संपत्तीचे व्यवहार व व्यवस्था न्याय्य, त्यामानानें त्या समाजांतील धर्म, सद्धर्म. ही सद्धर्मस्थापना सामाजिक न्यायावर अवलंबून आहे, यांत कांहीं गुह्यात्-गुह्यतरं अशा गोष्टीला जागा नाहीं. आर्थिक व्यवहारांत दैवाचा भाग नाहीं, तो मनुष्यामार्फत चालतो व त्यामुळें तो न्याय्य चालविणें मनुष्याच्या हातीं आहे. हा विचार व त्याला अनुसरून वर्तन केलें असतां, अर्थ, अनर्थकारक होत नाहीं, हेंहि दाखविण्याचा उद्देश यांत आहे......प्रमुख आधार ग्रंथाची यादी पुढें दिली आहे, तथापि या लिखाणांतील मतांची जबाबदारी सर्वस्वी लेखकाची आहे.

अंधेरी-भाग
येरवडा जेल
१२-१०-१९४१

न. वि. गाडगीळ

# दुसऱ्या आवृत्तिबाबत दोन शब्द

शास्त्रीय ग्रंथाची २।३ वर्षांत द्वितीय आवृत्ति काढण्याचा प्रसंग मराठी भाषेंत विरळाच आहे. पहिली आवृत्ति सामान्यपणें लोकांना आवडली म्हणून खपली असें म्हणणें गैर होणार नाहीं. अर्थशास्त्र हा रुक्ष विषय आहे. आपणांस समजणार नाहीं हा पूर्वग्रह बहुतेक सामान्य वाचकांचा असतो. विद्वान् व्यक्तिनीं व नामांकित पत्रकारांनीं दिलेले अभिप्राय व केलेली टीका लक्षांत घेतां ग्रंथ सुलभ व सुबोध झाला आहे याबद्दल मतैक्य आहे. कांहीं बाबतींत दोष जे दाखविले गेलें ते बहुश: मतभेदाचे आहेत. मराठी वाचकांनीं व विशेषत: बहुजन समाजांतील कार्यकर्त्यांनीं या ग्रंथापासून कांहींतरी ज्ञान मिळविलें हें समाधान मला मिळालें याबद्दल मला आनंद वाटत आहे.

द्वितीय आवृत्तींत जरूर तें फेरफार केले असून 'युद्धोत्तर जग' हे प्रकरण नवीन घातले आहे. जगांत अद्याप अस्थिरता आहे. नव्या नव्या आर्थिक प्रवृत्ति निर्माण होत आहेत. त्यांचा परामर्ष घेऊन मूलभूत सिद्धांतावर काय परिणाम होतील हे पाहणें जरूर आहे. पण त्यांस थोडा अवकाश आहे. कागद व मजुरी यांत झालेली वाढ लक्षांत घेतां किंमत थोडी वाढवावी लागत आहे त्याबद्दल नाईलाज आहे. ग्रंथ लिहितांना नजरेपुढें ठेवलेला हेतु साध्य होण्यास ही आवृत्ति मदत करो येवढीच इच्छा आहे.

नवी दिल्ली
कार्तिक शु. प्रतिपदा
शके १८६८

न. वि. गाडगीळ

# अनुक्रमणिका.

# आधार ग्रंथांची यादी


| | |
|---|---|
| (१) Prof. Taussig | Principles of Economics ( Vol. I, II ) 1939 Edition. |
| (२) Dr. Benham | Economics-General-Text -Book. |
| (३) Prof. Marshall | Principles of Eeconomics 1938 Edition. |
| (४) G. D. H. Cole | Monetary Problems. |
| (५) G. D. H. Cole | Principles of Economic Planning. |
| (६) Prof. Dobb | Political Economy and Capitalism. |
| (७) Prof. Gacelbend | Economic Recovery of Germany. |
| (८) Prof. Gyanchand | India's Teeming Millions. |
| (९) Prof. Keyne | General Theory of Money |
| (१०) Prof. Jathar and Beri | Indian Economics ( Vol. I. II ) |
| (११) प्रो. काळे आणि कर्वे | भारतीय अर्थशास्त्र. |
| (१२) F. Mackenzi | Planned Society Yesterday, to day, to-morrow. |
| (१३) Verulum | Production for Public |
| (१४) Cambridge Series | ( सर्व प्रकाशनें ). |
| (१५) Prof. Gadgil | Industrial Evolution in India. |
| (१६) Prof. Robbin | Nature and Significance of Economic Science. |
| (१७) Geofrey | Money. |


प्रमुख ग्रंथांची यादी दिली आहे, याशिवाय अनेक अन्य ग्रंथ, सरकारी रिपोर्ट वगैरेंचा उपयोग केला आहे.

# ग्यानबाचें अर्थशास्त्र

## प्रास्ताविक

जगाचा व्यवहार अखंड चालू आहे : शेतावर शेतकरी काम करीत आहे; गिरणींत मजूर कामें करीत आहेत; कच्चा माल तयार होऊन तो यंत्रांच्या सहाय्यानें पक्का होत आहे; दलाल खरेदी करीत आहेत; लहान दुकानदार विक्री करीत आहेत; गिऱ्हाईक ऐपतीप्रमाणें व इच्छेप्रमाणें विकत घेत आहेत; सर्वत्र, सर्व प्रकारें क्रय-विक्रय, उत्पादन, विभागणी, वांटणी चालू आहेत. जणूं कांहीं या जगाचीं कामें यंत्राप्रमाणें चालू असून त्यांना खंड नाहीं. आपल्याला वस्तूंची गरज आहे, आपल्याजवळ पैसा आहे; आपण बाजारांत जातों, चार ठिकाणीं पाहतों; भाव व माल पसंत पडला तर आपण घेतों. घेतलेली वस्तु कोठून आली, कोणीं घडविली, तिला अवश्यक लागणारे निरनिराळे पदार्थ कोठून आले, कोणीं एकत्र केले, किंमत कोणीं ठरविली, तयार करणाऱ्यास काय मिळालें, विक्री करणाऱ्यास काय मिळालें, ऐन पदार्थ किती किंमतीस तयार झाला, असे अनेक प्रश्न प्रस्तुत असूनही आपण गिऱ्हाईक ते कधीं विचारीत नाहीं, त्यांचा विचार करीत नाहीं. पदार्थ महाग झाला तर रागावतों, तो अवश्यक असल्यास जास्त किंमत देऊन घेतों; पण जगाच्या या सर्व व्यवहाराची वीण कशी तयार होते, माल व किंमत हीं कशीं बनतात व कशीं जुगतात याचा विचार आपण क्वचित्‌च करतों. सर्वसामान्य जनतेला हें सर्व कोडें वाटतें व तें सोडविण्यांत अर्थ नाहीं असें समजून त्याच्याकडे आपण दुर्लक्ष करतों.

जगाचा व्यवहार समजून घेणें अवश्यक आहे. ही गोष्ट अवघड नाहीं व ती शक्य तितक्या साध्या शब्दांत समजावून सांगण्याचा प्रयत्न करण्याच्याच उद्देशानें हें लिखाण केलें आहे. कारखान्याचें वर्णन, शेतीचें वर्णन अगर बाजारांचें वर्णन इत्यादि गोष्टी सांगणें हा उद्देश नाहीं; तर हा जगाचा व्यवहार जो चालू आहे, त्याचें एक शास्त्र आहे, तें शास्त्र अनेक तज्ज्ञांनीं बनविलें आहे व त्यांच्याच लिखाणांच्या अनुरोधानें व त्यांच्याच अनुभवाला वाट पुसत पुसत मार्ग काढण्यांत येणार आहे. या सर्व देण्या-घेण्याच्या, खरेदी-विक्रीच्या, उत्पादनाच्या मागें कांहीं नियम आहेत कां? कांहीं

सिद्धांत आहेत कां? कां हें सर्व अनियमित, अमानुष, अनिर्णीत असें आहे? मानवी इच्छा व निश्चय, निदान व निर्णय यांत आहेत कां नाहींत याचाच विचार आपणांस करावयाचा आहे. मजूर सकाळींच गिरणीचा भोंगा झाल्याबरोबर कामावर जातो. करावें लागणारें काम त्याला आवडो अगर नावडो, मजुरी त्यास हवी आहे; तीशिवाय तो जगूं शकत नाहीं; म्हणून त्याला जाणें अवश्य आहे. याचा अर्थ त्यास मिळणारे रुपये अगर नोटा त्याला हव्या आहेत असा नव्हे. कारण त्या कांहीं तो खाऊं शकत नाहीं. त्या देऊन त्याला उपभोग्य वस्तु (Consumers' goods) घेतां येतात. उदाहरणार्थ, अन्न, वस्त्र, राहावयाची जागा इत्यादि. त्याच्या राहणीला अवश्य अशा गोष्टी तो घेऊं शकतो. जर जीवनाला अवश्यक गोष्टी फुकट मिळाल्या, घरें फुकट मिळालीं, तर तो कामास जाणार नाहीं. पण ही गोष्ट अशक्य आहे; म्हणून जगण्यासाठीं त्यास काम करावें लागतें; भोंगा वाजूं लागतांच थंडींत, अंधारांत जावें लागतें. त्याचें पोट त्याच्या पायांना गति देतें.

जी गोष्ट सामान्य मजुराची, तीच शेतकऱ्याची, तीच सर्वसामान्य जनाची आहे. कांहीं अपवाद असणारच; ज्यांना यत्किंचित् श्रम, शारीरिक अगर बुद्धीचे, न करतां जगणें शक्य आहे त्यांचें निराळें. त्यांनीं आजपर्यंत जगाचें चांगलें केलें कां वाईट केलें याचा विचार पुढें करूं. मनुष्य गोडीसाठीं, क्वचित् षोकासाठीं श्रम करतो. त्यांत प्राप्तीचाच केवळ हेतु असतो असें नाहीं. पण सर्वसामान्य विचार करतां जगण्याकरितां श्रम करणें अवश्यक आहे व त्याप्रमाणें होत आहे. मनुष्य पैशांसाठीं श्रम करतो; कारण त्यांशिवाय जीवन शक्य नाहीं म्हणजे जीवनास अवश्य लागणाऱ्या वस्तु मिळणें शक्य नाहीं. श्रम करावयाचे, व्यवहार करावयाचा, उत्पादन करावयाचें व पैसा मिळवावयाचा हा सामान्य सिद्धांत. कांहीं मालक कमी भाडें घेत असतील, कांहीं दुकानदार कमी भावानें वस्तु विकीत असतील व त्यांत त्यांचें दातृत्व असेल; पण जगाचा व्यवहार सर्वसामान्यतः वर सांगितल्याप्रमाणें आहे. याचा अर्थ सर्व जग व सर्व श्रम करणारे लोभी आहेत अगर स्वार्थी आहेत असा नव्हे. मनुष्य आपलें उत्पन्न कसें खर्च करतो यावर त्याचें शील अवलंबून असतें. पैसा हा त्याला व त्याच्या कुटुंबांतील माणसांना जगण्यासाठीं, योग्य राहणीसाठीं, अन्नवस्त्रादि गोष्टींकरितां मिळविणें अवश्य असल्यामुळें, तो मिळविणें हा त्याच्या श्रमाचा, कष्ट करण्याचा खरा हेतु आहे व त्यामुळेंच या सर्व जगाच्या घडामोडीला व आर्थिक व्यवहाराला चालना मिळते.

जगांत जे अनंत व्यवहार चालले आहेत, उत्पादन, क्रय, विक्री वगैरे, त्या सर्वांचा तरी काय हेतु असेल? तर मनुष्याच्या जीवनाला जास्तींत जास्त अवश्यक असणाऱ्या

उपभोग्य वस्तु उत्पन्न करणें हा होय. जर आपण हे सर्व पदार्थ तयार करणाऱ्या सर्व व्यवहाराला एका यंत्राची उपमा दिली तर असें म्हणतां येईल कीं, यांतील जवळ जवळ सर्व चक्रें, या उपभोग्य वस्तु निर्माण करण्याकरितां फिरत आहेत. पाहा कसें तें : आपण बाजारांत आयतावळ, समजा, तयार सदरा घेण्यास गेलों तर हा सदरा दुकानांत येऊन कांचेच्या कपाटांत बसण्यापूर्वीं हजारों घटना झाल्या आहेत असें आपणांस आढळेल. कारखान्यांतील शिंप्यानें शिवला; स्टोअरमधून कापड–रूपानें शिंप्याकडे आला; गिरणींतून कापडाच्या गठ्ठयांत स्टोअरमध्यें आला; गिरणींत कापसाच्या रूपानें आला; शेतकऱ्याचे वावरांत बीजरूपानें आला; यांशिवाय अन्य किती तरी संस्कारांतून तो गेला आहे. जिनिंग फॅक्टरी, गाडीवाले, रेल्वे–हमाल, कारकून, कित्येकांचे संस्कार त्यावर झाले. एवंगुणविशिष्ट असा सदरा कांचेच्या कपाटांत आपण पाहिला. पण जेवढ्या घटना, जेवढे संस्कार झाले, ज्या सर्वांचे श्रम लागले, त्यांचें उद्दिष्ट जेव्हां सदरा तयार झाला म्हणजे उपभोग्य झाला तेव्हांच सफल झालें. सर्व व्यवहार उपभोग्य वस्तु तयार करण्यासाठींच आहे. मनुष्यास ज्या वस्तूंचा उपयोग नाहीं त्या उत्पन्न करण्यासाठीं कोणी श्रम करीत नाहीं. जगांतील आर्थिक घडामोड ( Economic Activity) उपभोग्य वस्तु उत्पन्न करण्याकरितांच आहे; हाच तिचा हेतु व हेंच तिचें महाकारण होय.

आजच्या व्यक्तिनिष्ठ व अनियंत्रित भांडवलशाही जगांत विक्रीकरितांच सर्व उत्पादन आहे. पदार्थ उत्पन्न करावयाचे, तयार करावयाचे व ते ज्यांना त्यांचा उपयोग आहे त्यांना विकावयाचे. कामगार मजुरीसाठीं खपतो, पण मालक मजुरी कां देतो? कारण मालकाला आशा—नव्हे खात्री असते कीं, मजुरांची मजुरी, सुताच्या अगर कापडाच्या विक्रींतून दिल्यानंतर खास कांहीं बाकी राहील व तेंच त्याचें उत्पन्न. दुकानदार अगर विणकर गिरणीमालकांपासून कापड अगर सूत विकत घेतात; कारण, गिऱ्हाइकाला कापड विकून अगर कापड तयार करून विकून जी किंमत येईल ती गिरणी–मालकाला दिलेल्या कापडाच्या अगर सुताच्या किंमतीपेक्षां जास्त असेल याच आशेवर; आणि जी जास्त रक्कम राहील तेंच त्यांचें उत्पन्न. याप्रमाणें ही सांखळी शेवटीं जो वस्तूचा उपभोग घेतो (consumes) त्याच्यापर्यंत वाढवितां येईल. म्हणजे सर्व खटाटोप जो उपभोग घेणारा त्याच्याकरितांच असतात, तोच अखेरचा मुक्काम; म्हणून सर्व आर्थिक घडामोडी या एका ध्रुवाकडे—उपभोगणाराकडे दिग्दर्शित आहेत. तो या सर्व घटनेचा आत्मा आहे. त्याचे समाधानाकरितां हा सर्व खटाटोप आहे.

मनुष्यमात्र आपला वेळ, आपली संपत्ति व आपले श्रम कसे खर्च करावयाचे

याचा विचार करीत असतो. या त्याच्या विचारावर त्याच्या गरजा—त्याला काय पाहिजे आहे हें अवलंबून असतें. तो आपणास कोणती उपभोग्य वस्तु पाहिजे आहे हें ठरवीत असतो व त्याच्या या निर्णयावर जगाचा बाजारहाट, उत्पादन—सर्व आर्थिक यंत्र अवलंबून असतें. हजारों माणसांचे असे हजारों निर्णय या आर्थिक व्यवहारांचें माप व मर्यादा ठरवीत असतात. हे निर्णय क्षणाक्षणाला होतच असतात व त्यांवरूनच सर्वसामान्यतः वस्तूची किंमत ठरविली जाते. समजा, एका स्त्रीला रेशमी साडी किंवा एखादा दागिना अशी एक वस्तु घ्यावयाची आहे. तिची पसंतीच तिनें घेतलेल्या वस्तूची किंमत ठरविते: साडी पसंत केल्यास त्या साडीची किंमत दागिन्याइतकी झाली; उलट दागिना पसंत केल्यास त्याची किंमत साडीइतकी झाली. साडी न घेतां दागिना घेण्यांत, जितकें समाधान तिला साडी घेण्यानें झालें असतें तितकेंच समाधान दागिना घेण्यानेंही झालें; म्हणजे त्या समाधानाचें मोल दागिन्याइतकेंच झालें असें सिद्ध होतें. समजा, एखाद्यानें सुट्टींत काम केलें व त्याचे मेहनतान्यांतून एक फोनो घेतला तर त्याच्या दृष्टीनें फोनोची किंमत सुट्टीच्या दिवसांइतकी झाली. आपण शेतकऱ्याचें उदाहरण घेऊं. बाजरीऐवजीं, समजा, त्यानें तेवढ्याच क्षेत्रांत शेंगदाणा पिकविला; याचा अर्थ त्याच्या शेंगदाण्याची किंमत ( Cost ) त्याच्या न पिकविलेल्या बाजरीइतकी झाली. मनुष्यमात्र पसंतीनें म्ह० स्वतःच्या अखेरच्या निर्णयानेंच त्या त्या वस्तूची किंमत—ऐन किंमत ठरवीत असतो व ती न पसंत केलेल्या अखेरच्या वस्तूइतकी असते. ही सापेक्षता व तुलना सर्व व्यवहारांत महत्त्वाची आहे. मनुष्य आपल्या खासगी जीवनांत जसे निर्णय घेतो, त्याचप्रमाणें त्याच्या धंद्यांतहि त्याला निर्णय घ्यावे लागतात. त्याचे खासगी निर्णय अनेक प्रकारचे असू शकतील. उदा०—आपल्या वेळापैकीं किती विश्रांतीकडे व किती श्रम करण्यांत खर्च करावा,—आपल्या उत्पन्नापैकीं किती शिल्लक ठेवावें व किती चालू खर्चांत घालावें,—उत्पन्न शिल्लक टाकल्यास ती शिल्लक रोख असावी कां रोख्यांत असावी अगर अन्य तऱ्हेनें गुंतवावी,—चालू खर्च तरी कसा करावा, काय घ्यावें,—यांवर त्याचें जीवन अवलंबून असतें; तसेंच या निर्णयांचे सामाजिक व आर्थिक परिणामही आहेत व ते अनिवार्य आहेत.

व्यक्तींना जशा कांहीं गोष्टी ठरवाव्या लागतात, निर्णय घ्यावे लागतात त्याचप्रमाणें धंदेवाल्यांनाहि निर्णय घ्यावे लागतात. आपल्या कारखान्यांत कोणता माल तयार करतां येईल, किती करतां येईल, कोणत्या प्रमाणावर करतां येईल, कारखान्याची संघटना कशी राहावी, तो कोठें असावा, मजूरसंबंध कसे ठेवावे वगैरे गोष्टी त्यांस ठरवाव्याच लागतात. मात्र जास्तींत जास्त नफा कसा होईल याच दृष्टीनें त्यांचे निर्णय

प्रेरित झालेले असतात. हे त्यांचे निर्णय त्यांच्या अभिरुचींवर अवलंबून नसून नफा मिळविणें हा त्यांचा हेतु असल्यामुळें ते सामाजिक व आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असतात. तसेंच त्यांचे परिणामही आर्थिक व सामाजिक असतात. त्यांचे निर्णय वरील परिणामांसंबंधांत, कांहींचें कारण व कांहींचें कार्य असे उभयविधस्वरूपी असतात.

खासगी व्यक्तीचे निर्णय असोत अगर धंद्यांतील व्यक्तीचे असोत त्यांचे अखेरचे परिणाम आर्थिक व्यवहारावर होतातच. समाजापुढें उत्पादन—उपभोग्य वस्तूंचें उत्पादन हा सर्वांत मोटा प्रश्न आहे. प्रत्येक व्यक्तीला साहजिक जास्तींत जास्त वस्तूंची इच्छा असते व समाजांतील सर्व व्यक्तींना त्या पुरविणें शक्य नसतें. एक तर सर्वांनीं त्यागी होऊन आपल्या गरजा अत्यल्प केल्या पाहिजेत, नाहीं तर सर्व गोष्टी सृष्टीनें तयार करून कल्पवृक्षाप्रमाणें दिल्या पाहिजेत; पण या गोष्टी शक्य नाहींत. 'श्रीमंतांना कांहीं कमी नाहीं, गरिबांना कांहीं मिळत नाहीं!' ही विषमता आज दिसते. असें कां? अवश्यक वस्तु कां मिळूं नयेत? सर्वांना संपूर्ण प्रमाणांत त्या कां मिळूं नयेत? वस्तुस्थिति अशी आहे कीं हवा, उजेड, पाणी वगैरे ज्या गोष्टी सृष्टीनें दिल्या आहेत त्या सोडून दिल्यास उपभोग्य वस्तु उत्पादन कराव्या लागतात, त्या मानवी श्रमानें तयार कराव्या लागतात आणि या वस्तु तयार करावयाच्या म्हणजे कांहीं घटक—उत्पादनाचे घटक ( Factors of Production ) अवश्यक आहेत; जमीन, श्रम, यंत्रसामग्री वगैरे. जर हे घटक, ही सामग्री विपुल प्रमाणांत असेल तर उपभोग्य वस्तुही समाजांतील सर्व लोकांना पुरतील इतक्या तयार करतां येतील; पण या घटकांना मर्यादा आहेत. मनुष्य जास्तींत जास्त किती श्रम करील यालाही मर्यादा आहे. पुनः लोकसंख्या वाढली तर लागलीच वस्तूंची मागणीही वाढणार. जमीन ही मर्यादित आहे, अन्य सर्व वस्तुही मर्यादित आहेत व त्यामुळें उपभोग्य वस्तूंचें उत्पादनही मर्यादितच राहणार. तथापि याही परिस्थितींत समाजाला या बाबतींत विचार करावा लागतोच, निर्णय घ्यावे लागतातच. किती जमीन पड ठेवावी, किती लागवडीस घ्यावी, तींत कोणतीं पिकें काढावीं, गांवठाण किती असावें, गायरानें किती असावीं, कारखान्यांत काय तयार व्हावें, दारूगोळा कीं कापड, संहारक वस्तु कीं सुखसंवर्धक वस्तु वगैरे गोष्टी ठरवाव्या लागतात व त्याही तुलनेनें व सापेक्षतेनें. समाज ज्या मानानें व ज्या पद्धतीनें हे निर्णय घेईल त्यावरच समाजाचें सुख व स्थैर्य अवलंबून राहतील.

जगांतील पुढारलेलीं व सुधारलेलीं राष्ट्रें हे उत्पादनासंबंधींचे निर्णय कसे घेतात व घेत आलीं, उत्पादक घटकांची योजना व त्यांचें संघटन निरनिराळ्या देशांत कसें होत आहे व विद्यमान उत्पादक घटकांचा व सामग्रीचा जास्तींत जास्त उपयोग कर-

ण्याचा प्रश्न कसा सोडविला जात आहे हें आपण विस्तारशः पाहावयाचें आहे; कारण उत्पादन हें जो उपभोगी म्हणजे गिऱ्हाईक—जो सर्व आर्थिक जगाचा राजा आहे त्याची राजलक्ष्मी आहे. या सर्व प्रकारांत राजसत्तेचें स्थानही काय आहे हें आपण पाहिलें पाहिजे. त्याचप्रमाणें उत्पादित वस्तु व त्यांचें नियंत्रण करणारी किंमत—भाव यांचे परस्परसंबंध व एकमेकांवर अवलंबून राहण्याचा धर्म व स्वभाव, हेही अभ्यासिले पाहिजेत. उत्पादनाला अवश्यक असणारें भांडवल व तें पुरविणाऱ्या पेढ्या, त्याचप्रमाणें मजूर व त्यांच्या संस्था, यांचाही परामर्ष हें सर्व विशाल जीवन निरीक्षितांना घेतला पाहिजे. उत्पादन व त्याच्या घटकांचें संपूर्ण व सोइस्कर संघटन हा आजकालचा मोठा प्रश्न आहे. आपण पाहत आहों कीं, राष्ट्राराष्ट्रांत हा प्रश्न जीव नकोसा करीत आहे. विपुलता व दुर्भिक्ष्य, अमाप श्रीमंती व अमर्यादित दारिद्र्य एकाच देशांत वावरत आहेत. आज उपभोग्य वस्तूंचें उत्पादन कमी आहे असें नाहीं. सन १९२९–३० सालीं अमेरिकेंत व इतर देशांत शेंकडों टन गहूं व इतर खाद्य पदार्थ नष्ट करण्यांत आले; कारण त्यांना भाव नव्हता. त्याच वेळीं अन्य देशांत शेंकडों लोक उपाशी अगर अर्धपोटी होते. कांहीं ठिकाणीं मालाला भाव नाहीं, तर कांहीं ठिकाणीं मालच नाहीं; ‘ मजूर बेकार, कारखाने बंद, बँकांचीं दिवाळीं, सर्वत्र हाहाःकार ’ ही सर्व घटना, ही भीषण परिस्थिति, कैक वर्षे सतत कांहीं ठिकाणीं पुनः पुनः होत आहे हें कां? या सर्व आर्थिक व्यवहारांत कांहीं नियमितता आहे, कीं हें सर्व चक्र कोणी तरी अमानुष शक्ति फिरवीत आहे? हे कटु प्रसंग कां यावे? हें कां व्हावें? यांतून मानवांना, राष्ट्रांना सुटका आहे कां नाहीं?

जगांतील विचारवंत लोकांपुढें हा प्रश्न असून निरनिराळीं राष्ट्रें तो सोडविण्याचा प्रयत्न दोन दृष्टींनीं करीत आहेत. हे ओले दुष्काळ येऊं नयेत, उत्पादन आणि समाजाची गरज यांत कांहीं निश्चितपणा असावा, हा व्यवहार निव्वळ विचाररहित नसावा, या सर्व आर्थिक व्यवहारामागें एक विचारपूर्ण योजना असावी असा एक विचार, एक दृष्टिकोण आहे. या दृष्टीनें आज सोव्हिएट रशियानें आपला आर्थिक व्यवहार चालविला आहे. एका मध्यवर्ति केंद्रानें—मग तें व्यक्ति असो अगर कमिटी असो—सर्व नियोजन केलें पाहिजे. राष्ट्रांतील कच्चा माल, यंत्रसामग्री, अवश्यक खेळतें भांडवल, कुशल कारागीर व मजूर, व्यवस्थापक मंडळी, कल्पक व योजक यांची गणना केली पाहिजे. राष्ट्रांतील उत्पादनशक्ति एका पद्धतींत आणल्या पाहिजेत. समाजांतील गरजा, विद्यमान व आगामी, मोजल्या पाहिजेत, ठरल्या पाहिजेत व त्यांची व उत्पादनघटनेची सांगड व समास योग्य रीतीनें जोडला पाहिजे. पण हें केवढें प्रचंड

काम आहे! राष्ट्रांतील जमीन किती पडीक, किती लागवडीसाठीं, किती जंगलाकरितां यांचा तक्ता पाहिजे. पीक कसें व किती, यंत्रसामग्री परराष्ट्रांतून मागविणें झाल्यास त्यांना तीबद्दल किंमतीदाखल द्यावा लागणारा कच्चा माल कसा व किती यांचें टिपण हवें. नवीन कारखाने अगर जुन्यांची वाढ, त्यांसाठीं अवश्यक असणारे कारागीर, त्यांचें शिक्षण व त्यांच्या राहण्याची व्यवस्था, नवीन शहरें, नव्या सोयी, एक नाहीं हजार गोष्टी विचारांत घ्याव्या लागतील. या सर्व गोष्टींची माहिती, संपूर्ण पाहणी, तिचें वर्गीकरण——केवढा व्याप आणि कांहींच्या दृष्टीनें केवढा उपद्व्याप, हें कां तें, कोणता माल राष्ट्राला अवश्यक, कोणता माल आंतरराष्ट्रीय क्रयविक्रीसाठीं, हे व असे हजारों निर्णय घेतले पाहिजेत. ते घेणें अवश्यक आहे; त्यांशिवाय योग्य व शास्त्रीय नियोजन शक्य नाहीं. या कामासाठीं शेंकडों माणसें, पाहणी करणारे व टिपणारे तज्ज्ञ, किती तरी प्रादेशिक व पदार्थविषयक समित्या लागतील. उदा०, कारखान्यांना किती वीज लागेल? ती अपुरी असल्यास नवीन विजेचीं केंद्रें निर्माण करणें. कोळसा पाहिजे असल्यास किती? मजुरांची विभागणी करण्यास समिति व या सर्व समित्यांच्या माहितीचें, विधानांचें एकीकरण करून हें सर्व नियोजन अगदीं यंत्राप्रमाणें चाललें पाहिजे; आणि या सर्व गोष्टी होत असतां हा येवढा खटाटोप ज्यांच्याकरितां आहे त्या गिऱ्हाइकांच्या, त्या समाजाच्या गरजेस हें सर्व जमलें पाहिजे. गिऱ्हाईक सर्वसामान्यपणें किंमतीच्या मानानें वस्तु घेतें; अवश्यक वस्तु किंमतीचा विचार न करतांच त्याला घ्याव्या लागतात व त्या घेतांना बाजारभावापेक्षां स्वतःच्या गरजेचा तें अधिक विचार करतें. ज्या राष्ट्रांत आर्थिक नियोजन नाहीं तेथें गिऱ्हाइकांच्या पसंतीवर माल तयार होत जातो व त्यांच्या घेण्या न घेण्यावर बऱ्याच अंशीं किंमत अवलंबून असते. अर्थातच नियोजनी व्यवहारांत ही गिऱ्हाइकांची पसंती आधीं कशी ओळखावयाची हा मोठा प्रश्न असतो व तोही सोडवावा लागतो. गिऱ्हाइकांच्या इच्छाही समजून घेतां येतात. जाहिरातीनें, नमुन्यांनीं वा अन्य मार्गांनीं पसंती ओळखतां येते. उत्पादित झालेलें घेतलेंच पाहिजे असें होतां कामा नये व खऱ्या शास्त्रीय नियोजनांत तसें होतही नाहीं. नियोजन, नियोजित उत्पादन अगर योजनापूर्ण व्यवहार यांविरुद्ध विचारसरणी म्हणजे सर्वतंत्र स्वतंत्र 'बिनमेळ बाजार'. ज्याला वाटेल तें व वाटेल तितकें त्यानें पिकवावें, उत्पादन करावें, वाटेल तो भाव लावावा, गिऱ्हाइकानें पटल्यास घ्यावें, भावाची निश्चिति नाहीं, माल मिळेल याची खात्री नाहीं, कारखाने आज २४ तास चालतील, उद्यां बंद होतील, अनिरुद्ध सतत व्यवहाराचा प्रवाह नाहीं, आज तुफान जोर, उद्यां अवर्षण, ही परिस्थिति म्ह० थोडक्यांत अनियंत्रित व्यवहार होय. तथापि विद्यमान जगांत

इतकी अनवस्था नाहीं. राजसत्तेनें (State) कांहीं व्यवहार नियमित केले आहेत, कायद्याच्या मर्यादा घातल्या आहेत. कोणी कोणाचें धन लुटूं शकत नाहीं, प्राणहानि करूं शकत नाहीं. अशी स्थिति जर नसती, तर सर्वत्र बलभीमांचेंच राज्य चाललें असतें; जग सुधारलें नसतें, उद्योगाची वाढ झाली नसती. पिकविलेलें पदरांत पडेल याची खात्री नसती तर कोणीं पिकविलेंच नसतें. आपल्या श्रमाचा कांहीं तरी मोबदला आपल्यास मिळतो, राजसत्तेच्या योगें तो राहूं शकतो यांतच वित्ताचें व मालमत्तेचें स्थैर्य आहे. ही मालकी अशा रीतीनें जन्मास आली आहे. राजशासनाचे नियमानुसार, आपल्या वस्तूंच्या मालकीचा उपभोग घेण्याचा हक्क सर्वमान्य आहे. आपली वस्तु अगर इस्टेट आपण विकूं शकतों. पण ही मालकी किती असावी, मालमत्तेचा व्याप वा विस्तार किती असावा, ज्या वस्तूंचा उपयोग सार्वजनिक आहे, जे उत्पादक घटक सर्व जणांच्या उपयोगाकरितां आहेत त्यांची मालकी खासगी असावी कीं शासन-संस्थेची, हा प्रश्न उपस्थित होतो. समजा, जर या देशांतील रेल्वे एका माणसाच्या अगर कांहीं थोड्या खासगी व्यक्तींच्या मालकीच्या झाल्या तर समाजाचें व राष्ट्राचें त्यांत हित नाहीं. अशा सर्व गोष्टी सामाजिक मालकीच्याच झाल्या पाहिजेत हा नवीन जगाचा—आधुनिक जगाचा सर्वमान्य निर्णय आहे. जर उत्पादन खासगी स्वरूपाचें राहिलें तर त्यांत नियमन नसतें; राष्ट्राची सामुदायिक गरज हा विचार त्यांत येत नाहीं, किंबहुना हें तंत्र सर्वस्वीं गिऱ्हाइकांवर अवलंबून राहतें. त्यांत संबद्धता नाहीं, सुसंगतताही नाहीं. ज्यास जें फायदेशीर वाटेल तें त्यानें उत्पादावें, विकावें; सामाजिक हितबुद्धि त्यांत येऊं शकत नाहीं. नफा हेंच एक गमक, हेंच एक माप, किंबहुना हीच एक प्रेरक व कारक शक्ति होते आणि अशा परिस्थितींत शक्य तितक्या कमी खर्चात जास्तींत जास्त उत्पादन हाच मूलमंत्र होतो. त्याचा परिणाम उत्पादक घटकांपैकीं मजुरांच्याच मजुरीवर होतो. त्यांतही स्पर्धा अनिवार्य असल्यामुळें सर्वत्र बेबंदशाही, प्रत्येकाचा हात प्रत्येकाच्या गळ्यावर, खिशावर राहणार!! आणि हें अपरिहार्य स्वरूप राष्ट्रांतील उत्पादन सर्वस्वीं खासगी व्यक्तीकडे राहण्यानें उत्पन्न होतें. सरकारनें—शासनसंस्थेनें यथातथा नियंत्रण करण्यानें या पद्धतीचें खरें व मूलभूत स्वरूप बदलत नाहीं; आणि ज्या ठिकाणीं उत्पादनावर सरकारी मालकी नाहीं, नियंत्रण पण यथातथाच आहे अशा राष्ट्राची समाजपद्धति—आर्थिक व्यवहार भांडवलशाहीचाच होय; याचा संपूर्ण विचार पुढें होणारच आहे. तूर्त जेथें नियोजन नाहीं तेथें सर्व आर्थिक तंत्र किंमत व बाजारभाव—वस्तूंना येणारा बाजारभाव यांवरच अवलंबून असतें, गिऱ्हाईक काय पसंत करील व काय किंमत देईल या अनिश्चित गोष्टी-

वरच उत्पादनाचा सर्व प्रपंच अवलंबून राहतो हें सांगतो. बाजारभाव कसा ठरतो व त्याच्या क्रिया व प्रतिक्रिया काय हें पाहणें म्हणजेच अर्थशास्त्रांतील मोठ्या सिद्धांताचें स्वरूप समजून घेणें होय.

आधुनिक जगांत दळणवळण वाढलें आहे, वाहतुकीची साधनें वाढलीं आहेत, राष्ट्राराष्ट्रांतील संबंध खोल व व्यापक झाले आहेत. आज कोणतेंही राष्ट्र अगदीं अलग राहूं शकत नाहीं, किंबहुना जगाची अशी एक बाजारपेठ उत्पन्न झाली आहे तिचाही परिणाम प्रत्येक राष्ट्रांतील आर्थिक व्यवहारावर होत आहे. राष्ट्रांतील पदार्थांचे भाव आज मोठ्या अंशानें जगाची बाजारपेठ ठरवीत आहे; या दृष्टीनें बाजारभावाचा सिद्धांत समजून घेतांना आंतरराष्ट्रीय व्यापार, उत्पादन व भाव लक्षांत घेतले पाहिजेत व शास्त्रीय दृष्टीनें याही गोष्टींचा समावेश अर्थशास्त्राच्या कक्षेंत येणें अपरिहार्य आहे, अवश्य आहे. ज्या राष्ट्रांतून खासगी उत्पादन आहे, जीं राष्ट्रें भांडवलशाही आहेत, त्या ठिकाणीं संपत्तीची विषमता कशी निर्माण होते, तेथील नीति, तेथील कायदे, तेथील सामाजिक संस्था या सर्व कशा भांडवलशाहीच्या ऋद्धिसिद्धि होतात हेंही पाहिलें पाहिजे. सांपत्तिक विषमता व ती कायम करणारा वारसा हक्काचा कायदा सर्व नागरिकांना सारखी संधि कशी मिळूं देत नाहीं व त्यामुळें राष्ट्रांतील बुद्धि, तेज, कल्पकता, कार्यक्षमता, हीं सर्व संधीअभावीं कशीं नाश पावतात याचेंही दिग्दर्शन व विवेचन केलें पाहिजे. भांडवलशाही राष्ट्रांत कांहीं विशिष्ट अवस्थेंत संपत्तीचें केंद्रीकरण थोडया व्यक्तींचे हातांत होतें व त्यामुळें मक्तेबाजी अपरिहार्य होऊन जनतेचें अकल्याण कसें होतें हेंही समजून घेतलें पाहिजे. त्याचप्रमाणें उत्पादनावर राष्ट्राची मालकी अगर ताबा नसला म्हणजे कोणती आपत्ति राष्ट्रावर येते, भांडवलवाले निव्वळ आर्थिक व्यवहारांतच धुडघूस घालून न थांबतां सर्व राजसत्तेला आपली 'संदेशवाहिका' दासी कशी बनवितात व राष्ट्रांतील दलित बहुजनसमाजाच्या—दडपलेल्या बहुजनसमाजाच्या भडकलेल्या भुकेच्या आगीवर आपल्या नफ्याची पोळी कशी भाजून घेतात याचा करुण व एकप्रकारें दारुण इतिहासही आपण निरीक्षिला पाहिजे. कांहीं राष्ट्रांनीं या भांडवलशाहीला, या सर्वभक्षक नफेबाजीला आळा घालण्याचे प्रयत्न केले आहेत. त्यांना त्याहूनहि जास्त करतां आलें असतें; पण—पण यांतच भांडवलशाहीचें सर्व रहस्य आहे, तें आपण उकललें पाहिजे. श्रीमंतांवर कर, वारसा–कर, मक्तेबाजीला कायद्यानें आळा वगैरे इलाज दिसतात, पण त्या वरवरच्या मलमपट्ट्या आहेत; मूळ क्षयरोग कायम आहे. कांहीं ठिकाणीं भीतभीत सरकारनें—शासनसंस्थेनें आपल्या हातांत कांहीं उत्पादन, कांहीं मक्ते घेतले आहेत; पण त्यानें मूलभूत प्रश्न सुटलेला नाहीं.

हा आर्थिक घटनेचा, आर्थिक व्यवहाराचा प्रश्न सांगोपांग समजून घ्यावा, त्याच्या अंगोपांगांचें संपूर्ण व सुबोध विवेचन करावें हाच या लिखाणाचा हेतु आहे. ज्या भांडवलशाही पद्धतींत सर्व मदार भावावर, बाजारभावावर आहे तिचें स्वरूप, त्याचप्रमाणें बाजार, त्यांची संघटना, उत्पादन, मागणी, पुरवठा, संघटना, चलन, क्रयविक्रय, वगैरे सर्व प्रश्नांचा—ज्यांचा समावेश अर्थशास्त्रांत होतो–ऊहापोह शास्त्राला धरून पण सोप्या रीतीनें करण्याचाही उद्देश आहे. नवीन जग निर्माण होत आहे. त्यांत आपल्या राष्ट्राचें स्थान अभिमानाचें व कर्तृत्वाचें राहावें हें ध्येय आहे आणि तें खरें करावयाचें झाल्यास राष्ट्रांतील सर्वसामान्य व्यक्तींना सुद्धां आधुनिक अर्थशास्त्र, त्याचीं मूलतत्त्वें, त्याचा विकास व व्याप समजणें अवश्य आहे; आणि म्हणूनच हा उपक्रम आहे.

---

# १. बाजारपेठ

सर्व उत्पादनाचा हेतु उपभोग्य वस्तु तयार करून गिऱ्हाइकांस पटविणें हा आहे. गिऱ्हाइकांकडून जास्तींत जास्त फायदा होईल अशा रीतीनें किंमत मिळविणें हा विकणाराचा हेतु असतो, तर गिऱ्हाईक कमींत कमी किंमत देऊन वस्तु घेणें हा हेतु बाळगून असतें; आणि ही सर्व झटापट, दरक्षणीं जेथें क्रयविक्रय चालू आहे तेथें चालू आहे; आणि असे व्यवहार ज्या ठिकाणीं होतात त्यांना आपण 'बाजार–पेठ' अगर बाजार म्हणतों; तेथें वस्तूंचा विकत घेणें व विकत देणें असा व्यवहार चालतो. फुले मार्केटमध्यें सकाळपासून संध्याकाळपर्यंत फळें, भाजी, किराणा माल वगैरेंची खरेदीविक्री चालू असते. त्याच ठिकाणीं घाऊक खरेदी–विक्री तसेंच किरकोळ खरेदी–विक्री चालू असते. कांहीं ठिकाणीं विशिष्ट वस्तूंचाच व्यवहार चालतो. उ०, भवानी पेठ लक्ष्मीबाजार येथें मेंढे व बकरीं यांची, तर भवानी पेठ गूळआळी येथें फक्त गुळाचीच खरेदी–विक्री चालते. पण याव्यतिरिक्त सुद्धां एका विशिष्ट तऱ्हेनें पदार्थांची खरेदी–विक्री होत असते. शेअर–बाजार, कॉटन–एक्स्चेंज (कापूस–बाजार), नाणें–बाजार तसेंच जेथें मजूर मिळतात ती जागा. उदा०, बुधवार–बाग हाही एक मजूर–बाजार आहे; कारण किंमत देऊनच मजुरी घ्यावयाची असते. आतांपर्यंत आपण स्थलवाचक अर्थानें उदाहरणें दिलीं; पण येथें राहूनही अमृतसरचा गहूं वा कऱ्हाडचा शेंगदाणा तारेनें अगर टेलिफोननें व्यापारी खरेदी करतात व विकतात. तसेंच कांहीं ठिकाणीं प्रत्यक्ष मालाचा मालक व उपभोगणारें गिऱ्हाईक यांच्या गांठी न पडतांच दलाल त्यांच्या वतीनें परस्पर व्यवहार करतात. उदा०, मंडईतले दांडीवाले गांवच्या दलालांपासून माल घेऊन पाटीवाल्यांस विकतात; पाटीवाले तो घरोघरीं विकतात. मला टाटा–कंपनीचे भाग घ्यावयाचे आहेत; मी मुंबईच्या शेअर–दलालास सांगतों. मद्रासच्या इसमास त्याच कंपनीचे भाग विकावयाचे आहेत; तोही दुसऱ्या दलालास सांगतो; आम्ही आपापल्या जागीं, पण खरेदीविक्री होते मुंबईस. याच दृष्टीनें परदेशांतही खरेदीविक्री दलालांमार्फत होते. तात्पर्य, आजच्या आधुनिक युगांत दळणवळ-

णाचीं साधनें वाढलीं असल्यामुळें देशांतील सर्व भाग पेठेच्या दृष्टीनें एकमेकांवर अगदीं अवलंबून आहेत. सर्व देश हीच एका अर्थानें एकमेव बाजारपेठ होते व त्या त्या वस्तूंची सर्वसाधारण किंमत अगर भाव ठरविते. अमेरिकेच्या कापसाचे भावावर खानदेशच्या शेतकऱ्यांच्या कापसाचा भाव अवलंबून असतो हें खरें असून सुद्धां अशक्य वाटतें. आज अवघ्या कांहीं मिनिटांचे आंत जगांतील सर्व स्थानिक बाजारपेठांतील भाव मिळूं शकतात व त्यांवर घेणारे व विकणारे आपले सौदे ठरवितात. तथापि प्रत्यक्ष व्यवहार सर्वसामान्यत: स्थानिक बाजारपेठेवर अवलंबून असतो. कांहीं पदार्थ हे स्थानिक महत्त्वाचेच असतात, कांहींना राष्ट्रीय मागणी असते, तर कांहींना आंतरराष्ट्रीय. उदा०, बाजरी गुजराथ–महाराष्ट्रांबाहेर जात नाहीं किंवा मोठ्या प्रमाणांत पिकतही नाहीं; गहूं, कापूस, शेंगदाणा यांना सर्व देशभर पेठ आहे, इतकेंच नव्हे तर जगभर मागणी आहे! कांहीं पदार्थांना कांहीं काळ अगर मोसमपरत्वें मागणी असते. उदा०, उन्हाळ्यांत सरबतें, यात्रा–प्रसगीं त्या त्या देवतेला प्रिय असणारीं वायनें अगर गोष्टी. दसऱ्याच्या दिवशीं आपट्याच्या पानांनाही कांहीं तरी पण किंमत येते. तसेंच संक्रांतीस सुगडें. अन्य दिवशीं या वस्तूंची किंमत शून्य! कांहीं वस्तूंना समाजपरत्वें किंमत असते. उदा०, शेले, पैठण्या व धार्मिक विधींना लागणाऱ्या वस्तु; पण या धार्मिक अगर विशिष्ट प्रसंगीं लागणाऱ्या अगर प्रासंगिक वस्तूंचें महत्त्व अर्थशास्त्राच्या दृष्टीनें फारसें नाहींच म्हटलें तरी चालेल. जो विचार करावयाचा आहे तो प्रमुख, सर्वकालीन व व्यापक मागणी ज्यांना आहे अशा वस्तूंबद्दल. आधुनिक युगांत दळणवळणाच्या मुबलक व वेगवान् साधनामुळे, भाव सापेक्षतेनें स्थिर असले तरी दळणवळणाची नेणावळ——त्यासाठीं द्यावें लागणारें भाडें अगर हांशील हाही बाजारभावाच्या दृष्टीनें एक महत्त्वाचा भाग आहे. बंगालमधील कोळसा मुंबईस आणण्याकरितां पूर्वी जितके भाडें पडत असे त्या मानानें विलायतचा कोळसा परवडत असे. आजही अमेरिकेंत कोळसा स्वस्त आहे, पण तो बंदरांत येऊन पडेपर्यंत महाग होतो व त्यामुळें युरोपांत अगर अन्य देशांत जाऊं शकत नाहीं. पंजाबांत अगर यमुना–कॅनॉल–क्षेत्रांत भाजीपाला थोडया खर्चात होतो; पण मुंबईकडे येईपर्यंत त्याची किंमत तसल्याच स्थानिक पदार्थांच्या किंमतीपेक्षां जास्त पडते; व त्यामुळें पुष्कळ वेळां दूरची पेठ परवडत नाहीं; म्हणून स्थानिक भाव कमी होतात, शेतकऱ्यांचें अगर माल तयार करणाऱ्यांचें नुकसान होतें. आगगाडीपेक्षां पाण्यांतील वाहतूक स्वस्त पडते. कलकत्याला भाजीपाला मोंगीर–पाटण्यांपासून येतो. तो नदीमार्गें येतो, स्वस्त पडतो व शिवाय नासधूस कमी होते. खुष्कीच्या मार्गापेक्षां पाण्यांतील वाह-

तूक नेहमींच स्वस्त असल्यामुळें ज्या वस्तु बंदरालगत अगर नदीकिनाऱ्यालगत होतात व जेथें वाहतुकीचीं साधनें आहेत त्या मालांना पेठ लवकर व भाव योग्य मिळतो. नॉर्वेचें कच्चें लोखंड किनाऱ्यापासून थोड्या अंतरावर तयार होतें व त्यामुळें युरोपांतील बऱ्याच देशांना तें विकत घेणें परवडतें. तसेंच इंग्लंडमधील कोळसा कॅनडामध्यें व दक्षिण अमेरिकेंत खुद्द युनायटेड् स्टेट्सूचे कोळशापेक्षां स्वस्त पडतो; कारण इंग्लंडच्या खाणी किनाऱ्यापासून लांब नाहींत. दळणवळणाचीं साधनें ज्या मानानें संघटित व समर्थ त्या मानानें बाजारही संघटित होतो. आजच्या जगांत हजारों वस्तु इकडून तिकडे जात येत आहेत, उत्पन्न होत आहेत व त्यांचा उपभोग होत आहे. 'जेथें जरूर आहे तेथें, जेथें जास्त आहे तेथून' याप्रमाणें या व्यवहाराच्या गतीचा सर्वसामान्य सिद्धांत आहे. प्रत्यक्ष जमीन अगर इमारती जशाच्या तशा इकडून तिकडे जात नाहींत यामुळेंच हिंदुस्थानांतील ही काळी, सु–जला, सु–फला, शस्य–शामला येथें राहिली आहे. नाहीं तर या भांडवलशाहीच्या सर्वभक्षी हालचालींत तीही गेली असती !! तथापि स्थावर वस्तु उ० घरें व जमिनी यांचीही एक पेठ असते, यांचीही खरेदी–विक्री होते; मात्र त्यांची पेठ संकुचित, निव्वळ स्थानिक असते; त्यांच्या किंमतीवर बाहेरच्या स्थावर वस्तूंच्या भावाचा परिणाम फारसा होत नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं पदार्थ नाशवंत म्हणजे फार काळ राहूं शकत नाहींत असे असतात. उदा०, भाजी, फळें, दूध, शिजवलेलीं खाद्यें. यांचा बाजार सामान्यतः स्थानिक असतो. सर्वत्र वाढणाऱ्या उद्योगधंद्यांमुळें आपला देशही यांत्रिक होण्याकडे झपाट्यानें जात आहे. याचा परिणाम म्ह० मोठमोठीं शहरें वाढत आहेत व त्यामुळें त्यांच्याकडे वस्तूंचा प्रवाह जाणें स्वाभाविक आहे. आज हजारों मण भाजी–पाला पुणें, सातारा, कुलाबा व ठाणें या जिल्ह्यांतून मुंबईस जातो. पण जर एक दिवस रेल्वे बंद पडली तर तीच भाजी मातीमोल किंमतीस त्या त्या ठिकाणीं विकावी लागते. नाशवंत वस्तु कांहीं सर्व देशभर जाऊं शकत नाहींत, म्हणून त्यांची पेठही थोड्या व्यापक अर्थानें स्थानिकच समजली पाहिजे; आणि ज्या ठिकाणीं चांगले रस्ते नाहींत, मोटारी अगर रेल्वे नाहींत, नद्यांना पूल नाहींत अशा टापूंत तर अशा वस्तूंची किंमत फारच थोडी येते. हल्लीं बर्फांत फळें ठेवून दीर्घकाल सुस्थितींत ठेवणें, त्याचप्रमाणें रसायनशास्त्राच्या सहाय्यानें त्यांचा टिकाऊपणा वाढविणें वगैरे गोष्टी होत आहेत. पण अद्यापि त्यांचें प्रमाण थोडें आहे. या गोष्टी मोठ्या प्रमाणावर झाल्यास याही वस्तूंची पेठ देशभर होईल. शास्त्रीय शोधांचा तसेंच प्रगतिपर होणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा परिणाम आर्थिक व्यवहारावर होतो; व म्हणूनच हें शास्त्र सापेक्ष आहे व जिवंत आहे.

मजूरवर्गाचीहि एक पेठ असते असें वर सांगितलें आहे. उद्योगाचे दृष्टीनें देशाची जसजशी प्रगति होते त्या मानानें मजूरवर्ग गतिमान् होतो, या गांवाहून त्या गांवीं जाऊं लागतो. मोठमोठे कारखाने होऊं लागले, देशाचे उद्योगधंदे वाढूं लागले म्हणजे मजूरवर्ग वाढतो व त्याबरोबर त्यासंबंधींचे प्रश्न उपस्थित होतात. कारागीर, माहीतगार मजूर, यंत्रकला जाणणारे मजूर, सामान्य मजूर वगैरे विभाग उत्पन्न होतात व निरनिराळ्या उद्योगकेंद्रांतील मागण्यांप्रमाणें, त्यांचें वेतन ठरविलें जातें. तथापि जास्त वेतनाच्या फायद्याकरितां चटकन देश सोडून परदेशीं जाण्यास मजूर तयार नसतात इतकेंच नव्हे, तर त्याच देशांत व होतां होईल तितकें आपल्या गांवाजवळच्या प्रांतांत काम पाहत असतात व जरूर तर कमी वेतनही पत्करतात. हिंदुस्थानांत ज्यास खरा मजूरवर्ग म्हणतां येईल तो म्हणजे पिढयानुपिढया कारखान्यांत काम करणारा अद्यापि फारच थोडया प्रमाणावर आहे. मजुरी करणारे सवड सांपडल्यास, संप झाल्यास, बेकार झाल्यास अद्यापि गांवीं जातात. त्यांच्या मनांची ओढ, विचारांचीं व संस्कृतींचीं पाळेंमुळें अद्यापि खेडेगांवांत आहेत; तीं नष्ट झालेलीं नाहींत. त्यामुळें दळणवळणाचे परिणाम पदार्थांच्या क्रयविक्रयावर व किंमतीवर जसे झाले आहेत तसे व त्या प्रमाणांत मजूरवर्गावर झालेले नाहींत. मुंबईंत गिरणींत काम करणारा मजूर कामासाठीं क्वचित्च मुंबईबाहेर जातो. एकदां तो चिकटला कीं तेथेंच जमवून राहण्याची त्याची प्रवृत्ति असते. या दृष्टीनें मजुरांची बाजारपेठ ही स्थानिक समजावयास पाहिजे. त्यांच्या उलट कारकुनी पेशा करणारे मध्यमवर्गीय. यांच्या बाबतींत मात्र दळणवळणाच्या आधुनिक साधनांचा फारच परिणाम झाला आहे. दरमहा रु. ३०च काय पण रु. २०वरही मद्रासी अय्या मथुरेस जाण्यास तयार असतो व अनेक जण तयार असल्यामुळें या वर्गाच्या लोकांचा मुशाहिरा—बाजारभाव—कमी झाला व त्यांची पेठ स्थानिक न राहतां देशभर झाली. तथापि मजूरवर्गाची पेठ ही वर सांगितल्याप्रमाणें स्थानिक स्वरूपाचीच राहते. रेल्वे, ट्रॅम्वे व बसेस या सर्व सोयी जरी असल्या तरी मजुरांचे बाबतींत वर जें स्वरूप सांगितलें त्यांत त्या फरक करूं शकत नाहींत.

आधुनिक वाहतुकीच्या वरील व अन्य सर्व साधनांना सुद्धां कांहीं वस्तूंच्या बाबतींत मर्यादा असतात. उदा०, गॅस, पाणी—पुरवठा व वीज या गोष्टी कांहीं वाहतुकीच्या साधनांनीं (जर तारा किंवा नळ टाकले नसतील तर) एका ठिकाणाहून दुसरीकडे नेतां येत नाहींत. त्यांच्या बाबतींतही पेठ अगर गिऱ्हाईक हें स्थानिकच असणार. टाटा—कंपनीची वीज जरी कितीही स्वस्तांत बोरघाटांत तयार होत असली तरी

रेल्वेनें अगर बसनें ती वाटेल तेथें विकण्यास नेतां येणार नाहीं. जेथें व जेथपर्यंत तारा नेतां येतील तेथपर्यंतच तिचा उपयोग, तिची विक्री व तेवढीच तिची पेठ; आणि त्या दृष्टीनें ती स्थानिकच. पण त्याचबरोबर जेथें वीज स्वस्त मिळूं शकते त्या ठिकाणीं कारखाने जातात वा नवीन तयार होतात; तें औद्योगिक केंद्र होतें. माल गिऱ्हाइकाकडे न जातां गिऱ्हाईक मालाकडे जाऊं लागतें असाही प्रकार होतो. पुष्कळ वेळां स्थानिक, म्हणजे जागतिक अगर आंतरराष्ट्रीय भावाचा जीवर परिणाम होत नाहीं अशी, पेठ आपलें संकुचित स्वरूप टाकून एकदम मोठ्या प्रवाहांत सांपडते. समजा, हिंदुस्थानांत आपण आपल्या देशास लागणारें सर्व प्रकारचें कापड तयार करीत आहों. ही कापडपेठ राष्ट्राच्या दृष्टीनें स्थानिकच आहे. इतर देशांत तयार होणारें कापड, जर त्याच्या आयातीवर मुळींच कर नसेल किंवा थोडा असेल तर, मोठ्या प्रमाणांत या देशांत येईल व येतेंही; व तसें झालें म्हणजे येथें तयार होणाऱ्या कापडाचा भाव जगाच्या कापडाच्या भावावर सरळ अवलंबून राहील. मग आपली पेठ कापडाच्या बाबतींत जागतिक पेठ झाली, तिचा एक भाग झाली. त्याचप्रमाणें आयातीचा कर फार मोठा झाल्यास स्थानिक कापडाचा भाव त्या मानानें वाढेल व जर बाहेरचें कापड स्वस्त होऊन मोठ्या प्रमाणांत येऊं लागलें तर पुनः भाव जगाचे भावावर अवलंबून राहील. हल्लीं कांहीं ठिकाणीं निरनिराळ्या राष्ट्रांत करारमदार होऊन कोणीं किती माल धाडावा हें ( Quota ) ठरवून घेतात; असें झालें म्हणजे मात्र त्या वस्तूंच्या बाबतींत देशांतील बाजाराचें स्वरूप स्थानिक राहतें व जगाच्या किंमतींशीं अगर भावाशीं त्याचा संबंध येत नाहीं. गेलीं कांहीं वर्षें इंग्लंडनें हिंदुस्थानपासून किती कापूस घ्यावा व या देशांत किती कापड धाडावें हें तहनाम्यानें ठरलें आहे. त्याचप्रमाणें जपाननें या देशांत किती कापूस खरेदी करावा व किती कापड येथें खपवावें हेंही ठरलें आहे; यामुळें कापडाच्या बाबतींत आपली पेठ कांहीं अंशीं स्थानिक झाली, जगाच्या तद्विषयक भावापासून अलग राहिली. अर्थात् सर्वसामान्य गिऱ्हाइकावर याचा परिणाम काय झाला याचा विचार निराळा. तो योग्य वेळीं होईलच. येथें आपण बाजारपेठ व विशेषतः स्थानिक पेठ आणि व्यापक म्हणजे जागतिक पेठ यांचा परस्पर–संबंध काय यासंबंधीं विचार करीत आहों.

या सर्व गोष्टींचा विचार करीत असतांना ज्या वस्तूंचा क्रयविक्रयादि व्यवहार होतो त्यांचेंही स्वरूप थोडें समजून घेतलें पाहिजे. अर्थशास्त्राच्या व्यवहाराच्या दृष्टीनें 'वस्तु' म्हणजे काय ? अर्थशास्त्र म्हणजे वस्तूंचा मनुष्यांशीं संबंध येतो त्याचा विचार करणारें शास्त्र, असें त्याची व्याख्या म्हणून नव्हे तर एका तऱ्हेनें वर्णन म्हणून म्हणतां

येईल. म्हणून जी वस्तु मनुष्याच्या व्यवहारांत—देवघेवींत येते, जिचा विनिमय होतो, तिचाच विचार करणें आहे; जी वस्तु कांहीं न देतां मुबलक मिळते उ० हवा, तिचा विचार अर्थशास्त्र करीत नाहीं; पण मुबलक असूनही किंमत पडली व तिच्या बाबतींत देवघेव झाली म्हणजे तिला एक प्रकारचें नवीन स्वरूप येतें; तिला सामाजिक स्वरूप येतें, ती एकदम अर्थशास्त्राच्या कक्षेंत येते व लागलींच या शास्त्राचे धर्म तिला लागू पडतात. तसेंच एकदां वस्तु म्हटली म्हणजे तिच्यांतील अनेक भागही तींत समाविष्ट होतात. उ० गहूं, लोंकर, कापूस, रोटी, तंबाखू, भाजीपाला यांचे अनेक प्रकार असतात व निरनिराळे प्रकार निरनिराळ्या प्रसंगांनीं किंवा आवडींमुळें, अभिरुचींमुळें अथवा संस्कृतींमुळें त्या त्या गिऱ्हाइकांना पसंत पडतात; प्रसंगविशेषीं एकाऐवजीं दुसरा भाग, अगर दोन्ही तऱ्हा गिऱ्हाईक घेतें व या गोष्टीचा परिणाम त्या त्या वस्तूंचे भावावर होतो, त्या प्रत्येक तऱ्हेचे भावावर होतो; म्हणून ज्या ज्या अखेरच्या स्वरूपांत ती वस्तु गिऱ्हाईक उपभोग्य म्हणून घेतें तें अखेरचें स्वरूप असलेली वस्तु ही स्वतंत्रच कल्पिली पाहिजे व तिचा विचार व व्याकरण 'मागणी व पुरवठा' या बाजाराच्या भाषेंत लावलीं पाहिजेत. उ०, आपणांस दुधाच्या पुरवठ्याचा विचार करावयाचा आहे. दूध म्हशीचें कां गाईचें ? नंतर गांवठी म्हशीचें कां दिल्लीवाल्या जाफराबादी म्हशीचें ? तसेंच दूध कोणत्या गाईचें ? पुष्कळ गिऱ्हाइकें दुधाचा विचार करतांना कसाचा व त्याचबरोबर निघणाऱ्या लोण्याचा विचार करतात. म्हणून त्यांना या सर्व गोष्टींची अवश्यकता असते. तसेंच गव्हाचें उदाहरण घेऊं. कांहींना गांवठी गहूं लागतो, तर कांहींना पंजाबी, खपल्या अगर दुसरा. कांचसामानाच्या बाबतींत बऱ्या स्थितींतील गिऱ्हाईक साधारणपणें स्वस्त जपानी मालापेक्षां किंचित् महाग असा इंग्रजी अगर जर्मन माल पत्करितें; कारण त्यांत टिकाऊपणा असतो. पुष्कळ वेळां वस्तु पसंत करण्यांत छांदिष्टपणाही असूं शकेल. मात्र एका वस्तूचे तऱ्हेतऱ्हेचे प्रकार एकाच किंमतीनें अगर भावानें जाऊं शकत नाहींत; कारण, गिऱ्हाइकाची पसंती व आवडनिवड यांचा छाप त्यांवर बसावयाचा असतो. एकीऐवजीं दुसरी तऱ्हा असल्यास तिचा परिणाम भावावर होणार नाहीं. उ०, राकेल दोन कंपन्यांचें, एक सूरज म्ह० सूर्यछाप व एक हत्तीछाप; दोन्ही जवळजवळ सारख्याच प्रकारच्या वस्तु असल्यांमुळें गिऱ्हाईक अमुकच जातीचें राकेल पाहिजे अशी खळखळ घालीत नाहीं; तथापि कारखानदार याही बाबतींत एक नवी हवा उत्पन्न करीत असतात. तीच वस्तु निरनिराळ्या कारखान्यांत तयार झाली, तिला वेगवेगळा 'ट्रेड—मार्क' बसला म्हणजे कारखानदार गिऱ्हाइकांत नवी दृष्टि, नवी रुचि उत्पन्न करतात. उदा० साबण घेऊं. हमाम,

टाटा, सनलाइट, राजमाची, म्हैसोर; तसेंच मोटारी अनेक कारखान्यांतून, कंपन्यांतून, निरनिराळ्या मॉडेलप्रमाणें तयार होतात; ज्यास पेटंट असेल त्यानेंच तशी वस्तु बनवावयाची व ट्रेड-मार्क ज्याला मिळाला असेल त्यानेंच तो उपयोगांत आणावयाचा, असा कायदा असल्यामुळें त्या त्या कंपन्यांचा अगर कारखान्यांचा माल खपतोच, व तेवढ्यापुरती त्यांची मक्तेबाजी होते. वास्तविक तसाच साबण अगर तशीच मोटार अन्यत्र होऊनसुद्धां वरील प्रकारच्या कायद्यामुळें केवळ छापाच्या अभावीं गिऱ्हाईक त्या त्या वस्तु घेत नाहीं व सरळ किंमत जास्त तीच देत असतें. तसेंच एक गोष्ट एका ठिकाणीं ज्या किंमतीस मिळते तिच्यापेक्षां कमी अगर जास्त किंमतीस दुसऱ्या ठिकाणीं मिळते. कारण किंमतींत, वाहतुकीचा, दलालीचा व आयात कर वगैरे बाबतींतील खर्च कमीजास्त आकारला जात असतो. पण या दोन्ही ठिकाणीं वस्तु मूळस्वरूपीं एक असूनही अर्थशास्त्रदृष्ट्या किंमतीच्या म्हणजे भावाच्या भाषेंत दुसरी होते. तसेंच आज एखाद्या वस्तूची जी किंमत असेल ती चार महिन्यांनीं असणार नाहीं. उदा०, शेतकऱ्यांचें धान्य बाजारांत येऊं लागलें म्हणजे जो भाव असतो तो पावसाळ्यांत राहत नाहीं. वर्षांतून भाव असे बदलत असतात. धान्य तयार झाल्याबरोबर प्रत्येक कुटुंब आपणास लागेल तेवढें विकत घेऊं शकत नाहीं व सांठवूं शकत नाहीं; म्हणून जे व्यापारी असतात ते मोठ्या प्रमाणावर घेतात, सांठवून ठेवतात व त्यावर त्यांचा नफा, कोठाभाडें, विम्याचा खर्च, नासधूस वगैरे सर्व गोष्टींचा विचार करून भाव ठरवून मगच व्यक्तिशः किरकोळ गिऱ्हाइकांना विकतात. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं वस्तु गेल्याबरोबर जसा तिच्या किंमतींत फरक पडतो—कारण वाहतुकीचा वगैरे खर्च तीवर येतो—तसाच माल आज घेऊन चार महिन्यांनीं विकणें म्हणजे कालपथावरील वाहतूकच करणें असल्यानें या वाहतुकीच्या खर्चामुळें किंमतीवर परिणाम होतो. जर ही अशी समाजव्यवस्था किंवा आर्थिक व्यवस्था नसती तर सुगीच्या वेळीं स्वस्ताई व अन्य वेळीं महागाईनेंसुद्धां पदार्थ मिळणें कठिण असें झालें असतें; पण हा भावाचा, किंमतीचा चढउतार या व्यापाराच्या पद्धतीमुळें बहुतेक कमी होतो. जरूर पडेल तेव्हांच गिऱ्हाईक माल घेत जातें व त्यामुळें गिऱ्हाइकी व खप अव्याहत व सारखा वर्षभर चालू राहतो. पूर्वीं जेव्हां वाहतुकीचीं साधनें थोडीं व बिनयांत्रिक होतीं तेव्हांपेक्षां आतां तर या बाबतींत पुष्कळच सुधारणा झाली आहे. पूर्वीं हिंदुस्थानांत एका भागांत चिक्कार पीक तर दुसरीकडे दुर्भिक्ष्य असे व वाहतुकीचीं साधनें नसल्यामुळें लाखों लोक भुकेनें व्याकुळ होऊन मृत्युमुखीं पडत. हल्लीं प्रत्यक्ष अन्न नाहीं म्हणून म्हणजे धान्य विकत मिळत नाहीं म्हणून मृत्यु होत आहेत असें

क्वचित्‌च होतें. येथें दुष्काळ पडल्यास ब्रह्मदेशांतून तांदूळ व पंजाबमधून, फार काय कॅनडामधून सुद्धां गहूं, येऊं शकतो व येतो. अर्थात् याचा अर्थ योग्य किंमतीस दुष्काळी भागांत धान्य मिळूं शकतें, इतकी बाजाराची संघटना आपोआप आधुनिक दळणवळणाच्या रेल्वे, जहाजें, मोटारी वगैरे साधनांनीं झाली आहे. तथापि यामुळें जे व्यापारी आहेत, जे मोसमांत वस्तु विकत घेतात व वर्षभर विकतात त्या वर्गाचें महत्त्व व उपयुक्तता कमी झालीं आहेत असें नाहीं. जगाची संघटना जरी असली तरी कांहीं वस्तु सर्व वर्षभर पिकत नाहींत, त्यांचा मोसम ठरलेला असतो. उदा०, कापूस कार्तिकाचे सुमारास सर्वत्र तयार होतो व त्याचा उपयोग सर्वत्र वर्षभर होत असतो. पिकविणारा शेतकरी हा कांहीं तो वर्षभर विकीत बसत नाहीं. मध्यस्थ दलाल हा सर्व माल खरीदतात व वर्षभर विकीत असतात. अर्थात्, भावाचा चढउतार व्याज, भाडें, दलाली व नफा या मानानें असणार; मात्र जेथें सट्टेबाजी आहे त्या ठिकाणीं गोष्ट निराळी.

खरेदी घेणारे व देणारे यांना ज्या बाजारांत काय भाव निघाला आहे हें ताबडतोब कळतें असा बाजार एका दृष्टीनें परिपूर्ण असतो. आपण त्याला ‘सिद्ध’ म्हणूं या. कोण काय भाव काढतो हें ताबडतोब कळत असल्यामुळें व कोणींही कोणासही विकावें व कोणाकडूनही विकत घ्यावें अशी परिस्थिति असल्यामुळें भाव स्थिर राहतो. कारण कोणीं कमी भाव लावला तर ताबडतोब गिऱ्हाईक त्या विक्रेत्याकडे वळतें व त्यामुळें त्याचा परिणाम ताबडतोब सर्वत्र तोच भाव होण्यांत होतो. जो थोडासा आयातकर व वाहतुकीचा खर्च, यांमुळें फेर होत असेल तेवढा बाद करूनच अर्थात् हा भाव स्थिर होत असतो. सिद्ध बाजारांतील व्यवहार उघड व स्पर्धेखालीं होत असतात; म्हणूनच तो बाजार भावांच्या म्हणजे वस्तूंच्या किंमतींच्या दृष्टीनें सिद्ध होतो व त्यास एक प्रकारें पूर्णता येते. बाजारांतील भावांचा फेरबदल ताबडतोब कळणें व त्यास अनुसरून खरेदीविक्री होणें या गोष्टी सिद्ध—परिपूर्ण बाजाराला अवश्य असतात. विकणारे व गिऱ्हाईक यांचा या परिस्थितींत असा संबंध उत्पन्न होतो कीं कोणी अडवणूक करूं शकत नाहीं. भावांचा कांटा दुकानदार व गिऱ्हाईक या दोन्ही पारड्यांत कमीजास्त राहूं देतच नाहीं; अर्थात् वस्तूंचा भाव स्थिर होतो म्हणजे ज्या वस्तु एकाच प्रकारच्या आहेत त्यांचा भाव स्थिर होतो. मागें सांगितल्याप्रमाणें जर त्यांत नाना तऱ्हा असतील तर जी अखेरची तऱ्हा तिचा भाव स्थिर राहील. उदा०, पंजाबी गहूं म्हटलां तर सर्व गव्हांचा भाव स्थिर राहील असा अर्थ नव्हे, तर पंजाबी गव्हाचा स्थिर राहील. दुसऱ्या तऱ्हेचा गहूं असल्यास निराळा भाव; मात्र

त्याच तऱ्हेच्या गव्हाचा पुनः स्थिर राहील. पदार्थांत नवीन शास्त्रीय शोधांमुळें प्रती लावतां येतात तशा लावल्या असल्यास व त्याप्रमाणें व्यवहार होत असल्यास प्रतवार भाव स्थिर राहील. उदा०, तांदूळ. राजावळ, आंबेमोहोर, साळ, जशी प्रत तसा त्याचा भाव निराळा; पण प्रतीनुसार स्थिर; कारण आपण मोकळा बाजार कल्पिला आहे व किंमती ताबडतोब सर्वत्र कळूं शकतात; म्हणूनच असल्या बाजार-पेठेला आपण 'सिद्ध' बाजारपेठ म्हटलें आहे. पुष्कळ वेळां वस्तूंचे नमुने बाजारांत असतात—लोकर, चहा, कॉफी—व त्या त्या नमुन्याबरहुकूम पुनः भाव स्थिर होतात. निश्चित वस्तु व मोकळा बाजार असला म्हणजे सिद्ध बाजार होऊन भाव स्थिर होतात.

याच्या उलट, जेथें वस्तूंचे भाव स्थिर नाहींत तेथें एक दुकानदार एक वस्तु २ रु. ला विकीत असेल तर दुसरा दुकानदार तीच वस्तु १० रु. ला विकील; अशा ठिकाणीं भाव स्थिर नसल्यामुळें बाजारपेठ ही सिद्ध नाहीं, अपूर्ण आहे. गिऱ्हाइकाला अन्यत्र भाव काय आहेत हें कळत नाहीं अगर कळण्याचें साधन नाहीं व दुकानदारांना दुसरा काय भावानें विकतो हें कळत नाहीं तेथें, म्हणजे बाजार असंघटित आहे, अपूर्ण आहे तेथें, भाव स्थिर नसतात. उदा०, मला एक शाकुंतल पुस्तक घ्यावयाचें आहे व तें जुनें पाहिजे आहे. जुनेंच 'शाकुंतल' चार जुन्या पुस्तकांच्या दुकानीं चार निरनिराळ्या किंमतीस मिळेल. तसेंच किरकोळ वाणसवद्याचीं दुकानें, त्याच वस्तूचा कमीजास्त भाव प्रत्येकीं सांगत असतात; कारण सर्वत्र भावांचें ताबड-तोब ज्ञान होत नसल्यामुळें ही अपूर्णता उत्पन्न होते व त्यामुळें भाव सारखेच राहत नाहींत. क्रॉफर्ड–मार्केटजवळ एक दुकानदार फाउंटनपेन ४ रु. ला सांगेल, दुसरा तसलेंच ३ रु. ला सांगेल, तर पलीकडल्या रस्त्यावर गाडीवाल्याजवळ तें १ रु. ला मिळेल हा अनुभव आपण पाहतों. तेंच खुद्द क्रॉफर्ड–मार्केटमध्यें आपण फळांचा भाव १० ठिकाणीं विचारला तरी बहुतेक ९९ टक्के सारखाच असतो. जर फरक झाला तर मालाच्या शिळेपणामुळेंच; प्रतीमुळें नव्हे. कारण तेथील बाजार सिद्ध आहे. स्पर्धेच्या वेसणींत असल्यामुळें भाव स्थिर व समान राहणें अपरिहार्य आहे. वाहतुकीचीं साधनें जसजशीं यांत्रिक होत आहेत तसतशा बाजारपेठाही जास्त जास्त सिद्ध होत आहेत. वस्तूंची खरेदीविक्री करणारे, सरकारी अगर अन्य रोख्यांचा व्यवहार करणारे अगर परदेशीं ज्यांचा हुंड्यांचा व्यवहार आहे ते या सर्वांना हा भावांतील फरक परवडणें शक्य नाहीं. जरूरीपेक्षां जास्त फरक पडूं लागला तर तो ताबडतोब सर्वत्र कळतो व त्याप्रमाणें जगभर त्याचे परिणाम होऊन त्यांत ताबडतोब सारखेपणा उत्पन्न होतो. समजा, 'अ' व्यापाऱ्यानें कॅनडाहून गव्हाचें गलबत भरलें व कराचीस आण-

ण्याचें ठरविलें आणि तें येत असतां जर त्यास असें कळलें कीं मुंबईस भाव जास्त आहे तर तो ताबडतोब बिनतारी संदेशानें जहाजाला मुंबईस येण्यास आज्ञा करील. तसेंच, समजा, माझी मोठी रक्कम अमेरिकेंत आहे व तिला तेथें जें व्याज मिळतें त्यापेक्षां मला मुंबईस अगर लंडनमध्यें जास्त व्याज अल्प मुदतीचे कर्जावर मिळत असेल तर मी ताबडतोब ती रक्कम न्यूयॉर्कमधून काढून मुंबईस अगर लंडन येथें आणीन. तारायंत्रें, टेलिफोन, बिनतारी संदेश यांयोगें कोठें काय भाव आहेत हें ताबडतोब कळतें व जास्त भाव असेल तेथें गिऱ्हाईक एकदम कमी होऊन ताबडतोब भावांतील फरक कमी होऊन वर म्हटल्याप्रमाणें स्थिरता उत्पन्न होते. पण या प्रकारची परिस्थिति जेथें विनिमयाला पूर्ण मोकळीक आहे व स्पर्धा चालू आहे तेथेंच असते.

याचे उलट जेथें राजसत्ता--सरकार--व्यापारांत हस्तक्षेप करते तेथें उलट परिस्थिति उत्पन्न होते. एका देशांत आयात-कर खूप आहेत; तर त्या ठिकाणीं वस्तूंच्या किंमती ज्या ठिकाणीं असा कर नाहीं त्या ठिकाणापेक्षां जास्त होतील. उदा०, आपल्या देशांत हल्लीं परदेशांतून येणाऱ्या कापडावर सरासरीनें २० टक्के संरक्षणाकरितां म्हणून आयात-कर आहे; याचा परिणाम येथें कापड महाग आहे. तेंच कापड आफ्रिकेंतील वसाहतींत स्वस्त आहे, कारण तेथें आयात-कर नाहीं; व अशा स्थितींत भावाचा फरक माहीत असूनही स्पर्धा--अनिर्बंध स्पर्धा अगर चढाओढ नसल्यामुळें भाव सारखे अगर स्थिर होणार नाहींत. तसेंच गेल्या महायुद्धानंतर सर्वत्र राष्ट्रीय अर्थवाद अगर स्वयंपूर्णवाद पसरला आहे. प्रत्येक राष्ट्र आपणास लागणारे सर्व पदार्थ--शस्त्रास्त्रांसुद्धां सर्व माल देशांतल्या देशांत तयार करण्यामागें आहे व त्यामुळें नवीन प्रश्न उत्पन्न झाले आहेत. शिवाय राष्ट्राराष्ट्रांत मालांच्या आयातनिर्यातींच्या बाबतींत व्यापारी आंतरराष्ट्रीय असे करारमदार झाले आहेत. कांहीं ठिकाणीं तर दर वर्षी विशिष्ट माल अगर विशिष्ट मर्यादेपर्यंतच माल आणावा अगर न्यावा अशींही कलमें अशा करारांत आहेत. तेव्हां ठरलेला हिस्सा ( Quota ) संपल्यानंतर सदरहू वस्तूंचा व्यवहार, व्यापार त्या राष्ट्रांत होत नाहीं व अशामुळें भावांतील फरक माहीत असूनही कायम राहतो व साहजिक जमून येणारी जागतिक पेठ विलग होऊन राष्ट्राराष्ट्राची अशी विलग पेठ उत्पन्न होते. निरनिराळ्या वस्तूंच्या प्रतवारीमुळें, नमुना-विक्रीपद्धतीमुळें, व सरकारी हस्तक्षेपामुळें मोठया मोठया बाजारपेठा लहान लहान होतात व त्याचा सरळ परिणाम गिऱ्हाइकाच्या म्हणजे उपभोगी गिऱ्हाइकाच्या हिताविरुद्ध होतो. ज्या ठिकाणीं खरेदी देणारे व खरेदी घेणारे यांचा व्यवहार दलालामार्फत अगर मध्यस्थामार्फत चालतो तेथें भाव स्थिर होणें जास्त संभवनीय असतें. मध्यस्थांची अगर दलालांची

खटपट नफा मिळविण्यासाठीं असल्यामुळें व त्यांच्या त्यांच्यांत चुरस व स्पर्धा असल्यामुळें माल घेणारे व विकणारे या दोन्ही दृष्टींनीं ते भावांत फार फरक करूं शकत नाहींत. कारण गिऱ्हाईकही दलालादलालांत चौकशी करूनच सवदा ठरवीत असतें. दलाल कांहीं स्वतः माल सांठवीत नाहींत, तर ते फक्त सवदे ठरवितात, माहिती पुरवितात, किंमती व भाव कळवितात व पक्का सवदा झाल्यावर कमिशन घेतात; तथापि त्यांचा उपयोग बाजारपेठ सिद्ध करण्याकडे म्हणजे भाव स्थिर करण्याकडे होतो. कांहीं एजंट्स् दैनिक व साप्ताहिक बाजारभाव नेमानें गिऱ्हाइकांना कळवितात अगर वर्तमानपत्र काढूनही छापतात; यामुळें गिऱ्हाइकांस तुलना करतां येते व याच कारणामुळें भावाभावांत फरक उरत नाहीं. जेथें मक्तेबाजी उत्पन्न होते तेथील परिस्थिति अर्थात्च निराळी व तिचा विचार पुढें होईल.

येथपर्यंत बाजारासंबंधीं विचार झाला. आतां बाजारांत जे व्यवहार होतात व ज्यांसाठीं किंमत देण्यांत येते असे व्यवहार तरी कोणकोणत्या बाबतींत होतात याचा विचार करूं. वस्तूंची खरेदीविक्री होते त्या वस्तु तरी कोणत्या स्वरूपाच्या असूं शकतात हें आपण पाहूं. अर्थशास्त्राप्रमाणें त्यांचे आठ प्रकार कल्पितां येतील:—( १ ) उपभोग्य वस्तु म्हणजे वस्तूचें शेष–शेवटचें स्वरूप. तिचा प्रत्यक्ष उपभोग घेऊन गिऱ्हाईक त्या वस्तूची उपयुक्तता संपवितें. (२) उत्पादक वस्तु; कीं जी शेषस्वरूपीं उपभोग्य नाहीं, पण जिचा उपयोग उपभोग्य वस्तु उत्पन्न करण्याकडे आहे. उदा०, कापूस व सदरा. सदरा हा उपभोग्य वस्तु आहे, कारण मनुष्याची थंडीची गरज तो भागवितो. कापूस ही उत्पादक वस्तु आहे व ती सदऱ्याकरितां अवश्य आहे. ( ३ ) मजुरांची श्रमशक्ति. (४) स्थावर मिळकत. (५) कर्जाऊ रकमा. (६) मालकीचे कागदपत्र. (७) सर्वमान्य हक्क. ( ८ ) अन्य चलन. आतां यांपैकीं प्रत्येकाचा आपण क्रमशः विचार करूं.

( १ ) **उपभोग्य वस्तु:**—हीं शेष वस्तु होय कीं जी वर सांगितल्याप्रमाणें गिऱ्हाइकाची गरज सरळ भागवितें. उदा०, सदरा, वर सांगितलाच आहे. तसेंच याच सदराखालीं वैद्य व डॉक्टर यांची सेवा, करमणुकीचीं साधनें, वाहतुकीचीं साधनें ( यांत जीं साधनें मनुष्याच्या प्रवासाला म्हणजे प्रत्यक्ष गरजेला उपयोगीं पडतात अशा सर्वांचा समावेश होईल ) येतात. खरें म्हटलें तर सर्व उत्पादन, सर्व आर्थिक व्यवहार, उपभोग्य वस्तु उत्पन्न करण्याकरितांच आहे; पण प्रत्यक्ष उपभोग्य वस्तूंची विक्री व झालेल्या उत्पादनाची, व्यवहाराची विक्री यांत साहजिकच तफावत राहणार. देशांत हजारों कारखाने चालू आहेत, व्यवहार चालू आहेत. बीं विकत घेण्या-

पासून तों कपडा तयार होऊन त्याचा सदरा दुकानांत गिऱ्हाईक विकत घेईपर्यंत शेंकडों सवदे—विनिमय झाले; त्यांची किंमत व फक्त सदराविक्रीची किंमत हीं सारखीं राहणें शक्य नाहीं. या देशांत जर उपभोग्य वस्तूंची विक्री घेतली व जेवढें उत्पादन झालें त्याची विक्री घेतली, तर उत्पादनाची विक्री कितीतरी जास्त होईल. या देशाचें माणशीं सरासरी वार्षिक उत्पन्न सुमारें ६५ रु० आहे व सर्व देशांत होणारें उत्पादन १८०० कोटि रु० किंमतीचें आहे. ब्रिटनमध्यें उपभोग्य वस्तूंची विक्री दरसाल ४००० दशलक्ष पौंड आहे तर देशांतील उत्पादनादिक सर्व व्यवहारांची वार्षिक किंमत ५०,००० दशलक्ष पौंड आहे. आर्थिक व्यवहारांत आपण शेअर व सरकारी रोखे यांचाही समावेश करतों. त्याचप्रमाणें निरनिराळ्या हातांतून वस्तु उपभोग्य होऊन गिऱ्हाइकाकडे जाते म्हणून हा फरक पडतो. उपभोग्य वस्तु सामान्यतः मोठ्या बाजारांत खरेदी न होतां किरकोळ दुकानांतून खरेदी केल्या जातात व गिऱ्हाइकाला अन्यत्र किंमती काय आहेत, भाव काय पडला आहे हें माहीत नसतें. पुष्कळ गिऱ्हाइकें चार ठिकाणीं जाऊन विचारपूस करावयास कंटाळतात; कांहींना लांब जाण्याचे श्रम नको असतात; तर कांहींना उधारीनें माल हवा असतो. कांहींना विवक्षित दुकानची व्यवस्था अगर वागणूक पसंत असते. कांहीं ठिकाणीं मालाची खात्री असते. कांहीं ठिकाणीं विश्वास असतो. कांहीं माल लेबली असतो, म्हणून कोठेंही गेलें तरी तीच किंमत पडेल अशी समजूत असते. शिक्क्याचा माल विकणारीं दुकानें व लेबली माल विकणारीं दुकानें आपणांस सर्व वस्तींत सांपडतील. ह्यांचा स्वतंत्र असा बाजार अगर एकत्रित दुकानें सांपडणार नाहींत. लिप्टनचा चहा, मुनशीभाईची अगर मानुरकरी विडी, गोल्डफ्लेक सिगरेट, माकडछाप टूथ–पावडर ( राखुंडी ) हा माल अगर त्याचीं दुकानें यांचा एकत्र असा बाजार नसतो. तीं सर्वत्र जशी वस्ती तशीं पसरलेलीं असतात; कारण या जिनसांची किंमत दर दुकानीं निराळी असूं शकत नाहीं. याच्या उलट भाजीपाला, फळफळावळ यांचा बाजारच असतो व तेथें शिक्केबाजी अगर लेबलबाजी नसल्यामुळें गिऱ्हाईक भाव व माल बघून खरेदी करतें. लेबली माल सर्वत्र सारखा; याचे उलट मटारच पण दोन दुकानीं निरनिराळी असूं शकतें. कोंवळी–जून, ताजी–शिळी व भाव त्याप्रमाणें निरनिराळा! अशा वस्तु गिऱ्हाईक पाहून घेतें व साहजिकच चार ठिकाणीं चौकशी करतें; ज्याला वेळ आहे असें चौकस गिऱ्हाईक चार ठिकाणीं हिंडतें व त्यास पदार्थ स्वस्तही मिळतात. अर्थात् त्याच्या वेळेला व श्रमाला किंमत नसेल तर हा फायदाच आहे!!

( २ ) **उत्पादक वस्तुः**—ही उपभोग्य वस्तूची साधनभूत वस्तु होय. वर उदा-

हरण दिल्याप्रमाणें कापूस ही उत्पादक वस्तु व कापड अगर सदरा ही उपभोग्य वस्तु होय. कापडासाठीं कापूस; म्हणून त्याची अवश्यकता आहे. उपभोग्य वस्तु गिऱ्हाइकाची गरज सरळ भागविते तर उत्पादक वस्तु तीच अप्रत्यक्ष रीतीनें भागविते व या दोघांचा असा नातेसंबंध असल्यामुळें उत्पादक वस्तूंची मागणी उपभोग्य वस्तूंच्या मागणीवर अवलंबून असून त्या मागणीनेंच तिचें स्वरूप निश्चित व मर्यादित होतें. आपण तीस 'तद्भव' ( Derived ) मागणी अगर वाटेल तर आनुषंगिक मागणी म्हणूं. या सदराखालीं कारखानदार आपले व्यवहार व उत्पादन चालविण्यासाठीं इतरांकडून जो माल घेतात तो, त्याचप्रमाणें निरनिराळ्या सोयी यांचाही समावेश होतो. कारखान्यासाठीं लागणारी वीज, कोळसा, तेल, यंत्रें इ० सामग्री, त्याचप्रमाणें कच्चा व पक्का माल आणण्यानेण्याबद्दल द्यावा लागणारा वाहतुकीचा खर्च, मालाचा व कारखान्याचा विमा उतरला असल्यास त्याचे हप्ते, त्याचप्रमाणें बँकेनें अगर अडत्यांनीं त्यांच्याकरितां केलेल्या श्रमांबद्दलचा मेहनताना वगैरे. बराचसा कच्चा मालही याच सदरांत येतो. अशुद्ध लोखंड, अशुद्ध रबर, कापूस, सूत, लोंकरीच्या लडी व सामान्यतः ज्यापासून पक्का माल म्हणजे 'उपभोग्य वस्तु' उत्पन्न होतात असा सर्व माल, सर्व पदार्थ, यांत येतात. कांहीं वस्तु उत्पादक व उपभोग्य अशा दोन्ही स्वरूपाच्या असूं शकतात. वीजच घेऊं या : मनुष्य घरांत वापरतो तेव्हां ती उपभोग्य होते, कारण मनुष्यास प्रकाशच हवा असतो व ती त्याची गरज वीज सरळ भागविते. उलट कारखान्यांत यंत्र चालविण्याकरितां वीज घेतात व तेथें ती साधनस्वरूपी, उत्पादकस्वरूपी होते. तसेंच घरीं स्वयंपाकाकरितां अगर उबेकरितां उपयोगांत आणलेला कोळसा व कारखाना चालविण्याकरितां साधन झालेला कोळसा. मनुष्याच्या प्रवासाकरितां उपयोगांत असलेली बस अगर रेल्वे त्याची गरज सरळ भागविते, तर माल व वस्तूंचा पुरवठा इकडून तिकडे नेणारी बस अगर रेल्वे लागलीच साधनभूत होते. कारण तेथें गरज अप्रत्यक्ष पुरविली जाते. कांहीं वस्तु जरी दोन्ही सदरांत पडत असल्या तरी त्यांचें मनुष्याच्या गरजेशीं निरनिराळ्या स्वरूपांत अगर निरनिराळ्या वेळीं काय नातें असतें हें अर्थशास्त्रांत महत्त्वाचें आहे; आर्थिक व्यवहारांत त्याचा पार्ट ( कार्य ) कोणता हें समजणें अवश्य आहे.

उत्पादक वस्तूंची पेठ सामान्यतः सिद्ध असते, भावांत चलबिचल अल्प असते; कारण किरकोळ दुकानदार अगर व्यापारी यांना काय नमुन्याचा अगर कोणत्या प्रतीचा माल लागतो याची त्यांना कल्पना असते व त्यामुळें निरनिराळ्या कारखान्यांकडे ते चौकशी करतात, जाहिराती पाहतात, त्यांचे एजंट त्यांना भेटतात. तात्पर्य माल व

भाव यांची तुलना करतां येते व स्पर्धा असल्यामुळें किंमतींत मोठा फरक राहूं शकत नाहीं. उदाहरणच घ्यावयाचें असेल तर पुण्याच्या फुले मार्केटचें घेतां येईल. मार्केटचें बाहेरील पटांगण हें कमिटीच्या मालकीचें आहे व त्यांत निरानिराळे गाळे आहेत. ते कमिटीनें सालवार बोलीनें दिलेले असतात. पहांटेपासून दररोज तेथें भाजीपाला खेड्यापाड्यांतून येत असतो व दांडीवाले व दलाल तो घेतात व लागलीच निरनिराळ्या फेरीवाल्यांना अगर किरकोळ विकणाऱ्या गाळेवाल्यांना विकतात. हा सगळा उघडा बाजार असतो म्हणजे कोण किती भाव लावतो हें ताबडतोब कळतें. व विकणारांत चढाओढ असल्यामुळें, फेरीवाले व किरकोळ विकणारे जे तेथें घेतात त्यांच्या आपापसांतील भावांत क्वचित्च फरक पडतो. एका दलालानें एक भाव काढला व तो कमी असल्यास व त्या दलालाजवळ बाजाराची मागणी बहुतांशीं पुरी करण्याइतका माल असल्यास त्याच कमी भावानें तसला माल सर्व दलालांना विकावा लागतो. खरेदी घेणारे व देणारे यांना कोठें काय भाव आहे हें कळत असल्यामुळें ही स्थिरता येते. वस्तूंचे घाऊक बाजार बहुतेक शहरांतून असतात. भांडेबाजार, कापडबाजार, दाणेआळी, या ठिकाणीं किरकोळ विक्री होत नाहीं असें नाहीं, पण बहुतेक व्यवहार घाऊक. खेडेगांवांतील अगर शहरांतील किरकोळ दुकानदार घाऊक व मोठ्या बाजारांतून खरेदी करतात व आपल्या मोहल्यांत अगर गांवांत किरकोळ विक्री करतात; व असे बिछाईत शेंकड्यांनीं असतात. मुंबईसारख्या मोठ्या शहरांत तर असले घाऊक बाजार बऱ्याच वस्तूंचे आहेत. लोखंडबाजार, पानबाजार, 'कॉटन-एक्सचेंज', बुलियन-एक्सचेंज, दाणेबाजार वगैरे. घेणारे-देणारे अगर त्यांचे दलाल भेटतात, नमुने पाहतात, सवदे करतात; व असे कोट्यवधि रुपयांचे हजारों व्यवहार दररोज तेथें होत असतात. तसेंच या सदराखालीं येणारे विम्याचे व्यवहारही चालूच असतात. परदेशीं माल पाठवावयाचा असल्यास निरनिराळ्या विमा-कंपन्या काय दर सांगतात याची आपण चौकशी करतों व मालाचा विमा उतरवीत असतों. हे सगळे व्यवहार उत्पादन या सदरांत येतात. या सगळ्या 'मार्केटां'त अगर 'एक्सचेंज'मध्यें प्रत्यक्ष माल क्वचित्च असतो. सर्व व्यवहार वर सांगितल्याप्रमाणें नमुना दाखवून अगर मान्य झालेल्या प्रतवाऱ्या सांगून चालू असतात व नमुन्याप्रमाणें अगर प्रतवारीप्रमाणें माल न निघाल्यास निरनिराळ्या बाजारांच्या नियमांप्रमाणें लवाद होतात व नुकसान मिळतें. जेथें प्रत्यक्ष पाहून गिऱ्हाईक माल घेतें, तेथें मालाची जबाबदारी त्याचीच असते. उदा०, भाजीपाला अगर कापड पाहून घेतलें, मग त्याची जबाबदारी दुकानदारावर नाहीं. जेथें नमुना पाहून घाऊक खरेदी अगर विक्री होते तेथें नमुन्या-

प्रमाणें माल न निघाला तर त्याबद्दल नुकसान भरून देणें हें वाजवी आहे व प्रघातहि तसाच आहे.

(३) मजुरांचे श्रमः—घराऊ नोकर अगर ज्यांचे श्रम माणसाची गरज सरळ भागवतात असे नोकर. उदा०, न्हावी, आचारी, या सर्वांचे श्रम उपभोग्य वस्तु या सदराखालीं येतात. कारण गिऱ्हाईक त्या त्या श्रम करणाऱ्या व्यक्तींना सरळ मेहनताना देत असतें. उलट पक्षीं कारखानदार, दुकानदार व सर्वसामान्यपणें नोकरवर्ग हाताखालीं ठेवणारा मालकवर्ग हे हाताखालीं अगर कारखान्यांत ठेवलेल्या मजुरांचे श्रम स्वतःच्या गरजा भागविण्याच्या कामी लावीत नसून ज्या वस्तु ते विकतात किंवा तयार करतात, त्या घडविण्याचे कामीं लावीत असतात; म्हणून एका अर्थानें मजुरांच्या श्रमाची मागणी ही आनुषंगिक अगर 'तद्भव' आहे व गिऱ्हाइकाला म्हणजे उपभोगी गिऱ्हाइकाला ज्या वस्तूंची अवश्यकता आहे त्या वस्तूंचे मागणीवर या मजूर–श्रमांची मागणी अवलंबून आहे. राष्ट्रांतील श्रमजीवी मजूरवर्ग अगर नोकरवर्ग कांहीं ना कांहीं उत्पादन करीत असतो. सर्वच सरकारी नोकर उदा०, पोलीस, शिक्षक, कित्येक खात्यांतील कारकून खरोखर कांहीं उत्पादन करीत नाहींत; तथापि त्यांचे श्रमही अवश्यक आहेत. कित्येक देशांत किमान मजुरी धंद्यागणिक ठरविलेली असते. ही किमान मजुरी सरकार, 'मजूरकोर्ट' अगर 'मंडळें' ठरवितात. ठराविक मुदतीनंतर ती बदलून घेण्याचा हक्क मालक व मजूर या दोघांनाही असतो. ब्रिटनमध्यें १९०९च्या व १९१८च्या कायद्यांनुसार ११ लाख मजुरांचें निरनिराळ्या धंद्यांतील किमान वेतन 'ट्रेडबोर्डें' व ४८ व्यापार–कमिट्या ठरवितात. ऑस्ट्रेलियांत सरकार बोर्डें नेमतें व तीं ठरवितात. मुंबई इलाख्यांत १९३८च्या औद्योगिक कलहाच्या कायद्यानेंही या दृष्टीनें थोडा उपक्रम सुरू केला आहे. मालक व मजूर यांच्यांतील कामाचे तास, पगार, अपघातासंबंधीं नुकसान–भरपाई वगैरे प्रश्नांसंबंधीं व्यवस्था करण्याकरितां बहुतेक राष्ट्रांतून 'समजूत मंडळें' मध्यस्थ, लवाद, औद्योगिक तंट्यांबाबत निकाल देणारीं कोर्टें वगैरे गोष्टींचा अवलंब करण्यांत आला आहे. बहुतेक देशांतून मजूरसंघ निर्माण झाले असून पुष्कळ ठिकाणीं त्यांची संघटना बलवान् आहे. इंग्लंडमध्यें आज सुमारें ५० लाख मजूर, मजूरसंघांतून संघटित आहेत आणि त्यांच्यांतील व मालकांमधील तंटे तो तो मजूरसंघ व ते ते मालक तडजोडीनें अगर लवादामार्फत तोडून घेतात. पगारकाट, पगारवाढ, दरांत काट अगर वाढ, मजुरीची पद्धति, कामाचे तास या सर्व गोष्टी करार होऊन ठरतात. तंटा उत्पन्न झाल्यास स्थानिक परिस्थितीप्रमाणें लवादामार्फत, त्या करारांत फेरबदल

होऊं शकतो. कांहीं ठिकाणीं मजुरी मालकाला मिळणाऱ्या नफ्याप्रमाणें वाढविण्याचाही करार असतो. कांहीं करारांत त्या त्या धंद्यांतील उत्पन्न होणाऱ्या वस्तूंच्या किंमतींत वाढ झाल्यास मजुरींतही वाढ व्हावी अशी शर्त असते. मजुरांचे वर्गवारीवर मजुरी ठरविली जाते; उदा०, जॉबर, साधा मजूर, रंगारी वगैरे. पुष्कळ वेळां सर्व देशभर त्या त्या वर्गाचा किमान मजुरीचा करार असतो, तर कांहीं ठिकाणीं तेवढ्याच भागापुरता अगर तेवढयाच मालकापुरताही तो असूं शकतो. हिंदुस्थानांत आज नोंदलेले संघ ६६६ असून त्यांची सभासदसंख्या १९३९-४० मध्यें ५,११,-१३८ होती. मालक व मजूर यांचे संबंध निश्चित करणारे Trade Disputes Act, Factory Act वगैरे कायदे मध्यवर्ति सरकारचे कायदे आहेत. याशिवाय कित्येक प्रांतांतून यासंबंधीं नुकतेच कांहीं कायदे झाले आहेत. मजूरसंघांप्रमाणें नोकर पुरविणारेही संघ असतात व पाश्चात्य देशांत सरकारच असे संघ काढून बेकारांची व्यवस्था करण्याचा प्रयत्न करीत असतें. आपल्याकडे कांहीं विश्वविद्यालयांतून पास झालेल्या लोकांची यादी ठेवण्यांत येऊन फक्त माहिती पुरविण्यांत येते. खलाशी व बोटीवर काम करणारे इतर मजूर बेकार असल्यास त्यांची व्यवस्था करण्याच्या दृष्टीनें मुंबईत व इतर कांहीं बंदरांत कांहीं संघ आहेत.

(४) **स्थावर मिळकतः**—स्थावर मिळकतीसंबंधीं सर्व व्यवहार ती प्रत्यक्ष पाहिल्यावांचून होत नाहीं. या व्यवहारांत कांहीं लेबल अगर नमुना दाखवून माल खरेदीविक्री करण्यासारखें या वस्तूंचें स्वरूप नाहीं. म्हणून खरेदी घेणारा ती प्रत्यक्ष पाहतो व नंतरच खरेदी घेतो. प्रत्येक स्थावर मिळकतीचें, मग ती शेतजमीन असो, इमारतीचा प्लॉट असो अगर प्रत्यक्ष इमारत असो, एक विशिष्टत्व असतें; एकीप्रमाणें दुसरी असूं शकत नाहीं. प्रत्येकीची किंमत तिच्या स्थानमहात्म्यावर (Situation) व तिच्या उत्पन्नावर अवलंबून असते. या कारणामुळें असले व्यवहार सामान्यतः तज्ज्ञ व माहीतगार—धंदेवाले म्हटलें तरी चालेल—अशा दलालांमार्फत होतात. 'विकणें आहे' वगैरे जाहिराती आपण पाहतों, त्याही बऱ्याच वेळां दलालांच्याच असतात. स्थावर मिळकतीच्या खरेदीविक्रीबाबत विकणारा जास्तींत जास्त किंमत मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो व घेणारा कमींतकमी किंमत पडेल असें पाहत असतो आणि त्यामुळें एखादी मिळकत भयंकर स्वस्तांत अगर भयंकर महाग विकली गेली असें बहुशः होत नाहीं.

(५) **कर्जाऊ रकमांचा व्यवहारः**—कर्जाचे निरनिराळे प्रकार असतात. त्यांचा विस्तरशः विचार पुढें होईल. धंदेवाले, कारखानदार वगैरे उत्पादकवर्ग बँकांकडून

थोड्या मुदतीकरितां व जरूर तर लांब मुदतीनें कर्ज घेतात; खासगी धंदेवाल्यांना बहुशः बँकांकडेच धांव घ्यावी लागते. सरकारला कर्ज पाहिजे असेल तर सरकार रोखे काढून सरळ जनतेकडून तें घेऊं शकतें. पुष्कळ मोठे धंदेवाले स्वदेशाप्रमाणें विदेशांतही कर्जें काढतात. सरकार स्वदेशाप्रमाणें परदेशींसुद्धां आपले रोखे विकण्याची खटपट जरूर तर करतें. आज हिंदुस्थान–सरकारला कर्जाची जरूरी भासली म्हणजे निव्वळ हिंदुस्थानांतच कर्ज काढून सरकार थांबत नाहीं तर पुष्कळ वेळां इंग्लंडमध्येंहि कर्ज काढतें. अशा कर्जाला म्हणजे ज्याची फेड सुवर्णचलनांत करावयाची असते त्याला स्टर्लिंग–लोन (Sterling Loan) म्हणतात. १९४० सालअखेर हिंदुस्थानचें असलें कर्ज २७०० लाख पौंड अगर ३५१ कोटि रुपये होतें. महायुद्धांत इंग्लंडसाठीं या देशानें खर्च केला त्यामुळें हें कर्ज फिटून जाऊन आतां हिंदुस्थानचीच बाकी सुमारें १२०० कोटि रुपये इंग्लंडकडे शिल्लक आहे. या देशांत कमी व्याजानें कर्ज मिळत असून सुद्धां इंग्लंडमध्यें जास्त व्याजानें कर्ज काढणें म्हणजे जनताद्रोह आहे; कारण त्यायोगें इंग्लंडच्या भांडवलवाल्यांची मगरमिठी या देशावर पक्की होत जाते. हें सरकारला समजत नाहीं असें नाहीं, पण सरकार राष्ट्रीय नाहीं व जनतेचें हित हें त्याचें हितहि नाहीं! इतर देशांतील सरकारें, खुद्द लंडन अगर न्यूयॉर्कमध्यें कोट्यवधि रुपयांचें कर्ज काढतात; पण त्याचा हेतु केवळ कमी दरानें कर्ज मिळावें हाच असतो. निरनिराळ्या राष्ट्रांतील मोठमोठे उद्योगधंदेवालेहि लंडनमध्यें किंवा न्यूयॉर्कमध्यें कर्ज काढतात व त्यांचाहि हेतु वरीलप्रमाणेंच असतो. खासगी धंदेवाल्यांना अगर परकी सरकारला लंडनमध्यें कर्ज काढावयाचें असल्यास व लांब मुदतीचें कर्ज हवें असल्यास ह्या बाबतींतील दलालां मार्फतच हीं कामें होतात. त्यांना कर्ज मिळवून देणारे दलाल अगर कंपन्या (Issue Houses) म्हटलें तरी चालेल. हे दलाल बाजाराची स्थिति पाहून काय व्याज कबूल केलें असतां किती रोखे खपतील वगैरे सल्ला देतात व त्यांचे रोखे ( कर्ज ) खपवितात. अर्थात्‌च या बाबतींत ते योग्य मेहनताना घेतात. आपल्याकडे सुद्धां मुंबई, कलकत्ता वगैरे मोठाल्या औद्योगिक व भांडवलाच्या केंद्रांतून अशीच पद्धत आहे. जर एखादा धंदेवाला अगर कंपनी प्रसिद्ध असेल व तिला जास्त भांडवलाची अवश्यकता असेल, तर तिला दलालाकडे जाण्याची अवश्यकता पडत नाहीं. सरळ शेअर–होल्डरांकडे विचारणा करून अगर जाहिरात देऊनसुद्धां कर्ज मिळूं शकतें. मात्र नव्या कंपन्यांना हें जुळत नाहीं. त्यांना दलालच गांठावे लागतात. कंपन्यांचे शेअर खपविणें हाच कांहीं दलालांचा धंदा असतो. त्याचप्रमाणें कांहीं भांडवलवाल्यांचे कंपन्या काढणें व त्यांचे सर्व भाग घेऊन मग पुनः ते विकणें

वगैरे व्यवहार असतात. शेअरच्या जाहिराती, एजंटांच्या पायपिटी, धंद्याच्या यशासंबंधीं खात्री देणारे लिहविलेले लेख व प्रॉस्पेक्टस, या सर्व गोष्टी आपल्याला परिचित आहेत. त्याचप्रमाणें नव्या शेअरची शिफारस शेअर–बाजारांत करविणें हाही भांडवल अगर कर्ज मिळविण्याचा एक मार्ग आहे.

गुंतविण्याकरितां मोकळा असलेला पैसा यालाच अर्थशास्त्रांत मोकळें अगर खेळतें भांडवल म्हणतात. तोच गुंतला गेला, त्याच्या विनिमयानें घेतलेली यंत्रसामग्री व कच्चा माल असें त्याचें स्वरूप झालें म्हणजे लागलीच तें गुंतलेलें भांडवल झालें. खेळत्या भांडवलावरील व्याजाचा दर कर्जाच्या मुदतीवर व ज्या धंद्याकरितां कर्ज घेतलें असेल त्याच्या यशाच्या अंदाजावर अवलंबून असतो. सरकारी कर्जरोख्यांची अगर नियमित व्याज मिळणाऱ्या रोख्यांची जी चालू किंमत असेल, त्या किंमतीच्या मानानें जो व्याजाचा दर पडत असेल त्या दराप्रमाणें सामान्यतः कर्ज, नाणावलेल्या धंदेवाल्याला अगर कारखानदाराला मिळूं शकतें. उदा०, ३ टक्के सरकारी रोख्याची किंमत जर ५० असली तर व्याजाचा दर दरसाल दरशेंकडा ६ झाला; या स्थितींत नवीन कर्जही ६ दराचे मिळांत मिळेल. कारण कर्ज देणारा जास्तींत जास्त व्याज रक्कम कोठें गुंतविली असतां मिळेल हें पाहतो व हें लक्षांत घेऊनच व्याजाचा दर नवीन कर्ज विकणारे दलाल ठरवीत असतात.

(६) **मालकी कागदांचा व्यवहारः**—या कागदांत सरकारी कर्जरोखे, लांब, अल्प अगर बिन मुदतीचे कंपन्यांचे शेअर्स, गहाणखतें कीं ज्यांत रकमेची फेड न झाल्यास ताबडतोब गहाण मिळकत ताब्यांत घेण्याची शर्त असते, डिबेंचर्स म्हणजे एक प्रकारचे कर्जरोखेच, ठराविक व्याज देणारे रोखे, अगर कंपनीच्या नफ्याप्रमाणें कमीजास्त डिव्हिडंड मिळविणारे शेअर्स वगैरेंचा समावेश होतो; यांच्या खरेदीविक्रीचे व्यवहार जेथें शेअरबाजार आहेत तेथें दररोज होत असतात.

(७) **हक्कांच्या खरेदीविक्रीचे व्यवहारः**—पुष्कळ वस्तूंचे शोध, नवीन यंत्रांचे शोध व त्यांतील सुधारणा उद्योगधंद्यांत होतात. जो शोध लावतो त्याच्याकडे त्या शोधाबद्दलची मालकी कांहीं काळ तरी राहावी म्हणून सर्व देशांत कायदे झाले आहेत. शोध लावणाऱ्यास कायद्याप्रमाणें पेटंट मिळतें. कायद्याप्रमाणें एकाद्यानें पेटंट घेतलें असेल तर ती वस्तु त्या प्रकारानें दुसऱ्या कोणास कांहीं काळ करतां येत नाहीं. हा एक मालकी–हक्क होतो. त्याची विक्री तो करूं शकतो व असे शेंकडों व्यवहार आर्थिक जगांत चालू असतात. त्याचप्रमाणें एखादें दुकान विवक्षित नांवानें फार दिवस चाललें म्हणजे त्याची एक गिऱ्हाइकी उत्पन्न होते, वळण उत्पन्न होतें, एक लौकिक उत्पन्न

होतो. ज्याला Good Will असें म्हणतात तोहि एक हक्क आहे आणि त्याच्या खरेदी-विक्रीचे व्यवहार आर्थिक जगांत नित्यशः चालू असतात. उदा०,–'कॉर्नर–कोर्लिंडूक–हाउस'ची मालकी बदलली तर या नांवाबद्दल–हक्काबद्दल किंमत घेतली जाते. असल्या व्यवहारांचीहि दखल आपण घेतली पाहिजे.

(८) **चलनाची खरेदीविक्रीः**—सामान्यतः एका देशांत एकच चलनपद्धति असते. पण समजा, दुसऱ्या देशांत अगर जेथें दुसरें चलन आहे तेथें भरणा करणें असेल तर तेथील चलन घ्यावें लागतें. उदा०, दक्षिण हैद्राबादला 'हाली' चलन आहे. तेथें मी १०० 'हाली' रुपयांचा माल घेतला व ती रक्कम देणें आहे. तेथें आपलें चलन, नाणें अगर नोटा चालत नाहींत; तेव्हां मला 'हाली' नाणें घ्यावयास पाहिजे. १०० रु.ना ११२॥ 'हाली' रुपये मिळतात. त्या मानानें मी 'हाली' रुपये घेऊन सवदा पुरा करतों. हा जो 'कलदार' म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानांतील नाणें व 'हाली' म्हणजे निजामी नाणें यांच्या खरेदीविक्रीचा भाव अगर दर असतो त्याला हुंडणावळ म्हणतात. इंग्लंड–हिंदुस्थान, अमेरिका–इंग्लंड, हिंदुस्थान–अमेरिका अशी परस्परांत चलनाची खरेदीविक्री अवश्यक असते व हीं सर्व कामें बँका करीत असतात; मोठमोठाले दलालहि करतात; व हे हुंडणावळीचे दर बँक–एजंटस् व दलाल ह्यांना ताबडतोब कळूं शकतात. त्यामुळें हे दर एकाच वेळीं फरकानें कमीजास्त होत नाहींत. हुंडणावळ हा अर्थशास्त्रांत व जागतिक आंतरराष्ट्रीय व्यवहारांत फार महत्त्वाचा प्रश्न आहे व त्याचा विचार स्वतंत्रपणें करणें अवश्य आहे.

सर्वसामान्यतः आपण वस्तूंचे आठ प्रकार कल्पून त्यांचा थोडा विचार केला; पण मुख्य गोष्ट आपण विसरतां कामा नये कीं, सर्व आर्थिक व्यवहारांचा रोख किंवा प्रधान हेतु उपभोग्य वस्तु तयार करणें—त्यांचें उत्पादन करणें—हा आहे; व त्यांच्या मागणीवर व्यवहारांत लागणाऱ्या इतर सर्व वस्तूंची मागणी अवलंबून आहे. मुख्य गोष्ट उपभोग्य वस्तूंचें उत्पादन आणि गिऱ्हाईक–उपभोगी गिऱ्हाईक–जसें मागेल त्यावर तें अवलंबून आहे; म्हणून उपभोग्य वस्तूंच्या मागणी (Demand for Consumers' Goods) चा विचार आपण केला पाहिजे.

---

# २. मागणी

एखाद्या वस्तूची मागणी म्हणजे एका निश्चित किंमतीस व विवक्षित कालमर्यादेंत तेवढी निश्चित किंमत देऊन, ती वस्तु जेवढी विकत घेतली जाईल तें प्रमाण होय. उदा०, एक आणा शेरानें बटाट्याला आज मागणी आहे म्हणजे आजच्या दिवसांत एक आणा भावानें जेवढे बटाटे खरेदी घेतले जातील तेवढे सर्व म्हणजे बटाट्यांची मागणी; ती भाव व काळ यांनीं मर्यादित आहे. मागणी म्हटली म्हणजे किंमत आलीच; किंबहुना अर्थशास्त्रांत—व्यवहारांत किंमतीशिवाय मागणीस महत्त्व नाहीं. जी हवा मुबलक व फुकट मिळते तिला अर्थशास्त्रांत महत्त्व नाहीं. किंमतीशिवाय, मग ती स्पष्ट सांगितलेली असो अगर अध्याहृत असो, कोठल्याहि वस्तूची मागणी नाहीं. बारामतीच्या गुळास पुणें येथें दरसाल मागणी असते, हिंदुस्थानांत दरसाल सुमारें १०,००० मोटारींना मागणी आहे, याचा अर्थ एका निश्चित किंमतीस बारामतीचा गूळ पुण्याच्या पेठेंत येतो व खपतो; त्याचप्रमाणें परदेशांतून येणाऱ्या १०,००० मोटारगाड्या साधारणतः निश्चित किंमतीस हिंदुस्थानांत दरसाल खपतात. जर किंमत बदलली, भाव बदलला, तर मागणीही बदलते. उदा०, गेल्या सालपेक्षां बारामती–गुळाचा भाव कमी झाला तर बारामती–गुळाची मागणी यंदां जास्त होईल, तो गूळ पुणें येथें जास्त मण खपेल; व ती मागणी नवीन भाव आहे तोंपर्यंत म्हणजे निश्चित कालपर्यंत राहील; उलट सदरहू गुळाचा भाव जास्त झाला तर पूर्वीची मागणी राहणार नाहीं, ती कमी होईल व जास्त झालेला भाव टिकेल तोंपर्यंत ती मागणी राहील. समजा, आज इंग्लंडमधून येणारी एका विवक्षित रचनेची मोटार ३००० रु.स मिळते. जर हीच किंमत वर्षभर राहिली तर समजा, ३००० गाड्या खपतात. मग या किंमतींत या वर्षी ३०००ची मागणी झाली. जर तीच गाडी १५०० रु.ला झाली तर मागणी वाढेल व एका वर्षांत ५००० गाड्या खपतील. मग ५००० ही नवी मागणी नवीन किंमतीनें झाली. तात्पर्य, मागणी ही किंमतीवर अवलंबून असते. किंमत जशी बदलेल, तशी त्या वस्तूची मागणी बदलते व त्याचप्रमाणें तिला दिवस, वर्ष, कांहीं तरी कालमर्यादा कल्पिली पाहिजे; नाहीं तर तिला कांहीं अर्थच राहणार नाहीं. मागणी म्हणजे किंमत देऊन घेण्यांत येणाऱ्या वस्तूची मागणी, फुकट मिळणाऱ्या वस्तूची नव्हे, हें वर सांगितलेंच आहे. त्याचबरोबर हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मागणी म्हणजे केवळ गरज अगर इच्छा

नव्हे. मला मोटार घ्यावी अशी इच्छा आहे पण खिशांत पैसे नाहींत; किंबहुना माझ्या प्रचारकार्याकरितां अशा मोटारीसारख्या वाहनाची जरूरी पण आहे. पण जोंपर्यंत ही गरज भागविण्यास अगर इच्छा पुरी करण्यास पैसे नाहींत तोंपर्यंत मी मोटार घेऊं शकत नाहीं व त्यामुळें मोटारीच्या खरेदीविक्रीवर माझ्या इच्छेचा अगर गरजेचा कांहीं परिणाम होणार नाहीं. मागणी म्हणजे निश्चित किंमत देऊन ती वस्तु घेण्याची तयारी व अशा मागणीचाच विचार आपणांस करावयाचा आहे.

वर मागणीला काल–मर्यादा असावी असें म्हटलें आहे. आपल्याकडे आठवड्याचे आठवड्याला बाजार भरतात. शहरांत देखील सामान्यतः आठवड्याला मालाची खरेदी केली जाते. तेव्हां आपण आठवडा ही काल–मर्यादा समजून मागणीचा विचार करूं. एखाद्या वस्तूची मागणी म्हणजे निरनिराळ्या भावांत त्या वस्तूची जी विक्री होईल ती सर्व असें म्हणूं या. धान्यबाजारांत १ रुपयास ६ शेरानें ज्वारी १०० मण खपली तर विक्री होणारी १०० मण बाजरी ही या भावानें ज्वारीची मागणी होय. वस्तूंची मागणी पुष्कळ गोष्टींवर अवलंबून असते. उदा०, रविवारीं सासवडला बाजार भरतो; समजूं या कीं तेथें पुष्कळ खंडी ज्वारी विकावयास आली आहे. मग तिला किती मागणी येईल याचा विचार करतांना त्या बाजाराला विकत घेणारे किती आले आहेत,. त्यांना किती बाजरी विकत घ्यावयाची आहे, त्यांचेजवळ रक्कम—पैसा किती आहे, जर त्याच बाजारांत आणखी बाजरी विकण्यास आली असती तर गिऱ्हाइकांना बाजरी आवडते कां ज्वारी आवडते वगैरे आणि अखेरीस विकणारा काय भावानें ती विकण्यास तयार आहे, अशा अनेक गोष्टींचा विचार केला पाहिजे. कारण त्या सर्वांवर ती मागणी अवलंबून आहे. तथापि प्रथम आपण फक्त वस्तूचा भाव अगर किंमत कमीजास्त होत आहे व बाकी सर्व गोष्टी स्थिर आहेत असें समजून काय निष्पन्न होतें तें पाहूं या; म्हणजे भाव व मागणी यांचा संबंध कसा आहे हें साधारणपणें लक्षांत येईल. आपण असें समजूं या कीं, या 'मागणी व भाव' या बाबीचा विचार करतांना कालमर्यादा एक आठवडा धरली असून विचारासाठीं पुण्यांत लोण्याची मागणी कशी राहील हें पाहावयाचें आहे आणि असें समजूं या कीं हें सर्व लोणी एकाच जातीचें व दर्जाचें आहे.

| किती आणे शेर भाव असल्यास दर आठवड्यास | | | | | किती खप | |
|---|---|---|---|---|---|---|
| १६ | ,, | ,, | ,, | ,, | २०,००० | शेर |
| १५ | ,, | ,, | ,, | ,, | २२,००० | ,, |
| १४ | ,, | ,, | ,, | ,, | २४,००० | ,, |

| किती आणे शेर भाव असल्यास | दर आठवड्यास | किती खप | | | |
|---|---|---|---|---|---|
| १३ | ,, | ,, | ,, | ,, | २६,००० शेर |
| १२ | ,, | ,, | ,, | ,, | २७,००० ,, |
| ११ | ,, | ,, | ,, | ,, | २८,००० ,, |
| १० | ,, | ,, | ,, | ,, | ३०,००० ,, |

लोणी खाणारे एका आठवड्याला लोण्यावर किती खर्च करीत असतील हें ज्या भावानें जितकें शेर लोणी खपलें असेल त्याचा हिशोब करून काढतां येईल.

( सदरहु हिशोब पुढील पानांवर दिलेला आहे. )



| | | | | |
|---|---|---|---|---|
| १६ आणे | भाव | असतां | २०,००० | रु. |
| १५ आणे | ,, | ,, | २०,६२५ | रु. |
| १४ ,, | ,, | ,, | २१,००० | रु. |
| १३ ,, | ,, | ,, | २१,१२५ | रु. |
| १२ ,, | ,, | ,, | २०,३५० | रु. |
| ११ ,, | ,, | ,, | १९,२५० | रु. |
| १० ,, | ,, | ,, | १८,७५० | रु. |

यापमाणें एक आठवडयाचा खर्चाचा तक्ता होतो. हीच गोष्ट मागील पानावरील आकृतींत दाखविली आहे.

वर निरनिराळे ७ भाव घेऊन त्या त्या भावानुसार ७ मागण्या असतील असें कल्पिलें आहे व आकृतींत अब ही रेषा किती हजार शेर लोणी खपतें हें दाखविते व अक ही रेषा शेरीं काय भाव आहे हें दाखविते. अक या रेषेला समांतर अशी रेषा अब रेषेंतील २० हजार हा आंकडा दाखविणाऱ्या बिंदूपासून अब या रेषेला काटकोनांत काढली व अक या रेषेंतील १६ आणे दाखविणाऱ्या बिंदूपासून अब या रेषेला समांतर अशी रेषा अक या रेषेला काटकोनांत काढली म्हणजे त्या दोन्ही रेषा मिळतात. याप्रमाणें भाव व शेर दाखविणारे बिंदु काढले म्हणजे मागणीनिदर्शक (डड′ड″) रेषा मिळते. जसा भाव वाढेल अगर कमी होईल त्या मानानें खप कमी अगर जास्त होऊन त्याप्रमाणें मागणी-दर्शक रेषा वर अगर अबचे बाजूस झुकेल. जें उदाहरण आपण घेतलें आहे तें काल्पनिक आहे. कोणत्याही वस्तूची मागणी संपूर्ण-पणें निश्चित करणें कठिण आहे. एका विवक्षित वेळीं एकाद्या विवक्षित किंमतीस वस्तु मिळत असतां अमुक एक प्रमाणांत तिला मागणी आहे असें समजलें तरी भाव बदलल्यास ती मागणी कमी होईल कां जास्त होईल हा प्रश्न आहे; मागें काय झालें याचे आंकडे घेऊन हा प्रश्न सर्वस्वीं सुटण्यासारखा नाहीं. असें समजू या कीं गेल्या वर्षी साखरेचा भाव आजच्यापेक्षां शें. १०नीं जास्त होता, पण खप आजच्या-पेक्षां शें. ३०नीं कमी होता; याचा अर्थ असा नव्हे कीं आज शें. १० टक्के भाव वाढविला कीं लागलीच ३० टक्के विक्री कमी होईल. कदाचित् थोडी कमी होईल अगर कमी होणारही नाहीं. कदाचित् गेल्या वर्षांत अनेकांना जास्त साखर खाण्याची संवय झाली असेल, तिचा उपयोग नवे पदार्थ करण्याकडे केला जात असेल; माणसांचें उत्पन्न वाढलें असेल व म्हणून जास्त भावानें सुद्धां ते पूर्वीइतकीच साखर घेणें संभवनीय आहे. या व इतर अनेक गोष्टी पूर्वींचेंच प्रमाण ठेवूं देणार नाहींत; सर्वत्र सुबत्ता

असली म्हणजे पुष्कळ पदार्थांच्या किंमतीही वाढतात व खपही वाढतो. तथापि दिवस चांगले अगर वाईट कसेही असोत केव्हांहि किंमत वाढली कीं त्या वस्तूचा खप-विक्री सामान्यतः कमी होते. झालेल्या व्यवहारांचे खरेदीविक्रीचे अनुभव व आंकडे चालू घटकेच्या खरेदीविक्रीचा अंदाज काढण्यास सामान्यतः उपयोगीं पडतील; तथापि वर उल्लेखिलेल्या अनेक गोष्टीही हा अंदाज करतांना लक्षांत घेतल्या पाहिजेत. घेणारा वर्ग केवढा आहे, त्याचें उत्पन्न किती आहे, या व त्याची संस्कृति, अभिरुचि, इतर पदार्थांचा बाजारभाव वगैरे अनेक गोष्टींचा पदार्थांच्या खरेदीविक्रीवर परिणाम होत असतो. वस्तु घेणाऱ्या वर्गाची सर्व दृष्टींनीं माहिती असल्यामुळें मनुष्य मागणीचा अंदाज साधारणतः करूं शकेल. विशिष्ट वस्तूला काय मागणी येईल याचा अंदाज असणें व्यापाऱ्यांना अवश्यक आहे; त्याचप्रमाणें सरकारलाहि कर बसविण्यापूर्वी असे अंदाज व माहिती असणें अवश्य आहे; इतकेंच नव्हे तर विक्री करणारा हा मक्तेवाला ( Monopolist ) असला तरी सुद्धां या अंदाजाची माहिती त्याला असणें अवश्य आहे. मग तो मक्ता एका व्यक्तीला दिलेला असो अगर मोठ्या कंपनीला अगर मोठ्या कंपन्यांच्या संघाला दिलेला असो. एखाद्याला सिनेमा-थिएटर काढावयाचें आहे; त्याला ज्या वस्तींत तें काढावयाचें तेथील लोक काय दर ठेविले असतां येतील, ह्याचाही अंदाज असणें अवश्य आहे. खुद्द पुण्यांत 'प्रभात'मध्यें जे दर आहेत ते 'दिलखुष'मध्यें नाहींत; 'वेस्ट एंड'मध्यें निराळेच आहेत. याचा अर्थ तेथील वस्ती, तेथील लोकांची सांपत्तिक स्थिति, किती अंतरावरून व काय दर्जाचे लोक तेथें येऊं शकतील, अशा सर्व गोष्टींचा अंदाज करूनच त्याला दर ठेवावे लागतात. सरकारला सुद्धां वर सांगितल्याप्रमाणें ज्या वस्तूवर कर बसवावयाचा असेल तिच्या मागणीचा अंदाज असावा लागतो. नाहीं तर एखाद्या वस्तूवर कर बसवावा व तिची विक्री अगर आयात अपेक्षेप्रमाणें होऊं नये, म्हणजे आपत्तिच होईल. पुष्कळ वेळां कर कमी केल्यास विक्री कमी तर होत नाहींच, उलट जास्त होते व कराची रक्कमहि वाढते. या बाबतींत हिंदुस्थानांत मिठाच्या कराचें उदाहरण घेतां येण्यासारखें आहे.

| सन | दर मणास कर रु. | खप मण |
|---|---|---|
| १९०३ | २ | ३९० लक्ष |
| १९०५ | १॥८ | ४६२ ,, |
| १९०७ | १ | ४६३ ,, |

ना. गोखले यांनीं दरसाल या बाबतींत भाषणें करून कर कमी केला असतां मिठाचा खप वाढेल असें सांगितलें व त्याप्रमाणें घडूनही आलें. इतकेंच नव्हे तर

सदरहू करापासून मिळणारें उत्पन्नही वाढलें. उलट, समजा, एका विशिष्ट मोटार गाडीवर जर कर वाढविला तर विक्री कमी होऊन कदाचित् त्या कराचें उत्पन्न पूर्वीपेक्षां कमीही होणें संभवनीय आहे व अशीं उदाहरणें इंग्लंडमध्यें व अन्य देशांत झालीही आहेत. ऊंस व साखर यांचें उदाहरण घेऊं या. साधारणपणें पुढील सालीं किती साखर खपेल याचा अंदाज नसेल तर घोंटाळा होऊन ती न खपल्यास पुढील सालीं कारखानदार उंसाचें पीक घेणार नाहींत अगर फार कमी किंमतीला उंसाची खरेदी होईल व शेतकऱ्यांचें नुकसान होईल. या उलट, अंदाज असल्यास पूर्वसूचना मिळाल्यामुळें शेतकरी उंसा बदली दुसरीं पिकें लावतील. तात्पर्य या आर्थिक व्यवहारांत मागणी काय येईल याचा अंदाज असणें अवश्यक आहे.

हा अंदाज करणें कठिण आहे ही गोष्ट तर उघडच आहे. तथापि मागणी व किंमत यांचा संबंध समजावून घेऊन तदनुसार मागणी कशी कमीजास्त होते, किंमत कशी कमीजास्त होते, यांबद्दलची सर्वसामान्य तत्त्वें समजावून घेतलीं असतां पुष्कळ मदत होण्यासारखीं आहे. मागणीचें स्वरूप आपण प्रथम समजून घेतलें पाहिजे. वर आपण लोण्याबाबतच्या मागणीसंबंधीं एक कोष्टक तयार केलें आहे व जशी मागणी वाढते तदनुसार भाव कसा बदलतो हें मागणी-रेषेवरून दाखविलें आहे. उलट काय भाव असला म्हणजे किती मागणी असते हेंही त्यांतच दिसून येतें. पण कोणत्याही वेळीं एकच भाव असणार; समजा, तो १६ आण्यांस १ शेर याप्रमाणें आहे व या भावानें २० हजार शेर लोण्याची विक्री झाली; समजा, भाव कमी म्हणजे तेरा आणे शेर झाला तर विक्री २६ हजार शेर होईल; याचा अर्थ मागणीच्या स्वरूपांत बदल झाला असा नव्हे तर तें स्वरूप कायमच आहे, मात्र किंमत कमी झाल्यामुळें विक्री वाढली असा आहे. कारण, आपण असें गृहीत धरलें आहे कीं "बाकी सर्व गोष्टी स्थिर आहेत". बाजारांत तयार तुपाचे भावांतही फरक झाला नाहीं, अगर लोण्याऐवजीं दुसरें कोकोजम वगैरे घेण्याकडेही लोकांची प्रवृत्ति झाली नाहीं; अन्य कोणत्याही गोष्टी बदलल्या नाहींत त्या पूर्वीप्रमाणेंच आहेत; फक्त लोण्याचा भाव तेवढा १६ आण्यांवरून १३ आण्यांवर आला व विक्री २० हजारांवरून २६ हजारां-वर गेली; याचा अर्थ किंमत अगर भाव कमी झाल्यास मागणी वाढते. जर इतर गोष्टींत बदल झाला असेल तर आपल्याला तो लक्षांत घेऊन पुन्हां नवें मागणी-कोष्टक करावें लागेल; मात्र एकदां कोष्टक तयार केलें म्हणजे आपणांस "बाकी सर्व गोष्टी स्थिर आहेत" असें गृहीत धरलें पाहिजे; तरच किंमतीच्या चढउताराचा मागणीवर काय परिणाम होतो हें शास्त्रीयदृष्ट्या निश्चित करतां येईल.

वर दिलेल्या आकृतींत डड'ड'' ही मागणीरेषा अक या रेषेच्या बाजूनें अब या रेषेकडे खालवट होत गेली आहे; याचा अर्थच असा कीं आर्थिक व्यवहारांत कांहीं म्हणण्यासारखे बदल झाले नाहींत तर जशी किंमत कमी होत जाईल त्या मानानें मागणी वाढत जाईल व जशी किंमत वाढत जाईल त्या मानानें मागणी कमी होत जाईल.

हें असें कां होतें हें पाहूं या. आपण घेतलेल्या उदाहरणांत एका आठवड्याला १६ आणे भाव असतांना २० हजार शेर लोणी पुण्यास खपतें असें धरलें आहे. अर्थात् ही सर्व खरेदी एक मनुष्य करीत नाहीं; शेंकडों माणसें आपल्याला लागतें तेवढें लोणी खरीदतात व त्या सर्वांच्या खरेदीची बेरीज आपण २० हजार शेर धरली आहे. "बाकी सर्व गोष्टी स्थिर" असून कांहीं फरक नसला तर काय होतें हें आपण पाहूं या. १६ आणे भाव असतां एखादा मनुष्य जितकें लोणी घेईल त्यापेक्षां १३ आणे भाव झाला तर थोडेसें जास्त घेईल. उलट कांहीं गिऱ्हाइकें भाव १६ आण्यां-ऐवजीं १८ आणे झाला तर थोडेंसें कमी घेतील. आपण उदाहरणासाठीं ६ गिऱ्हा-इकें घेऊं या व भाव कमीजास्त झालें तर तीं किती जास्तकमी लोणी घेतील हें पाहूं याः—

| भाव | | | खप शेर | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| शेरीं आणे | अ | ब | क | ड | ई | फ |
| १६ | १ | ० | ० | ० | ३ | १ |
| १५ | १ | $\frac{१}{२}$ | ० | ० | ३ | १ |
| १४ | १ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{४}$ | ३ | १$\frac{१}{२}$ |
| १३ | १ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{४}$ | ३$\frac{१}{४}$ | १$\frac{१}{२}$ |
| १२ | १ | $\frac{३}{४}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{४}$ | ३$\frac{१}{४}$ | १$\frac{१}{२}$ |
| ११ | १ | $\frac{४}{४}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | ३$\frac{१}{२}$ | १$\frac{३}{४}$ |
| १० | १ | १ | $\frac{३}{४}$ | $\frac{३}{२}$ | ३$\frac{१}{२}$ | २ |

वरील उदाहरणांत निरनिराळ्या तऱ्हा दाखविल्या आहेत. गिऱ्हाईक अ कांहींही भाव झाला तरी १ शेरच लोणी घेतें. कांहीं गिऱ्हाइकें भाव स्वस्त झाला तर थोडें थोडें जास्त जास्त घेत जातात; एकंदर परिणाम असा कीं भाव कमी झाला म्हणजे सर्व-साधारणतः एकंदर विक्री वाढते. भाव कमी झाला म्हणजे गिऱ्हाईक तो माल जास्त घेतें तें कां याचा आपण विचार करूं या. आपण असें गृहीत धरलें आहे कीं, माग-णीचें स्वरूप स्थिर आहे व भाव कमीजास्त होतो म्हणून प्रत्यक्ष खप जास्तकमी होतो. आपल्या उदाहरणांत मागणीचें स्वरूप स्थिर आहे. गिऱ्हाइकांच्या उत्पन्नांत अगर

कमाईत बदल झालेला नाहीं. गिऱ्हाइकें आपलें उत्पन्न कसें खर्च करावयाचें हें ठरवीत असतात. अमुक एक रक्कम दर आठवड्यास लोण्यासाठीं खर्चावयाची असें त्यांनीं साधारणतः ठरविलेलें असतें. जर त्यावर जास्त खर्च केला तर त्यांना दुसरीकडे खर्च कमी करावा लागेल; पण ज्या अर्थीं तीं लोण्यावर जास्त खर्च करतात त्या अर्थीं इतर वस्तु व लोणी यांच्यांत तीं लोणी कोणच्या प्रमाणांत पसंत करतात हें उघड होतें. याच दृष्टीनें जर एखाद्या मनुष्याला लागणाऱ्या सर्व गोष्टी तो कोणत्या प्रमाणांत पसंत करतो हें आपणांला समजेल तर तो कोणत्या गोष्टी कोणत्या भावांत किती घेईल हें सांगतां येईल. त्याच्या पसंतीचें प्रमाण म्हणजे त्याला कोणत्या वस्तु आवडतात याचा पुरावाच आहे, तें त्याच्या आवडीचा आरसाच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण हें असलें पसंतीचें प्रमाण खरोखर व्यवहारांत आढळतें कां, अशी शंका कोणी घेईल. आज गिऱ्हाईक एक वस्तु पसंत करतें, उद्यां फॅशन बदलली कीं दुसरी वस्तु पसंत करतें. त्याचें उत्पन्न वाढलें म्हणजे त्याची दृष्टि बदलते. प्रकृति बिघडली कीं पुष्कळ माणसांना जुन्या परिचित गोष्टी नकोशा होतात; कित्येक गिऱ्हाइकें जाहिरातबाजीवर जाऊन आपल्या फॅशन्स् बदलतात व त्यामुळें त्यांच्या पसंतीच्या जुन्या वस्तु त्यांच्या मनांतून उतरतात. असें जर आहे तर पसंतीचें प्रमाण निश्चित कसें सांगणार ? पण याला उत्तर असें आहे कीं, आपण मुळांतच असें कल्पिलें आहे—गृहीत धरलें आहे कीं, मागणीचें स्वरूप स्थिर आहे, "बाकी सगळ्या गोष्टी स्थिर आहेत". जर बाकीच्या गोष्टींत फरक झाला तर मागणीच्या स्वरूपांत फरक होईल आणि तसें झालें तर आपण मांडलेलें मागणीचें कोष्टक चालणार नाहीं, नवें कोष्टक मांडावें लागेल. जेव्हां आपण कोणत्या कारणापासून कोणतें कार्य होतें हें शास्त्रीयदृष्ट्या पाहतों तेव्हां आपण तेवढेंच कारण अलग करतों व पाहतों. समजा, आपल्याला विजेच्या टॉर्चचें बटन दाबलें कीं प्रकाश पडतो हें सिद्ध करावयाचें आहे. तर आपण त्या ठिकाणीं दुसरा कोठलाहि प्रकाश नाहीं, येणें शक्य नाहीं, असें प्रथम करतों व नंतर बटन दाबतों तेव्हां प्रकाश पडतो. म्हणजे आपण 'कारण' वेगळें ( Isolate ) करतों व तेव्हांच आपण त्याचा परिणाम अगर 'कार्य' अमुक असें सांगू शकतों. त्याप्रमाणें आपण "बाकी सर्व गोष्टी स्थिर" असें समजून वस्तूंचे भाव तेवढे कमीजास्त होत असतां मागणीवर काय परिणाम होईल हें पाहूं इच्छितों तेव्हां हें पसंतीचें प्रमाण समजल्यास आपण सदरहू मनुष्य कसा खर्च करील हें सत्य सृष्टींत—प्रत्यक्ष व्यवहारांत सांगू शकूं. पुष्कळ वेळां माणसाची पसंती अगर अभिरुचि कायम असली तरी त्याच त्याच गोष्टीचा त्याला कंटाळा येतो; पण तो

कंटाळा येईपर्यंत जो काळ जाईल तेवढ्यापुरता तरी तो उत्पन्न कसें खर्च करील हें आपण सांगूं शकूं. कांहीं गोष्टी अशा असतात कीं, मनुष्य त्या फारशा कमीजास्त करूं शकत नाहीं व अशा गोष्टींकरितां आपल्या उत्पन्नाचा कांहीं ठराविक भाग त्याला कायम खर्च करावा लागतो. उदा०, राहण्याची जागा वगैरे. तथापि बाकीच्या ज्या गोष्टी त्याला लागतात त्यांच्यांत आपण त्याच्या पसंतीचें प्रमाण काढूं शकतों आणि तें कळलें तर तो कसा खर्च करील हें आपणांस सांगतां येईल. इतर वस्तु स्वस्त झाल्यास कदाचित् तोच मनुष्य जास्त भाड्याच्या चांगल्या जागेंत जाईल; किंवा महाग झाल्यास कदाचित् कमी जागा वापरील अगर स्वस्त जागेंत जाईल; पण कांहीं झालें तरी वर लिहिलेल्या सिद्धांतास बाध येत नाहीं. पुष्कळ वेळां गिऱ्हाईक वस्तु स्वतःसाठीं घेत नाहीं. समजा, एक बाई बाजारांत खेळणीं घेण्यासाठीं गेली. पूर्वी एक आण्यास मिळणारें खेळणें जर पाऊण आण्यास मिळालें तर तिनें दोन खेळणीं घेणें जास्त संभवनीय आहे. ती कोणासाठीं घेते हा प्रश्न नाहीं. ती व्यक्ति गिऱ्हाईक म्हणून बाजारांत आली असतां भाव स्वस्त झाला—कमी झाला तर त्याचा त्या व्यक्तीवर काय परिणाम होईल, म्हणजे ती व्यक्ति स्वस्त झालेली वस्तु जास्त घेईल कीं नाहीं हें पाहावयाचें आहे. कोणी असें म्हणेल कीं खरोखर वस्तु कोणती घ्यावी किंवा किती घ्यावी याचा विचार फारच थोडीं माणसें करतात. पण आपण जें उदाहरण घेतलें आहे त्यांत मुळांत असें गृहीत धरलें आहे कीं, किती घ्यावयाचें व काय घ्यावयाचें हें गिऱ्हाइकाच्या पसंतीचें प्रमाण साधारणतः निश्चित आहे व त्याच्या वागणुकीवरून आपण तें संपूर्णपणें निश्चित करूं शकतों. खरोखर असें जर कोणी म्हणूं लागला कीं बहुतेक माणसें कांहींही विचार न करतां बाजारांत येतात, मनांत संकल्प अगर निश्चय न करतां वाटेल तें अगर वाटेल तितकें विकत घेतात, तर मग त्याला उत्तरचं नाहीं. पण खरोखर व्यवहारांत माणसें अशा तऱ्हेनें वागत नाहींत; तसें वागणें त्यांना परवडणार नाहीं. बहुसंख्य लोकांजवळ असणारा पैसा त्यांच्या इच्छांच्या व महत्त्वाकांक्षाच्या मानानें अपुरा व मर्यादित असल्यामुळें काय घ्यावें, काय न घ्यावें, किती घ्यावें, कसा खर्च करावा तो कोठें करावा याचा विचार त्यांना करावाच लागतो. अर्थात्च गिऱ्हाईक हें सर्वसामान्यतः विचारी असतें. मग असें गिऱ्हाईक—असा मनुष्य आपला पैसा कसा खर्च करील तें पाहूं या. अवश्य लागणाऱ्या गोष्टी मनांत धरून व त्यांचे भाव लक्षांत घेऊन जास्तींत जास्त सोय व सुख कशीं मिळतील या दृष्टीनें तो आपला एकंदर हिशोब जमवील, हें करतांना आपल्या जास्तींत जास्त पसं-

तीच्या वस्तु घेईल व आपल्या खर्चांचा व व्यवहाराचा सर्व मेळ जमवील. असें झालें म्हणजे कोठेंहि फाजील खर्च अगर फाजील कंजूषपणा त्याच्या हातून होणार नाहीं.

या त्याच्या वागण्यानें त्याला स्वतःची जास्तींत जास्त सोय करतां आली, जास्तींत जास्त सुख मिळालें किंवा खर्चलेल्या पैशाच्या विनिमयापासून जास्तींत जास्त 'उपयुक्तता' असलेल्या म्हणजेच त्याच्या दृष्टीनें जास्तींत जास्त उपयोगी अशा गोष्टी त्याला मिळाल्या. त्यानें ज्या रीतीनें आपलें 'बजेट' बसविलें असेल ती कदाचित् दुसऱ्यांना पसंत पडणार नाहीं. त्यानें कपड्यापेक्षां खाद्यपेयांत जास्त खर्च केला असता तर त्याची ताकद वाढली असती. पुस्तकांत जरा जास्त खर्च केला तर त्याच्या ज्ञानांत भर पडली असती; पण त्यानें आपल्याला लागणाऱ्या वस्तूंची जुळवाजुळव कशी करून घ्यावी हा त्याचा प्रश्न आहे. जास्तींत जास्त सोय व सुख हीं त्याच्या दृष्टीनें असें करण्यामुळें झालीं. वर म्हटल्याप्रमाणें त्याला खर्च केलेल्या पैशापासून जास्तींत जास्त उपयुक्तता मिळाली यांत नैतिक गोष्टींचा विचार करावयाचा नसतो. नैतिक दृष्टीनें त्यानें केलेला खर्च कदाचित् कमी दर्जाचा असेल. पण आपणांस जो विचार करावयाचा आहे तो माणसानें कसें वागावें हा नसून तो कसें वागतो हा आहे. नैतिक दृष्टीनें त्याच्या मागणीचें तारतम्य ठरविणें हें सरकार, म्युनिसिपालिटी इत्यादींना अवश्यक होतें. फक्त खासगी उत्पादकांच्या कोष्टकांत त्याचा अन्तर्भाव होत नाहीं. त्याच्या पसंतीस काय उतरलें व त्याप्रमाणें त्यानें काय घेतलें येवढेंच आपण त्याच्या वागण्यावरून विचारांत घ्यावयाचें आहे. दुसऱ्या ज्या कांहीं वस्तु इतरांनीं पसंत केल्या असल्या त्या त्यानें नापसंत केल्या व कांहीं वस्तूंपेक्षां इतर कांहीं वस्तूंना त्यानें पसंती दाखविली; तथापि हा सर्वस्वीं त्याचा प्रश्न आहे.

आपण घेतलेल्या उदाहरणाप्रमाणें सदर (उपभोगी) मनुष्यानें आपणाला पाहिजे त्या वस्तु खरेदी केल्या. समजा, जर त्यांतील एक आण्याची एखादी वस्तु कमी करून त्यानें दुसरी एक आण्याची घेतली तर या दोन्ही वस्तु त्याच्या दृष्टीनें सारख्याच उपयुक्त आहेत असें झालें. आतांपर्यंत तो अकरा आण्यांचें तूप घेत होता व आतां त्यानें बारा आण्यांचें घेतलें व त्यामुळें त्याला एक छटाक जास्त तूप मिळालें याचा अर्थ त्याला या छटाक तुपाची उपयुक्तता एक आण्याच्याइतकीच आहे. आपण आणखी एक उदाहरण घेऊं या. एका इसमास दर आठवड्यास ६ शेर साखर लागते व तिचा भाव दर शेरास सात आणे आहे. समजा, 'बाकी सर्व गोष्टी स्थिर आहेत' पण साखरेचा भाव मात्र शेरीं आठ आणे झाला तर सदरहू इसम ५ शेर साखर खरेदी करतो. याचा अर्थ सहावा शेर तो खरेदी करीत नाहीं व आठ

आणे वांचवितो; म्हणजेच त्या सहाव्या शेराची उपयुक्तता त्याला आठ आण्यांच्या-इतकी वाटत नाहीं, पण तो जेव्हां सात आणे भाव असतांना सहावा शेर घेतो तेव्हां त्याचा अर्थ त्या सहाव्या शेराची उपयुक्तता त्याला खात्रीनें सात आण्यांच्याइतकी वाटते. प्रत्यक्ष व्यवहारांत मनुष्य दुकानीं जातो तेव्हां भाव बदललेला असला म्हणजे जास्तीं घ्यावयाचें कीं कमी घ्यावयाचें याचा विचार करीतच नाहीं असें नाहीं. वरील उदाहरणांत, समजा, आठ आणे भाव पाहून ५ शेर साखऱ्या त्यानें खरेदी केला व दुसऱ्या आठवडयांत ७ आणे भाव पाहून सहावा शेर घेतांना कांहीं तरी विचार त्यानें केला असेलच; ७ आणे वांचवावे कीं १ शेर अधिक घ्यावा हें विचार करून त्या वाढलेल्या शेराची उपयुक्तता लक्षांत घेऊन त्यानें सहावा शेर घेतला व ७ आणे दिले. हा सहावा शेर ही एक त्याच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें घेण्याची सीमा ठरली व तिचा संबंध चालू भावाशीं आहे हें उघड झालें. जसजसा एखाद्या वस्तूचा पुरवठा त्या माणसाजवळ जास्त जास्त होत जाईल तसतशी जी वाढ त्या वस्तूच्या पुरवठ्यांत होते तिची उपयुक्तता त्याला कमी कमी वाटत जाते. भाव लक्षांत घेऊन ज्या वेळेला तो विचार करून वस्तु घेतो अगर घेत नाहीं, त्यावेळेस ती अधिक घेतलेली वस्तु अगर न घेतलेली तेवढी वस्तु, हीं त्याची वागणूक, हा त्याच्या मनांतल्या त्या वस्तू संबंधीं असलेल्या उपयुक्ततेचा एक पुरावा आहे; हा उपयोगीपणा अगर ही 'उपयुक्तता' हिला आपण सीमागत म्हणूं या; ही सीमागत अगर कडेची उपयुक्तता व्यवहारांत फार महत्त्वाची गोष्ट आहे; ही सीमागत उपयुक्तता वस्तूंचा पुरवठा कमीजास्त असेल त्याप्रमाणें कमीजास्त होईल. समजा, एखाद्या माणसाजवळ १०० शेर साखर आहे; त्यानें आणखी १० शेर अधिक घेतली व पुनः आणखी १० शेर घेतली तर पहिल्या १० शेरांची जी उपयुक्तता त्याला होती तीपेक्षां नंतरच्या १० शेरांची उपयुक्तता खास कमी असणार. तसेंच पहिल्या १० शेरांची जी उपयुक्तता त्याला वाटली तीपेक्षां ९० नंतर जे १० शेर त्यानें घेतले, त्यांची उपयुक्तता त्याला जास्त वाटली असली पाहिजे. पदार्थांची वाढ ज्यामानानें जास्त त्या मानानें मनुष्यास त्याची सीमागत उपयुक्तता कमी होत जाते व ही कमी होणारी उपयुक्तता त्याच पदार्थांपुरती न राहतां इतर ज्या वस्तु ज्या त्याच्या मागणीच्या क्षेत्रांत येतात त्यांच्या मानानेंही ती कमी होत जाते. समजा, पूर्वी तो ६ शेर तूप घेत होता, त्यापैकीं २ शेर कमी करून, तेवढ्या वांचलेल्या रुपयांची आणखी साखर त्यानें घेतली कीं त्याला या घेतलेल्या साखरेची सीमागत उपयुक्तता कमी झाली येवढेंच नव्हे तर त्याचबरोबर उरलेल्या पदार्थांची सीमागत उपयुक्तता जास्त झाली; कारण

उरलेले पदार्थ साखरेच्या मानानें कमी झाले; पण त्यांची सीमागत उपयुक्तता मात्र वाढली; कारण वस्तूंचें आपापसांतील प्रमाण बदललें. कोणत्याही वस्तूची उपयुक्तता स्वयंभू अगर बिनहिशेबी नसते; तिचा संबंध इतर वस्तूंच्या उपयुक्ततेशीं असतोच; व गिऱ्हाईक वस्तु खरेदी करतांना निरनिराळ्या वस्तूंची उपयुक्तता एकमेकींशीं पडताळून कोणती जास्त उपयोगी कोणती कमी असा विचार करून नंतरच खरेदी करीत असतें.

सामान्यतः एखाद्या वस्तूचा पुरवठा जास्त होत गेला म्हणजे तिची कडेची उपयुक्तता अगर अगर सीमागत उपयुक्तता कमी होते हें वर सांगितलेंच आहे. आपण तुपाचें उदाहरण पुनः घेऊं. त्यानें एकदां सर्व विचार करून १३ आणे भाव असतांना २६ शेर तूप खरेदी केलें याचा अर्थ २६ शेर तूप व इतर वस्तु यांमध्यें त्या माणसाच्या दृष्टीनें एक उपयुक्ततेचें प्रमाण पडलें. आतां तुपाचा भाव १३ आणेच असतांना तो २६ शेरापेक्षां जास्त तूप घेणार नाहीं; कारण तसें केल्यास दुसऱ्या कांहीं पदार्थांवर त्याचा परिणाम होईल, ते त्याला कमी घ्यावे लागतील; याचा अर्थ जे पदार्थ कमी घ्यावे लागतील त्यांची उपयुक्तता (उपयोग) त्याच्या दृष्टीनें जास्त घेतल्या जाणाऱ्या तुपाच्या दृष्टीनें जास्त आहे व म्हणूनच तो जास्त तूप घेत नाहीं. हें आणखी स्पष्ट करावयाचें झाल्यास पाहा कीं जर त्याला १ शेर तूप जास्त घ्यावयाचें असेल तर १३ आणे किंमतीचा दुसरा एखादा पदार्थ कमी घ्यावा लागेल; समजा, त्यानें १३ आण्यांची साखर कमी घेतली; पण ती तो कमी घेत नाहीं; याचा अर्थ १ शेर तुपापेक्षां त्याला १३ आणे किंमतीच्या साखरेची उपयुक्तता,—उपयोग जास्त वाटतो. पण समजा कीं, तुपाचे भावांत फरक झाला व तें ३ आण्यांनीं स्वस्त झालें; मग मात्र तो जास्त तूप घेईल व त्या जास्त घेण्याची मर्यादा त्याला इतर वस्तूंची किती गरज आहे, किती उपयुक्तता आहे हें पाहूनच तो ठरवील. तथापि, सर्वसाधारण रीतीनें आपण असें म्हणू या कीं जसजशी वस्तुची किंमत कमी होते तसतशी त्या वस्तुची विक्री वाढत जाते.

निरनिराळ्या वस्तूंच्या किंमती त्या त्या वस्तूंच्या मानानें निरनिराळ्या कां असतात याचें एक कारण सीमागत उपयुक्तता हें होय. तें कसें तें आपण पाहूं या. प्रत्येक गिऱ्हाईक कांहीं एक विशिष्ट बाजारभाव असतांना आपल्या पसंतीनें कोणती वस्तु किती घ्यावयाची याचा विचार करून ती घेत असतें. आपलें उत्पन्न तें अशा रीतीनें खर्च करतें कीं, मागें सांगितल्याप्रमाणें जास्तींत जास्त सोय व्हावी, सुख मिळावें. याचा अर्थ, प्रत्येक वस्तूची सीमागत उपयुक्तता त्याच्या दृष्टीनें जितक्या किंमतीची

असेल तितक्याच किंमतीची सीमागत उपयुक्तता त्यानें खरेदी केलेल्या दुसऱ्या वस्तूंची असणार. ज्या वस्तु त्यानें घेतल्या व जो मेळ बसविला त्यांतील प्रत्येक वस्तु त्याच्या दृष्टीनें सारखीच उपयोगी होती. जर दुसरी वस्तु जास्त उपयोगी असती तर ती त्यानें घेतलीच असती. त्यानें ती घेतली नाहीं याचा अर्थच त्यानें घेतलेली प्रत्येक वस्तु त्याच्या दृष्टीनें सारखीच उपयोगी आहे; असें नसेल तर त्याची जास्तींत जास्त सोय व्हावयाची नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक गिऱ्हाइकानें कोणती वस्तु किती घ्यावयाची ही गोष्ट एकदां पसंतीनें ठरविली म्हणजे महिनेमहिने अगर सालोसाल तो कोणती वस्तु किती घेईल हेंही निश्चित होतें. अशा रीतीनें विवक्षित वस्तु अगर पदार्थ किती खपेल हें निश्चित होईल. त्या पदार्थांची एकंदर विक्री निश्चित झाली म्हणजे तो ज्या अनेक पदार्थांपासून तयार होतो त्या पदार्थांची विक्रीही निश्चित होत जाईल; मात्र त्या पदार्थांपासून पूर्वींच्यापेक्षां निराळी वस्तु तयार करणें जास्त फायद्याचें झालें तर पूर्वींची वस्तु तयारच होणार नाहीं; त्यामुळें पुन्हां सर्व पदार्थांच्या किंमती बदलतील. समजा, पुणें येथें बाहेरगांवाहून कांहीं कारणामुळें दूध जास्त विकावयास येऊं लागलें; त्यामुळें त्याची किंमत कमी झाली व लोक दूध जास्त घेऊं लागले. वर सांगितल्याप्रमाणें जास्त जास्त दूध मिळालें म्हणजे त्याची सीमागत उपयुक्तता कमी कमी होणार आणि तें सर्व खपलें असें धरलें तर इतर पदार्थांच्या मानानें दुधाची किंमत कमी झाली असेंच होणार; असें समजूं या कीं ४०००० शेर दूध येत होतें व १ रुपयास ४ शेर दरानें त्याची किंमत रु. १०००० मिळत होती. जास्त पुरवठ्यामुळें ५००००, ६०००० शेर दूध आलें तसा त्याचा भाव कमी झाला; गिऱ्हाईक जास्त दूध घेऊं लागून सर्व ६० हजार शेर दूध खपलें व समजा ५ शेर भावानें त्याचे १२ हजार रुपये आले तरी इतर वस्तूंचे भाव कायम असल्यामुळें त्यांच्या दृष्टीनें दुधाची ऐन किंमत कमीच झाली. कारण पूर्वींच्या भावानें १५ हजार रुपये येऊं शकले असते तेथें १२ हजारच रुपये आले. त्याचप्रमाणें दूध स्वस्त जातें म्हणून त्याचेऐवजीं खवा करून विकणें फायदेशीर असेल तर तात्बडतोब त्याचा परिणाम भावावर पुनः होईल. तथापि गिऱ्हाइकानें पसंतीनें आपली मागणी एखाद्या बाबतींत निश्चित केली म्हणजे तिजबरोबर इतर वस्तूंचीहि मागणी अप्रत्यक्ष रीतीनें ठरते व ह्या त्याच्या पसंतीमुळें त्या अन्य वस्तूंच्या किंमती ठरण्यावरहि तिचा परिणाम होतो.

एखाद्या वस्तूच्या किंमतीमध्यें अगर भावांत फरक पडला, तो कमी अगर जास्त झाला म्हणजे त्या वस्तूंची सीमागत उपयुक्तता त्या व्यक्तीबाबत कमीजास्त होते. याचा अर्थ तिची ( Total ) वट उपयुक्तता कमीजास्त होतें असा मात्र नव्हे.

उदा०, समजा, एक मनुष्य आठवड्याला १ रुपयाचें दूध घेतो व वर्तमानपत्रांकरितां पण १ रुपया खर्च करतो. याचा अर्थ वर्तमानपत्रांपासून—वाचनापासून त्याला जें सुख होतें, जी उपयुक्तता वाटते, ती एक रुपयाच्या दुधाइतकी आहे. कदाचित् वेळच आली तर तो दूध कमी करील पण वाचनाकरितां रक्कम कमी करणार नाहीं; पण सीमागत उपयुक्ततेच्या दृष्टीनें वर्तमानपत्रांबाबत शेवटचा आणा—त्याची उपयुक्तता दुधाच्या शेवटच्या आण्याच्या इतकीच आहे म्हणून तो वर्तमानपत्रावर खर्च होणारा शेवटचा सोळावा आणा वर्तमानपत्राला व दुधावर खर्च होणारा शेवटचा सोळावा आणा दुधाकरितां खर्च करतो. तसें नसतें तर एक आण्याचें जास्त दूध, कां एक आण्याचें जास्त वर्तमानपत्र असा प्रश्न उपस्थित होऊन त्यांच्या सीमागत उपयुक्ततांत फरक पडला असता व ज्याची उपयुक्तता अगर उपभोग त्याच्या दृष्टीनें जास्त तिकडेच तो एक आणा गेला असता. मनुष्याच्या या वागणुकीमुळें आपणांस् आर्थिक व्यवहारांत कित्येक विरोधी चमत्कार दिसतात. वास्तविक दूध किंवा रोटी वगैरे खाण्याचे पदार्थ हे मनुष्यास अत्यंत उपयुक्तच नव्हे तर अवश्यक आहेत. असें असूनही अशा वस्तु फारच स्वस्त मिळतात; पण ज्या खरोखर उपयुक्त नाहींत, उपयोगी नाहींत, अवश्यकही नाहींत, अशा हिरे, माणकें, मोतीं, वगैरे वस्तूंना भयंकर किंमत पडतें; असें कां? तर याचें कारण मनुष्य प्रत्येक वस्तु घेतांना तिची सीमागत उपयुक्तता पाहत असतो. किती घेतलें तर चालेल, किती न घेतलें तर चालेल असा विचार करून अवश्यकतेची सीमा मनाशीं ठरवीत असतो; उपयुक्तता, उपयोग जणूं कांहीं तो मनांत मोजतो व माप भरलें कीं पुरे करतो. याचाच अर्थ तो सीमागत उपयुक्तता पाहतो. म्हणून जो इसम हिरे, माणकें वगैरे घेतो त्या इसमानें अन्नवस्त्रादिक गोष्टींवर पुरें होण्याच्या शिगेपर्यंत, समाधानाच्या सीमेपर्यंत खर्च केलेलाच असतो; म्हणून शिल्लक राहणाऱ्या रुपयांतून वस्त्रें किंवा खाण्याच्या वस्तु जास्त घेण्यापेक्षां ती रक्कम तो हिरे, माणकें वगैरे खरेदी करण्यांत खर्च करतो. जर उपाशीं राहावयाचा प्रसंग आला तर अर्थात्च तो हिरे घेणार नाहीं, अन्न, धान्य वगैरे विकत घेईल हें उघड आहे; पण असा प्रसंग क्वचित्च येतो. ही वस्तु थोडीशी जास्त घ्यावयाची कीं थोडी कमी घ्यावयाची, कां दुसरी एखादी वस्तु थोडी कमी अगर थोडी जास्त घ्यावयाची, एवढ्याच चतुःसीमेंत सामान्यतः गिऱ्हाइकें विचार करीत असतात. व त्यामुळें वस्तुवस्तूंतील वट उपयुक्तता सारखी होत नाहीं, तर सीमागत उपयुक्तता सारखी होते. हें थोडें जास्ती घेणें व तें थोडें कमी घेणें हें सारखें होतें. हें थोडें कमी कां व तें थोडें जास्त कां हें तो किंमतीचे दृष्टीनें पाहतो. एक

आण्याचें अधिक दूध काय किंवा एक आण्याचें अधिक वर्तमानपत्र काय हें कमी-अधिक पैशाच्या मापानें मोजावयाचें, पदार्थांच्या मानानें नव्हे; कारण १ छटाक अधिक दूध व एक अधिक वर्तमानपत्र यांची वट उपयुक्तता सारखी नाहीं हें उघड आहे. मनुष्य शेंकडों वस्तु घेत असतो; त्याच्या मनाची पसंती किंवा त्याला वाटणारी उपयुक्तता सांगावयाची असल्यास ती पदार्थांच्या सहाय्यानें सांगणें शक्य नाहीं. म्हणून सर्व पदार्थांना लावतां येईल असें पैसा हें माप असल्यामुळें त्या भाषेंत, किंमतीच्या भाषेंतच आपण ही तुलना करूं शकतों. शिवाय भाव किंवा किंमत ही सर्व गिऱ्हाइकांना सारखीच असणार; पण प्रत्येक गिऱ्हाईक मात्र आपआपल्या पसंतीप्रमाणें निरनिराळ्या प्रमाणांत वस्तु कमीजास्त घेणार. गिऱ्हाइकांची पसंती ही निरनिराळ्या भावांनीं, किंमतीनीं व्यक्त होत नसून त्यांनीं निरनिराळ्या प्रमाणांत केलेल्या खरेदीनें ती व्यक्त होते. मनुष्य श्रीमंत झाला तर जास्त वर्तमानपत्रें घेईल; पण जें एक आण्याला मिळतें त्याला दोन आणे देणार नाहीं हें उघड आहे.

वर सर्वसामान्यतः वस्तूंची किंमत वाढली कीं त्या मानानें मागणी--विक्री कमी होत जाते असें दिसलें. पण कांहीं वेळां अपवाद म्हणूनच कीं काय किंमत वाढत गेली तरी कांहीं मर्यादेपर्यंत विक्रीही वाढत जाते. उदा०, नुकतीच लढाई सुरू झाली तेव्हां भाव वाढूं लागले. त्याबरोबर पुष्कळ लोकांनीं आणखी भाव वाढत जातील या भीतीनें जास्त खरेदी वाढलेल्याच भावांत केली; पण ही गोष्ट सुद्धां वरील नियमास अपवाद होईल असेंच कांहीं म्हणतां येणार नाहीं. कारण वाढत्या भावांत जी जास्त विक्री झाली तिचें खरें कारण म्हणजे मागणीच्या ऐन स्वरूपांतच फरक झाला. लोकांच्या अपेक्षेंत एकदम बदल झाला त्यामुळें ही गोष्ट झाली. कांहीं श्रीमंत लोक जडजवाहीर, हिरें माणकें जास्त महाग होत गेलीं तरी सुद्धां घेतात, जास्त घेतात; कारण आपली श्रीमंती त्यांना दाखवावयाची असते. पण हीं थोड्या व्यक्तींचीं उदाहरणें झालीं. जर याच जवाहिरादिक पदार्थांच्या बाबतींतही किंमती वाढत गेल्या तर एकंदर गिऱ्हाईक लक्षांत घेतां विक्री कमीच होत जाईल हें निश्चित. कांहीं वेळां मनुष्याला अवश्यक असणाऱ्या धान्य वगैरे वस्तूंचे भाव वाढले, तर प्रसंगविशेषीं जास्त किंमत देऊनही जास्त विक्री होते. कारण, समजा, सर्वच पदार्थांचे भाव वाढले तर पुष्कळ वेळां गिऱ्हाईक दुसरी एखादी वस्तु कमी घेऊन खाण्याची वस्तु जास्त किंमत देऊनही घेत असतें व ती जास्तही घेतें. कारण दुसऱ्या वस्तूची किंमत त्या मानानें फारच वाढलेली असते. समजा, साखरेचा भाव गुळाच्या भावापेक्षां पुष्कळ वाढला, तर मनुष्य साखर न घेतां त्याच पैशांतून जास्त भाव असतांनाही

गूळच जास्त घेऊन आपली गरज भागवील व आपलें एकंदर 'बजेट' जुळवील; पण अशा कांहीं अपवादात्मक गोष्टी सोडून दिल्यास वर सांगितलेला, सर्वसामान्य सिद्धांत व्यवहारांत अनुभवाला येतो. आतां आणखी एका गोष्टीचा विचार करूं या. कांहीं वस्तु अशा असतात कीं त्यांच्याशिवाय माणसाचें चालत नाहीं; कांहीं अशा असतात कीं मनुष्य त्यांच्याशिवाय राहूं शकतो. जीवनाला अवश्यक लागणारें अन्नवस्त्र किंवा समाजानें कांहीं बाबतींत ठरविलेलें संकेत व त्यांचे निदर्शक पदार्थ (उदा०, सुवासिनीचें मंगलसूत्र) या सर्व वस्तु अशा आहेत कीं, त्यांच्या मागणीचें स्वरूप हें लवचीक नाहीं. ती अगदीं नाईलाजी मागणी असते. याच्या उलट, दागिने, सायकली इ० चैनीच्या वस्तु; त्यांच्या बाबतींत मनुष्य कमीजास्त करूं शकतो. त्यांच्या मागणीचें स्वरूप लवचीक, त्यांत फरक होऊं शकतो; तथापि हा फरक प्रमाणांतला आहे, स्थूलमानाचा आहे. कारण, ज्या वस्तु आपण अवश्यक समजतों त्यांच्या बाबतींत तसल्या दुसऱ्या वस्तु मिळाल्या तर लागलीच त्याचा बाजारावर परिणाम होतो. समजा, बाजरी एक रुपयास ६ शेर भावानें मिळत आहे; आतां बाजरी ही अवश्यक बाब आहे; पण असें समजूं या कीं यंदां तिचें पीक कमी आलें आणि ती रुपयास ५ शेर झाली व त्याच वेळेस ज्वारी व गहूं यांचा भाव पूर्वीइतकाच म्हणजे रुपयास ५।।। शेर व ५।। शेर आहे. अशा स्थितींत कांहीं मर्यादेपर्यंत, बाजरीची विक्री कमी होऊन ज्वारी व गहूं यांची विक्री वाढेल व तेवढ्यापुरती बाजरीची मागणी लवचीक होती असें म्हणावें लागेल. तसेंच अनवश्यक वस्तूंचे बाबतींतही, कांहीं वेळां मागणी लवचीक राहणार नाहीं. समजा, एखाद्याला एका विशिष्ट तऱ्हेचाच हिरा पाहिजे आहे व दुसरा चालणार नाहीं तर त्या व्यक्तीची मागणी अगदीं नाइलाजी आहे असेंच म्हटलें पाहिजे. त्याचप्रमाणें पुष्कळ वस्तु अशा स्वरूपाच्या असतात कीं, एका मागणीबरोबर अनेक गोष्टींचा तींत समावेश होतो. उदा०, कापडाची मागणी वाढली कीं त्याचबरोबर कापसाची व त्याच्या सुताची मागणी वाढणार, कापडाचा भाव कमी झाला कीं त्याची विक्री वाढणार व कापडाची विक्री वाढूं लागली कीं कापसाचीही विक्री वाढणार हें उघड आहे. आतांपर्यंतच्या विवेचनाचें सार आपल्याला असें सांगतां येईल कीं (१) वस्तूंची किंमत जसजशी वाढत जाते त्या मानानें त्या वस्तूंची मागणी--विक्री कमी कमी होत जाते व (२) वस्तूंची किंमत जसजशी कमी होत जाते त्या मानानें तिची मागणी—विक्री वाढत जाते. अर्थात् हे नियम सामान्यतःच अनुभवाला येतात असें समजलें पाहिजे.

———

# ३. मागणी ( पुढें चालू )

आतांपर्यंत, भाव कमीजास्त झाला म्हणजे मागणी ही कशी जास्त कमी होते याचा विचार केला. आतां मागणी बराच काळपर्यंत कायम आहे, तिच्या स्वरूपांत बदल झाला नाहीं असें गृहीत धरून भाव अगर त्या वस्तूची किंमत कशी जमून येते, कशी निश्चित होते याचा विचार करूं. आपण मागणी निश्चित धरली आहे, तेव्हां हें उघड आहे कीं वस्तूचा भाव किंवा किंमत, वस्तूच्या पुरवठ्यावर म्हणजे सदरहू वस्तु बाजारांत विक्रीकरितां किती आली आहे यावर अवलंबून राहील. आतां विक्रीला आलेल्या वस्तूंचें प्रमाण किंवा पुरवठा, याचें स्वरूप आपण समजावून घेण्याचा प्रयत्न करूं. पुरवठा म्हणजे प्रत्यक्ष बाजारांत वस्तु किती प्रमाणांत आली आहे हें समजावयाचें कां सदरहू वस्तु एकंदर किती आहे तें सर्व प्रमाण समजावयाचें ? कांहीं वस्तु अशा असतात कीं त्यांचा पुरवठा निश्चित असतो, मर्यादित असतो, त्यांत वाढ होत नाहीं. कांहीं वस्तूंच्या पुरवठ्यांत थोडीशीच वाढ होते. कांहींत वाटेल तेवढी म्हणजे फार मोठ्या प्रमाणांत वाढ होतें. सोन्याचा पुरवठा म्हटला तर त्यांत वर्षाकांठीं थोडीच वाढ होते; तेव्हां त्याच्या संबंधांत एकंदर अस्तित्वांत असलेला पुरवठा असाच अर्थ आपण घेतला पाहिजे. तसेंच गव्हाचा पुरवठा आपण म्हणूं लागलों म्हणजे त्याचा अर्थ चालू सालीं पिकलेल्या गव्हाचा पुरवठा असाच समजला पाहिजे. तथापि जेव्हां व्यवहारांत आपण 'पुरवठा' हा शब्द वापरूं लागतों तेव्हां त्याचा व्याप आपण निश्चित केला पाहिजे. सर्व पिकलेला गहूं कांहीं बाजारांत विक्रीला येत नाहीं; म्हणून सामान्यतः वस्तूंचें जें प्रमाण विवक्षित काळांत बाजारांत विक्रीकरितां येतें त्यालाच आपण पुरवठा म्हणूं या. कारण त्याचाच परिणाम बाजारावर व मनुष्याच्या व्यवहारावर व विनिमयावर होत असतो; आणि पुरवठा याचा अर्थ किंमत घेऊन विक्रीकरितां ठेवलेल्या वस्तूंचें प्रमाण. कारण फुकट एखादी गोष्ट मिळत असेल तर त्याचा विचार करणें जरूर नाहीं हें पूर्वीच सांगितलें आहे. पुरवठ्याचें स्वरूप म्हणजे कोणत्या परिस्थितींत तो किती व कसा होऊं शकतो हें आपण समजा-

वून घेतलें पाहिजे. त्याचप्रमाणें निरनिराळे भाव असतांना किती प्रमाणांत त्या वस्तूंचा पुरवठा होईल व तो कोणकोणत्या गोष्टींवर अवलंबून राहील हेंही पाहिलें पाहिजे. वस्तूंचें उत्पादन म्हणजे त्या तयार करणें व त्यांना खर्च कसा लागतो हें व याबाबतचे सिद्धांत व नियमही आपण समजून घेतले पाहिजेत. परंतु ह्या गोष्टी 'वस्तूंचें उत्पादन' या बाबीचा विचार करतांना आपण पाहूं. एक गोष्ट सामान्यतः उघड दिसते ती ही कीं, "बाकीच्या सर्व गोष्टी जर स्थिर असतील" व जर वस्तूंची किंमत वाढली तर त्या वस्तूंचा पुरवठा वाढेल. बाकीच्या गोष्टी म्हणजे, ती वस्तु ज्या वस्तूपासून उत्पन्न होते त्यांचे भाव, मजुरीचे दर, इतर वस्तूंचा पुरवठा वगैरे. किंमत वाढली कीं वस्तुच्या विक्रींत फायदा जास्त होतो म्हणून साहजिकच ती वस्तु तयार करणारा ती जास्त प्रमाणांत तयार करून विक्रीला ठेवील हें उघड आहे. मात्र ज्या वेळेला आपण असें म्हणतों कीं, किंमतीचे वाढीबरोबर पुरवठाही वाढतो त्या वेळेस, आपण सदरहू वस्तूंची मागणी कायम आहे असें गृहीत धरलेलें असते. समजा, दुधाचा भाव पुणें येथें वैशाख महिन्यांत एक रुपयास ४ शेर आहे, तोच एक रुपयास ३ शेर झाला; मग त्याचा परिणाम पुण्याला दुधाचा पुरवठा जास्त होण्याकडे होईल. आसपासच्या खेडेंगांवांतील गवळी पुण्यास भाव चांगला म्हणून तेथें दूध विक्रीस आणतील. पण या वेळीं दूध घेणारे ( अर्थातच दुधाची मागणी ) कायम आहेत, त्यांना दुधाची जरूरी आहे असें आपण धरलें आहे. पण जर त्यांना जरूरी नसेल म्हणजे मागणी अचल न राहतां कमी होऊं लागेल तर मात्र निराळी परिस्थिति उत्पन्न होईल. तेव्हां काय होईल याचा विचार पुढें करूं. आतां आपण एवढेंच पाहिलें कीं, मागणी कायम असतां भाव वाढला तर पुरवठा वाढतो, तो माल विक्रीला जास्त येतो.

आतां आणखी एका दृष्टीनें विचार करूं. असें समजूं या कीं वस्तूंचा पुरवठा म्हणजे बाजारांत विक्रीकरितां आलेल्या वस्तूंचें प्रमाण निश्चित आहे. तें कमीजास्त होत नाहीं अर्थात् कांहीं विशिष्ट कालमर्यादेपर्यंत तें अचल आहे; अशा परिस्थितींत भावावर—किंमतीवर काय परिणाम होईल ? जर त्या वस्तूंची मागणी—विकत घेणारें गिऱ्हाईक कायम असेल तर भावावर काय परिणाम होईल हें उघड आहे. कांहीं दिवस किंचित् कमीजास्त फरक पडून शेवटीं असा भाव निश्चित होईल कीं, तेवढया कालमर्यादेंत येणारा वस्तूंचा पुरवठा पूर्णपणें विकला जाईल. उदा०, दररोज पुण्यास १००००शेर दूध येतें; जास्त येत नाहीं व कमीही नाहीं. आज ४ शेर भाव आहे, या भावानें समजा ९ हजार शेर दूध खपलें; उद्यां ४॥ शेर भावानें सर्व खपलें, व

आपण कल्पिल्याप्रमाणें मागणी कायम असल्यास ४॥ शेर भाव पडेल. कारण त्या भावानें सर्व खपतें; घेणारा व विकणारा यांना तें परवडतें. पण असें समजूं या कीं दर आठवड्यास पुण्यास १०००० शेर तूप येतें, व समजूं कीं, भाव रुपयास एक शेर आहे व हा भाव जोंपर्यंत आहे तोंपर्यंत हें सर्व १०००० शेर तूप आठवडयाचे आठवडयास विकलें जातें. समजा कीं, कांहीं कारणानें भाव १ रु. १ आ. शेर झाला तर या पुरवठयापैकीं कांहीं तूप शिल्लक राहील, विकलें जाणार नाहीं; आणखी कांहीं आठवडे असेंच चाललें म्हणजे पुरवठा पूर्वीइतकाच होत असेल तर पुष्कळ तूप सांचेल; व्यापाऱ्यांना असें सांचवणें परवडणार नाहीं. एक तर पुरवठा कमी झाला पाहिजे किंवा मागणी खूप वाढली पाहिजे, नाहीं तर या न विकल्या जाणाऱ्या तुपाचा कोणालाहि फायदा होणार नाहीं. कांहीं काळ व्यापारी थांबतील, व शेवटीं त्यांना किंमत—भाव कमी करावाच लागेल. १ रुपया शेर असतांना सर्व तूप खपत होतें म्हणजे १०००० शेरांचा आठवडयाचा सर्व पुरवठा खपत होता. आतां व्यापाऱ्यांनीं एक रुपयाऐवजीं जर १५ आणे शेर भाव लावला तर सर्व तूप खपेल एवढेंच नव्हे तर, मागें आपण पाहिलें त्याप्रमाणें ‘ भाव कमी झाला म्हणजे विक्री—मागणी वाढते ’ या न्यायानें जास्त विक्री होईल. मागणी—( विकत घेणारे ) वाढली कीं व्यापारीही पुनः भाव वाढवून पाहतील; शेवटीं भाव असा निश्चित होतो कीं, विक्रीकरितां आणलेला वस्तूंचा पुरवठा त्या भावानें पूर्ण विकला जातो. याचाच अर्थ, भावाचा कांटा विशिष्ट कालमर्यादेंत मागणी व पुरवठा यांचीं पारडीं सारखीं करून स्थिर होतो. योग्याप्रमाणें तो मागणी व पुरवठा यांच्यांत समत्व आणतो म्हणून आपण अशा परिस्थितींतील भावास अगर किंमतीस समतोल भाव अगर समतोल किंमत ( Equilibrium Price ) म्हणूं या.



वरील आकृतींत अक रेषेवर तुपाचा पुरवठा दर्शविणारे आंकडे आहेत व अब रेषेवर भावदर्शक. पुरवठा १० हजार निश्चित असल्यामुळें इई रेषा सरळ आहे. १६ आण्यांप्रमाणें भाव असतां १० हजार खप होतो. भाव वाढला तर मागणी-रेषा डड' वर जाईल; भाव कमी झाला तर इईच्या उजव्या बाजूला म्हणजे खालीं येईल. पण भाव कांहींही झाला तरी पुरवठा अचल असल्यामुळें इई रेषा सरळ आहे; म्हणून डड' व इई यांचा छेद जेथें होईल तो बिंदु दाखविणारा भाव मागणी व पुरवठा यांना समत्व देईल, तो समतोल भाव होय.

आतां आपण असें समजूं कीं, विवक्षित कालमर्यादेंत—ही मर्यादा एक आठवडा धरूं या—विक्रीस येणाऱ्या मालाचें प्रमाण सारखें नाहीं; तर काय परिणाम होईल? जर ती वस्तु तयार करण्याचे कामीं म्हणजे उत्पादनाचें कामीं, होणारा खर्च कायम कमी होणारा नसेल तर, भावांत जे काय फरक होतील ते तात्पुरते होतील, ते कायम अगर दीर्घकालीन म्हणजे फार वेळ टिकणारे असें होणार नाहींत. आपण तुपाचें उदाहरण घेऊं या. जर असें झालें कीं, कांहीं कारणानें म्हशींची व गाईची किंमत वाढली, सरकी, चूण, कडबा, गवत यांचीहि किंमत वाढली, तर त्यामुळें तुपाचे भावांतहि किंमत कायम वाढेल व त्यामुळें वरील गोष्टींची म्हणजे तुपाच्या उत्पादनाची किंमत जोंपर्यंत कमी होणार नाहीं तोंपर्यंत सामान्यतः वाढलेलीच राहील. उलट उत्पादनाची किंमत वाढली नाहीं पण लग्नसराई, यात्रा, मोठ्या परिषदा वगैरे आगंतुक कारणांनीं महागाई झाली व किंमत वाढली तर ती अल्पकालीन होईल, अगदीं तात्पुरतीच वाढेल. उलट दूध, फळें वगैरे जे पदार्थ फार दिवस राहूं शकत नाहींत त्यांच्या बाबतींत, समजा, एकदम पुरवठा खूप झाला अगर मागणी एकदम जास्त झाली तर त्या गोष्टीचा परिणाम ताबडतोब व मोठ्या प्रमाणांत भावावर होतो. पुण्याहून रेल्वेनें अगर मोटारनें मुंबईस जाणारा भाजीपाला घांटांत रेल्वे नादुरुस्त झाल्यामुळें अगर घांट मोटारला बंद झाला तर १–२ दिवसांत पुण्यांत मातीमोल किंमतीनें विकला जाईल; कारण १–२ दिवसांपलीकडे तो टिकूं शकत नाहीं. तद्वत्च पुण्याच्या मार्केटांत कांहीं कारणानें माल कमी आला तर तसाच भाव एकदम वाढेल व तोहि तेवढ्याचपुरता. पण जर वस्तु टिकणारी असली ( उदा०, तूप ) व तिचा पुरवठा आठवड्याचे आठवड्यास वाढूं लागला तर किंमत ताबडतोब कमी होणार नाहीं; कांहीं दिवस व्यापारी न खपलेला माल सांठवतील; पण नेहमीं खपतो त्यापेक्षां तुपाचा साप्ताहिक पुरवठा कमी होत नाहीं असें पाहिलें कीं भाव कमी करून माल ते खपवून टाकतील; पण जर त्यांना असें वाटलें कीं, जरूर तेवढा पुरवठा

पुढें होणार नाहीं, कमी होत जाईल, तर कमी भावांत न विकतां बरा भाव येईपर्यंत ते थांबतील व दरम्यान झालेला कोठा भाडें, व्याज वगैरेंचा खर्चहि भरून काढतील. व्यापारी जेव्हां माल सांचवून ठेवतो, विक्रीस काढीत नाहीं, तेव्हां त्याचा अर्थ पुरवठा कसा करावा व किती करावा हेंहि तो थोडेंसें कां होईना ठरवितो व त्यांत चढउतार करूं शकतो. आपण असें समजूं या कीं १ शेर भाव आहे तर १० हजार शेर तूप विक्रीस येतें, १७ छटाक झाला तर ९ हजारांचा पुरवठा, १८ छटाक झाला तर ८ हजारांचा पुरवठा, याप्रमाणें भाव कमी होत गेला तर पुरवठा म्हणजे विक्रीस येणारा मालच अर्थात्च कमी होत जाईल. याचे उलट जर भावांत वाढ झाली तर दोन गोष्टी होतील; एक मागणी म्हणजे विक्री कमी होईल व पुरवठा म्हणजे विक्रीस येणारा माल जास्त होईल. विकणाऱ्यास भाव अनुकूल झाल्यास तो अधिक माल आणतो, कमी आणत नाहीं, हा अनुभव दिसून येतो. भाव वाढला कीं विक्री कमी पण पुरवठा जास्त होईल. भाव कमी झाला तर मागणी जास्त व पुरवठा कमी होईल हेंही तितकेंच खरें. पण जर मागणी व पुरवठा या दोन्हींचें स्वरूप म्हणजे 'बाकी सगळ्या गोष्टी'---आणि या कोणत्या त्या आपणांस आतां माहीत आहेत---स्थिर असें झालें तर भाव १ रु. शेर या ठिकाणीं कायम होईल. कारण विक्रीस येणारा सर्व माल त्या भावानें विकला जाईल. हा भाव आपण ज्याला समतोल म्हणून नांव दिलें तो होईल.



वरील आकृतींतील अब म्हणजे आठवडयाची पुरवठयाची रेघ, अक भावाची, डड' मागणीची व इई भावाचे मानानें पुरवठयाची रेषा. मागणी व पुरवठा यांच्या डड' व इई या रेषा स्वतंत्र आहेत व त्या ज्या ठिकाणीं मिळतात ती स्थिति म्हणजे समतोल भाव दाखविणारी स्थिति होय; कारण त्या भावांत जो पुरवठा होईल तो सर्व खपून जाईल.

जर पुरवठयाच्या स्वरूपांत बदल झाला तर पूर्वीचें पुरवठयाचें कोष्टक चालणार नाहीं. कारण, पुरवठ्याच्या स्वरूपांत बदल झाला म्हणजे पूर्वी ज्या भावांत जो पुरवठा होत होता त्या भावांत तो होणार नाहीं. जसें: जनावरांच्या किंमती व पेंड, सरकी वगैरेच्या किंमती वाढल्या कीं तूप तयार करण्याची—तुपाच्या उत्पादनाची—किंमत वाढणार. मग १ रु. भाव असतांना १० हजारांचा पुरवठा होणार नाहीं. जुनें सर्व बिझिक—सर्व मेळ—बदलेल व तसें झालें म्हणजे समतोल भावही अर्थात्‌च बदलेल. कारण तुपाची किंमत वाढली म्हणजे गिऱ्हाईक कमी होईल व शेवटीं मागणी व पुरवठा यांचीं पारडीं कांहींतरी निराळ्या भावाचा कांटा स्थिर करील; कदाचित् भाव १ रु. १ आ. शेरही होईल अगर कमीही होईल; मात्र पूर्वीचा राहणार नाहीं. जर पूर्वीपेक्षां बदललेल्या पुरवठ्याच्या स्वरूपांत वस्तूंचा जास्त पुरवठा झाला तर हा 'समतोल भाव' पूर्वीच्या समतोल भावापेक्षां कमी होईल. उलट पूर्वीपेक्षां पुरवठा—विक्रीस येणारा माल—कमी झाला तर हा 'समतोल भाव' जास्त होईल. उत्पादनाचा खर्च कमी होऊन व्यापाऱ्याला तूप स्वस्त पडूं लागलें तर त्याचा पुरवठा जास्त होईल व तसें झालें म्हणजे किंमत कमी होईल; व शेवटीं एक वेळ अशी येईल कीं, विक्रीस आलेला सर्व माल एका विवक्षित भावांत खपेल व हाच भाव वर सांगितल्याप्रमाणें कायम, अर्थात् विवक्षित काळपर्यंत कायम राहील. त्याचप्रमाणें समजा कीं, सरकारनें मालविक्रीवर कर लादला तो असा कीं, प्रत्येक १ शेर तुपाच्या विक्रीवर एक आणा. मग लागलीच पुरवठ्याच्या स्वरूपांत फरक होतो; कारण हा कर सकृद्दर्शनीं दिसावयाला तरी—व्यापाऱ्यास द्यावा लागतो. त्याचा परिणाम असा होईल कीं, विवक्षित भावांत होणारा पूर्वीचा पुरवठा आतां राहणार नाहीं. पुनः मेळ बदलेल. जर कर बसलेली वस्तु अवश्यक म्हणजे जिची मागणी लवचीक नाहीं अशी असेल, तर नवीन किंमत पूर्वीच्या किंमतीपेक्षां जवळ जवळ एक आणा म्हणजे कराच्या रकमेइतकी जास्त होईल. जर ती वस्तु अवश्यक नसेल, तिची मागणी लवचीक असेल, तर नवीन किंमत जुन्या किंमतीपेक्षां किंचित्‌च वाढेल. हिंदुस्थानांत अलीकडे हा विक्रीकर सुरू होत आहे; म्हणून वरील विवेचन उपयोगीं आहे. समजा, कापडावर विक्रीकर बसविला व समजा, तो रुपयामागें एक आणा

आहे, तर त्याचा किंमतीवर काय परिणाम होईल ? धोतरें, शर्टिंग, कोटिंग असें जें कापड मनुष्याला अगदीं अवश्यक आहे, त्याची किंमत खात्रीनें जवळ जवळ रुपयामागें एक आण्यानें वाढेल; उलट उंची कपडे, शोभेचे कपडे, गालिचे, मोठाले पडदे, टेबल—क्लॉथ, यांची किंमत त्या मानानें कमी वाढेल. कारण या वस्तु जरा महाग झाल्या तर त्यांची गिऱ्हाइकीही कमी होते. याचप्रमाणें इतर वस्तूंच्याही बाबतींत त्या अवश्यक आहेत कीं चालढकलीच्या आहेत यावर नवीन किंमत अवलंबून राहील.

कांहीं वस्तु अशा असतात कीं, त्यांचा पुरवठा वाढूं शकत नाहीं. उदा०,—राजा रविवर्म्यानें काढलेलीं अस्सल चित्रें, शिवाजीच्या वेळचीं नाणीं किंवा पेशवाई—बखरीच्या अस्सल प्रती; प्रती नवीन केल्या तर त्या अस्सल राहणार नाहींत; तसेंच रविवर्म्याच्या चित्रांच्या प्रती काढल्या तरी त्या अस्सल नसतात. तसेंच कांहीं बँकांचे अगर कंपन्यांचे शेअर कायम असतात; त्यांत भर पडत नसल्यामुळें त्यांचा पुरवठा म्हणजे विक्रीस येण्याचें प्रमाणही निश्चित असतें. उदा०, इंपीरिअल बँकेचे शेअर्स यांत वाढ नाहीं. कांहीं वस्तूंत वाढ होते; पण त्या वस्तु फार टिकाऊ असतात. उदा०, घरें बांधणें चालूच असतें पण बांधल्यानंतर ३०, ४०, ५० वर्षेंपर्यंतही तीं टिकत असतात. ज्या वस्तु ताबडतोब अगर फार थोड्या वेळांत तयार होत नाहींत त्यांचा पुरवठा म्हणजे विक्रीस येणारें प्रमाण निश्चित समजण्यास हरकत नाहीं; आतां अशा स्वरूपाच्या वस्तूंचा भाव कसा राहील तें पाहूं. कांहीं काळ, जे सट्टेवाले आहेत ते म्हणजे खरी खरेदी करणारे नव्हेत, तर शेअर्स घ्यावयाचे, वस्तु घ्यावयाच्या व जास्त किंमत आली कीं ताबडतोब विकावयाच्या असा उद्योग करणारे या वस्तु विकत घेतील पण आपण आतांपर्यंत असें गृहीत धरलें आहे कीं मागणीचें स्वरूप बदललेलें नाहीं तेव्हां या वस्तूंच्या बाबतींत सट्टेवाल्यांना फायदा होणार नाहीं. कारण, मागणीच वाढणार नाहीं म्हणून त्यांना फायदाही होणार नाहीं. अशा सट्टेवाल्यांचा विचार आपणांस करावयाचा नाहीं, तर ज्या वस्तूंचा पुरवठा निश्चित आहे व मागणी कायम असून खरी आहे, त्यांच्या भावावर काय परिणाम होईल ? याचा विचार करावयाचा आहे. जर पुरवठ्याच्या वस्तूंत सारखेपणा असेल उदा०,—शिवाजीच्या वेळचीं नाणीं अगर एखाद्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीचीं पुस्तकें—कारण तीं नाणीं, तीं पुस्तकें सर्व सारखीं असणार—तर काय होईल ? समजा, अशीं १००० नाणीं अगदीं एक सारखीं आहेत, व एकदां एक भाव पडला कीं तीं सर्व खपलीं. मग मागणी असून पुरवठा नाहीं अशी वेळ येईल तेव्हां ज्याच्याजवळ तें नाणें असेल त्याला जी किंमत मिळेल ती त्या नाण्याची किंमत झाली. सुरवातीस, समजा, सगळी १००० नाणीं

५ रुपयांस एक याप्रमाणें खपलीं; पण मागणी अद्याप आहे. तर कोणी आपल्या-जवळचें नाणें १० रुपयांस विकील तर कोणी २५ रुपयांस; त्याला प्रमाण राहणार नाहीं. ज्याच्याजवळ तें नाणें असेल तो प्रत्येक जण स्वतःशीं कांहीं तरी एक किमान राखीव किंमत ठरवील व तिच्या खालीं तें विकणार नाही. आपण जर या सर्व १००० गृहस्थांच्या राखीव किंमतींची बेरीज केली व त्याचप्रमाणें कोण किती रक्कम देऊन किती नाणीं घेण्यास तयार आहेत याची बेरीज केली व मागणी व पुरवठा यांचें कोष्टक तयार केलें, तर आपल्याला साधारणतः समतोल भाव म्हणजे विक्रीस आलेला सर्व माल ज्या भावानें विकला जाईल तो मिळूं शकेल.




या आकृतींत इई ही रेषा पुरवठा निश्चित असल्यामुळें सरळ आहे. कांहीं जण नाणीं ५ रुपयांस एक याप्रमाणें देण्यास तयार आहेत तर कांहींस २५ रुपयांस एक याप्रमाणें; उलट, कांहीं इसम २५ रु.स एक नाणें घेण्यास तयार आहेत तर कांहीं ५ रु. स एक. प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र २५ रु. देऊन घेणारा २५ रु. देणार नाहीं; कारण ५ रुपयांस याप्रमाणें सुद्धां कांहीं जण तीं विकण्यास तयार असतात. उलट ५ रुपयांस विकण्यास तयार असणारा ५ रुपयास देणार नाहीं; कारण तो पाहतो कीं बाजारांत २५ रु. देऊन सुद्धां विकत घेणारे कांहीं जण तयार आहेत. शेवटीं या सर्व चौकशीचा निकाल म्हणून तो भाव पडेल कीं ज्यायोगें विक्रीस असलेलीं सर्व नाणीं खपतील; तो म्हणजेच आपल्या शब्दांत समतोल भाव होय. वरील आकृतींत मागणी–रेषा डड′ पुरवठा–रेषेला छेदते तो बिंदु समतोलभावदर्शक आहे; म्हणजे ‘ अभा ’ इतकी किंमत राहील.

---

# ४. मागणी ( पुढें चालू )

आतांपर्यंत आपण मागणी कायम समजून विवेचन केलें व आपणांस असें आढळून आलें कीं, भाव कमी झाला कीं पुरवठा म्हणजे विक्रीस येणाऱ्या वस्तूंचें प्रमाण वाढतें. विक्रीस येणाऱ्या वस्तूंचें प्रमाण वाढलें याचा अर्थ ती जास्त खपत असलीच पाहिजे; म्हणजे पूर्वी ५ शेर भाव असतांना जर १० हजार मण एखादी वस्तु—समजा, बाजरी—खपत असली व आतां ४॥ शेर भाव झाल्यावर १२ हजार मण खपली, तर जास्त २ हजार मणांस मागणी झाली असा त्याचा अर्थ होतो. अशा तऱ्हेनें जास्त झालेल्या मागणीला आपण 'मागणी'चा 'विस्तार' वाढला असें म्हणूं या; व जर भाव तोच म्हणजे ५ शेरच आहे व खप मात्र १० हजारांचा १२ हजार मण झाला तर आपण या जास्त विक्रीस मागणी वाढली असें म्हणूं, कारण मागणीच्या ऐन स्वरूपांत बदल झाला असा याचा अर्थ होतो. त्याचप्रमाणें भाव वाढल्यामुळें जेव्हां विक्री कमी होईल त्या वेळीं, मागणी 'आंकसली' असें म्हणूं व जर भाव कायम राहून विक्री कमी झाली तर मागणी 'कमी' झाली असें म्हणूं; या चारी गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत व त्या नीट समजल्या म्हणजे पुढील विवेचन समजण्यास सोपें जाईल.

आतां ज्या वेळीं मागणीच्या ऐन स्वरूपांत बदल होतो त्या वेळेला ती वाढते अगर कमी होते व स्वरूपांत फरक झाला म्हणजे जुनें मागणी-कोष्टक अर्थात्च चालणार नाहीं; व पूर्वी ज्या भावांत जी मागणी झाली असती ती आतां राहणार नाहीं म्हणून नवीन कोष्टक मांडलें पाहिजे. उदा०, मागें असें धरलें होतें कीं १ रु. शेर भाव असला, कीं दर आठवड्यास १० हजार शेर तुपाची मागणी, ८१५ झाला कीं ११ हजार शेर तुपाची मागणी, याप्रमाणें होत जातें. वस्तूंची मागणी वाढली कीं त्या वस्तूंची किंमत बहुशः वाढते आणि जर त्या वस्तूंच्या पुरवठ्याचें स्वरूप कायम असलें—म्हणजे त्या वस्तूच्या उत्पादनाचा खर्च वाढला नाहीं अगर अवश्य असलेल्या या पदार्थांच्या पुरवठ्यांत बदल झाला नाहीं—तर त्या वस्तूचा भाव

खात्रीनें वाढेल व शेवटीं तो असा स्थिर होईल, कीं ज्या भावांत विक्रीस असलेला सर्व माल (त्या वस्तूंचा) विकला जाईल. खालील आकृतींत ही गोष्ट दाखविली आहे.




मागणीचें व पुरवठ्याचें प्रमाण
(आठवडा)

वरील आकृतींत पहिली मागणी--रेषा डड असून नवीन वाढलेली मागणी ड''ड'' ही रेषा दाखविते. अप हा पहिला भाव अप' हा वाढत्या मागणीमुळें झालेला भाव. अम पहिल्या भावांत झालेलें विक्रीचें प्रमाण; अम' हें वाढती मागणी झाल्यानंतरचें प्रमाण.

जर मागणी कमी झाली तर या उलट परिणाम होईल; भाव कमी होईल. आतां मागणीवर कोणत्या गोष्टींचा परिणाम होतो हें आपण पाहूं या. कोणकोणत्या गोष्टी मागणीच्या स्वरूपांत बदल करतात ? आपण आतांपर्यंत मागणी व पुरवठा वगैरेंच जो विचार केला तो प्रत्यक्ष ती वस्तु उपभोगणाऱ्याच्या दृष्टीनें; तथापि तेंच विवेचन जे उद्योगधंदेवाले व विशेषतः योजकवर्ग त्यांनाही लावण्यास हरकत नाहीं. योजक म्हणजे जो कच्चा माल घेऊन भांडवलाच्या सहाय्यानें तो पक्का करतो व विकतो तो; अगर असें म्हणूं कीं उत्पादनाचीं साधनें एके ठिकाणीं आणून वस्तु तयार करतो तो. योजक (Entreprenuer) तरी काय करतो ? जर कापडाला मागणी असली तर तो कापूस जास्त खरेदी करील; म्हणून जें विवेचन आपण कापडाच्या मागणी–पुरवठयांबाबत केलें तेंच सामान्यतः योजकांच्या खरेदीविक्रीचे व्यवहारांत लावण्यास कांहीं हरकत नाहीं. आपण पूर्वीं वस्तूंचे दोन प्रकार वर्णिले आहेतः उपभोग्य म्हणजे

वस्तूचें अखेरचें स्वरूप, ज्या स्वरूपांत मनुष्य तिचा आपल्या गरजेसाठीं उपयोग करतो व त्याची गरज सरळ भागते; उदा०, सदरा; तो मनुष्य घालतो व थंडीचें निवारण करतो; दुसरा वर्ग म्हणजे उत्पादक वस्तु. उदा०, कापूस; तो कांहीं मनुष्याची गरज सरळ भागवीत नाहीं, पण गरज भागवणाऱ्या उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनाकरितां म्हणजे त्या तयार करण्याकरितां तो अवश्यक आहे व म्हणूनच अशा वस्तूला आपण उत्पादक वस्तु म्हणण्याचें ठरविलें आहे. उपभोग्य व उत्पादक अशा दोन्ही वस्तूंस आपण आतांपर्यंत केलेलें विवेचन लागू आहे आणि या प्रकरणांतील पुढील विवेचनही या दोन्ही प्रकारच्या वस्तूंना लावण्यास हरकत नाहीं.

आतांपर्यंत आपण मागणी व पुरवठा यांचें प्रमाण निश्चित अगर अनिश्चित समजून भावावर काय काय परिणाम होतात हें सामान्यतः पाहिलें व भावाचा विचार करतांना १ रु. अगर ८१६, ८१५, ८१४ याप्रमाणें पैशाची भाषा वापरली व 'वस्तूंची खरेदी व विक्री' या व्यवहाराचा विचार करतांना 'अमुक रुपयाला अमुक भाव' असें बोलत आलों. आणि व्यवहारांत ४ शेर बाजरीला ५ शेर जोंधळे अगर ½ शेर तूप असें कधीं होत नाहीं; म्हणजे तें अशक्य आहे असें नव्हे तर व्यवहाराचें वळण असें चालत आलें आहे कीं वस्तु पैसा घेऊन विकावयाची व पैसा देऊन विकत घ्यावयाची. घटकाभर असें म्हणूं कीं पैसा हा या सर्व खरेदी-विक्रीच्या व्यवहारांतील एकमेव-अगदीं एकच असा-दलाल आहे. पैसा म्हणजे नोटा; नाणें, अन्य चलन वगैरे यासंबंधीं जास्त तपशीलवर विवेचन आम्ही पुढें करणार आहों. आतां मागणीचा विचार करीत असतांना पैशाचें एकंदर प्रमाण भावावर काय परिणाम करतें हें पहावयाचें. व्यवहारांत पैसा कमीजास्त झाला कीं व्यवहारांत ताबडतोब नाना बदल होतात; वस्तुवस्तूंमधील किंमतीचें प्रमाण बदलतें इतकेंच नव्हे तर एकंदर वस्तूंचे भाव सुद्धां कमीजास्त होतात. याचा अर्थ असा नव्हे कीं, पैसा दुप्पट झाला कीं भाव दुप्पट होईल अगर निमपट झाला कीं निमपट होईल.

निरनिराळ्या देशांत निरनिराळें चलन—म्हणजे नाणीं, नोटा वगैरे—असतें. म्हणजे पैसा तोच, पण त्याचें प्रत्यक्ष स्वरूप मात्र देशागणिक निरनिराळें असतें. आपण एकंदर व्यवहारांतील पैसा वाढला म्हणजे त्याचा भावावर काय परिणाम होतो हें पाहावयाचें ठरविलें आहे. अर्थात् हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं पैसा-नाणें, नोटा इ०—पाडण्याचे सर्व हक्क फक्त सरकारला, म्हणजे त्या त्या देशांतील राजसत्तेला आहे; व ती राजसत्ता, तें सरकार कांहीं नियम करून ( ज्यांचा विचार पुढें होईल ) किती पैसा, किती चलन, व्यवहारांत चालू ठेवावयाचें हें ठरवितें. आपण पाहिलें

कीं पैशाशिवाय खरेदी नाहीं, विक्री नाहीं; दामाजीपंत खिशांत पाहिजे अगर चार दिवसांनीं तरी दिले पाहिजेत, त्याशिवाय व्यवहार नाहीं. मग देशांतील कोट कोट लोकांचे येवढ्या मोठ्या प्रमाणावर दर क्षणीं खरेदीविक्रीचें लाखों व्यवहार होणार त्यांकरितां पैशाची म्हणजे चलनाची ( जें चालतें त्याची ) जरूरी असणार. स्विट्झरलंड देशाची गोष्ट घेऊं या: तेथील प्रमुख नाणें फ्रँक आहे; फ्रान्सचें प्रमुख नाणें फ्रँक आहे; इंग्लंडचें पौंड, जर्मनीचें मार्क, हिंदुस्थानचें रुपया आहे. १९३८ सालीं स्विट्झरलंडच्या फ्रँकची किंमत पौंडांत, एका पौंडाला २२ फ्रँक मिळत; एका पौंडाला १५० फ्रेंचफ्रँक मिळत; फ्रान्स व स्विट्झरलंड देश अगदीं लागून आहेत आणि जर स्विट्झरलंड सरकारनें असें ठरविलें असतें कीं, स्विट्झरलंडचा फ्रँक व फ्रान्सचा फ्रँक यांची किंमत सारखी असावी, तर पूर्वीच्या एका स्विट्झरलंड फ्रँकला आतां नवीन ७ स्विट्झरलंड फ्रँकची किंमत आली असती; व समजा, तेथील सरकारानें जुने फ्रँक सरकारांत परत देऊन त्याऐवजीं १ : ७ प्रमाणें नवे घेऊन जावें असें ठरविलें असते तर त्याचा अर्थ हा कायदा–अर्थात् ही गोष्ट सरकार कायद्यानेंच करणार–होण्यापूर्वी जेवढे फ्रँक स्विट्झरलंडमध्यें होते त्याचे ७ पट झाले असते. म्हणजे एकंदर पैसा–चटपैसा–पूर्वीच्या ७ पट झाला आणि जर पूर्वीप्रमाणेंच वस्तूंचा पुरवठा राहिला तर ज्याला पूर्वी एक फ्रँक पडत असे त्याला आतां ७ पडूं लागतील. हें उदाहरण एका प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञानें घेतलें आहे; पण प्रत्यक्ष झालली गोष्ट आपण घेऊं या. जर्मनीमध्यें १९२२–२३ सालांत मार्कची स्थिति मोठी पाहण्यासारखी झाली. नाण्याची टंचाई जाली व अन्य कारणासाठींही तेथील सरकारानें मार्कनोटा एवढया मोठया प्रमाणावर छापून व्यवहारांत सोडून दिल्या कीं, एक कप कॉफी अगर चहा घ्यावयाचा झाला तर एक बिलियन (१०००००००००) इतक्या मार्कच्या नोटा द्याव्या लागत होत्या. देशांतील सर्व व्यवहार बेबंदशाहीचा झाला व शेवटीं सरकारनें नवीन कायदा करून मार्कची किंमत १००००००००० जुने मार्क ठरवून सर्व जुने मार्क चलनांतून रद्द केले. फ्रान्समध्यें १९१४ च्या म्हणजे गेल्या महायुद्धाचे पूर्वी जेवढें चलन–पैसा–व्यवहारांत होता त्याचे सातपट, गेल्या २५ वर्षांत झाला व त्याचा परिणाम म्हणजे १९१४ सालचा भाव व १९३८ सालचा भाव यांत जवळजवळ ७ पटीचा फरक आहे. अर्थात् ही चलनांतील वाढ एका दिवसांत झाली नाहीं, २५ वर्षे ती चालू आहे. समजा, आज हिंदुस्थानांत सरकारी आंकड्याप्रमाणें एकंदर चलन, नाणें व नोटा ९४० कोटी रु० ( जून १९४६ ) व्यवहारांत चालू आहे. उद्यां हिंदुस्थान सरकारनें एकदम कायदा करून आहे या

एकंदर चलनाच्या निम्यानें नोटा काढून, व्यवहरांत सोडल्या तर एकंदर चलन १॥ पट होईल व पैसा मूबलक झाला म्हणजे निश्चित किंमती वाढतील. १ रुपयाला मिळणारा माल खात्रीनें ५।६ आणे तरी जास्त किंमत देऊन घ्यावा लागेल. जेथें चलनाची टंचाई तेथें भाव कमी, जेथें चलन मुबलक व वाढत जातें, तेथें भाव वाढत जातो. तसेंच मनुष्याच्या हातांत पैसा जास्त झाला, त्याच्या पैशाच्या उत्पन्नांत वाढ झाली, कीं वस्तूंची मागणी वाढते, व वस्तूंची मागणी वाढली कीं, वस्तूंच्या किंमती वाढतात, त्यांचा भाव वाढतो. व्यवहारांत खेळत राहणारा पैसा (Quantity) वट—पैसा—वाढला कीं, वस्तूंच्या किंमती वाढणारच हें अगदीं स्पष्ट झालें.

किंमत आणि भाव जे वाढतात ते पैशाच्या स्वरूपांत वाढतात; म्हणून एखाद्या इसमाचें पैशांत उत्पन्न वाढलें, पण वस्तूंचा भाव वाढला तर त्याचें खरें उत्पन्न वाढलें असें होणार नाहीं. समजा, पुण्यास पूर्वी ८० तोळ्यांचा शेर होता. मुंबईस ४० तोळ्यांचा शेर होता. पुण्यास ज्या वस्तूचा भाव १ रुपयास ३ शेर असेल, त्याच वस्तूचा भाव मुंबईस ६ शेर असेल. वरवर कोणी असें म्हणूं लागला कीं, वा! मुंबईस दुप्पट स्वताई आहे तर तें खरें नाहीं. कारण हा फरक केवळ वजनांतील फरकानें झाला. त्याच न्यायानें समजूं कीं, वजनांत फरक न होतां पैसा दुप्पट झाला, तर खऱ्या किंमतींत फरक होणार नाहीं. समजा एका मनुष्याचें द. म. ३० रु. उत्पन्न आहे व त्यावेळेस १ रुपयास ६ शेर बाजरी, भाडें द. म. ५ रु. व त्याचप्रमाणें इतर वस्तूंचें भाव आहेत व या सर्व गोष्टींस त्याला एकंदर द. म. २५ रु. खर्च येतो. समजा कीं महागाई झाली व बाजरीचा भाव १ रु. स ३ शेर झाला भाडें १० रु. झालें व एकंदर सर्व वस्तूंचे भाव वाढले व त्यामुळें त्याच्या मालकानें त्याचा पगार ६० रु. केला. पण पूर्वी ज्या वस्तू खरेदी करण्यासाठीं त्याला २५ रु. खर्च येत होता, त्याच गोष्टीला आतां ५० रु. खर्च येऊं लागला. याचा अर्थ त्याचें पैशाच्या स्वरूपांत उत्पन्न वाढलें तरी भाव वाढल्यामुळें खरें उत्पन्न वाढलें नाहीं. माणसाचें खरें उत्पन्न म्हणजे पैसा नव्हे, तर वस्तु व सुखसोयी, कीं ज्या पैशानें विकत घ्याव्या लागतात. म्हणून नुसत्या पैशाची रक्कम किंवा वट—चलन वाढविल्याबरोबर माणसाचें अगर समाजाचें खरें उत्पन्न वाढेल ही गोष्ट खोटी. समजा, एकदम चालू चलन दुप्पट केलें तर, वर दर्शविल्याप्रमाणें भाव वाढतील व वस्तूंची मागणीही वाढेल. पण त्यानें समाजाच्या खऱ्या उत्पन्नांत म्हणजे जास्त वस्तु उत्पन्न करण्यांत अगर जास्त सुखसोयी उत्पन्न करण्यांत वाढ होणार नाहीं. एकदम पैशाचा पुरवठा वाढला तर, कांहीं उद्योगधंदे जे मंदीमुळें बेतानें चालले होते, कांहीं बंद होते, त्यांत थोडीशी

हालचाल दिसेल, पण ती प्रगति नव्हे. अर्धांग झालेला इसम लुला हात अगर पाय हालवतो पण तें चैतन्य अगर खरी हालचाल नव्हे. नुसत्या नोटा दुप्पट करून अगर नाणीं दुप्पट करून खरी संपत्ति दुप्पट होत नाहीं. ती वाढविण्याचा मार्ग म्हणजे वस्तूंचें उत्पादन, त्या तयार करणें, जास्त जास्त तयार करणें हा होय. नवीन नवीन शोध, शास्त्रांची प्रगति व तिचा उद्योगधंद्यांचे कामीं उपयोग करून घेण्याची बुद्धि वगैरे गोष्टी होऊं लागल्या, म्हणजे खऱ्या संपत्तीची वाढ होऊं लागेल. कारण नवीन शोध व शास्त्राची प्रगति झाली कीं वस्तु तयार करण्याच्या कामीं फरक होतो, त्यांचें उत्पादन वाढतें; एकंदर पुरवठ्यावर परिणाम होतो. नवीन नवीन यंत्रे, तीं चालवावयास लागणारी शक्ति, यांच्यांत जसा फरक झाला तसा, वस्तूंचा पुरवठा जास्त होत चालला व त्या तयार करण्याचा खर्चही कमी होऊं लागला. उदा०, पूर्वी वर्तमानपत्रें वगैरे ज्या छापखान्यांत यंत्रावर छापत असत तीं हातानें चालवीत असत व फारतर तासाला ३०० प्रति निघत; नंतर नवीन यंत्रें आलीं, तीं वाफेनें चालूं लागलीं, नंतर तेलानें व नंतर विजेनें चालूं लागलीं. त्याचप्रमाणें कागद हातानें घालावा लागे, नंतर घडी करावी लागे. आतां कागदाचें रीळच्या रीळ एका बाजूस लावलें कीं दुसऱ्या बाजूस वर्तमानपत्र घडी होऊन पडतें व त्याचा कमाल वेग ताशीं १० हजारपर्यंत आहे. या नवीन तऱ्हेच्या यंत्रामुळें बरेच कारागीर व मजूर कमी करतां आले व त्यामुळें तयार करण्याचा किंवा उत्पादनाचा खर्च कमी झाला. याचप्रमाणें सर्व उद्योगधंद्यांत गेल्या ५० वर्षांत भयंकर प्रगति झाली आहे. नवीन नवीन शोध झाले, शास्त्रांतील प्रगति उद्योगधंद्याला जोडली गेली, त्याचा परिणाम उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊं लागले व त्याचा खर्च कमी होऊं लागला. वस्तु स्वस्तांत तयार होऊं लागल्या म्हणजे पुरवठा वाढूं लागतो, व मागणीही त्या मानानें वाढूं लागते. उत्पादनाचें प्रमाण वाढल्यानें, बहुतेक यांत्रिक धंद्यांत नगामागें अगर प्रमाणामागें खर्च कमी होत जातो व वस्तु जास्त जास्त उत्पन्न झाल्या, तयार केल्या म्हणजे खऱ्या संपत्तींत भर पडली असें म्हणतां येईल. जितक्या जास्त वस्तु अगर सुखसोई माणसांना अगर समाजाला मिळूं लागतील त्यामानानें त्यांच्या संपत्तींत—खऱ्या संपत्तींत—वाढ झाली असें म्हणतां येईल. तात्पर्य, पैशाची वाढ म्हणजे खऱ्या संपत्तीची वाढ नव्हे; पदार्थांची वाढ म्हणजे संपत्तीची वाढ हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे.

आतां आपण संपत्तींत खऱ्या संपत्तींत—खऱ्या उत्पन्नांत, वाढ झाली म्हणजे माणसावर त्याचे काय परिणाम होतात तें पाहूं. एक उदाहरण घेऊं कीं, एका इसमाच्या खऱ्या उत्पन्नांत १० टक्के वाढ झाली व सर्वसाधारणतः त्याची आवडनिवड कायम आहे;

तरीसुद्धां पूर्वीप्रमाणेंच तो आपलें उत्पन्न खर्च करील हें संभवनीय नाहीं. पूर्वी त्याला लागणाऱ्या वस्तु वस्तूंत जें प्रमाण होतें, तेंच प्रमाण आतां राहील हें संभवनीय नाहीं. १० टक्के वाढ झाल्याबरोबर, प्रत्येक वस्तु १० टक्के घेण्याचें तो वाढवील हें कसें संभवेल ? समजा, तो पूर्वी एक मण बाजरी दरमहा घेत होता, तर आतां तो एक मण चार शेर घेईल असें नाहीं. कारण बाजरी, सर्व सामान्यतः धान्य, हें अवश्यक वस्तूंपैकीं असल्यामुळें, त्याच्या अवश्यकतेला मर्यादा असते. पूर्वी तो जितकें दूध घेत होता त्यापेक्षां तो आतां १० टक्क्यापेक्षां कदाचित् जास्त घेईल. पूर्वी कदाचित् साखर परवडत नसेल म्हणून गूळ घेत असला तर आतां गूळ अजीबात न घेतां साखरच घेईल. तात्पर्य, उत्पन्न वाढल्याबरोबर निरनिराळ्या वस्तूंबाबत त्याचें मागणीचें प्रमाण कमीजास्त होईल व त्याचप्रमाणें त्या त्या वस्तूचे भाव कमीजास्त झाले तर, त्याप्रमाणें त्याच्या मागणीचें कोष्टकही कमीजास्त होईल. जास्त भाव झाला तर किती घेईल, कमी झाला तर किती घेईल हें दर्शविणारें कोष्टकही बदलेल. पूर्वी आपण हीं मागणी–कोष्टकें कशीं बदलतात याचा विचार केला आहे.

उत्पादनाच्या पद्धतींत प्रगति झाली कीं, वर सांगितल्याप्रमाणें खऱ्या उत्पन्नांत वाढ होते व अशी वाढ झाली कीं, पुरवठ्याचें कोष्टकहि बदलतें. निरनिराळ्या वस्तु काय भाव असला म्हणजे कोणत्या प्रमाणांत विकावयास येतील, हें पूर्वीच्याप्रमाणें न राहतां, सर्व परिस्थिति निराळी होते. तथापि आपण घटकाभर असें समजूं कीं, उत्पादनाच्या प्रगतीबरोबर पैशाचा पुरवठा, वट–चलनहि वाढलें व त्यामुळें पुरवठ्याचीं कोष्टकें कायम राहिलीं, तर वाढलेल्या खऱ्या उत्पन्नाचा माणसाच्या खर्च करण्याच्या प्रवृत्तींवर काय परिणाम होतो, तें पाहूं. माणसामाणसांत आवडीनिवडीचा फरक हा असणारच. तथापि सर्वसामान्यतः कांहीं आवडीनिवडी सारख्या असतात. समजा, एका इसमाचें उत्पन्न पूर्वीच्यापेक्षां ५० टक्के वाढलें, दीडपट झालें; म्हणजे समजा, पूर्वी १०० रु. होतें तें १५० रु. झालें---अर्थात् पदार्थांचे भाव कायम आहेत असें गृहीत धरलें, म्हणून ही ५० टक्के वाढ खऱ्या उत्पन्नांत वाढ आहे, असें समजून तो आतां कसा खर्च करील हें पाहूं. या परिस्थितींत ज्यांचें १५० रुपये उत्पन्न आहे ते सर्वसामान्यतः जसा खर्च करतात त्याच प्रकारें त्याचा खर्च होईल. १५० रुपये खर्च करणाऱ्या माणसांची जी एक राहणी त्याचे नजरेसमोर असते, त्यापेक्षां या नवीन 'रंगरूटाची' राहणी फारशी निराळी राहणार नाहीं असा अनुभव जगांत आहे. पूर्वीपेक्षां बरे कपडे घालील, पण त्याचें गमक वरील १५० रुपयेवाल्याचे राहणीप्रमाणें राहील. पूर्वीपेक्षां सिनेमाचें तिकीट थोडें वरच्या

दर्जाचें काढील. खाण्याचे बाबतींतहि तशीच सुधारणा होईल. ज्या गोष्टी घेणें पूर्वी शक्य नव्हतें अगर अल्प प्रमाणांत शक्य होतें त्या तो जास्त घेऊं लागेल. साधारणतः अवश्यक वस्तु म्हणजे अन्नवस्त्र वगैरे यांच्यावर जो पूर्वी खर्च होत होता त्याचें व दुसऱ्या गोष्टी चालढकलीच्या व कांहीं चैनीच्याहि, यांच्यावर जो खर्च होत होता, यांचें जें प्रमाण पूर्वी होतें तें आतां राहणार नाहीं. अवश्यक वस्तूंवरील खर्चाचें प्रमाण कमी होईल. चैनीच्या अगर चैनीवजा गोष्टींवर जास्त खर्च होईल. आपण एक खालील प्रमाणें कोष्टक तयार केलें कीं, हा फरक आपल्या ध्यानांत तेव्हांच येण्यासारखा आहे. त्यांतील आंकडे निव्वळ अनुमानाचे नाहींत.

## एक कुटुंब; यांत नवरा, बायको व ३ मुलें;
## (–नवरा फक्त मिळवता–)

| दरमहा उत्पन्न रुपये | एकंदर भोजन खर्च रु. | निव्वळ धान्य खर्च रुपये | एकंदर उत्पन्नाशीं नं. २ चें प्रमाण. | एकंदर उत्पन्नाशीं नं. ३ चें प्रमाण. |
|---|---|---|---|---|
| ३० | १५ | १० | ·५० | ·३३ |
| ३०–४० | १५ | १० | ·३७५ | ·२५ |
| ४०–५० | १८ | ११ | ·३६ | ·२२ |
| ५०–७० | १९ | ११ | ·२७७ | ·१४४ |
| ७०–१०० | २० | १३ | ·२० | ·१३ |
| १००–१२५ | ४० | १४ | ·३२ | ·११२ |
| १२५–१५० | ५० | १५ | ·३३३ | ·१० |

वरील आंकड्यांवरून स्पष्ट दिसून येईल कीं, जसें उत्पन्न वाढलें तसा भोजनाचा वटखर्च वाढला नाहीं व प्रत्यक्ष धान्यावर होणारा खर्च तर अगदीं अल्प प्रमाणांत वाढलेला दिसेल. त्याचबरोबर भोजनाव्यतिरिक्त गोष्टींवर होणाऱ्या खर्चाचे प्रमाणाचे मानानें हें प्रमाण कमीच होत गेलें. उत्पन्न वाढलें म्हणजे अवश्यक वस्तूंवरील खर्चाचें प्रमाण कमी होत जातें हें उघड आहे. तसेंच घरभाड्याचाहि तक्ता आपण तयार केला तर आपल्याला खालीलप्रमाणें आढळेल.

| दरमहा उत्पन्न | दरमहा घरभाडें | उत्पन्नाशीं प्रमाण. |
| --- | --- | --- |
| रु. | रु. | |
| ३० | ३ | $\frac{१}{१०}$ |
| ३०–४० | ३ | $\frac{१}{१३}$ |
| ४०–६० | ६ | $\frac{१}{१०}$ |
| ६०–८० | १० | $\frac{१}{८}$ |
| ८०–१०० | १० | $\frac{१}{१०}$ |
| १००–१२५ | १५ | $\frac{१}{८}$ |
| १२५–१५० | १५ | $\frac{१}{१०}$ |

वरील उदाहरणें प्रत्यक्ष चौकशी करून घेतलेलीं आहेत. मध्यमवर्ग व मजूरवर्ग हे थोडीशी मजुरी अगर कांहीं मर्यादेपर्यंत उत्पन्न वाढलें तर घरभाड्यावर जास्त प्रमाणांत खर्च करीत नाहींत; तर खुर्च्या, टेबल, भांडीं, फोनो, क्वचित् पुस्तकें, कापड, प्रवास, करमणुकी यांवर वाढत्या उत्पन्नांतून जास्त जास्त खर्च करीत जाईल. एक मोठी गोष्ट विसरलों, गृहिणीच्या दागिन्यांवरही खर्च वाढतो!! लग्नकार्य याबाबत मनुष्य थोडा जास्त हात सैल करतो. पण कांहीं मर्यादेपेक्षां जास्त उत्पन्न वाढलें तर घरभाड्याच्या खर्चाचें प्रमाणही वाढतें. १५० रु० चें २०० रु० महिना उत्पन्न झालें तर एखादी जास्त खोली, नाहींतर भांबुर्ड्याला (शिवाजीनगरला) एखादा 'फ्लॅट्' घेण्याकडे मनुष्याचा कल होतो व त्याप्रमाणें बहुशः तो खर्च करतो. कांहीं ठिकाणीं उत्पन्न वाढलें कीं, मनुष्य चांगल्या वस्तींत जाऊं इच्छितो; थोडी मोठे-पणाची, किंचित् मिरविण्याची हौस उत्पन्न होते. तो 'बंगल्याचा' भाडेकरी होऊं इच्छितो. सामान्यतः उत्पन्न वाढलें कीं मनुष्य, वरच्या दर्जाच्या राहणीकडे झुकतो. पूर्वीं साळीचा भात खात असेल, तर आतां तो जरा आंबेमोहोर घेईल, बाजरीबरो-बर गहूंहि खरेदी करील. पूर्वीं तेच शर्ट उन्हाळ्यांत अगर हिंवाळ्यांत वापरीत असला तर आतां, उन्हाळ्यांत मलमल, व हिंवाळ्यांत शर्टचे जोडीला स्वेटर, गरम गंजि-फ्रॉकही घेईल. पूर्वीं उन्हाळ्यांत थंड पाण्यानें तहान भागविणारा जरा पगार वाढला कीं 'बोवाकडे' आइस्क्रीम खाऊं लागेल. चांगली भाजी घेईल; फळें घ्यावयास लागेल 'ती'ला उंची पातळेंहि घेईल, पायीं जात असेल तर आता टांग्यानें जाईल वगैरे. तात्पर्य, वाढत्या उत्पन्नाचा, त्याच्या राहणीवर सर्व बाजूंनीं परिणाम होतो; व खर्चाचें प्रमाण, अवश्यक वस्तु चांगल्या प्रतीच्या घेण्याकडे वाढतें. तथापि सर्व-सामान्यतः ज्या गोष्टी चैनीच्या, चालढकलीच्या हौसेच्या, ज्या पूर्वीं तो घेत नव्हता

अगर अल्प प्रमाणांत अगर कमी प्रतीच्या घेत होता त्यांवरील खर्चाचें प्रमाण निःसंशय जास्त प्रमाणांत वाढेल. ही जी जास्त वस्तूंची मागणी जास्त उत्पन्नामुळें होते, तिचें स्वरूप अर्थात् लवचीक आहे; कारण उत्पन्न न वाढलें तर, ती जास्त मागणी नाहींशी होते. गणिताच्या भाषेत म्हणावयाचें झाल्यास

$$\text{मागणीचा लवचीकपणा} = \frac{\text{जास्त मागणी}}{\text{जास्त उत्पन्न}}$$ असें म्हणतां येईल.

आतांपर्यंत आपण पुरवठा कायम समजून विचार केला, मागणी कायम समजून विचार केला, व्यवहाराचें साधन पैसा तो कायम समजून विचार केला. त्याचप्रमाणें मागणी, पुरवठा, पैसा कायम नसतांना व्यवहारावर काय परिणाम होतो त्याचा विचार केला. आतां वस्तु विकणारा, विकत घेणारा असा समाज म्हणजे लोकसंख्या ही जर बदलली तर त्याचा काय परिणाम होईल हें पाहूं. लोकसंख्या याचा अर्थ आपल्या विवेचनाचे दृष्टीनें वस्तु विकत घेऊन त्यांचा उपभोग घेणारा, नुसतें उत्पादन करणारा वर्ग नव्हे तर उपभोग घेणारा वर्ग. 'बाकी सर्व गोष्टी' स्थिर राहिल्या, तर जसा हा वर्ग वाढेल त्या मानानें मागणी वाढेल. परंतु 'बाकीच्या गोष्टी' क्वचित्‌च स्थिर राहतात. लोकसंख्या कशी वाढते ? एक, बाहेर देशांतील लोक रहावयास आल्यामुळें अगर होणाऱ्या मृत्यूपेक्षां जन्मांची संख्या वाढल्यानें. जे बाहेरचे लोक येतात ते अर्थात् आपल्याबरोबर आपल्या आवडीनिवडी घेऊन येतात. त्यांना ज्या खास वस्तू लागत असतील त्यांची मागणी अर्थात् वाढणार. समजा, पुण्यांत एकदम मद्रासी लोकांची वस्ती खूप वाढली तर त्यांना अवश्यक असणारी 'कॉफी' हिची मागणी वाढेल. उद्यां असें समजा कीं, उत्तर हिंदुस्थानांतील लोक, ज्यांचें नेहमीचें खाण्याचें धान्य गहूं आहे, त्यांची संख्या वाढली तर पुण्यांतील गव्हाची मागणी वाढेल. ज्या देशाची लोकसंख्या वाढत आहे त्या देशांत मुलांचें मोठया माणसांशीं प्रमाण वाढत जातें. उदा०, ब्रि. हिंदुस्थानांत १९२१ सालीं १५ वर्षांखालचीं माणसें ९,५७,७३,७२७ इतकीं होतीं; १९३१ सालीं १०,७५,८९,७१६ इतकीं झालीं. एकंदर लोकसंख्येच्या मानानें १९२१ चें प्रमाण ३७·५ इतकें होतें. सन १९३१ सालीं हें प्रमाण जवळजवळ तितकेंच राहिलें. मात्र १९४१ चें प्रमाण त्याहिपेक्षां जास्त होईल असें दिसतें. ग्रेटब्रिटनमध्यें १९३७ सालीं १५ वर्षांखालील लोकसंख्येचे प्रमाण १०० स २३ होतें. १०० स १३ असें साठ वर्षांवरील माणसांचें प्रमाण होतें. पण ग्रेटब्रिटनची लोकसंख्या वाढली नाहीं, त्यामुळें आणखी २० वर्षांनीं १५ वर्षांखालील माणसांचें प्रमाण २३ पेक्षांहि कमी होईल व वृद्धांचें प्रमाण वाढेल. जेथें

लोकसंख्या वाढते आहे, तेथें मुलांचें प्रमाण मोठ्या माणसाशीं वाढत जात असतें. हा जो सारखा फरक लोकसंख्येचें स्वरूपांत होत असतो, त्याचा व्यवहारावर फार परिणाम होतो. कसा तो पाहूं. मुलांच्या गरजा, अवश्यक व चैनीच्या, चालढकलावू–लवचीक–या मोठ्या माणसापेक्षां निराळ्या असतात. त्यांचें अन्न, त्यांची औषधें, त्यांना लागणारीं खेळणीं, बाबागाड्या वगैरे यांची मागणी, जर मुलांची संख्या वाढत गेली तर वाढत जाईल, घटत गेली तर घटत जाईल हें उघड आहे. त्याचप्रमाणें मोठ्या माणसांचें लोकसंख्येतील प्रमाण वाढलें म्हणजे त्यांना लागणाऱ्या अवश्यक व चैनीच्या, चालढकलावू वस्तूंची मागणी वाढणार; प्रमाण कमी झालें, त्यांची संख्या घटली तर, मागणी पण घटणार हें उघड आहे. तसें माणसें मोठीं झालीं म्हणजे लग्नें होणार, संसार वाढणार याचा परिणाम पूर्वी जितकीं कुटुंबें होतीं त्यापेक्षां जास्त कुटुंबें होणार, त्यांना राहण्यास जागा लागणार, म्हणजे नवीन घरांची मागणी वाढणार. हळूहळू एकत्र कुटुंबें कमी होत चाललीं, त्याचबरोबर मोटमोठे चौकी वाडे कमी होऊन चाळी होऊं लागल्या. चार भावांची चार कुटुंबें झाली, त्यांना चार जागांची अवश्यकता उत्पन्न झाली. त्याच वाड्यांत चार बिऱ्हाडें होणें शक्य नाहीं म्हणून, घरांच्या पद्धती बदलल्या. माजघरें, सोपे कमी झाले, फ्लॅट आले. लोकसंख्येच्या फरकानें व्यवहारावर असेच परिणाम होत जातात. वाढत्या संख्येबरोबर सर्व वस्तूंच्या मागणीवर वाढता परिणाम होतो.

आतां आपण मनुष्याची मागणी कशावर अवलंबून असते याचा विचार करूं. माणसाची संपत्ती द्विविध असते–एक चालू उत्पन्न व एक संचित म्हणजे घरें, शेतें, दागिने वगैरे कीं ज्यांत ती सांठविलेली असते. त्याला जेव्हां कांहीं खरेदी करावयाची असते तेव्हां ती त्याला चालू उत्पन्नांतून वा संचित संपत्ती विकून त्याचे पैशांतून अगर संपत्तीचे तारणावर उसनवार घेतलेल्या पैशांतूनच करावी लागते. जगांत सर्व माणसांचें उत्पन्न व संचित संपत्ति दुर्दैवानें सारखी नाहीं; ती असावी हा आपला सर्वांचा हेतु आहे. तथापि आज निरनिराळ्या माणसांची या बाबतींतील स्थिति निरनिराळी आहे. एक इसम दरसाल प्रपंचाकरितां २००० रु. खर्च करतो, दुसरा २०० रु. करतो. या दोन्ही माणसांच्या उत्पन्नांतील खर्चाचा व्यवहारावर निराळा परिणाम होतो. जास्त खर्च करणारा इसम व्यवहारावर जास्त पटीनें परिणाम करील हें उघड आहे. जर संपत्तींतील हा फरक जास्त जास्त वाढत गेला श्रीमंत जास्त श्रीमंत झालें व गरीब जास्त गरीब झालें, तर या विषमतेचा परिणाम व्यवहारावर व वस्तूंच्या मागणीपुरवठ्यावर होतो. जे जास्त श्रीमंत झाले ते नवीन मिळालेली संपत्ती, जे पूर्वी

कमी गरीब होते त्यांच्याप्रमाणें खर्चणार नाहींत. उदा०, समजूं या कीं ५० रु. खालील नोकरांना ५ टक्के कपात उद्यां सरकारनें लागू केली व कांहीं नोकरांचे पगार ५ टक्के वाढविले, तर ज्यांना जास्त पगार मिळूं लागला ते तो ज्यांचा कमी झाला, त्यांच्यासारखा खर्च करणार नाहींत. त्यांचें पसंतीचें कोष्टक निराळें राहणार. उत्पन्न वाढलेले ज्या वस्तूंवर ते खर्च करतील, त्या वस्तूंची मागणी वाढणार; कमी उत्पन्न झालेले लोक, ज्या वस्तूंवरील आपला खर्च कमी करतील, त्या वस्तूंची मागणी कमी होणार. नवीन तयार होणाऱ्या जगांत विषमता कमी करण्याकरितां, श्रीमंतावर खूप कर व तोच कराचा पैसा मजुरांची मजुरी वाढविण्याकडे लावला तर व्यवहारावर काय परिणाम होईल ? करांमुळें श्रीमंताचें उत्पन्न कमी होईल, मग मोटारगाड्या, दागिने, चैनीच्या वस्तु, भारी कपडे वगैरेंची मागणी कमी होईल. उलट, जीं गरीब माणसें हलक्या प्रतीचें व अपुरें अन्न खात आहेत तीं पुरें व चांगल्या प्रतीचें खातील; आठवड्यांत एखादा सिनेमा पाहून चैन करतील. क्वचित्, कांहीं चैनीच्या वस्तूहि घेतील. संपत्तीची वांटणी, उत्पन्नाची वांटणी, समाजांत कशी होते, यावर वस्तूंची मागणी व पुरवठा कसा अवलंबून असतो हें दिसून आलें. सर्व सुखी व्हावेत, सर्व सुदृढ व्हावेत, सर्वांचें हित व्हावें, अशी नुसती प्रार्थना करून यांतील कांहीं होत नाहीं. या सर्व गोष्टी घडवून आणणारी जी संपत्ति ती सर्वांना सारखी, निदान त्यामानानें तरी मिळाली पाहिजे म्हणजेच सुखाचीं साधनें व जीवनाला लागणाऱ्या वस्तु पुऱ्या प्रमाणांत समाजांतील सर्व व्यक्तींस मिळतील.

माणसांच्या उत्पन्नाप्रमाणें व्यापाराच्या तेजीमंदीचाहि परिणाम वस्तूंची मागणी व पुरवठा यांवर होतो. व्यापार तेजींत असला म्हणजे बेकारी कमी, वस्तूंचें उत्पादन म्हणजे तयार करणें जोरांत, मग पैशाचें उत्पन्नहि जास्त, व एकंदरीनें वस्तूंना मागणीहि जास्त. याच्या उलट परिणाम व्यापार मंदावला म्हणजे होतो. मागणी कमी म्हणून वस्तूंचें उत्पादन कमी म्हणून कारखान्यांत काम कमी, म्हणून बेकारी जास्त, व त्याचबरोबर भाव कमी असल्यामुळें, पैशांचें उत्पन्नहि कमी. जेव्हां व्यापार तेजींत, तेव्हां मागणी वाढत जाते, पण उपभोग्य वस्तूंच्या मागणीपेक्षां उत्पादक वस्तूंची जास्त. समजा, कापडाला भाव येऊं लागला, व्यापार तेजींत झाला, कीं जे योजक असतात—योजक हे कोण हें आपण मागें समजून घेतलें आहे—त्यांना वाटतें कीं, अशीच तेजी रहात गेली तर पुरवठा, पुरवठ्याच्या साधनांत भर टाकल्याशिवाय पुरा पडणार नाहीं; म्हणून पुरवठयाच्या साधनांची वाढ करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होईल. अशा साधनांची मागणी वाढेल, म्हणजेच उत्पादक वस्तूंची मागणी वाढेल.

वर कापडाला भाव वाढूं लागला, त्याची मागणी वाढूं लागली, तर आज काम करीत असलेल्या कारखान्यांतून, गिरण्यांतून, वाढती मागणी पुरी करतां येणार नाहीं म्हणून नवीन गिरण्या किंवा जुन्यांत नवीन माग, नवीन यंत्रें यावर ते खर्च करतील; म्हणजे साधनांवर खर्च करतील. याप्रमाणें उत्पादक वस्तूंची मागणी वाढेल; कापडाचे मागणीचे मानानें जास्त वाढेल. कापसाची मागणी वाढेल म्हणजेच साधनांची मागणी वाढेल, जास्त जमीन कापसाचे लागवडीस येऊं लागेल. व्यापार मंदावला म्हणजे उलट परिणाम होईल. योजकवर्ग साधनांवर खर्चच करणार नाहीं. कदाचित् आहेत तींच साधनें, यंत्रें त्यांना बंद ठेवण्याचा प्रसंग येईल. मंदी झाली म्हणजे उत्पन्न कमी झालें, उत्पन्न कमी झालें म्हणजे लोक आपला अनावश्यक खर्च कमी करतील. त्यांतले त्यांत जास्त टिकणाऱ्या गोष्टींवरचा खर्च जास्त कमी करतील. चैनीच्या वस्तु वस्तूंत सुद्धां माणसांच्या पसंतीची प्रतबंदी असते. उत्पन्न कमी झालें तर टेबल, खुर्च्या, ग्रामोफोन, टिकाऊ कपडे, अशा वस्तूंकडे खर्च कमी होईल; सिनेमा, सिगारेट, आइस्क्रीम, यांवर त्या मानानें कमी होणार नाहीं. व्यापाराची तेजीमंदी माणसाच्या उत्पन्नावर परिणाम करते व त्याचा परिणाम वस्तूंच्या मागणीवर निरनिराळ्या प्रकारांनीं होतो हें आपण पाहिलें.

कांहीं वेळां एका वस्तूचा भाव कांहीं कारणानें बदलला, तर दुसऱ्या कांहीं वस्तूंच्या मागणीवर त्याचा परिणाम होतो. समजा, कांहीं कारणानें साखर परदेशीं जाणें बंद झालें म्हणून बाजारांत साखर जास्त येऊं लागली व पुरवठा जास्त झाला म्हणून भाव उतरला; तर या गोष्टीचा परिणाम गुळाचे मागणीवर खास होईल. जर साखर खूप स्वस्त झाली तर पुष्कळ लोक गुळाचे ऐवजीं अगर गूळ कमी घेऊन साखर जास्त घेऊं लागतील. गुळाची मागणी कमी होईल. तसेंच कांहीं वस्तु अशा असतात कीं, त्यांची मागणी वाढली किंवा कमी झाली कीं, लागलीच दुसऱ्या वस्तूंची मागणी कमी–जास्त होते. उदा०, मोटारींची मागणी वाढली कीं, लागलीच पेट्रोलचीहि मागणी वाढणार. तात्पर्य जेथें एका वस्तू बदली दुसरी चालूं शकते अशा वस्तूं बाबत एकाच्या मागणीचा दुसऱ्यावर परिणाम होतो. उदा०, साखर, गूळ; तसेंच ज्या वस्तूंची जोडीनें मागणी केली जाते, त्यांच्यांतहि एकाच्या मागणीवर दुसऱ्याची मागणी अवलंबून असते. मोटार–पेट्रोल. कापडाला खूप मागणी झाली कीं, शिंप्यांच्या श्रमालाहि जास्त मागणी येणार, त्यांचेंही गिऱ्हाईक वाढणार. कापड स्वस्त झालें कीं जास्त खपणार म्हणून शिंप्याकडेहि गिऱ्हाइकें वाढणार. जास्त गिऱ्हाइकें झालीं तर तो आपलीं शिवण्याचीं यंत्रेंहि वाढवणार, त्या यंत्रांची मागणी वाढणार.

पुष्कळ वेळां गिऱ्हाइकांची आवडनिवड बदलते. ती बदलली कीं, लागलीच त्याचा परिणाम निरनिराळ्या वस्तूंच्या मागणीवर होतो. आपल्याला फॅशनच्या बाब-तींत हा नेहमीं अनुभव आहे. एकदां गांधी टोपीची फॅशन झाली कीं तिची मागणी वाढली. अस्मानी पातळाची फॅशन झाली कीं, त्या रंगाच्या अगर त्या डिझाइनच्या पातळांची मागणी वाढली. तथापि नुसत्या पोशाखांतच नव्हे तर खाण्याच्याहि बाब-तींत आवडीनिवडी, अभिरुचि समाजाच्या बदलत असतात. हॉटेलांत भजी–मिसळ एकेकाळीं तेजींत होती. आतां इराण्याकडील 'इतर' माल तेजींत आहे. त्याची मागणी वाढली. जेवणांतहि पूर्वीपेक्षां फरक पडत चालला. भाजीपाल्याचें प्रमाण वाढलें. चहा तर महाराष्ट्रांत राष्ट्रीय पेय झालें, त्याची मागणी गेल्या २० वर्षांत बेसुमार वाढली. या फॅशनच्या बदलत्या सृष्टीबद्दल कोणी कांहीं कारण सांगूं शकणार नाहीं. ती बदलली कीं त्या वस्तुंची मागणी वाढली एवढेंच. एकेकाळीं—१० वर्षांपूर्वीं— पुण्यास छत्र्या जास्त व पावसाळी रबरी कोट क्वचित्. आजकाल बहुतेक मध्यम वर्गांतील लोक छत्र्याऐवजीं रेन कोटच वापरतांना दिसतात. पूर्वीं 'त्रिफळा' 'स्वादिष्ट-चूर्ण' वगैरे औषधें घरांतून दिसत, तर आतां साधारण उत्पन्नवाल्या माणसाच्या घरांत 'क्रुशेन' नाहीं तर 'एनोज–फ्रूटसाल्ट'ची बाटली नाहीं असें क्वचित्. असें कां, हें सांगणें कठीण; पण या वस्तूंची मागणी वाढली एवढाच विचार अर्थशास्त्रानें कराव-याचा आहे. आवडींत, अभिरुचींत फरक पडला कीं मागणींत फरक झाला. पुष्कळ वेळां जाहिरातबाजीनें आवडी बदलत असतात. झंडू द्राक्षासव, क्रुशेन, रक्तदोषांतक वगैरे बाबत जाहिराती, तसेंच 'स्वदेशी वापरा' 'परदेशी मालावर बहिष्कार' इत्यादि घोषणांनीं जनतेच्या आवडींत फरक होतो व त्याचा परिणाम वस्तूंच्या मागणींत होतो; म्हणून मागणीवर परिणाम करणाऱ्या सर्व गोष्टींचा विचार करणें हें व्यवहार-शास्त्रांत—अर्थशास्त्रांत—अवश्य आहे.



## ५ मागणी-पुरवठा-भाव ( पुढें चालू )

आतांपर्यंत मागणी व भाव यांच्यावर कोणकोणत्या गोष्टींचा परिणाम होतो याचा आपण विचार केला. त्याचबरोबर पुरवठ्यासंबंधींहि विचार केला. पुरवठा कसा होईल, किती होईल, याबाबतींत आपण थोडेंसें असें पाहिलें कीं, वस्तु तयार करण्यास लागणाऱ्या खर्चावर हें बरेंचसें अवलंबून असतें. वस्तु उत्पन्न करावयाची, तयार करावयाची, त्याचा खर्च, ती ज्या ज्या निराळ्या जिनसांपासून तयार होते, त्या त्या जिनसांच्या किंमतीवर अवलंबून राहील. जिनसांची किंमत वाढली कीं त्यांपासून तयार होणाऱ्या वस्तूंची किंमत वाढणार. पेढ्यांचा भाव, दूध व साखर यांच्या भावावर अवलंबून राहणार. पेढे तयार करावयाचा खर्च दूध व साखर यांच्या भावावर अवलंबून राहणार. त्यांच्या भावांत वाढ झाली कीं, तयार करण्याचा, उत्पादनाचा खर्च वाढणार व अर्थात् त्याची बाजार किंमत वाढणार; व या वाढत्या किंमतींत पेढ्यांना जशी मागणी असेल त्याप्रमाणें पुरवठा होणार हें अगदीं उघड. फार महाग झाले कीं गिऱ्हाईक अगदीं कमी होईल. कमी गिऱ्हाईक झालें कीं मालही कमी होईल. या दृष्टीनें पुरवठा हा उत्पादनाचे तयार करण्याचे खर्चावर अवलंबून आहे व तसाच इतर जिनसांवरही वर दर्शविल्याप्रमाणें अवलंबून आहे. आज लढाईमुळें जस्त वगैरे महाग झाल्याबरोबर पितळ वगैरेंचे भावांतही फरक पडला. सागवान, गांवठी व मलबार यांना भाव आल्याबरोबर त्यापासून तयार होणारे जिन्नस, फर्निचर वगैरे यांच्याही किंमती वाढल्या. किंमती वाढल्या कीं गिऱ्हाइकहि या गोष्टी अवश्यक नसल्यामुळें कमी घेणार व त्यामुळें पुरवठा कमी होणार. त्याचप्रमाणें समजा पुणें म्यु० कमिटीनें सागवानी लांकडाच्या प्रत्येक घनफुटावर ८१ कर बसविला तर फर्निचर वगैरे गोष्टी आणखी महाग होतील व त्यांचा पुरवठाहि गिऱ्हाईक कमी झाल्यानें कमी होईल. जर उत्पादनखर्च कमी झाला—म्हणजे ज्या निरनिराळ्या जिनसांपासून एखादी वस्तु तयार होते त्यांची किंमत कमी झाली—तर अर्थात् पुरवठा वाढेल व मागणीहि वाढेल कारण कमी किंमतींत वस्तु देण्यास परवडेल व त्यामुळें गिऱ्हाईक—मागणी—वाढेल.

समजा, सागवानी लांकडाचा भाव कमी झाला तर अर्थात्, फर्निचर तयार करण्याचा खर्च कमी होईल व त्यामुळें त्यांचा पुरवठा वाढेल; कारण कमी किंमतीस विकणें परवडेल व त्यामुळें गिऱ्हाईक वाढेल. त्याचप्रमाणें उत्पादन करण्याच्या पद्धतींत जास्त यंत्रें लावून अगर मोठीं यंत्रें लावून अगर अन्य मार्गानें तयार करण्याचे खर्चांत बचत झाली तरीही पुरवठा वाढेल; कारण तो पदार्थ कमी किंमतीस देणें परवडेल. उदा०, पूर्वीं पितळेचीं भांडीं हातांनीं घडवीत, आतां यंत्रांत पत्रा दाबून तीं तयार करतात, त्यामुळें तीं कमी खर्चांत तयार होतात व कमी किंमतींत विकणें परवडतें व त्यामुळें मागणी जास्त होऊन पुरवठा अर्थात् वाढतो. पुष्कळ वेळां अतिवृष्टि, अनावृष्टि, म्हणजे खूप पावसानें, पाऊस न पडण्यानें, पुरामुळें वगैरे अस्मानी कारणांमुळें, वस्तूंचे पुरवठ्यावर परिणाम होतो; उदा०, वर लिहिलेल्या गोष्टी झाल्या कीं, पीक बुडतें अगर मोठ्या प्रमाणावर त्याचें नुकसान होतें; व त्यामुळें त्या धान्याचा पुरवठा अर्थात् कमी होतो. पण ही गोष्ट फक्त एका मोसमपुरतीच असणार. उलट चांगली हवा पडली, योग्य वेळीं पाऊस पडला तर पीक १६ आणे येतें व त्यामुळें पुरवठाही त्या धान्याचा वाढतो; पण ही स्थितिहि त्या मोसमपुरतीच. याशिवाय अनेक गोष्टींचा मागणी व पुरवठ्यावर परिणाम होतो, त्यांच्या स्वरूपांवर परिणाम होतो. मागें आपण पाहिलें कीं, पैशाच्या प्रमाणांत, (Quantity) वट चलनांत वाढ झाली कीं पैशाचे उत्पन्नांत वाढ होते, मग मागणी वाढेल. पण त्याजबरोबर भावही वाढतो व भाव वाढला म्हणजे सर्वत्र तो वाढतो व त्याचा परिणाम वस्तु तयार करण्याच्या क्रियेवर म्हणजे उत्पादनावरही होतो. कारण उत्पादक जिनसांचा भाव वाढला म्हणजे त्यांपासून तयार होणाऱ्या वस्तु तयार करण्याचा खर्चही वाढणार; म्हणजे उत्पादन खर्च वाढणार, उत्पादन खर्च वाढला कीं पुरवठ्यावर त्याचा परिणाम होणार. म्हणून पैसा वाढला कीं उत्पादन खर्चही वाढतो हें उघड आहे. मजुरांची मजुरी ही त्यांच्या उत्पन्नाची बाब झाली. पण त्यांच्या मालकांच्या दृष्टीनें ती खर्चाची बाब आहे; कारण वस्तु तयार करण्याचे खातींच तो मजुरी खर्च टाकणार. म्हणून पैशाचें उत्पन्न वाढलें—म्हणजे मजुरी वाढली—कीं, त्याजबरोबर तो मजूर जी वस्तु तयार करण्याकडे श्रम करतो, तिची तयार करण्याची किंमत म्हणजे, उत्पादन खर्च वाढला. त्याचप्रमाणें यांत्रिक सुधारणांमुळें पुरवठा वाढतो हें आपण पाहिलें; तो वाढला म्हणजे लोकांजवळ वस्तु वाढतात. निरनिराळ्या वस्तूंच्या मागणीमध्यें बदल होतो. त्याचबरोबर मजुरांचें उत्पन्न वाढलें कीं, निरानिराळ्या जिनसांची मागणी वाढते. मजुरांची पदार्थ विकत घेण्याची ताकद त्या मानानें वाढते. आपण त्याला खरेदी-शक्ति अगर क्रयशक्ति म्हणूं. तात्पर्य, या

व्यवहारी जगांत कोठेंहि जरी थोडा बदल झाला तरी त्याचे कमीजास्त परिणाम सर्वत्र होतात. या जगाचा व्यवहार अगदीं घड्याळाप्रमाणें आहे. घड्याळांत ज्याप्रमाणें लहान लहान चाकें अनेक असतात व एकाची गति दुसऱ्यावर अवलंबून असते, तसेंच येथेंहि मागणीवर पुरवठा, दोहोंवर भाव, त्यावर पुनः मागणी व पुरवठा; वस्तूंवर खरें उत्पन्न, आणि त्यावर पुनः मागणी; असें हें अजब यंत्र आहे. सकाळीं उठून आपण मंडईत जावें, हजारों गाड्या येत आहेत, खरेदीविक्री चालली आहे; भाव पडतो आहे, माल उडतो आहे, गिऱ्हाइकें चौकशी करतात, घेतात; कोठून माल येतो, कसा विकला जातो याचा क्वचित्‌च कोणी विचार करतो; जो तो आपल्यापुरतें पाहतो व मनुष्य पुढें चालूं लागतो. हा व्यवहार कांहीं परमेश्वरी कृपा नाहीं, जादू नाहीं, अगदीं माणसांनीं स्वार्थानें तयार केलेला हा बाजार आहे, मायाबाजार म्हणा पाहिजे तर!! पण यांतील खरें तत्त्व एकमेव तत्त्व, व्यक्तिस्वार्थ हें आहे!!

उत्पादनपद्धतींत फरक होत जातो तसा मागणींतहि फरक पडतो. व्यापारांतील तेजीनें तसेंच करानें, व्यक्तिव्यक्तींचें उत्पन्न बदलत जातें. नवीन शोध लागून नवीन मोटारी स्वस्त होऊं लागल्या आणि त्याच वेळीं लोक घेऊं लागले तर पुरवठा वाढेल, भाव ठीक राहील. उलट, शोधानें पुरवठा वाढला आणि मागणीच नसली तर किंमती कमी होतील. त्याबरोबर पुरवठा कमी झाला, तर पुन्हा भाव वाढेल. वाढत्या पुरवठ्याबरोबर मागणी वाढली तर भाव वाढेलच असें नाहीं; किंवा पुरवठा कमी झाला, मागणी कमी झाली तर किंमत कमी होईल असेंहि नव्हे. मात्र मागणी वाढत गेली तर पुरवठा म्हणजे विक्री वाढत जाईल, कमी झाली तर कमी होईल एवढें निश्चित. पण ही स्थिति फार दिवस टिकणार नाहीं. कारण कोठें तरी भाव स्थिर होईल म्हणजे त्या किंमतींत, त्या भावांत, विक्रीस येणारा सर्व माल खपेल. समतोल भाव असें आपण ज्यास म्हणावयाचें ठरविलें आहे, तो कायम होईल. व्यवहारांत पुष्कळ गोष्टी एकदम घडून येत असतात; त्यामुळें कोणतेंहि विधान अगदीं गणितांतील नियमाप्रमाणें बिनचूक धरतां कामा नये. सर्वसामान्यतः याप्रमाणें घडेल असेंच आपण आतांपर्यंत म्हणत आलों, तेंच बरोबर आहे. उद्यां खूप कापूस पिकला व पुरवठा खूप झाला म्हणजे भाव कमी होईल हें खरें. पण समजा, दुसऱ्या देशांत कापसाचें पीक बुडालें अथवा तेथें कमी आलें, तर तेथील भाव कमी होणार नाहीं. पण आपला सिद्धांत 'बाकी सर्व गोष्टी' स्थिर असल्यास खरा असेंच आपण म्हटलें आहे. तेव्हां सर्वसामान्यतः कापसाचें खूप पीक झाल्यास भाव कमी हें खरें.

वर उत्पादनाचे पद्धतींत बदल झाला म्हणजे लागलीच त्याचा परिणाम

पुरवठ्यावर होतो असें आपण पाहिलें व भाव कमीजास्त होतो, शेवटीं समतोल भाव होतो; म्हणजे तो भाव पडतो कीं ज्या भावांत बाजारांत विक्रीला आलेला सर्व माल उठतो; पण हा जो पद्धतींत किंवा उत्पादनखर्चांत म्हणजे पुरवठ्याचे स्वरूपांत बदल होतो त्याचा पुरा परिणाम होण्यास कांहीं काळ लागतो व या दरम्यानच्या काळांत, पुनः कांहीं नवीन शोध अगर बदल न झाल्यास, म्हणजे 'बाकी सर्व गोष्टी' स्थिर राहिल्यास समतोल भाव पडतो, निश्चित होतो. परंतु हा दरम्यानचा काळ पुष्कळ वेळां महिन्यांचा असेल, कदाचित् वर्षांचाहि असेल. अक्रोडाचें झाड जसें ६० वर्षांनीं फळ देतें तसेंच पुष्कळ वेळां यांत्रिक सुधारणा ज्या मोठमोठाल्या उद्योगधंद्यांत होतात त्यांचा पुरा परिणाम किंवा फळ कालांतरानें दिसतें. उलट कांहीं वस्तूंच्या बाबतींत उत्पादनाचे पद्धतींत झालेली सुधारणा ताबडतोब पुरवठा वाढवते व त्याचा परिणाम ताबडतोब दिसून येतो.

पुष्कळवेळां वस्तूंची मागणी, पुरवठा असो वा नसो वाढते व ती वाढली असतां पुरवठा कायम असल्यास, वस्तूंची किंमत अर्थात् भरमसाट वाढते. उदा०,— राजा रविवर्म्याची अस्सल चित्रें. हीं कांहीं आतां वाढणार नाहींत व पुष्कळ धनवान लोक तीं घेऊं इच्छितात; याचा परिणाम येवढाच होईल कीं त्यांची किंमत भरमसाट वाढेल. उलट ज्या वस्तुची मागणी वाढली आहे, ती सारखी तयार होत आहे, त्या बाबतींत वाढत्या मागणीला जास्त पुरवठा, व्यापारी व कारखानदार हजर करतील. कारण पूर्वींइतका पुरवठा ठेवला तर मागणी जास्त म्हणून किंमत वाढेल व किंमत जास्त झाली म्हणून पुरवठा वाढत जाईल. हा धंदा किफायतशीर म्हणून नवीन कंपन्या, नवीन कारखानदार, त्यांत येतील. प्रथम एका कंपनीनें 'लोखंडी नांगर' काढलें, त्याला पुष्कळ गिऱ्हाईक आलें; इतकें कीं, मागणी पुरी करतां येईना. मग भाव वाढला. हा धंदा, म्हणजे नांगर तयार करण्याचा, फायदेशीर वाटल्याबरोबर इतर व्यापारी त्यांत घुसले. निरनिराळ्या कंपन्यांचे नांगर झाले. 'बहादुर नांगर' झाला; त्याचप्रमाणें 'किर्लोस्कर नांगर' वगैरे. पण आपण विचार करीत आहों तो पुरवठा ताबडतोब होणाऱ्या परिस्थितींतला. समजा एकच कारखाना आहे व मागणी वाढली तर, त्याच कारखान्यांत कांहीं जास्त यंत्रे न आणतां अधिक पुरवठा कदाचित् करतां येईल; याचा अर्थ त्या कारखान्याला पूर्वीं पुरेपूर काम नव्हतें तें आतां झालें. अशा तऱ्हेनें जर पुरवठा वाढला—म्हणजे कांहीं बदल न करतां—तर नवीन तयार झालेल्या मालाचा, कारखानदाराला पडलेला खर्च, अर्थात् कमीच असणार व एकंदर सर्वसामान्य तयार करण्याचा खर्च, नगामागें कमी होणार. उदा०, समजा,

'अ' कारखान्यांत महिना १ हजार नांगर निघूं शकतात. पण आतांपर्यंत फक्त ८०० दरमहा काढीत होतें, कारण तेवढ्यालाच गिऱ्हाईक होतें. आतां १००० ची दरमहा मागणी आली. ८०० चा तयार करण्याचा खर्च नगाला २० रु. प्रमाणें १६००० रु. होता. यापैकीं जागाभाडें व्यवस्था वगैरे कांहीं गोष्टींचा खर्च, कारखान्यानें ८०० नांगर तयार केलें काय किंवा १००० केले काय, सारखाच राहणार. म्हणून नवीन २०० नांगरांना जादा खर्च ३६०० रु. म्हणजे नगाला १८ रुपये आला तर एकंदर १००० नांगर=१६००० रु.+३६०० रु.= $\frac{१९६००}{१०००}$ रु. म्हणजे एक नग १९ रु. ९॥ आण्यास पडला म्हणजे सरासरी खर्च, पूर्वीपेक्षां कमी आला. पण जर दुसऱ्या कोणत्याहि कंपनीचा अगर कारखानदाराचा 'नांगर' बाजारांत नसेल तर, या कंपनीला आपला माल नगामागें खर्च कमी पडून, नवीन वाढलेल्या किंमतींत विकतां येईल. कारण मागणी वाढली असल्यामुळें भावहि वाढलेला असणार व पूर्वी समजा, २५ रु. ला विकत असलेला नांगर २७ रु. पर्यंत म्हणजे कांहीं तरी जास्त किंमतीला जाऊं लागेल. पुष्कळ वेळां, तीच किंमत राहून जास्त मागणी पुरविली जाते; कारण पुष्कळ कारखानदारांना गिऱ्हाइकी रुंदवावयाची म्हणजे वाढवावयाची असते. पुष्कळ वेळां एखाद्या वस्तूची मागणी वाढली कीं, त्याचबरोबर दुसऱ्या पदार्थाची कमी होते; व हे दोन्ही एकाच कारखान्यांत तयार होणारे असले तर, ताबडतोब एकाचा पुरवठा कमी करून, दुसऱ्याचा वाढवून, वाढती मागणी पुरी करतां येते. असें करतांना किंमत बदलते असें नाहीं. लुगडीं व पातळें दोन्ही जर एकाच कारखान्यांत निघत असतील आणि पातळांची मागणी वाढली व ती वाढली म्हणजे लुगड्यांची मागणी साहजिक कमी होणार, तर कारखानदार किंमती न बदलतां गिऱ्हाईक कायम रहावें, वळण व लौकिक रहावा सबब किंमत न बदलतां वाढती मागणी पुरी करील व कमी होणाऱ्या मागणीचा माल कमी प्रमाणांत तयार करील. पुष्कळ वेळां गिऱ्हाइकांची आवडनिवड, आगाऊ पाहून, अभ्यासून, त्याप्रमाणें व्यापारी माल तयार करतात. नेहमींच मागणी वाढली मग भाव वाढला म्हणजेच पुरवठा वाढवितात असें नव्हे. पुष्कळ वेळां व्यापारी जाहिरात-बाजीनें एखाद्या विशिष्ट मालाला गिऱ्हाईक तयार करतात. 'टिकेकरी पातळें' 'कमला उदबत्ती' वगैरे माल मागणीपूर्वी तयार होऊन तो गिऱ्हाइकी तयार करतो. तथापि मागणी आणि पुरवठा यांचा नेहमींच, ताबडतोब अगर सहजगत्या मेळ बसत नाहीं. एखाद्या कारखान्यांत यंत्रानें तयार होणाऱ्या वस्तूंची मागणी फार मोठ्या प्रमाणांत वाढली तर, त्या उद्योगधंद्याची सर्व प्रकारें शक्ति वाढल्याशिवाय पुरवठा होणें शक्य नाहीं. नवीन यंत्रें, नवीन कारखाने, सर्व नवीन साधनें व सामुग्री आणली

पाहिजे. नवीन मजूर, नवीन कारागीर, सर्व नवीनच तयार झाले म्हणजेच हा जास्त मागणीचा प्रश्न सुटतो. पण अर्थात् याला वर सांगितल्याप्रमाणें वेळ लागतो; हा 'दरम्यानचा काळ' लांबलचकही असतो. उदा०, हिंदुस्थानांत आतां सर्वत्र विजेचे दिवे होत आहेत, मोठमोठ्या शहरांतून रोषणाई, ट्रॅम, कारखाने, विजेवर चालत आहेत. रेल्वेही आतां विजेच्या होऊं लागल्या. त्याबरोबर या गोष्टींना अवश्यक असणारी सामग्री, माल, दिवे, तारा व अन्य गोष्टी तयार करण्याचे कारखाने हिंदुस्थानांत निघूं लागले. वाढती मागणी नवीन कारखान्यापासून होणाऱ्या मालानें पुरी होऊं लागली आहे. त्याचप्रमाणें शेंगदाण्याला चिकार मागणी आल्याबरोबर ज्या शेतांतून इतर धान्यें होत होतीं त्यांत शेंगदाणा होऊं लागला. सातारा जिल्ह्यांतील हजारों एकर जमिनींत शेंगदाणा होऊं लागला. चालू सालीं लढाईमुळें बटाटे व कांदा यांना भाव आला; त्याबरोबर बटाटे व कांदे यांची लागवड जास्त प्रमाणावर झाली आहे. मागणी व पुरवठा यांचा मेळ बसण्यास वेळ लागतो, पण तोंपर्यंत भाव वाढता असतो. खूप शेंगदाणा झाला, खूप कांदा बटाटा झाला कीं पुनः भाव कमी होईल, व शेवटीं मागणी व पुरवठा यांत मेळ बसून भाव साधारणतः स्थिर होईल, म्हणजे समतोल भाव होईल. रबराच्या पिकाचें उदाहरण पाहण्यासारखें आहे. रबराचें झाड लावल्यापासून दुधटचीक—ज्यापासून रबर तयार करतात—तो येण्यास ६।७ वर्षें लागतात. समजा रबराचा भाव वाढला, कारण मागणी वाढली व पुरवठा कायम; नवीन झाडें लावलीं तरी ६।७ वर्षें भाव वाढत असणार. जुन्या झाडांना कांहीं नवीन उपाय करून पुनः पुनः शेंवटून फारतर पुरवठा थोडा जास्त होईल. पण ६।७ वर्षांनीं नवीन झाडांचा पुरवठा येऊं लागला कीं भाव कमी होईल. निदान दरम्यानच्या काळाच्या भावापेक्षां खास कमी होईल. हल्लीं फळांना मागणी फार आहे; कारण लोकांची रुचि बदलली, फळें जास्त खावींत असें डॉक्टर सांगू लागले, त्यामुळें मागणी वाढत आहे. फळझाडांची लागवड वाढत आहे; पण फळझाडें, नारिंगे, मुसंबी, डाळिंबे, यांना ७–८ वर्षें लागतात. त्यांच्याहि बाबतींत हाच अनुभव आहे. मात्र परदेशी माल आला तर मग सगळेंच स्वरूप बदलेल. तात्पर्य, उत्पादनपद्धतींत कांहीं बदल झाले तर कांहींचा परिणाम लवकर दिसून येतो, कांहींचा कालांतरानें, म्हणून अमुक भावांत अमुक पुरवठा होईल, हें आपण ताबडतोब सांगूं शकणार नाहीं. मागणी व पुरवठा यांचा मेळ बसल्याशिवाय हें सांगणें सोपें नाहीं. वस्तु तयार करण्याची ही पायरी पुरी झाली पाहिजे. पर्वतीच्या पायऱ्या एकदम उंच नाहींत तर चढत्या आहेत. तेव्हां मागल्या पायरीच्या लेव्हल ( पातळी ) पेक्षां आपण किती उंच

आहेत हें पुढील पायरीवर पाऊल पडेपर्यंत नक्की सांगतां येणार नाहीं. तसेंच उत्पादनाची ती बदलती अवस्था, पुरी बदलली म्हणजेच, आपण पुरवठा कोष्टक,—म्हणजे कोणत्या भावांत किती पुरवठा होईल हें दाखविणारें—मांडू शकूं, तत्पूर्वी नाहीं.

आतांपर्यंत आपण असें पाहिलें कीं साधारणतः पुरवठ्याची वाढ व्हावयाची असेल तर भाव वाढला पाहिजे. मागणी वाढती असली कीं भाव वाढता होतो, पुरवठा वाढत जातो व कांहीं कालानें वाढती मागणी व वाढता पुरवठा यांचा मेळ बसून भाव स्थिर होतो; पण हा पुनः स्थिर झालेला समतोल भाव मागणींत वाढ होण्यापूर्वीच्या भावापेक्षां, जास्त कां कमी ? पुष्कळवेळां मागणी वाढते, त्याच वेळेस वस्तूंच्या उत्पादनपद्धतींत सुधारणा झाली म्हणजे त्या तयार करण्याचा खर्च कमी होतो व तसें झालें तर मागणी वाढूनसुद्धां, नवीन भाव पूर्वीपेक्षां कमी राहतील. गेल्या कांहीं वर्षांत चहाचा प्रसार झाल्यामुळें साखरेची मागणी वाढली; त्याच सुमारास कांहीं कारखान्यांतील सुधारणेमुळें, कांहीं उंसाचे लागवडींतील सुधारणेमुळें व कांहीं अन्य कारणानें ( संरक्षक जकात ) साखरेचा पुरवठा वाढूं लागला, व त्यामुळें मागणी खूप वाढून सुद्धां, भाव म्हणण्यासारखा वाढला नाहीं. पण समजा, मागणीच वाढली नसती व पुरवठा वाढत गेला असता तर भाव कमी झाला असता. ही मागणींत वाढ तात्पुरती नसून कायम आहे; तेव्हां वर आपण उत्पादनपद्धतींत प्रगति झाली, ती झाली नाहीं असें धरलें तर काय झालें असतें हें आपण पाहूं. कायमची मागणी वाढली म्हणजे भावावर काय परिणाम होईल हें स्पष्ट होईल. जुन्याच पद्धतीनें ऊंस निघाला असता, पण साखरेला मागणी वाढल्याबरोबर उंसाचाही भाव पूर्वीइतका राहिला नसता. त्याच कारखान्यांत, जास्तींतजास्त माल काढण्याचा प्रयत्न झाला असता; आणखी कामगार, आणखी कच्चा माल वगैरे वाढवून वाढती मागणी पुरविण्याचा प्रयत्न झाला असता. तात्पर्य, हा जास्त पुरवठा तयार करण्यास खर्चही कदाचित् जास्त आला असता. पण ही मागणींतील वाढ कायम स्वरूपी असल्यामुळें, खरा परिणाम आणखी कारखाने निघण्याकडे होणें स्वाभाविक आहे. मोठ्या प्रमाणावर माल काढून, खर्च कमी करणें स्वाभाविक आहे व त्याचप्रमाणें व्यवहारांत होतें व शेवटीं वाढती मागणी व वाढता पुरवठा यांचा मेळ बसून, दरम्यानचा काळ संपला कीं, पुन्हा एकंदर भाव स्थिर होईल व तो पूर्वीच्या स्थिर, समतोल भावापेक्षां कमीच असणें संभवनीय आहे. अनुभवहि, असें होतें असाच आहे. मोठ्या प्रमाणावर घड्याळें निघूं लागल्याबरोबर त्यांच्या किंमती कमी झाल्या. 'बाटा'च्या कारखान्यांत यंत्रानें मोठ्या प्रमाणावर चपला निघूं लागल्याबरोबर त्या स्वस्तच

झाल्या. गेल्या कांहीं वर्षांत, जोडे, चपला वगैरे घालणाऱ्या स्त्रीपुरुषांची, मुलांची संख्या वाढली; यामुळें मागणी वाढली व ही वाढ कायम स्वरूपाची आहे; पण लवकरच पुरवठा सर्वत्र इतका झाला कीं, आज चपला पूर्वीपेक्षां स्वस्त झाल्या. कारण कारखाने वाढले व मोठया प्रमाणावर माल निघूं लागला. असें कां होतें? तर एक कारण, वस्तु मोठया प्रमाणावर निघूं लागल्या म्हणजे त्यांचा उत्पादन—तयार करण्याचा—खर्च सरासरीनें कमी होतो. दुसरें, पूर्वी कारखान्यापासून जितका माल काढणें शक्य होतें, तो काढला जात नव्हता व नवीन माल काढला म्हणजे साहजिकच त्याचा खर्च कमी येतो. नुसते, पूर्वीसारखेच कारखाने उघडून खर्च कमी येणार नाहीं; कारखान्यांतील यंत्रांचा उपयोग पूर्वीपेक्षां जास्त किफायतशीर रीतीनें झाला पाहिजे, तरच हें शक्य आहे. उत्पादनाचे पद्धतींत बदल झाला तर मग सगळेंच निराळें; कारण मग जास्त काम देणारीं यंत्रें आलीं व मग साहजिकच उत्पादनखर्च कमी झाला. पण पूर्वीचीं यंत्रें व पद्धति कायम असतील तर, यंत्राचा जास्तींत जास्त उपयोग केला तरच वस्तु स्वस्त रीतीनें तयार करणें परवडेल व मग पुरवठा वाढवूनहि भाव तोच राहणें अगर कमी होणें शक्य आहे. पण हें सुद्धां कच्च्या मालाचा कीं ज्यापासून ती वस्तु तयार होते त्याचा—भाव कायम आहे, किंवा त्यांतील वाढ विशेष नाहीं असें असेल तरच होतें.

कांहीं पदार्थ असे असतात कीं, ते जोडीजोडीनें तयार होतात त्यांना आपण जोड वस्तु म्हणूं. उदा०, लोंकर व मांस हे दोन्ही मेंढ्यांपासून जोडीनें तयार होतात. मांस व कातडीं, बैल वगैरे जनावरांपासून, कापूस—सरकी वगैरे. गॅस तयार करतांना त्याच कोळशापासून एक नवीन गॅसचा कोळसा तयार होतो. ज्वारीचे पिकापासून ज्वारी व कडबा. अर्थात या जोड वस्तूंत जी कमी महत्त्वाची तिला दुय्यम वस्तू म्हणूं; तथापि आतांपर्यंत आपण मागणी, पुरवठा व भाव यासंबंधीं जें विवेचन केलें तें सामान्यतः याही वस्तूंचे बाबतींत लागू आहे. लोंकरीला भाव येऊं लागला तर धनगर मेंढया मांसाकरितां विकणार नाहीं. उलट मांसाला भाव आहे व लोंकरीला कमी, तर तो मेंढया कसायाला विकील. तात्पर्य भावाप्रमाणें जोड वस्तूंपैकीं कोणती वस्तु निकालीं लावावयाची हें तो ठरवील व त्याचें करणें आतांपर्यंत केलेल्या विवेचनाविरुद्ध अगर विसंगत असणार नाहीं. आस्ट्रेलियांत जास्त लोंकर असणारी मेंढयाची एक जात, तर जास्त मांसल मेंढयांची दुसरी जात आहे. जे हे मेंढे पाळतात व मांस व लोंकर यांचा पुरवठा करतात ते, भावाकडे पाहून कोणती जात जास्त वाढवावयाची हें ठरवितात. पण त्यांचें करणेंसुद्धां, आतांपर्यंत

आपण जें निरीक्षण केलें त्याबरहुकूम असणार. तसेंच कापूस सरकी यांच्या प्रत्येकाचे मागणीचें स्वरूप निराळें व समजा सरकीला खूप भाव आला तरी कापूस व सरकी यांचे एकमेकांतील प्रमाण शेतकरी कांहीं बदलू शकत नाहीं. मेंढ्यांचे बाबतींत ते शक्य आहे. समजा, कापसाचा भाव चढला, कापूस जास्त पिकला तर सरकीचाही पण पुरवठा वाढेल; पण सरकीची मागणी कापसाचे मागणीवर अवलंबून नाहीं, ती स्वतंत्र आहे म्हणून कापसाचा भाव वाढला तरी सरकीची मागणी कायम असली, तर सरकीचा भाव उतरेल. पण बहुतकरून जोड वस्तु विकणारे कोणतीहि वस्तु विकतांना, दुसऱ्या वस्तूवर होणारा परिणाम लक्षांत घेऊनच भाव ठरवीत असतात. शिवाय, बहुतेक जोड वस्तूंचें, एकमेकांतील प्रमाण बदलतां येतें असा अनुभव आहे. त्यामुळें एकंदरींत याही तऱ्हेच्या जोड वस्तूंचे, मागणी–पुरवठा भाव वगैरे बाबतींत जें आपण आतांपर्यंत विवेचन केलें, तेंच लागू होईल.

किंमत किंवा भाव हा कांहीं स्वयंभू गृहस्थ नाहीं किंवा लहरीहि नाहीं कीं वाटेल तेव्हां तो बदलतो. तो नाफेरवालाहि नाहीं, फेरवालाहि नाहीं. जशास तसें वागणारा आहे. मागणीचें कोष्टक, पुरवठ्याचें कोष्टक, यांच्यांत बदल झाला, अगर दोन्हींत बदल म्हणजे मागणीचे अगर पुरवठ्याचे स्वरूपांत बदल झाला म्हणजे भावांतहि बदल होतो. आपलें पूर्वींचेंच उदाहरण घेऊं. मागणी—पुरवठ्याचे ताजवे सारखे असले तर भावाचा कांटा स्थिर; ते कमीजास्त झाले कीं हाहि कांटा हलूं लागतो. जर नुसत्या मागणींत फरक झाला, म्हणजे ती वाढली, तर भाव वाढेल व भाव वाढला म्हणजे पुरवठा–विक्रीस येणारा माल–वाढेल. उलट, जर मागणी कमी झाली, तर भाव कमी होईल व भाव कमी झाला म्हणजे पुरवठाहि कमी होईल. तसेंच जर पुरवठ्यांत म्हणजे विक्रीस येणाऱ्या मालाचे प्रमाणांत फरक झाला म्हणजे तो वाढला तर भाव कमी व भाव कमी झाला कीं मागणी—घेणारें गिऱ्हाईक—जास्त. उलट पुरवठा कमी झाला म्हणजे भाव वाढला कीं मागणी—घेणारें गिऱ्हाईक—कमी. आतांपर्यंत आपण मागणी, पुरवठा व भाव यांचा जो विचार केला, त्यावरून आतां आपल्याला खालील सिद्धांत मांडावयास हरकत नाहीं.

(१) भाव सामान्यतः मागणी व पुरवठा यांचा मेळ घालतो. मागणी व पुरवठा म्हणजे गिऱ्हाइकांस घ्यावयाचा माल व विक्रीस आलेला माल यांचें प्रमाण सारखें करण्याकडे भावाची प्रवृत्ति असते.

(२) सामान्यतः वस्तूंची किंमत कमी झाली कीं सामान्यतः मागणी—गिऱ्हाईक—

जास्त. वस्तूंची किंमत जास्त झाली कीं तिचा पुरवठा--म्हणजे विक्रीला येणारें प्रमाण—जास्त.

(३) मागणींत वाढ झाली कीं सामान्यतः भावांत वाढ व त्यामुळें पुरवठा जास्त प्रमाणांत होतो; मागणी कमी झाली कीं भाव कमी व त्यामुळें पुरवठा आंकसतो.

(४) पुरवठ्यांत वाढ झाली कीं, सामान्यतः भाव कमी व त्यामुळें मागणी विस्तारते. पुरवठा कमी झाला कीं भाव जास्त व त्यामुळें मागणी आंकसते.

---

# ६. उत्पादन

आतांपर्यंतच्या विवेचनांत मागणी, पुरवठा, भाव वगैरे गोष्टी आल्या; व पुरवठ्याच्या संबंधांत उत्पादन म्हणजे वस्तु तयार करणें याबद्दलही उल्लेख केला. उत्पादन ही एक व्यवहारांतील फार मोठी बाब आहे. उत्पन्न झालेल्या, तयार केलेल्या गोष्टी उपभोगणारा पाहिजे नाहींतर त्याचा काय उपयोग? सर्व व्यवहार जो उपभोगणारा, उपभोगी गिऱ्हाईक त्याकरितां आहे; त्याकरितांच हा सर्व खटाटोप आहे. तो खरा व्यवहार–राज्याचा मालक व त्याच्यासाठीं सर्व बाजार, सर्व देवघेव व सर्व उत्पादन. व्यवहाराला जर खादीची उपमा दिली तर उत्पादन व उपभोग हे ताणा व बाणा याप्रमाणें आहेत. गिऱ्हाइकाला वस्तु पाहिजेत व वस्तूंस गिऱ्हाईक पाहिजे. तेव्हां वस्तु उत्पादन करणें, तयार करणें ही बाब व्यवहारांत, अर्थशास्त्रांत. अत्यंत महत्वाची आहे. आपण क्षणभर बाजारांत उभे राहिलों कीं सारखी देवघेवीची रीघ लागलेली दिसते. माल रोज रोज येत असतो व तो विकला जातो. हा माल कोण काढतो व किती खपेल हें त्याला कसें कळतें? कोणकोणत्या गोष्टींचा कोणत्या परिस्थितीचा या माल तयार करण्याच्या क्रियेवर म्हणजे उत्पादनावर परिणाम होतो, याचा आपण विस्तारानें विचार करूं.

सृष्टीनें दिलेल्या अगर उत्पन्न केलेल्या सर्व वस्तूंशिवाय बाकी सर्व गोष्टी माणसांना तयार कराव्या लागतात. हवा, उजेड, नुसती जमीन, तिच्यावर आपोआप उगवलेलीं झाडें अगर गवत अगर अन्य वस्तु परमेश्वरानें अगर सृष्टीनें उत्पन्न केल्या आहेत. इतर सर्व मनुष्यांना तयार कराव्या लागतात. झाड जरी सृष्टीचें असलें, तरी तें माणसानें तोडलें म्हणजे सरपण तयार होतें. तें चौरस कापलें पाहिजे म्हणजे इमारतीचें लांकूड तयार होतें. जमीन नांगरून, साफ करून लागवड केली म्हणजे पीक तयार होतें. मनुष्याचे श्रम लागल्याशिवाय 'वस्तु' तयार होत नाहीं; व सर्व वस्तु ज्या तयार करावयाच्या त्या माणसाकरितां, त्याचे उपयोगाकरितां. जो उपभोगी 'गिऱ्हाईक' आहे त्याच्याकरितां. तो एक कृष्ण कीं ज्याभोंवती या जगाच्या व्यव-

हारांतील उत्पादनाच्या गोष्टी, गोफ विणीत आहेत. मग जर माणसाच्या सुखाकरितां, उपभोगाकरितां हें सर्व उत्पादन आहे, तर साहजिकच एकंदर वस्तु किती प्रमाणांत होतात व कोणत्या प्रतीच्या होतात, या दोन गोष्टींचें प्रमाण व प्रत यांचें महत्त्व विशेष आहे हें उघड आहे. सर्व सुखी व्हावेत, सर्व निरामय व्हावेत, सर्वांचे कल्याण व्हावें हा तर सर्वांचा हेतु असावा. व्यवहारशास्त्र समजलें तर निदान जगांत असें दुःख कां, गरिबी कां, हें कळेल व त्याचीं कारणें दूर करतां येणें शक्य आहे कीं नाहीं हेंहि समजेल. एकंदर व्यवहाराचें धोरण असें असावें कीं, सर्व लोकांना सुख मिळावें, त्यांचें दारिद्र्य जावें, त्यांची स्थिति सुधारावी, राहणी बरी व्हावी. चांगली राहणी, म्हणजेच माणसाला अवश्य लागणाऱ्या वस्तु पुरेपूर व योग्य प्रतीच्या मिळणें. गरिबी म्हणजे अन्न पुरें न मिळणें, कमी प्रतीचें मिळणें, इतर सर्व सामान कपडे-लत्ते, करमणुकी वगैरेंचा अभाव, हाच अर्थ आपण समजतों. अर्थात् एका माणसाला किती वस्तु मिळाव्यात, त्यांची राहणी कोणत्या दर्जाची असावी हा मोठा प्रश्न आहे. हिंदुस्थानांतील शें. २० लोक अर्धपोटीं राहतात. त्यांना आज जरी पोटभर खाण्यास मिळालें तरी मोठीच प्रगति होईल! आपलेकडील गरिबी व युरोपमधील देशांतील गरिबी यांत फार फरक. त्यांच्याकडील राहणी सर्व प्रकारें वरच्या दर्जाची म्हणजे आपल्या दृष्टीनें पुष्कळच चांगली. तेव्हां गरिबीची राहणी, हीसुद्धां देशादेशांत निरनिराळी असूं शकेल व असतेहि. एका माणसाला कमींत कमी किती अन्न, किती वस्त्र, इतर अवश्यक व साधारण चैनीच्या वस्तु किती, करमणुकीच्या सोयी किती असाव्यात, या निरनिराळ्या राष्ट्रांत ठरविल्या जातात; व ती राहणी निदान किमान पक्षीं, प्रत्येक माणसाला राहतां आली पाहिजे त्यापेक्षां खालीं जातां कामा नये. तिला आपण किमान राहणी म्हणूं. आणि जर अशा राहणीचें कोष्टक, म्हणजे एकंदर वस्तु किती लागतील हें आपण हिंदुस्थानाचे बाबतींत तयार केलें तर, आपल्याला असें आढळेल कीं, या दुर्दैवी देशांत निम्यावर, कांहींच्या मतें तीनचतुर्थांश लोक, या किमान राहणीपेक्षां खालच्या पायरीवर जिवंत राहण्यासाठीं धडपडत आहेत. मुलांना बाल्यावस्थेंत पुरेसें दूध नाहीं म्हणून अशीं मुलें मोठ्या संख्येनें मरतात; व जीं जिवंत राहतात तीं अर्धवट, खुजट, निस्तेज, पंगू अशींच पुष्कळ. दरसाल हिंदुस्थानांत ९२·९ (लाख) मुलें जन्मतात (१९२०–१९२५) पैकीं एक चतुर्थांश एक वर्षाचीं होण्यापूर्वीं मरतात, व ५० लाख ५ वर्षांचीं होण्यापूर्वीं मरतात. हें प्रमाण १९२१ सालचें आहे. त्यापेक्षां १९४० च्या नोंदणींत तें थोडेसें कमी झालें आहे. तथापि इतर कोठल्याहि राष्ट्रापेक्षां तें अधिकच आहे. इतर कोठल्याहि देशांत बाल-

मृत्यूंचें येवढें प्रमाण नाहीं. माणसें लाखोंनीं क्षय होऊन मरत आहेत. दरसाल हिंदुस्थानांत क्षयानें पांच लाखांवर लोक मरतात. अपुरें व वाईट अन्न हें क्षयाचें मुख्य कारण आहे. मलेरियानें दरसाल २० लाख लोक मरतात; त्याचें मुख्य कारण सात्त्विक व दमदार अन्न लोकांना मिळत नाहीं; त्यामुळें ते मलेरियाला बळी पडतात. हिंदुस्थानांतील जीवमानहि इतर देशांचे मानानें कमी. येथें सरासरी जीवमान २६·७ वर्षें तर इंग्लंड ६०·७८, फ्रान्स ५२·८३, स्वीडन ६२·३३ वर्षें असें आहे. हिंदुस्थानांत जीवमान कमी याचें कारणहि अपुरें अन्न, कमी प्रतीचें अन्न, दारिद्र्य व व दुर्भिक्ष्य. मग सहजच कोणी म्हणेल, अन्न धान्यादिक पदार्थ, कपडालत्ता, अन्य गोष्टी ज्या चांगल्या राहणीस—निदान किमान राहणीस—अवश्यक आहेत त्या गोष्टी उत्पन्न कां करीत नाहीं ? तयार कां करीत नाहीं ? जर पुरवठा कमी असेल तर तो वाढवीत कां नाहीं ? या गोष्टी उत्पन्न केल्या पाहिजेत; त्यांचें उत्पादन वाढविलें पाहिजे. या वस्तु कांहीं आकाशांतून पडणार नाहींत. जर आकाशांतून भाकरी, सुंदर भाजी, स्वादिष्ट पक्वानें तयार होऊन पडूं लागलीं तर कसलीच पंचाईत पडणार नाहीं व जगांतील सर्व पेंचप्रसंग सुटतील. पण मनुष्याच्या दुर्दैवानें या सर्व गोष्टी त्यास श्रमानें तयार कराव्या लागतात. राष्ट्रांत कांहीं श्रीमंत लोक असणारच. त्यांच्याजवळ जर जास्त वस्तु असतील तर त्या वांटून देतां येतील. त्यांच्यावर खूप कर बसवून, थोडीशी सुखदुःखाची वांटणी बरी करतां येईल; तें करण्यांत थोडा न्यायहि होईल. तथापि सर्वांजवळ असलेली पैशाची संपत्ती सारखी वांटली तरी हें दुःख फारसें कमी होणार नाहीं; कारण आपण मागें पाहिलें कीं खरी संपत्ती, खरें उत्पन्न म्हणजे वस्तु, उपभोग्य वस्तु ! अर्थात् या सारख्या वांटणीमुळें पुढें चांगले परिणाम होतील हें निराळें, पण आज जें अवश्य आहे तें म्हणजे उपभोग्य वस्तूंचा मुबलक पुरवठा हा ताबडतोब शक्य नाहीं. चालू भांडवलांतून या वस्तु दिल्या तरीही फारसा उपयोग होणार नाहीं ! याचा अर्थ असा कीं, आज अगर विवक्षित कालमर्यादेंत ज्या वस्तु, जे पदार्थ तयार होतात त्यांचें वट प्रमाण एकंदरीनें मनुष्याची राहणी ठरवीत असतें. आजच्या घटकेला उत्पन्न होणारें धान्य, कपडा, अन्य माल या सर्वांची, सर्व उत्पादनाची वटरास, वटप्रमाण जें होईल, त्यांतूनच सर्वांना कमीजास्त वांटलें जाणार. ही वटरास किंवा वटप्रमाण जर कमी असेल तर राहणीहि कमी दर्जाचीच होणार हें उघड आहे. म्हणजे वट—उत्पादनाचे चतुःसीमेंत राहणीला वागलें पाहिजे; ही रामरेषा तिला ओलांडतां येत नाहीं. मग हें क्षेत्र—राहणीचें क्षेत्र—मोठें करावयाचें असेल तर उत्पादन—वट उत्पादन—वाढविलें

पाहिजे हें उघड आहे. एकच तीळ सहा जणांनीं खावयाला नको असेल तर जास्त तीळ पैदा केले पाहिजेत. म्हणून राहणी अथवा माणसांचें खरें सुखदुःख, हें सर्वस्वीं त्या राष्ट्रांतील वट—उत्पादनावर, पदार्थांच्या पैदाशीवर अवलंबून आहे, पांडुरंगावर नाहीं. कबीराचे शेले त्याच्या दोहऱ्यांतून उत्पन्न झाले नाहींत, त्याच्या दोन्ही हातांनीं श्रम केले तेव्हां झाले. माणसाचें सुख त्याच्या राहणीवर, व त्याची राहणी ही सर्वस्वीं उत्पादनावर अवलंबून, म्हणून जेवढें उत्पादन वाढेल, तेवढें राहणी सुधारण्यास मदतच देणारें ठरतें. दुष्काळांत परक्या देशांतून मदत आली, धान्य आले, कपडे आले अगर परदेशांतील माल येथें आला व तो उधारीनें आला तर तो परत देण्याचा असतो. म्हणजे पदार्थांची परत फेड पदार्थांनींच करावयाची. म्हणून या गोष्टीनीं राहणी सुधारणार नाहीं. राहणी एकाच गोष्टीनें सुधारेल आणि ती म्हणजे देशांत जादा पैदास, जादा उत्पादन करण्यानें. परदेशी माल उधारीनें आणला तर त्याची फेड वर सांगितल्याप्रमाणें माल तयार करून मालानेंच करावी लागते; म्हणून जितका माल जास्त तयार होईल व याच देशांत तो उपभोगिला जाईल तितक्या प्रमाणांत राहणी सुधारेल. देशादेशांतील व्यापारासंबंधीं आपण पुढें विचार करूं. तूर्त येवढें उघड आहे कीं, जितका माल, जितक्या सोई, दररोज, महिन्याचे महिना जास्त वाढतील, तितकी राहणी सुधारेल. आजच आपण चीन व अमेरिका यांच्याकडे पाहिलें तर एक देश दारिद्र्यांत व एक देश सुखांत आणि याचें मुख्य कारण चीनपेक्षां अमेरिकेंत उत्पादन, पैदास मुबलक व मोठ्या प्रमाणावर आहे. एवढ्या विवेचनावरून वस्तूंचें उत्पादन समाजाच्या व राष्ट्राच्या दृष्टीनें, किती महत्त्वाचें आहे हें समजून येण्यासारखें आहे. कांहीं लोकांना असें वाटतें कीं, जगांत सर्व वस्तूंचा पुरवठा मुबलक होणें शक्य आहे; मात्र सर्वत्र उत्पादनाचें काम संघटित केलें पाहिजे. भांडवल नीट जुळवून उद्योगधंदे वाढविले पाहिजेत म्हणजे सर्व गोष्टी चांगल्या तऱ्हेनें होतील. आपण जगाची गोष्ट सोडून देऊं. हिंदुस्थानचीच घेऊं. डॉ. आकरायड डायरेक्टर ऑफ न्यूट्रीशन, यांनीं कमींत कमी अन्न माणसास किती लागेल हें काढलें आहे. कमींत कमी, म्हणजे योग्य रीतीनें त्याला राहतां येईल इतकें. त्यामानानें माणशीं द० म० ५ रु. खर्च येईल व सालीना ६० रु. येईल; व एका कुटुंबांत स्त्री, पुरुष व तीन लहान मुलें धरलीं तर त्यांच्या हिशोबानें दरसाल २१६ रु. नुसते अन्नाकरितां खर्च होतील व या मानानें हिंदुस्थानांतील ⅔ कुटुंबांना हे परवडणार नाहीं. हा हिशोब १९३९ सालीं जे भाव होते त्यांच्यावर आधारलेला आहे. १९४६ सालीं सर्वसामान्य भावांत अडीचपटीनें वाढ झालेली आहे. नियंत्रित दरानें

आज मिळणारे शिधा धान्यच फक्त विचारांत घेतले तर हा खर्च ४८० रु. होतो. शिवाय अन्नांतील संरक्षक द्रव्यें दूध, चरबी, भाजीपाला वगैरे वस्तूंचा सर्वांना योग्य पुरवठा करावयाचा झाला तर हिंदुस्थानांतील सर्व उत्पादन किती तरी पटीनें वाढवावें लागेल. तें सर्व वाढविणें शक्य आहे कीं नाहीं याबद्दलही विद्वानांत मतभेद आहेत. याचा अर्थ असा नव्हे कीं, चालू विषमता, दुःख व दारिद्य चालू ठेवावें. उलट आपण असेंही पाहतों कीं, कित्येक पदार्थ भाव नाहीं म्हणून नाहींसे केले जात आहेत. १९३१–३४ सालांत २० लक्ष टन कॉफी ब्राझिलमध्यें जाळण्यांत आली. आपल्याच देशांत, संयुक्त प्रांतांत १९३८–३९ मध्यें उंसाचें पीक एवढें लाविलें कीं, साखरेचे कारखानदार विकत घेईनात व कित्येक ठिकाणीं गुरांना चारा म्हणून त्याचा उपयोग करण्यांत आला. जगांतील उत्पन्न केलेल्या वस्तूंचें थोडें प्रमाण याप्रमाणें निकालीं लावलें जात असेल हें खरें, तथापि जगांत वस्तु उत्पन्न करावयाची म्हणजे उत्पादनाची, कमाल मर्यादा संपली हें मात्र खरें नाहीं. कित्येक उत्पादक साधनें अनेक कारणांनीं पूर्णपणें काम करीत नाहींत. जगांतील लागवडीला लायक असलेल्या सर्व जमिनी लागवडींत नाहींत. हिंदुस्थानांतील (ब्रिटिश) ९ कोटी ३ लाख एकर जमीन लागवडीस योग्य असून ती पडीक आहे. ही जवळ जवळ लागवडीला योग्य असणाऱ्या जमिनीच्या $\frac{1}{4}$ आहे. कितीतरी कच्चा माल जगांत तसाच पडला आहे, शेंकडों लोक बेकार आहेत. खुद्द हिंदुस्थानांत ६ कोटींवर लोक कमीजास्त प्रमाणांत बेकार आहेत. इतर देशांत हें प्रमाण शेंकडा २० पासून ३० पर्यंत आहे. अर्थात् ही स्थिति महायुद्धापूर्वीं होती. युद्धकालांत बेकारी सर्वत्र कमी झाली. पण युद्ध संपताच बेकारी पुनः पूर्ववत् होण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. जगांतील सर्व लोकांना काम मिळालें तरी आजच्या स्थितींत जास्तींत जास्त १० टक्के भर जगांतील उत्पादनांत घालतां येईल असें कांहींचें म्हणणें आहे. तेवढ्यानें सर्वांना अवश्यक अशा वस्तूंचा योग्य प्रमाणांत पुरवठा होईल असें नव्हे. तथापि यांत वाढ होणार नाहीं असें नाहीं. आजपर्यंत सर्व उत्पादन—वस्तु तयार करणें—हें एका जुन्या पद्धतीनें, भांडवलशाहीच्या पद्धतीनें चाललें आहे व यांत सर्व उत्पादन, वस्तु तयार करणें हें नफा किती मिळेल, यावरच दृष्टि ठेवून. समाजाच्या उपयोगाकरितां, समाजाची गरज भागविणें हा हेतु त्यांत नाहीं. सुखाचीं साधनें उत्पन्न करण्यांत नफा होत नसेल, तर भांडवलवाले संहार करणारी शस्त्रसामुग्री, दारूगोळा, यांचे कारखाने काढतील, पण नफा मिळवतील. लोक मेले, राष्ट्र बुडालें याचा त्यांना विधिनिषेध नाहीं. त्यांचा देश म्हणजे त्यांचा खिसा. त्यांचें देशप्रेम म्हणजे नफाप्रेम! हा अनुभव या युद्धांत सुद्धां आला आहे.

ब्रिटिश भांडवलदारांना ज्या प्रकारचा दारूगोळा ब्रिटिश सैन्याला पाहिजे होता तो तयार करणें फायद्याचें नव्हतें म्हणून त्यांनीं तो केला नाहीं व अशा सामग्रीचे अभावीं ब्रिटिशांना बेल्जममधून पळ काढावा लागला असा आक्षेप अनेक ब्रिटिश ग्रंथकारांनीं घेतला आहे. उत्पादनाचें ऐन स्वरूप बदललें म्हणजे समाजाकरितां उत्पादन, समाजाकरितां वस्तु तयार करणें, असें झालें म्हणजे जगांतील उत्पादन १० टक्क्यांनींच काय, पण कितीतरी पटीनें वाढेल. त्यांत विचारपूर्वक मांडणी होईल, कोणाला किती लागेल याचा नकाशा तयार होईल, कोणाला किती द्यावयाचें याचा न्यायपूर्ण निकाल लागेल, कोणापासून किती श्रम घ्यावयाचें हेंहि ठरेल; तात्पर्य सर्व सृष्टि बदलेल. आजची चुरस, गळेकापू भाव व बदल हे नाहींसे होतील. पण हें सर्व नव्या जगांत होईल. आज आपण चालू जग कसें आहे याची चिकित्सा, नाडीपरीक्षा करीत आहोंत. कांहीं लोकांना खरोखरच असें वाटतें कीं, मुळांत कांहीं फरक न करतां, उत्पादन वाढवितां येईल. आज लोक पाहतात कीं, अमेरिकेंत १० माणसांमागें ३ मोटारी आहेत. हें जर मोटारींचे बाबतींत शक्य झालें, तर इतर उद्योगधंद्यांत कां होऊं नये; आणि तसें झालें तर सर्वत्र चैन व चंगळ होईल!! सर्व अडचणी दूर होतील, पण हें शक्य नाहीं. एका धंद्यांतील वाढ दुसऱ्या धंद्यांत कमीपणा आणून झालेली आहे. खूप मोटारी, खूप दारूगोळा, याचा अर्थ त्या कामीं उपयोग केलेला कच्चा माल दुसऱ्या कामीं कमी पडला. सर्व उद्योगधंद्यांत, शेतींत मोठ्या प्रमाणावर जरी उत्पादन सुरू केलें, तरी आजच्या व्यवहाराच्या भांडवलशाही घडणीमुळें दरसाल शेंकडा १–२ टक्क्यांपेक्षां उत्पादनांत वाढ होणार नाहीं. मात्र जगाची लोकसंख्या दरसाल सरासरी शेंकडा १ टक्क्यानें वाढतच असते. शिवाय या नवीन उत्पादनाला नवीन कारागीर, नवीन भांडवल, नवीन तज्ज्ञ पण मिळतीलच असें नाहीं. योजनापूर्ण उत्पादन असेल तर ह्या सर्व गोष्टी शक्य आहेत; पण योजनापूर्ण उत्पादन भांडवलशाहीचे चौकटींत शक्य नाहीं. समाजसत्तावादी समाजरचनेंत प्रत्येक माणसाला त्याच्या गरजेप्रमाणें मिळावें व प्रत्येकाकडून त्याच्या शक्तीप्रमाणें घ्यावें हा मूलभूत सिद्धान्त असतो. त्यामुळें योजनापूर्ण व्यवहार समाजनियंत्रणामुळें शक्य होतो. असें झालें तर नफा कोठें उरला? व नफा म्हणजे भांडवलशाहीचा प्राण. म्हणून आहे या घडणींत राहून जगांतील मनुष्यांना अवश्यक असें सर्व मिळेल, हें कधींच शक्य नाहीं. सर्व समाजाची, व्यवहाराची कायापालट झाल्याशिवाय हें शक्य नाहीं.

असो, आपण चालू जगांतील उत्पादनाचा विचार करीत आहों. उत्पादन

म्हणजे माणसानें श्रम करून मनुष्याच्या उपभोगाकरितां वस्तु तयार करणें. जादुगारासारखा कांहीं रिकाम्या पिशवींतून तो वस्तु निर्माण करूं शकत नाहीं. शेतकरी जमीन साफ करतो, नांगरतो, पद्धतशीर रीतीनें बीं पेरतो, मग पीक येतें. चांभार (ढोर) कच्चें कातडें कमावतो, कापतो व शिवतो तेव्हां जोडा तयार होतो. त्याचप्रमाणें गवळी दूध काढतो, तसाच चिंचवडाहून टांग्यांत दूध आणून पुण्यास विकतो. व्यापारी धान्य एकदम घेऊन गिऱ्हाइकांस जसें व जेव्हां लागेल तेव्हां विकतो. हीं सर्व माणसें उत्पादनच करीत असतात. कांहीं प्रत्यक्ष तयार करून, कांहीं तयार केलेला माल गिऱ्हाइकाजवळ आणून श्रम करीत असतात. तसेंच कारकून, अन्य नोकर वगैरे सर्व हे या सांखळींत असल्यामुळें उत्पादनाच्याच कार्यांत ते पडतात. ज्या श्रमांपासून त्यांना प्राप्ति होते ते श्रम त्यांच्या दृष्टीनें, उत्पादक म्हणजे कांहीं तरी उत्पन्न देणारे. कांहींचे श्रम समाजाच्या दृष्टीनें निरर्थक, बिन–उत्पन्नाचे असतात; पण मनुष्याला ज्या ज्या वस्तूंची गरज आहे त्या त्या वस्तु तयार करणें, म्हणजे एका अर्थानें उत्पादन आहे; व आज सर्व व्यवहाराचा, सर्व खटाटोपीचा उद्देश उपभोगी–गिऱ्हाइकांची गरज भागविणें हा आहे. चुलींत येणारें लांकूड एकदम कांहीं तेथें येत नाहीं. हमाल वखारींतून आणतो. वखारींतील ओंडके लांकूडफोड्या फोडून ठेवतो. तेथें येणारे ओंडके रानांत इतर मजूर तोडतात. या सर्व कामांतील मजूर उत्पादनच करीत असतात. त्याचप्रमाणें वखारीचा मालक, त्याचा कारकून व वजन करणारा नोकर हे सर्व उत्पादकच आहेत. त्याचबरोबर चुलींत लांकडें पेटवून त्यावर चहा तयार करणारी 'ती' सुद्धां उत्पादक श्रम करीत असते. अशी ही श्रम करणाऱ्यांची सांखळी सर्वच व्यवहारांत आहे. हे मध्यस्थ कांहीं ठिकाणीं संख्येनें थोडे असतात. ज्या ठिकाणीं केलेले श्रम वायां गेले, मनुष्याच्या उपयोगी पडले नाहींत त्या ठिकाणीं असें म्हणतां येईल कीं, सर्व श्रम निरर्थक झाले. समजा, दगड लागेल म्हणून जमीन खणली पण दगड लागला नाहीं, पाण्यासाठीं विहीर खणली पण पाणी लागलें नाहीं; अगर कालवे तयार केले व टाकून दिले; या बाबतींतील सर्व श्रम निरर्थक ठरले. यांतील श्रम कांहीं उत्पादन करूं शकले नाहींत. पण हें परिणामीं ठरले सुरवातीस नाहीं. तसेंच कलालाचा धंदा 'उत्पादक' नाहीं. कारण दारूपासून अखेर नाश होतो. तथापि 'कांहींची गरज' तो भागवतोच कीं नाहीं; आणि सरकारसुद्धां ती भागविण्यास किती तयार व उत्सुक आहे हें आपण दारूबंदीच्या धोरणावरून पाहिलेंच कीं नाहीं !! तथापि सामाजिकदृष्ट्या हितकारक म्हणजेच उत्पादक असा अर्थ करणें हल्लींच्या भांडवलशाही व्यवहारनीतीला सोडून

आहे. किंबहुना भांडवलशाहींत उत्पादन करणारे ह्या गोष्टीचा विचारच करीत नाहींत. दारू काय, किंवा दारूगोळा काय, दोन्हींचें उत्पादन करण्यांत जर नफा होत असेल, तर तें करण्यास ते तयार होतील! नीतीला तेथें स्थान नाहीं.

असो, आपण उत्पादनाची चिकित्सा तूर्त तरी नीतिनियमानें करीत नाहीं. आपणांस, हल्लींचे जगांत उत्पादन कसें चाललें आहे वगैरे गोष्टींचा विचार करावयाचा आहे. एखाद्या राष्ट्रांत उत्पादन किती होतें हें समजण्याची एक रीत आहे. आपण एखाद्या शेतकऱ्यास विचारतों कीं तुझें उत्पन्न काय? तर तो सांगतो २ खंडी ज्वारी अगर भात; व हें त्याचें एक सालचें उत्पन्न असतें. तसेंच राष्ट्राचें उत्पादन किती, याचा अर्थ एका वर्षांत त्या राष्ट्रांत माणसांना उपयोगी पडणाऱ्या व ज्या विकत घेऊन माणसें उपभोग घेतात, अशा सर्व वस्तूंची वट बेरीज म्हणजे त्या राष्ट्राचें उत्पादन—पैदास—होय. आणि वर्ष ही एक सोयीची मर्यादा आहे; कारण पिकें हीं वार्षिक असतात. सुगीचे महिन्यांत पीक होतें तरी तें वर्षभर पुरवावें लागतें. या व इतर अनेक दृष्टींनीं हीं वर्षाची मर्यादा सर्वत्र सोयीची समजली गेली आहे. म्हणून वर्षांत वर लिहिल्याप्रमाणें तयार झालेल्या वस्तूंची वट बेरीज म्हणजे राष्ट्राचें उत्पादन. प्रत्यक्ष ज्या शेष वस्तूंचा, माणसें उपभोग घेतात त्यांची वटरास म्हणजे उत्पादन हें जरी खरें असलें, तरी त्या वस्तु त्यांच्या अखेरच्या स्वरूपांत तयार करण्याकरितां, ज्या ज्या गोष्टी अवश्य आहेत व ज्या ज्या पायऱ्यांतून, टप्यांतून जावें लागतें त्या सर्वांचा समावेश 'उत्पादन' या सदरांत करणें अवश्य आहे. प्रत्यक्ष ज्या वस्तु उपभोगिल्या जातात त्यांवरच राहणीचा दर्जा अवलंबून आहे ही गोष्ट खरी. तथापि, त्या तयार करण्यासाठीं अनेक तोरणांखालून त्यांना जावें लागतें. फार दूरच्या खेडेगांवांतून सुखानें येतां यावें म्हणून बांधण्यांत आलेल्या रस्त्यांचे कामीं जे श्रम खर्च झाले, ते सुद्धां उत्पादक आहेत. चांगल्या सडकेमुळें मोटारी जाऊं लागल्या, त्यामुळें दूरच्या खेडेगांवचा भाजीपाला, दुध वगैरे गोष्टी शहरांत येऊं लागल्या. कुंभारानें माती खणली, भट्टी लाविली, विटा केल्या, त्यांचें घर झालें व त्यानें माणसांची राहण्याची गरज भागली. म्हणून नुसते घराचे कामीं झालेले श्रमच उत्पादक असें नव्हे तर कुंभाराचे, लांकूडकाप्याचे, लोहाराचे, नकाशा काढणाराचे, देखरेख करणाऱ्याचें, या सर्वांचेहि श्रम उत्पादक, यांत शंका नाहीं; व तेहि उत्पादनच करीत असतात. वस्तु—उपभोग्य वस्तु—तयार करण्यांतच, त्या सांखळींतच, त्यांचा भाग आहे; आणि अशा व्यापक अर्थानें उत्पादन सारखें चालूच असतें. कांहीं वेळां जास्त जोरानें व कांहीं वेळां मंदाईनें; म्हणून वर लिहिलेल्या सर्व तऱ्हेच्या वस्तु व सोयी उत्पन्न करणाऱ्या श्रमांचा आपण उत्पादन या

सदरांतच समावेश केला पाहिजे. तथापि ज्या वेळेस आपणांस उत्पादनाचा हिशोब करावयाचा असतो, त्यावेळीं एकच गोष्ट दोनदां न मोजली जाईल अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे. उदा०, गहूं, गव्हाचें पीठ, डबल रोटी या सर्वांची बेरीज करूं लागलों तर गहूं तीनदां व पीठ दोनदां मोजलें जाईल. तसेंच अनेक पदार्थ असे आहेत कीं, ते प्रत्यक्ष उपभोगण्याचे अवस्थेपर्यंत, निरनिराळ्या अवस्थांतून जातात. उदा०,—भात, तांदूळ. म्हणून सामान्यतः एखाद्या कारखान्यांत किती उत्पादन झालें हें ठरवितांना वस्तु तयार करण्याचे कामीं उपयोगांत आणलेल्या वस्तूंचा खर्च कमीं करतात. उदा०, कारखान्याला लागणारा कोळसा अगर वीज याचा खर्च कमी करून मग मालाची जी किंमत राहील, तितक्या किंमतीच्या मालाचें उत्पादन झालें; कारण ज्यांची किंमत कमी केली त्या वस्तु त्यांच्या त्यांच्या उत्पादनाच्या कोष्टकांत मोजल्या गेल्या; म्हणजे कोळशाच्या उत्पादन कोष्टकांत कोळसा मोजला गेला, विजेच्या उत्पादन कोष्टकांत वीज मोजली गेली. तसेंच प्रत्येक यंत्राला झीज ही असणार, दुरुस्ती असणार, नवें जुनें करावें लागणार. याही गोष्टी ऐन उत्पादन ठरवितांना कमी केल्या पाहिजेत. कारण या गोष्टी न झाल्या तर कांहीं दिवसांनीं तीं यंत्रे, कारखाने निकामीं होतील; म्हणून केल्या पाहिजेत; पण त्या कांहीं उत्पादन या सदरांत घालतां येणार नाहींत तर उत्पादनाचें कार्य चालू ठेवण्यासाठीं अवश्यक आहेत म्हणून त्यांची किंमत कमी केल्यानंतरच ऐन उत्पादन मोजतां येईल. जसें एकाद्या शेताचें उत्पन्न—पीक—किती हें काढतांना आपण पेरलेलें बीं त्यांतून उणें करतोंच कीं नाहीं! मोठमोठाले कारखानदार, आपल्या जमाखर्चाचा तक्ता तयार करतांना 'घसरा' खर्चाकडे टाकीत असतात. घसरा याचा अर्थ यंत्रें झिजत असतात व कांहीं वर्षांनीं तीं निकामी होतात व त्यांची किंमत शून्य होते ही स्थिति दर्शविणारें गमक दरसाल होणाऱ्या झिजीची किंमत करून ती खर्चखातीं टाकतात. समजा एखादें यंत्र २० वर्षें काम देणारें आहे व त्याची किंमत १००० रु. पर्यंत आहे म्हणजे दरसाल त्या यंत्राची उपयुक्तता ५० रु. नें कमी होत जाते. यंत्रदुरुस्ती, नवे जुनें, यांतहि खर्च होतो. २० वर्षांचे शेवटीं १००० रु. एकदम नुकसान नसावें म्हणून यंत्र निकामी होण्यानें होणारें दरसाल ५० रु. किंवा हजारावरील व्याज अशी रक्कम खर्चीं टाकून जमाखर्च करण्याची एक पद्धत आहे. म्हणून ऐन उत्पादन त्या कारखान्याचें दाखवावयाचें असेल तर, ह्या सर्व गोष्टींची किंमत कमी करावयास हवी हें उघड आहे. देशांत हजारों कारखानें हजारों वस्तु तयार करीत असतात, अनेक सोयी तयार होत असतात; या सर्वांची वटबेरीज करून एकंदर उत्पादन काढणें फार कठीण काम आहे.

वस्तूंची किंमत करून, त्यांची बेरीज करून, इतक्या किंमतीचें उत्पादन या वर्षी झालें असें ठरविणें हा सर्वांत सोपा मार्ग. पण किंमती तरी कोठें कायम आहेत? वर्षावर्षात किंमतींत फरक पडतो. याच्या उलट, आपण सर्व वस्तूंची, मोजणी केली तरीसुद्धां अतिशय अडचण आहे. कांहीं सोयी अशा आहेत कीं त्यांना माप लावणेंच शक्य नाहीं. त्यांची किंमत केली पाहिजे; तरीसुद्धां हें गणित बरोबर होणार नाहीं. कारण सर्व उत्पादन—वस्तु तयार करावयाच्या—तें माणसाच्या गरजेकरितां, सुखाकरितां आणि या सालची गरज दुसऱ्या सालीं निराळ्या स्वरूपांत झाली—सुखाचीच कल्पना अर्थात् वस्तुगत वस्तूंसंबंधीच्या—बदलली तर कसें म्हणावयाचें कीं हें उत्पादन त्यापेक्षां जास्त अगर कमी आहे? दोघांना लावतां येईल असें कोणतें माप आहे? एकाला भजीं आवडतात, तर दुसरा पेढे खाईल या दोघांपासून होणारा आनंद कमी किंवा जास्त कसा मोजावयाचा? ज्या वस्तु या सालीं खूप घेतल्या जात होत्या त्या ५ वर्षांनीं कोणी घेणार नाहीं; मग नुसतें किंमतीचें माप लावून काय फायदा? तथापि कांहींनीं अशी तोड काढली आहे कीं, दरसाल भाव बदलत असले तरी एक संकेत वर्ष धरावें. समजा १९३० साल हें संकेत वर्ष धरलें व त्यासालीं जेवढ्या वस्तु झाल्या, जे उत्पादन झाले, त्यांची किंमत त्या सालच्या भावानें ४०० कोटी रुपये झाली. १९४० सालीं सर्व उत्पादनाची किंमत १९४० चे भावांत ५०० कोटी झाली; पण १९३० चे भावानें केली तर ४४० कोटी होते. तेव्हां १९४० चें उत्पादन १९३० चे उत्पादनापेक्षां मापानें, किंमतीनें नव्हे, १० टक्के (४०० + ४०) जास्त झालें असें समजावें. या पद्धतीनें कमीजास्त प्रमाणांत मापानें—प्रमाणानें उत्पादन काढतां येईल; तरी सुद्धां उपभोग घेणाऱ्यांच्या दृष्टीनें हें बिनचूक आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें माणसांची रुचि, आवडनिवड बदलतें. गेल्या दहा वर्षांत महाराष्ट्रांत पैठणी, मोठे शेले, दिसेनासे झालें; त्यांच्या ऐवजीं हलकीं जरीची लुगडीं आलीं. कॉलेज विद्यार्थ्यांत निदान पुण्यांत धोतर नेसणारा शंभरांत एक सांपडणें कठीण; सर्वत्र 'रुंदट' विजारी झाल्या. घरें सजविण्याच्या पद्धति बदलल्या. पितळेचीं भांडीं कमी होऊन ॲल्युमिनिनयम, चिनीमातीचीं आलीं. आवडीनिवडीप्रमाणें, लोकसंख्येचें स्वरूप बदललें. खेडेगांवची वस्ती कमी झाली, शहरीं वस्ती वाढली.* माणसांची सांपत्तिक स्थिति थोडीच सारखी राहते? लक्ष्मी चंचल, उत्पन्नांत बदल होत जातो; या अनेक गोष्टींमुळें वस्तूंची किंमत कायम राहणें शक्य नाहीं व नव्या नव्या होणाऱ्या सोयींची किंमत तर बदलणाऱ्या परिस्थितीमुळें

---

(* हे चिन्ह दर्शविणारे कोष्टक पुढील पानावर शेवटीं आहे)

करणें कठीण. आजची सोईची गोष्ट उद्यांला निरर्थक होते. तथापि या सर्व अडचणी व मर्यादा ओळखून, उत्पादन किती होतें हें समजणें जरूर आहे. ३० वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत जितकें उत्पादन होत होतें, जितकी मालाची पैदास होत होती, त्यापेक्षां आज खास जास्त आहे. कांहीं आंकडे आपण पाहूं. सन १९०१ मध्यें ब्रिटिश हिंदुस्थानांत एकंदर लागवडीखालीं जमीन १९७·११ दशलक्ष एकर, १९०१–१९१० या काळांतील दरसाल सरासरी काढली तर २०९·३७ दशलक्ष एकर, १९१०–२१ मधील सरासरी काढली तर २२६·३५ दशलक्ष एकर, १९२१–३१ मध्यें २२५·१५ दशलक्ष एकर, १९३१–३४ मधील काढली तर २२९ दशलक्ष एकर. म्हणजे १९०१ ते ३४ या काळांत शेंकडा १० नें लागवडीच्या जमिनींत वाढ झाली. त्याबरोबर १९०१ मध्यें ब्रिटिश हिंदुस्थानची लोकसंख्या २३१·१५ दशलक्ष होती ती १९३४ मध्यें २७५·७५ दशलक्ष झाली. म्हणजे ज्या काळांत लोकसंख्येची वाढ २१ टक्के झाली त्याच काळांत लागवडीची जमीन फक्त शेंकडा १० नी वाढली. १९४६ सालची लोकसंख्या लक्षांत घेतां लागवडीस असलेल्या जमिनीचें प्रमाण गेल्या १० वर्षांत प्रमाणानें वाढले नाहीं. या जमिनींतील पिकाचे जर वर्ग केले म्हणजे अन्न-धान्य, गळिताची पिकें व व्यापारी पिकें म्हणजे कापूस, ताग वगैरे तर या १९०१—

(मागील पानावर * ह्या खुणेनें दर्शविलेले कोष्टक)

## हिंदुस्थानांतील शहरी व खेडुत लोकसंख्येचें कोष्टक

| | गांवे | लोकसंख्या |
|---|---|---|
| एकूण | ६८७, ९८१ | ३१८, ९४२, ४८० |
| १९२१ शहरीं | २, ३१६ | ३२, ४७५, २७६ |
| खेडूत | ६८५, ६६५ | २८६, ४६७, २०४ |
| एकूण | ६९९, ४०६ | ३५२, ८३७, ७७८ |
| १९३१ शहरीं | २, ५७५ | ३८, ९८५, ४२७ |
| खेडूत | ६९६, ८३१ | ३१३, ८५२, ३५१ |
| एकूण | ६५८, ५९५ | ३८६, ६२०, ३५६ |
| १९४१ शहरीं | २, ७०३ | ४९६, ९६, ०५३ |
| खेडूत | ६५५, ८९२ | ३३९, ३०१, ३०२ |

१९३४ सालांत खालीलप्रमाणें लागण झाली असें दिसेल. खाण्याच्या धान्याकडे १९०१ सालीं १८८·१० दशलक्ष एकर जमीन होती. ती १९३३–३४ सालीं २०३·८८ दशलक्ष एकर झाली. गळीत पिकांकडे १९०१ सालीं १३·४६ दशलक्ष एकर होती ती १६·९५ दशलक्ष एकर झाली; व्यापारी पिकांकडे १९·६७ दशलक्ष होती ती २४·४० दशलक्ष एकर झाली. म्हणजे धान्याकडील जमीन शें. १०, व्यापारी पिकांकडील शें. २४ व गळिताकडील जमीन शें. २६ याप्रमाणें वाढ झाली. धान्यांपैकीं भातांत ११ टक्के पण बर्मा भात–पीक कमी केलें तर, वाढ तर नाहींच; उलट भाताची लागवड ३० वर्षांत कमीच झाली आहे, इतर धान्यें वाढलीं. १९ टक्के जास्त जमीन गव्हाकडे वांढली आहे. एकंदर सर्व धान्यांचा हिशोब केला तर ९ टक्के वाढ १९०१–३४ या काळांत झाली आहे. गेल्या तीन वर्षांत म्हणजे बंगाल दुष्काळानंतर अन्नधान्याकडील लागवड थोडी वाढली आहे. 'अधिक धान्य पिकवा' या चळवळीचा थोडा परिणाम झाला आहे. वैरणीची लागवड १९०१ सालीं ३·०३ दशलक्ष एकर होती ती १९३३–३४ पर्यंत १०·२० दशलक्ष एकरांवर गेली आहे. त्याचप्रमाणें जनावरांच्या संख्येंत ७५ टक्के वाढ झाली आहे. विहिरी व कॅनॉलच्या पाण्यानें भिजणारी जमीन १९०१ सालीं ३५·२७ दशलक्ष एकर म्हणजे एकंदर लागवडीच्या जमिनीपैकीं १७ टक्के होती, ती १९३३–३४ सालीं ४८·३६ दशलक्ष एकर म्हणजे एकंदर लागवडीच्या जमिनीपैकीं २१ टक्के झाली. कांहीं विद्वान लोकांच्या मतानें १९०१–१९३० सालपर्यंतच्या काळांत एकंदर उत्पादन ४४ टक्के वाढलें आहे. पण हें चुकीचें आहे. कारण लागवडीची जमीन फक्त १० टक्क्यांनीं वाढली व पाण्याखालचीं जरी १२·५९ दशलक्ष एकरांनीं वाढली असली व जमिनीचा मगदूर, नवीन खतें, नवीन शोधांचा फायदा घेऊन, नवीन बियाणें लावून वाढविला असला तरी, तो कांहीं शें. ५० नें वाढला नाहीं; व शें. ५० वाढला असें धरलें तरी उत्पादन ४४ टक्क्यांनीं वाढत नाहीं. १५ टक्क्यांपेक्षां वाढ झाली आहे असें वाटत नाहीं असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. आपणांस तूर्त एवढाच विचार करावयाचा आहे कीं, १९०१–३४ या काळांत उत्पादन वाढलें कीं नाहीं. आपण नुसत्या शेतीबाबत पाहिलें व तें वाढलें आहे हें निश्चित. तसेंच कापड, अन्य माल, लोखंड वगैरे अनेक वस्तूंची पैदास गेल्या ३०–३५ वर्षांत या देशांत वाढली आहे.

१९०० सालीं हिंदुस्थानामध्यें कापडाच्या गिरण्या १९३ होत्या. त्यांमधून २ लक्ष ६० हजार कामकरी काम करीत असत व ४० हजारांचे वर माग चालत असत. १९१४ सालीं गिरण्यांची संख्या २३१ वर गेली तर १९२४ सालीं ती

३३३ झाली. १९३६ सालीं ३७९ गिरण्या हिंदुस्थानांत होत्या. या गिरण्यांमधून १९०४–५ सालीं ६७८ दशलक्ष वार कापड तयार झालें. १९१३–१४ मध्यें ११६४, १९२४–२५ मध्ये १९७० व १९३६–३७ मध्यें ३५७२, १९४४–४५ मध्यें ४८०२ दशलक्ष वार कापड तयार झालें. तागाच्या उत्पादनाची हीच गोष्ट आहे. १९०३–४ सालीं ३६ गिरण्या होत्या व त्यांतून १६२०० माग चालत असत तर १९१४–१५ ते १९१८–१९ चे दरम्यान सर्वसाधारणपणें ७३ गिरण्या होत्या व त्यांतून ३९७०० माग चालत असत. १९३३–३४ सालीं ही संख्या ९९ वर गेली व त्यांतून ५९५०० माग चालू होते. लोखंडाच्या उत्पादनाची वाढहि बऱ्याच मोठ्या प्रमाणांत झाली. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला लोखंडाचें उत्पादन ३५००० टन होतें तें १९१४ सालीं १६२२८२ टनांवर गेलें. १९२९–३० सालीं हा आंकडा १३७६००० टन व १९३६–३७ सालीं १५५७००० टन होता. अशाच तऱ्हेची वाढ कातडे, कागद, कांच इत्यादी धंद्यांत झालेली आहे. महायुद्धांत उत्पादनाला चालना मिळाली व ते अधिक वाढलें आहे.

हें सगळें वाढलेलें उत्पादन लक्षांत घेतांना आपली लोकसंख्या गेल्या ४० वर्षांत २८ टक्के वाढली आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. हिंदुस्थानांत अगर कोठल्याहि देशांत जें हें उत्पादन होतें, माल तयार होतो, तो किती व्हावा हें कोण ठरवितो; कोणकोणत्या गोष्टींचा यावर परिणाम होतो हें आपणांस पाहिलें पाहिजे व या सर्व गोष्टींचा विचार करणें अत्यंत महत्त्वाचें आहे. समाजाची रचना व समाजांतील संस्था यांच्या स्वरूपावर उत्पादन अवलंबून असतें. समाजाची रचना भांडवलशाही असली तर, उत्पादन कसें होईल हें आपणांस जरूर पाहिलें पाहिजे. कारण एक रशिया देश सोडून दिला तर सर्व जगभर, सर्वसामान्यतः याच भांडवल-शाहीच्या छत्राखालीं उत्पादन चालू आहे; म्हणून भांडवलशाहींतील उत्पादन याचा विचार आपण जरूर करूं. कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यांचा परिणाम कोणत्याहि तऱ्हेची समाजरचना असली तरी, उत्पादनावर व्हावयाचा तो होतोच म्हणून त्याचा विचार प्रथम करूं. पहिली गोष्ट अशी कीं, दैवी आपत्ति म्हणजे महापूर, दुर्भिक्ष्य, धरणीकंप, झंझावात, टोळधाड, योग्य वेळीं पाऊस न पडणें, किंवा जास्त पडणें वगैरे गोष्टींवर मनुष्याची सत्ता नाहीं. योग्यवेळीं पाऊस पडला तर उत्तम पीक येईल, न पडला तर पीक बुडेल अगर कमी येईल. या गोष्टींचा उत्पादनावर जो परिणाम होईल त्याविरुद्ध कांहीं मानवी इलाज नाहींत. कोणत्याहि तऱ्हेची समाजरचना असली तरी याला इलाज नाहीं. दुसरी गोष्ट नवीन

शास्त्रीय शोध. या शोधांनीं गेल्या २०० वर्षांत वस्तु तयार करण्याचे कामीं क्रांति करून टाकली आहे. नवीन शोधांचें ज्ञान ज्या देशांत जास्त व त्यामध्यें जेथें जास्त भर पडत आहे तेथें उत्पादन वाढतें व त्याचा खर्च कमी येतो. समाजरचना कशीहि असली तरी, ह्या गोष्टींचा परिणाम अत्यंत महत्त्वाचा आहे. पैदास वाढविणारा हा देशाचा हितकर्ता आहे; व आधुनिक युगांत यंत्रांची वाढ होत जाणार, नवीन नवीन शोध चालूच राहणार. कोणी कांहीं केलें तरी आतां यंत्रें थंड होत नाहींत व प्रगतीचे कांटे कोणी मागें फिरवूं शकत नाहीं. अधिक अधिक उत्पादन, हाच जगांतील दुःख व विषमता कमी करण्याचा मार्ग आहे व जगाच्या सुखाचें हें महावस्त्र चरख्यावरच्या सुतानें विणून भागणार नाहीं, तें शक्य नाहीं. हें अधिक उत्पादन यंत्रानेंच होणार हें इतिहासाचा ब्रह्मदेव बोलला आहे. तिसरी गोष्ट, उत्पादन हें त्याला अवश्य लागणाऱ्या वस्तूंवर अवलंबून आहे. त्यांना आपण उत्पादनाचे घटक म्हणूं. ज्यांच्यायोगानें अगर ज्यांच्यामुळें एखादी गोष्ट अगर वस्तु घडते त्या सर्व त्या त्या वस्तूंच्या घटक आहेत. उदा०,—कापड ही तयार वस्तु आहे. मी तिचा एकदम उपयोग करूं शकतों; पण कापड तयार करण्याकरितां अवश्य असलेला कापूस, यंत्रें, त्याला लागणारें भांडवल, या सर्व गोष्टी त्याच्या घटक आहेत. वस्तु हें कमळ समजलें तर उत्पादक गोष्टी त्याच्या पाकळ्या आहेत. एक जरी पाकळी कमी होईल तरी तें कमळ पुरें होणार नाहीं. त्याला कमळसुद्धां म्हणतां येणार नाहीं. म्हणून मालाची पैदास---उत्पादन--हें उत्पादनाच्या घटकांवर व त्यांचा उपयोग कसा केला जातो यावर अवलंबून आहे. ज्या अखेरी वस्तु—म्हणजे गिऱ्हाईक एकदम आपले गरजेकरितां ज्यांचा उपयोग करतें—ज्याला आपण उपभोग्य वस्तु असें नांव दिलें आहे, त्यांचा पुरवठा जितका पाहिजे तितका नाहीं. मनुष्यांना अनेक वस्तूंची गरज आहे. पण त्या वस्तूंचा पुरवठा करण्याकरितां ज्या घटकांची जरूरी आहे ते पुरेसे नाहींत म्हणून त्या वस्तु उत्पन्न करणें शक्य नाहीं व म्हणून मनुष्यांच्या गरजा भागविल्या जात नाहींत; व त्यामुळें गारिबी, दुःख, वाईट राहणी वगैरे गोष्टी आपण पाहतों. गरिबांना मुलांकरितां दूध पाहिजे. डॉक्टरांचें म्हणणें आहे कीं मोठ्या माणसाला निदान अर्धाशेर दूध व मुलांना जवळ जवळ तितकेंच अवश्य आहे. पण हिंदुस्थानांत, माणशीं सरासरी ४ औंस सुद्धां दूध पडत नाहीं. हें सरासरी मान झालें. प्रत्यक्ष गरिबांना पाटणा शहरांत '२५ औंस इतकेंसुद्धां दूध मिळत नाहीं; याचें कारण दूध देणाऱ्या गाई व म्हशी पुरेशा नाहींत व त्या पुरेशा नाहींत याचें कारण त्यांना लागणारा चारा नाहीं, त्याकरितां जमीन नाहीं; श्रम करणारीं माणसें नाहींत—म्हणजे दुधाचें

उत्पादन या घटकांचे अभावीं शक्य नाहीं. दुसऱ्या वस्तूंकडे खर्च होणारे श्रम, भांडवल, जमीन कमी करून, दुधाचा पुरवठा वाढविणें म्हणजे त्या दुसऱ्या वस्तूंचें उत्पादन कमी करण्यासारखें आहे. म्हणून कितीहि नवीन शोध लागले, शास्त्रीय प्रगति झाली, तरी उत्पादनाचे घटक ज्या मानानें समाजांत असतील त्या मानानें एकंदर उत्पादन होईल हें निश्चित. नुसत्या श्रम करणाऱ्यांच्या संख्येवर उत्पादन अवलंबून आहे हें खरें नाहीं. काम करणारे, श्रम करणारे हे अनेक घटकांपैकीं एक घटक आहेत. म्हणून नुसत्या माणसांच्या वाढत्या संख्येनें जरी उत्पादन वाढलें तरी उपभोग घेणाऱ्यांची संख्या वाढतेच. म्हणून ती वाढ, सर्वस्वीं वाढ आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. कारण मागें आपण पाहिलें कीं १९०१–३४ पर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानांतील लागवडीस असलेली जमीन शें. १० नीं वाढली पण त्याबरोबर लोकसंख्या शें. २१ नीं वाढली; व त्यामुळें उत्पादनांत निरपवाद वाढ झाली असें म्हणणें बरोबर नाहीं अगर राहणी सुधारली हेंही म्हणणें बरोबर नाहीं. १९०१ सालीं माणशीं लागवडीची जमीन ·८८३ एकर होती व १९३४ सालीं ·८४१ एकर झाली. धान्याकडे असलेली जमीन ·८१८ पासून ·७७४ एकर झाली. यावरून लोकसंख्या ज्या प्रमाणांत वाढली त्या प्रमाणांत लागवडीची जमीन वाढली नाहीं. विद्वानांचे म्हणणें असें आहे कीं, माणसामागें त्याला चांगलें राहतां यावें याकरितां किमान दरमाणशीं २·३ एकर जमीन असावी. यावरून हिंदुस्थानांतील दारिद्र्याची कल्पना येईल. गणितच मांडावयाचें असेल तर, प्रत्येक मनुष्य त्याला जें अन्न लागतें त्याच्या $\frac{1}{3}$ खातो व $\frac{2}{3}$ प्रमाणांत तो उपाशींच राहत असला पाहिजे.

उत्पादनाचे घटक म्हणजे काय हें स्थूल मानानें आपण वर पाहिलें. आतां त्याचा आणखी जास्त विचार करूं. ज्या ज्या गोष्टींमुळें पैदास होते, उत्पादन होतें, त्या सर्व गोष्टी उत्पादनाचे घटक. तथापि एकच वस्तु एक वेळ एका स्वरूपांत घटक व दुसऱ्या स्वरूपांत पूर्ण वस्तु असूं शकते, हें ज्यावेळीं आपण वस्तूंचे वर्ग पाडले त्यावेळीं पाहिलें आहे. उदा०, खाणींतून कोळसा निघाला कीं तो मालकाचे दृष्टीनें उत्पादन झाला, पैदास झाली; व जर त्याचा उपयोग गिऱ्हाइकानें थंडी निवारण्याकरितां शेगडींत घालून केला तर तो सरळ गरज भागवतो म्हणून उपभोग्य वस्तूही झाला. उलट तोच कोळसा गिरणींत इंजिनासाठीं वापरला कीं घटक झाला, उत्पादक वस्तु झाला कारण दुसऱ्या वस्तूचें उत्पादन करण्याचे कामीं त्याचा उपयोग झाला. याच रीतीनें समजा, एक 'गिरण' नुसतें सूतच काढते व दुसरी 'गिरण' त्यापासून कापड तयार करते; तर पहिल्या गिरणींतील सूत हें घटक—उत्पादन घटक, व दुसऱ्या गिरणींतील

कापड ही पूर्ण वस्तु—उपभोग्य—वस्तु होय. तात्पर्य, या तयार करण्याच्या क्रियेंत—उत्पादनाचे सांखळींत—ज्या ज्या वस्तु येतात त्या सर्व उत्पादक घटक अगर उत्पादन घटक व शेवटची शेष वस्तु म्हणजे उपभोग्य वस्तु, जी मनुष्याची सरळ व प्रत्यक्ष गरज भागवते. कांहीं घटक असे आहेत कीं, त्यांवर मनुष्याचा ताबा असूं शकत नाहीं. उदा०, सूर्यप्रकाश, पाऊस. एखाद्या भागांतील हवामान चांगलें असेल तर त्यामुळें पीक चांगलें येतें; व पीक चांगलें येतें म्हणून तेथील जमिनींना किंमतही जास्त. तथापि हा सूर्यप्रकाश किंवा हवामान, ज्यामुळें चांगलें पीक येतें, त्यांना कोणी घटक मानीत नाहीं, तर जमीन हीच घटक समजतात. घटक म्हणजे त्यापासून उत्पादनाचे कामीं होणारा उपयोग. जर उपयोग होत नसेल तर ती वस्तु घटक होऊं शकत नाहीं; उदा०, माणसाचे श्रम हे घटक आहेत; ते उत्पादनाचे कामीं उपयोगी पडतात. श्रम न करणारीं माणसें उत्पादक घटक नाहींत. भांडवलशाहीचे राज्यांत माणसांना किंमत नाहीं, त्यांच्या श्रमांना आहे; व इतर वस्तु लोक जसे पैसा टाकून विकत घेतात त्याप्रमाणें माणसांचे श्रम, मालक—भांडवलवाले—विकत घेत असतात. खाटीक ज्याप्रमाणें बाजारांत गाय जाडजूड पाहून विकत घेतो, ती किती दूध देते याकडे तो पाहत नाहीं, त्याप्रमाणें भांडवलशाहींत मनुष्य किती श्रम करील व ते कसे परवडतील यांकडे दृष्टि असते. त्यांच्यांतील माणुसकीचा विकास कसा होईल याकडे तीं कधींही नसते. गुलामांचे बाजारांत पूर्वी गुलाम कामास किती उपयोगी पडेल हें पाहून त्याची किंमत ठरत असे. हल्लींची ही नवीन सुधारलेली गुलामगिरी आहे. तात्पर्य, उत्पादन ही क्रिया, हें काम, माणसांचें नाहीं, त्यांच्या श्रमांचें आहे. मजुरांचा पुरवठा असें जेव्हां आपण ऐकतों तेव्हां त्याचा अर्थ मजुरांची संख्या नव्हे तर त्यांचे श्रम, जे लागतील अगर लागले असतील. इतके कामाचे तास, श्रमाचे तास, नुसते उभे राहण्याचे नाहीं, हे विसरतां कामा नये. कारण यंत्रें हीं त्याचप्रमाणें २४, १६, अगर ८ तास दिवसां व रात्रपाळीनें अखंड काम करीत असतात. म्हणून जी भाषा निर्जीव यंत्रांना, तीच भाषा सजीव मानवयंत्रांना !! कारण, भांडवलशाहीचे व्याकरणांत मजूर ही एक यंत्रासारखी निर्जीव वस्तु आहे !! कांहीं घटक असे असतात कीं त्यांचा उपयोग जसा पाहिजे तसा कमीजास्त करतां येतो; कांहींचा निश्चित त्यांत फरक होत नाहीं उदा०, कापूस १ शेर असला तर त्याचें सूतही ठराविक वजनाइतकेंच निघेल. उलट जमिनींतील पीक कमीजास्त होऊं शकेल. रेडियोवर बोलणारा, लाखांसाठीं, कोटीसाठीं, सर्व जगासाठीं गाऊं शकेल, बोलूं शकेल व कितीही ऐकणारे वाढले तरी त्याला कांहीं जास्त श्रम करावे लागत नाहींत. तसेंच एखाद्या उद्योग-

धंदेवाल्यास किंवा योजकाला १० टन माल काढतांना जेवढे मनाचे श्रम पडत असतील तेवढेच १०० टन काढावे असें ठरवितांनाही पडतील. त्याचा दुसरा निर्णय उत्पादन जास्त वाढवील पण त्यामुळें त्याचे मनाला श्रम कांहीं जास्ती पडणार नाहींत. ज्याला १०० रुपयांची प्रॉमिसरी नोट लिहून द्यावयाची आहे त्याला जितकी व जेवढी सही करावी लागेल तेवढीच सही व श्रम १०००० रुपयांची देतांना करावे लागतील. आगगाडींत थोडीं माणसें बसलीं काय किंवा तितक्याच डब्यांत जास्त बसलीं काय तरी एंजिनाला कांहीं जास्त कोळसा लागत नाहीं. कांहीं घटक असे असतात कीं, त्यांचा १०० टक्के उपयोग होतो व कांहींही वायां जात नाहीं. उदा०, पूल, रस्ते वगैरे, जसे कांहीं योगीच जनतेसाठीं अहोरात्र सेवा करणारे सज्जनच!!' असो, आपण प्रत्यक्ष घटक व त्यांचा उत्पादनाचे कामीं होणारा उपयोग हा फरक लक्षांत ठेविला पाहिजे. मजूर, जमीन, सर्व तऱ्हेच्या उत्पादक वस्तु, कीं ज्यांपासून उपभोग्य वस्तु तयार होतात अशा सर्वांना वरील फरक लक्षांत ठेवून उत्पादनाचे घटक म्हणूं.

अर्थशास्त्रांतील, व्यवहारशास्त्रांतील विद्वान् लोकांनीं या उत्पादन घटकांचे तीन वर्ग अगर तीन प्रकार केले आहेत. (१) जमीन (२) श्रम (माणसांचे) (३) भांडवल. ही वर्गवारी अथवा वांटणी अगदीं निर्दोष आहे असें नाहीं; पण फार काळापासून चालत आलेली आहे. प्रत्यक्ष गिरणींत काम करणारा मजूर, लांकडे कापणारा अरकस, कॉलेजांत शब्दांचा कीस काढणारा प्रोफेसर, कलागतीवर व्यापार करणारा वकील, ऑपरेशन करणारा डॉक्टर व ऑफिसांत काम पाहणारा मोठा पगारवाला 'मॅनेजर' हे सर्व श्रम करणारे या सदरांत येतात!! खरोखर पुष्कळ वेळां जमीन ही भांडवल असते. उदा०, कारखान्याखालच्या जमिनी, गोदींतील जमिनी, रेल्वेखालच्या जमिनी, या भांडवलच होत व हिशोबांत तसेंच दाखवितातहि. तसेंच दुकानें, टायर्स, तेलाचे डबे, मोटारलॉऱ्या, हे व असे अनेक जिन्नस व्यवहारांत भांडवल समजले जातात. तात्पर्य ही जी तिरंगी वांटणी केली आहे ती कांहीं निर्दोष नाहीं. कांहीं असें म्हणतील कीं, जमीन ही परमेश्वराची, सृष्टीची देणगी आहे, ती कुठें माणसांनीं केली? तेव्हां ती अर्थात् भांडवलापासून निराळी. भांडवल हें माणसांनीं तयार केलेलें. तसेंच जमीन म्हणजे अगदीं आद्य, 'अस्सल' व अव्वल गोष्ट कीं ज्यापासून सर्व निर्माण झालें. तथापि नुसती जमीन कांहीं करूं शकत नाहीं; कांहीं उत्पन्न देत नाहीं. तिजवर कष्ट करावे लागतात, घाण काढावी लागते; बांधबंदिस्ती करावी लागते, तेव्हां पीक येतें; व तींत आणखी भांडवल घालून तिच्या पिकाचा मगदूर वाढवितां येतो;

जसें भांडवल वाढवितां येतें तसें जमिनीचे पीक, मगदूरही वाढवितां येतो. सृष्टींतील मूळ जमीन व हल्लीं लागवडीस असलेली जमीन यांत कितीतरी फरक आहे. व तो मनुष्याच्या श्रमांमुळें, तिजवर खर्च केलेल्या भांडवलामुळें झाला हें उघड आहे. म्हणून एका अर्थानें जमीन ही सुद्धां भांडवलच आहे. तसेंच मजुरांच्या बाबतींतहि त्यांची शक्ति वाढवितां येते. त्यांना शिक्षण देऊन त्यांची माल पैदास करण्याची शक्ति वाढवितां येतें. व त्यांना शिक्षण देण्याकरितां करावा लागणारा खर्च, हें एक गुंतवलेलें भांडवलच. जशी जमीन ही जास्त मगदुराची करतां येते तसें जमिनीच्या पोटांतून काढण्यांत येणाऱ्या पदार्थांच्या प्रमाणांत मात्र भर टाकतां येत नाहीं. उलट जसा खाणींतून माल काढला जाईल तितक्या प्रमाणांत तो कमीच होतो. कांहीं वर्षांनीं जगांतील कोळसा, लोखंड वगैरे खनिज पदार्थांच्या खाणी खलास होतील हें निश्चित. तात्पर्य जमीन ही एक अशी विचित्र वस्तु आहे कीं जिच्या पाठीवर माणसानें यंत्रानें अगर साध्या नांगरानें खरवडलें तरी एकपट बीं घेऊन ती अनंतपट देतें व त्यांतील कांहींही पोटांत घेत नाहीं; व पोटांतील माणसानें फाडून घेतलें तरी, आपलें अनंतपटीनें परत करण्याचें सौजन्य कमी करीत नाहीं!! जमीन एका कवीनें वर्णन केल्याप्रमाणें असें कूळ आहे कीं एक दाणा घेऊन थोड्या महिन्यांत हजार पटीनें त्याची फेड करते!! पुन्हां आपण व्यवहाराकडे येऊं. जमीन, मजूर, भांडवल, हे जे वर्ग केले आहेत ते आपल्या विवेचनाला पुरेसे नाहींत. जमीन आपण एकरानें मोजतों पण एका एकरांत जें पीक निघेल, तितकेंच अगदीं शेजारच्या दुसऱ्या एकरांत निघेल असें नाहीं. म्हणून एखादा एकर गहूं जास्त लावला तर काय परिणाम होईल हें निश्चितपणें सांगणें अवघड होतें. तीच अडचण मजुरांचे बाबतींत आहे. दक्षिणी सुतार, काठेवाडी सुतार, चिनी सुतार, यांत प्रत्येकाचें काम सारखें नाहीं. दक्षिणी सुतार अंगावर काम दिलें कीं वाईट काम करील, रोजानें दिलें तर निम्मा वेळ 'फरशी'ला धार लावण्यांत घालवील. उलट, चिनी, काठेवाडी सुतार, बरोबर ठरलेले तास असतील त्यांत हयगय न करतां काम करतील. त्याचप्रमाणें कच्चा माल, यंत्रें वगैरे बाबतींत अनेक प्रकार व प्रति असतात. म्हणून निव्वळ १० टन जास्त माल घातला म्हणजे वाटेल त्या प्रतीचा माल निघेल असें नव्हे. तात्पर्य, उत्पादनाचे कामीं विचार करतांना भोंगळपणा नसावा. या दृष्टीनें हे तीन वर्ग जे पाडले आहेत ते बरोबर नाहींत पुरे नाहींत; म्हणून आपल्या विवेचनांत जितका सारखेपणा व पक्केपणा आणतां येईल, तितका आपण आणूं. त्यामुळें उत्पादन घटकांचे वर्ग तीनपेक्षां जास्त पडतील. आपल्याला विषय समजला पाहिजे. मुलानें भूक लागली म्हणून आईजवळ खावयास

मागितलें व त्याचें तें वाक्य व्याकरणाचें नियमानें चुकलें, म्हणून आईला तें समजत नाहीं असें नाहीं व आई त्याला खावयास देत नाहीं असेंही नाहीं. आपल्याला हा सर्व चालू जगाचा व्यवहार चांगला समजून घ्यावयाचा, त्याशिवाय आमच्या अवनतीचें, दारिद्र्याचें कारण समजणार नाहीं म्हणून जास्त प्रकार अगर वर्ग, आपण उत्पादन घटकांचे पाडले तरी हरकत नाहीं. एकजिनसी जमीन; एकजिनसी श्रम करणारा मजूर, एकजिनसी उत्पादक पदार्थ, असे अलग करून त्यांना उत्पादक घटक म्हणणें सोईचें होईल. तसेंच हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं एकाच उत्पादन घटकाचे निरनिराळे उपयोग होऊं शकतात, उदा०, ग्यानबा हा बुधवारांतील मजूर आहे. हातांत कुंचला घेऊन तो घर रंगवूं शकतो, उद्यां गवंड्याच्या हाताखालीं तो विटा देईल, परवां चुन्याची घाणी चालवील; हीं सर्व कामें करणारा ग्यानबा एकच आहे. समजा रंगाऐवजीं गवंड्याचा गडी म्हणून काम करूं लागला तर, आपल्याला असें म्हणतां येईल कां कीं, मजुरांचा पुरवठा कायम राहिला ? कां असें म्हणतां येईल कीं, रंग देणारा मजूर एक कमी झाला व गवंड्याच्या गड्याची मजुरी करणारा वाढला ? आपण जर सर्व मजूर हा एकच वर्ग धरला तर ही आपत्ति येते म्हणून वर लिहिल्याप्रमाणें जेवढे सारखे एकजिनसी वर्ग करतां येतील तेवढे करावे. मग वरच्या उदाहरणांत आपणांस असेंच म्हटलें पाहिजे कीं रंग देणारे मजुरांत एक कमी झाला व दुसऱ्या प्रकारांत एक वाढला. तसेंच, जमिनीच्याही बाबतींत; तिच्यांतील पीक बदलतां येतें. धान्यादिक पीक बंद करून व्यापारी पीक, कापूस वगैरे लावतां येतें. तात्पर्य बहु-उपयोगी जे उत्पादन-घटक असतात त्यांचा विचार करतांना सारख्या सारख्या उपयोगांच्या वस्तूंचा एक गट करणें जरूर आहे. अन्न धान्य लागवडीच्या जमिनी, व्यापारी पिकाच्या जमिनी, गळित धान्याच्या जमिनी वगैरे. विवेचनाला ही वर्गवारी सुलभ जाते.

आतांपर्यंत कोठल्याहि तऱ्हेची समाजरचना असली तरी, ज्या गोष्टींचा उत्पादनावर परिणाम होतो त्यांचा आपण विचार केला. आतां भांडवलशाहीच्या व्यवस्थेंत उत्पादन कसें होतें याचा विचार करावयाचा आहे. आपण आज एकंदर व्यवहाराकडे पाहूं लागलों म्हणजे पूर्वीपेक्षां किती बदल झाला आहे हें दिसतें. कापडाचेंच उदाहरण घेऊं. एकच मनुष्य कापूस पिंजी, सूत काढी व तोच अगर त्याच्या कुटुंबांतील माणसें तें विणीत व पुन्हां तोच तें कापड विकी. म्हणजे पैदाशीच्या—उत्पादनाच्या सर्व क्रिया, संस्कार एकहातीं असत. आज त्याच कापडाच्या बाबतींत पाहिलें तर कापूस स्वच्छ करून त्याच्या गांठी करणारा एक कारखाना, त्या कापसाचें

सूत करणारा दुसरा कारखाना व सुताचें कापड तयार करणारा तिसरा कारखाना अशी स्थिति दिसते. पदार्थांचे सुटे भाग असतात व प्रत्येक भाग एकेका कारखान्यांत होऊन, सर्व भाग एका कारखान्यांत जोडून पूर्ण वस्तु तयार होत असते. मोटारीचें उदाहरण घेऊं. टायर्स एका कारखान्यांत, त्यांतील गाद्या व इतर जिनसा दुसरीकडे, यंत्रांचे कांहीं भाग तिसरीकडे व हा सर्व माल एके ठिकाणीं आणून जोडून गाड्या तयार करतात. अर्थात् कांहीं कारखाने असे आहेत कीं, सर्व घटक तेथेंच तयार होतात; उदा०, फोर्डसारखें. तात्पर्य, पूर्वीपेक्षां जास्त जास्त कामाची विभागणी, श्रमांची विभागणी, हल्लींचे जगांत आहे. आजहि चांभार कच्चें कातडें कमावतात, जोडेहि तयार करतात व विकतात. तसेंच कांहीं सुतार लांकूड विकत घेऊन फर्निचर करतात तर कांहीं निव्वळ मजुरीनें तें करतात. तथापि एकच मनुष्य, कच्चा माल तयार करून, तो पुरा करून विकणारा, हल्लींच्या यंत्रयुगांत अगदींच कमी. उलट एकाच कारखान्यांत निरनिराळ्या कामांवर निरनिराळीं माणसें असून तीं आपआपल्या कामापुरतीं हुशार होतात. हें श्रमविभागाचें, कामाच्या वांटणीचें तत्त्व, मोठ्या प्रमाणावर, हल्लीं चालू आहे. समजा, आपण एखाद्या रेल्वेच्या कारखान्यांत गेलों, तर कांहीं माणसें फिटरचें काम करीत असतील, कांहीं लांकूड काम, कांहीं जोडण्याचें काम, तर कांहीं ओतण्याचें काम करीत असतील. समजा, एक चाक तयार करावयाचें आहे. भट्टींतून तें ओबडधोबड निघालें कीं लागलीच दुसऱ्या खात्यांत तें जातें, तेथें यंत्रानें तें कानसलें जातें. नंतर तिसऱ्यां खात्यांत गेलें कीं पॉलिश होतें; अशा अनेक खात्यांतून जात जात शेवटीं तें पक्कें तयार होतें. हें एका कारखान्याचें उदाहरण दिलें. कांहीं बाबतींत निरनिराळ्या कारखान्यांतून जावें लागतें तेव्हांच एखादी वस्तु पूर्ण होतें. हातरुमाल मी बुधवारांत 'सेंट्रल स्टोअर 'मध्यें घेतला, पण त्याच्या मालकानें ज्या गिरणींत तो तयार झाला, त्याच्या सोल एजंटाकडून तो घेतला; त्यानें गिरणीवाल्याकडून; ज्या सुतापासून तो झाला तें सूत दुसऱ्या गिरणीवाल्याकडून आलें. त्या सुताचा कापूस स्वच्छ होऊन दुसऱ्या जिनिंगच्या कारखान्यांतून आला. अशा अनेक कारखान्यांनीं सहकार्य केलें तेव्हांच हा हातरुमाल मला मिळाला. यांत वाहतूक, रंगारी, जाहिरातखातें वगैरे गोष्टी आपण विचारांत घेतल्या नाहींत. याचा अर्थ हल्लीं उत्पादन हें भागाभागानें होतें व प्रत्येक भाग तयार करण्यांत एक एक कारखाना आपलें खास काम समजतो व दुसरें काम त्यांत क्वचितच होतें. हें ( Specialisation ) 'खास कसब' अगर 'वैशिष्ट्य' पण पूर्वीपेक्षां खूप मोठ्या प्रमाणावर वाढलें आहे. जुन्या काळांत कामाची वांटणी होती. कांहीं लोक शेती, कांहीं शिपाईगिरी, कांहीं विणकाम,

कांहीं व्यापार तर कांहीं शिकवण्याचें काम करीत. पण हल्लीं यंत्रयुगामुळें हें एकच भाग तयार करण्याचें प्रमाण ज्याला आपण 'खास कसब' अगर 'खासपण' म्हणूं, तें वाढले आहे. प्राचीनकाळीं ऋषि स्नानास जाण्यापूर्वी धान्य पेरीत व परत येतांना पीक काढून नेत असें सांगतात. जेव्हां लोक थोडे, गरजा थोड्या, तेव्हां एकच कुटुंब आपल्या गरजा, अन्नवस्त्रादिकांच्या भागवूं शकत होतें. आतां लोकसंख्या बेसुमार ! असें असतां जर कोणी म्हणेल कीं, माझें अन्न मीच उत्पन्न करीन, माझें वस्त्र मीच तयार करीन, त्याचा कापूसहि मीच पिकवीन, माझ्या सर्व गरजा मीच भागवीन, पायींच चालत काशीस जाईन, तर हें कठीण आहे. मनुष्य, कुटुंब किंवा गांव, हें सर्वस्वीं स्वावलंबी होऊं शकत नाहीं. इतकेंच काय मोठमोठाले देश, ज्यांत उद्योगधंदे खूप वाढले आहेत असे देशसुद्धां, पूर्णपणें स्वावलंबी होऊं शकत नाहींत. मग लहान अगर मागासलेल्या देशांची गोष्टच सोडा ! आणि हट्टानें एखाद्या देशानें असा प्रयोग केला तर कमी दर्जाची राहणी पत्करून सरासरी जिवंत राहणें भाग होईल. तथापि असा प्रयत्नहि कोणी करणार नाहीं. या कामाच्या वांटणीमुळें, श्रमविभागणीचे तत्त्वामुळें, मालाची पैदास वाढली, तिचें प्रमाण वाढलें हें उघड आहे. अर्थात् ही वाढ नुसत्या या श्रमविभागणीमुळें झाली असें म्हणणें चुकीचें आहे. नवीन शोध, नवीन यंत्रे, त्यांच्यांत होत असलेली सुधारणा, शास्त्रांची प्रगति, यामुळें उत्पादनाचे वाढीवर सर्वांत मोठा परिणाम झाला आहे. उत्पादन वाढलें म्हणजे भांडवलहि वाढतें; व तें जसें वाढतें तसें उत्पादनहि वाढतें हें विसरतां कामा नये. पदार्थांचा एक एक भाग तयार करावयाचा म्हणजे, तेवढ्या कामाकरितां नवीन व खास यंत्रें, खास कारखाना, खास व्यवस्था म्हणजे अधिक भांडवल, व तें झालें कीं अधिक उत्पादन, याप्रमाणें हा क्रम चालत आला आहे. नवीन शोध लागला, यंत्रांत प्रगति झाली कीं लागलीच नवीं यंत्रें, कीं लागलीच अधिक पैदास ! याप्रमाणें श्रमविभाग, यंत्राविषयीं ज्ञानाची प्रगति व अधिक भांडवल, या त्रिवेणीसंगमानें पैदाशीचा ओघ फार मोठा होत चालला आहे हा जगाचा अनुभव आहे.

वर 'खासपणा' अगर 'तज्ज्ञपणा' हल्लींचे उत्पादनांत आला आहे असें सांगितलें व तो श्रमाची वांटणी केली म्हणून येत गेला हें उघड आहे. माणसाला चार कामें करावयास सांगण्यापेक्षां एक काम करावयास सांगितलें तर तो, तें चांगलें व जास्त करील. आपण पाहतों कीं कांहीं डॉक्टर डोळ्यांचे तज्ज्ञ, कांहीं बालरोगांचे वगैरे. त्याचप्रमाणें एखाद्या वस्तूचा एकच भाग एका कारखान्यांत तयार केला किंवा एका मजुरानें तो तयार केला तर, तो त्या मानानें जास्त प्रमाणावर तयार होईल. आपण

एक उदाहरण घेऊं; प्रथम तज्ज्ञपणाचें—खासपणाचें—घेऊं. एक इसम २ तासांत २० पतंग तयार करतो पण ते विकण्यास त्याला ६ तास लागतात; कारण गिऱ्हाईक कसें गटवावें, पोरांना आवाज काढून कसें खुलवावें, केव्हां विकण्यास जावें, ही कला त्याला माहीत नसते; व त्यामुळें सर्व पुण्याभर हिंडावें तेव्हां ६ तासांत २० पतंग खपतात. दुसरा इसम २० पतंग करण्यांत ६ तास घालवितो; कागद कापणें, कामट्या आणणें व कापणें, खळ करणें, चिकटवणें वगैरे त्याला लवकर जमत नाहीं, तो हाताचा जड आहे. पण त्याचें 'तोंड' फार गोड. अवघ्या २ तासांत तो ते वीसही पतंग खपवितो. आतां समजा, दोघे एक झाले व सहकार्यानें काम करण्याचें त्यांनीं ठरविलें तर काय होईल हें आपण पाहूं. दोघेही ८ तास पूर्वीप्रमाणेंच काम करतील. पहिला जो हाताचा हुशार कारागीर आहे, तो ८ तासांत ८० पतंग तयार करील व दुसरा जो 'तोंडाचा' मिठ्ठास आहे तो आठ तासांत ते सर्व विकील. याचा अर्थ प्रत्येकानें पतंग तयार करणें व विकणें या दोन्ही गोष्टी न करतां श्रमविभागणी केली व त्यामुळें त्यांच्या खासपणाला, तज्ज्ञपणाला वाव मिळाला व परिणाम, पैदास दुप्पट व प्राप्ति वाढली. तसेंच एखादा इसम कुशल असला तरी, एखाद्या गोष्टींत तो विशेष हुशार असतो; ती त्याची 'स्पेशॅलिटी' 'खास बाब' असते व याही कामीं जर श्रम-विभागणीच्या तत्त्वाचा उपयोग केला तर पैदास वाढण्याकडेच त्याचा परिणाम होतो. उदा०, एक चांभार कारागीर एका आठवड्यांत ८ चपला जोड अगर ४ पिशव्या तयार करूं शकतो, पण प्रत्यक्ष ४ चपला जोड व २ पिशव्या करतो. दुसरा चांभार कारागीर १० चप्पल जोड अगर १० पिशव्या करूं शकतो पण प्रत्यक्ष प्रत्येकीं ५ करतो. दोघे एक झाले व दुसऱ्यानें आठवडाभर पिशव्याच केल्या म्हणजे त्या १० झाल्या व पहिल्यानें चप्पलांचे जोड केले ते ८ झाले. पूर्वीं निरनिराळें काम करीत होते तेव्हां दोघांचे चपला जोड ९ व पिशव्या ७ होत होत्या; आतां श्रमविभागणी करून एकानें पिशव्या व एकानें चपला केल्या व त्यायोगें पैदास वाढविली व याला कारण श्रमविभागणी व ज्याला जें 'खास' करतां येत होतें तें करण्यास दिलें. म्हणून हें श्रम-विभागाचें व 'खास' काम करून घेण्याचें तत्त्व उत्पादनांत हल्लीं सर्वत्र लागू असून देशांतील व देशाबाहेरील व्यापारांत सुद्धां त्याचा अवलंब करण्यांत येत आहे.

आतां आपणांस ही जी शक्ति, एखादी गोष्ट अगदीं 'खास' अगर 'स्पेशॅलिटी' म्हणून असते ती कांहीं वेळां जन्मतः देवाची देणगी म्हणून, कांहीं ठिकाणीं शिक्षणानें, अनुभवानें प्राप्त झालेली असते. व या श्रमविभागणीचें, कामाचे वांटणीचें तत्त्व स्वीकारलें म्हणजे ज्याला जें चांगलें करतां येत असेल तिकडे त्याची योजना करतां येतें;

शिवाय सुरवात जरी सामान्य कारागीर म्हणून केली तरी फार काळ तेंच काम करीत-गेल्यानें व मिळणाऱ्या शिक्षणानें साहजिकच अंगीं तज्ज्ञपणा येतो. श्रमविभागणीमुळें अनेक गुणांना पुष्कळ धंदे झाल्यामुळें वाव मिळतो. अर्थात् जेथें प्रत्येक कुटुंब अगर मनुष्य त्याला जें पाहिजे तें तयार करीन म्हणेल तर हें शक्य नाहीं. तथापि कुटुंबांतल्या कुटुंबांतही गुणपरत्वें श्रमविभाग होणें शक्य आहे. मात्र मोठ्या प्रमाणांत श्रमविभाग व गुणविकासाला वाव हल्लींच्या यंत्रयुगांतच शक्य झाला आहे. जसा मनुष्य एखाद्या कामांत तज्ज्ञ होतो, कमाल हुशार होतो त्याचप्रमाणें जमिनीच्या बाबतींत सुद्धां पिकांची विभागणी करून ज्या जमिनी ज्या पिकांना जास्तींत जास्त चांगल्या व ज्यास्तींत ज्यास्त पीक देणाऱ्या, अशा निवडून काढून, त्याप्रमाणें पिकें काढण्यांत येतात. उदा०, भातजमीन, बागाईत जमीन, कापसाचे लागवडीस जरूर असलेली काळी जमीन. शिवाय नवीन खतें घालून, नवीन पद्धतीनें लागवड करून कमाल मगदूर वाढविला जातो व अशी योग्य विभागणी केली तर उत्पादनही वाढतें. जर असें केलें नाहीं, जमिनीचा कस (मगदुर) न पाहतां, हवापाणी न पाहतां कोणी बिनडोक्यानें काम करूं लागला तर नुकसानच होणार. कोंकणांत जर कोणी म्हणेल उंसाची लागवड करून गूळ अगर साखर तयार करावयाची व देशावर पोफळीचे व नारळीचे बाग लावून मोठ्या प्रमाणावर पैदास करावयाची, तर त्याला आपण मूर्खांतच काढूं. फक्त पांडुरंग-भक्त तुकारामच असला व्यापार करूं जाणे; कारण असें म्हणतात कीं तुकारामबोवा देशावर मीठ विकत घेऊन तें कोंकणांत विकावयास नेत व तेथें गूळ घेऊन देशावर आणीत. आपणांस 'तुकाराम' व्हावयाचें नाहीं, तर व्यवहार करावयाचा आहे. प्रपंच करून सुखी व्हावयाचें आहे, करंटें रहावयाचें नाहीं. म्हणून ज्या पिकाला जी जमीन लायक तींत तेंच पीक काढलें पाहिजे. हें एक श्रमविभागणीचेंच तत्त्व आहे व या मार्गानें पैदास, उत्पादन, वाढत असतें. देशभागांत मुद्दाम ताली बांधून, पाणी अडवून, भात करूं म्हणेल तर तें पीक थोडें व महाग पडेल. उलट भातजमिनींत जेथें खूप पाऊस पडतो तेथें बाजरी करूं म्हणेल, तर होणार नाहीं व झाली तरी थोडी. तेव्हां भात-जमिनींत भात, देश भागांत ज्वारी, बाजरी. ज्याला ज्याची गरज लागते ती वस्तु अदलाबदलीनें अगर स्वतंत्रपणें एक विकून तिच्याबदली दुसरी विकत घेतां येते; या यथायोग्य लागवडीमुळें—एक प्रकारच्या श्रमविभागणीमुळें—पैदास वाढलेली आहे. हीच गोष्ट उदाहरणानें सांगतां येईल. समजा, एका एकरांत ५०० शेर गहूं होतो व १०० शेर हरबरा होतो, दुसरा एक एकर असा आहे कीं ज्यांत ५०० शेर हर-बरा व १०० शेर गहूं होतो. जर पहिल्यांत नुसते गहूं लावले तर १००० शेर गहूं

येतील व दुसऱ्यांत नुसता हरबरा लावला तर १००० शेर हरबरे येतील, तर तशी लागवड केल्यास पूर्वी जे ६०० शेर गहूं व ६०० शेर हरबरा येत असे, त्याऐवजीं १००० शेर गहूं व तितकाच हरबरा आतां येईल. अर्थात् त्यांत आपण दोन्ही वेळां खर्च सारखाच लागेल, असें धरलें आहे, फरक जो होतो तो जमिनीच्या गुणामुळें; म्हणून जेथें तेथें यथायोग्य लागवड होणें जरूर आहे. आज आपल्या महाराष्ट्रांत पाहिलें तर, प्रथम जमिनीचे येवढाले लहान तुकडे झाले आहेत कीं म्हणण्यासारखे त्यांत कांहींच उत्पन्न होत नाहीं. महाराष्ट्र व कर्नाटकामध्यें ५ एकरापर्यंत ज्यांची जमीन आहे अशा शेतकऱ्यांची संख्या १०,१३,४६५ असून त्यांची एकूण जमीन २२,६२,४८४ एकर आहे. कोंकणांत २३ टक्के खातेदारांची शेती एक एकरापेक्षां कमी आहे. पंजाबमध्यें १८ टक्के खातेदारांची जमीन १ एकरापेक्षां कमी व ५५ टक्के खातेदारांची जमीन ५ एकरापेक्षां कमी. मलबारमध्यें ३४ टक्के खातेदारांची जमीन १ एकरापेक्षां कमी. शेतकी कमिशनचे रिपोर्टाप्रमाणें मद्रास ४·९ एकर, बंगाल ३·१, बिहार ३·१, आसाम ३·०, संयुक्तप्रांत २·५, मुंबई १२·२ याप्रमाणें खातेदारामागें सरासरी जमीन पडते. जमिनीच्या याप्रमाणें चिंध्या झाल्या असूनसुद्धां, लहानशा शेतांत पुन्हां सर्व प्रकारचें पीक काढण्याकडे सर्वांचा कल व त्यामुळें एकंदर पैदास आणखी कमी होणें साहजिक आहे. नुसत्या या लहान लहान वांटण्यांमुळें जे बांध—वांटणीचे बांध—घालावे लागले आहेत त्यांपायीं लाखों एकर जमीन वायां गेली आहे व भांडणापायीं कज्जेदलाली लक्षपटीनें वाढली आहे. समजा, यथायोग्य लागवडीचें तत्त्व अंमलांत आणलें तर काय होईल? एका गांवाचेंच उदाहरण घेऊं. ज्या बागायती जमिनी आहेत त्यांचा एक गट व ज्या जिरायती जमिनी आहेत त्यांचा एक गट केला. ज्या बागायती गटांत जेथें जे पीक उत्तम व जास्त येईल तेथें तें लावणें, त्याचप्रमाणें अन्य जमिनींत. असें झाले तर उत्पन्न वाढल व माणसांचे बरेंच श्रम वांचतील. पण हें सर्व हल्लीं ज्या पद्धतीनें सर्वच व्यवहार चालला आहे तेथें शक्य नाहीं, असें करावयाचें म्हणजे सर्व योजनापूर्ण झालें पाहिजे. देशांतील सर्व लोकांच्या गरजा काय आहेत या नोंदल्या पाहिजेत. त्यांना किमान राहणीला काय अवश्य आहे याचें कोष्टक झालें पाहिजे व मग तितका माल तयार करावयाला किती कारखाने, किती व कशी जमीन, किती कारागीर, किती मजूर, किती भांडवल लागेल याचें 'एस्टिमेट', अंदाजपत्रक झालें पाहिजे. जें कमी पडत असेल तें परदेशांतून आणावयाचें तर त्यांना परत काय द्यावयाचें याचा नकाशा तयार झाला पाहिजे. अर्थात् हा योजनाबरहुकूम पैदाशीचा मोठा प्रश्न आहे व निराळ्या ग्रंथांत त्याचा विचार केला

पाहिजे. आज एवढच पहावयाचें आहे कीं, यथायोग्य लागवडीनें—एक प्रकारें श्रमविभागणीनें—पैदास वाढते. श्रमविभागणीनें पैदास फार मोठ्या प्रमाणावर करतां येते हें तर आपण आज यंत्रयुगांत पाहात आहोंत. अरकसांची एक जोडी जितकें लांकूड कापील त्याच्या कितीतरी पटीनें लांकूड कापण्याची गिरणी हे काम करते; त्या कारखान्यांतसुद्धां, एकानें आंखावयाचें, दुसऱ्यानें मापाप्रमाणें करवत बसवावयाची वगैरे ठिकठिकाणीं श्रमविभागणी आहेच. यंत्रांतील प्रत्येक भागाकडे काम करणारा एक एक निराळा, त्यामुळें तो हुषार होतो व मोठमोठीं यंत्रें कामावर आणतां येतात. यंत्रयुगानें व श्रमविभागणीनें मोठया प्रमाणावर पैदास होऊं लागली आहे. हें जर श्रमविभागणीचें तत्त्व आलें नसतें, तर आज जगांत ज्या सुधारणा दिसतात व जो हजारों वस्तूंचा पुरवठा दिसतो तो दिसला नसता. मला गातां येत नाहीं, पण ताबडतोब फोनो लावून मी मनोरंजन करूं शकतों; कारण गाणाऱ्या तज्ज्ञांचीं गाणी रेकॉर्ड झालेलीं आहेत. आज या देशांतील पदार्थ त्या देशांत सर्वत्र जात आहेत. जेथें जी वस्तु पिकत नाहीं तेथें ती वस्तु सुद्धां मिळते. याचें कारण श्रमविभागणीनें झालेली पैदाशीची प्रगती होय. आज क्वेट्याचीं द्राक्षें, मलबारचे नारळ, खानदेशी तूप, जावा साखर, सगळ्या गोष्टी पुण्याच्या पेठेंत मिळतात कीं नाहीं ? समजा, सर्व गोष्टी पुण्यांत करावयाच्या म्हटल्या तर तें शक्य नाहीं. याचप्रमाणें एखाद्या गवयानें गायिलें, कांहीं वेळ त्याला बरें वाटेल; पण जर त्याच्या गाण्याला कोणी किंमत दिली नाहीं म्हणजे तें ऐकण्याबद्दल किंमत दिली नाहीं, तर त्याला मरावेंच लागेल. समाजांत श्रमविभागणी आहे, तज्ज्ञपणा आहे म्हणून त्याच्या गाण्याला किंमत येते व तो जिवंत राहूं शकतो. असें सांगतात कीं, मध्य आफ्रिकेंत पूर्वीं कांहीं भागांत फक्त एक केळ्यांचेच पीक येत असे व त्यामुळें तेथील रहिवाशी कमताकद होत गेले. जेव्हां इतर धान्यांचा पुरवठा बाहेरून होऊं लागला तेव्हां ही स्थिति बदलली. जर जगांत स्वावलंबनच असतें तर तेथील लोकांना मरावें लागलें असतें. आतां त्यांना केळीं देऊन दुसऱ्या वस्तु घेतां येतात. त्यांनीं दुसरें धान्य तेथें लावलें तर येत नाहीं म्हणून यथायोग्य लागवडीचे सिद्धांताप्रमाणें त्यांनीं केळींच काढावीं व त्याच्या सहाय्यानें इतर वस्तु घ्याव्यात यांतच वटपैदास वाढते.

वर श्रमविभागणीच्या तत्त्वाचें विवेचन केलें त्याबरोबर एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, ही श्रमविभागणी एकंदर बाजाराच्या मर्यादेवर अवलंबून आहे. समजा एखादा डॉक्टर नेत्रतज्ज्ञ आहे, पण एका लहान तालुक्याच्या गांवीं आहे. तेथें नुसत्या डोळ्यांची डॉक्टरी करून भागणार नाहीं, तर सर्व तऱ्हेची केली पाहिजे. समजा, एखाद्या प्रांतांत, एखादा पदार्थ खूप होईल, चांगला होईल, पण जर

त्याला पुरेसें गिऱ्हाईक नसेल अगर परप्रांतांत, परदेशांत तो नेतां येणें शक्य नसेल तर, दुसरे पदार्थ तयार करणें त्या प्रांताला भाग पडेल. अर्थात् ही गोष्ट जेथें उत्पादन भांडवलशाहीच्या छायेंत आहे तेथेंच शक्य आहे. समजा, पुणें येथें बुटांचा एक कारखाना काढला. अर्थात् त्यांत यंत्राच्या साहाय्यानें व श्रमविभागणीनें खूप माल तयार होऊं लागला; पण जर बाजारांत तो सर्व खपला नाहीं, खपणें शक्य नाहीं तर अशा ठिकाणीं एकंदर लहान प्रमाणावर साधारण यंत्रे लावून तो मागणीच्या अंदाजानेंच काढला पाहिजे. म्हणजे बाजाराची मर्यादा, श्रमविभागणीची ही मर्यादा कोठपर्यंत नेणें फायद्याचें आहे हें ठरविते. तसेंच कांहीं ठिकाणीं माल काढणें अधिक परवडते. उदा०, जेथें कोळसा मुबलक आहे अगर कच्चा माल हाताशीं आहे अशा ठिकाणीं कारखाना काढणें स्वस्त जातें. मुंबईतील गिरण्यांपेक्षां अहमदाबाद, खानदेश येथील गिरण्यांना कापूस हाताशीं असल्यामुळें पुष्कळ फायदा होतो. उलट वाहतुकीचें साधनांत बदल होऊन ती स्वस्त झाली कीं लागलाच बाजार वाढतो व त्याबरोबर श्रमविभागणीचा व्याप वाढतो. अलीकडे मोटारीनें माल लांबवर जाऊं लागला त्याचा परिणाम कांहीं कारखान्यांवर चांगला झाला. मालाच्या किंमतींत व पुरवठ्यांत फरक पडला. उदा०, तळेगांव कांच कारखान्यांतील माल पूर्वी रेल्वेनें मुंबईस जात असे; तळेगांव कारखान्यांतून तळेगांव स्टेशनवर वाहणें, नंतर तो मुंबईस वाडी बंदरापासून पुन: एजंटाच्या गुदामामध्यें मोटारीनें नेणें यांत मोडतोड व खटाटोप पुष्कळ असे. शिवाय पॅकिंग जास्त करावें लागे. आज कारखान्यांत लॉरी आणून माल भरला कीं थेट एजंटाचे गुदामामध्यें मुंबईस नेतां येतो. याचा परिणाम किंमत व पुरवठा यांवर जरूर झाला, त्या मालाचा बाजार वाढला.

श्रमविभागणीचा अर्थ असा नाहीं कीं एकाच स्वरूपाच्या कामाकडे अगर उत्कृष्ट कामाकडेच एखाद्या घटकाचा उपयोग होतो. कित्येक घटक असे सामान्य स्वरूपाचे असतात कीं त्यांचा एकापेक्षां अनेक तऱ्हांनीं उपयोग होतो. जमीन घेऊं. एखादी बागाईत जमीन निरनिराळ्या पिकांना सारखीच उपयोगी असते. तसेंच एखादा मनुष्य चांगला गवंडी व चांगला मिस्त्रीही असूं शकेल. त्याच्या कोणत्या गुणाचा उपयोग त्याला करावा लागेल हें मागणीवर, बाजारावर, अवलंबून आहे. एखादा साहित्तिक नाटककार आहे, कादंबरीकार आहे व पटकथालेखकही आहे. हल्लीं साहित्तिक जें खपेल व ज्याला भाव येईल तें लिहिणारे आहेत. तेव्हां या साहित्तिकांना काय लिहावयास परवडेल हें मागणीवर, बाजारावर अवलंबून आहे. तात्पर्य, श्रमविभागणीचें स्वरूप व व्याप, मग त्या घटकांचें स्वरूप कसेंही असो, मागणी व बाजार यांच्या मर्यादेनें ठरविला जातो.

---

## ७ उत्पादन ( पुढें चालू )

मागील प्रकरणांत, आपण उत्पादन घटकांचे जे सामान्य तीन प्रकार सांगितले त्यांसंबंधीं विचार केला व ही वर्गवारी व वांटणी पुरी नाहीं हेंही पाहिलें. बहुतेक उत्पादन म्हणजे अनेक घटकांच्या सहकार्याचें—एकत्र येण्याचें—फळ. एकाच घटका-पासून होणाऱ्या पूर्ण वस्तु म्हणजे ज्या उपभोग्य आहेत अशा थोड्याच आहेत. बहुतेक उपभोग्य वस्तु पूर्ण वस्तु अनेक घटकांच्या संगमानें, एकत्र येण्यानें होतात. जमीन व शेतकऱ्यांचे श्रम एकत्र आल्याशिवाय धान्य नाहीं. कापूस, यंत्रें, मजुरांचे श्रम एकत्र आल्याशिवाय कापड नाहीं. तसेंच माणसांचे श्रम व त्यांचीं हत्यारें, यंत्रें व सामग्री हीं जर चांगलीं, विशेष काम देणारीं उत्तम प्रकारचीं असलीं तर, उत्पादन जास्त होईल हेंही तितकेंच खरें. जर जमीन चांगली, खत उत्तम, नांगर लोखंडी आधुनिक पद्धतीचा, तर जमिनींतील पीक त्यामानानें जास्त; अर्थात् पीक येण्याची प्रत्येक जमिनीची कमाल मर्यादा ही कांहीं तरी असणारच. पण सामान्य सामग्रीनें जें पीक त्याच जमिनींत येईल, त्यापेक्षां चांगलें बीं, चांगलें खत वापरण्यानें जास्त येईल हें उघड आहे. म्हणून उत्पादनाचे—पैदाशीचे—दृष्टीनें सामग्री घटक कसे व कोणत्या प्रमाणांत वापरावयाचें हें पाहणेंहि महत्त्वाचें आहे. कांहीं पैदास, कांहीं सोयी—याही उत्पादनांत येतात हें आपण पूर्वीं पाहिलें आहे—अशा स्वरूपाच्या असतात कीं, त्यांत दरम्यानचे घटक अगर सामग्री काय प्रमाणांत असावी हें त्यांच्या स्वरूपामुळेंच ठरलें जातें. टांगा, टॅक्सी यांना अर्थात् एकाला एकच हांकणारा असणार, कारण त्यांचें स्वरूपच असें आहे. तेव्हां वाहतुकीचें उत्पादन वरील स्वरूपांत करावयाचें म्हणजे एक टांगा एक टांगेवाला, एक टॅक्सी एक ड्रायव्हर, असेंच गणित असणार. उलट-पक्षी कांहीं घटक वस्तूंचें प्रमाण बदलतां येतें. शेतकरी यंदा जी व जेवढी जमीन करील त्यापेक्षां जास्त करूं शकतो, जास्त यंत्रें घेऊं शकतो. त्याचप्रमाणें कारखान-दार आणखी यंत्रें आणून अगर नवीन सुधारलेलीं यंत्रें आणून, कामगारांची संख्या कमी करूं शकेल व करतातही. जेथें प्रमाण बसलें असेल, तेथेंसुद्धां बदल होणार नाहीं

असें नाहीं. समजा, मोटारटॅक्सीसंबंधी नवीन कायदा झाला आहे, त्यायोगें ८ तासां-पेक्षां जास्त वेळ एका ड्रायव्हरला मोटार हांकतां येत नाहीं. टॅक्सीपासून जर जास्त वेळ काम घ्यावयाचें असेल तर, आणखी एक मनुष्य नेमला पाहिजे. कांहीं भाड्याचे टांगे पुण्यांत असे आहेत कीं ते रात्रंदिवस काम देतात, पण त्यांना दिवसपाळीला व रात्रपाळीला प्रत्येकीं घोडे निराळे व हांकणारा निराळा असतोच. साधारणपणें देखरेख करणारे दर कारखान्यांत ठरलेले असतात, पण पुष्कळवेळां माल पक्का निघाला कीं नाहीं हें पाहण्याकरितांही हें प्रमाण कित्येक ठिकाणीं वाढविलें जातें. तसेंच नवीन शोधामुळें अगर मोठ्या प्रमाणावर पैदास करावयाची झाल्यास, मोठीं यंत्रें आणवावीं लागतात व त्यामुळें मजूर, कारागीर, यांच्या संख्येवर—मजूर या घटकावर—परिणाम होतोच. लोखंडाचे कारखान्यांतील काहिली लहान असल्या तर १० मजूर लागतील; त्याच जर मोठ्या आणल्या तर तेंच काम कमी मजुरांत होईल. मागें वर्तमानपत्र छापण्याचें उदाहरण दिलें आहे; ज्यावेळेस साधें यंत्र होतें तेव्हां कागद उलटा करण्यास चार माणसें, पत्रांची घडी करण्यास समजा २०; पण आतां रोटरी यंत्र आणल्याबरोबर इकडे कागदाचें रीळ लावावें व तिकडे घडी करून प्रति घ्याव्यात; मधले सगळे मजूर कमी झाले. पूर्वी मजुरांचें प्रमाण पूर्वीच्या यंत्राच्या मानानें ठरलें होतें, पण नवीन शोधानें, प्रगतीनें तें बदललें. याचा अर्थ जें प्रमाण निश्चित झालेलें असतें तें नेहमीच तेवढ्यापुरतें, तात्पुरतें, चालू असतें. प्रगति होत आहे, नवे नवे शोध लागत आहेत व त्यामुळें सर्व निश्चित गोष्टींचें प्रमाण बदलत आहे. फक्त आमच्या लोकांचा बेशिस्तपणा व खोटया कल्पना अजून बदलत नाहींत!! या नाहीं त्या मिषानें त्यांची पैदास चालू आहे व दुःखांत पडलेल्या, दाबलेल्या आमच्या लोकांना हें सर्व दुःख देवानें दिलें आहे, 'ही हरीची इच्छा आहे,' असा खोटा धर्म अद्याप सांगणें चाललेंच आहे. सर्व तऱ्हेच्या कारखान्यांतून, याप्रमाणें घटकाघटकांतील हें प्रमाण, काळाकाळानें बदलत असतें. कापड गिरण्यांतून जुनें सांचे जाऊन नवीन आलें. पूर्वी एक कामगार एक माग चालवीत असे, आतां नवीन पद्धतीनें दोन, तीन, चार, पर्यंत तो चालवितो. त्यामानानें कामगार कमी झाले. तात्पर्य, उत्पादनांतील पदार्थांचें, घटकांचें प्रमाण बदलतां येतें व त्याचा परिणाम मालाच्या वट पैदाशीवर होतो हेंहि त्याबरोबर दिसून येतें; कारण प्रमाण बदललें याचा अर्थ आणखी श्रमविभागणी झाली. ती व्यापक झाली, म्हणजे पैदास वाढली हें उघड आहे. केलेल्या खर्चाचे व श्रमांचे मानानें ती कशा स्वरूपाची असते हें पाहणें जरूर आहे व त्या वाढीलाहि मर्यादा आहे हें विसरतां कामा नये.

वर जमिनीच्या मगदुरासंबंधीं लिहितांना असें म्हटलें आहे कीं, कमाल मगदुरा-

लाहि कांहीं मर्यादा आहे. त्यापलीकडे कितीहि खत घातलें, किंवा आणखी सुधारलेलें बीं घातलें; तरी त्या मर्यादेपलीकडे पैदास जाणार नाहीं. जगांतील ज़मीन कांहीं झालें तरी वाढणार नाहीं. लोकसंख्या मात्र वाढत आहे. हिंदुस्थानच्याच बाबतींत आपण पाहिलें कीं, १९०१ ते १९४५ या ४४ वर्षांत लोकसंख्या शेंकडा २८ नीं वाढली पण त्या मानानें जमिनीची लागवड वाढली नाहीं, ती फक्त शें. १० नीं वाढली. जर ठराविक जमिनी असतांना जास्त जास्त लोक शेती करूं लागले तर, प्रत्येकीं पीक कमी कमीच वांट्यास येणार हें उघड आहे. जास्ती मजूर शेतावर लावले म्हणजे कांहीं तितक्या पटीनें उत्पन्न येत नाहीं. जगाच्या लोकसंख्येंत दरसाल एक टक्का भर पडत आहे व त्यामुळें एकवेळ जगावर अशी आपत्ति येईल कीं, माणसांना पोटभर खावयास मिळणार नाहीं. हल्लीं मिळतेंच असें नाहीं. सर्वत्र राहणी हीन हीन होत जाईल. अर्थात् या संकटाला तोंड देण्याकरितां कांहींनीं संतति–नियमनाचा उपाय सुचविला आहे. तथापि ही आपत्ति इतकी जवळ ठेपली आहे असें नाहीं. उलट गेल्या १०० वर्षांत जमिनीचा मगदूर वाढविण्याचें अनेक प्रयत्न यशस्वी झाले आहेत. नवीन खतांचा शोध व त्यांचा उपयोग, नवीन तऱ्हेचें बीं, पीक पालट करून मगदूर वाढविणें, यंत्रांचा शेतीचे कामीं उपयोग वगैरे गोष्टी झाल्या आहेत व होत आहेत. त्यांचा परिणाम जसा जमिनीचा मगदूर वाढविण्याकडे झाला आहे तसाच शेतकीवर अवलंबून असलेल्या लोकांवरहि झाला आहे. युरोप व अन्य पुढारलेल्या देशांत गेल्या १०० वर्षांत शेतीवर अवलंबून राहणाऱ्यांची संख्या कमी झाली आहे. आपल्या देशांत १९२१ सालीं शेंकडा ७२·४१ इतके लोक शेतीवर अवलंबून होते. १९३१ सालीं हें प्रमाण ६७·० झालें आहे. मात्र १९३१ च्या ह्या प्रमाणांत प्रत्यक्ष शेत-काम करणाऱ्यांचीच दखल घेतली आहे. त्यांच्यावर अवलंबून असलेल्यांची नाहीं. साधारणतः इतर देशांत मगदूर वाढला, शेतीचे कामीं यंत्रे आली म्हणून बरेच लोक निकामी झाले यामुळें ते शहरांकडे वळून कामगार झाले. आपल्या देशांत जमिनीचा मगदूर कांहीं प्रमाणांत कालव्यांमुळें वाढला. पण जमिनीच्या वांटण्यामुळें चिंध्या झाल्या. शेती कायमची आंतबट्ट्याचा व्यापार होऊन बसली. म्हणून हिंदुस्थानांतील खेड्यांतील लोक शहराकडे वळले व कामगार अगर बेकार अगर भिकारी झाले. तात्पर्य जमिनीचा मगदूर जरी वाढला तरी त्यास मर्यादा आहे व जर जास्त जास्त माणसें जमिनीवर अवलंबून राहिली तर, माणसामागें सरासरी उत्पन्न त्या प्रमाणांत कमी कमी होत जाईल. हें जें घडतें, त्याला आपण आंकसती पैदास अगर उतरतें

उत्पादन असें म्हणूं. हा जो नियम जमिनीच्या संबंधांत आपण पाहिला, तोच सर्व वस्तूंच्या पैदाशीच्या व्यवहारांत आपणाला आढळून येईल.

जर एखाद्या वस्तूच्या उत्पादनांतील घटक दुप्पट केले अगर वाढविले तर सामान्यतः उत्पादन अगर पैदास दुप्पट होईल अगर त्यामानानें वाढेल. त्याचप्रमाणें मोठ्या प्रमाणावर पैदास करावयाची झाल्यास जास्त यंत्रें उपयोगांत आणावीं लागतील व श्रमविभागणी जास्त होईल. आपण प्रथम घटकांचें प्रमाण वाढविलें म्हणजे पैदास वाढते याचा विचार करूं; व कांहीं मर्यादा ओलांडल्यावर पैदास कशी आंकसते, उतरूं लागते हें समजावून घेऊं. सुरुवातीस अगदीं साधें उदाहरण घेऊं. ज्यांत दोनच घटकांचा समावेश आहे असें जमीन व मजूर. असें समजा कीं, आपल्या उदाहरणांतील जमीन एकाच जातीची आहे, मजूर एकाच दर्जाचे आहेत व या जमिनींत गव्हाचें उत्पादन होत आहे. एवढ्यावरून, चौरस मैलामागें अगर अमुक एकरांमागें किती गव्हांची पैदास होईल हें आपण काढूं शकूं. त्याप्रमाणें किती माणसें लावलीं म्हणजे किती पीक किती एकरांत निघेल, हेंही काढूं शकूं. समजा, आपण एक चौरस मैल गव्हाची लागवड केली; माणसें कमी लावलीं तर पैदास कमी येईल; माणसें वाढवीत गेलों तर पैदासही वाढेल. पण एक मर्यादा अशी येईल कीं, त्यापलीकडे माणसें वाढविलीं तरी पैदास वाढणार नाहीं; उलट माणसें वाढवीत गेल्यास माणसामागें सरासरीचें पीक कमी कमी होत जाईल. एक चौरस मैलाची लागवड १ मनुष्यापासून २१ पर्यंत केली तर त्याचा परिणाम काय होईल याचें कोष्टक खालीलप्रमाणें मांडूं.

| मनुष्यांची संख्या (एक चौ. मैलास) | एकंदर उत्पन्न (१ चौरस मैलास) | सरासरी (माणशीं) प्रमाण | (संख्या वाढविण्यानें माणशीं सीमागत उत्पन्न किती जास्त वाढलें.) |
|---|---|---|---|
| १ | १०० | १०० | १०० |
| २ | २५० | १२५ | १५० |
| ३ | ४५० | १५० | २०० |
| ४ | ६४६ | १६१·५ | १९६ |
| ५ | ८३७ | १६७·४ | १९१ |
| ६ | १०२२ | १७०·३ | १८५ |
| ७ | १२०० | १७१·४ | १७८ |
| ८ | १३७० | १७१·२ | १७० |

| मनुष्यांची संख्या (एक चौ. मैलास) | एकंदर उत्पन्न ( १ चौरस मैलास ) | सरासरी ( माणशीं ) प्रमाण | ( संख्या वाढविण्यानें माणशीं सीमागत उत्पन्न किती जास्त वाढतें ) |
|---|---|---|---|
| ९ | १५३१ | १७०·१ | १६१ |
| १० | १६८२ | १६८·२ | १५१ |
| ११ | १८२२ | १६५·६ | १४० |
| १२ | १९१५ | १६२·५ | १२८ |
| १३ | २०६५ | १५८·८ | ११५ |
| १४ | २१६६ | १५४·७ | १०१ |
| १५ | २२५२ | १५०·१ | ८६ |
| १६ | २३३२ | १४५·१ | ७० |
| १७ | २३७५ | १४९·७ | ५३ |
| १८ | २४१० | १३३·८ | ३५ |
| १९ | २४२६ | १२७·६ | १६ |
| २० | २४२२ | १२१·१ | –४ |
| २१ | २३९७ | ११४·१ | –२५ |

प्रथम एक मनुष्य काम करीत होता त्यावेळीं त्यास १०० प्रमाण झालें. ही सरासरी ७ माणसें काम करीपर्यंत वाढत गेली. ७ माणसें काम करीत त्यावेळेस १२०० प्रमाण उत्पन्न झालें व माणशीं सरासरी १७१·४ पडली; याचा अर्थ ७ पेक्षां कमी माणसांना ती सबंध जमीन लागवड करणें शक्य नव्हतें. माणसें ७ पेक्षां वाढल्याबरोबर पीक जरी वाढलें तरी माणशीं सरासरी कमी होत चालली. माणसें १९ झालीं त्या वेळेस जमिनीचें पीक कमाल झालें म्हणजे २४२६ प्रमाण झालें; पण सरासरी कमी होत गेली. माणसें आणखी २१ झालीं, आतां सरासरी तर कमी होत चाललीच पण एकंदर उत्पन्नहि कमी होत चाललें. कारण जमिनीचा कमाल मगदूर २४२६ प्रमाण होता, ती मर्यादा संपली. त्यापुढें माणसें अधिक लावलीं म्हणजे पैदास कमी झालेली दिसेल; कारण १९ माणसांपेक्षां जास्त माणसें झालीं कीं गर्दी होते, त्यांची मदत होण्यापेक्षां अडथळा होतो व पैदास कमी होते; पण असें होत नाहीं कारण कमाल मर्यादेच्या पलीकडे कोणी मजूर वाढवीत नाहीं असा व्यवहाराचा अनुभव आहे; कारण त्या मर्यादेपासून उत्पादन उतरूं लागतें, पैदास आंकसूं लागते. त्याचप्रमाणें ७ पेक्षां माणसें जास्त झाल्याबरोबर माणशीं सरासरी उत्पन्न कमी होऊं लागलें. मनुष्य जास्त लावला म्हणजे तो अधिक भर किती टाकतो हें ४ थ्या स्तंभावरून समजेल; अधिक येणाऱ्या माणसाची उपयुक्तता किती

हेंही त्यावरून समजतें. वरील उदाहरणावरून असें दिसतें कीं, मजुरांचें प्रमाण जमिनीशीं वाढत गेलें म्हणजे दरमाणशीं सरासरी पैदास कमी होत जाते. त्याचप्रमाणें जर कमाल पैदाशीला अवश्य असणारे मजूर ( या उदाहरणांत १९ ) कमी केले तर एकंदर पैदास कमी होत जाते. यावरून आपण असें म्हणूं शकतों कीं, जर उत्पादनांत त्याच्या घटकांपैकीं एक घटकच वाढविला तर कांहीं मर्यादेपलीकडे त्या घटकांची सरासरी पैदास व सीमागत पैदास कमी कमी होत जाते, उतरत जाते. वर आपण जमिनीचें उदाहरण घेतलें असलें तरी हा नियम प्रत्येक घटकाच्या व कोठल्याही धंद्याच्या उत्पादनाच्या बाबतींत खरा आहे. समजा, एकच घटक १० टक्के वाढविला व बाकी घटक पूर्वीच्याच प्रमाणांत राहिले तर उत्पादनांत एकंदर वाढ कांहीं १० टक्के होणार नाहीं, ती कमीच होणार. असें नसतें तर एकाच जमिनीच्या तुकड्यावर नुसती मजुरांची संख्या वाढवून पीक तितक्या पटीनें वाढलें असतें, पण असें होत नाहीं.

वर ४ थ्या स्तंभांत अधिक येणारा मनुष्य किती भर टाकतो हें दाखविलें आहे; याचा अर्थ तो इतरांपेक्षां कमी काम करतो असें नव्हे. त्याची उपयुक्तता एकंदर प्रमाणांत किती, येवढाच त्याचा अर्थ. आठवा मनुष्य लावल्याबरोबर, १७८ पासून १७० वर ही संख्या आली. आपल्या उदाहरणांत सुरुवातीस ही सीमागत उपयुक्तता सरासरीपेक्षां जास्त आहे व पुढें ती कमी होते व नंतर सरासरी उत्पादन व सीमागत उपयुक्तता ह्या दोन्ही कमी होत जातात. अर्थात् ही गोष्ट महत्त्वाची आहे, कारण किती जास्त खर्च करून, किती जास्त उपयोगी वस्तू उत्पादन होणार आहेत व त्यांची उपयुक्तता किती होणार आहे हें पैदास करणारांना, उत्पादन करणारांना समजणें अवश्य आहे. या एकंदर विवेचनावरून आपल्याला असें म्हणतां येईल कीं, पैदाशीच्या अगर उत्पादनाच्या पदार्थांत अगर घटकांत जर एका मर्यादेच्या पलीकडे एखाद्या घटकाचें अगर पदार्थाचें प्रमाण वाढविलें तर, सरासरी पैदास त्याचप्रमाणें सीमागत पैदास आंकसते, उतरत जाते. याच नियमाला अर्थशास्त्रांत उतरत्या पैदाशीचा अगर उतरत्या उत्पादनाचा सिद्धांत म्हणतात.

---

# ८. घटकांची वांटणी

आतांपर्यंत घटकांच्याबद्दल सर्वसाधारण विचार केला आतां प्रत्यक्ष या उत्पादन-घटकांची वांटणी कशी होते तें पाहूं. कारण त्यावर एकंदर पैदास, वट पैदास व तिचें एकंदर स्वरूप अवलंबून राहील. राष्ट्रांत अनेक धंदे कारखाने चालू असणार. त्याचप्रमाणें कोणत्याहीं एका वेळेस या उत्पादनघटकांची रास—प्रमाण—हें निश्चित असणार व तें प्रमाण कोणत्या उद्योगधंद्यांत किती जातें यावर एकंदर पैदास अवलंबून राहणार. समजा कांहीं एक कोळसा दरसाल एखाद्या राष्ट्रांत निर्माण होतो, त्याचा उपयोग कोणकोणत्या धंद्यांना होणार हें समजलें म्हणजे उत्पादनाचें स्वरूपही समजूं शकतें. कोळसा, जहाजांना किती जाणार, रेल्वेला किती जाणार, परदेशांत किती जाणार, गॅस उत्पन्न करण्याचे कामीं किती जाणार हें कळणें जरूर आहे. तसेंच राष्ट्रांत तयार झालेला कापूस हा परदेशीं किती जाणार, या कापसाचे सूत परदेशीं किती जाणार, यावरून येथें कापड किती निघणार हें समजून येणार आहे. पुष्कळ घटक असे असतात कीं त्यांचा उपयोग अनेक उद्योगधंद्यांतील मालाचे पैदाशीकरितां अवश्य आहे. उदा०, दगडी कोळसा. तसेंच एकंदर उत्पादनाचे कामीं अनेक घटक व अनेक कारखाने यांचें सहकार्य एकमेकांस अवश्य असतें, किंबहुना त्याशिवाय पैदासच होणार नाहीं. कांहीं घटक अशा स्वरूपाचे असतात कीं, त्यांचा उपयोग अनेक गोष्टींकरितां करतां येतो. त्यांना बहु-उपयोगी घटक म्हणूं. आपण वर जमिनीचें उदाहरण घेऊन गव्हांच्या पिकाचे बाबतींत विचार केला, पण जमीन हा असा घटक आहे कीं, त्यांत गव्हांबरोबर अनेक धान्यांचीं पिकें होऊं शकतात. त्यांत बाजरी होईल, ज्वारी होईल. परंतु समाजांत आपण पाहत असतों कीं, जास्तींत जास्त उपयोग एका घटकापासून अशारीतीनें करून घ्यावयाचा कीं, दुसऱ्या घटकांपासून होणाऱ्या पैदाशींत नुकसान होऊं नये. यामुळें घटकांची फायदेशीर वांटणी होत जाते. जेव्हां कांहीं एका मर्यादेनंतर जमिनींत गहूं लावला काय किंवा अन्य धान्य लावलें काय, उत्पन्न उपयोगाचे दृष्टीनें सारखेंच होऊं लागलें, म्हणजे ती वांटणी

जास्तींत जास्त फायदेशीर झाली. त्याचप्रमाणें जर एखाद्या घटकाचें प्रमाण वाढवून, उत्पादन कमी होऊं लागलें, पैदास आंकसूं लागली तर तें उत्पन्न उपयोगाचे किंवा फायद्याचे दृष्टीनें बरोबर होणार नाहीं. त्याच वस्तूंचें उत्पादन अगर पैदास करण्याऐवजीं दुसऱ्या वस्तूंचे पैदाशीकडे त्या घटकाचा उपयोग केला पाहिजे. जमिनींत जास्त माणसें लावून अगर तिचा जास्त प्रमाणांत गव्हांकडे उपयोग केल्यानें, सरासरी पैदास कमी होत गेली व जास्त वाढणाऱ्या खर्चानें जास्त उपयोग होईनासा झाला म्हणजे, गव्हांऐवजीं दुसरें पीक काढलें पाहिजे हें उघड आहे. हीच गोष्ट आणखी स्पष्ट करावयाची तर आपल्याला असें म्हणतां येईल कीं, दर चौ. मैलाला १९।२० माणसें लावलीं म्हणजे कमाल पीक हातीं येतें; त्यापेक्षां जास्त माणसें लावलीं तर पिकांत वाढ होत नाहीं, उलट नवीन माणसें खर्च वाढवितात. या स्थितींत पैदाशींत कांहींही भर पडली नाहीं. याऐवजीं हीं वाढलेलीं माणसें दुसऱ्या धंद्यांत टाकलीं तर, गव्हांची कमाल पैदास कायम राहून दुसऱ्या धंद्यांतील उत्पादन वाढेल. समजा, १०० चौरस मैल गहूं लावला असून त्यांत १००० माणसें काम करीत आहेत; जर त्यांतील १०० माणसें कमी केलीं तर समजा, एक हजार मण गहूं कमी होईल. जर ही १०० माणसें दुसरीकडे काम करून जी पैदास करतील ती, या एक हजार मणांपेक्षां समाजाला जास्त उपयोगी वाटली तर दुसरीकडे हीं १०० माणसें जातील. जर समाजाला तसें वाटत नसेल तर मग, असा विचार येतो कीं या १०० चौ. मैलांचे लागवडीकरितां हीं हजार माणसें पुरीं आहेत कां नाहींत? समजा, या हजारांत आणखी १०० माणसें घातलीं व त्यायोगें एक हजार मण पीक वाढलें, पण त्याबरोबर १०० माणसें ज्या धंद्यांतून आलीं, तेथें अर्थात् पैदास कमी झाली. मग प्रश्न असा कीं, समाजाला या जास्त एक हजार मणांची किंमत (उपयोग) इतकी जास्त वाटते काय कीं, त्याकरितां दुसऱ्या धंद्यांतील पैदास कमी झाली तरी हरकत नाहीं? तसें वाटत असेल तर दुसऱ्या धंद्यांतून १०० माणसें गव्हाचे लागवडीचे कामाकडे जातील हें उघड आहे. ज्या वेळेस उत्पादनसामग्री अगर घटक एका धंद्यांतून दुसऱ्या धंद्यांत जाण्यानें जास्त उपयोग अगर जास्त किंमत समाजास वाटत नाहीं, त्यावेळेस असा बदल होणार नाहीं. मजूर इकडून तिकडे जाणार नाहींत. याचाच अर्थ एखाद्या घटकाचा उपयोग कोणत्याही वस्तूचे उत्पादनाकरितां केला तरी, त्यांचा अधिक उपयोग करून होणारी पैदास, सर्वत्र सारख्याच किंमतीची होते. 'एका अर्थानें यथायोग्य लागवडीप्रमाणें हा यथायोग्य उपयोग उत्पादनघटकांचा झाला. जो नियम आपण जमीन व मजूर यांच्या विवेचनांत बांधला, तोच सर्व उत्पादनघटकांचे बाबतींत लागू आहे हें आपण पुढें विस्तारानें

पाहूं. कारण भांडवलशाही उत्पादनाचे कामीं यावर फार गोष्टी अवलंबून आहेत. कोणत्या वस्तूचें उत्पादन जास्तींत जास्त फायदेशीर म्हणजे कमाल नफा देणारें, हें या नियमाचे आधारानेंच ठरलें जातें.

राष्ट्रांत हातीं येऊं शकणाऱ्या सर्व सामग्रीचा, सर्व पदार्थांचा, उत्पादन घटकांचा उपयोग केला जातोच असें नाहीं. आज भांडवलशाहीच्या राज्यांत माणसांप्रमाणें हे उत्पादन घटकहि बेकार राहतात. खरें पाहिलें तर देशांतील सर्व साधनांचा उपयोग उत्पादन कार्याकरितां झाला पाहिजे, केला पाहिजे. किती तरी जमीन लागवडीस योग्य असून रिकामी पडली आहे हें आपण आपल्या देशाबाबत मागें पाहिले. पण प्रत्यक्ष भांडवलशाही जगांत काय होतें तें पहा. समजा कोळसा पाहिजे आहे. दोन खाणी आहेत; एकींत कोळसा अगदी थोडें खणलें असतां लागतो व खूप लागतो; दुसरींत फार खोल खणून थोडा लागतो. पहिली खाण उपयोगांत आणली तर जेवढा कोळसा पाहिजे आहे तेवढा काढण्यास एक हजार माणसें पुरी होतात, दुसरी उपयोगांत आणली तर पांच हजार माणसें लागतात. जर निम्मा निम्मा प्रत्येकीं घेतला, तर तीन हजार माणसें लागतात. जर अवश्य लागणाऱ्या कोळशापेक्षां जास्त नको असेल, तर पहिली खाण उपयोगांत आणणें हें सरळ व्यवहाराला धरून होईल. जास्त मजूर लावून दुसरी उपयोगांत आणणें म्हणजे निव्वळ नुकसानीची बाब आहे. जर पहिलींतील कोळसा संपला तर मग दुसरींतून काढणें योग्य होईल. अगर पहिली इतकी खोल खणली गेलीं कीं, आतां त्यांतून कोळसा काढणें हें, दुसरींतून काढण्यापेक्षां महाग पडूं लागलें तर दुसरींतून काढणें योग्य होईल. समाजाला कोळशाची गरज भागवावयाची आहे. माणसें बेकार झालीं तरी त्याची त्यास पर्वा नाहीं. या विचारसरणींत पहिली खाण प्रथम उपयोगांत आणणें हेंच सरळ आहे. तसेंच लागवडीस योग्य असलेल्या पण कमी मगदुराच्या अगर ज्यांत खर्चाचे मानानें पीक येणार नाहीं त्या जमिनी पड राहतील व चांगल्या जमिनींत जास्तींत जास्त उत्पन्न करण्याकडे श्रम व पैसा खर्च केला जाईल. या करण्यांत कमी माणसें लागलीं तरी चालेल. कमी पैदास झाली तरी चालेल; कारण जास्त पैदास हा हेतु नाहीं. जास्त फायदा—नफा—हा हेतु आहे. हाच नियम आपल्याला मोठमोठाल्या कारखान्यांच्या बाबतींतही आढळून येईल. नवीन यंत्रें निघालीं व त्यापासून जास्त व चांगली पैदास होणारी असेल तर, जुनीं यंत्रें काढून टाकून नवीन यंत्रें बसविण्याकडे सरळ कल असतो. तसेंच नवीन यंत्रें तयार करण्याचा खर्च पत्करून जर खर्चाचे मानानें पैदास वाढणार असेल तर जुनीं यंत्रें टाकून नवीन बसविणें परवडतें; व त्याप्रमाणें घडत आहे. मात्र नवीन यंत्रें तयार करण्याचे

कामीं खर्च होणाऱ्या रकमेचा दुसरीकडे उपयोग करून जास्त फायदा होणार असेल, तर मात्र नवीन यंत्रें होणार नाहींत, जुनींच चालविली जातील. कारण नवीन यंत्रें बसवून जास्त घातलेल्या भांडवलावर योग्य नफा मिळत नाहीं. म्हणून कांहीं भांडवलवाले नवीन शोध म्हणजे भांडवलाला एक साडेसातीच समजतात. नवीन शोध समाजाचे कल्याणाकरितां आहेत हें ते जाणत नाहींत म्हणून किती तरी शोध व प्रगतिकारक गोष्टी, नफा देणाऱ्या नाहींत म्हणून पडून राहातात हा अनुभव आहे. ज्ञानाच्या प्रगतीला नफ्याच्या गजानें मोजलें जातें, समाजाच्या हितानें नव्हे. मोटारीचा शोध लागल्याबरोबर रेल्वेचे भांडवलवाले, नफा कमी झाला म्हणून ओरडूं लागले. मोटारीनें जनतेची सोय झाली ही गोष्ट त्यांना पटत नाहीं. बेकारी नाहींशी व्हावी म्हणून सरकारी कामें निरनिराळ्या देशांत सुरू केलीं जातात. अर्थात् त्या कामांत बेकार मजुराबरोबर, मालमसाला, व्यवस्थापक, इंजीनियर वगैरे असतातच. जर कोणी असें म्हणूं लागेल कीं, या पद्धतीनें काम चांगलें होत नाहीं तर त्याला उत्तर, बेकारी कमी करणें हा मुख्य हेतु नाहीं, तर समाजांत अस्वस्थता माजेल ती माजूं नये हा हेतु आहे असें देण्यांत येतें. याचा अर्थ रिकाम्या उत्पादन–घटकांचा उपयोग उत्पादनाकरितां नाइलाज झाला म्हणजे करावयाचा. उलट अशा तऱ्हेच्या बेकारांना काम देणाऱ्या योजना प्रेसिडेंट रूझवेल्ट यांनीं काढल्यामुळें मंदीच्या निराशेंत आलेली अमेरिकेच्या उद्योगधंद्यांची स्थिति थोडी सुधारली. लोक बेकार राहिले म्हणजे त्यांना समाजानें पोसावें लागतें. पण त्यांना उद्योगधंद्यांत स्वाभिमानाची जागा निर्माण करणें भांडवलशाहीला परवडत नाही. उत्पादन–घटक मग तो जमीन, मजूर, यंत्रें, कोणत्याहि स्वरूपांत असो, नफा होत नसेल तर निकामी ठेवणें हें हल्लींच्या जगाच्या उत्पादनक्षेत्रांत राजरोस चालू आहे.

जसें कांहीं घटक निकामी ठेवणें हें हितावह ठरतें, त्याचप्रमाणें उत्पादनाचें प्रमाण वाढवून कांहीं घटक, मजूर, वगैरे कमी करणें हेंहि फायदेशीर होतें. मागें आपण पाहिलें आहे कीं, उत्पादनघटकांचें प्रमाण वाढविलें कीं, त्या वस्तूंचें उत्पादन पैदास वाढते. अर्थात् अगदीं ज्यापटीनें उत्पादन–घटक वाढविले असतील त्या पटीनेंच वाढेल असें नाहीं. उलट उत्पादन वाढवून, विस्तारून, कांहीं घटक वर म्हटल्याप्रमाणें कमी करतां येतात. आज उत्पादन करण्याची पद्धति लहान प्रमाणावर आहे. जर पैदास एकदम मोठ्या प्रमाणावर करावयास सुरुवात केली तर श्रमविभागणी जास्त करतां येईल. ‘खास’ काम जास्त वाढेल. अधिक यंत्रें उपयोगांत येतील व एकंदर पैदास वाढेल. उदा०, पूर्वीं छापखाने हातानें चालविले जात असत.

त्यांत काम करणारीं माणसें यंत्रांचीं कामें शिकून तयार झालीं. हातानें चालणाऱ्या छापखान्यापेक्षां यंत्रानें चालणारा एक छापखाना घेतल्याबरोबर पैदास कितीतरी वाढली. त्याचबरोबर कांहीं माणसें टाईप जुळणारीं होतील, कांहीं प्रुफें पाहणारीं होतील, कांहीं यंत्रावर काम करणारे होतील, पण प्रत्येक भागावर श्रमविभागणीनें काम होऊं लागेल व तें चांगलें होईल. पूर्वी एक मनुष्य जितकें काम, जितक्या किंमतीचें करीत होता त्यापेक्षां त्याच्या कामाचें प्रमाण जास्त वाढेल. पद्धतींत बदल झाला म्हणून ही गोष्ट घडून आली. पुष्कळवेळां मोठया प्रमाणावर पैदास करणें हें सोपे असून, चांगलें असून करण्यांत येत नाहीं. कारण त्यापासून 'नफा' होत नाहीं. उदा०, राष्ट्राला लागणारें सगळें कापड अगर दुसरा कोणताहि जिन्नस एकाच ठिकाणीं मोठया प्रमाणावर तयार करणें, प्रसंगीं सोपें व कमी खर्चाचें असतें. तथापि तयार झालेला माल गिऱ्हाईक जेथें असेल तेथें न्यावा लागतो; व त्या वाहतुकीचा खर्च जास्त असल्यामुळें ही गोष्ट होत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं त्या त्या विभागाकरितां सोयीस्कर होईल अशा रीतीनें मोठया प्रमाणावर उत्पादन करण्याकडे प्रवृत्ति असते. फोर्डच्या सर्व गाडया कांहीं तो डिट्रॉइट मुख्य कारखान्यांत तयार करीत नाहीं; नुसत्या तयार करावयाच्या असत्या तर तेथें तयार करणें त्यास फायदेशीर होतें. पण वाहतुकीचे खर्चामुळें तो तें करीत नाहीं. उलट फोर्डनें निरनिराळया देशांत आपले कारखाने काढून त्या त्या ठिकाणीं मोठया प्रमाणावर उत्पादन सुरू केलें आहे. मोठया प्रमाणावर पैदास करण्याकडे हल्लीं सर्वत्र प्रवृत्ति व प्रयत्न चालू आहेत. भांडवल वाढवून जुनीं यंत्रें काढून टाकून नवीन वाढविणें हा एक मार्ग आहे; पण एक मर्यादा अशी येते कीं त्यापलीकडे हें शक्य होत नाहीं. म्हणून कारखानदार—संघ काढून चुरस कमी करावयाची व किंमत कायम करून गिऱ्हाइकें वांटून घ्यावयाचीं. उदा०, हिंदुस्थानांतील बहुतेक सीमेंट कंपन्या एका गटांत आल्या व त्यांनीं किंमत व गिऱ्हाईक याबाबत नियम करून स्पर्धा नाहींशी केली, नफा कायम केला. अर्थात् गिऱ्हाइकाच्या दृष्टीनें नुकसानच झालें; कारण चुरस असली म्हणजे किंमत कमीजास्त होते. हे असे संघ निघाले कीं मक्तेबाजीच निर्माण होते. त्याचप्रमाणें आणखी नवीन प्रकार उत्पादनाचे बाबतींत दिसूं लागला आहे. वर लिहिलेले संघ हे माल तयार करणाऱ्या कारखानदारांचे संघ. या नवीन प्रकारांत अगदीं कच्च्या मालापासून तों विक्री—किरकोळ विक्रीचे—दुकानापर्यंत सर्व गोष्टी एकतंत्री करावयाच्या. समजा, मोटारचाच धंदा घेऊं. टायर्सना लागणारें रबर हे खरेदी न करतां त्याची लागवड स्वतःच करावयाची; लोखंड, त्याची खाण विकत घेऊन तें शुद्ध

करून लागणारीं यंत्रें पण आपणच तयार करावयाचीं; या सर्व गोष्टी एकाच तंत्राखालीं एकाच मालकीच्या करावयाच्या म्हणजे त्यांत एकंदर नफा जास्त व उत्पादन मोठ्या प्रमाणावर. या दोन प्रवृत्तींचा आणखी विचार आपण पुढें करूं. मोठ्या प्रमाणावर पैदास सुरूं झाली म्हणजे जास्त जास्त श्रमविभागणी होते हें वर सांगितलेंच आहे. एकाच माणसानें पिंजणें, विणणें, रंग देणें, नकशी काढणें, हें सर्व करून गालिच्या तयार करण्याऐवजीं या सगळ्या क्रिया भागाभागानें निरनिराळे लोक करूं लागले तर, गालिचे मोठ्या प्रमाणावर तयार होतील हें उघड आहे. शिवाय यंत्राची जोड मिळत गेल्यानें तर हें पैदाशीचें प्रमाण फारच वाढलें आहे. भांडवलाचे सहाय्यानें यंत्रें येत आहेत. मोटारी झाल्या, टांगे बैलगाड्या कमी होऊं लागल्या. हजारों कारखाने निघाले आहेत, निघत आहेत. कांहीं कारखान्यांतून निघतें त्यापेक्षां जास्त उत्पादन करणें शक्य आहे. पण मालाला मागणी नाहीं म्हणून ते पुरेपूर काम देत नाहींत. शिवाय हजारों शोध मागें सांगितल्याप्रमाणें फायदेशीर नाहींत म्हणून तसेंच पडले आहेत. जर मागणी असेल तर आहे याच साधनानीं उत्पादन वाढविणें पुष्कळ अंशीं शक्य आहे. तथापि समाजांतील स्थिति लक्षांत घेऊन कांहीं गोष्टी होतात व कांहीं होत नाहींत. प्रत्येक लहान लहान शहरांत विजेचा कारखाना काढून, वीज उत्पन्न करून घरवाल्यांना व सार्वजनिक रस्त्यांना देणें शक्य आहे. पण दारिद्र्यामुळें तें करणें परवडत नाहीं. समाजाच्या गरजेकरितां निर्हेतुकपणें उत्पादन करावें हा हल्लीचे जगाचा सिद्धांत नाहीं. तासीं १० हजार प्रती काढणारीं यंत्रें आहेत, पण इतके अंक वाचणारे लोक नाहींत. एकतर ते मोठ्या प्रमाणावर गरीब आहेत व शिवाय शें. ९० या देशांत लिहितांवाचतां न येणारे असे आहेत. या यंत्रांची शक्ति आज वांयाच जाते कीं नाहीं ? पुष्कळ वेळां मोठया प्रमाणांवर उत्पादन करण्याला अवश्यक अशी सामाजिक परिस्थितिच नसते. याचाच सरळ अर्थ मागणी नाहीं व त्याला कारण दारिद्र्य. वाढत्या प्रमाणावर पैदास केल्यानें सरासरी खर्च कमी येतो हें मागें सांगितलें आहे. एक एंजिन, समजा १० डबे नेतें; त्यांत १०० माणसें बसलीं तरी तितकाच खर्च, व सर्व डबे भरले तरी एंजिनाला तितकाच खर्च लागणार. वीज तयार करणारे कारखाने, जहाजें वगैरे बाबतींत हाच अनुभव आहे. समजा, एक जहाज १ हजार माणसें नेऊं शकतें. जितका १ हजार माणसें नेतांना खर्च येईल तितकाच त्यांत १०० माणसें असलीं तरी येईल; कारण जहाजाच्या यत्रांना तितकेंच काम पडणार व खर्चहि तितकाच येणार. त्याचप्रमाणें यंत्रावर व देखरेखीसाठीं लागणारीं माणसेंहि दोन्ही स्थितींत तितकींच लागणार. कांहीं यंत्रें, कांहीं यांत्रिक सामग्री अशा

स्वरूपाची असते कीं, कमीजास्त पैदाशीमुळें तिच्या ऐन खर्चात कमीजास्त होऊं शकत नाहीं. मनुष्यही एका दृष्टीनें तसाच आहे. त्याची कांहीं वांटणी होऊं शकत नाहीं. एकाच रोग्याकरितां जितकें ज्ञान पैदा करणें डॉक्टरला अवश्य आहे, तितकेंच १० साठीं व तितकेंच १०० साठीं. तथापि अशीं माणसें अगर अशी सामग्री किती उपयोगांत आणतां येईल हें वर सांगितल्याप्रमाणें बाजारावर—मागणीवर—अवलंबून आहे. लोकसंख्येंत वाढ होऊन म्हणा, लोकांची आवड बदलली म्हणून म्हणा, वाहतुकीच्या जास्त सोयी झाल्या म्हणून म्हणा, कोणत्याही कारणानें मागणी वाढली कीं, मोठ्या प्रमाणावर पैदास करणें परवडतें व या सर्व गोष्टींत वर लिहिलेल्या स्वरूपाच्या सामग्रीचें फार महत्त्व आहे.

मोठ्या प्रमाणावर उत्पादन कां व कसें शक्य आहे हें वर आपण पाहिलें. उत्पादनाची पद्धति न बदलतां एखाद्या उत्पादन घटकांचें प्रमाण बदललें तर कांहीं वेळां उत्पादन वाढून तें फायदेशीरही होतें. वाढलेला खर्च लक्षांत घेतां वाढलेलें उत्पादन फायदेशीर पडतें. एका घरांतून कांहीं कपाटें दुसरीकडे न्यावयाचीं आहेत; दोन माणसें लाविलीं तर तीं कांहीं एक कपाट उचलूं शकत नाहींत. चार लाविलीं तर तीं उचलून नेतील. पण ६ लाविलीं तर तें सर्व काम लवकर होईल. याचा अर्थ जास्त माणसें लावल्यानें, झालेल्या खर्चाचे मानानें झालेलें काम फायदेशीर पडलें—लवकर झालें—व एकंदर हिशोब केला तर, माणशीं कामाची सरासरीसुद्धां जास्त माणसें लावल्यानें वाढली. पुष्कळ वेळां जास्त शक्ति असलेली यंत्रें अगर जास्त माणसें उपयोगांत आणणें एकंदरींत परवडतें. उदा०, एखाद्या दुकानीं १० माणसें दिवसभर ठेवणें अगर संध्याकाळीं कांहीं तासांकरितां ३० माणसें ठेवणें अवश्य असलें तर दिवसभर १० माणसें ठेवणें हें जास्त फायदेशीर असेल. समजा, दोन बंदरांतील व्यापार वर्षभर सारखा नाहीं; ज्यावेळीं जास्त असतो त्यावेळीं दोन हजार टनी बोट अवश्य होते व कमी असेल तेव्हां, म्हणजे मोसम नसतांना एक हजार टनी पुरे होईल. अशा स्थितींत दोन हजार टनी वर्षभर ठेवणें जास्त सोयीचें आहे. कारण मोसमांत दोन जहाजांना लागणारा खर्च व एका जहाजाला वर्षभर लागणारा खर्च, यांत जर दुसऱ्या योजनेंत कमी खर्च येत असेल तर तीच योग्य. कांहीं काळ उतारूं पुरेसे मिळणार नाहींत, पण एकंदरीनें विचार करतां जर फायदा होत असेल तर, तीच योजना स्वीकारणें योग्य होईल. त्याचप्रमाणें दुकानांतील नोकरांच्या उदाहरणांत कांहीं तास त्यांना काम नसेल पण थोड्या वेळांसाठीं ३० माणसें लावण्याचा खर्च जास्त होत असेल तर, १० माणसें दिवसभर ठेवणें हेच योग्य आहे. कांहीं काळ तीं काम करीत नसतील पण एकंदरीनें

त्यांना कायम ठेवणें फायदेशीर असेल तर तसें करणें बरोबर आहे. तसेंच यंत्राचें उदाहरण घेऊं. समजा, एका गांवीं वर्षांतून दोनदां मोठी जत्रा भरते व त्यावेळीं विजेची व पाण्याची मोठ्या प्रमाणावर मागणी असते. जर वीज तयार करण्याचें मोठें यंत्र व पाणी काढण्याचें मोठें यंत्र अशीं लावलीं तर, ही गोष्ट अगदीं उघड आहे कीं, यात्रेचे दिवस सोडून दिले तर त्यांना पुरेसें काम नाहीं; पण तीं लावून त्यांना वर्षभर लागणारा खर्च व त्यापासून मिळणारें पाणी व वीज, यांची सरासरी व लहान लहान यंत्रें लावून, यात्रेचें वेळीं आणखी यंत्रें आणून व इतर प्रकारें याच सोयी करून होणारा खर्च व उत्पादनाची सरासरी काढून, जर पहिल्या योजनेंत कमी खर्च व सरासरी जास्त होत असेल तर तीच योजना अमलांत आणणें योग्य आहे. कांहीं उत्पादनाचे घटक यांची किमान उपयोग देण्याची मर्यादा ठरलेली असते, त्याखालीं ते जाऊं शकत नाहींत; व त्यांचा जास्त उपयोग केल्यास ते जास्त उपयोगी होतात. इतकेंच नव्हे तर जास्त कराव्या लागणाऱ्या खर्चाचे मानानें जास्तच उपयोगी पडतात. मग ते घटक जहाज असो, विजेचें यंत्र असो, अगर मनुष्य असो. कारण हे सर्व घटक अशा स्वरूपाचे आहेत कीं, त्यांचे भाग पाडतां येत नाहींत. निम्मा मनुष्य काम करूं शकत नाहीं. निम्मे जहाज काम करूं शकत नाहीं. त्यांच्या उपयोगाची किमान मर्यादा निश्चित आहे. लाडू आपण अर्धा करून खाऊं शकतों, पण घरांत निम्मा हिस्सा असला तर पहारेकरी कांहीं अर्धेंच घर राखूं शकत नाहीं. तो राखील तर तें पूर्णपणें; कारण त्याच्या उपयोगीपणाची किमान मर्यादा ठरलेली आहे.

---

# १. भांडवल

उत्पादनाचा विचार करतांना मधून मधून भांडवशाहीचाही आपण उल्लेख केला. कारण जे मुख्य तीन वर्ग उत्पादन–घटकांचे पाडले आहेत, त्यांत, भांडवल हा एक वर्ग आहे. एकंदर व्यवहारशास्त्र, अर्थशास्त्र समजून घ्यावयाचें म्हणजे साधारणतः कांहीं प्रमुख कल्पना व सिद्धांत, समजून घेणें होय. म्हणून हे सिद्धांत निश्चित करणारे जे शब्द त्यांचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. आपण कांहीं विद्वानांच्या दृष्टीनें विचार करीत नाहीं म्हणून प्रत्येक शब्दाची अगदीं बिनचूक व्याख्या करणें जरूर नाहीं; सामान्य कल्पना आली म्हणजे झालें. या दृष्टीनें 'भांडवल' या शब्दानें काय कल्पना येते व व्यवहारांत काय अर्थानें हा शब्द वापरला जातो हें आपण पाहूं. भांडवल म्हटल्याबरोबर चालू उत्पन्न ही कल्पना पण लागलीच डोळ्यांपुढें येते. एखाद्याकडे १०० रु. मुद्दल येणें आहे असें म्हटल्याबरोबर व्याजाची कल्पना अगदीं सहज उभी राहते. मुद्दल म्हटलें कीं व्याज आलें. तसेंच भांडवल व उत्पन्न हे दोन कल्पनांचे दोन शब्द आहेत. एका वखारींत ग्यानबानें ४०० रु. भांडवल घातलें आहे असें म्हटलें म्हणजे साहजिकच मनुष्य असें विचारतों कीं, त्या वखारीच्या धंद्यापासून ग्यानबाला महिन्याला अगर वर्षाला काय उत्पन्न येतें ? यावरून भांडवल व उत्पन्न यांचा निकट संबंध आहे, पण ते एक नाहींत हे स्पष्ट होते. एकांत उत्पादनार्थ, उपयोगाकरितां सांठवण ही कल्पना आहे व दुसऱ्यांत तयार होण्याची. भांडवल म्हणजे वस्तूंची सांठवण म्हटलें तरी चालेल. भांडवल म्हणजे त्या धंद्यांत अगर व्यवहारांत घातलेला पैसा अगर त्यापासून उत्पादनाकरितां घेतलेलीं साधनसामग्री यंत्र, शेड वगैरे; व उत्पन्न म्हणजे जें उत्पादन होतें त्याच्या विक्रींतून दरसाल अगर दरमहा येणारा पैसा अगर त्या किंमतीचा निदर्शक माल. भांडवलाला जर झाडाची उपमा दिली तर उत्पन्न म्हणजे त्याला वर्षाला येणारीं फळें. भांडवल हें कोणत्याही क्षणाला किती आहे हें आपण सांगूं शकतों, मात्र उत्पन्न सारखें होत असतें, चालू असतें. ज्या समाजांत खाजगी मालमत्ता

कायद्यानें मानली आहे, आणि आज तरी रशियाखेरीज सर्व जगांत खाजगी मालमत्तेच्याच खांबांवर व्यवहाराची द्वारका वसविली आहे, त्या ठिकाणीं मनुष्याचें भांडवल अनेक स्वरूपीं असेल. शेअर्स (भाग), रोखे, स्थावर मिळकत वगैरे. शेअर्स, रोखे हे नुसते कागद नाहींत तर दरसाल त्यांच्या मालकांना कांहीं निश्चित उत्पन्न अगर धंद्यांत नफा झाल्यास त्या मानानें हिस्सा मिळत असतो. भांडवल म्हणजे सर्व तऱ्हेच्या भौतिक वस्तूच असणार. जेथें गुलामगिरी असेल तेथें फार तर गुलामांची संख्या मालकांचे भांडवल म्हणतां येईल. पण तें सोडून दिल्यास भांडवल म्हणजे वस्तु. आतां एखाद्या देशाचें भांडवल किती हें ठरवावयाचें झाल्यास त्यावेळीं तयार झालेलीं उत्पादनाचीं, पैदाशीचीं साधनें. उदा०, कारखाने, यंत्रें, रेल्वे, कच्चा माल, त्याचप्रमाणें तयार होत आलेला, तयार झालेला माल, किंबहुना दुकानदारांजवळ शिल्लक असलेला माल सुद्धां भांडवलच. कारण प्रत्यक्ष अखेरचा उपयोग करणाऱ्या गिऱ्हाइकाचे हातांत पडेपर्यंत, जो माल ज्या स्थितींत असेल, तो सर्व भांडवल. कांहींच्या मतें जमीन कसणाऱ्याचे हातांत गेली व माल उपभोगी गिऱ्हाईक यांच्या हातांत गेला म्हणजे त्यांचें भांडवल हें स्वरूप नाहींसें होतें. जमीन ही सृष्टीची देणगी व भांडवल हें मनुष्यानें निर्माण केलेलें, म्हणून कांहींच्या मतें जमीन ही भांडवल होऊं शकत नाहीं. आपण भांडवल हें कसें आलें, कोठून आलें याचा विचार करीत नाहीं, तर तें काय करतें हें पाहत आहोंत. कूळ पाहात नाहीं, त्याचा पराक्रम पाहात आहों. भांडवलाचें कूळ पाहण्यांत अर्थ नाहीं. म्हणून जमीन ही माणसाला उत्पादनाला मदत करते म्हणून ती क्रियेनें भांडवल आहे. भांडवल प्रयत्नानें वाढवितां येतें पण सृष्टीनें दिलेल्या गोष्टी वाढवितां येत नाहींत. जगांतील आज लागवडीस असलेली जमीन कांहीं आज आहे तशी उत्पन्न झालेली नाहीं. माणसांनी हजारों वर्षे त्यावर मेहनत मशागत केली आहे, श्रम व पैसा ओतला आहे. व्यापारांत मनुष्य ज्याप्रमाणें भांडवल घालूं शकतो, ते वाढवूं शकतो त्याचप्रमाणें जमिनींतसुद्धां जास्त भांडवल घालून, मनुष्य जास्त उत्पन्न काढूं शकतो, त्यामुळें सृष्टीनें जरी कांहीं गोष्टी दिल्या असल्या तरी, आज मनुष्याच्या प्रयत्नांनीं त्यांचें स्वरूप बदललें आहे. म्हणून जमीन हें भांडवल म्हणणेंच योग्य होईल. तथापि एका विशिष्ट तऱ्हेचें भांडवल म्हणणें बरें. त्याचप्रमाणें उपभोगाकरितां वस्तु गिऱ्हाइकाचे हातांत आली म्हणजे ती भांडवल राहत नाहीं असा एक विचार मांडण्यांत येतो. कारण उपभोग घेणाराचे हातांत वस्तु आली म्हणजे आतां तिला कांहीं उत्पादनाचा संस्कार शिल्लक राहिला नाहीं. थंडी निवारण्याकरितां चुलींत अगर शेगडींत कोळसा टाकला म्हणजे उत्पादनक्षेत्र संपलें.

माणसाची गरज भागविण्याचें काम, त्यांस समाधान देण्याचें काम सुरू झालें. पण थंडी निवारणें ही एक सोय उत्पन्न करण्याकरितांच कोळसा जाळला गेला असें म्हटलें म्हणजे थंडीचे निवारण्याची सोय हें उत्पादन झालें व कोळसा एक उत्पादन घटक झाला; म्हणजे त्याचा समावेश भांडवलांत करावयास पाहिजे. या दृष्टीनें, अन्न ताकद उत्पन्न करण्याकरितां, घरें आच्छादनाकरितां आहेत असें समजलें म्हणजे गिऱ्हाइकांचे हातांतहि अद्याप उपयोग न झालेली प्रत्येक वस्तु भांडवलच होईल. खाजगी मोटार स्वतः वापरली तर ती भांडवल नाहीं, पण तीच थोडा वेळ भाड्यानें दिली तर भांडवल होईलच कीं नाहीं ? म्हणून कांहींच्या मतें माणसांच्या हातांत असलेल्या वस्तु ज्यांचा अद्याप उपभोग घेतला गेला नाहीं त्या सर्व भांडवलच. फारतर त्यांना उपभोगी– गिऱ्हाईक यांचें भांडवल म्हणावें; कारण आपण उत्पादक व उपभोग्य असे वस्तूंचे वर्ग पाडले आहेत. त्या दृष्टीनें उपभोगी यांचें भांडवल म्हणावें, तथापि आपल्याला राष्ट्राचें भांडवल काय, याची कल्पना आली. सर्व उत्पादक वस्तु, उत्पादनाची साधनसामग्री यांची जी वट रास होईल तें राष्ट्राचें भांडवल; व ज्या वस्तु प्रत्यक्ष उपभोगाकरितां मनुष्याच्या हातांत आहेत, त्यांचा समावेश या भांडवलांत होणें बरोबर नाहीं. अशा वस्तूंना उपभोग्यांचें अगर गिऱ्हाइकांचें भांडवल म्हटल्यानें कल्पना सुबोध होत नाहीं.

असो, हें भांडवल कसें सांचत जातें याचा आपण विचार करूं. भांडवलशाही राष्ट्रें, समाजवादी राष्ट्रें, यांचा विचार सध्या आपण करीत नाहीं. तो तूर्त बाजूला ठेवूं. भांडवलाची मालकी व ताबा कोणाकडे यावर या दोन पद्धति अवलंबून आहेत. परंतु कोणतीही समाजरचना असली तरी उत्पादनासाठीं व्यवहारांत भांडवलाची अवश्यकता असणारच. म्हणून भांडवल कसें वाढतें व तें वाढल्यापासून समाजाच्या गरजा मोठ्या प्रमाणांत जास्त उत्पादन करून कशा भागविल्या जातात, हें पहावयाचें आहे. जर राष्ट्रांत जास्त घरें बांधलीं गेलीं, जास्त फार्निचर तयार झालें व अशाच पुष्कळ टिकाऊ गोष्टी तयार झाल्या, तर त्यामानानें समाजांतील लोकांना जास्त घरें रहावयास मिळतील व त्यांच्या सोयी जास्त प्रमाणांत होतील. त्याचप्रमाणें उत्पादक वस्तूंची वाढ झाली कीं, त्यांपासून उत्पादन वाढून मनुष्याच्या गरजा भागविल्या जातील. उदा०, रेल्वे वाढल्या, प्रवासाची सोय झाली, लांबचा माल येऊं लागला; मच्छीमारी बोटी वाढल्या माशांचा पुरवठा जास्त वाढेल. तात्पर्य, उत्पादक वस्तूंत वाढ झाली कीं अप्रत्यक्ष मदत होते व उपभोग्य वस्तूंची वाढ झाली तर प्रत्यक्ष मदत होते. कारण उत्पादक वस्तूंच्या सहाय्यानें उपभोग्य वस्तु निर्माण करणें हा तर

सर्व पैदाशीचा हेतु. माणसांना मासे हवेत मचवे नकोत; पण त्याकरितां मचवे हें साधन आहे, उत्पादक वस्तु आहे. उत्पादक वस्तूंची वाढ होणें इष्ट आहे; या वस्तु अगर हें भांडवल कसें वाढवावयाचें हा मुख्य प्रश्न आहे. बोटीचेंच उदाहरण घेऊं. जास्त बोटी बांधावयाच्या म्हणजे पूर्वींपेक्षां त्या समाजांतील माणसांनीं जास्त काम केले पाहिजे; जास्त वेळ बोटी बांधण्याचे कामाकडे दिला पाहिजे; म्हणजे आपल्या आरामाच्या वेळेचा स्वार्थत्याग केला पाहिजे. जर ही गोष्ट करावयास ते तयार नसतील तर काय करणें शक्य आहे हें आपण पाहूं. अन्न वस्त्र व इतर लागणाऱ्या वस्तु थोड्या थोड्या सांचविणें, व समजा, ११ महिन्यांनंतर एक महिना कांहीं काम नाहीं केलें तरी एक महिना पुरेल इतकी अन्नवस्त्रादिक गोष्टींची सामग्री शिल्लक राहिली; मग या स्थितींत त्या लोकांनीं नेहमींचा उद्योग म्हणजे त्यांना लागणाऱ्या वर लिहिलेल्या गोष्टी उत्पन्न करणें हा न करतां हा १२ वा महिना नवीन बोटी बांधण्याकडे खर्च करावा, म्हणजे बोटी तयार होतील; व जास्त वेळ कामहि करावें लागणार नाहीं. हा एक मार्ग झाला. दुसरा मार्ग असा कीं दररोज जर ते १२ तास काम करीत असतील तर ११ तासच नेहमीचें काम करावें व १२ वा तास बोटी बांधण्याकरितां खर्च करावा, म्हणजे सालअखेर पहिल्या योजनेनें होतील तितक्या बोटी नवीन योजनेनेंहि तयार होतील. तिसरा प्रकार. त्यांच्यांतील बारा माणसांपैकीं एक, या प्रमाणांत माणसें बाजूला काढून त्या माणसांनीं नवीन बोटी बांधाव्यांत व त्यांच्या गरजा बाकीच्यांनीं भागवाव्या. हा तिसरा प्रकारच आपणांस व्यवहारांत आढळतो; कारण यांत श्रमविभागणी आहे व शिवाय अन्नवस्त्रादि गोष्टी सांचविणें ही कटकट नाहीं.

तथापि यांपैकीं कोणताहि प्रकार घेतला तरी तेवढ्या वेळेपुरतें त्या समाजाचें उत्पादन—उपभोग्य वस्तूंचें उत्पादन—व उपभोग कमी होणारच. कारण कांहीं माणसांचे श्रम बोटी बांधण्याकडे खर्च झाले व त्यामुळें उपभोग्य वस्तूंचें उत्पादन व उपभोग त्या मानानें कमी झाला. आतां हीं जीं कांहीं माणसें बोट बांधण्याकडे गुंतलीं, त्यांना बोटी संपूर्ण तयार करण्यास कांहीं काळ लागणार व नंतर बोटी तयार झाल्यावर त्यांच्या साहाय्यानें जास्त मासे मिळून त्या समाजाचे उपभोग्य वस्तूंत भर पडणार. पण त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, बोटी पुष्कळ दिवस टिकतात. याचा अर्थ माणसांनीं बोटी बांधण्याचे श्रम केले, त्या श्रमांमुळें जितके दिवस बोटी टिकतील तितके दिवस माशांचा अधिक पुरवठा त्या समाजाला होईल. दुसरी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, नवीन बोटीसाठीं प्रत्यक्ष श्रम करण्याला सुरुवात केली व मासे नवीन बोटीमुळें येऊं लागले, या दोन घटनांत पुष्कळ काळ जातो.

म्हणजे श्रम 'पेरून' वस्तूंचें 'पीक' काढणें यांत नेहमीं कमीजास्त काळ जाणारच; व हा जो मधला 'गर्भवासा'चा काळ जातो त्यामुळेंच भांडवलाला महत्त्व आलें आहे. जर सर्व उपभोग्य वस्तु—ज्या मनुष्यांच्या गरजा सरळ भागवितात, त्या ताबडतोब कसलीही पूर्व मेहनत व मशागत, कच्चा माल, उत्पादक वस्तु अगर याशिवाय तयार होत असत्या तर, जास्त भांडवल घालून पैदास वाढविण्याची जरूरी पण वाटली नसती. अल्लाउद्दिनाचे कंदिलाप्रमाणें घासल्याबरोबर उत्पन्न झालेल्या राक्षसास जी हवी असेल ती वस्तु आणण्यास सांगावयाचें कीं ती आलीच. तथापि या उदाहरणांत सुद्धां कंदील घासण्याचे श्रम पडतातच व थोडा वेळही जातोच. यापेक्षां माणसाचे मनांत आल्याबरोबर ती वस्तु पूर्ण स्वरूपांत त्याचेसमोर हजर झाली असती तर गोष्ट निराळी. पण तसें घडत नाहीं. नुसतें मनांत आणून कांहीं होत नाहीं. कल्पनेनें घोडे तयार होत असते तर प्रत्येक भिकारी शिलेदार झाला असता.

म्हणून भांडवल हें एक श्रमापासून, माणसांच्या श्रमापासून, तयार झालेलें उत्पादन अगर पैदास आहे. भांडवलाचे निर्माते श्रम, मानवी श्रम आहेत. बोटीच्या उदाहरणांतच पहा. बोटी हें भांडवल माणसांनीं श्रम केले म्हणून उत्पन्न झालें, सांचलें. अर्थात् बोटींना लांकडें लागलीं, तीं झाडांपासून काढलीं, झाडें जमिनीवर उगवलीं. तथापि झाडांची लागवड, त्यांची निगा, त्यांची तोड, त्यांची कापणी व नंतर बोटीचे कामीं उपयोग, या सर्व अवस्थांत मनुष्याचे श्रम नसते तर कांहींच झालें नसतें. ज्या कारणानें बोटींस 'भांडवल' स्वरूप आलें तें कारण म्हणजे मानवी श्रम. जमिनीची जोड खरी पण आदिकारण श्रमच. कस्तुरीला रंग व सुवास दोन्ही आहेत. रंग काळा कां होईना, पण रंग आहे. पण कस्तुरीचें कस्तुरित्त्व, कस्तूरीपणा, सुवासामुळें आहे, तिच्या रंगामुळें अगर अन्य गुणामुळें नाहीं. त्याच न्यायानें भांडवल हें मनुष्याच्या श्रमानेंच अस्तित्वांत येतें. तोच त्याचा पाया, आत्मा, निर्माता सर्व कांहीं आहे. वरच्या बोटीचे उदाहरणांत आपण असेंही पाहिलें कीं, बोटींची संख्या वाढविण्याकरितां भांडवलांत भर टाकण्याकरितां, थोडा वेळ त्या समाजांतल्या लोकांना कांहीं गोष्टी कमी कराव्या लागल्या. कांहीं गोष्टींच्या उपभोगाचें प्रमाण कमी करावें लागलें. पण हा जो त्याग करावा लागला अगर थांबावें लागलें, ही गोष्ट त्यांनीं केली, यांत त्यांची खात्री होती कीं, नवीन बोटी झाल्या म्हणजे माशांचा पुरवठा वाढेल, पुष्कळ काळपर्यंत वाढेल व केलेले श्रम सार्थकीं लागतील. पुढील फायदा व पुढें मिळणाऱ्या सुखाच्या हेतूनेंच, प्रेरणेनेंच ही गोष्ट होते. आधीं भांडवलाचे सहाय्यानें पैदाशीचीं साधनें निर्माण करावयाचीं व त्यांच्या सहाय्यानें प्रत्यक्ष उपभोग्य वस्तूंची

पैदास वाढवावयाची, हा नेहमींचाच क्रम आहे. कारण एकदम अगर ताबडतोब उपभोग्य वस्तु निर्माण होत नाहींत व झाल्या तरी मोठया प्रमाणांत होत नाहींत. वरील उदाहरणांत बोटीऐवजीं नुसत्या जाळ्यांनीं पाण्यांत उभें राहून जितके मासे धरतां आले असते, त्यापेक्षां बोटींच्या सहाय्यानें खास अधिक धरतां येतात. म्हणूनच बोटीची अवश्यकता; व म्हणूनच भांडवलाची अवश्यकता व सांठवण. कारण बोटी तयार केल्या याचा अर्थ भांडवल उभें केलें व सांठविलें असाच होतो.

आतांपर्यंत भांडवल कसें निर्माण होतें, त्याची अवश्यकता कशी आहे, याचा थोडा विचार केला; आतां तें अवश्य त्या प्रमाणांत कसें कायम ठेवलें जातें याचा विचार पाहूं. बोटीचेंच उदाहरण घेऊं. समजा, वरच्या उदाहरणांत घेतलेल्या बोटी पांच वर्षें काम देतात व नंतर त्या निरुपयोगी होतात. या पांच वर्षांत या समाजानें निकामीं होणाऱ्या बोटींच्या जागीं नवीन बोटी तयार करण्याची जर व्यवस्था केली नाहीं तर पूर्वीची स्थिति येईल. माशांचा पुरवठा कमी होईल कारण बोटीच नाहींत! त्यांना हा पुरवठा अवश्य असेल तर, पुनः त्यांना कांहीं गरजा कमी करून, कांहीं त्याग करून, पूर्वींप्रमाणें कांहीं माणसें, अगर वेळ, बोटी बांधण्याकडे खर्च करावा लागेल. जर त्यांना हा पुरवठा कायम ठेवणें इष्ट वाटत असेल तर, या पांच वर्षांतच कांहींतरी सोय करून जुन्या बोटी निकामीं होण्याचे वेळींच नवीन बोटी तयार ठेवणें जरूर आहे. या नवीन बोटी तयार ठेवणें म्हणजेच ‘ भांडवल ’ राखणें व कार्यक्षम ठेवणें होय. उत्पादनाची साधनें व सामग्री राखणें म्हणजेच भांडवल राखणें, कार्यक्षम ठेवणें होय. वरच्या उदाहरणांत साधनसामग्री बोटी होत्या; अगदीं साध्या स्वरूपाच्या वस्तु होत्या. पण समाजांत, आधुनिक समाजांत, इतका साधेपणा नाहीं. यंत्रें व अन्य सामग्री विविध स्वरूपाची आहे. त्याचबरोबर नवीन शोध लागत आहेत. उत्पादनाचे साधनांत प्रगति होत आहे. तशीच माणसांची अभिरुचि, आवडनिवड बदलत आहे म्हणूनहि भांडवल चालू ठेवण्याची क्रिया, त्यामानानें विविध स्वरूपाची होईल. लोकांना मासे नकोत, मांस हवें असें झालें तर बोटी न वाढवितां तेच श्रम, मेंढ्यांची पैदास वाढविण्याकडे खर्च करावे लागतील. समाजाला ज्या उपभोग्य वस्तूंची गरज आहे त्या उत्पन्न करण्याकरितां जी जी सामग्री, उत्पादनाचीं साधनें लागतात, ती ती तयार करण्याची, राखण्याची व्यवस्था समाज करीत असतो व याच क्रियेला भांडवल राखण्याची, कायम ठेवण्याची क्रिया म्हणतात.

पुष्कळ वेळां, माणसाला असा अनुभव येतो कीं, त्याला आपल्या शिल्केंतून खर्च करावा लागतो. समजा, एखादे वेळीं तो आजारी पडला, अगर नोकरी गेली,

किंवा धंदा बसला, तर चालू उत्पन्न बंद झाल्यामुळें त्याला शिलकेंतून खर्च करून जिवंत रहावें लागेल व शिल्लकहि मर्यादित असल्यामुळें त्याची राहणी त्याला कमी दर्जाची करावी लागेल व कांहीं काळानें त्याजवर उपाशीं राहण्याचा प्रसंग येईल. समजा, समाजामध्यें उत्पादन सारखें चालू आहे. उत्पादन सामग्री कमी होऊं नये म्हणून तिचेंहि उत्पादन चालू आहे. नवीन घरें, नवीन रस्ते, नवीन वाहतुकीचीं साधनें, सर्व प्रकारच्या गरजेच्या वस्तूंचा पुरवठा चालू आहे. याच उत्पादनाबरोबर नवीन कारखाने, नवीन यंत्रें, नवीन कच्चा माल, म्हणजे उत्पादक वस्तूंचा पुरवठाहि तयार करणें म्हणजे भांडवल राखणें, वाढविणें हेंहि चालू आहे. समजा, नवीन उत्पादक वस्तु अगर उत्पादनाची सामग्री तयार करण्यांत श्रम करण्याऐवजी, उपभोग्य वस्तु तयार करण्यांत श्रम खर्च होऊं लागले तर, त्या वस्तूंचें उत्पादन वाढेल व राहणी सुधारेल. कोंबड्या नीट पाळून त्यांपासून अंडीं व कोंबड्या तयार करण्याऐवजीं मोठ्या सपाट्यानें कोंबड्याच मारणें सुरू करून त्यांचा उपयोग होऊं लागला तर कांहीं दिवस चैन होईल. पुढें हाहाःकार होईल. तसेंच यंत्रें कारखाने वगैरे सामग्री दुरुस्त ठेवून, चालू ठेवण्याकडेच श्रम व पैसा खर्च न करतां, तो जर नुसता माल तयार करण्याकडे खर्च होऊं लागला तर, कांहीं काळ मालाची पैदास वाढेल, चंगळ होईल; राहणीवर परिणाम होईल, पण शेवटीं सर्वच उत्पादन बंद होईल. उत्पादन-सामग्रीचा उपयोग, भांडवलाचा उपयोग, उत्पादनसामग्री तयार करण्याकडे न केला व नुसता उपभोग्य वस्तु निर्माण करण्याकडे केला तर, भांडवल नाहींसें होईल व असें करणारा देश पुनः अगदीं मागसलेल्या स्थितींत जाईल; म्हणून नेहमीं व्यवहारांत, भांडवलांतून समाजाच्या गरजांचा, उपभोग्य वस्तूंचाच पुरवठा करणें हें चुकीचें आहे. कोठल्याहि धंद्यांत जर भांडवलांतूनच चालू खर्च होऊं लागला तर थोड्या दिवसांत तो धंदा बसतो. संकटविशेषीं हें करणें व थोड्या वेळांपुरतें करणें क्षम्य ठरेल. नाहीं तर हें एक भांडवलभक्षणच आहे. युद्धकाळांत असले प्रसंग राष्ट्रांवर येणें साहजिकच आहे. युद्धकाळांत जी रक्कम ब्रिटन व अन्य देशांना उभी करावी लागली त्यांपैकीं कांहीं भाग कर बसवून, चालू उत्पन्नांतून उभी करण्यांत येई व कांहीं भाग देशाच्या भांडवलांतून म्हणजे सोनें, व रोखे व जी संपत्ती उत्पादक साधनें व सामग्री कायम ठेवण्याकरितां खर्च झाली असती त्यांतून, म्हणजे देशाचे भांडवलांतून. यामुळें साहजिकच राहणीवर परिणाम झाला व तो होत आहे. जनतेला चालू उत्पन्नांतून उपभोग कमी करून सरकारला कर्ज देण्यास सांगण्यांत आले व त्या मानानें भांडवलाचा ऱ्हास जरी कमी होत असला तरी तेवढयानें होणारा परिणाम

टळत नाहीं. भांडवल राखलें पाहिजे, वाढविलें पाहिजे, एवढेंच नव्हे तर भांडवलांतून चालू गरजा भागवतां कामा नये, नाहीं तर हाहा:कार हा परिणाम ठेवलेलाच आहे.

आतांपर्यंत आपण केलेल्या विवेचनावरून ही गोष्ट अगदीं उघड आहे कीं, मनुष्याच्या गरजा भागविणाऱ्या वस्तु—उपभोग्य वस्तु — भांडवलशाही, पक्क्या भांडवलशाही पद्धतीनें तयार केल्या जातात. श्रमविभागणीचें तत्त्व शक्य तितक्या प्रमाणांत वाढविलें गेलें असून वस्तु अगदीं भागाभागानें तयार होत असते. नुसतें कापड म्हटलें तर किती तरी उत्पादन अवस्थेंतून जाऊन ते तयार होतें. शेतकऱ्याचे श्रमानें कापूस, पिंजलेल्या कापसाचा जिनिंग प्रेसच्या मजुरांच्या श्रमानें गठ्ठा, सुताच्या गिरणीच्या मजुरांच्या श्रमानें सूत, तसेंच कापड गिरणीच्या मजुरांच्या श्रमानें कापड, याशिवाय या कारखान्यांत वापरलेला कोळसा खाणींतून काढणाऱ्या मजुरांचे श्रम वगैरे अनेक तऱ्हांच्या श्रमविभागणीनें व अनेक अवस्थांतून कापड ही वस्तु तयार झाली. हें लक्षांत धरलें तर जगांतील वस्तूंचें मोठें प्रमाण उत्पादक वस्तूंच्या स्वरूपाचें असतें; व तें उपभोग्य वस्तु तयार होण्याकडे वाट चालत असतें. या व्यवहारांत जणूं साधकांची संख्या जास्त व सिद्धांची थोडी. कणीक भिजविणें चालूच आहे, जरूर तेवढ्या पोळ्या भाजावयाच्या असा क्रम आहे. पूर्ण वस्तु तयार होईपर्यंत पुष्कळ वेळां महिनेच्या महिने जावे लागतात. हें उत्पादनाचें कार्य एकाच बिंदूकडे म्हणजे उपभोग्य वस्तु तयार करण्याकडेच वाट चालत आहे; व त्या वस्तूंच्या स्वरूपाप्रमाणें ती पूर्ण होण्यास कमीजास्त वेळ लागत असतो. समाजाला ज्या वस्तु कमीजास्त प्रमाणांत हव्या असतात त्या त्या मानानें उत्पादनाची सामग्री अगर घटक कमीजास्त करावे लागतात; व भांडवलशाही उत्पादनाच्या पद्धतीनें कमी सामग्री अगर घटक खर्चीं घालून जास्त उत्पादन, जास्त पैदास वाढविणें शक्य होतें. यंत्रामुळें निरनिराळ्या प्रकारांनीं उत्पादन होत असल्यामुळें, जास्तींत जास्त उत्पादन ज्यायोगें होईल अशीं यंत्रें घेऊन समाज उत्पादन वाढवूं शकतो. या तऱ्हेची यंत्रसामग्री म्हणजे जास्त भांडवल व जास्त भांडवल उभें करावयाचें म्हणजे त्या मानानें समाजाला उपभोग्य वस्तूंचे उपभोगाबाबत कांहीं काळ कळ काढावी लागते व तात्पुरता त्याग करावा लागतो.

भांडवल हें राखावें लागतें म्हणजे दुरुस्ती, मोडतोड नीट करणें, उत्पादनसामग्री, उत्पादनघटक नीट ठेवणें हें अवश्य असतें. उत्पादनाचे कामांत सर्व कच्च्या वस्तूंपासून अगदीं तयार झालेल्या मालापर्यंत, सर्व वस्तूंचा सांठा ठेवणें जरूर असतें. कारण कोणत्या वेळीं मागणी येईल याचा नेम नसतो व आयत्या वेळीं कच्चा माल मिळेल न मिळेल म्हणून कच्चा माल सुद्धां भरून ठेवणें हें हल्लींचे युगांत उत्पादनाचे

कामीं जरूर असतें. या सगळ्या वस्तूंचा सांठा म्हणजे भांडवलाचा एक भागच होय. कारागिराची हुशारी हें एक भांडवलच आहे. चांगले धट्टेकट्टे मजूर असणें, ते हुशार व शिकलेले असणें, हें कांहीं भांडवल नाहीं असें नाहीं. अधिक शिक्षण देऊन, त्यांच्या राहणींत, सुखसोयींत, भर टाकून त्यांना जास्त कार्यक्षम करणें हें एक भांडवल वाढविण्यासारखेंच आहे. यंत्राच्या शोधाकरितां प्रयोगशाळा काढणें, त्याकरितां शास्त्रज्ञ ठेवणें हें सुद्धां भांडवल वाढविण्यासारखेंच आहे. हें शेवटचें तत्त्व भांडवलशाहींत पटतें, मजुरांच्या बाबतींत मात्र तें पटत नाहीं ! ! अधिक वेतन देऊन अधिक काम घेणें किंवा सार्वजनिक अगर कारखानदारांच्या पैशांतून मजूर वर्गाच्या सुखसोयी वाढविणें ह्या गोष्टी आतां रूढ होत आहेत.

---

# १०. हुकूमशाहींतील उत्पादन

समाजाची रचना कशी कां असेना काय उत्पन्न करावयाचें, काय पैदास करावयाची, याचा निकाल त्याला घ्यावाच लागतो. समाजांतल्या सर्व माणसांच्या सर्व गरजा भागणें हें अगदी अशक्य; तेव्हां कोणाच्या व कोणत्या गरजा भागवावयाच्या व कोणत्या न भागवावयाच्या याचा निर्णय समाजाला घ्यावाच लागतो. याचाच अर्थ उत्पादनाची जी साधनसामग्री आहे ती कोणत्या धंद्यांत, कशा प्रमाणांत खर्च करावयाची, वांटून द्यावयाची, याचा निर्णय घेणें हा होय. भांडवलशाही राष्ट्रांत जेथें उत्पादनावर नियंत्रण नाहीं तेथें, हे निर्णय कसे घेतले जातात, ते घेतांना कोणतें गमक विचारांत घेतलें जातें, हें आपण मग पाहूं. कारण तेथें थोडा आवडीनिवडीला वाव आहे. मनुष्याच्या इच्छेप्रमाणें मागणी निरनिराळ्या स्वरूपाची असूं शकते. पण आज आपल्याला सर्वत्र हुकूमशहांचे पराक्रम ऐकूं येत आहेत. त्यांच्या राष्ट्रांत हे निर्णय कसे घेतले जात असतील हें पहाणें मनोरंजक होणार आहे म्हणून त्याचा आपण प्रथम विचार करूं.

हुकूमशहाचे राष्ट्रांतही भांडवलशाहीच असते, तथापि तेथें तिचें स्वरूप जरा निराळें असतें. हुकूमशहाचें सर्वांनीं ऐकलेंच पाहिजे असें असल्यामुळें पुष्कळ अडचणी ज्या मागणीपुरवठयाचा विचार करतांना आपल्याला दिसल्या, त्या येथें दिसणार नाहींत. तेथें कांहीं पसंतीचें कोष्टक नाहीं, विकल्प नाहीं. तो जें ठरवील जें पसंत करील तें प्रमाण, तीच आज्ञा. त्याबरहुकूम उत्पादन. तथापि हुकूमशहालासुद्धां निर्णय घेतांना कांहींतरी गोष्टी, कांहीं आंकडे, कांहीं विचार, कांहीं हेतु लक्षांत घ्यावे लागतात. नुसत्या अनुमानधक्क्यानें अगर आंतल्या आवाजानें हें एवढे विराट व विविध उत्पादनाचें जग बनवितां येणार नाहीं. त्याचा व्यापार सूत्रवत् करतां येणार नाहीं. त्यालासुद्धां कांहीं पद्धतीनें, कांहीं तत्त्वानेंच, या गोष्टी करणें प्राप्त आहे. आपण कल्पना करूं कीं, तो कसा निर्णय घेत असेल? समजा, अनेक उत्पादकघटक आहेत, मुबलक आहेत; पण त्यांपैकीं एक मर्यादित आहे

व तोच अत्यंत अवश्यक आहे. समजा, मजुरांचा पुरवठा मर्यादित आहे व जमीन मुबलक आहे. त्याचा हेतु जास्तींत जास्त उत्पादन करण्याचा आहे. मग साहजिकच तो मजुरांची वांटणी धंद्यागणिक अशी करील कीं, माणशीं सरासरी उत्पन्न जास्तींत जास्त–कमाल यावें. येथें जमिनीचें उदाहरण घेतलें आहे. तरी तिची अशी वांटणी करील कीं, माणसामागें उत्पन्नाच्या प्रमाणाची सरासरी कमाल पडेल. याचा अर्थ सर्व धंद्यांत अगर सर्व प्रकारच्या उत्पन्नाच्या जमिनीला, मजुरांची संख्या सारखी येईल असें नाहीं. मजुरांची संख्या निश्चित असली तर कमाल सरासरी केव्हां येईल हें सांगतां येतें हें आपण पाहिलें. एक मैल गहूं लावावयाचा असला तर सात माणसें असलीं म्हणजे सरासरी उत्पन्न माणशीं जास्तींतजास्त असतें व १९।२० असलीं म्हणजे तेवढ्या जमिनीचें कमाल उत्पन्न होतें. त्याला गव्हाचे कमाल उत्पन्न हवें असेल तर तेथें जास्त माणसें लावील व दुसरीकडे कमी लावील. पण एकंदरीनें तो मजुरांची वांटणी अशी करील कीं एका शाखेंतला मजूर काढून दुसरीकडे घालणें अगर एका धंद्यांतील मजूर काढून दुसऱ्या धंद्यांत घालणें हें त्याला परवडणार नाहीं. म्हणजे त्यानें जो उत्पादनाचा एकंदरींत मेळ धरला असेल, त्या दृष्टीनें असें करणें जुळणार नाहीं; किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे इकडला मजूर काढून तिकडे घालण्यानें, जास्त होणाऱ्या अगर कमी होणाऱ्या खर्चाचे मानानें —उत्पादनाचे दृष्टीनें—कमी अगर जास्त उपयोग होत नाहीं. बाजरीचे जमिनींतून दहा मजूर काढून ते गव्हाचे जमिनींत घालून जर उत्पादनांत उपयुक्त अशी भर पडणार नसेल तर तें करण्यांत अर्थ नाहीं. याच पद्धतीनें सामान्य भांडवलशाहींत विचार होतो. कारण घटक कमीजास्त करणें जर फायद्याचें नसेल तर तो बदल करण्यांत येणार नाहीं. हुकूमशहासुद्धां याच परिस्थितींत तो करणार नाहीं. कारण त्याचा जो उत्पादनाचा मेळ ठरला आहे, जो नकाशा त्यानें काढला आहे त्यांत बदल करणें जुळणार नाहीं, परवडणार नाहीं. नियम एकच पण निरनिराळ्या दोन दृष्टींनीं त्याचा अवलंब होतो. काळा चष्मा कोणी ऊन लागूं नये म्हणून घालतो तर कोणी आपण काय करतों हें समजूं नये म्हणून. तात्पर्य हुकूमशहा आपल्या मजुरांची वांटणी आपल्या उत्पादनाच्या कल्पनेप्रमाणें अशी करील कीं प्रत्येक मजूर जेथें काम करीत असेल, तेथील काम उत्पादनाचे दृष्टीनें यथायोग्य व उपयुक्ततेच्या दृष्टीनें इतर धंद्यांतल्या मजुरांच्या इतकेंच उपयुक्त, शास्त्रीय भाषेंत बोलावयाचें झाल्यास सीमागत उत्पन्न, मजुरांचे सर्व शाखांत त्याचे दृष्टीनें सारखेंच होतें; तसें होत नसेल तर जेथें जास्त होण्याचा संभव असेल तेथें तो जास्त मजूर धाडील.

आतां आणखी पुढें विचार करूं. समजा, उत्पादनाचे दोन घटक असे आहेत कीं ते मर्यादित आहेत. उदा०, मजूर व जमीन; वरच्या उदाहरणांत मजूर मर्यादित होते. आतां मजूर व जमीन हे दोन्हीही घटक मर्यादित आहेत; व एकंदर उत्पादनाला हें दोन्ही घटक अत्यंत अवश्यक आहेत. म्हणून हुकूमशहा या दोघांचा मेळ अशा प्रमाणांत बसवील कीं, सर्व जमीन व सर्व मजूर कामास लागले. पण या योजनेनें मजुरांचें माणशीं सरासरी उत्पन्न कमाल येणार नाहीं. कारण जमीन हा घटकहि आपण मर्यादित धरला आहे व शिवाय तिची वांटणी अनेक प्रकारच्या पिकांचे उत्पादनांत करावयाची हेंहि धरलें आहे. यामुळें दर प्रकारच्या जमिनीचे मानानें मजुरांची संख्या जास्त व कोणत्याच प्रकारांत माणशीं कमाल उत्पादन करण्याइतकी जमीन नसणार. माणशीं कमाल उत्पन्न करण्याला जेवढी मजुरांची संख्या लागेल त्यापेक्षां प्रत्येक प्रकारांत जास्त संख्या राहील, व त्यामुळें एकंदर मजुरांचें सीमागत उत्पादन कमीच होणार; कारण जास्त उत्पादन करण्यास वाव असून दुसरा घटक मर्यादित असल्यामुळें तें होत नाहीं. याच्या उलट जमीन प्रथम घेऊन मजुरांत वांटावयाची असा क्रम घेतला तरी परिणाम तोच दिसेल; मजुरांचें सीमागत उत्पादन कमी झालेलें दिसेल. त्याचप्रमाणें जमिनीचें सीमागत उत्पादन त्याच कारणाकरितां कमी झालेलें दिसेल. समजा, पाणीमिश्रित दूध आहे; आपण असें म्हटलें कीं दुधांत ४:३ या प्रमाणांत पाणी आहे, कोणी असें म्हणूं लागला कीं, पाण्यांत दुधाचें प्रमाण ३:४ आहे तर तेंही बरोबर आहे. त्याचप्रमाणें दोन उत्पादन घटक मर्यादित धरले, त्याबरोबर एकाचे बाबतींत जें स्वरूप दिसलें तेंच दुसऱ्याचे बाबतींत दिसणार हें उघड आहे. मग अशा परिस्थितींत हुकूमशहा आपला मेळ कसा बसवील? त्याला उत्तर असें कीं, त्याच्या उत्पादनाचा जो एकंदर मेळ असेल व महत्त्व असेल त्याला अनुसरून प्रत्येक शाखेंतील मजुरांची उपयुक्तता दुसऱ्या शाखेंतील मजुरांचे उपयुक्ततेइतकी व प्रत्येक प्रकारच्या जमिनीचे उत्पादनाची उपयुक्तता दुसरे प्रकारचे जमिनीचे उत्पादनाइतकी असावी अशी योजना करील. जर कमीजास्त उपयोग अगर उत्पादन करणें त्याला परवडत असते अगर महत्त्वाचें असतें तर त्यानें ताबडतोब बदल केला असता. तो करीत नाहीं याचा अर्थ उपयुक्तता व उत्पादन हीं सर्व प्रकारांत व शाखांत त्याच्या दृष्टीनें सारखीं झाली हाच होय. हा एक समतोलपणा त्याच्या दृष्टीनें त्यानें उत्पादनांत आणला. उत्पादनाला किती व कोणत्या प्रकाराला किती महत्त्व द्यावयाचें हें अर्थात् तोच ठरविणार असल्यामुळें त्याचा निर्णय हीच मोजण्याची फूटपट्टी. गव्हांच्या लागवडींतील मजूर काढून बाजरीचे लागवडींत कांहीं

घातले तर पिकांत कमीजास्त होईल. कित्येकांचें मतें तें योग्य व फायदेशीर होईल व नफाहि त्यांत मिळेल. पण त्याचा हा विचार नाहीं. एकंदर उत्पादन वाढवावें अगर जास्तींत जास्त नफा होईल असें उत्पादन योजावें हा त्याचा हेतु नाहीं. त्याचा हेतु आपल्याला ज्या प्रमाणांत व ज्या तऱ्हेचा मेळ उत्पादनांत पाहिजे आहे तो त्यास घडवून आणावयाचा आहे व त्या नकाशाप्रमाणें, त्या योजनेप्रमाणें, त्याचें महत्त्व मोजण्याचें माप ठरलें जातें.

वर एकदां एक घटक मर्यादित आहे व एकदां दोन घटक मर्यादित आहेत असें कल्पून त्यांची योजना उत्पादनाचे कामीं कशी होईल याचा विचार केला. पण प्रत्यक्ष व्यवहारांत अनेक उत्पादन घटक असे आहेत कीं, ते मर्यादित असतात, अपुरे असतात व त्यांचाही उपयोग करतांना जें वरील दोन उदाहरणांत दिसून आलें तसेंच होईल. कारण उत्पादन कसें, किती व कोणत्या वस्तूंचें करावयाचें हें ठरल्यानंतर, प्रत्येक घटक आणि जो मर्यादित असेल तो, अशा रीतीनें वांटला जाईल कीं, योजलेल्या उत्पादनाचें दृष्टीनें अगदी करार वांटणी, अगदीं यथायोग्य वांटणी होईल. एका धंद्यांतून एखादा घटक काढून दुसऱ्या धंद्यांत घालणें परवडणार नाहीं व तसें झालें तर योजनेशीं विसंगत होईल. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे प्रत्येक मर्यादित स्वरूपाचा घटक अशा रीतीनें निरनिराळ्या धंद्यांत विभागला जाईल कीं, त्याचें सीमागत उत्पादन, परवडणारें उत्पादन सर्वत्र सारखें असेल. कारण जर तसें न झालें व एकीकडील घटक काढून दुसरीकडे घालणें योजनेच्या दृष्टीनें, महत्त्वाच्या दृष्टीनें, उपयुक्ततेच्या दृष्टीनें, जरूर झालें तर तें हुकूमशहा करीलच. म्हणजे ही विभागणी अशा तऱ्हेनें होते कीं आतां बदल शक्य नाहीं. एकंदर उत्पादनाच्या दृष्टीनें जास्तींत जास्त उपयोग प्रत्येक घटकाचा झाला किंवा दुसऱ्या दृष्टीनें प्रत्येक घटकाचें सीमागत उत्पादन सारखें झालें. एक समतोलपणा उत्पादनांत आला—अर्थात् हुकूमशहाचें दृष्टीनें. तसेंच जे घटक अशा स्वरूपांचे असतात कीं ज्यांचे भाग पाडून कामीं लावतां येत नाहींत त्यांचाही तो विचार करील. श्रमविभागणी करून उत्पादन वाढतें याचा विचार करून ज्या गोष्टी, ज्या वस्तु, त्याला मोठ्या प्रमाणांत हव्या आहेत, त्या तो घटकांचा हिशोब जुळवून करील. समजा, आज मोटार उत्पादनाचे घटक दुप्पट केले तर मोटारचें उत्पादन चौपट होईल, पण त्याला इतक्याची जरूर नाहीं; तिप्पटच पाहिजे म्हणून तो ते घटक वाढवील, मात्र मोटारचें उत्पादन त्याला पाहिजे त्यापेक्षां जास्त करणार नाहीं. यांत संपूर्ण शक्ति त्याला उपयोगांत आणतां आली नाहीं. पण ती उपयोगांत आणून अनावश्यक

उत्पादन तो करणार नाहीं, कारण त्यामुळें त्याच्या योजनेच्या इतर भागांवर परिणाम होतो. तसेंच उत्पादन घटक फारसे न वाढवितां, कांहीं वस्तूंचें एका नमुन्याबरहुकूम उत्पादन केलें म्हणजे तें जास्त प्रमाणावर करतां येतें. समजा, मजुरांचीं घरें वाढवावयाचीं आहेत. एक नमुना तयार केला व त्याबरहुकूम खूप घरें बांधावयाची योजना केली म्हणजे खर्च कमी येतो; सारखीं दारें, सारख्या खिडक्या वगैरे गोष्टी यंत्राचे सहाय्याचा पूर्ण उपयोग करून घेऊन मोठ्या प्रमाणांत करतां येतात. तयार कपडे, एकदां दहापांच फॅशनचे नमुने केले कीं त्याबरहुकूम मोठ्या प्रमाणावर, श्रमविभागणीचे तत्त्वावर, यंत्राचे सहाय्यानें वाटेल तितके काढतां येतात व या करण्यांत अर्थात् खर्च कमी. कारण त्यामानानें उत्पादनसामग्री कमीच लागणार. अर्थात् हुकूमशहाचें मत विविधता असावी असें असेल तर, तो एका नमुन्याबरहूकूम उत्पादन करणार नाहीं.

समजा, कांहीं घटक असे आहेत कीं त्यांचा उपयोग विशिष्ट गोष्टींकरितांच होऊं शकतो. ते कांहीं बहु–उपयोगी घटक नाहींत. त्यांचा उपयोग कोणत्या पद्धतीनें होईल, याचा आपण विचार करूं. उदा०, जमीन अशी आहे कीं, त्यांत जंगलच होऊं शकतें दुसरें कांहीं नाहीं; तर एक असें होईल कीं या सर्व जमिनीचा उपयोग करण्यास अवश्यक इतके दुसरे घटक नसतील तर ती जमीन मोकळी राहील; जितकीं माणसें लावून जास्तींत जास्त सरासरी उत्पादन पडेल, तितकी लावतां येईल. यानें सर्व जमीन कांहीं उपयोगांत आणली जाणार नाहीं. दुसरें असें समजा कीं, हीच जमीन जंगलापुरती पुरेशी नाहीं, हुकूमशहाला आणखी जंगलें हवी आहेत व त्याकरितां तो इतर जमिनींत पण जंगले वाढवितो आहे; असें झालें तर, पहिल्या जमिनीचा विशिष्टपणा उरतच नाहीं. तिसरें, ही सर्व जमीन जंगलाकरितां जी आहे, तिचाच फक्त उपयोग तो जंगलाकरिता करतो आहे, इतर जमिनीचा नाहीं; या परिस्थितींत या विशिष्ट जमिनीची उत्पादनाचे दृष्टीनें निःसंशय किंमत आहे, पण इतर जमिनीइतकी नाहीं. तसें असतें तर, त्यानें इतर जमिनींत जंगल लावलें असतें. जर दुसऱ्या जमिनींत जंगल लावणेंच शक्य नाहीं तर या जमिनीची किंमत, जर जंगलें अवश्य आहेत असें त्यानें मानलें तर, उत्पादनाचे मानानें जास्त आहे हें उघड आहे. या सर्व गोष्टी विचारांत घेऊन त्याच्या उत्पादनाच्या महत्त्वाच्या दृष्टीनें, असल्या घटकांचा उपयोग हुकूमशहा करील.

आतांपर्यंतच्या विवेचनांत प्रत्येक धंद्यांत एकाच वस्तूचें उत्पादन होतें असें समजून विवेचन केलें आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, पुष्कळ धंद्यांत अनेक

वस्तूंचें उत्पादन होतें. तथापि वरील विवेचनांत जे सिद्धांत आपण पाहिले, तेच सामान्यतः जोड उत्पादनाला लागू आहेत. कांहीं वस्तु जोडीनें उत्पन्न होतात हें आपण मागें पाहिले आहे. त्यांचे आपआपसांतील प्रमाण कांहींच्या बाबतींत अगदीं न बदलणारें आहे. कापूस आणि सरकी यांचें प्रमाण कांहीं यंत्रें बदलूं शकत नाहींत. पण हुकूमशहा ज्यावेळीं कापसाचा विचार करील, त्यावेळीं सरकीचाही विचार करून आपल्या उत्पादनाचा नकाशा अगर कार्यक्रम तयार करील; व जास्त निघणाऱ्या सरकीचें तेल अगर खत करण्याची योजना आपल्या कार्यक्रमांत ठेवून तो धंद्यांत समतोलपणा आणील. ज्या जोड वस्तूंचें प्रमाण बदलतां येतें तें अवश्य अशा रीतीनें तो बदलून घेईल, व या सर्व जोड वस्तूंचा अव्वल व दुय्यम अशा दोन्हींचा तो बरोबर मेळ, त्याला हवा आहे त्या हिशोबांत बसवून आपल्या पसंतीप्रमाणें उत्पादनाची भट्टी तयार करील.

आतांपर्यंत जो विचार केला, तो ज्या चालू गरजा आहेत—उपभोग्य वस्तु आहेत—त्यांच्या उत्पादनाचा. पण हा उत्पादनाचा ओघ, ही पुरवठ्याची अन्नपूर्णा कायम राहावी म्हणून हुकूमशहाला आज आणि उद्यां यांचेंही गणित उत्पादनाचे दृष्टीनें बसविलें पाहिजे. आज उत्पादनसाधनें चालू गरजांकरितां किती व भावी गरजा भागविण्याकरितां किती तयार केलीं पाहिजेत म्हणजे हा ओघ कायम राहील अगर ज्या तऱ्हेनें पाहिजे त्या तऱ्हेनें वाहील, हेंहि त्यानें ठरविलें पाहिजे. उपभोग्य वस्तु किती निर्माण करावयाच्या व उत्पादक वस्तु, भांडवल स्वरूपाच्या वस्तु, किती निर्माण करावयाच्या, याचा निर्णय घेतला पाहिजे व त्या निर्णयाला अनुसरून उत्पादनाचें स्वरूप व प्रमाण ठरविलें पाहिजे. शास्त्रांची व शोधांची प्रगति लक्षांत घेतां यंत्राच्या साहाय्यानें उत्पादनाची साधनसामग्री वाढविणें किती तरी शक्य आहे. यंत्रांची सामग्री व पुरवठा वाढवून, कारखानें व घरें बांधून, नवीन जमिनी लागवडीस आणून, जुन्या जमिनींत नवीन पद्धतीनें लागवड करून, विक्रीच्या पद्धतींत एकसूत्रीपणा आणून, अनेक प्रकारांनीं उत्पादन, वस्तूंचें व सोयींचें वाढविणें व त्यायोगें अवश्य तें भांडवल तयार करून, हा उत्पादनाचा ओघ कायम ठेवणें शक्य आहे. ज्या ज्या धंद्यांत जे तज्ज्ञ आहेत, माहितगार आहेत त्यांच्या साहाय्यानें, कोणत्या धंद्यांत काय वाढ करतां येणें शक्य आहे, हें तो हुकूमशहा समजावून घेईल; कोठलीं खतें, कोणते नांगर अगर यंत्रें वापरलीं म्हणजे पैदास वाढेल, हें त्याला कळेल. कोठें जास्त यंत्रें बसविलीं पाहिजेत, कोठें अगदीं आधुनिक पद्धतीचीं यंत्रें बसविलीं पाहिजेत, विजेच्या रेल्वे कोठें केल्या पाहिजेत, म्हणजे वाढती वाहतूक नेणें सोपें व किफायतशीर होईल,

शक्य होईल, या सर्वांचा तक्ता तो तयार करील. किंबहुना एखादी हुशार मुलगी भरतकाम करतांना प्रथम आंखणी करते व नंतर नक्षी भरते त्याचप्रमाणें आपल्या उत्पादनयोजनेची पूर्ण आंखणी करून अगदीं बारीकसारीक गोष्टींचासुद्धां पूर्ण विचार करून तो आपली योजना कायम करील व मग अंमलबजावणी करील. इतकेंच नव्हे तर, नवीन नवीन शोध, नवीन यंत्रें, शास्त्रीय प्रगति या गोष्टी अवश्य आहेत व त्यांची जोड उद्योगधंद्याला अवश्य आहे हें जाणून, प्रयोगशाळा, रसायनशाळा वगैरेंची सुद्धां तो व्यवस्था करील. सर्व उत्पादनाचें मूळ मजुरांचे श्रम. मजूर जर अशक्त असले, अशिक्षित असले तर हें एवढें कार्य होणार नाहीं, चांगलें होणार नाहीं हें जाणून मजुरांची शक्ति व ज्ञान वाढविण्याची योजना तो आंखील. उत्तम व कार्यक्षम कारागिरांची कमतरता पडूं नये म्हणून तो कामगारांसाठीं शिक्षण-शाळा काढील. प्रत्यक्ष शिक्षण मिळावें म्हणून शिकाऊ उमेदवार ठेवून घेण्याची पद्धतहि आंखील. तात्पर्य, मजूर हा एक अत्यंत महत्त्वाचा उत्पादन घटक आहे हें जाणून त्याची कार्यक्षमता वाढविण्याचा तो प्रयत्न करील. ही कार्यक्षमता व शक्ति योग्य प्रमाणांत असावी म्हणून नुसती सामान्य व विशेष शिक्षणाचीच व्यवस्था करून भागणार नाहीं, तर प्रत्येक मजुराला किमान राहणीला योग्य इतका मेहनताना मिळेल अशी व्यवस्था तो करील. कारण मजुराची शरीरप्रकृति, मनःस्वास्थ्य बरोबर नसेल तर तो काम करूं शकणार नाहीं. म्हणून किमान राहणीला अवश्यक लागेल तेवढेंच देऊन तो थांबणार नाहीं तर, आणखी त्यापेक्षांहि जास्त मेहनताना देईल; कारण त्यामुळें मजुरांना जास्त स्वास्थ्य व समाधान लाभेल व त्यामुळें भावी काळांत ते जास्त व चांगलें काम करतील, त्यांची उत्पादनशक्ति वाढेल. ज्या धंद्यांत जशी अवश्यकता असेल त्यामानानें तो वांटणी करील. प्रत्येक उत्पादनघटक, मग तो जंगल असो, जमीन असो, यंत्र असो, मनुष्य असो, त्याच्या योजनेच्या दृष्टीनें, ज्यांत आजचा व उद्यांचा पूर्ण विचार केला आहे, जेथें व ज्या कामासाठीं अवश्य आहे व त्याच्या दृष्टीनें जास्तींतजास्त उपयोग व उत्पादन होऊं शकेल तेथें, तो योजील. खाणींतील मजूर काढून त्यांना गवंडी करील. समाजांत तंटे वाढविणारे वकील कमी करून त्यांना विक्री योजनेंत घेईल. वायां जाणारें नद्यांचें पाणी बंधारे घालून कालवे काढील. कांहीं कालव्यांनीं अगर बंधाऱ्यांनीं जमीन वाईट झाली, प्रदेश मलेरियामय झाला तर, ते तो बंद करील. कॉलेजांत काव्यें करून, संध्याकाळीं 'लकी'मध्यें चकाट्या पिटणारे विद्यार्थी तेथून काढून, त्यांना धंदेशिक्षणाच्या शाळेंत घालील. दुपारीं नुसत्याच चकाट्या पिटणाऱ्या अगर कुटाळक्या करीत बसणाऱ्या सुखवस्तू स्त्रियांना त्याच्या योजनेंत तो कष्ट करण्याचें, श्रम करण्याचें काम देईल, त्यांना स्वस्थ बसूं देणार

नाहीं. वडिलोपार्जित संपत्तीवर जगणारे, बिनश्रमानें जगणारे व लक्ष्मीधरासारखे खुशालचेंडू यांना, तो कामास जोडील. शब्दपंडित, वावदूक, खुर्चीवर बसून जगाचीं सूत्रें हालविण्याचा देखावा करणारे, यंत्रें हालविणारे होतील. तात्पर्य, त्याच्या योजनेला जें अवश्यक वाटेल तें तो करील. कारण त्याला विरोध नाहीं तो हुकूमशहा आहे.

मागें सांगितल्याप्रमाणें पुढील काळांत हा उत्पादनाचा ओघ कायम रहावा म्हणून नवीन यंत्रें, नवीन कच्चा माल, सर्व तऱ्हेची उत्पादनसामग्री—भांडवलसामग्री—करण्याची ही योजना त्याला केलीच पाहिजे. व हें घडवून आणतांना कांहीं चालू गरजा कमी प्रमाणांत भागल्या गेल्या, कांहीं कळ काढावी लागली, कांहीं त्याग करणें अवश्य असलें तर तो समाजाला करावयाला लावील; कारण त्याच्या दृष्टीनें अखेरीस तें हिताचें आहे. त्याचप्रमाणें उत्पादनाचीं साधनें आधीं कोणतीं निर्माण करावयाचीं नंतर कोणतीं, हेंही वेळापत्रक तो ठरवील. रेल्वे, रस्ते, कारखाने, मोठमोठया यंत्रांची निपज करणारे कारखाने हे प्रथम घेईल. ह्या गोष्टी करण्याकरितां, व त्यांचा पुरवठा कायम ठेवण्याकरितां, नवीन कारागीर प्रथम शिकवून तयार करील. कोणता धंदा योग्य चालत नाहीं हें पाहून त्यांत काय सुधारणा करून तो योग्य करतां येईल हें ठरवील. प्रत्येक मनुष्याला अवश्यक तेवढया चालू गरजांचा पुरवठा करून मजुरांना जास्त कार्यक्षम करण्याची, शिक्षण वगैरेची व्यवस्था करून, सर्व घटक चांगल्या रीतीनें कसें जुळवतां येतील याचा विचार करून, भावी पुरवठा व आजची गरज यांचा बरोबर मेळ घालून, कार्यक्षमता व उत्पादन कोठेंही कमी पडणार नाहीं अशी व्यवस्था करून, हुकूमशहा आपली योजना कायम करून काम सुरू करील. सर्वांच्या सर्व गरजा भागतील हें स्वर्गीय सुख मिळणें कठीण आहे. त्याचप्रमाणें जगांतील पदार्थांना मर्यादा आहे व त्यामुळें उत्पादनालाही मर्यादा आहे. तथापि या चौकटींतसुद्धां एवढें क्षेत्र विचारपूर्वक, योजनापूर्वक उत्पादनाला आहे कीं, त्याप्रमाणें झाल्यास, जगांत दुःखाचा, दारिद्र्याचा भार कमी होऊन जग सुखाच्या, समाधानाच्या राज्यांत प्रवेश करूं शकेल. वर हुकूमशहा हें उत्पादन कसे करील याचें चित्र दिलें आहे. पुढें भांडवलशाही जगांत हें उत्पादन कसें होतें व अखेरचे निर्णय कोण घेतो हें आपण पाहूं. पण जगाचें भवितव्य तेव्हांच उज्ज्वल होईल कीं जेव्हां हे निर्णय जनता घेईल व सर्व उत्पादन, सर्व उत्पादनसृष्टि नफ्याकरितां अगर एखाद्या हुकूमशहाच्या लहरीचा खेळ म्हणून उत्पन्न न होतां, जनतेच्या, आमच्या जनतेच्या उपयोगाकरितां, सुखाकरितां, समाधानाकरितां उत्पन्न होईल. मग तेथें मालक व मजूर असा भेद नाहीं. कोणी नुसते खाणारे कोणी नुसते खपणारे, हें अन्याय्य दृश्य दिसणार नाहीं. सर्व श्रम करणारे म्हणून सर्व सारखे, व सर्व सारखे म्हणून सर्व सुखी व समाधानपूर्ण.

---

# ११. भांडवलशाहींतील उत्पादन

मागील भागांत हुकूमशहाचे अमदानींत उत्पादन कसें असेल व तेथें काय उत्पादन करावें, कोणी करावें, कोणत्या प्रमाणांत करावें याचा विचार कसा केला जातो हे पाहिलें. उत्पादनाच्या निरनिराळया अवस्थांत काय प्रश्न उत्पन्न होतात व त्यांचे निर्णय हुकूमशहा कसा घेईल हें स्थूलमानानें पाहिलें. आतां हल्लींच्या भांडवलशाही जगांत उत्पादनासंबंधीं हे सर्व प्रश्न कसें सोडविलें जातात हें पहावयाचें आहे. त्याचप्रमाणें निरनिराळया उत्पादन घटकांचें महत्त्व व त्यांची किंमत कशी ठरली जाते हेंहि पाहिलें पाहिजे. कारण हुकूमशहाच्या अमलांत प्रत्येक घटकाचें महत्त्व तो ठरवितो, प्रत्येकाला काय मिळावें हें तोच ठरवितो म्हणून त्यांच्या महत्त्वांत अगर किंमतींत तेथें चढउतार नाहीं. हल्लींचे जगांत रशिया हें राष्ट्र सोडून दिल्यास, बाकीचीं युरोप, आशिया व अन्यत्र सर्व राष्ट्रें भांडवलशाही राष्ट्रें असून त्यांची समाजरचना व उत्पादनपद्धति, सर्व आर्थिक व्यवहार भांडवलशाहीच्या चौकटींत चालला आहे. कांहीं राष्ट्रांत सरकार कांहीं उद्योगधंद्यांत हात घालतें, कांहीं थोडेसें नियंत्रण करतें पण त्यायोगानें उत्पादनाच्या पद्धतींत कांहीं मूलभूत फरक झालेला नाहीं. युद्धकालांत नियंत्रण वाढलें व अजूनही नियंत्रण वाटपक्षेत्रांत चालू आहे. तथापि मूलग्राही असा फरक लवकर होईल असे वाटत नाहीं. युद्धोत्तर जग कसें राहील हें अद्याप ठरावयाचे आहे. क्वचित् ठिकाणीं बाहेरील मुखवटा थोडा बदललेला दिसत आहे. हुकूमशाहीच्या अमदानींतील व्यवहार व भांडवलशाहीच्या अमदानींतील व्यवहार हे एका दृष्टीनें एकमेकांविरुद्ध आहेत, भिन्नस्वरूपाचे आहेत. भांडवलशाहींत सर्व राष्ट्राकरितां सर्वांगीण अशी उत्पादनाची योजना नाहीं. एखादी दुसरी बाब सरकारनें आपल्या देखरेखीखालीं घेऊन तेवढयापुरती योजना केलेली दिसते उदा०, टपाल, तारायंत्रें; या गोष्टी सर्व देशांतून सरकारनें आपल्या मालकीच्या केल्या असून त्यांवर सरकारचेंच नियंत्रण असतें. कांहीं उद्योगधंद्यांवर सरकार नियंत्रण ठेवतें तर कांहीं धंद्यांत मजुरांबद्दल किमान गोष्टी सरकार मालकांना करावयास लावतें. कांहीं वस्तूंचें उत्पादन

परवानगीशिवाय करण्यास मनाई असते. उदा०, दारूगोळा, शस्त्रास्त्रें. कांहींची विक्री बंद केली असते उदा०, दारू, मादक पदार्थ वगैरे. तथापि या कांहीं बाबी सोडल्या तर भांडवलशाहीमध्यें प्रत्येकजण पूर्णपणें वाटेल तें करावयास म्हणंजे उत्पादनाचे दृष्टीनें मोकळा आहे. तेथें सर्वतंत्र स्वतंत्र राज्य आहे. सर्वच बंधनाच्या पलीकडे आहेत असें नव्हे तर बंधनच नाहीं. सर्वत्र एकाच 'देवते'चे पूजन आणि ती 'देवता' म्हणजे 'नफा'. आधीं 'नफा' मागून 'नफा', विष्णुमय जग वैष्णवांची सृष्टि, तशी नफामय जग, भांडवलवाल्यांची सृष्टि व दृष्टिहि!! कोणी काय तयार करावें हें सांगणारे असे अधिकृत कोणी नसल्यामुळें उत्पादनाचें बाबतींत घ्यावे लागणारे अनेक निर्णय अनेक माणसें सैरावैरा पद्धतीनें घेत असतात. त्यांत सूत्रबद्धता नाहीं, संकेत नाहीं, मेळ नाहीं. प्रत्येक उत्पादन घटकाचा मालक त्याला नफ्याच्याच दृष्टीनें योग्य वाटेल तें तयार करील, व तें उत्पादन तयार झाल्यावर त्याला जमेल तसें विकून टाकील. तो सर्वस्वी स्वयंसिद्ध आहे, मोकळा आहे.

हें जें भांडवलशाहींत स्वातंत्र्य आहे, त्याचे थोडें स्वरूप आपण पाहूं. एकतर प्रत्येकाला आपल्याजवळ जी साधनसामग्री आहे त्याचा उपयोग वाटेल तसा करण्याची परवानगी आहे, पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्या साधनांवर पूर्ण मालकी आहे हाच त्याचा अर्थ. म्हणून भांडवलशाहींत स्वातंत्र्य म्हणजे खाजगी मालमत्ता असणें हें त्याचें एक स्वरूप. दुसरें कोणी कांहींहि उत्पादन करावयाचें ठरविल्यास त्यास प्रतिबंध नाहीं म्हणजे हिंमतीनें कोणतेंहि काम करण्यास मोकळीक हें एक त्याच्या स्वातंत्र्याचें स्वरूप झालें. तिसरें कोणी कांहीं जरी उत्पन्न केलें, कोणत्याहि वस्तूची जरी पैदास केली तरी विकत घेणारें गिऱ्हाईक—आपल्या शब्दांत उपभोगी—ह्याला काय विकत घ्यावें याची पूर्ण मोकळीक, हें त्या स्वातंत्र्याचें आणखी एक स्वरूप. अशीं अनेक स्वरूपें आहेत, पण स्थूलमानानें महत्त्वाचीं सांगितलीं आहेत. खासगी मालमत्ता याचा अर्थ ज्या कोणाजवळ कांहीं मालकीची वस्तु असेल तिचा उपयोग करण्यास, तिचा उपभोग घेण्यास अगर इतरांस घेऊं देण्यास किंवा तिचा नाश करण्यासुद्धां तो पूर्ण मोकळा आहे. कोणी त्यास विचारूं शकत नाहीं. फक्त सरकारी जे कांहीं कायदे असतील त्यांविरुद्ध त्याची वर्तणूक नसली म्हणजे झालें. उदा०, त्याला आपलें घर भाड्यानें द्यावयाचें असेल तर भाडेचिठ्ठीचा स्टँप सरकारी नियमांप्रमाणें असला म्हणजे झालें. त्यानें आपल्या शेतांत वाटेल तें पीक काढावें. सरकारी चावडी व लोकलफंड भरावा म्हणजे झालें. त्यानें शेतजमिनींत पीकच काढावें असाहि त्यावर निर्बंध नाहीं. त्यानें त्यांत टेनिस कोर्टें केलीं, घरें बांधलीं, पडिक

ठेवलें किंवा रम्य उद्यानें केलीं तरी त्याला कोणी हरकत घेणार नाहीं. फक्त सरकारी नियमाप्रमाणें घरें बांधण्यास बिगर शेतीकडे उपयोग केला म्हणून जादा सारा द्यावा लागेल एवढेंच. अशक्य गोष्ट त्याला करतां येणार नाहीं एवढीच मर्यादा त्याला आहे. उदा०, नगर जिल्ह्यांतील जमीन असली तर तेथील उन्हांत त्याला द्राक्षें करतां येणार नाहींत किंवा कोकणांतल्या खडकाळ जमिनींत ऊंस लावतां येणार नाहीं. तात्पर्य, आपल्या मालकीच्या वस्तूचा तो वाटेल तसा उपयोग करूं शकेल. कारण ती वस्तु अगर ती जमीन त्याची खासगी मालमत्ता आहे. त्याचप्रमाणें कोणतेंहि काम हिंमतीनें अंगावर घेऊन करण्यास त्यास पूर्ण मुभा आहे; याचा अर्थ सरकारी नियमांना अनुसरून वाटेल ती वस्तु उत्पन्न करण्याकरितां, तिचें उत्पादन करण्याकरितां त्याला पूर्ण मुभा आहे. त्याला वाटेल तो धंदा सुरू करण्यास, वाढविण्यास, बदलण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे. वाटेल तेथें नोकरी करण्यास—अर्थात् देणारानें ती दिली पाहिजे!—वाटेल त्यासाठीं काम करण्यास त्याला कोणाची हरकत नाहीं. घरीं कादंबऱ्या अगर लघुकथा वाचण्यास अगर अन्य रिकामपणाची कामगिरी केल्यास कोणास प्रतिबंध करतां येणार नाहीं. पण ह्या स्वातंत्र्याला आपोआपच मर्यादा उत्पन्न होतात. समजा, त्यानें मोठा टाटाकंपनीसारखा कारखाना काढण्याचें मनांत आणलें तर त्याच्याजवळ भांडवल पाहिजे. गीतारहस्य लिहिण्याचें धाडस करण्याचें मनांत आणल्यास तेवढें वाचन व बुद्धि पाहिजे. मोठा उद्योगसूत्रधार होण्याचें मनांत आणलें तर अवश्यक व दुर्लभ असें जें योजनाचातुर्य तें पाहिजे. कायदेमंडळाचें सभासद होण्याचें मनांत आणलें तर लोकप्रियता पाहिजे. एकदम रुपेरी पडद्यावर प्रसिद्ध नट होण्याचें मनांत आणलें तरी त्याला स्वरूप, मनोहर आवाज व संधि देणारा एकादा 'शांतारामबापू' तरी पाहिजे. व या सगळ्या गोष्टी मर्यादित आहेत म्हणूनच हें वाटेल तें उत्पादन करण्याचें अगर वाटेल तो धंदा करण्याचें स्वातंत्र्य असलें तरी प्रत्यक्ष सृष्टींत तें अगदीं कागदी आहे, असेंच अनुभवास येतें. पण त्याला जें शक्य आहे त्या चौकटींत, त्या रंगणांत वाटेल तो नाच करण्यास भांडवलशाहींत पूर्ण वाव आहे. मूर्खपणामुळें धंद्यांत नुकसान आलें म्हणून सरकार त्याला शासन करणार नाहीं. किंवा पांचट काव्य करून तें खपलें नाहीं म्हणून सरकार तें घेणार नाहीं, किंवा कां लिहिलें म्हणून विचारणार नाहीं. गिऱ्हाइकाला वस्तु खरेदी घेण्याचें न घेण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आहे; याचा अर्थ सरकारी नियमानुसार आपल्या पैशाचें वाटेल तें करण्यास मुभा आहे. त्यानें वाटेल त्या वस्तु घेतल्या तर त्यास कोणी विचारणार नाहीं. नाहीं घेतल्या व आपलें धन सांचविलें तरीही कोणी विचारणार नाहीं. कांहीं सांचविलें, कांहीं खर्च केला, असा विवेक केला

तरीही कोणी वास्तपुस्त करणार नाहीं. तथापि गिऱ्हाईक—उपभोगी—काय घेईल याला मर्यादा आहेतच. त्याच्याजवळ असलेल्या सर्व धनाची वासलात लावून नुसत्या मोटारीच—बसण्याकरितां—घेणार नाहीं; कारण मग खाण्यास कांहीं उरणार नाहीं. अगर कांहीं न खातां अगदीं उपाशीं राहून आपलीं फडताळें तो पैशानेंहि भरणार नाहीं. प्रत्येक माणसाचें उत्पन्न, त्याची संपत्ती, त्याची अभिरुचि, त्याचे शिक्षण-संस्कार, समाजाची चालरीत, या सर्व त्याच्या स्वातंत्र्याला मर्यादा घालीत असतात. आज कोणी पुण्यांत नदीवरून कावडीनें पाणी विकत आणीत नाहीं अगर घोड्यावर बसून शनवारांतून मंडईत भाजी आणण्याकरितां जात नाहीं. जी एक राहणी त्याच्या स्थितीच्या मानानें अवश्यक होते त्याला अनुसरूनच तो पैसे खर्च करतो. यांतच त्या मर्यादा उत्पन्न होतात. आतां कांहीं 'बाळासाहेब' केवळ जन्मानें आलेली संपत्ति, पाहतां पाहतां उडवतात ही गोष्ट खरी; पण त्यांच्या उडवण्याला तरी त्यांच्या संपत्तीची मर्यादा आहेच कीं!! म्हणून जें शक्य आहे तेवढ्यांत मनुष्याला भांडवलशाहींत वाटेल ती वस्तु घेण्यास अगर न घेण्यास, वाटेल त्यारीतीनें आपली संपत्ति, आपलें उत्पन्न खर्च करण्यास पूर्ण मुभा आहे.

आतांपर्यंत जें हें स्वातंत्र्य भांडवलशाहींत आहे त्याचें थोडेसें स्वरूप आपण पाहिलें. मग आपला मुख्य प्रश्न राष्ट्रांतील असलेली उत्पन्नाची साधनसामग्री कशी व कोणत्या पैदाशीसाठीं उपयोगांत आणावयाची याचा निर्णय कोण घेतो, याचा विचार करूं. ज्याच्याजवळ जी उत्पादनसाधनसामग्री आहे, जे उत्पादनघटक आहेत, त्यांचा उपयोग अगदीं जास्तींत जास्त ज्यायोगें किंमत येईल अशा रीतीनें तो करील हें उघड आहे. तथापि ही किंमत, हा पैसा केव्हां येईल? त्यानें पैदाशीला सुरुवात केली, उत्पादन झालें, माल बाजारांत गेला, तो किरकोळ व्यापाऱ्यांनीं घेतल्यानंतर गिऱ्हाइकांनीं घेतला म्हणजे त्याला मालाची किंमत—पैसा, भेटणार हेंहि उघड आहे. याचा अर्थ त्यापूर्वी ॲडव्हान्स अगर आगाऊ रक्कम मिळत नाहीं असें नाहीं. पण सामान्यतः वर सांगितलें त्याचप्रमाणें होत असतें. मग गिऱ्हाइकांनीं, उपभोगी लोकांनीं माल घेतल्यानंतर पैसा मिळावयाचा तर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हें गिऱ्हाईक वस्तु घेतांना ज्या रीतीनें आपल्या पसंतीचा, स्वातंत्र्याचा, उपयोग करील, त्यावर हा पैसा मिळणें न मिळणें अवलंबून असणार. सांगण्याप्रमाणें, 'ऑर्डरी'प्रमाणें माल तयार होत असता, तसें उत्पादन होत असतें तर, हा प्रश्नच उपस्थित झाला नसता. कारण मग सर्व पैदास गिऱ्हाइकांनीं, उपभोगींनीं सांगितल्याप्रमाणें, त्यांच्या ऑर्डरीप्रमाणें होईल. गिऱ्हाइकें आपल्या ऑर्डरी किरकोळ व्यापाऱ्याजवळ देतील, ते घाऊक

ग्यापाऱ्याजवळ, ते कारखानदाराजवळ, कारखानदार त्याप्रमाणें कच्चा माल करणारांकडे याप्रमाणें सर्व उत्पादनांत एकजात निश्चितपणा, सूत्रबद्धता येईल. हल्लींसुद्धां गिऱ्हाइकांना काय लागेल, मार्केटांत काय खपेल, कशाला बाजार आहे हें अंदाजून मालाची पैदास व पुरवठा होत असतो. पण तो अंदाजच, त्याच्यांत ऑर्डरीबरहुकूम होणाऱ्या उत्पादनाचा निश्चितपणा असणार नाहीं. तसेंच पुष्कळ कारखानदार, उद्योगधंद्यांतील सूत्रधार, योजक लोक, माल तयार करण्याकरितां आगाऊ पैसे खर्च करीत असतात. त्यांना कारागिरांना पगार द्यावा लागतो, कच्चा माल विकत घ्यावा लागतो, यंत्रें विकत घ्यावी लागतात. तात्पर्य, पक्का माल तयार होण्यापूर्वी खर्च करावा लागतो हें जरी खरें असलें तरी, वर सांगितल्याप्रमाणें ह्या गोष्टी तो मालाला काय खप येईल, काय गिऱ्हाइकी येईल याचा अंदाज बांधूनच करतो. माल तयार झाला व अंदाज जमला तर त्याला अपेक्षेपेक्षांही जास्त प्राप्ती होईल, अंदाज चुकला तर अपेक्षेइतकीही होणार नाहीं. मग शक्य तितक्या लवकर गिऱ्हाइकाला जसा माल पाहिजे म्हणजे ज्या मालाला मागणी आहे असा माल करण्यास तो सुरुवात करील, आपले बेत बदलील, नवीन योजना अमलांत आणील. याचा अर्थ उत्पादन कसें व्हावें व कोणत्या वस्तूंचें व्हावें, हें मागणीवर किंवा मागणी काय राहील, याच्या अंदाजावर अवलंबून आहे. मागणी किंवा तिचा अंदाज हेच उत्पादनाचे संचालक आहेत. हुकूमशाहींत हुकूमशहाच्या इच्छेप्रमाणें, त्याला वाटणाऱ्या महत्त्वाच्या दृष्टीनें शक्य असलेल्या व हातीं असलेल्या उत्पादनसाधनसामग्रीच्या सहाय्यानें, या गोष्टी तो ठरवीत असतो. काय पाहिजे, काय नको याचा तक्ता त्याची इच्छा ठरविते व त्या तक्त्याबरहुकूम उत्पादन होतें. भांडवलशाहींत काय पाहिजे, काय नको हें गिऱ्हाईक ठरवीत असतें; कारण काय विकत घ्यावें, काय घेऊं नये याचें त्याला पूर्ण स्वातंत्र्य आहे. एकांत जें मिळेल तेंच घ्यावें लागतें, दुसऱ्यांत जें पाहिजे तें मिळण्याची व्यवस्था होतें. जें पाहिजे तें मिळेल हें सामान्यतः खरें आहे, कारण या स्वातंत्र्यालाही मर्यादा आहेतच. मागणीवर उत्पादन अवलंबून आहे याचा अर्थ मागणीप्रमाणें सर्वस्वीं तें मिळेलच असें नाहीं. कारण राष्ट्रांत असलेली यंत्रसामग्री, उत्पादनाची साधनसामग्री, शास्त्रीयज्ञान या गोष्टींवर उत्पादनाचें प्रमाण व स्वरूप अवलंबून आहे. म्हणून त्यांच्या टप्प्यांत जेवढें शक्य आहे तेवढेंच होईल ही एक उघड मर्यादा झाली. त्याचप्रमाणें कोणत्या वस्तु कशा भावानें विकल्या जातील यावरहि मागणी किती पुरविली जाईल हें अवलंबून आहे. उदा०, एखादी वस्तु अशी आहे कीं ती तयार करण्यास बराच खर्च येतो म्हणून कमी किंमतीस देणें शक्य नाहीं, परवडत नाहीं; अशा

स्थितींत गिऱ्हाइकाला ती जास्त किंमत देऊन विकत घ्यावी लागेल व तसें झालें म्हणजे दुसऱ्या कांहीं वस्तु कमी प्रमाणांत अगर घेतांच येणार नाहींत; ही एक दुसरी मर्यादा जास्त किंमतीची, व्यक्तिशः गिऱ्हाइकापुढें उत्पन्न होते. गिऱ्हाइका-जवळ असणारा पैसा मर्यादित असतो तेव्हां त्याला विचार करावा लागतो कीं, ही वस्तु जास्त किंमत देऊन घ्यावी कीं घेऊं नये. शिवाजीनगरांत जागा भाड्यानें घेतली तर हवा, उजेड, स्वच्छता जास्त, पण भाडेंही जास्त. तेथें राहिलें तर दुसऱ्या कांहीं सुखसोयी कमी कराव्या लागतील. रेनकोट पावसाला चांगला, पण किंमत चार रुपये पडते. छत्री दीड रुपयाला मिळते. मग काय घ्यावें ? रेनकोट घेतला तर दुसरी कांहीं गरज कमी करावी लागेल. जुन्याच वहाणा पुनः पुनः दुरुस्त करून तो जास्त दिवस वापरील. कदाचित् एकदोन शनिवारीं 'प्रभात' मधल्या 'शो'ला जाणार नाहीं. तात्पर्य, त्या गिऱ्हाइकाचें उत्पन्न, त्याच्याजवळ असलेला पैसा मर्यादित असल्यामुळें ही एक दुसरी मर्यादा त्याच्या मागणीच्या स्वातंत्र्याला उत्पन्न होते. ही व्यक्तिशः दिसणारी मर्यादा हजारों गिऱ्हाइकांनाही दिसते. या सर्वांचा एकत्र झालेला परिणाम उत्पादन कसें असावें, कोणत्या दृष्टीनें असावें यावर होतो. शिवाजीनगरांत जास्त भाडें देऊन जागा घेणारे वाढले कीं, नवीन घरें तेथें होऊं लागतील. जास्त किंमत देऊन रेनकोट घेणारे यंदा भेटले कीं, पुढील वर्षी रेनकोटांचा पुरवठा—उत्पादन जास्त होईल. त्याचबरोबर गांवांतील घरें, इतर सुखसोयी म्हणजे छत्र्या, जोडे वगैरे यांची मागणी कमी होईल. वर उल्लेखिलेलें गिऱ्हाईक ज्या वस्तु कमी घेईल अगर ज्या सुखसोयी कमी करील त्यांची मागणी कमी होईल व त्याचाही एकत्रित परिणाम, त्या वस्तूंच्या, सुखसोयींच्या उत्पादनावर होईल. सरकार कांहीं बाबतींत उत्पादनावर मर्यादा घालीत असतें. कांहीं वस्तूंची विक्री कायद्यानें बंद केलेली असते. उदा०, अंमली पदार्थ, दारू, मादक द्रव्यें, यांची विक्री नियमित केलेली असते, त्यांवर नियंत्रण असतें. अमक्या वेळींच विकलें पाहिजे, अमक्या दिवशीं विक्री बंद ठेवली पाहिजे. सरकार एखाद्या वस्तूवर कर बसवून त्याची किंमत वाढविण्यास कारणीभूत होतें व तसें झालें तर त्याची पैदास कमी होते, निदान त्याला नियंत्रण तरी बसतें. उदा०, तंबाखूवरील कर. त्याचप्रमाणें लोकांचा पैसा सरकार कर रूपानें घेऊन तो कमी करतें म्हणजे ती एक मर्यादाच उत्पन्न होते. तो पैसा सर-कार जर लोकोपयोगी कामावर खर्च करीत असेल ठीक, नाहीं तर ही आणखी एक आपत्तिच ! तथापि लोकशाही राष्ट्रांत तो पैसा सरकार लोकांच्या सोयीसाठींच खर्च करतें असें समजूं. त्या दृष्टीनें, मग करांपासून वास्तविक नुकसान नाहीं. त्यानंतर

भांडवलशाहींतील भयंकर स्वरूपाची मर्यादा म्हणजे मक्तेबाजी. या मक्तेबाजीचा विचार पुढें विस्तारानें करूं. जर एखाद्या वस्तूंचे उत्पादनांत मक्तेबाजी झाली व तिची मागणी वाढली तर ती पुरी करणें हें, ती मक्तेबाजी ज्यांच्या हातांत आहे त्यांच्या हिताचें आहे. त्या वस्तूंचा पुरवठा वाढविणें त्यांच्या दृष्टीनें नुकसानकारक नाहीं. तथापि मक्तेबाजी झाली कीं, गिऱ्हाइकाला ज्या पद्धतीनें पुरवठा पाहिजे असतो, किंवा ज्या तऱ्हेनें पाहिजे असतो, अगर जसा मेळ त्याला हवा असतो, तसा मिळत नाहीं. उलट मक्तेबाजींत त्या वस्तूंचें उत्पादन एक हातीं असल्यामुळें जें व जसें मिळेल तें व तसें त्यांस घ्यावें लागतें. कारण मक्तेबाजी ह्याचा अर्थच हा कीं, तीं वस्तु दुसरा कोणी तयार करीत नाहीं. मक्तेवाले तेथें दुसऱ्यांचा प्रवेश होऊं देत नाहींत. किंबहुना त्याच वस्तूंचें जर जास्त उत्पादन झालें तर, स्वस्तही पडेल अशी शक्यता असलीं तरी हे मक्तेबाज आपल्या भांडवलाच्या व संघटनेच्या जोरावर ती गोष्ट होऊं देत नाहींत; त्यामुळें उत्पादन वाढत नाहीं. माल स्वस्त किंमतींत पैदा होत नाहीं म्हणून गिऱ्हाइकांना किंमत कमी न होतां जास्तच द्यावी लागते. ही मक्तेबाजी नुसत्या उपभोग्य वस्तु तयार करण्याचे कामीं असते असें नाहीं. उत्पादक वस्तु, कच्चा माल, अपूर्ण वस्तु--म्हणजे ज्यापासून थोडासा संस्कार झाल्याबरोबर उपभोग्य वस्तु होतात अशा—सर्व गोष्टींचें उत्पादनांतसुद्धां ही मक्तेबाजी असते. इतकेंच नव्हे तर निरनिराळे कारागीर, धंदे करणारे, वकील, डॉक्टरसुद्धां आपापले संघ काढून एकप्रकारें मक्तेबाजीच उत्पन्न करीत असतात. या मक्तेबाजीबद्दल पुढें विचार करावयाचा आहे. तथापि इच्यामुळें आणखी एक मर्यादा गिऱ्हाइकांचे मागणीच्या स्वातंत्र्याला उत्पन्न होते. त्याचप्रमाणें जाहिरातबाजी व एजंटशाही ह्यासुद्धां एकप्रकारें त्या गिऱ्हाइकांना कोंडून धरतात, त्याला जवळ जवळ विशिष्ट वस्तु घेण्यास भाग पाडतात. एजंटांच्या खटपटीपासून सुटका नाहीं किंवा जाहिरातबाजीला बळी न पडणें शक्य नाहीं असेंही नाहीं; पण कांहीं गिऱ्हाइकांचे बाबतींत या गोष्टींचा त्यांचेवर परिणाम होतो व तेवढ्यापुरती कां होईना, ही मर्यादा येतेच. हल्लीं सर्वत्रच जाहिरातबाजी झाली आहे. मोटारींत, रेल्वेंत, चौकांतून, पुलावर, वर्तमानपत्रांत, रुपेरी पडद्यावर, किंबहुना या पांसष्टांव्या कलेचें उत्पादन फार मोठ्या प्रमाणावर चालू आहे! त्यामुळें गिऱ्हाइकांवर त्याचा परिणाम होत नाहीं असें नाहीं. पण त्याबरोबर हेंहि खरें कीं, गिऱ्हाइकांचे स्वातंत्र्य त्यानें मनांत आणल्यास हिरावलें जाणार नाहीं. हें उपभोगी गिऱ्हाईक मागें सांगितल्याप्रमाणें या उत्पादनसृष्टीचा राजा आहे. कोणी खुशामत करील, कोणी स्तुतीनें भारून टाकील, तरी तत्त्वतः त्याचें स्वातंत्र्य

कोणी हिरावूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें नमुन्याबरहुकूम मोठ्या प्रमाणावर उत्पन्न झालेलें उत्पादन त्यानें घेतलेंच पाहिजे असें नाहीं. त्यानें तयार पण स्वस्त कपडे घ्यावेत असें कांहीं नाहीं. त्यानें कापड घेऊन शिवावे, ते महाग पडतील एवढेंच. त्याला निवड करण्यास वाव नाहीं असें नाहीं. कोणी असें म्हणेल कीं, हें स्वातंत्र्य कशाला हवें ? तर त्याचें उत्तर देतां येणार नाहीं असें नाहीं. जर प्रत्येक माणसाला काय पाहिजे हें दुसरा कोणी अधिकृतरीत्या ठरवील तर ती हुकूमशाही झाली. मग हुकूमशाहीच्या आज्ञेप्रमाणें तो प्रभू देईल तें खावें व ल्यावें. सर्वत्र एकसारखेपणा येईल. जीवन अगदीं जेलजीवनाप्रमाणें घोटीव, वैचित्र्यशून्य, भकास असें होईल. कलेला वाव मिळणार नाहीं, व्यक्तिविकासाला जागा राहणार नाहीं. कारण ही हुकूमशाही कांहीं नुसती अन्नवस्त्राबाबतच राहणार नाहीं तर काय वाचावें, काय लिहावें, काय बोलावें, इत्यादि जीवनाच्या सर्व दालनांत तिचा अंमल व अधिकार राहील. विविधता, वैचित्र्य, विकासाला वाव, ह्यांतच जीवनाची गोडी आहे. रोजच सायंकाळीं "डोळे हे जुलमी गडे" हें पद ऐकावें लागलें अगर सर्वांना सारखाच पोषाख घालावा लागला, साहित्य ठराविक सांच्याचेंच काढावें असें झालें, तर सर्व जीवन रेल्वेच्या वेळापत्रकाप्रमाणें झालें कीं मग त्यांत रस नाहीं, गोडी नाहीं. स्वातंत्र्य दिल्यानें लोक स्वस्त व कमी प्रतीच्या गोष्टी घेतात, गटार वाङ्मय वाचतात, 'स्टंट' असलेले बोलपट पाहतात, अगदीं अगदीं कळकट संगीत ऐकतात हें म्हणणें बरोबर नाहीं. त्याचप्रमाणें स्वातंत्र्य ठेवलें तर, चैन करतील, भांग दारू पितील, हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. ह्या गोष्टी ते करीत असले तर त्या बंद करण्याचा उपाय त्यांचें स्वातंत्र्य काढून घेऊन सर्वत्र हुकूमशाही सुरू करणें हा नव्हे. ह्या गोष्टी कां होतात हें पाहिलें पाहिजे. असें होण्याचें मुख्य कारण दारिद्र्य, त्यामुळें शिक्षणाचा अभाव व त्यामुळेंच कमी प्रतीची अभिरुचि. जर प्रत्येक माणसाला किमान राहणीपुरतेंच न मिळतां जास्त मिळेल तर त्यायोगें तो आपली उन्नति करूं शकेल, ज्ञान वाढवील, मग वरील गोष्टी होणार नाहींत व असें झालें कीं त्याचा परिणाम उत्पादनावरहि होईल. आज एकीकडे खूप श्रीमंत गिऱ्हाईक तर दुसरीकडे खूप गरीब अशी स्थिति आहे; याचा उत्पादनावर मागणी करणाऱ्यांच्या उत्पन्नाचे मानानें परिणाम होतो. श्रीमंत गिऱ्हाइकांच्या मागणीस पैशाचें अधिक पाठबळ असल्यानें त्या मागणीचा किंमती व उत्पादन यावर विशेष परिणाम होतो, कारण पैसा तयार असतो. पण राष्ट्रांत उत्पन्नाची अशी वांटणी झाली कीं सर्वांना वर सांगितल्याप्रमाणें किमान राहणीपुरतें मिळून शिवाय वर कांहीं मिळेल,

तर या वांटणीमुळें पदार्थ जास्त प्रमाणांत घेणारें गिऱ्हाईक वाढेल; इतकेंच नव्हे तर, परिणामकारक मागणी वाढेल. कारण त्यांच्याजवळ वस्तु घेण्यास अवश्य असणारी क्रयशक्ति जो पैसा तो आहे. एका श्रीमंत गिऱ्हाइकाच्या खरेदीला मर्यादा आहे. कारण एकच वस्तु जास्त घेण्यांत त्याला सौख्य काय असणार? उलट ती वस्तु घेणारें ऐपतदार गिऱ्हाईक वाढलें कीं एकंदर विक्री जास्त हें उघड आहे. श्रीमंत गिऱ्हाईक ४० रु. किंमतीच्या फार तर दोन, चार सायकली घेईल. पण समाजांत मजुरांची मजुरी वाढली, त्यांना वर सांगितल्याप्रमाणें उत्पन्न मिळालें तर, आज जी सायकलींची विक्री आहे तिच्या अनेक पटींनीं ती वाढेल. सर्वांना सारखी संपत्ति मिळाली, सारखें उत्पन्न वांटून मिळालें, निदान आजची समाजांतील विषमता दूर झाली तर सर्वच चांगल्या वस्तु घेतील व त्यांचें उत्पादन वाढेल. एकदम समाजाचा कायापालट होईल, पण मग भांडवलशाही राहिली नाहीं. असो, गिऱ्हाइकांना स्वातंत्र्य असावें कीं नाहीं याचा विचार आज आपल्याला करावयाचा नाहीं. भांडवलशाहींत तें स्वातंत्र्य त्यास आहे व आज आपण भांडवलशाहींतील उत्पादनाचा विचार करीत आहोंत.

गिऱ्हाइकाच्या इच्छेचा परिणाम उत्पादनावर होतो हें अगदी उघड आहे. आपण कांहीं उदाहरणें घेऊं. या उदाहरणांत मक्तेबाजी तूर्त विचारांत घेतली नाहीं व त्याचप्रमाणें समाजांतील चलन हेंही सरळ चालू आहे, त्यांत कांहीं कमीजास्त होत नाहीं असें समजू. कारण ह्या दोन्ही गोष्टी प्रत्यक्ष व्यवहारांत फार महत्त्वाच्या असून अनर्थकारी आहेत. समजा, आज गिऱ्हाईक गव्हाची मागणी करीत आहे, उद्यां बाजरीची करूं लागेल. दोन्हींचा पुरवठा या बदललेल्या मागणीचें स्थितींत कायम असला तर, बाजरीची किंमत वाढेल, गव्हाची कमी होईल. ही मागणी टिकली तर पुढील मोसमांत बाजरी जास्त लावली जाईल व गहूं कमी. गव्हाच्या जमिनी कमी होऊन बाजरीच्या जमिनी वाढतील. त्याचा परिणाम जमिनीच्या किंमतीवरही होईल. कारण बाजरीला भाव म्हणून बाजरीच्या जमिनीला भाव! त्याचप्रमाणें शेतकरीही कोणत्या जमिनींत काय लावावें हें गव्हाचा व बाजरीचा भाव लक्षांत घेऊन त्याप्रमाणें पेरणी करतील. हें एक साधें उदाहरण आपण घेतलें. पण वस्तुतः असें होतें कीं मागणींत बदल झाला, म्हणजेच गिऱ्हाइकांची पसंती बदलली, कीं त्या त्या वस्तूंच्या उत्पादनाच्या सर्व अवस्थांवर परिणाम होतो. या धंद्यांतून त्या धंद्यांत मजूर जातात. भांडवल इकडचें तिकडे जातें. मात्र या सर्व हालचालींच्या मुळाशीं व मागें नवीन क्षेत्रांत जास्त प्राप्ती आहे ही खात्री अगर अंदाज असतो.

समजा, तीच वस्तु नवीन शोधामुळें मोठ्या प्रमाणावर पूर्वीच्याच साधनसामग्रीनें निर्माण करणें शक्य झालें तर, गिऱ्हाइकाच्या दृष्टीनें तें चांगलेंच झालें. कारण तयार करण्याच्या खर्चात वाढ न होतां त्या वस्तूचा पुरवठा वाढला. पूर्वीचीच साधनंसामग्री असल्यामुळें खर्चात वाढ होण्याचें कारण नाहीं; परंतु असें होत नाहीं. भांडवलशाहींत नफा हा प्रधानहेतु असल्यामुळें, पूर्वीच्याच किंमतींत उत्पादन वाढवून विकण्याऐवजीं, पूर्वीच्या सामग्रींतून इतकीं साधनें काढून घ्यावयाचीं कीं, त्या वस्तूंचे उत्पादन कमी होऊं न देतां तीं दुसऱ्या वस्तु निर्माण करण्याकडे उपयोगांत आणावयाचीं. या व्यवस्थेंत पूर्वींची मागणी पूर्वींच्या किंमतीस कायम ठेवून नवीन वस्तूंकडे अगर दुसऱ्या वस्तूंचें किफायतशीर उत्पादन करण्याकडे, कांहीं जुनी सामग्री व साधनें लावून आणखी प्राप्ती वाढवावयाची असें दृश्य दिसतें. मात्र दुसरीकडे नफा होणें शक्यच नसल्यास अगर संशयित असल्यास, पहिल्याच वस्तुचें जास्त उत्पादन करणें, जास्त नफ्याच्या दृष्टीनें योग्य ठरतें. मात्र तेथें उत्पादन जास्त झाल्याबरोबर, पुरवठा वाढल्याबरोबर, भाव कमी होईल व त्या दृष्टीनें गिऱ्हाइकाचा फायदा होईल. गिऱ्हाईक आपल्या मागणीनें उत्पादनावर कसा परिणाम करूं शकतें हें वर पाहिलें. समजा, गिऱ्हाईक आपलें स्वातंत्र्य खर्च करण्याकडे उपयोगांत न आणतां पैसे वांचवूं लागलें. याचा अर्थ आज ज्या गोष्टी, ज्या उपभोग्य गोष्टी हव्या आहेत त्या न घेतां अगर त्या कमी प्रमाणांत घेऊन पुढें त्या घेतां याव्यात एवढ्यासाठीं ही व्यवस्था आहे. माणसें पैसे जास्त वांचवावयाला लागलीं म्हणजे चालू गरजांवर— उपभोग्य वस्तूंवर साहजिक खर्च कमी होणार. शिवाय आपलें उत्पन्न वाढावें म्हणून जी सांचविलेली संपत्ति असेल तीं व्याजीं लावणें अगर अन्य तऱ्हेनें गुंतविणें हें क्रमप्राप्त होतें. चालू गरजांच्या वस्तूंना—उपभोग्य वस्तूंना—मागणी कमी झाली कीं, साहजिक तिचा पुरवठा कमी होईल व मालक नफ्याच्या आशेनें त्यांतील कांहीं उत्पादन साधनसामग्री, दुसऱ्या वस्तूंच्या उत्पादनक्षेत्राकडे नेतील. त्याचबरोबर लोकांनीं सांचविलेला व गुंतविलेला पैसा, जास्त यंत्रें, जास्त उत्पादनाची साधनसामग्री म्हणजे भांडवलरूपीं वस्तु,—उत्पादक वस्तु—तयार करण्याकडे खर्च केला जाईल. म्हणजे गिऱ्हाइकाच्या इच्छेचा, वागणुकीचा परिणाम कांहीं वस्तूंचा पुरवठा वाढविण्यांत, कांहींचा कमी करण्यांत, चालू गरजांवर, उपभोग्य वस्तूंवर व भांडवलरूपी वस्तूंवर— थोडक्यांत सर्व उत्पादनसृष्टीवर होतो; आणि म्हणूनच आपण त्याला उत्पादनसृष्टीचा राजा म्हटलें तें योग्य आहे. पण या त्याच्या वागणुकीचा परिणाम एकंदर उत्पादन जास्त जास्त भांडवलशाही स्वरूपाचें होण्यांत होतो, हेंही तितकेंच खरें. राजाची लहर

अनियमित व अनियंत्रित हेलकावे खाणारी असली, कीं तिचा परिणाम त्याच्या राज्यव्यवस्थेवरहि तसाच होतो; त्याप्रमाणें भांडवलशाही उत्पादनसृष्टींत एकीकडे विपुलता, श्रीमंती, डोकें भडकविणारी तेजी व दुसरीकडे दुर्भिक्षता, दारिद्र्य, आणि डोकें फिरविणारी मंदी ! सर्वत्र अनियंत्रितपणा, नियमनाचा अभाव व कार्यसाधू लोकांचें, स्वार्थसाधू लोकांचें अधिराज्य, स्वार्थाला तेजी व सेवेला मंदी असें विरोधी व अन्यायी दृश्य दिसतें.

वर आपण असें पाहिलें कीं, लोक पैसा सांचवितात व व्यवहारांत गुंतवितात व हें करण्याचें त्यांना अर्थात् भांडवलशाहींत पूर्ण स्वातंत्र्य आहे. ही सांठवण, हें भांडवल कसें उपयोगांत आणलें जातें हें थोडक्यांत पाहूं. जास्त यंत्रें वाढवून, उत्पादनाचें तंत्र सुधारून, श्रमविभागणी करून, 'खासपणा' वाढवून, कोणत्या ना कोणत्या वस्तूचें उत्पादन व्यापक प्रमाणावर करणें नेहमींच शक्य असतें. ज्यांना पैसे गुंतवावयाचे असतात, ते असें ठिकाण पाहतात कीं त्यांना जास्तींत जास्त व्याज, नफा, डिव्हिडंड—थोडक्यांत जास्त प्राप्ती व्हावी. म्हणून पैसे गुंतविण्यापूर्वी उत्पादन किती वाढविणें शक्य आहे, कोणत्या वस्तूंचें वाढविल्यास अधिक प्राप्ती होण्याचा संभव आहे मार्केट कोणत्या वस्तूला आहे अगर वाढले आहे, अगर तसें होण्याचा संभव आहे, ह्या व अशाच गोष्टींचा ते विचार करतील. मागणी—भावी काळांत होणारी—निदान तिचा अंदाज बांधूनच, एखाद्या धंद्यांत भांडवल गुंतविलें जातें. म्हणजेच गिऱ्हाईक—उपभोगी—काय वस्तु घेईल, या गिऱ्हाइकराजाच्या लहरींचा अंदाज घेऊनच हें गणित बसवावयाचें असतें. तात्पर्य उपभोगी गिऱ्हाईक उत्पादनसृष्टीवर अधिकार चालवितो. याचा अर्थ तो एकटादुकटा अधिकार चालवितो असा नव्हे, तर हें सर्व उत्पादनयंत्र सर्व गिऱ्हाइकांच्या एकत्रित इच्छेच्या कांट्याप्रमाणें चालत असतें. मोटार कशीही असो कोणीही हांको, ती कशी व कोठें जावयाची हें तिचा आंत बसलेला मालक ठरवीत असतो. उत्पादनाच्या स्थितीचा, गतीचा लयाचा, संचालक उपभोगी गिऱ्हाईक आहे; अखेरचा शब्द, अखेरचा निर्णय त्याचा हें स्पष्ट आहे.

वर आपण पाहिलें कीं, गिऱ्हाईक—उपभोगी—हा भांडवलशाहींत पूर्ण मोकळा आहे, स्वतंत्र आहे. पण हे उपभोगी म्हणजे कोण ? त्यांचें उत्पन्न कोठून येतें कीं, ज्यामुळें ते एवढी सत्ता चालवितात हें आपण आतां पाहूं. आपल्या इच्छेप्रमाणें वस्तूंच्या किंमतीरूपी मुनिमामार्फत सर्व उत्पादनावर अंमल चालविणारे हे कोण हें पाहूं. हें उपभोगी गिऱ्हाईक, म्हणजे उत्पादनसाधनांपैकींच एक जात आहे. म्हणजे

जे श्रम करून मजुरी अगर मेहनताना मिळवितात ते अगर आपल्याजवळच्या वस्तूंचा मोबदला मिळवितात ते, तो मेहनताना व तो मोबदला हें त्यांचें उत्पन्न. समाजांत कांहीं श्रम करून, कांहीं व्याज मिळवून, कांहीं खंड मिळवून, कांहीं भाडें मिळवून आपल्याजवळ असलेल्या साधनसामग्रीच्या उपयोगाबद्दल मोबदला मिळवून त्यावर जगतात. कांहीं सरकारी देणग्यांवर जगतात, कांहीं दानावर जगतात. या भांडवलशाही जगांत जगण्याचे असे हे विविध प्रकार आहेत. स्थूलमानानें श्रम करून जगणारे हा एक वर्ग; व श्रम न करतां मोबदला घेऊन जगणारे हा दुसरा. या दोन वर्गांची बेरीज म्हणजे उपभोगी गिऱ्हाइकांची जातगंगा. अर्थात् मुलें, म्हातारे, दानावर जगणारे, यांचा विचार केला नाहीं. कारण ते ज्यांच्यावर अवलंबून आहेत, त्यांचा समावेश या दोन वर्गांत कोठें तरी होतो. श्रमांचा मोबदला व वस्तूंच्या उपयोगाचा मोबदला, या दोहोंची बेरीज म्हणजे या उपभोगी जातगंगेचें उत्पन्न. याचा अर्थ असा नव्हे कीं, प्रत्येक श्रम करणाराचें अगर मोबदलावाल्याचें उत्पन्न कायम व ठराविक असतें अगर राहतें. धान्याला भाव आला तर जमिनीची किंमत वाढते, व त्याबरोबर जमिनीचा मालक म्हणून त्याचा मागणीवर जास्त परिणाम होतो. त्याबरोबर तो प्रत्यक्ष धान्याचा गिऱ्हाइकही असतो म्हणजे धान्यहि त्याला अवश्यक असतें. म्हणून धान्य महाग झालें तर त्यालाहि महाग झालें; म्हणजे एका नात्यानें उत्पन्न वाढलें. दुसऱ्या नात्यानें कमी झालें. या दृष्टीनें प्रत्येक घटकाचे उत्पन्नांत व गिऱ्हाइकांचे परस्परांचे उत्पन्नाचे प्रमाणांत, सारखे फेरबदल होत असतात. तथापि हे फेरबदल उत्पादक वस्तूंच्या अगर उपभोगींच्या उत्पन्नांत होत असले तरी त्यामुळें उपभोगी गिऱ्हाईक हा सर्व उत्पादनसृष्टीचा संचालक आहे, या सिद्धांताला कांहीं बाध येत नाहीं. राज्याचें उत्पन्न कमीजास्त झालें म्हणून राजाचें राजेपण कांहीं कमी होत नाहीं. जोंपर्यंत आपल्या इच्छेनें, आपल्या मागणीनें कोणती वस्तु घ्यावी अगर न घ्यावी हें स्वातंत्र्य माणसांना आहे, तोंपर्यंत त्याचा परिणाम उत्पादनावर होणार हा अगदीं निश्चित सिद्धांत आहे.

---

# १२. उत्पादनाचे कांहीं प्रश्न

आतांपर्यंतच्या विचारांत आपण पाहिलें आहे कीं उत्पादनाचे कामांत अनेक उत्पादनघटक एके ठिकाणीं यावे लागतात, आणावे लागतात. अवश्य तें भांडवल, कच्चा माल, मजुरांचा पुरवठा, तंत्र जाणणारे कारागीर, या सर्व गोष्टींचा मेळ बसवावा लागतो तेव्हां उत्पादनाचें काम सुरू होतें. या सर्व गोष्टीं एकत्र आणण्याचें कार्य सोपें नाहीं, त्यांत चातुर्य लागते, योजकता लागते. हें काम करणाऱ्यास आपण योजक अशी पदवी मागेंच दिली आहे. नुसती हिंमतबहाद्दरी यांत नाहीं किंव नुसत्या सांगकाम्याप्रमाणें पाट्या टाकावयाच्या हेंहि नाहीं; तर निरनिराळे उत्पादन-घटक, साधनसामग्री जमवून, मागणीचा अंदाज घेऊन, सर्व गोष्टी यथायोग्य प्रमाणांत करण्याची हातोटी व पात्रता अंगीं असावी लागते. पुष्कळ वस्तु जगांत आहेत पण त्यांचा उपयोग करून घेणारा दुर्लभ असतो, असे म्हणतात. योग्य रीतीनें उत्पादन घडवून आणणारा हा योजकवर्ग भांडवलशाहीच्या उत्पादनांतील प्रमुख वर्ग आहे, तो उत्पादनाचा द्रष्टा आहे. सोप्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे उत्पादन जर शरीर समजल तर तो डोकें आहे; कारण विचार करण्याचें काम त्याचें आहे. मग धंद्याच्या मानानें एक अगर अनेक व्यक्ति हें काम करीत असतील, तें करणारांना आपण योजक म्हणूं. हल्लीं सर्वत्र उत्पादनाचें काम मोठमोठ्या पेढ्या, मंडळ्या करीत असतात. त्या कायद्यानें नोंदलेल्या असल्या व त्यांचें भांडवल भागरूपानें विभागलें असलें म्हणजे त्यांना लिमिटेड कंपनी असें आपण म्हणतों. किर्लोस्करबंधु लि० याचा अर्थ ही कंपनी नोंदली असून तिचें भांडवल भागरूपानें भागीदारांनीं उभें केलें आहे. दुसऱ्या पुष्कळ मंडळ्या, पेढ्या, कंपन्या, न नोंदलेल्या असतात. त्यांतही भागीदार असतात. दोहोंत मुख्य फरक असा——लिमिटेड कंपनींत भाग घेणारांची जबाबदारी भागाची जी नोंदलेली किंमत असेल तेवढीच. समजा 'प्रकाश आणि कंपनी लि०' अशी नोंदविलेली एक कंपनी आहे. तिचें एक लक्ष रुपये भांडवल, दर भाग १०० रु.चा असें एक हजार भागांत आहे. म्हणजे जर सदरहू कंपनी बंद झाली, बुडाली व तिचें कर्ज द्यावयाची

पाळी आली तर, ज्यांनीं भाग घेतले असतील, पण पैसे पुरे दिले नसतील, त्यांची जबाबदारी राहिलेल्या पैशांइतकीच. उदा०, मी एक भाग १०० रु.चा घेतला व आतांपर्यंत ५० रुपये दिले आहेत जास्त नाहीं; आतां कंपनी बुडाली तर माझी जबाबदारी राहिलेल्या ५० रु. पुरती, जास्त नाहीं. याच गोष्टीला मर्यादित जबाबदारीच्या मंडळ्या, लिमिटेड कंपन्या म्हणतात. ज्या लिमिटेड नाहींत, त्यांच्या भागीदारांवर संपूर्ण जबाबदारी ! नुसता मंडळीचा माल विकून ती भागली नाहीं तर त्यांच्या अन्य मिळकतींतूनसुद्धां ती पुरी केली जाते, हा मुख्य फरक आहे. याबद्दल आणखी विचार पुढें करूं. या कंपन्या, त्या लिमिटेड असोत अगर नसोत, उत्पादनाची साधनसामग्री, जमीन, कारखाने, कच्चा माल, वाहतुकीचीं साधनें, मजूर, विक्रीव्यवस्था वगैरे सर्व गोष्टी एकत्र करीत असतात; त्या सर्वांवर देखरेख ठेवणारा, मार्गदर्शन करणारा, योजकवर्ग हा असतोच. त्या मंडळीपुरती, कंपनीपुरती, हा योजक योजना करीत असतो व त्याप्रमाणें उत्पादन होत असतें. हल्लीं हें उत्पादनाचें तंत्र इतकें शास्त्रीय झालें आहे कीं, तें संभाळण्याकरितां निरनिराळे कारखाने एकत्र करावे लागतात, निरनिराळ्या घटकांशीं सहकार्य करावें लागतें. त्याकरितां अनेक योजक लागतात. पुष्कळ वेळां योजक योजना करतात, पण त्या उत्पादनावर प्रत्यक्ष ताबा दुसऱ्यांचाच असतो. शेअरहोल्डर्स म्हणजे भागीदार, चालक मंडळावर नियंत्रण करतात. ते त्यांना काढूं शकतात, कंपनीच्या सर्व कारभारावर आपला अधिकार अशा रीतीनें चालवूं शकतात कीं कंपनीचें धोरणहि ते बदलूं शकतात. प्रत्यक्ष व्यवहारांत २–३ चालक अगर थोडेसे भागीदार एकंदर धोरण ठरवितात. बाकीचे भागीदार आपापल्या भागामागें डिव्हिडंड—नफा—काय मिळतो यापलीकडे लक्ष घालीत नाहींत; प्रत्यक्ष कामावर देखरेख करण्याचें अगर प्रत्यक्ष उत्पादनाचें काम करणारे निराळेच असतात. उत्पादन काय करावें काय करूं नये याचा निर्णय त्या कंपनींतील, मंडळींतील योजक घेत असतात. कारण ते ह्या बाबतींतील तज्ज्ञच होत. हुकूमशाहींत एकसूत्रीपणा व सर्व कारभार एकहातीं असल्यामुळें मूळ योजना हुकूमशहा ठरवितो, सर्व निर्णय तो घेतो, सर्व कारभार एका ठिकाणाहून चालतो. याच्या उलट भांडवलशाहींत प्रत्येक मंडळी, उत्पादन करणारी प्रत्येक कंपनी अगर व्यक्ति आपापल्या परीनें स्वयंसिद्ध असल्यामुळें आपापल्या विचारानें उत्पादनासंबंधींचे सर्व निर्णय घेत असते. सर्वत्र प्रांतिकच काय पण व्यक्तिगत स्वायत्तता, स्वातंत्र्य आहे व हे सर्व निर्णय घेण्याचें काम सर्वत्र योजकच करीत असतात. जो तो योजक आपल्या पेढीच्या हिताच्या दृष्टीनें स्वतंत्र रीतीनें हे निर्णय घेत असतो. मग तो नवीन धंदा काढीत असो, चालू

जुना धंदा वाढवीत असो अगर चालू धंद्यांत भागीदार म्हणून शिरलेला असो. तो जे निर्णय घेतो ते आपला फायदा म्हणजे नफा जास्तींत जास्त कसा होईल या एकाच दृष्टीनें. त्याचप्रमाणें ज्या साधनसामग्रीमुळें जास्तींत जास्त फायदेशीर उत्पादन करतां येईल, तीच उपयोगांत आणण्याच्या दृष्टीनें त्या बाबतींतील त्याचे निर्णय असतात. कांहीं उद्योगधंदे वाढतात, कांहीं कमी होतात, कांहीं कारखाने जागा बदलतात, यंत्रांत सुधारणा होतात, उत्पादनाचें तंत्र बदलतें; अशा नाना गोष्टी सारख्या चालू असतात. त्या बाबतींतील सर्व निर्णय योजकवर्ग घेत असतो, त्यामुळेंच हे सर्व बदल होत जातात. काय उत्पादन करावयाचें, कोठें करावयाचें, कोणत्या प्रमाणांत करावयाचें याचे निर्णय, हे सर्व प्रश्न समाजातर्फे या योजक वर्गाला सोडवावे लागतात व त्याप्रमाणें त्याचें धोरण ठरत जातें. सामान्यतः योजकांनाच धंद्यांतील जबाबदारी पतकरावी लागते. उत्पादन करण्याचें ठरल्यापासून पक्का माल—पूर्ण वस्तु—तयार होईपर्यंत वेळ लागतो. तथापि यंत्रांची किंमत, जमिनीचें भाडें, कारखाना बांधण्याचा खर्च, कच्चा माल विकत घेण्याचा खर्च, मजुरांचा व कारागिरांचा मेहनताना हे त्याला सुरवातीपासून द्यावेच लागतात; तसेंच भांडवलावरील व्याजहि द्यावें लागतें. या गोष्टी त्याला कराव्याच लागतात. ही खर्चाची बाजू निश्चित असते. माल पक्का तयार झाला, बाजारांत गेला, अंदाजाप्रमाणें खपला तर—तर प्राप्ती. नाहीं तर नुकसान! म्हणजे जमेची बाजू अनिश्चित, अंदाजाप्रमाणें झालें तर प्राप्ती योग्य इतकेंच नव्हे तर जास्तहि. तथापि हा धोका त्याला पतकरावा लागतो. घरभाडें, नोकरींतील मेहनताना, व्याज वगैरेंना कांहीं निश्चितपणा आहे. धंद्यांतील नफा पतंगाप्रमाणें आहे. मागणीची हवा लागली कीं वरवर, नाहींतर जमिनीवर, पुनः पुनः प्रयत्न केला तरी पडावयाचा. व्यवहार सारखा बदलत असतो. आज एका वस्तूला चिकार मागणी, उद्यां तिचा बाजार थंड; कांहींची मागणी वाढत असते, कांहींची कमी होत असते. कांहीं वस्तूंच्या उत्पादनाची साधनसामग्री महाग होते, मर्यादित होते, त्याबरोबर कांहीं वस्तु, इतर वस्तूंचे मानानें महाग होतात. अशा व यासारख्या कायम ठाव नसणाऱ्या व्यवहाराच्या दर्यांत योजकाला नफ्याचे मोती काढावयाचे असतात. हा बदलणारा व्यवहार, हा देवघेवीचा बाजार, सनातन पण नित्य नवा अशा स्वरूपाचा आहे. म्हणून काय बदल झाला आहे, काय होत आहे व काय होईल, हें योजकाला समजणें अवश्य आहे. ज्या प्रमाणांत या बाबतींत त्याचें ज्ञान पक्कें, अंदाज बरोबर, त्या प्रमाणांत त्याला यश म्हणजे नफा मिळतो; कारण या ज्ञानाला व अंदाजाला अनुसरून तो आपलें उत्पादन जुळवून घेतो. एकंदर

परिस्थितीचें पूर्ण आकलन करून तो उद्यांबद्दल जो कयास बांधतो त्यावर त्याचा नफा. हे सर्व अंदाज जास्तींत जास्त नफा कसा मिळेल याच दृष्टीनें तो बांधीत असतो. भांडवलशाहींत स्पर्धा, ( कॉंपिटिशन ) चुरस असल्यामुळें जें गिऱ्हाइकाला विशेष पाहिजे तेंच उत्पादन करणें नफ्याचें ठरतें. जें खपेल तें लिहावें हें भांडवलशाहीचें तत्त्व आज महाराष्ट्रांतील साहित्यसृष्टींतहि शिरलें आहे. कारण न खपणारें लिहून अगर न खपणारी वस्तु उत्पादन करून आपलें नुकसान कोण करून घेईल ? कलेसाठीं त्याग कदाचित् एखादा महामना महात्मा करील, पण वस्तु न खपणारी हें जाणून तिचें उत्पादन करणारा योजक खरोखर दुर्लभ आहे ! म्हणून खप असणारेंच उत्पादन केलें पाहिजे नाहीं तर दुसरा उभा आहेच. मागणीप्रमाणें पुरवठा करणें हेंच नफ्याचें ठरतें. इतकेंच नव्हे तर दुसरीकडे खर्च होणारी साधनसामग्री, योग्य मोबदला तिकडे देत नसेल तर, या म्हणजे जिचा खप आहे त्या वस्तूच्या उत्पादनाकडे लावणें हेंहि फायदेशीर होईल. वस्तूंच्या भावांवरून, किंमतीवरून कोणीकडून कोणीकडे उत्पादनसामग्री बदलली असतां फायदेशीर होईल हें कळून येण्यासारखें असतें. कारण भाव अगर किंमत, म्हणजे गिऱ्हाइकाच्या आवडी–निवडीच्या नाडीचे ठोके, म्हणजेच वस्तूंचे भाव, व त्यावरून काय खपेल, कशाला मागणी वाढेल, हें योजक समजूं शकतो. हें भावयंत्र गिऱ्हाइकाला काय पाहिजे हे दाखवितें; त्याचबरोबर योजकाला कोणत्या वस्तूंच्या उत्पादनांत नफा आहे हेंहि दाखवितें आणि उत्पादन व उपभोग यांच्यांत समतोलपणा—मेळ—उत्पन्न करतें.

वर भावयंत्र मेळ उत्पन्न करतें असें म्हटलें. पण ही गोष्ट प्रत्यक्ष व्यवहारांत संपूर्णपणें घडून येत नाहीं. कारण जर व्यवहारांत, उत्पादनांत, पूर्ण मोकळीक, पूर्ण स्पर्धा, चुरस असेल तर, हें शक्य आहे. कारण स्पर्धा अगर चुरस नसली तर, वस्तूंच्या उत्पादनांत कमीजास्त मक्तेबाजी अगर त्या स्वरूपाचे कांहीं प्रकार असतील तर, या भावयंत्रावरून वर सांगितल्याप्रमाणें गोष्टी घडून येणार नाहींत. मोकळ्या जागीं हवा–यंत्र ठेवलें म्हणजे सर्वस्वीं समाधानकारक काम देतें, परिस्थिति कशी आहे हें दाखवितें. त्याचप्रमाणें व्यवहार–उत्पादन मोकळें, मुक्तबंध पाहिजे म्हणजे भावयंत्र वर लिहिल्याप्रमाणें मार्गदर्शन करतें. हें यंत्र इतकें नाजुक आहे कीं, जरा कांहीं कमीजास्त झालें कीं बिघडतें. समजा, चालक वर्गानें भागीदारांच्या हिताविरुद्ध व स्वतःच्याच हिताकरितां कांहीं निर्णय घेतले, अगर सरकार समाजांतील एकाच वर्गाकरितां, सर्व जनतेकरितां नव्हे, कायदे करून त्यांचेंच हित पाहूं लागलें, कंपन्या थापेबाज जाहिरातींनीं गिऱ्हाइकांना व खोट्या जमाखर्चाच्या तक्त्यांनीं

अगर ताळेबंदांनीं जनतेला फसवूं लागल्या तर हें भाव-यंत्र वर लिहिल्याप्रमाणें काम देणार नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं वस्तूंच्या उत्पादनामुळें कांहींना सदरहु उत्पादनाशीं संबंध नसतांनासुद्धां खर्च पडत असतो. उदा०, गिरणगांवांत राहणाऱ्या लोकांचे कपडे धुरानें लवकर मळतात, त्यामुळें धोब्याचा खर्च वाढतो. हा खर्च कांहीं गिरणीवाले देत नाहींत; या उलट रेल्वे जवळ असली, अगर कारखाना जवळ असला, तर जवळच्या वस्तींतल्या लोकांचा फायदाहि होतो. खडकीच्या कारखान्यांमुळें आसपासच्या वीस-पंचवीस खेडेगांवच्या लोकांच्या उत्पन्नांत भर पडली आहे. पुष्कळ मजूर तेथें वर्षांतून कांहीं दिवस कामास जातात, बाकी दिवस शेतीवर काम करतात. खेडेगांवच्या घरांनाहि भाव येऊं लागला, हातीं खेळता पैसा आला. रेल्वे स्टेशन जवळ असलें कीं वस्तु विकण्याकरितां एक लहानसा बाजारच उत्पन्न होतो. पण अशा तऱ्हेचा फायदा हा कांहीं त्या रेल्वेला अगर कारखान्याला जात नाहीं. पण त्याचा परिणाम भावयंत्रावर होतो. जेव्हां आपण भाव म्हणजे गिऱ्हाइकाच्या इच्छेचें गमक व भावयंत्र हें उपभोग व उत्पादन याचा मेळ घालतें असें म्हणतों, त्या वेळेस माणसांचें उत्पन्न, तेव्हां जें असेल त्याला अनुसरूनच. कारण भाव मागणीचा गमक आहे, पण ऐपतीचा नाहीं. धान्य, साखर, भाजीपाला कापड हीं मनुष्यमात्रास घ्यावींच लागतात म्हणून त्यांना मागणी. पण, त्याच्यावरून तें घेण्याची त्यांची ऐपत आहे हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. भावयंत्र, मागणी काय आहे हें सांगेल, कोणते उत्पादन फायदेशीर आहे याचाहि कौल देईल. मात्र या भावयंत्रानें गिऱ्हाइकांचें उत्पन्न काय आहे हें कळणार नाहीं. या आरशांत त्याचें चित्र दिसेल वित्त दिसणार नाहीं!! भावयंत्रानें उत्पादन—उपभोग—यांचा मेळ बसविण्याचें काम होतें, हाहि नियम संपूर्णपणें व्यवहारांत दिसत नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. कारण हा मेळ घडवून आणणें हें योजकाच्या चातुर्यावर व धाडसावर अवलंबून असतें. चौपटांत जसें सांगून दान पडत नाहीं, तसें भांडवलशाही उत्पादनांत-ठरविलेलें घडतेंच असें नाहीं. निर्जीव फांसे व सजीव माणसें दोन्ही काय करतील हें निश्चित सांगतां येत नाहीं. म्हणून हा उत्पादन-उपभोगाचा मेळ संपूर्ण बसणें कठीण होतें. भांडवलशाहींतच असें होईल असें नाहीं; तर प्रत्येक समाजरचनेंत कांहीं ना कांहीं दोष असणारच. मग ते साधारण असोत अगर संघटनेचे असोत. रशियांतील साम्यवादी उत्पादन योजनेंतसुद्धां, ठरविल्याप्रमाणें सर्व झालें नाहीं. अर्थात् तेथें चुकीचें प्रमाण कमी. शिवाय तेथें होणारा फायदा सर्वांचा असल्यामुळें झालेलें नुकसान सर्वांनीं सहन केलें. अलौकिक गोष्टी करीत आहोंत ही सर्वांचीं भावना असल्यामुळें तेथें मानसिक यातना नाहींत.

उलट भांडवलशाहींत मानसिक यातना तर आहेतच, पण त्याबरोबर प्रत्यक्ष अन्याय व दुःख हीहि आहेत. तथापि त्या पद्धतींतसुद्धां दोष असणारच. जगांत निर्दोष काय आहे? पण याचा आणखी थोडा विचार केला पाहिजे. सर्व उत्पादन कोणत्याहि समाजरचनेंत माणसांकडूनच व्हावयाचें असतें, परंतु सर्व माणसें सारखीं नाहींत, सारख्या बुद्धीचीं नाहींत. कांहीं सुस्वभावी, कांहीं त्रासिक, कांहीं अन्याय बुद्धीनें वागणारीं, कांहीं सरळ—म्हणजे ज्यांच्या वागणुकीचें गणित आपण बिनचूक मांडूं शकणार नाहीं अशीं असतात. दगडाला आकार दिला कीं तो कायम, लांकूड कापलें तर त्याचा आकार कायम, शाडूचें चित्र केलें तर तेंही कांहीं काळ कायम, पण माणसांचीं मनें काय कलाटणी घेतील हें बिनचूक सांगणें कठीण. निवडणुकींत हा अनुभव सर्वत्र आहे. म्हणून जेवढा कांहीं दोष मनुष्यांत असेल, त्या मानानें कमी-जास्त दोष त्यांच्या संघटनेंत राहणार; अर्थात् भांडवलशाही पद्धतींत, माणसाकडे मनुष्य या नात्यानें न बघतां एक यंत्र, एक उत्पादनघटक, या नात्यानें बघण्याची दृष्टि असल्यामुळें हे दोष जास्ती प्रमाणांत असणारच. असो; वर सांगितलेल्या मर्यादा लक्षांत घेऊन आपणाला असें म्हणतां येईल कीं, मागणीप्रमाणें उत्पादन घडवून आणण्याकडे भावयंत्र मार्गनिदर्शन—रस्ता दाखविण्याचें काम करीत असतें.

आतांपर्यंत योजकाला कोणत्या दिशेनें जावें हें दाखविणाऱ्या भावयंत्राचा थोडा विचार केला. आतां योजकापुढें जे नाना प्रकारचे प्रश्न उभे राहतात त्यासंबंधीं थोडा विचार करूं. प्रथम योजकाच्या संघटनेचें स्वरूप हल्लींच्या व्यवहारांत कसें असतें, हें आपण पाहूं. एकच मनुष्य आपल्या मालकीच्या उत्पादनसाधनसामग्रीचा योजक होऊं शकतो. उदा०, माझी १०० एकर जमीन आहे. मी भांडवल कर्जाऊ घेईन, मजूर लावीन, यंत्रें घेईन, ऊंस लावीन, गूळ काढीन व विकीन. यांत मीच मालक व मीच योजक झालों. सर्व नफानुकसान माझेंच. समजा, माझ्या गांवच्या दहा-जणांनीं भागी केली, मी त्यांना जमीन खंडानें दिली, त्यांनीं सावकारांकडून कर्ज काढलें, यंत्रें घेतलीं, मजूर ठेवले, गूळ काढला, विकला म्हणजे जे दहाजण भागींत होते ते योजक, या उत्पादनाचे—पैदाशीचे झाले. नफानुकसान सर्व त्यांचेंच. पण ज्यांच्याजवळ मजुरीशिवाय, श्रमांशिवाय कांहीं नाहीं त्यांना प्रत्यक्ष व्यवहारांत योजक होणें कठीण पडतें. कारण भांडवलाकरितां अवश्य अशी पत नसते. इतर साधन-सामग्री मिळणेंही दुरापास्त होतें. म्हणून प्रत्यक्ष व्यवहारांत ज्यांच्याजवळ भांडवल आहे ते सामान्यतः योजक होतात. मात्र सर्वसाधारण धोरणापलीकडे प्रत्यक्ष उत्पा-दनांत ते भाग घेत नाहींत. तें काम अर्थात् व्यवस्थापक, मॅनेजरकडे जातें. तथापि

नफानुकसानीची सर्व जबाबदारी योजक म्हणून त्यांचेवर पडणार हें उघड आहे. जेथें एकच मनुष्य योजक आहे म्हणजे नफानुकसानीस जबाबदार आहे, अशा तऱ्हेचें उत्पादनाचें स्वरूप कांहीं धंद्यांत विशेष दिसतें. लहान प्रमाणावर जेथें उद्योगधंदे आहेत तेथें हा प्रकार आहे. त्याचप्रमाणें शेतींत तर मोठ्या प्रमाणांत मालकच उत्पादन करीत असतो, सर्व जबाबदारी तोच घेत असतो. किरकोळीनें विक्री करणारीं दुकानें सामान्यतः एका माणसाचींच असतात. एकखांबी तंबूप्रमाणें एका माणसाचे अधिकाराखालीं असणारे पुष्कळ व्यवहार हल्लींसुद्धां आहेत. तथापि भागीदारीनें व्यवहार करण्याचें प्रमाणही पुष्कळ आहे. भागीदारी कायद्यानें नोंदवावी लागते. आपापसांतील करारमदार ठरवावे लागतात. ते न ठरविले तर सर्वसामान्य कायद्याचीं जीं तत्त्वें असतील त्यांप्रमाणें व्यवहार होत आहे असें समजलें जाईल. आपल्याकडे भागीदारीचा कायदा आहे. सुधारलेल्या सर्व राष्ट्रांत याप्रमाणें व्यवस्था आहेच. भागीदारींत प्रत्येक भागीदारानें भांडवल अगर अन्य साधनसामग्री अगर आपले श्रम, हे द्यावे लागतात. जर नुकसान झालें तर प्रत्येक भागीदार व्यक्तिशः जबाबदार आहे व ही जबाबदारी अमर्यादित आहे. म्हणजे भागीदाराची सर्व इस्टेट--मिळकत--त्या देण्याला जबाबदार आहे आणि म्हणून साधारणतः कोणतीही नवीन गोष्ट करावयाची असल्यास, सर्व भागीदारांच्या संमतीमेंच करणें योग्य असतें. नवा धंदा करणें असो, नवा भागीदार घेणें असो अगर नवीन धोरण स्वीकारणें असो अशा महत्त्वाच्या प्रश्नाबाबत सर्व भागीदारांची संमति असणें अवश्य असतें. तथापि ज्या दैनंदिन गोष्टी, त्या बहुमतानेंच ठरतात व तें योग्यही आहे; अशा पद्धतीच्या भागीदारीनें शेंकडों धंदे चालू आहेत. स्थावर इस्टेटींचे दलाल, सॉलिसिटर्स, हिशोबतपासनीस, डॉक्टर्स, वकील वगैरेंच्या व्यापारांतसुद्धां अशा भागीदाऱ्या आहेत. या अनियंत्रित जबाबदारीच्या भागीदारी पेढ्याप्रमाणें खाजगी रीतीनें मर्यादित जबाबदारीच्याही पेढया असतात (Private Limited Company). त्यांत भाग कांहीं ठराविक मंडळी घेतात, व ते भाग विक्रीस नसतात. अशा खाजगी मर्यादित जबाबदारीच्या कंपन्या उद्योगधंद्यांतून फार आहेत. त्या नोंदलेल्या असतात. त्यांत भागीदारांची जबाबदारी मर्यादित, भागीदारांची संख्या मर्यादित, भाग बाजारांत इतर सार्वजनिक कंपन्यांच्या भागाप्रमाणें विकतां येत नाहींत किंवा तारणरोखेहि काढून ते जाहीरपणें विकतां येत नाहींत. पण त्याबरोबर कामाच्या दृष्टीनें सुटसुटीत, दोन माणसेंसुद्धां कंपनी काढूं शकतात. म्हणून बऱ्याच उद्योगधंद्यांत या तऱ्हेच्या कंपन्या आहेत. जेथें जनतेकडून भांडवलाची गरज नाहीं

अशा सर्व ठिकाणीं ह्या नजरेस येतील. जेथें मोठ्या धोक्याची जबाबदारी पतकरून उद्योग सुरू करावयाचा आहे, तेथें अशा कंपन्या फार चांगल्या. शिवाय जरूर पडल्यास त्यांचें रूपांतर सार्वजनिक लिमिटेड कंपनींत करतां येतें व भागांची विक्री करतां येते. सार्वजनिक मर्यादित जबाबदारीच्या कंपन्या तर आजच्या उत्पादन-क्षेत्रांत सर्वांत महत्त्वाच्या स्थानावर आहेत. कमींत कमी सात माणसें असलीं म्हणजे सार्वजनिक लिमिटेड कंपनी नोंदवितां येते. अधिकृत भांडवल कितीहि असलें तरी जेवढें पाहिजे असेल तेवढें व जरूर पडेल तर बाकीचें भागीदारांकडून गोळा करतां येतें. जबाबदारी मात्र जेवढया दर्शनी रकमेचे भाग काढले असतील तेवढीच मर्यादित. १० रु. चा एक भाग याप्रमाणें एक लाख भाग काढून या उत्पादनघटनेंत हजारों माणसांना गोवतां येतें. नफा झाल्यास दरसाल अगर नियमित काळानें डिव्हिडंड म्हणून भागीदारांत वांटला जातो. सर्व भागीदार हे कंपनीचे मालक व कंपनी-कडून होणाऱ्या उत्पादनाचे योजक; पण व्यवहारांत सर्व भागीदारांना देखरेख करणें शक्य नाहीं, म्हणून ते चालक मंडळ निवडतात. हें चालक मंडळ कायद्याप्रमाणें भागीदारांस जबाबदार असतें. परंतु बहुतेक ठिकाणीं हे चालक व त्यांचे इष्टमित्र यांच्या मालकीचे भाग बहुसंख्येनें असतात, त्यामुळें सर्वच अधिकार तेच चालवतात बाकीचे भागीदार नफ्यापुरतें पाहत असतात. भांडवल जमा करण्याचे अनेक प्रकार असतात. एक सरळ भाग विकून, दुसरा कांहीं भाग असे काढावयाचे कीं, त्यांवरील नफा—डिव्हिडंड—निश्चित देण्यांत येईल अशी हमी घ्यावयाची मग त्या धंद्यांत नफा होवो न होवो. या वर्षीं झाला नाहीं तर पुढील वर्षीं, जेव्हां होईल तेव्हां या तऱ्हेच्या भागीदारांचा त्यावर अग्रहक्क—प्रथम हक्क असतो. अशांना आपण अग्रहक्क—भाग (प्रेफरन्स शेअर) म्हणूं. अर्थात् प्राप्तीची हमी असल्यामुळें असले भाग फार खपतात. कारण नुसते भाग घेऊन फायदा मिळेलच असें नाहीं. असे अनेक तऱ्हेचे भागांचे प्रकार आहेत व त्या सर्वांत कमीजास्त पद्धतीनें नफ्याची हमी दिलेली असते. सार्वजनिक लिमिटेड कंपनीला तारणरोखे काढून कर्ज मिळवितां येतें. निश्चित दरानें व्याज देण्याचे शर्तीवर व कंपनीचे मिळकतीचे तारणावर हें कर्ज असतें; व तें रोखे काढून बाजारांत विकून कर्ज मिळवितां येतें. 'डिबेंचर्स' म्हणून अशा रोख्यांना नांव आहे. जर व्याज मिळालें नाहीं तर कंपनीची मिळकत विकण्याचा हक्क, या रोखे घेणारांना असतो. पण हे रोखे घेणारे सावकार होत; कंपनीचे मालक नाहींत व योजकही नाहींत. मालक, योजक मूळ भागीदार ज्यांनीं भाग घेतले आहेत ते. नफा होवो अगर न होवो रोखेवाल्यांना व्याज मिळालेंच पाहिजे.

अशा तऱ्हेच्या अनेक कंपन्या निराळ्या ठेवून त्यांच्यावरील नियंत्रण एकहातीं एकसूत्री करण्याकरितां एक नवीन संघटना झालेली आहे, त्यांना सूत्रधारी कंपन्या म्हणूं; इंग्रजींत त्यांना Holding Companies म्हणतात. या कंपनीचा मुख्य उद्देश म्हणजे ज्या दुसऱ्या कंपनीचा कारभार हातीं घ्यावयाचा तिचे बहुसंख्याक भाग खरेदी करावयाचे व भागीदारांत बहुमत झाले कीं आपोआप ताबा आलाच. अशारीतीनें अनेक कंपन्यांचे भाग खरेदी करून, एकहातीं नियंत्रण आणावयाचें; शिवाय ही सूत्रधार कंपनी स्वतः सुद्धां उत्पादन करूं शकते. या अशा सूत्रधार कंपनीच्या संघटनेमुळें व तिच्या कक्षेंत असलेल्या अनेक दुय्यम कंपन्यांमुळें उत्पादनांत खर्चाचे मानानें काटकसर करतां येते, उत्पादन मोठ्या प्रमाणावर करतां येतें, किंमती नियंत्रित करतां येतात, देखरेखीचा खर्च, तज्ज्ञांचा खर्च, वांचवितां येतो. अनेक रीतीनीं उत्पादनाचा खर्च, कमी करतां येऊन नफा वाढवितां येतो. या सर्व कंपन्यांचें निरनिराळें अस्तित्व रद्द करून एक कंपनीसुद्धां करतां येते. मात्र नुकसान आल्यास तें मर्यादित करतां येत नाहीं. निरनिराळ्या कंपन्यांच्या वस्तूंचे विक्रीकरितां संघ निर्माण होतात, पण ते किंमतीचें नियंत्रण करण्यापुरतेच असल्यामुळें, फार काळ टिकत नाहींत. कारण प्रत्येक पेढी, धंदेवाली मंडळी आपल्या हिताबद्दल जागरूक असल्यामुळें हा तहनामा फार काळ टिकत नाहीं. तात्पुरत्या संघापेक्षां निरनिराळ्या पेढ्या अगर कंपन्या एक करून उत्पादन करणें हें जास्त फायदेशीर. कारण मग स्पर्धा कमी होऊन उत्पादन मोठ्या प्रमाणावर होईल व त्याबरोबर उत्पादनखर्च कमी होऊन नफा वाढेल.

सूत्रधार कंपनीच्या युक्तीमुळें अनेक कंपन्यांवर नियंत्रण घालतां येतें व थोडया भांडवलावर कितीतरी मोठें भांडवल हातीं येऊन त्यावर अधिकार चालवितां येतो. समजा, कांहीं मंडळीचे भाग 'अ' कंपनींत शेंकडा ५१ आहेत. तर 'अ' कंपनीनें 'ब' कंपनीचे शेंकडा ५१ भाग घ्यावयाचे, 'ब' कंपनीनें 'क' कंपनीचे शेंकडा ५१ भाग घ्यावयाचे; याप्रमाणें झाले म्हणजे 'क' कंपनीवर ताबा 'ब'चा, 'ब'वर ताबा 'अ'चा आणि 'अ'वर तिच्या भागांपैकीं, ज्यांच्या हातांत शें. ५१ भाग आहेत त्यांचा; म्हणजे या तिन्ही कंपन्यांवर या शेवटल्या मंडळीचा ताबा व या मंडळीची एक कंपनीच असली म्हणजे ती सूत्रधार कंपनी होऊन तिन्ही कंपन्यांच्या उत्पादनावर ती नियंत्रण करूं शकते. कारण सर्व कारभार कायद्याप्रमाणें, बहुमतानें चालला पाहिजे व तें बहुमत अशा रीतीनें हस्तगत केलें जातें. जे भागीदार अल्पमतांत राहिले, त्यांना स्वस्थ बसण्यापलीकडे इलाज नाहीं. ह्या कंपन्या निरनिराळ्या दिसल्या

तरी सर्व धोरण, सर्व नियमन व नियंत्रण, सूत्रधार कंपनी करणार; तेच खरे योजक व संचालक होत. त्यांचा व इतर भागीदारांचा हितविरोध झाला तर इतर भागीदार नुकसानींत जातील. या सूत्रधार कंपनीच्या युक्तीमुळें व्यवहारांत कायदेशीर गुंडगिरी उत्पन्न झाली आहे. कंपनीच्या कायद्याप्रमाणें, ताळेबंद व नफातोटा पत्रक प्रत्येक सार्वजनिक लिमिटेड कंपनीला प्रसिद्ध करावें लागतें. या सगळ्या कंपन्यांचें नियंत्रण एका हातीं असून एकत्रित ताळेबंद अगर नफातोटा पत्रक प्रसिद्ध करण्याची जबाबदारी नाहीं; शिवाय दुय्यम कंपन्या खाजगी लिमिटेड असल्या म्हणजे कांहींच प्रसिद्ध करण्याची जरूरी नाहीं. कारण सार्वजनिक लिमिटेड कंपनीलाच सरकारकडे हिशोबाचा ताळेबंद, नफातोटापत्रक धाडावें लागतें. हिंदुस्थानांत उद्योगधंद्यांत अशा तऱ्हेचा व्यवहार चालू आहे. सूत्रधार कंपन्या आहेत व त्यांच्या ताब्यांत अनेक कंपन्या आहेत. १९३६ च्या कंपनीच्या कायद्यांत कांहीं नवीन सुधारणा झाल्यामुळें अशा तऱ्हेच्या कायदेशीर गुंडगिरीला थोडा आळा बसला आहे. हिंदी कंपन्यांचा नामनिर्देश करण्याचें कारण नाहीं. भांडवलशाही जगांत जेथें संपूर्ण स्वातंत्र्य आहे तेथें हेंच व्हावयाचें. अमेरिका, इंग्लंड, या देशांत हेंच आहे. एक उदाहरण म्हणून विकर्स लिमिटेड ( Vickers Ltd. ) ह्या कंपनीचें घेऊं. या सूत्रधार कंपनीच्या मुख्य कंपन्या ९ आहेत, १३ दुय्यम आहेत. सूत्रधार कंपनीच्या नियंत्रणाखालीं रबर, इस्टेटी खरेदी घेणें, पोलाद, लोखंड, वीज, विमानें, रेल्वेचे डबे व वाघिणी तयार करणें, मोटारी, मोटारबॉडीज्, अशा अनेक गोष्टींचें उत्पादन होतें. आपल्याकडेही अशा कंपन्या आहेत कीं, त्यांचा हात वाहतुकींत आहे, इंजिनिअरिंगमध्यें आहे, जहाजांच्या गोदींत आहे, साखरेंत आहे. तात्पर्य असें हें भांडवलाचें केंद्रीकरण व त्यापासून उत्पन्न होणारे अधिकार एकहातीं येणें, हें भांडवलशाहींत न टळणारें आहे.

आणखी एक योजकसंघटनेचें स्वरूप म्हणजे पतपेढ्या. यांचे अनेक प्रकार आहेत. गिऱ्हाइकांची पतपेढी म्हणजे गिऱ्हाइकांनीं समाईक भांडवल घालून लागणारा माल विकत आणावयाचा व त्याच्या विक्रींतून जो नफा होईल तो वांटून घ्यावयाचा. अशा किरकोळ विक्री करणाऱ्या पतपेढ्या, सहकार्य करून घाऊक विक्रीची पतपेढी काढूं शकतात. ती नुसता घाऊक माल घेऊन विकील किंवा वस्तूंचें उत्पादनही करूं शकेल. कांहीं देशांत या बाबतींत इतकी प्रगति झाली आहे कीं, या घाऊक पतपेढ्यांच्या मालकीच्या जमिनी आहेत, जहाजें आहेत, बँका आहेत व कारखानेही आहेत. वस्तु उत्पन्न करणाऱ्या कामगारांच्याही पतपेढ्या असतात. उदा०, विणकर, भांडीं घडणारे वगैरे. हे सर्व उत्पादन करतात, कच्चा माल पेढीचे पतीवर घेऊन, पेढीमार्फत

पक्का माल विकून, नफा वांटून घेतात. ह्या पतपेढ्यांचे सभासद, हेहि एका दृष्टीनें योजकच आहेत. कारण काय उत्पादन पाहिजे आहे, काय तयार केलें पाहिजे याचा निर्णय त्यांना घ्यावा लागतो व उत्पादन घडवून आणावें लागतें. खुद्द सरकारहि भांडवलशाही समाजरचनेंत कांहीं उत्पादन करीत असतें. रेल्वे, पोस्टऑफीस, तारा-यंत्रें, या सर्व सोयींच्या वाहतुकीचें उत्पादन व त्यावरील सर्व नियंत्रण सरकारचेंच या देशांत आहे. कांहीं ठिकाणीं वाहतुकीचें काम कंपन्यांमार्फत होतें, पण त्यांच्यावर सरकारी नियंत्रण आहे. तथापि जेथें सरकार सर्व काम करतें तेथें सरकारच योजक असतें; या कामीं लागणारें भांडवल करानें अगर कर्ज काढून सरकार उभें करीत असतें. याशिवाय निरनिराळ्या म्युनिसिपालिट्या, स्थानिक सरकारें कित्येक गोष्टींचें उत्पादन करीत असतात; पाणी पुरवठा, वीज पुरवठा, ट्रामगाड्या वगैरे. आतांपर्यंत योजगवर्गाची संघटना कशी विविध स्वरूपीं आहे हें आपण पाहिलें. एकच योजक, भागीदारी, खाजगी कंपनी, सार्वजनिक लिमिटेड कंपनी, सूत्रधार कंपनी, पतपेढ्या, स्थानिक संस्था व स्थानिक सरकार, मुख्य सरकार वगैरे अनेक रूपानीं हें योजकाचें काम उत्पादनसृष्टींत चालू असतें. योजक जबाबदार असले तरी प्रत्यक्ष उत्पादनावर व्यवस्थापक व अन्य माणसांचाच ताबा असतो. तथापि जो नफा व नुकसान यांस जबाबदार म्हणजे योजक, तो एक असो अगर अनेक असोत तोच उत्पादनाचें अखेरचें धोरण ठरवीत असतो; तोच अखेरचे निर्णय घेत असतो. सरकारी व स्थानिक संस्थांचें उत्पादन, हें कांहीं जास्तींत जास्त नफा मिळावा अगर मिळवावा या हेतूनें होत नाहीं. बाकीचें उत्पादन 'नफा' या एकाच गोष्टीकडे लक्ष देऊन योजक करीत असतो. त्याच्या डोळ्यांपुढें तो ध्रुव तारा असतो किंवा सूर्याभोंवती जशी सर्व ग्रह-माला फिरते त्याप्रमाणें भांडवलशाहींत या नफ्याभोंवती सर्व उत्पादनसृष्टि फिरत असते.

आतां नफ्यासंबंधीं विचार करूं. येणाऱ्या विक्रींतून होणारा खर्च वजा जातां जी शिल्लक राहील तो नफा, हें अगदीं सहज समजण्यासारखें नफ्याचें वर्णन झालें. आपणाला थोडा सूक्ष्म विचार करावयाचा आहे. एखाद्या पेढीचा नफा काढावयाचा असल्यास, प्रथम तिचा होणारा खर्च काढला पाहिजे. साधारणपणें कच्चा माल, साधनसामग्रीं, मजुरी, व अन्य वस्तु, ज्या उत्पादनाला अवश्य आहेत, यांवर होणारा खर्च म्हणजे त्या पेढीचा खर्च होय. त्याचप्रमाणें जो माल त्या पेढीनें उत्पादन केला त्याच्या वटविक्रींत जें येईल तें ढोबळ उत्पन्न. यांतून वर दाखविलेला खर्च वजा केला म्हणजे जी शिल्लक राहील तें निव्वळ उत्पन्न. साधनसामग्री व अन्य घटकांच्यामुळें ही प्राप्ति झाली; योजक हा त्यांचा मालक म्हणून ही त्याची प्राप्ति झाली; त्यानें या

उत्पादनांत गुंतविलेली मिळकत व केलेले श्रम याचाच तो एकप्रकारें मोबदला होय; या तऱ्हेच्या मोबदल्याला सामान्यपणें 'नफा' म्हणतात. पुष्कळ वेळां खर्चांत काय रकमा धराव्यात अगर नफ्यांतून काय वजा करावें, हें सामान्य दृष्टीला दिसत नाहीं त्यामुळें खर्चाबद्दलच्या व नफ्याबद्दलच्या कल्पना थोड्या चुकीच्या असतात. एका कारखान्यांत एकजण मालक असून सर्व भांडवल, सर्व सामग्री, त्याचीच असून शिवाय तो सर्व वेळ देखरेख करतो, अंगमेहनतीनें झटतो. दुसरा कारखाना आहे; त्यांत मालक स्वतः देखरेख करीत नाहीं, तर त्यानें मॅनेजर ठेवला आहे; स्वतः मेहनत करीत नाहीं, किंवा आपला वेळही त्याकडे खर्चीत नाहीं. आतां या दोघांचे खर्च व नफा हे कसे राहतील तें पाहूं. पहिल्याचा नफा जास्त व खर्च कमी, कारण मॅनेजरचा खर्च नाहीं, त्यामुळें नफा वाढला. दुसऱ्याचा खर्च जास्त व नफा कमी असें कोणी म्हटलें तर तें खरेंहि दिसतें पण अगदीं सूक्ष्म विचार करावयाचा म्हणजे पहिला प्रत्यक्ष मेहनत करतो, देखरेख करतो, त्याबद्दल मेहनताना म्हणून हिशोबांत धरून तो खर्चखातीं टाकला पाहिजे. कारण जर तो दुसरीकडे मेहनत करील तर त्याला कांहीं मिळेलच कीं नाहीं? घरच्या गाडीला सुद्धां वंगण लागतें. या न्यायानें त्याच्या मेहनतीचा मोबदला धरून तो खर्चखातीं टाकणें हें अगदीं व्यवहाराला धरून आहे. त्याचप्रमाणें त्यानें आपलें भांडवल घातलें आहे, तेव्हां त्यावरील व्याजहि त्याच न्यायानें खर्चखातीं घातलें पाहिजे. मग व्याजाचा दर कितीहि धरा. तथापि तो सुद्धां बाजारभावाप्रमाणें धरला पाहिजे. हें सर्व कमी केल्यानंतर मग जी शिल्लक राहील, तो नफा म्हणणें रास्त होईल. योजकाला कच्चा माल, साधनसामग्रीचें भाडें, भांडवलावरील व्याज, मजुरांची मजुरी, या बाबतींत जो खर्च होतो त्याचें स्वरूप थोडें निराळें व योजकानें आपली मेहनत व मिळकत त्यांत घातली व त्यांची किंमत आकारली तर जो खर्च निघेल त्याचें स्वरूप थोडें निराळें. पाहिल्याला आपण मूळ (Prime) खर्च म्हणूं व दुसऱ्याला 'पुरवणी खर्च' म्हणूं. म्हणून कोणी उत्पादन सुरू करतांना असाच अंदाज बांधील कीं, १–२ वर्षांत, किंवा कांहीं विवक्षित काळांत, निघणाऱ्या मालापासून,–उत्पादनापासून–होणारी विक्री या प्रमुख व पुरवणी खर्चापेक्षां जास्त असेल तर, या उत्पादनाच्या भानगडींत पडणें योग्य ठरेल. या दोन खर्चांच्या बेरजेपेक्षां एकंदर विक्री जितकी जास्त, तेवढाच नफा; व हा नफा म्हणजे योजकानें जो धोका पतकरला, जी जबाबदारी अंगावर घेतली त्याचेंच बक्षीस. कारण आपल्या वरच्या हिशोबांत त्याच्या मेहनतीबद्दल व मिळकतीबद्दल आपण त्याला किंमत देऊन, ती खर्चखातीं टाकली आहे; म्हणून जो नफा आतां राहिला, तो त्यानें जी हिंमत दाखविली व नुकसानीचाही धोका स्वीकारला त्याचेंच

बक्षीस अगर किंमत होय. उत्पादन फायद्याचें होईल किंवा नाहीं ही काळजी, त्यामुळें अनिश्चितपणा; बाजारमागणी ही नेहमीं बदलणारी, अशा स्थितींत ज्यामानानें त्यांचे अंदाज बरोबर अगर चुकीचे ठरतील त्यामानानें नफा जास्तकमी होणार. या तऱ्हेच्या नफ्यास आपण 'शुद्ध नफा', निर्भेळ नफा म्हणूं. पुष्कळवेळां हा शुद्ध नफा मिळणार नाहीं. कांहीं योजक आपल्याबद्दलच्या खोट्या कल्पना करून घेतात. आपल्या हुशारीची, चातुर्याची मजल भलतीच समजून ठाव न घेतां उडी मारतात तेव्हां फायद्याचे मोती हातांत येण्याऐवजीं सरळ तळाशीं जातात. कित्येक धंदे बुडतात, कित्येक सरासरीच जिवंत राहतात, कांहीं नाममात्र चालविले जातात. हें चालविण्यापेक्षां योजकानें भांडवल दुसरीकडे व्याजीं लावलें व दुसरीकडे मेहनत केली तर त्यापासून जास्त उत्पन्न मिळणें शक्य असतें. तथापि शेखमहंमदी आशा कोणास सोडीत नाहीं. लवकरच मंदी संपेल, व्यवहाराला तेजी येईल व मग सर्व पुरवणी खर्च भरून निघेल, असें वाटत असतें; म्हणून योजक आपलें भांडवल व मेहनत हातीं असलेल्या धंद्यांतून काढीत नाहीं. कांहीं वेळा ही आशा फलदायी होते. मोठमोठाल्या धंद्यांत 'पी हळद, हो गोरी' असा झटपट अनुभव नसतो. दहादहा, वीसवीस वर्षे धंदा चालवावा लागतो, नुकसानींत चालवावा लागतो, धीरगंभीर असावें लागतें, तेव्हांच मनुष्य टिकतो. हिंदुस्थानांतील कापडाच्या गिरण्यांचा अनुभव प्रसिद्ध आहे. १८७० पासून १९०६ पर्यंत हा धंदा जवळजवळ नुकसानींत होता. स्वदेशीची लाट आली, बाजार बदलला व एकदम नफ्याची, भरतीची लाट सुरू झाली, ती अजून चालूच आहे. तेव्हां मोठाल्या धंद्यांत आज उद्यां काय होईल अशी संकुचित दृष्टि चालत नाहीं. राजकारणाप्रमाणें उत्पादनजगांत क्षणाची कुंडली मांडू नये युगाची मांडावी, हेंच धोरणी ठरतें. असो, हा व्यवहाराचा बदल चालू असल्यामुळें, मागणी कमीजास्त होत असल्यामुळें त्याचा परिणाम निरनिराळ्या धंद्यांवर, निरनिराळ्या प्रकारांनीं होतो. हाच चढउतार कांहीं धंदे अगदीं निकालांत काढतो तर कांहींना एकदम वैभवशिखरावर नेतो. ज्यांची मागणी सामान्यतः कमीजास्त होऊं शकत नाहीं अगर फार थोड्या प्रमाणांत होते, अशा वस्तूंच्या उत्पादनावर या चढउताराचा फारसा परिणाम होत नाहीं. त्यांचे बाबतींत हा निर्भेळ नफा फारसा बदलत नाहीं. परंतु कांहीं वस्तूंच्या उत्पादनाबाबत निराळा अनुभव येतो. वर्षानुवर्षें नुकसान भोगावें लागतें व पुढें चांगले दिवस येतील, या आशेवर जगावें लागतें. ते दिवस आले तर ठीक, नाहींतर—नाहींतर ते धंदे नामशेष होतात. यंत्रें, लोखंड, पोलाद वगैरेंच्या उत्पादनाबाबत हा अनुभव सर्वत्र आहे. हिंदुस्थानांत जेव्हां लोखंड व पोलादाच्या

कारखाना निघाला तेव्हां कित्येक वर्षें त्यानें नुकसानींत काढली; पुढें सरकारी मदतीनें, संरक्षण मिळाल्यानें त्यानें जीव धरला व आतां चढता काळ सुरू झाला असून तो चालूच आहे. हा धंदा आतां मार्गास लागला आहे. १९१६ सालीं लोखंड (पिग आयर्न) हिंदुस्थानांत १४९ हजार टन तयार झालें तर १९३६–३७ सालीं १५८२ हजार टन. पोलादाची १३९ पासून ८६५ हजार टनापर्यंत वाढ झाली. गॅल्व्हनाईझची वाढ ९९ पासून ९५२ हजार टनापर्यंत झाली. तसेंच १९१३–१४ सालीं पिग आयर्न लोखंडाची आयात १२८८१ टन होती ती १९३६–३७ सालीं १७३० टनापर्यंत आली. पोलाद व शुद्ध लोखंडाची १०१८·२ टनांपासून ३६२·४ टनापर्यंत आली. कापडाचे बाबतींत तोच अनुभव आहे. १९१३ सालीं ११६७ दशलक्ष वार कापड येथें तयार झालें तर १९३५ सालीं ३५६९ दशलक्ष वार झालें. १९१३ सालीं कापडाची आयात ३०४२ द. ल. वारांपासून १९३५ सालीं ७६४ द. ल. वारपर्यंत आली. तात्पर्य, चढ व उतार या दोन्ही काळांतील अनुभवांची बेरीज केली म्हणजे कांहीं धंदे फायदेशीर झाले, मार्गी लागले, असें म्हणतां येतें. नुकसानीचे काळांत दमदारपणा दाखविला नाहीं तर नामशेष होण्याची पाळी येते.

उद्योगधंदा करणाऱ्या सर्व योजकांच्या सर्व उत्पादनाचा चढ व उतार अशा दोन्ही काळांतील होणाऱ्या सर्व उत्पन्नांचा वट हिशोब केला तर ज्याला आपण शुद्ध—निर्भेळ—नफा म्हणून म्हटलें आहे तो कांहीं तरी राहतोच. आपली मेहनत व मिळकत दुसरीकडे लावून त्यापासून होणाऱ्या प्राप्तीपेक्षां एकंदर या उत्पादनाच्या हिशोबांत जास्त प्राप्ति होते. ज्यांच्या अंगांत खरोखर योजकाला लागणाऱ्या गुणांची कमतरता नाहीं असे योजक जरूर यशस्वी होतात. ते भांडवल, उत्पादनसाधनें वगैरे जमवून, जुळवून, इतर ठिकाणीं नोकरी करून, जें मिळविलें असतें त्यापेक्षां जास्त मिळवितात; व हें जें जास्त मिळतें तें त्यांच्या धाडसाचें बक्षीस–शुद्ध नफा होय. निव्वळ सुदैवानें कांहीं परिस्थितींत बदल पडल्यामुळें मिळणाऱ्या घबाड नफ्याहून (Windfall profits) हा निराळा आहे. त्याचप्रमाणें अन्य धंद्यांतसुद्धां त्या त्या धंद्याला अवश्य असणारा विशिष्ट गुण व धमक अंगीं असेल तर, तो मनुष्य यशस्वी होतो. साधारण कारकुनाचें काम करणारा गोड आवाजानें व आपल्या अभिनय कौशल्यानें आज सिनेमासृष्टींत उच्चपद मिळवितो याचें उदाहरण आपल्यापुढें आहेच कीं नाहीं? पण ज्यांना यश मिळतें त्याबरोबर अपयशी किती झाले, याची दखल व हिशोब कोणी करीत नाहीं. कित्येक पेढ्या बुडाल्या, नुकसानींत आल्या, कित्येक कंपन्यांना आपलें भांडवल कमी करावें लागलें हें कोणी लक्षांत घेत नाहीं. त्याचप्रमाणें शेंकडों माणसें हुशार असून

आज धंद्यांतून नोकर म्हणून काम करीत आहेत. त्यांना भांडवल मिळणार नाहीं असें नाहीं. पण नोकरींत होणाऱ्या मिळकतीपेक्षां योजक होऊन, उत्पादन करून, जास्त मिळेल याची खात्री नसते म्हणूनच हातचें सोडून अनिश्चित गोष्टींच्या मागें जाण्यास लोक धजावत नाहींत. सर्व हिंमत बाळगणाऱ्यांना खुदा मदत देतोच असें नाहीं. व या कठोर व्यवहारांत, आधुनिक भांवलशाहीच्या गळेकापू स्पर्धेच्या व्यवहारांत, बिचाऱ्या खुदाला स्थान नाहीं ! म्हणून ज्यांच्याजवळ मोकळे भांडवल आहे असे लोकच योजक होतात. मग ते भाग विकत घेऊन अगर ठराविक व्याजानें रकमा देऊन, या उत्पादनांत योजक म्हणून पडतात. मागें सांगितल्याप्रमाणें सर्व योजकांच्या सर्व उत्पादनाचा हिशोब केला म्हणजे शुद्ध नफा राहतोच. आपल्या भांडवलावरचें व्याज सुटून शिवाय हा शुद्ध नफा मिळण्याचा संभव म्हणूनच भांडवलवाले या उत्पादनांत पडतात, योजक होतात. मात्र लोकांना वाटतो तेवढया प्रमाणांत हा शुद्ध नफा निर्भेळ नसतो. मेहनत व भांडवल यांचा योग्य मोबदला खर्ची टाकून हा निर्भेळ नफा काढावयाचा असतो हें विसरतां कामा नये.

आपण खर्चाचे, प्रमुख व पुरवणी खर्च असे दोन भाग वर दर्शविले आहेत. कांहीं उत्पादनाचा खर्च कायम स्वरूपाचा असतो. प्रत्यक्ष उत्पादन कमीजास्त झालें तरी त्यांत बदल होत नाहीं. कांहीं खर्च बदलणारा असतो म्हणजे उत्पादन वाढलें तर वाढणारा, कमी झालें तर कमी होणारा. सामान्यतः ज्याला आपण पुरवणी खर्च म्हटलें आहे, तो कायम स्वरूपाचा असतो. मात्र योजकाची मिळकत व मेहनत त्या कामीं जी असेल तीच राहिली पाहिजे. मग प्रत्यक्ष उत्पादन किती जरी वाढलें तरी, ही खर्चाची बाब बदलत नाहीं. तसेंच प्रमुख खर्चाच्या बाबीपैकीं कांहीं कायम स्वरूपाच्या असतात; उदा०, कारखान्याकरितां जागा भाड्यानें घेतली व ती ९९ वर्षांच्या करारानें आहे. मग त्या कारखान्याचें उत्पादन वाढलें तरी हें भाडें कायम असतें; त्याचप्रमाणें कर्जाऊ रकमेवरचें व्याज हेंहि कायम, कारण उत्पादन वाढलें म्हणून व्याजाची रक्कम कांहीं वाढत नाहीं. जाहिरातींचा खर्च, इमारतीच्या विम्याचा खर्च, देखरेख खात्यांचा खर्च, हे सर्व प्रमुख खर्च पण कायम स्वरूपाचे असतात. प्रमुख खर्च व पुरवणी खर्च, त्याचप्रमाणें कायम खर्च अगर बदलणारा खर्च, हे जे भेद आहेत ते स्थूलमानानें आहेत व ते सुद्धां कांहीं कालमर्यादेपुरतेच लागू असतात. समजा, एकदम एखाद्या कारखान्याचें उत्पादन अनेक पटींनीं वाढलें, तर त्याला देखरेख खात्यांतहि वाढ करावी लागेल. खेळतें भांडवल जास्त लागलें तर तें आणखी कर्ज काढून बँकेकडून अगर अन्य रीतीनें, घेतलें पाहिजे. त्याचप्रमाणें अनेक पटींनीं

उत्पादन वाढवावयाचें म्हणजे यंत्रसामग्री किंबहुना उत्पादनतंत्रच बदलावें लागेल व त्यामुळें उत्पादन एकंदरीनें कमी खर्चाचें झालें तरी, पहिल्या खर्चात वाढ होणारच; व कायम खर्चात वाढ झाली कीं, बदलणाऱ्या खर्चातहि वाढ होणारच. त्याचप्रमाणें उत्पादन वाढलें म्हणजे दुरुस्ती, नवेंजुनें करणें, यंत्रें योग्य स्थितींत ठेवणें, वगैरे खर्चाचेंहि प्रमाण वाढतें. त्याचप्रमाणें यंत्रें, कारखान्याच्या इमारती वगैरे जें कायम स्वरूपाचें भांडवल असतें तें हळूहळू झिजत जातें; त्या जागीं दुसरीं यंत्रें आणणें, दुसऱ्या इमारती बांधणें---थोडक्यांत दुसरा संच ( Plant ) तयार करणें अवश्य होतें; आणि हें केव्हां होईल तर जेव्हां या दुसऱ्या संचाला जो खर्च करावा लागेल, जें भांडवल घालावें लागेल, त्यापासून निदान बाजारभावानें मिळणारें व्याज सुटेल, इतका तरी फायदा मिळेल अशी खात्री असेल तेव्हां. म्हणून मर्यादित काळाच्या दृष्टीनें वर खर्चाचे जे प्रकार सांगितले ते स्थूलमानाचेच समजावे; कारण लांबवर विचार केला तर वर आपण पाहिलेंच कीं, सर्वच खर्च प्रमुख व बदलणारा असाच दिसतो.

आतांपर्यंत आपण योजकांच्या संघटनेचें स्वरूप, खर्चाचे प्रकार, नफ्याचें स्वरूप वगैरेंचा थोडा विचार केला. आपण आपल्या व्याख्येप्रमाणें व एकंदर विवेचना-प्रमाणें योजकाला उत्पादनाचे बाबतींत अनेक निर्णय घ्यावे लागतात असें पाहिलें. या घ्याव्या लागणाऱ्या निर्णयांसंबंधीं आणखी थोडा विचार करूं. एकदां नोकरी न करतां धंदा करावयाचा असा निर्णय घेतल्यानंतर म्हणजे योजक व्हावयाचें एवढें ठरल्यानंतर पहिला प्रश्न उपस्थित होतो व ज्याचा प्रथम निर्णय घेतला पाहिजे तो म्हणजे कोणत्या धंद्यांत, कोणत्या उत्पादनांत शिरावयाचें हा. जे नुसते भाग विकत घेऊन नामधारी योजक होऊं इच्छितात त्यांना एवढाच विचार करावयाचा कीं, ठराविक दरानें रक्कम व्याजीं न देतां भाग विकत घ्यावयाचे म्हणजे एका दृष्टीनें पैसा धोक्यांत टाकावयाचा, कारण फायदा मिळेल किंवा नाहीं हे अनिश्चित. व जर भाग विकत घ्यावयाचे तर कोणत्या उत्पादनांतील, कोणत्या कंपनीचे? पण एवढ्यानेंच हा प्रश्न संपत नाहीं. कारण मनुष्य एक धंदा सोडून दुसऱ्यांत शिरतो, एकांतले भाग विकून दुसऱ्याचे खरेदी करतो. म्हणून हे निर्णय घेण्याचें काम एकदांच संपत नाहीं. त्यानंतर, धंदा ठरल्यावर कोणत्या वस्तूंचें व कोणत्या प्रमाणांत उत्पादन करावयाचें. उत्पादनांत सुखसोयींच्या उत्पादनाचा अंतर्भाव होतो हें विसरतां कामा नये. यंत्रें काढण्याचा धंदा ठरला, मग कोणतीं यंत्रें व किती प्रमाणावर हे प्रश्न उपस्थित होतात. शहराला वीज पुरविण्याचें उत्पादन करावयाचें तें कोणत्या प्रमाणावर? चालू गरजा लक्षांत घेऊन कां पुढील सुद्धां? उदा०, मातीच्या भांड्यांचा कारखाना ठरला, मग

कोणते वाण काढावयाचे व कोणत्या प्रमाणांत ? म्हणजे उत्पादनाच्या स्वरूपाचे प्रश्न उत्पन्न होतात. या प्रश्नांचा निकाल लागला म्हणजे मग उत्पादनसंच ( Plant ) केवढा ? लहान घेऊन भागेल कां मोठा ? त्याचा निकाल लागला कीं, मग त्यावर देखरेख ठेवणारी संघटना कशी ? अर्थात् ज्या मानाचें उत्पादन त्या मानावर हें अवलंबून असणार; आणि जर या बाबतींत मक्तेबाजी झाली असेल तर किती उत्पादन करावयाचें हें अर्थात् ठरलेलेंच असणार. नंतर मग उत्पादन कोणच्या पद्धतीनें करावयाचें, निरनिराळी उत्पादनसामग्री कोणत्या प्रमाणांत जुळवावयाची, कारखाना कोठें काढावयाचा हे प्रश्न उभे राहतात. अर्थात् पुष्कळशा बाबतींत, त्याला गिऱ्हाइकांच्या इच्छेप्रमाणें वागावें लागणार हें तर उघड आहे. जागा ठरवितांना कच्चा माल कारखान्यांत आणण्याकरितां लागणारीं वाहतुकीचीं साधनें व खर्च लक्षांत घेतला पाहिजे. त्याचप्रमाणें होणारा माल कोणत्या बाजारांत खपणार, तेथें तो नेण्याचा वाहतुकीचा खर्च, वाहतुकीचीं साधनें, यांचाही विचार करावा लागेल. जेथें वाहतुकीचा खर्च कमी पडेल तेथेंच तो कारखाना काढील व तें गिऱ्हाइकाच्या दृष्टीनेंही ठीक, कारण तेवढा उत्पादन खर्च कमी.

वर उल्लेखिलेले अनेक निर्णय त्याला घ्यावे लागतील. त्यांत त्याला अनेक गोष्टींचा विचार करावा लागेल. त्याची आवडनिवड तो स्वतः विचारांत घेईल. लहान धंदा करून सर्व मालकी आपले हातांत ठेवणें कदाचित् त्याला आवडेल. कदाचित् मोठ्या कंपनींत शिरून मोठ्या प्रमाणावर उलाढाली करणेंहि त्याला आवडेल. दारू गाळण्याचा धंदा करून जास्त फायदा होत असला तरी तो तिकडे जाणार नाहीं. दुसरा धंदा करण्यानें प्राप्ति कमी झाली तरी हरकत नाहीं या मताचा तो असेल. एखाद्या धंद्यांत फार मेहनत करावी लागत असली तर तो, तो धंदा करणार नाहीं. थोडी मिळकत व भरपूर विश्रांति मिळेल असा धंदा स्वीकारील. आपली शिल्लक दुसरीकडे जास्त व्याजानें न लावतां स्वतःच्याच धंद्यांत टाकील. तथापि त्याच्या मनांत काय विचार येतील व कोणत्या गोष्टीला तो किती महत्त्व देईल या सर्व गोष्टी आपण बाजूला सारूं. एक गोष्ट निश्चितपणें त्याच्या मनांत असते, त्याच एकच हेतु असतो; तो म्हणजे ज्या धंद्यांत त्याला व्यापक अर्थानें पुरवणी खर्च अधिक, शुद्ध नफा जास्तींतजास्त मिळेल, तो धंदा तो स्वीकारील. पुरवणी खर्च म्हणजे त्याची मेहनत व मिळकत याची बाजारभावानें होणारी मोबदला रक्कम, व निव्वळ नफा म्हणजे जी जबाबदारी व धोका पतकरतो त्याबद्दल सर्व तऱ्हेचा खर्च वजा जातां जी प्राप्ति राहते ती. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे आपल्या मेहन-

हा सिद्धांत एकदां लक्षांत धरला म्हणजे बाजारभाव कसा असला म्हणजे तो उत्पादन कसें करील हें सांगतां येईल. कारण साधसामग्रीचा मेळ कसा घातला असतां कसें उत्पादन होतें हें त्यास माहीत असतें व बाजारभाव डोळ्यांपुढें असल्यामुळें, जास्तींत जास्त नफा हा त्याचा हेतु असल्यामुळें, त्या दृष्टीनें तो उत्पादनतंत्र चालवीत असतो. नव्हे त्याशिवाय अन्य रीतीनें तो वागणें शक्य नाहीं. तसेंच मागणींत बदल होईल अशी त्याची खात्री झाली अगर उत्पादनतंत्रांत बदल झाला तर, त्याचा मागणीचा अंदाज व उत्पादनतंत्रांतील बदल आपल्याला कळला तर, आपण सांगूं शकूं कीं, तो आपल्या उत्पादनांत काय व कसा बदल करील, आणि याचें कारण त्याचा मुख्य किंबहुना एकमेव हेतु नफा हाच असल्यामुळें तो कसा वागेल हें आपणाला सांगणें शक्य आहे. गिऱ्हाईक बाजारभाव कसा असतांना कसें वागेल, हेंहि आपण सांगूं शकूं. मात्र गिऱ्हाइकाच्या पसंतीचें कोष्टक व प्रमाण आपल्याला समजलें पाहिजे. उत्पादन घटकांचे बाबतींत जमाखर्च करतां येतो, कोणतें स्वस्त परवडेल, कोणतें महाग पडेल हें काढणें शक्य आहे. पण मनुष्याची पसंती हिशोबाला जुमानीत नाहीं. हौसेला मोल नाहीं. योजकाला त्याच्या स्वतःच्या पसंतीला वाव देतां येत नाहीं. किंबहुना उत्पादनाचे कामांत, योजकाची पसंती निरर्थक, अप्रस्तुत व अस्पृश्य म्हणून बाजूस काढलेली. सर्व योजकांचे बाबतींत हाच न्याय. योजक म्हणजे निव्वळ जास्तींत जास्त नफ्यासाठीं, उत्पादनाचें यंत्र फिरविणारा प्राणी; आणि नफा हाच हेतु असला म्हणजे रुचि, अभिरुचि, आवडनिवड, नीतिनियम हा विचार नाहीं. नफा मिळत असेल तर सोनखताचा व्यापार जितक्या जोमानें तो करील तितक्याच जोमानें सोन्याचा. जितक्या हिरिरीनें मोत्यांचा तितक्याच हिरिरीनें चामड्याचा. वस्तूंच्या स्वरूपाकडे तो पाहणार नाहीं. त्याला गिऱ्हाईक आहे कां नाहीं हें तो पाहील. जीवन देणाऱ्या औषधाचे उत्पादनाप्रमाणें, प्राणभक्षक दारूगोळा सुद्धां पूर्ण निर्विकार मनानें तो उत्पादन करील. षड्रिपूंपैकीं पंचरिपु त्यानें कबजांत घेतलेले असतात. फक्त लोभानें त्याला कबजांत घेतलेलें असतें; नफ्याचा लोभ याशिवाय त्याचा दुसरा हेतु नसतो. देशभक्तीच्या त्याच्या कल्पना, तुमच्या आमच्या सारख्या क्षुद्र व संकुचित नसतात. जेथें मुबलक कच्चा माल व किफायतशीर बाजार, तेथें माझा देश व तोच माझा शेजार, हेंच त्याचें ब्रीदवाक्य!

असो, एकाच तऱ्हेच्या वस्तूंचें उत्पादन करणारे जे अनेक योजक असतात त्या सर्वांचें एकत्रित स्वरूप म्हणजे तो धंदा अगर तो उद्योग होय. तथापि ही अगदीं करार व्याख्या नाहीं. पुष्कळ वेळां एकाच धंद्यांत सारख्या अगर तत्सम वस्तूंचा

समावेश, व्यवहारांत केला जातो. कोळशाचा धंदा म्हटला म्हणजे, दगडी कोळसा, जळाऊ लांकडाचा कोळसा, सर्वांचा समावेश होतो. हे दोन्ही कोळशांचे प्रकार सारखे नाहींत अगर एका बदली दुसरा चालणार नाहीं. तथापि तत्सम आहेत व येवढयाच मुळें व्यवहारांत कोळशाचा धंदा या एका नांवाखालीं संबोधले जातात. त्याच्या मागणींत फरक असतो तसाच उपयोगांतहि. उपयोगाचे दृष्टीनें पाहिलें तर दगडी कोळसा व पेट्रोल यांचा संबंध जास्त जवळचा, कारण दोघांचाहि उपयोग यंत्र चालविण्याकडे होतो. जसे पुष्कळ योजक एक धंदा करतात तसा एक योजक, मग तो एकटा असो अगर अनेक असोत, पुष्कळ धंदे करतात. एकच कंपनी कापड, लोखंड, पोलाद, साबण वगैरे नाना तऱ्हेचें उत्पादन करीत असते, हें आपण व्यवहारांत पाहतोंच; उदा०, टाटा कंपनी.

एखाद्या धंद्यांत मागणी वाढली म्हणजे तिचें स्वरूप सामान्यतः दोन प्रकारचें असतें. एक त्या धंद्यांत मागणी वाढते हें तर खरेंच, पण त्याबरोबर त्याचा अर्थ असा होतो कीं, इतर धंद्यांपेक्षां या विशिष्ट धंद्यांत मागणी जास्त झाली. समजा, पांच मुलें आहेत व त्यांना कांहीं प्रमाणानें मी रोज दूध देतों. आज त्यांपैकीं एकाला एक शेर जास्त दिलें याचा अर्थ त्याला जास्त मिळालें येवढेंच नव्हे, तर पूर्वीं त्या पांच जणांत जें परस्परांत प्रमाण होतें तें बदललें. ज्याला जास्त मिळालें त्याला तें नुसतें जास्त मिळालें असें नाहीं, तर इतरांशीं जें प्रमाण होतें तेंहि बदललें. त्या गोष्टीला आपण सापेक्ष बदल म्हणूं. तेव्हां एका धंद्यांत मागणी वाढली कीं, तिचा अर्थ त्या धंद्यांत वाढली व सापेक्षतेनें इतर धंद्यांत कमी झाली अगर सापेक्षतेनें प्रमाणांत फरक झाला. मागणी वाढली कीं त्या धंद्यांत जे मूळचे योजक असतील ते उत्पादन वाढविण्याचा उपक्रम करतील; कारण वाढती मागणी ही सामान्यतः जास्त नफा देणारी, त्याचबरोबर, नवीन योजकहि धंदा वाढता आहे, नफा होण्यासारखा आहे, असा अंदाज बांधून त्यांत शिरतील. जर जास्त उत्पादनाला मार्गच नसेल तर, वाढत्या मागणींत भाव वाढेल व त्यामुळें पुन्हां मागणी कमी होईल; म्हणून कुठल्याहि धंद्यांत जास्त उत्पादनाला अद्याप माया आहे, कांहीं अवकाश आहे, असें असेल, तरच वर सांगितल्याप्रमाणें नवीन योजक त्यांत शिरतील. याच्या उलट जर मागणी कमी कमी होऊं लागली, तर जे योजक या धंद्यांत मूळचेच आहेत, ते उत्पादन कमी कमी करूं लागतील व नवे योजक तर तिकडे बघणारच नाहींत. मागणी सारखी पडत चालली कीं, त्या धंद्यांतील योजक कमी होऊं लागतील, भागीदार दिवाळें काढतील, कांहीं योजक हा धंदा बंद करून आपलें भांडवल व

नशीब दुसरीकडे यशस्वी करतां येईल कीं काय, हें पाहून दुसरा धंदा करण्यास सुरुवात करतील. ज्या योजकाला येणाऱ्या विक्रींतून, उत्पन्नांतून, प्रमुख खर्चच भागवितां आला नाहीं तर त्याला धंदा बंद करावा लागेल ती पेढी नामशेष होईल. अंदाज चुकला म्हणून, काय मागणी राहील, काय बाजार राहील याचें गणित चुकलें म्हणून, अव्यवस्थितपणामुळें म्हणून, अगर आपली लायकी नसतां या उत्पादनाचे फंदांत पडला म्हणून कोणत्याहि कारणानें कां होईना, त्याला ठोकर बसते. मागणीच पडली तर मोठमोठया कार्यकर्त्या व लायक योजकांनासुद्धां त्या धंद्यांतून चंबूगबाळें उचलावें लागतें. कित्येक वेळां मागणी कमी झाली, थोडा नफा मिळाला म्हणून, कांहीं योजक जास्त नफ्याच्या आशेनें व अंदाजानें हा धंदा सोडून दुसरीकडे बघतात.

योजक या धंद्यांतून त्या धंद्यांत जातात म्हणजे कांहीं आपल्या उत्पादन संचांतील वस्तू न् वस्तू इकडची उचलून तिकडे ठेवतात असें नव्हे. तर त्या उत्पादन संचांपैकीं जी साधनसामग्री त्या विशिष्ट धंद्यालाच योग्य होती, तेवढी बाजूला काढून राहिलेली पुन्हां नवीन धंद्याच्या उत्पादनाला लावतात. जी त्या विशिष्ट धंद्याला उपयोगी होती, तेवढयाच सामग्रीपासून जर उत्पादन करून कॉंपिटिशनमध्यें सुद्धां कांहीं फायदा राहणार असेल तर ती चालू ठेवील. नाहीं तर ती सामग्री मोडीच्या भावानेंहि तो विकील. समजा, एकानें पीठ दळण्याचा कारखाना काढला, त्याप्रमाणें यंत्रें वगैरे बसवून धंदा सुरू झाला. पुढें तो चालणें फायदेशीर झालें नाहीं, जास्त फायदेशीर झालें नाहीं तर योजक काय करील ? यंत्रांपैकीं जेवढा भाग दळण्याच्याच कामाचे उपयोगी असेल तो अलग ठेवून जर कांहींतरी फायदा मिळणें शक्य असेल तर तो ठेवील; नाहीं तर तो यंत्रें अगर जाती विकून टाकील. मुख्य यंत्रांचा उपयोग दुसऱ्या उत्पादनाकडे करतां येण्यासारखा आहे. इमारतीच्या चुन्याचें उत्पादन जास्त फायदेशीर असल्यास तें तो करील, त्याचप्रमाणें कांहीं ओतीव कामहि नवें सुरू करील. कारण जुन्या संचांपैकीं मुख्य यंत्रें याहि कामाला उपयोगी पडतातच. अशा रीतीनें एका उत्पादनापासून तो दुसऱ्या उत्पादनाकडे आपलें भांडवल नेईल. जे कारागीर तज्ज्ञ आहेत, विशिष्ट कामच ज्यांना करतां येतें ते मात्र या धंद्यांतून त्या धंद्यांत जाऊं शकत नाहींत. मजुरी कमी झाली किंवा बेकारी आली तरी, दुसऱ्या उत्पादनाकडे त्यांना जाणें अशक्य असतें; कारण हल्लींचें उत्पादन इतकें यांत्रिक व भानगडीचें आहे कीं, त्यांत कारागीर अनुभवी व तज्ज्ञच असावा लागतो. धंदा बसत चालला म्हणजे योजक वरीलप्रमाणें उत्पादनांत बदल करून जमलें तर पहातो, नाहींतर तो कारखाना, तो उत्पादन संच विकून टाकून, पैसा घेऊन दुसरीकडे गुंतवण्यास तयार होतो.

विकतांना त्याला योग्य किंमत मिळेल असें नाहीं. पृथक् माल करून तो विकील अगर एकदम विकील. चालू कारखानान कोणीं घेतल्यास पूर्वीचे मजूर, कारागीर कांहीं राहातील, कांहीं बेकार होतील, कांहीं दुसऱ्या धंद्यांत जमल्यास जातील. पण त्यांच्या भविष्याची योजकास काळजी करण्याचें कारण नाहीं ! ! योजकाला नफा हवा होता म्हणून त्यानें कारखाना विकला. भांडवलशाही व्यवस्थेंत त्याला पूर्ण स्वातंत्र्य आहे ! बिचारे मजूर, त्यांचें काय होईल याची काळजी त्यानें कां करावी ? त्याला त्यांचे श्रम पाहिजे होते ते त्यानें जसे परवडले, व जेथपर्यंत हवे होते तेथपर्यंत विकत घेतले. हा सरळ सौदा होता. कराराप्रमाणें त्यानें वेतन दिलें. संपलें ! अर्थात् हीच त्याची विचारसरणी असणार ! मजुरांचे श्रम म्हणजे विकत घेण्याची वस्तु ! !

योजक तरी वस्तूंचा पुरवठा अगर उत्पादन किती वाढवील हें आपण मागें पाहिलें आहे. वाढविलेलें उत्पादन अगर जास्त उत्पादन हें त्यासाठीं होणाऱ्या जास्त खर्चाचें मानानें जर परवडेल तरच योजक वाढवील, नाहीं तर वाढविणार नाहीं. जें परवडतें व ज्यांत नफा मिळत आहे तेंच पूर्वीचें तो कायम ठेवील. धंदा वाढूं लागला, त्यांतलें उत्पादन वाढूं लागलें याचा अर्थ त्या उत्पादनाचे कामास लागणाऱ्या सर्व घटकांना, उत्पादक घटकांना, मजूरांना, कारागिरांना जास्त मागणी आली. साहजिक त्या उत्पादक गोष्टींना जास्त मागणीमुळें जास्त किंमत द्यावी लागली तर, त्यामुळें जें जास्त उत्पादन होईल त्याचा खर्च पूर्वीच्या उत्पादनाचे मानानें वाढला; व हा वाढता खर्च लक्षांत घेऊनच जर पुरवठा वाढवावयाचा असेल तर त्या वस्तूंची किंमतहि त्या मानानें वाढविली पाहिजे. नाहीं तर त्या वस्तूंचें जास्त उत्पादन करणें योजकास परवडणार नाहीं. समजा, एका योजकानें सैन्याकरितां २ रुपयांस एक खाट, याप्रमाणें १० हजार खाटांचा पुरवठा करण्याचें कबूल केलें. समजा, त्याला आणखी २० हजारांची ऑर्डर मिळाली; पण ही मिळण्यापूर्वीं लांकडाचा भाव सर्वत्र मागणी वाढल्यामुळें वाढला, तसाच काथ्याचा व सुताराचा. त्याचा परिणाम प्रत्येक खाटेमागें, खर्च पूर्वींपेक्षां ४ आण्यांनीं वाढला असें समजूं. यापूर्वीं त्याला खाटेमागें ३ आणे नफा रहात होता असें समजूं. अशा परिस्थितींत जास्त पुरवठा करणें, त्यासाठीं होणाऱ्या खर्चाचे मानानें त्याच किंमतीस त्याला परवडणार नाहीं. जेव्हां १ रु. १३ आणे पूर्वींचा खर्च +४ आणे हल्लींचा वाढलेला खर्च मिळून २ रु. १ आण्यापेक्षां कांहीं तरी जास्त किंमत मिळेल तेव्हांच त्याला तो पुरवठा करणें परवडेल नाहीं तर नाहीं. पुष्कळ वेळां मागणी वाढली, धंदा तेजाळला तर मोठ्या प्रमाणावर उत्पादन करून, पूर्वींच्या उत्पादनसंचापैकीं जे जास्त काम देणारे घटक त्यांस पुरेसें काम नव्हतें, तें मिळाल्यामुळें

उत्पादन खर्च—म्हणजे जास्त उत्पादनासाठीं करावा लागणारा खर्च—त्या मानानें कमीच येईल. समजा, एक भांड्यांचा कारखाना आहे पण त्याला पुरें काम नाहीं; कारण जो संच आहे तो समजा, दिवसाला ३ टन माल काढून देतो, पण मागणी नसल्यामुळें १ टनच काढतो. आतां ३ टनांची मागणी आली, तर जास्त उत्पादनाचा खर्च त्या मानानें कमीच येईल, कारण नवीन संचाची जरूरी नाहीं. देखरेख खर्च —पुरवणी खर्च कांहीं वाढण्याचें कारण नाहीं. म्हणून जास्त उत्पादन त्यामुळें होणाऱ्या खर्चाचें मानानें परवडेल. रेल्वे कंपन्यासुद्धां माल मोठ्या प्रमाणावर चढत असला अगर उतरत असला तर स्पेशल दर देतात याचें कारण तरी हेंच. तथापि जास्त उत्पादन परवडतें कीं नाहीं हें शेवटीं, बाजारांत त्या वस्तूंची किंमत काय येईल, यावर अवलंबून असतें; व जेथें मोकळा व्यवहार आहे, मक्तेबाजी नाहीं तेथें शेवटीं जास्त उत्पादनाचा खर्च, बाजारांत त्या वस्तूला येणाऱ्या किंमतीइतका होतो. जास्त झाला तर कोणीं उत्पादन करणार नाहीं, कमी झाला तर दुसरे स्पर्धा करणारे येऊन, शेवटीं तेथपर्यंत मजल नेतातच. सीमागत खर्च म्हणजे परवडणारा खर्च व वस्तूंची बाजारांतील किंमत, हीं दोन्ही समतोल होण्याकडे प्रवृत्ति असते. अर्थात् हें सबंध धंद्यांविषयीं विवेचन आहे. त्यांतील एकट्यादुकट्या योजकासंबंधीं नाहीं, व्यक्तिगत नव्हे, व्यापक अर्थानें हा सिद्धांत आपण मानला पाहिजे.

समजा, योजकानें धंदा सुरू केला. पण अपेक्षेप्रमाणें मागणी आली नाहीं, म्हणजे अपेक्षेप्रमाणें त्याच्या मालाला किंमत आली नाहीं. त्याबरोबर एक नफा तरी झाला नाहीं किंवा नाममात्र झाला, तरी सुद्धां तो ताबडतोब दुसऱ्या धंद्यांत जाईलच असें नाहीं. कारण त्याला करीत असलेल्या धंद्याचा अनुभव मिळालेला असतो. त्याचें ज्ञान, त्यांतील गम्य त्याला माहित झालेलें असतें व जर त्यानें धंदा बदलला तर हें सर्व वायां जातें. सर्वच योजक अगर पेढ्या, एकजिनसी माल उत्पादन करीत नाहींत. नुसत्या बुटांचा कारखाना घेतला तरी त्यांत नानातऱ्हेचा माल काढला जातो; टेनिसचे बूट, क्रिकेटचे बूट, कॅनव्हासचे बूट, मोठ्या 'टो'चा, बारीक टोकाचा, मुलांचे, मोठ्या माणसांचे वगैरे प्रकार असतात. या प्रकारांत ज्याला ज्या मानानें जास्त मागणी असेल तो प्रकार जास्त निर्माण केला जाईल. ज्याला गिऱ्हाइकी कमी त्याचें उत्पादन कमी केलें जाईल. तात्पर्य, एकाच उत्पादनांत अनेक प्रकार असले तरी, ज्यामुळें जास्तींत जास्त नफा पडेल असेच प्रकार योजक उत्पादन करील व त्या दृष्टीनें तो मालाचा मेळ बसवील. गिऱ्हाईक राजी राखणें हाच त्याचा हेतु असतो. मग तो करणारें उत्पादन, उपभोग्य वस्तूंचें असो अगर उत्पादक वस्तूंचें

असो; उघड आहे कीं, मागणीप्रमाणेंच पुरवठा करणें कोणाहि योजकाला भाग आहे. जशी मागणी, पूर्ण वस्तूंना—उपभोग्य वस्तूंना, असणार त्यावर त्या त्या वस्तु, ज्या उत्पादक वस्तूंपासून होतात त्यांना मागणी असणार; व त्या उत्पादक वस्तूंचा पुरवठा त्यांच्या मागणीप्रमाणें योजकाला करणें फायदेशीर असतें. विशिष्ट पद्धतीच्या शर्टला मागणी वाढली कीं, त्या विशिष्ट कापडाला वाढली. त्याबरोबर सुताला व म्हणून कापसाला वाढली. अशा रीतीनें पूर्ण वस्तु ज्या ज्या अवस्थेंतून तयार होत येते, त्या त्या अवस्थेंतील सर्व उत्पादक वस्तूंची मागणी वाढत जाते. उपभोगी गिऱ्हाईक आपल्या मागणीनें या उत्पादनयंत्राला चालना देतें. त्याबरोबर सर्व यंत्रें फिरूं लागतात. जशी चालना मिळेल तशी त्या यंत्राची चाल. समजा, एखाद्या योजकानें नवीनच वस्तु तयार करावयाचें ठरविलें, तथापि ती खपेल कीं नाहीं, हें सुद्धां गिऱ्हाइकीचा, मागणीचा अंदाज घेऊन कांहीं हिशोब मनाशीं धरूनच, त्याला ठरवावें लागेल. भंपकपणें विचार न करतां तो कांहीं करणार नाहीं. कारण तेथें पैशाचा खेळ आहे. योजक धंद्यांत पैसे घालविण्याकरितां येत नसतात. पुष्कळ वेळां उत्पादनसंचांत, त्यांतील यंत्रांत थोडाबहुत फरक करून, उत्पादनाचे जे प्रकार होत असतील त्यांतच कांहींचें उत्पादन जास्त अगर कमी करतां येणें शक्य असतें; व अशा रीतीनें जरी मागणींत थोडाफार फरक झाला तरी, उत्पादनखर्च, एकंदरीनें पूर्वींइतकाच येऊन पूर्वींच्याच किंमतींत योजक माल विकूं शकतो. तात्पर्य, लहान मुलें जशी चित्राच्या ठोकळ्यांची निरनिराळी रचना करतात, तसाच योजक, शक्य तितक्या रीतीनें खर्च न वाढवितां मागणी पुरविण्याची खटपट करीत असतोच व त्या दृष्टीनें आपल्या उत्पादनसंचांत कमीजास्त करून पाहतो, व ज्यायोगें मालाची किंमत वाढणार नाहीं अशी रचना करीत असतो. कारण मालाची किंमत वाढवावी लागली तर शेवटीं त्याला जास्त उत्पादन परवडत नाहीं.

उत्पादनसंच अमुकच प्रमाणांत असला पाहिजे असें कांहीं नाहीं. एका शेतकऱ्याचें एकच शेत असूं शकेल. एखाद्याचें एकच दुकान असेल किंवा एखाद्याचा एकच कारखाना असेल. याच्या उलट एखाद्या योजकाचे (व्यक्ति अगर पेढी) अनेक कारखाने असूं शकतील, व त्यामुळें अनेक उत्पादनसंच त्याच्या नियंत्रणाखालीं असतील. कोळशाच्या अनेक खाणी एकाच कंपनीच्या मालकीच्या असतात. कित्येक मध्यवर्ति पेढ्यांच्या शेंकडों शाखा असतात. तात्पर्य, ज्या मानानें मागणी असेल त्या मानानें उत्पादनसंचाचें प्रमाण राहील. कांहीं वस्तु अगदीं थोड्या प्रमाणांत खपतात म्हणून त्यांचें उत्पादनहि थोडें, व त्यामुळें त्यांचा उत्पादनसंचही लहान. कुंकवाचें उदाहरण घेऊं;

कुंकू किती खपतें त्या मानानें त्याचें उत्पादन व तेंहि लहान प्रमाणावर. मोठें यंत्र लावून मोठ्या प्रमाणावर काढण्यासारखी ही वस्तु नाहीं. तसेंच एकंदर उत्पादनापेक्षां एकंदर मागणीपेक्षां—स्थानिक मागणी जास्त महत्त्वाची असते व ती पुष्कळ वेळां परिणामकारक असते. चिंचवडला कोणी मोठा 'सेंट्रल क्लॉथ स्टोअर' काढणार नाहीं. कारण एवढया मोठ्या प्रमाणावर दुकान काढणें व माल ठेवणें त्या ठिकाणीं नुकसानकारक आहे; एवढेंच नव्हे तर हास्यास्पदहि आहे. तसेंच कांहीं धंदे अशा स्वरूपाचे आहेत कीं त्यांना स्थानिक मागणीच महत्त्वाची असते. व त्यावरच सर्वस्वीं ते अवलंबून असतात. खेड, जुन्नर, अशा तालुक्यांच्या गांवीं फारतर एखादा लहानसाच हातानें काम देणारा छापखाना सरासरी चालेल. तेथें जर कोणी मोठें रोटरी मशिन लावून धंदा सुरू करीन म्हणेल तर मूर्खपणाचें होईल. शिंपी, धोबी, रोटीवाला, किराणा मालाचें दुकान वगैरे यांचा संच व स्वरूप स्थानिक परिस्थितीच ठरविते. व ते सर्व धंदे अगदीं गिऱ्हाइकाला हातांशीं असले पाहिजेत. मग एक मालक अनेक शाखा काढो, पण जशी लोकवस्ती तशी त्याची आंखणी करणें जरूर होतें. वस्तूंच्या आकारावरहि उत्पादनाचें प्रमाण अवलंबून असतें. खुर्च्या, टेबलें, कपाटें यांचे कारखानेसुद्धां स्थानिक मागणीवरच चालतात, स्थान-मानानें ते लहान अगर मोठे. पण फार मोठ्या प्रमाणावर कोणी फर्निचर काढून देशभर धाडील तर तें परवडणार नाहीं. वाहतुकीच्या खर्चाखालीं तो योजक मरून जाईल. मातीच्या विटा अगर भांडीं, विशेषतः विटा, यांच्यासुद्धां भट्ट्या जेथें मागणी आहे त्यांपासून फार लांब असत नाहींत, व त्यांचें स्वरूपहि मागणीच्या मानानेंच असतें. मोठ्या प्रमाणावर उत्पादन होणाऱ्या वस्तूंचें स्वरूप निराळें व त्यांच्या उत्पादनांत अशा तऱ्हेचीं उत्पादनसाधनें असतात कीं, तीं उत्पादन कमी केलें तर कमी करतां येत नाहींत हें मागें पाहिलें. त्यांना आपण अखंड अगर एकसाधनी साधनें म्हणूं. या दृष्टीनें पोलाद, लोखंड, मोटारगाड्या, अशा तऱ्हेच्या उत्पादनांत मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें फायदेशीर असतें व त्यांतील उत्पादनसंचहि प्रचंड असतात. कांहीं धंद्यांत त्या वस्तूंच्या उत्पादनाच्या सर्व क्रिया, सर्व संस्कार, एकाच ठिकाणीं, एका उत्पादन संचांत, एकाच नियंत्रणाखालीं, केल्या तर फायदेशीर असतें. उदा०, पोलादाचा धंदा; यांतील लोखंड शुद्ध करण्याच्या भट्ट्या, नंतर ओतण्याचें काम, गुंडाळण्याचें काम वगैरे दरम्यानचीं उत्पादनाचीं अनेक कामें, एकाच ठिकाणीं झालीं तर फायद्याचें होतें हें उघड आहे. दुसरें उदाहरण घेऊं. लांकडें कापणें, फर्निचर तयार करणें, तें पॉलिश करणें व त्याच ठिकाणीं विक्री दुकान ठेवणें यासारख्या गोष्टी

एकाच ठिकाणीं असल्या तर त्यांत फायदाच होतो; श्रम वाचतात. वाहतुकीचा खर्च वांचतो, अनेक प्रकारें फायदा होतो. या पद्धतीच्या उत्पादनाला संकलन पद्धतीचें उत्पादन (Integration) म्हणतात. तसें तंत्राच्या दृष्टीनें म्हणजे उत्पादनाच्या पद्धतींतसुद्धां पुष्कळवेळां कमी खर्च कां जास्त कार्यक्षमता, जास्त चांगल्या तऱ्हेनें काम, याचाहि निर्णय एकंदर मागणीच्याच दृष्टीनें घ्यावा लागतो. समजा, लोखंडाच्या कारखान्यांत मोठमोठ्या काहिली आणिल्या तर एकंदर काम चांगलें निघेल, व्यवस्थित निघेल. पण त्या काहिलींना लागणारा कोळसा अगर विशिष्ट प्रतीचा कोळसा, लांबून आणावा लागत असल्यास खर्चाच्या दृष्टीनें लहान काहिली बसविणेंच फायदेशीर पडेल. समजा, एखाद्यानें वाफेचा नांगर सुरू केला, पण तो नादुरुस्त झाला आणि तो दुरुस्त करून घेण्यासाठीं ५० मैल लांब त्याला न्यावा लागत असेल तर, तो उत्पादनाचे खर्चाचे दृष्टीनें लावणें योग्य होणार नाहीं. तात्पर्य, सर्व उत्पादनांचा त्याचप्रमाणें उत्पादनसंच कोणत्या प्रमाणांत असावा याचा विचार करतांना मागणी, स्थानिक मागणी, एकंदर परिस्थिति, संकलन पद्धतीनें उत्पादन केल्यास काय फायदा होईल, त्याचप्रमाणें उत्पादन संचांतसुद्धां जरा लवचिकपणा ठेवल्यास म्हणजे एकाच संचांत अशी यंत्रयोजना असावी कीं, नाममात्र खर्चानें निरनिराळ्या वस्तूंचें, वस्तूंच्या प्रकारांचें उत्पादन करणें शक्य व्हावें, अशा अनेक गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतात. ज्या ठिकाणीं मोकळा बाजार व स्पर्धा आहे त्या ठिकाणीं, व मक्तेबाजी असेल त्या ठिकाणींसुद्धां, स्वतःच्या दृष्टीपेक्षां गिऱ्हाइकांच्या--मागणीच्या दृष्टीनेंच योजक उत्पादन संचाचें स्वरूप व प्रमाण ठरवितात. मोठ्या प्रमाणावर व संकलित पद्धतीनें उत्पादन करणें हें केव्हांहि फायदेशीर. पण होणाऱ्या उत्पादनाला पूर्ण व पुरेशी मागणी पाहिजे. तशी नसल्यास लहान प्रमाणावर व विभागून विभागूनच उत्पादन करणें फायदेशीर ठरतें. हिंदुस्थानांत या दृष्टीनें पाहिल्यास एकंदर लोखंडाच्या व पोलादाच्या उत्पादनांत काम करणारांची संख्या ३९०२४ आहे पैकीं २० वर मजूर असणारे ७८ कारखाने आहेत. तसेंच कापड गिरण्यांत काम करणारे मजूर ५१५८१३ आहेत व २० वर मजूर असणाऱ्या गिरण्या ३९८ आहेत. एकंदर उद्योगधंद्यांत काम करणारे लोक १८,४०,७९२ आहेत व २० वर मजूर काम करतात असे कारखाने ९२६१ आहेत. यावरून साधारण उत्पादनसंचाचें स्वरूप व प्रमाण धंद्याच्या दृष्टीनें कसें आहे हें दिसून येतें. ५०० वर मजूर असणारे कारखाने फारच थोडे आहेत.

उत्पादन संचाच्या प्रमाणाचें व स्वरूपाचें विवेचन केलें, आतां योजकांची संघटना

केवढी असावी, कशी असावी, याचा विचार करूं. योजकांच्या संघटनेचें स्वरूप याचें सामान्य विवेचन मागें केलेंच आहे. जसें उत्पादन, ज्या प्रमाणावर उत्पादन-संच, त्या मानानें योजकांची संघटना असते. मोठमोठ्या कंपन्याहि लहान लहान असे अनेक कारखाने चालवितात. तथापि योजक कशी संघटना ठेवतील यालाहि कांहीं मर्यादा आहेत. योजक आपली मिळकत व मेहनत धंद्यांत घालून जास्तींत जास्त नफा कसा मिळेल या दृष्टीनें उत्पादन चालवीत असतो. मग खूप उत्पादन वाढवून आपला नफा कां वाढवीत नाहींत असें कोणी विचारील. एकतर जास्त उत्पादनाला लागणारें जादा भांडवल त्याचेजवळ नाहीं अगर त्याला मिळत असेल पण व्याजाचा दर फार असल्यानें तें घेणें त्याला परवडणार नाहीं. उत्पादन वाढवावयाचें म्हणजे संच वाढवावा लागेल, कच्चा माल जास्त घ्यावा लागेल, मजूर वाढवावे लागतील व या सर्वांना आधीं पैसा द्यावा लागेल; आणि माल तयार होईल, विकला जाईल तेव्हां पैसा येईल; तोंपर्यंत कायम व खेळत्या, अशा दोन्ही भांडवलाची जरूरी असणार. व त्याची मिळकत जी धंद्यांत घातलेली ती मर्यादित असल्यामुळें त्याची पतहि मर्यादित असणार. तथापि प्रत्यक्ष व्यवहारांत कच्चा माल व अन्य माल उधारीनें मिळतो. बँका तारणावर व त्याच्या स्वतःच्या पतीवरहि कर्ज देतात व जर या योगानें उत्पादन वाढवून तें किफायतशीर झालें तर आणखीहि कर्ज त्यास मिळूं शकतें; तथापि कर्ज किती मिळेल व बँका अगर अन्य सावकार किती देतील याला मर्यादा असतेच. शिवाय वाटेल तितका पैसा मिळाला तरी उत्पादनाच्या वाढीलासुद्धां मर्यादा आहेच. योजकांची संघटना वर लिहिल्याप्रमाणें वाढूं लागली. त्यामुळें उत्पादनहि वाढूं लागलें; मग वाढत्या उत्पादनाचा एका मर्यादेपलीकडे परिणाम किंमतीवर, बाजारभावावर, होऊं लागतो. भाव कमी होऊं लागतो व तो नुसत्या वाढत्या उत्पादनापुरताच कमी न होतां, नव्या व जुन्या अशा सर्व उत्पादनाला कमी होतो. एक कंपनी हजार नांगर काढीत होती. समजा, मागणी खूप वाढली. कारखाना वाढविला, भांडवल वाढविलें यामुळें विस्तार झाला, खूप उत्पादन वाढलें, मागणी त्या मानानें कमी पडली, किंमतहि कमी झाली. पूर्वींचा नांगर २० रु. ला विकला होता, आतां ३००० निघूं लागले; नगामागें भाव १५ रु. झाला. १५ रु. भाव सर्व नांगरांना झाला, तीन हजार नांगरांना तो भाव पडला. नव्याला कमी पहिल्या हजारांना जास्त असा भेद व्यवहारांत होत नाहीं. ही आपत्ति नको असेल तर नवीन वाढविलेलें उत्पादन बंद करावयाचें व पूर्वींच्या भावांत माल विकावयाचा. पण आतां मात्र त्याला उत्पादनखर्च पूर्वींपेक्षां जास्त येणार, कारण वाढविलेलें भांडवल व

साधनसामग्री त्यांत निरुपयोगी व गुंतलेली पडून राहणार. वाहतुकीच्या खर्चामुळें उत्पादन संच कसा राहील हें पुष्कळ वेळां ठरतें असें मागें सांगितलेंच आहे. तथापि एखादा योजक ठिकठिकाणीं कारखाने काढील व त्याबरोबर त्यांची संघटना वाढेल व उत्पादन तर वाढेलच वाढेल. पूर्वीच्याच किंमतींत माल विकावयाचा झाल्यास त्याला नुसते कारखाने काढून भागणार नाहीं तर विक्रीची संघटना करावी लागेल, एजंट नेमावे लागतील, जाहिरातीचा खर्च करावा लागेल. म्हणजे एका दृष्टीनें उत्पादन खर्चहि वाढेल. योजकांची संघटना वाढली, कारखाने मोठे झाले अगर पुष्कळ झाले तर नेहमींच अवश्य असा कच्चा माल अगर जरूर तितके हुशार कारागीर मिळतील असें नाहीं; या दोन्हीकरितां त्याला प्रसंगीं जास्त किंमत द्यावी लागेल. तथापि या सर्व गोष्टींचा विचार करतांना जास्तींत जास्त नफा कसा मिळेल हें त्याचें जीवनतत्त्व तो विसरणार नाहीं. म्हणून तो अशा रीतीनें उत्पादन करील कीं जास्त उत्पादनामुळें होणारा खर्च, जास्त येणाऱ्या उत्पन्नाचे मानानें परवडेल. तसें होत नसेल तर तो जास्त उत्पादन करणार नाहीं. वाढतें उत्पादन व वाढतें उत्पन्न याचा मेळ बसला पाहिजे; व तो बसेल अशा रीतीनें त्याची वागणूक राहील. जोंपर्यंत एकंदर उत्पन्न एकंदर खर्चापेक्षां जास्त आहे तोंपर्यंत तो उत्पादन जास्त वाढवीत जाईल. उत्पन्न कमी झालें कीं तो उत्पादन आंखडतें घेईल. कारण जास्त फायदा हाच त्याचा प्रमुख हेतु आहे व याच दृष्टीनें त्याची संघटना राहील. कांहीं योजकांचें उत्पादन किंमतीवर परिणाम घडवून आणण्याइतकें मोठें नसतें. त्यामुळें ते जी उत्पादन साधनसामग्री उत्पादकघटक, उपयोगांत आणतात त्यांच्याहि किंमतीवर ते परिणाम करूं शकत नाहींत. अशा योजकांनीं जर उत्पादन वाढविलें तर त्यांचा उलट वट नफा कमीच होईल; कारण ते मोठ्या प्रमाणावर वाढ करूं शकत नाहींत म्हणून उत्पादनखर्च कमी होणार नाहीं व त्यामुळें थोडेसें वाढवून खर्चच वाढेल व नफा कमीच होईल. समजा, एका शेतकऱ्यानें आपलें उत्पादन, गहूं जास्त विकविण्याचें ठरविलें. पण जोंपर्यंत तो एकटाच काम करणारा आहे तोंपर्यंत किती जास्त वाढवील म्हणजे जास्त लागवड करील, त्याला मर्यादा आहे. त्यापलीकडे लागवड केली तर त्याच्यानें सर्व उरकणार नाहीं व एकंदर उत्पादन वाढत्या खर्चाचे मानानें कमीच येईल; व उतरत्या पैदाशीच्या नियमांप्रमाणें जसजसा तो जास्त लागवड करील तसतशी त्याची प्राप्ति कमी कमी होत जाईल. यांत आपण शेतकरी हा एकटाच योजक असून तो कायम व बाजारभावहि कायम धरला आहे. अर्थात् योजकांची संघटना वाढली म्हणजे आपल्या शेतकऱ्यानें भागीदारी करून आणखी माणसें घेतली, बाजारभाव बदलला तर वर लिहिल्याप्रमाणें होणार नाहीं.

योजकांची संघटना कायम, बाजारभाव कायम, अशी स्थिति असतांना जर उत्पादन वाढविलें तर वाढत्या खर्चाचे मानानें वाढतें उत्पादन परवडत नाहीं. पूर्वीपेक्षां वाढत्या उत्पादनाच्या खर्चाचें प्रमाण जास्त असतें. केवढया उत्पादनाच्या व्यापाची एक व्यक्ति अगर एक पेढी चांगल्या रीतीनें—फायदेशीर रीतीनें, देखरेख व नियंत्रण करूं शकेल, याला मर्यादा असते व त्याच मर्यादेमुळें एका ठराविक उत्पादनाचे प्रमाणापलीकडे जास्त उत्पादन करणें त्या व्यक्तीला अगर पेढीला परवडणार नाहीं. व्यक्ति कितीहि हुशार असली अगर कंपनींतील कार्यकर्ते कितीहि हुशार असले तरी त्यांनाहि मर्यादा असते; आणि ती जर नसती तर कंपनीनें अगर व्यक्तीनें आपला व्याप आणखी वाढविला असताच. ज्याअर्थी वाढवीत नाहींत त्याअर्थी व्याप वाढविण्यानें, उत्पादन वाढविण्यानें होणारा जास्त खर्च येणाऱ्या जास्त उत्पन्नापेक्षां जास्त होतो म्हणून वाढवीत नाहींत हें उघड आहे; आणि म्हणूनच त्याच्या वाढीला मर्यादा आहे हें जें सांगितलें तें बरोबर आहे.

यावरून पुनः एकदां हेंच सिद्ध होतें कीं, योजक जास्तींत जास्त नफा कसा मिळेल या दृष्टीनें उत्पादन आंखीत असतो, त्याचबरोबर तें उत्पादन कमींत कमी खर्चाचें कसें होईल हेंहि पहात असतो. कारण जास्त खर्च उत्पादनावर झाला तर नफा जास्त होणार नाहीं हें उघड आहे. किंबहुना या योजकाचे दोन डोळे एक जास्तींत जास्त नफा कसा होईल याकडे व दुसरा उत्पादनाला कमींत कमी खर्च कसा येईल याकडे वेधलेले असून या दोन डोळयांच्या दृष्टीनें तो त्याच्या उत्पादनसृष्टीकडे बघत असतो. आपण कमींत कमी खर्च म्हणतों याचा अर्थ प्रमाणानें कमींत कमी. नाहीं तर त्यानें अगदीं लहान प्रमाणावर उत्पादन करावें म्हणजे साहजिकच त्याला खर्च कमी येईल. स्वस्त पद्धतीनें कमींत कमी म्हणजे नुसता कमी नव्हे तर स्वस्त रीतीनें; पण त्याबरोबर जास्त उत्पादन केलें तर नफाहि जास्त येईल. त्याचप्रमाणें कमींत कमी खर्च याचा वस्तूंमागील सरासरी खर्च कमी असाहि अर्थ नव्हे; कारण त्याच्या उत्पादनाचा नगा मागील सरासरी खर्च वाढला तरी तो उत्पादन वाढवीत जाईल. जोंपर्यंत वाढत्या उत्पादनाचा खर्च वाढत्या उत्पन्नापेक्षां कमी आहे तोंपर्यंत उत्पादन वाढविणें त्याला परवडणारच. यामुळें नगामागें सरासरी खर्च वाढेल. पण त्याचबरोबर पूर्वीपेक्षां नफाहि वाढेल. उदा०, एक कंपनी पूर्वी १ हजार नांगर काढीत होती व नगामागें खर्च १८ रु. व फायदा २ रु. होई. म्हणजे तो नांगर २० रु. ला विकीत होती. आतां आणखी दोन हजार नांगर काढले. नगामागें १९ रु. खर्च आला तरी सुद्धां त्या कंपनीला १ रु.

नगामागें फायदा मिळेल. मात्र पूर्वीं नगामागें १८ रु. खर्च होता आतां १९ रु. आला व सरासरी खर्च $\frac{१८००० + ३८०००}{३०००}$ म्हणजे $१८\frac{२}{३}$ रु. आला, पण एकंदर फायदा ३००० रु. झाला, म्हणून २० रु.ला थोडेसे कमी असेपर्यंत जरी अधिक उत्पन्न केलेल्या नांगरामागें खर्च आला तरी, तें उत्पादन फायदेशीर. म्हणून कमींत कमी खर्च करण्याचा योजक प्रयत्न करील, याचा अर्थ खर्च वाढला असतां फायदा वाढणारा असेल तर तेथें तो खर्च कमी करणार नाहीं. कमी म्हणजे निव्वळ कमी नव्हे, सरासरीनें खर्च कमी याही अर्थानें कमी नव्हे. कमींत कमी खर्च करील याचा अर्थ स्वस्त रीतीनें, स्वस्त पद्धतीनें तो उत्पादन करील. जर एखाद्या उत्पादन घटकांत, उत्पादनसामग्रींत बदल करून, एकंदर उत्पादन कायम ठेवून खर्च कमी करतां आला तर तो जरूर करील. हा बदल करणें एकंदर यांत्रिक प्रगतीवर, उत्पादन तंत्राच्या प्रगतीवर निरनिराळ्या कच्च्या मालाचे प्रगतीवर अवलंबून राहील. समजा, १० माणसें ८ तास लावून ४०० शेर आइस्क्रीम तयार करतात. या १० माणसांना दररोज ८ आणे म्हणजे ५ रुपये द्यावे लागतात. यांपैकीं समजा, आमच्या 'ग्यानबानें' आपल्या 'दिलखूष' पेयगृहांतून ८ माणसें काढलीं. दूध, साखर, मीट वगैरे भरण्याकरितां दोन टेबिलीं व विजेच्या सहाय्यानें आइसस्क्रीम तयार केलें; वीज बसविण्याचा खर्च, त्यावरील व्याज, नवीन पद्धतीचें भांडें, त्याची किंमत, त्यावरील व्याज व विजेचा चालू खर्च व दोन माणसांची मजुरी, या सर्वांचा हिशेब करून जर एकंदर तें तयार करण्याबद्दल ४ रु. खर्च येत असेल व 'ग्यानबा' भांडवलशाहींतील योजक असेल, तर त्याप्रमाणें तो करील. कारण या योगानें उत्पादन स्वस्त होतें. माणसांच्या सहाय्यानें कां यंत्रांच्या, या प्रश्नाचा निकाल कोणाच्या सहाय्यानें स्वस्त म्हणजे कमी खर्चांत निघेल, यावर अवलंबून राहील. समजा, त्याला ८०० शेर आइस्क्रीम रोज हवें आहे. तेव्हां या जास्त उत्पादनाचे वेळीं सुद्धां त्याच दृष्टीनें तो विचार करील. यंत्रानें स्वस्त पडणार असेल तर यंत्रानें, माणसांच्या सहाय्यानें स्वस्त पडत असेल तर त्यांच्या सहाय्यानें; त्याचप्रमाणें साखऱ्याऐवजीं पिठी साखर घालून अगर साखरेचा अर्क घालून ज्या पद्धतीनें स्वस्त पडेल तीच पद्धत तो स्वीकारील. तात्पर्य, कच्च्या मालांत बदल करून, माणसांच्या संख्येंत बदल करून, दुरुस्ती, नवें-जुनें वगैरे नाना प्रकार करून योजक शक्य तितक्या स्वस्त रीतीनें उत्पादन करण्याचा प्रयत्न करील. आपणहि व्यवहारांत या तऱ्हेचे बदल करीत असतों. अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. कच्च्या लोखंडापेक्षां टाकाऊ लोखंड स्वस्त असेल तर तें जास्त प्रमाणांत मिसळून पोलाद तयार करावयाचें. त्याचप्रमाणें हलवाई, तुपाऐवजीं कोकोजेम

अगर अन्य वनस्पतीचें तूप उपयोगांत आणतात. श्रीखंडांत केशराऐवजीं, रंग वगैरे. याप्रमाणें सर्वच वागत असतात. हा घटक काढून तो घातला असतां परवडेल व एकंदर नफा जास्त होईल ही खात्री मात्र त्यांची झाली पाहिजे. हीच गोष्ट शास्त्रीय भाषेंत सांगावयाची म्हणजे अ घटकाचा, उत्पादन ÷ खर्च जर ब घटकाच्या, उत्पादन ÷ खर्च यापेक्षां जास्त असेल तर अ घटकाचा उपयोग करणें योजकांस फायदेशीर होईल. मग तो घटक मनुष्य असो, कच्चा माल असो अगर अन्य कोणत्याहि प्रकारचा असो. समजा, सिगारेट कारखान्यांत बाया पुडे गुंडाळण्याचें काम करीत असल्यास, त्याऐवजीं जर यंत्र स्वस्त पडत असेल, तर योजक बायांना काढून टाकील. बायकांची मजुरी त्यांना मागणी नसल्यामुळें कमी होईल. उलट यंत्रांना मागणी झाली तर यंत्रांची किंमत वाढेल. हें जास्त प्रमाणांत होत गेलें तर योजक पुन्हां विचार करील कीं, कोणतें फायदेशीर ? जास्त यंत्रें लावणें कां पुन्हां स्वस्त मजुरीनें मिळणाऱ्या बायका ? म्हणजे 'अ'चा, उत्पादन ÷ खर्च जर 'ब'च्या, उत्पादन ÷ खर्च यापेक्षां जास्त असेल तर ब ऐवजीं अ या नियमानुसार योजक वागेल. जेथें बाजार मोकळा व मक्तेबाजी नाहीं त्या ठिकाणीं उत्पादक घटकांच्या किंमती-वरच योजक बदल करील कीं नाहीं हें अवलंबून राहील. जर किंमत जास्त असेल तर तो बदल करणार नाहीं, किंमत उतरली कीं बदल करील कारण तेव्हांच त्याला बदल करणें परवडेल. बदली दिलेल्या घटकांचें उत्पादन निदान त्यांच्या किंमतीशीं मेळ घालणारें असलें पाहिजे. तसें नसेल तर योजक हौसेसाठीं बदल करून उत्पादन खर्च वाढविणार नाहीं; बदल करून उत्पादन परवडत असेल तर तो मोठ्या प्रमाणांत बदल करीत जाईल व त्याला फायदाहि जास्त होईल; जो घटक अगर उत्पादकवस्तु तो घेत जाईल उदा०, यंत्रें वगैरे, त्यालाहि गिऱ्हाईक वाढेलच. याचाच अर्थ तो विशिष्ट उत्पादक घटक—मग तो कच्चा माल असो, यंत्र असो, अगर हुशार कारागीर असो, गिऱ्हाइकांच्या पसंतीचे प्रमाणांत जास्त आहे, त्यांना काम हवें याचें निदर्शक आहे. त्यामुळें विशिष्ट तऱ्हेचा कच्चा माल, यंत्रें अगर कारागीर या धंद्यांतून, किंमत जास्त आल्यामुळें त्या धंद्यांत जातात; याचा अर्थ समाजाला त्याच्या जुन्या धंद्यांपेक्षां नविनाची जास्त अवश्यकता आहे असा होतो. निदान दोन्ही सारखेच वाटतात इतका जरी त्यांतून अर्थ काढला तरी तो चुकीचा होणार नाहीं. निरनिराळ्या धंद्यांत कसकसे बदल घडत जातात, योजक उत्पादनाचे कामीं उत्पादकघटक बदलून आपला नफा कसा वाढवीत असतात, हें आपण पाहिलें. आणि या सर्व विवेचनावरून आपणांस एकच सिद्धांत दिसला, तो म्हणजे उत्पादक घटकांत बदल करून फायदा होत असेल तरच तो करील.

त्या बदलाचें गणित म्हणजे उत्पादन आणि खर्च यांचा मेळ परवडणारा होय. (अ चा उत्पादन ÷ खर्च, ब चे उत्पादन ÷ खर्च यापेक्षां अधिक असेल तर.)

वरील विवेचनांत आपण वस्तूंच्या किंमतीचा उल्लेख केला व मागणी व पुरवठा यांच्या कमीजास्त होण्यावर किंमत बरीच अवलंबून असतें, हें मागें मागणी व पुरवठा यांचा विचार करतांना आपण पाहिले. परंतु उत्पादनखर्च, ती वस्तु तयार करण्याकरितां होणारा खर्च, यांवरहि ती किंमत अवलंबून असते असें साधारणपणें म्हटल्यास तें चुकीचें नाहीं. वस्तूची किंमत, यांत वस्तूचा सर्व तऱ्हेचा उत्पादन खर्च व योजकाचा नफा यांचा अंतर्भाव असतो. परंतु योजकांचा नफा वस्तूंच्या किंमतीवरच अवलंबून असल्यामुळें तो कमीजास्त होत असतो. त्याचप्रमाणें उत्पादनखर्च हाहि पुष्कळ वेळां उत्पादनाचे प्रमाणावर व त्यामुळें उत्पादनाचे मागणीवर अवलंबून असतो. मागणीवर किंमत, किंमतीवर नफा, मागणीवरच उत्पादन व त्याचे मागणीवर उत्पादनखर्च याप्रमाणें हें नातेगोतें आहे.

पैशांत एखाद्या वस्तूच्या उत्पादनाचा खर्च काढणें अगदीं सरळ काम आहे, मग तो सरासरी खर्च असो अगर परवडणारा खर्च असो. ज्या ज्या उत्पादक वस्तूंच्या अगर घटकांच्या सहाय्यानें ती वस्तु तयार होते, त्या त्या घटकांची किंमत एकत्र केली कीं त्या वस्तूचा उत्पादन खर्च निघाला. कच्चा माल, यंत्रें, भांडवल, मजुरी, देखरेख, जमिनीचें भाडें वगैरे यांचे किंमतींची बेरीज म्हणजे उत्पादन खर्च. यांत सृष्टीनें फुकट दिलेल्या गोष्टींची किंमत धरली नाहीं; आपण ती गोष्ट तूर्त बाजूला सारूं. अगदीं शंभर टक्के तात्त्विक दृष्ट्या विचार करावयाचा तर याहि गोष्टींचा विचार यांत केला पाहिजे. तथापि चालचलाऊ दृष्टीनें वस्तूच्या उत्पादनाचा खर्च म्हणजे तिच्या उत्पादकघटकांच्या किंमतींची बेरीज. यांत दोन्ही तऱ्हेचे उत्पादकघटक धरले आहेत. भांडवलस्वरूपी घटक म्हणजे यंत्रें, कारखान्याच्या इमारती व खर्चीघटक म्हणजे कच्चा माल, मजुरी वगैरे. उत्पादन खर्चाची स्थूल कल्पना आपणास आली आतां उत्पादनखर्च व वस्तूंची किंमत—बाजारी किंमत, यांचें नातें कसें असतें तें पाहूं. वर उत्पादन खर्चावर किंमत अवलंबून असते असें सांगितलें. पण उत्पादन खर्चानें ती निश्चित होते कां ? जर किंमत उत्पादन खर्चापेक्षां कमी असेल तर उत्पादन होणार नाहीं किंवा कमी होईल; व जर किंमत वाढली तर पुनः सुरू होईल अगर वाढेल हें सरळ आहे. कोणताहि योजक नुकसान होत असतां उत्पादन चालू ठेवणार नाहीं. या दृष्टीनें उत्पादन खर्चावर किंमत साधारणपणें अवलंबून आहे हें म्हणणें ठीक आहे. पण त्या खर्चानें किंमत निश्चित होतें हें म्हणणें बरोबर नाहीं व

त्याचप्रमाणें किंमत उत्पादनखर्चहि निश्चित करीत नाहीं. समजा, आरकस काम करणारे मजूर कमी झाले. त्याबरोबर जे आहेत त्यांचा मजुरीचा दर वाढेल व त्याबरोबर कापीव लांकडाचा भाव वाढेल; याच्या उलट कापीव लांकडाची मागणी वाढली तर आरकस मजुरांची मागणी वाढेल व त्यामुळें त्यांची मजुरीहि वाढेल. याचा अर्थ सर्व वस्तूंच्या किंमती स्वतंत्र रीतीनें ठरल्या जात नसून परस्परांवर अवलंबून असतात. केवळ खर्चानें—उत्पादन खर्चानें—किंमत निश्चित झाली नाहीं, किंवा किमतीनेंहि उत्पादन खर्च निश्चित झाला नाहीं. जर उत्पादनांत मक्तेबाजी असेल, बाजार मोकळा नाहीं अशी परिस्थिति असेल तर अनुभव निराळा येतो. समजा, एका गांवीं सूर्यछाप घासलेट विकण्याचा मक्ता आहे. दुसरें कोणीं तें विकणार नाहीं व हा मक्तेदार आठवड्याला ३ रु. डबा याप्रमाणें १००० डबे विकतो. आतां त्याला ११०० पर्यंत विक्री वाढवावयाची आहे. या कामीं थोडी किंमत कमी केल्याशिवाय हें शक्य नाहीं म्हणून त्यानें डब्यामागें २ आणे किंमत कमी केली तर ११०० डबे खपतात. आतां ३ रु. या किंमतींत त्याला १००० डब्यांची एकंदर विक्री ३ हजार रुपये येते व २ रु. १४ आ. या किंमतींत ११०० ची विक्री ३१६२ रु. ८ आ. आली म्हणजे १६२ रु. ८ आ. वाढ झाली. १०० डबे जास्त विकले म्हणून एकंदर विक्री १००× २ रु. १४ आ. म्हणजे २८७ रु. ८ आ.नें वाढली नाहीं. तर ३१६२ रु. ८ आ.–३००० रु. १६२ रु. ८ आ. नेंच वाढली. उत्पादन वाढल्याबरोबर त्या प्रमाणांत विक्री वाढली नाहीं. शंभर डबे जास्त विकून त्यांत १६२ रु. ८ आ. विक्री वाढवितां आली, जरी प्रत्येक शंभर डब्यांची किंमत त्याला २८७ रु. ८ आ. आली. मग कोणत्या परिस्थितींत हा मक्तेवाला या आणखी शंभर डब्यांचें उत्पादन करील? जेव्हां या शंभर डब्यांचा येणारा अधिक खर्च १६२ रु.८ आण्यापेक्षां कमी असेल तेव्हांच. जर तो जास्त होईल तर त्यास कांहींहि फायदा नाहीं. जेव्हां बाजार मोकळा नसतो तेव्हां वस्तूंची किंमत तिच्या सीमागत खर्चापेक्षां—परवडणाऱ्या खर्चापेक्षां—जास्त असते. वरच्या उदाहरणांत शंभर डब्यांची किंमत प्रत्यक्ष रु.२८७ ८ आणे आली पण सीमागत खर्च परवडेल म्हणजे अधिक उत्पन्न परवडेल इतका खर्च १६२ रु. ८ आणे येतो. जर मक्तेबाजी नसती व बाजार मोकळा म्हणजे बाजारांत स्पर्धा असती तर किंमत २ रु. १४ आण्यापेक्षां कमी झाली असती व अखेर बाजारची किंमत व परवडणारा खर्च—सीमागत खर्च, यांत मेळ जमला असता, दोन्हीं सारखे झाले असते. कारण जशी किंमत कमी होत जाईल तसा परवडणारा खर्च जास्त होत जाईल व किंमतीपेक्षां जास्त खर्च होत असेल तर कोणी अधिक

उत्पादन करणार नाहीं, व पुन्हां खर्चचक्र, मागणी पुरवठ्याच्या सिद्धांताप्रमाणें बदलेल. मोकळ्या बाजारांत काय परिस्थिती होते याचा आणखी विचार करूं. समजा, योजकानें, त्याच्या पेढीनें, उत्पादन वाढविण्यास सुरुवात केली कीं लागलीच झपाट्यानें कांहीं त्या वस्तूंची किंमत कमी होत नाहीं; सुरुवातीस जास्त उत्पादनाला सुद्धां पूर्वीइतकीच किंमत येत जाते. म्हणून या परिस्थितींत सीमागत उत्पन्न—अधिक उत्पादनाची प्राप्ति ही बाजारी किंमतीबरोबर असते; आणि म्हणून येणाऱ्या किंमतीइतकी खर्चाची बाजू होईपर्यंत तो उत्पादन अधिक करीत राहील. सीमागत उत्पन्न म्हणजे जें अधिक उत्पन्न मिळविणें, अधिक खर्चाच्या मानानें परवडणारें आहे; व जर तें परवडणारें नसेल तर, तें मिळविण्याकरितां योजक अधिक उत्पादन करणार नाहीं, हें त्याचें स्वरूप पूर्वी आपण समजावून घेतलें आहे, तें या विवेचनाचे वेळीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. म्हणून सुरुवातीस, समजा, आपल्या नांगराच्या कारखानदारानें १०० नांगर जास्त काढले व या सर्वांना पूर्वी काढलेल्या नांगरांइतकी नगामागें किंमत आली, म्हणजे २० रु. नगाप्रमाणें पूर्वीचे हजार खपत होतें व आतां हे १०० अधिक काढलेले धरून ११ शें नांगर त्याच भावानें म्हणजे २० रु. प्रमाणें खपूं लागले. कारण अजून उत्पादनामुळें किंमतीवर परिणाम होऊं लागला नाहीं. एक नांगर जास्त काढला रु. २० जास्त उत्पन्न झालें. म्हणजे जास्त उत्पादनाचें उत्पन्न, हें या घटकेला बाजाराच्या किंमतीइतकें आहे. मग नांगराचें हें उत्पादन कोठपर्यंत फायदेशीर रीतीनें योजक वाढवूं शकेल? जोंपर्यंत अधिक काढलेल्या नगांचा खर्च अधिक नगांच्या येणाऱ्या किंमतीपेक्षां कमी आहे अगर तितकाच आहे तोंपर्यंत. तो बिंदु ओलांडून खर्च जाणार नाहीं तोंपर्यंत त्याला अधिक नग काढणें परवडेल त्यापलीकडे नाहीं. कारण येणाऱ्या किंमतीपेक्षां जास्त खर्च येऊं लागला तर उत्पादन करणें त्यास फायदेशीर नाहीं. आपण बाजार मोकळा आहे, त्यांत स्पर्धा आहे असें धरलें आहे. तेव्हां या नांगर काढण्याच्या धंद्यांत दुसरे योजक असतील, दुसऱ्या पेढ्या असतील त्याहि याच सिद्धांताप्रमाणें वागतील. व जर निरनिराळ्या कारखान्यांत कामाची कार्यक्षमता—हुशारी कमीजास्त असली तर, उत्पादनाचें प्रमाणहि कमीजास्त होईल. परवडणाऱ्या खर्चांत फरक होणार नाहीं. पण जास्त हुशारीनें चालविलेल्या कारखान्यांत जास्त माल, जास्त पैदास होईल. पण बाजारांत हळूहळू त्या वस्तूचें—येथें नांगराचें—उत्पादन जास्त जास्त येऊं लागेल व त्याचा परिणाम किंमतीवर होऊं लागेल, व शेवटीं अधिक येणारी किंमत, अधिक होणाऱ्या खर्चापेक्षां, जी जास्त होती, ती कमी कमी होत जाईल व त्यामुळें होणारा नफाहि कमी होत जाईल, व शेवटीं किंमतीपेक्षां

उत्पादन खर्च जास्त होऊं लागला तर उत्पादन बंद होईल अगर कमी होईल; व कमी झालें अगर पुरवठा मागणीपेक्षां कमी झाला, म्हणजे पुनः 'हरिः ओम्' म्हणून उत्पादन वाढूं लागेल, असें हें व्यवहारचक्र, मोकळा बाजार—पूर्ण स्पर्धा आहे असा बाजार असतांना फिरत असतें. जर बरेच दिवस येणारी विक्री प्रमुख व पुरवणी दोन्ही मिळून होणाऱ्या खर्चापेक्षां, कमी कमी येऊं लागली तर, त्या योजकाला तो धंदा सोडावा लागेल. आपलें भांडवल तो दुसरीकडे नेईल अगर नादार होईल अगर धंदा बंद करील व तो नोकरी पतकरून योजकाचीं वस्त्रें फेंकून देईल; पण यांपैकीं कांहींहि घडून येण्यास कालावधि लागतो, कारण वर सांगितलेंच आहे कीं, बाजारांतील किंमती झटपट बदलत जातात असें नव्हे; कित्येक प्रसंगीं क्षयी माणसा-प्रमाणें हळुहळू, आशा देतदेत निराशा करतात. पण दरम्यानच्या काळांत प्रमुख खर्चाची बाब ही जास्त महत्त्वाची असते. उत्पादनांतील जो कायम खर्च असतो तो उत्पादन वाढलें अगर कमी झालें तरी तो कायमच असतो. कायमस्वरूपी खर्च कोणता याचा आपण पूर्वी विचार केला आहे तो म्हणजे इमारत, तिचा विमा, जागेचें भाडें, यंत्रें, देखरेख वगैरे यांवर केलेला खर्च. म्हणून अधिक उत्पादनाचा खर्च परवडेल कीं नाहीं याचा विचार करतांना हा कायम खर्च लक्षांत घेण्याचें कारणच पडत नाहीं. म्हणून एक नग अगर एक प्रमाण, अधिक उत्पादन करण्या-करितां योजकास जेवढा अधिक पैसा खर्च करावा लागतो, त्यापेक्षां त्याला येणारी किंमत जर अधिक असेल तर, तो अधिक नग अगर प्रमाण उत्पन्न करील. त्याच-प्रमाणें एक नग अगर प्रमाण, कमी उत्पादन केल्यानें त्याचा एकंदर उत्पादन खर्च एका नगाच्या अगर प्रमाणाच्या किंमतीपेक्षां जास्त कमी होत असेल तर तो उत्पादन कमी करील. एक नांगर जास्त काढून त्याचाहि खर्च निघत नसेल तर तो काढणार नाहीं; उलट एक नांगर कमी काढला तर एकंदर खर्च २२ रु. नें कमी होतो व काढला तर किंमत २० रु. येते अशा स्थितींत न काढणेंच फायदेशीर होतें म्हणून तो उत्पादन कमीच करीत जाईल. वाढलेल्या उत्पादनाची किंमत व वाढलेल्या उत्पा-दनाचा खर्च यांचा मेळ असेल तेव्हांच त्याला फायदा होईल हें पूर्वी आपण पाहिलें आहे; व या सूत्राला अनुसरूनच तो वागेल. याच नियमाला अनुसरून तो वागेल. याच नियमाला अनुसरून त्या त्या धंद्यांतील सर्व योजक, व्यक्ति अगर पेढ्या अगर कंपन्या, कुठल्याहि स्वरूपाची संघटना असो अशाच वागतील. जर त्यांना फायदाच नको असेल तर गोष्ट निराळी. उत्पादनाची वाढ हजारों प्रकारांनीं जरी वाढली तरी

हा नियम त्याहि उत्पादनाचे बाबतींत लागू आहे; कारण हा व्यवहाराचा नियम आहे प्रमाणाचा नाहीं.

अधिक उत्पादन करणें हें फायदेशीर आहे की नाहीं हें वर लिहिलेल्या नियमानुसार प्रत्येक योजक पाहील. समजा, एका मालकाचे १० टांगे आहेत व त्यांपासून दररोज त्याला ५० रु. मिळतात. पैकीं १० नोकरांना १० रुपये, घोड्यांचा खाण्याचा खर्च, नालबंदी, तबेलाभाडें, टांग्याच्या व घोड्यांच्या किंमतीचें व्याज वगैरे मिळून ३ रु. खर्च होतो म्हणजे टांग्यामागें १ रु. राहतो. समजा त्यानें एक घोडा वाढविला व त्यामुळें त्याला आणखी ४ रु. ८ आ. उत्पन्न वाढलें. पण खर्च पूर्वींइतका म्हणजे ४ रु. या नवीन घोड्याचा व रात्रपाळी करणाऱ्या नोकराचा अधिक मेहनताना वगैरे मिळून झाला, म्हणजे अधिक उत्पादनामुळें येणारें उत्पन्न ४ रु. ८ आ. व खर्च ४ रु. अगर एकंदर खर्चांत ४ रु. नें वाढ झाली व एकंदर उत्पन्नांत ४ रु. ८ आ. नें झाली. या स्थितींत अधिक उत्पादन करणें, येथें जास्त घोडा घेऊन रात्रपाळीनें टांगा हाकणें फायदेशीर आहे. समजा, आणखी एक घोडा घेतला व रात्रपाळीनें दुसरा टांगा हांकला, यांपासून त्याला ३ रु. ८ आ. अधिक उत्पन्न आलें. व खर्च मात्र अधिक घोडा, रात्रपाळीच्या नोकराचा भत्ता वगैरे मिळून ४ रु. च राहिला तर हें वाढलेलें उत्पादन त्याला परवडणार नाहीं म्हणून तो दुसरा घोडा घेऊन रात्र पाळीला दुसरा टांगा हांकणार नाहीं. तात्पर्य, अधिक उत्पादनापासून येणारें अधिक उत्पन्न, हें जर अधिक उत्पादनांत झालेल्या खर्चापेक्षां जास्त असेल तरच अधिक उत्पादन फायदेशीर होईल एरव्हीं नाहीं.

अर्थात् वरील गोष्ट बाजार मोकळा आहे, मक्तेबाजी नाहीं असें गृहीत धरून मांडली आहे. त्याचप्रमाणें उत्पादनाची वाढहि जी कल्पिली आहे ती माणसें कमीजास्त करून जी काय होईल त्या दृष्टीनेंच. पण अशी अवस्था फार वेळ रहात नाहीं, कारण उत्पादनाच्या दुसऱ्या घटकांमध्येंहि उत्पादन वाढविण्यासाठीं बदल करावा लागतो, वाढ करावी लागते. जास्त कच्चा माल, जास्त कारागीर, जास्त भांडवल (कायम व खेळतेंहि) वगैरे साधनसामग्री घ्यावी लागते. तथापि हें सर्व जरी झालें तरी वरील सिद्धांताला बाध येत नाहीं. जसा हा सिद्धांत लहान मुदतीच्या काळांत काम देतो असें आपण पाहिलें तसेंच मोठ्या मुदतीपर्यंत जरी आपण एकाद्या धंद्याचा विचार करावयाचें म्हटलें तरी, त्याला बाध येणार नाहीं. फक्त खर्चांत, उत्पादनखर्चांत आणखी कांहीं बाबींचा समावेश करावा लागेल एवढेंच. उदा०, यंत्रांची, उत्पादनसंचाची दुरुस्ती, नवेजुनें वगैरेवरील खर्च, अधिक उत्पादनाचे खर्चांत या

सिद्धांताचा विचार करतांना धरला पाहिजे. कारण या बाबींवरील खर्च प्रत्यक्ष होतच असतो म्हणून तो धरलाच पाहिजे. तात्पर्य योग्य व अवश्य तो खर्च, जो अधिक उत्पादनामुळें होतो तो जोंपर्यंत अधिक उत्पादनाच्या येणाऱ्या किंमतीपेक्षां कमी आहे तोंपर्यंत अधिक उत्पादन करणें योजकाला फायदेशीरच आहे.

एकाद्या वेळेस धंदा चालवून होणारें नुकसान जर धंदा कांहीं दिवस बंद करून होणाऱ्या नुकसानीपेक्षां कमी असेल तर योजक कांहीं दिवस नुकसानींत चालवील; कारण त्याचा अंदाज व आशा अशी असते कीं, लवकरच मागणी वाढेल, किंमती वाढतील व बाजार सुधारेल. मोठमोठाले कारखाने बंद ठेवणें व उत्पादनसंचाचें कायमचें नुकसान करून घेणें यापेक्षां थोड्या नुकसानींत भावी आशेवर धंदा चालविणें श्रेयस्कर ठरतें. कोळशाच्या खाणी बंद करून त्यांवर संरक्षणाचा खर्च, पाण्यानें भरून जाऊं नयेत म्हणून होणारा खर्च व अशाच तऱ्हेचे खर्च करण्यापेक्षां त्या चालू ठेवून नुकसान सोसलेलें बरें. पण याहि मार्गाला मर्यादा आहे. जर पुढें त्या धंद्याला चांगले दिवस येणार नसले किंवा नाहींच आले तर धंदा बंद करणें हा एकच मार्ग उरतो. कारण नुकसानींत उत्पादन करणें हें भांडवलशाहीच्या तत्त्वज्ञानाच्या विरुद्ध आहे. धंदा बंद करण्यानें समाजाची गरज भागली नाहीं अगर गैरसोय झाली हा विचार भांडवलशाहीच्या तत्त्वज्ञानांत पडत नाहीं. कारण तेथें सर्व उत्पादन समाजाच्या उपयोगासाठीं नाहीं, तर व्यक्तींच्याच उत्कर्षासाठीं—त्यांच्या फायद्यासाठींच—आणि त्या व्यक्ति म्हणजे भांडवलवाले !

---

# १३. उत्पादक घटकांचे बदल

मागील भागांत योजक जास्तींत जास्त नफा, या भांडवलशाही उत्पादनांतील हेतूला अनुसरून तो कसा वागेल, उत्पादनांत कसा बदल करील, अधिक उत्पादनाला काय मर्यादा असतात, योजकांची संघटना वगैरे गोष्टींचा विचार केला. उत्पादनघटकांत, साधनसामग्रींत बदल करून, ती कमीजास्त करून उत्पादन फायदेशीर करण्याचा त्यांचा प्रयत्न सारखा चालू असतो हें आपण पाहिलें. पण ही उत्पादनाची साधनसामग्री, हे उत्पादनघटक योजक बदलूं शकतात म्हणजे एकंदर काय परिस्थिति निर्माण होते हें आपण पाहिलें पाहिजे. आणि हे घटक योजक बदलतो म्हणजे त्यांच्या स्वरूपांत बदल करतो कीं एके ठिकाणीं असलेले दुसरे ठिकाणीं नेतो कीं पूर्वी एखाद्या साधनसामग्रीचा एका तऱ्हेनें उपयोग होत होता, तो दुसऱ्या तऱ्हेनें तो करतो ? त्याचप्रमाणें हे घटक किती बदलूं शकतात, त्यांची या बाबतींत गति किती आहे, त्याला कांहीं मर्यादा आहेत कीं नाहीं हें आपण पाहिलें पाहिजे. मागें आपण उत्पादनघटक अनेक स्वरूपाचे असूं शकतात हें पाहिलें; तथापि परंपरागत त्यांचे तीन वर्ग—जमीन, श्रम, भांडवल हे केलेले आहेत, हेंहि आपण पाहिलें आहे. तरी या उत्पादनघटकांचे बाबतींत वर उपस्थित केलेल्या प्रश्नांचे अनुरोधानें विचार करूं. प्रथम राष्ट्रांतील उत्पादनसाधनसामग्री कोणत्याहि स्थितींत कांहींतरी मर्यादित, निश्चित असणार; मग ती भांडवल स्वरूपी अगर अन्य स्वरूपी असो, राष्ट्रांची लोकसंख्या जरी झालेले जन्म व मृत्यु यांची वजावाट करून वाढत असली तरी अमूक एक वेळेस काम करण्यास लायक किती इसम आहेत हें निश्चित असतें. काम करणारे म्हणजे श्रम करून आयुष्यक्रम चालविणारे असा व्यापक अर्थ करूं व यांत निव्वळ शरीरश्रमानें काम करणारेच फक्त न धरतां, दुकानदार, डॉक्टर, वकील, ग्रंथकार, शिक्षक, गृहकाम करणाऱ्या स्त्रिया वगैरेसुद्धां धरल्या पाहिजेत. कारण हे सर्व इसम प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें उत्पादनाचे कामीं खपत असतात. ही सर्व मंडळी कोणत्याहि वेळीं किती असतील हें निश्चितपणें सांगणें शक्य आहे. तसेंच

राष्ट्रांत निसर्गानें दिलेल्या गोष्टी व त्यांत माणसांनीं केलेल्या सुधारणा उदा०, नद्या, त्यांवर बांधलेली धरणें, रस्ते, जमिनीची केलेली सुधारणा, याहि गोष्टी मोजतां येण्यासारख्या आहेत. त्याचप्रमाणें राष्ट्रांत भांडवल, मग कोणत्याहि स्वरूपांत तें असो, फार काळ टिकणारीं यंत्रें अगर इमारतीपासून तों अगदीं नाशवंत भाजीपाल्यापर्यंत जें असेल त्याचीहि नोंद करणें अशक्य नाहीं. त्याचप्रमाणें या तीन प्रमुख प्रकारांखेरीज अनेक उत्पादक घटक आहेत व ते कदाचित् या वर्गांत बसणार नाहींत. तथापि त्यांची सुद्धां नोंद अदमासें कां होईना करतां येणार नाहीं असें नाहीं. तात्पर्य, राष्ट्रांतील सर्व तऱ्हेच्या उत्पादनसाधनसामग्रीची, उत्पादक घटकांची, नोंद करणें शक्य आहे. चालू स्थितींत ती सामग्री किती आहे, किती असेल हें अंदाजानें कां होईना सांगतां येतें म्हणूनच राष्ट्रांतील उत्पादन, वस्तु व सुखसोयी कोठपर्यंत वाढवितां येतील हेंहि सांगणें, त्यांची मर्यादा शोधणें शक्य आहे. कारण राष्ट्रांत जितकी साधनसामग्री त्याच मानानें उत्पादनाची चालू व भावी मर्यादा हें उघड आहे.

उत्पादनसामग्रीचा बदलून उपयोग करतां येतो म्हणजे काय ? कांहीं उत्पादक घटक कमी अगर जास्त उत्पादन करीत असतील; उदा०, कांहीं माणसें आज काम करीत आहेत; उद्यां कामाचे तास कमी करतील, विश्रांतीचे तास ते वाढवितील. कांहीं कायम काम सोडून रोजावर राहतील; तथापि सामग्रीपासून उत्पादन कमी कां जास्ती हा विचार निराळा व एका प्रकारच्या उत्पादनापासून दुसऱ्या प्रकारच्या उत्पादनाकडे त्या घटकांचा, त्या सामग्रीचा उपयोग करणें, हा विचार निराळा. आपल्याला दुसरा विचार समजून घ्यावयाचा आहे. कांहीं उत्पादक घटक असे असतात कीं त्यांचा उपयोग एकाच तऱ्हेचें उत्पादन करण्याकडे होतो, दुसरीकडे होत नाहीं. त्यांना एकांडे शिलेदार अगर एकमार्गी घटक म्हणा पाहिजे तर. जर सर्वच उत्पादनसामग्री अशी एकदेशी, एकच उत्पादन देणारी असती तर, मग काय उत्पादन करावें हा प्रश्नच शिल्लक राहिला नसता. फक्त त्या सामग्रीचा उपयोग करावयाचा किंवा नाहीं येवढाच प्रश्न शिल्लक राहाता. कारण उपयोग करावयाचा ठरलें म्हणजे काय उत्पादन हें ठरलेलेंच आहे. जसें ग्रामोफोनची एखादी प्लेट शंभरवेळां लावली तरी तेंच गाणें गाणार, दिवाणखान्यांत लाविली किंवा हॉटेलांत लाविली तरी गाणें तेंच, प्रेक्षक व श्रोते निराळे येवढेंच. तथापि आधुनिक जगांत, कांहीं उत्पादनसामग्री—उत्पादक घटक असे असतात कीं, त्यांचा उपयोग अनेक प्रकारच्या उत्पादनाकडे करतां येतो. ते बहुपयोगी असतात म्हणूनच कोणत्या उत्पादनाकडे त्यांचा उपयोग केला असतां जास्त फायदा होण्याचा संभव आहे या प्रश्नाचा विचार

योजकास करावा लागतो. चित्रांचे ठोकळे घेऊन लहान मुलगा जसे निरनिराळ्या चित्रांचे सांचे जमवीत असतो, त्याचप्रमाणें या उत्पादनसामग्रीच्या निरनिराळ्या उपयोगांची व उत्पादनघटकांची संगत जुळवून योजक कोणचें उत्पादन जास्त फायदेशीर होईल हें पाहत असतो. घटकांचा बदल करून, एकाऐवजीं दुसरे नवीनच घालून, जुन्यांचें थोडें स्वरूप बदलून, नाना प्रकारांनीं विविध उत्पादनांचा मेळ तो बसवीत असतो. मोत्यांचा मेळ बसवितांना ज्याप्रमाणें तज्ज्ञ तऱ्हतऱ्हेचे मेळ बसवून शेवटीं उत्कृष्ट (शेलकीं) कायम करतात, त्याचप्रमाणें योजकहि करीत असतो. फरक, उत्कृष्ट उत्पादनाऐवजीं जास्तींत जास्त नफा देणारा मेळ तो पसंत करतो एवढाच. हल्लीचें एकंदर उत्पादन म्हणजे विविध स्वरूपांचें व फार गुंतागुंतीचें झालें आहे. साधी वस्तु संपूर्णपणें तयार होण्यापूर्वी ती अनेक अवस्थांतून जात असते. अनेक उत्पादनघटक त्या कामीं उपयोगांत आणले जातात. अनेक माणसांचे श्रम खर्ची पडतात. चौऱ्यांशी लक्ष योनींतून गेल्यानंतर मनुष्यजन्म प्राप्त होतो असें म्हणतात. जवळजवळ तीच स्थिति या आधुनिक जगांत वस्तु संपूर्ण पुरी होऊन बाजारांत येण्यापर्यंत तिची होते. अनेक अवस्थांतून तिला जावें लागतें. या दृष्टीनें बहुपयोगी साधनसामग्रीचा कसा उपयोग करतां येतो हें स्पष्ट होत जातें. एकतर तीच सामग्री, तोच उत्पादक घटक या धंद्यांतून त्या धंद्यांत नेला जाईल, अगदीं निराळ्या उत्पादनाकडे त्याचा उपयोग केला जाईल. किंवा, त्याच्या उपयोगाचें स्वरूप बदललें जाऊन त्याचा उपयोग केला जाईल. उदा०, एक कारकून कापडाचे गिरणींत टाइप रायटिंगचें काम करीत आहे. तो उद्यां बँकेंत गेला व तेथें तेंच काम करूं लागला तर त्यानें धंदा बदलला, पण त्याचें काम बदललें नाहीं; त्याचप्रमाणें लोखंडाच्या कारखान्यांत पूर्वींप्रमाणें भय्या लोखंड काढीत राहिला, पण त्याचे पूर्वीइतके रांध्याचे रूळ न होतां जास्त होऊं लागले व गर्डर्स कमी होऊं लागले. भय्याचें पूर्वींचेंच उत्पादन कायम आहे पण उत्पादनाचा उपयोग निराळ्या रीतीनें निराळ्या प्रमाणांत होऊं लागला. उलट, वरील कारकून टाइप रायटिंगचें काम सोडून, अभ्यास करून, परिक्षा देऊन समजा, हिशेबतपासनीस झाला तर याचा अर्थ त्याचें उत्पादनाचें स्वरूपच बदललें. त्याचबरोबर हा बदल करण्याकरितां त्याला करावे लागलेले श्रम व खर्च, हें एक त्यानें भांडवलच गुंतविलें असें म्हटलें पाहिजे. निर्जीव वस्तूंचें स्वरूप बदलतांना करावा लागणारा खर्च, जर भांडवलस्वरूपी आपण समजतों व नफ्यातोट्याचा हिशेब करतांना त्याचा विचार करतों, तर माणसाचे बाबतींतहि जास्त कौशल्य अंगीं आणण्याकरितां, शिक्षणाकरितां केलेला खर्च म्हणजे एका अर्थानें भांडवलाची पेरणीच होय; येथें उत्पन्नाचा,

मजुरीचा, विचार करतांना हा झालेला खर्चहि विचारांत घेणें अशास्त्रीय नाहीं, किंबहुना अवश्य आहे.

उत्पादनसामग्रीचा या प्रकारें बदलून उपयोग करणें हें कार्य उत्पादनाचे कामीं सारखें चालू असतें. परिस्थिति अर्थात् उत्पादनविषयक परिस्थिति बदलली म्हणजे ही बदलाबदली जास्त होत जाते. हा धंदा सोडून तो धंदा, ही जागा सोडून दुसरीकडे धंदा नेणें, प्रकार बदलणें, रूपांतरें, स्थलांतरे या गोष्टी होणें आर्थिक परिस्थिति बदलली म्हणजे नफ्याच्या दृष्टीनें अवश्य होतें. कारकून म्हणून भागत नसल्यास कारागीर, दलाल, जसें जमेल तसें मनुष्य करीत असतो. त्याचप्रमाणें इतर उत्पादनसामग्रीचे बाबतींतहि योजक रूपांतरांचे, स्थलांतराचे अनेक प्रयोग फायद्याच्या दृष्टीनें करून पाहत असतो. मागणी वाढली, बाजारभाव वाढला कीं, उत्पादनावर कसा परिणाम होतो हें आपण पाहिलें आहे व त्या दृष्टीनें योजक जसें गिऱ्हाईक उत्पादनाबद्दल मागणी करील, पसंती दर्शवील, त्याप्रमाणें तो उत्पादनांत हातीं असलेल्या शास्त्रीय साधनांनीं व उत्पादक साधनांनीं जरूर तो बदल करून, तें वाढवीत असतो. मागणीशीं त्याचा मेळ बसवीत असतो. अर्थात् हें सर्व पुढील काळांत उत्पादनाला मागणी राहील, गिऱ्हाइकी राहील, याच्या अंदाजावर अवलंबून असणार. त्याचप्रमाणें बदल करतांना साधनसामग्रीच्या किंमती यांवरहि हें होणारें उत्पादन थोडेसें अवलंबून राहणार. समजा, सर्व कारखानाच दुसरीकडे नेला, त्या नवीन ठिकाणीं कारागीर आले तर ठीक, नाहींतर अधिक अडचणी उत्पन्न होतात. कारागीर, मजूर हा तर अत्यंत महत्त्वाचा उत्पादक घटक, फार महत्त्वाची सामग्री हें विसरतां कामा नये. पुष्कळ वेळां उत्पादनांत रूपांतरें अगर स्थलांतरें करतांना सरकारी धोरणहि विचारांत घ्यावें लागतें. उदा०, ब्रिटिश हिंदुस्थानांत कोठेंहि कारखाना काढला व त्यांत १० पेक्षां जास्त मजूर लावले तर फॅक्टरी कायदा लागतो व त्याच्या नियमांप्रमाणें आठवड्यांत एक दिवस सुट्टी द्यावी लागते. त्याचप्रमाणें ४८ तासांपेक्षां जास्त तास काम आठवडयांत घेतां येत नाहीं. कोणत्याही एका दिवशीं नऊ तासांपेक्षां जास्त तास काम घेतां येत नाहीं. हवा, उजेड यांच्या दृष्टीनें कारखाना कसा असावा ह्यांचे नियम आहेत. कामगारांचा पगार महिन्याचे आठवे तारखेचे आंत दिला पाहिजे वगैरे नियम लागू होतात. तेंच जर संस्थानी हद्दींत कारखाना काढला तर योजकाला सुखावह होते. कारण कांहीं संस्थानांत असा फॅक्टरी कायदाच नाहीं. कांहींत मामुली आहे व कांहींत संस्थानी पद्धतीची अंमलबजावणी मालकाला बिनजाचाची असते. अर्थात् भांडवलवाल्यांना संस्थानांत धंदा काढणें जास्त

फायदेशीर. कारण तेथें मजुरांना चांगलेच पिळून काढतां येतें. पुष्कळ वेळां सरकार धंद्यांना परक्या देशांतील येणाऱ्या मालापासून संरक्षण देतें; म्हणजे आयात कर बसवून धंद्यांना उत्तेजन देतें. कांहीं वेळां नुकसानी भरून मिळावी म्हणून सरकार देणगी (Bounty) देतें. तात्पर्य, सरकारी धोरण काय असेल याचाहि विचार करावा लागतो. उत्पादनांत कशी वाढ करणें शक्य आहे अगर बदल किती करतां येणें शक्य आहे, ही गोष्ट किती वेळांत इकडून तिकडे उत्पादनसामग्री नेऊन उत्पादन सुरू करणें शक्य आहे अगर किती लवकर एक उत्पादक घटक बदलून या उत्पादनांतून त्या उत्पादनांत घालतां येईल अगर त्याचा या उपयोगाऐवजीं तो उपयोग किती लवकर करतां येईल, यावर अवलंबून आहे.

मजूर या घटकाचा या दृष्टीनें थोडा विचार करू. जेथें उद्योगधंदे वाढले आहेत, सर्व उत्पादन सामान्यतः यंत्राच्या सहाय्यानें होत आहे, व त्यामुळें श्रमविभागणी सर्वत्र झाली आहे, अशा राष्ट्रांतील मजूर वर्ग आपापल्या कामांत विशिष्ट तऱ्हेनें हुशार कारागीर असतो. व तेंच काम वर्षानुवर्ष करीत असल्यामुळें तेंच अगर तसलेंच काम मिळालें तर त्याला जमतें. पुष्कळ धंद्यांत सारख्या स्वरूपाच्या मजुरीचीं, कारागीरांचीं कामेंहि असतात. कांहीं धंद्यांत अगदीं खास गुण अंगीं असल्याशिवाय मजुरांना काम मिळणें अशक्य असतें. राष्ट्रांत शेंकडा धंदे आहेत, त्यांचे हजारों प्रकार आहेत. १९३१ च्या खानेसुमारींत इंग्लंडमध्यें ३५ हजार निरनिराळे व्यवसाय (Occupations) नोंदले आहेत. हिंदुस्थानांतहि हजारोंनीं आहेत, पण तपशीलवार नोंद १९३१ अगर १९४१ सालींहि झाली नाहीं. अर्थात् महत्त्वाचे असे नोंदले आहेत. तथापि कांहीं व्यवसायांत काम करणाऱ्या माणसाला त्यांत गम्य असावें लागतें; त्याचा कल तिकडे असावा लागतो. उदा०, रंग, कला, व्यापारी चित्रकला, शिल्पकला वगैरे. कांहीं धंदे शिक्षण घेऊन, अनुभव घेऊन, उमेदवारी करून शिकतां येतात. पण त्यांत सुद्धां मूळचा कल पाहिजेच. उदा०, छापखान्याचा धंदा, कंपाझिटर, सुतारकाम वगैरे. तसेंच अगदीं पाटी टाकणाऱ्या मजुरांचा जरी धंदा घेतला तरी कांहीं गोष्टी त्यांत सुद्धां अवश्यक आहेतच. सारखें तासतास काम करण्याची ताकद पाहिजे. त्यांत सुद्धां अनुभवानें मनुष्य जास्त काम करूं लागतो, चांगलें काम करूं लागतो. तथापि वर सांगितल्या-प्रमाणें पुष्कळ धंदे असे आहेत कीं, त्यांतील कामें सारख्याच अगर जवळ जवळ सारख्याच स्वरूपाचीं असतात. म्हणून कारागीर इकडून तिकडे जाऊन झटकन चांगलें काम करूं शकतो. यंत्र चालविण्याची माहिती असलेला कारागीर साधारण-

पणें कोणतेंहि यंत्र चालवूं शकेल. पिठाच्या गिरणींत जो काम करील तो छापखान्यांतील यंत्रांकडे नेमला गेला तरी लवकरच तें काम तो आपलेसें करील. दाणेआळींतील ओझेवाले, मालधक्क्यावरसुद्धां काम तितक्याच सफाईनें करतील. ज्याला मोटार चालवितां येते त्याला विमान चालविणें लवकरच जमेल. बऱ्याच धंद्यांतील कारागिरी माणसें लवकर शिकूं शकतात. फिटर काम करणारा मनुष्य रेल्वेंत, मोटार कारखान्यांत, गिरणींत कोठेंहि काम करील. सारख्या स्वरूपाच्या कामांत तो पटकन तयार होईल. पण एकदम अगदीं निराळेंच काम, कीं ज्यांत निराळ्या स्वरूपाचें ज्ञान लागतें, तें काम त्याला लवकर येणार नाहीं. बैलगाडी हांकणारा, टांगा एक घोड्याचा अगर दोन घोड्यांचा असो, हांकण्यास ताबडतोब शिकेल. पण मोटार चालवावयास शिकण्यास त्याला कालावधि लागेल, कारण हें काम अगदीं निराळ्या स्वरूपाचें झालें. बैलगाडी हांकावयाची झाल्यास ती वाटेल तेथें व वाटेल त्या मालानें भरलेली हांकणें, त्याला कांहींच नाहीं. धान्याचीं पोतीं काय अगर कोळसा काय, त्याच्या कामाचें स्वरूप बदललें नाहीं. एका धंद्यांतील वाहतुकीऐवजीं दुसऱ्या धंद्यांतील वाहतूक त्यानें केली. त्याच्या धंद्याचें स्वरूप बदललें नाहीं. अशा तऱ्हेचें काम करणारे इसम कित्येक धंद्यांत आहेत. त्यांना काम बदललें नाहीं व धंदा बदलला तरी कांहींच त्रास वाटण्याचें कारण नाहीं. फेरीवाले, दलाल, लॉरीवाले, ओझेवाले, टाइपिस्ट, कारकून, पट्टेवाले वगैरे, ह्या विभूति बहुतेक धंद्यांत आहेत. तेव्हां ह्या धंद्यांतून त्या धंद्यांत गेल्यास त्यांचें काम बदलत नाहीं. पण एक गांव सोडून दुसऱ्या गांवीं जाण्याचा प्रश्न आला तर मात्र, ही बदलाबदल त्यांना इतकी सोपी वाटत नाहीं. गांव सोडून जाण्यांत मनुष्य पैशापेक्षां इतर पुष्कळ गोष्टींचा विचार करीत असतो. त्याला जमलेला संसार मोडून, ओळखीपाळखी, स्नेहसंबंध सोडून जावें लागतें म्हणून तो नाखूष असतो. त्याहिपेक्षां दुसऱ्या प्रांतांत अगर देशांत जाण्यास तो आणखीच नाखूष असतो. १९३१ च्या खानेसुमारींतील हिंदुस्थानांतील आंकडे पाहिले तर, संयुक्तप्रांत, बिहार, मद्रास या प्रांतांतील लोक इतर प्रांतांत जास्त प्रमाणांत जातात. मद्रासी तर सर्वत्र जातात. सं. प्रांतीय १० लक्ष ६३ हजार, बिहारी ८ लक्ष ८८ हजार व मद्रासी १२ लक्ष ९१ हजार याप्रमाणें लोक पोटासाठीं बाहेरच्या प्रांतांत गेलेले आहेत. याच्या उलट मुंबई, बंगाल व आसाम या प्रांतांत बाहेरच्या प्रांतांतील लोक आलेले आहेत. ते असे—५ लक्ष ९७ हजार मुंबई, ७ लक्ष ७१ हजार बंगाल, व १२ लक्ष ४१ हजार आसाम. मुंबई व बंगालमध्यें कापड व ज्यूट यांच्या गिरण्या असल्यामुळें मजुरांची भरती परप्रांतांतून होते; आसाममध्यें नवीन जमीन

लागवडीस आली म्हणुन ही संख्या वाढली आहे. हिंदुस्थानाबाहेर ब्रह्मदेश धरून ३२ लाख हिंदी लोक पोट भरीत आहेत. ही स्थिति महायुद्धापूर्वी होती. १९४२ मध्यें लक्षावधी हिंदी लोकांना ब्रह्मदेशांतून निर्वासित व्हावें लागले. आजच्या घटकेला निदान २० लाख हिंदी लोक देशाबाहेर व्यवसायांत गुंतलेले आहेत असे म्हणण्यास हरकत नाहीं. हे आंकडे हिंदुस्थानच्या ३८ कोटी लोकसंख्येच्या मानानें कांहींच नाहींत. मनुष्य हिंदुस्थानांतच काय, सर्वत्र आपला गांव, प्रांत वा देश सोडून दुसरीकडे जाण्यास नाइलाज झाल्याशिवाय तयार नसतो. कांहीं ठिकाणच्या लोकांत एक बाहेर जाण्याची परंपरा उत्पन्न होते. त्या न्यायानें मद्रास, बिहार, सं. प्रांत यांमध्यें बाहेर प्रांतीं व बाहेर देशीं जाणाऱ्यांची संख्या जास्त आहे. ब्रह्मदेशामध्यें मद्रासी जवळ जवळ ८ लाख आहेत. तात्पर्य, मजूर हा उत्पादकघटक इकडून तिकडे जलद जाणारा असला तरी तो खुषीनें जाणारा नसतो हें विसरतां कामा नये.

नवीन धंदा किंवा काम शिकणें त्याचप्रमाणें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणें या कामीं जो खर्च होतो, तो भांडवल स्वरूपाचाच समजला पाहिजे. कांहीं देशांत सरकार सामान्य शिक्षणाप्रमाणें धंदेशिक्षण देत असतें. त्याचा खर्च सरकार करतें. त्याचप्रमाणें लोकसंख्या जास्त झाल्यामुळें कांहीं देशांतील सरकारांनीं आपल्या खर्चानें शेंकडों लोक परदेशी धाडले आहेत. आजची अमेरिका म्हणजे युरोपमधील हांकून दिलेल्या, बाहेर काढलेल्या, खुषीनें गेलेल्या लोकांची सरमिसळ झालेली जनता आहे. कांहीं ठिकाणीं मालक—योजक, आपल्या कामगारांना धंद्यांचें शिक्षण देतो, त्याचप्रमाणें दुसरीकडे त्यांना नेणें झाल्यास त्यांचा खर्चहि तोच सोसतो. तथापि सामान्यतः मनुष्य स्वतः आपल्याला जास्त मजुरी मिळावी, बढती व्हावी म्हणून आपल्या खर्चानें जास्त शिक्षण घेऊन प्रयत्न करीत असतो. विशेषतः तरुण मंडळी उमेदींत असल्यामुळे आशा धरून शिकत असतात, खर्च करीत असतात. लघुलेखन शिकतात, हिशोबाचें काम शिकतात, टर्नरचें शिकतात, वायरमनचें शिकतात; कारकून अगर कारागीर, या दृष्टीनें आपली लायकी वाढविण्याचा प्रयत्न करीत असतात. १०–१५ वर्षे ज्यांनीं एखाद्या धंद्यांत काढलेलीं असतात, ते नवीन कांहीं शिकण्याचा अगर खर्च करून नवीन कला हस्तगत करून जास्त पगार अगर मजुरी मिळेल, या दृष्टीनें क्वचितच प्रयत्न करतात. एक तर त्यांचा उत्साह कमी झालेला असतो, अभ्यासाच्या संवयी गेलेल्या असतात, शिवाय १० गेले ५ राहिले अशा वृत्तीनें ते आयुष्याकडे बघूं लागलेले असतात. अशा मानासिक अवस्थेंत खर्च करून नवीन कला शिकणें दुरापास्त आहे.

हल्लींच्या जगांत यंत्रविषयक ज्ञान वाढतें आहे, नवीन शोध लागत आहेत. तऱ्हतऱ्हेची गिऱ्हाइकी वाढते आहे व त्यामुळें मालाची किंमत वाढत आहे. त्याचा परिणाम त्या त्या धंद्यांतील मजुरी वाढण्याकडे होतो. या धंद्यांतून त्या धंद्यांत जसा योजक नफ्याच्या आशेनें जातो तसाच मजूर, कारागीरहि दुसऱ्या धंद्यांत जास्त रोजमुरा मिळणार असेल तर जाण्याचा प्रयत्न करतो. याप्रमाणें निरनिराळ्या धंद्यांतून ही ये, जा, चालू असते. प्रसंगीं सरकार याबाबतींत नियंत्रणहि घालतें. आतांपर्यंत वाटेल तितक्या मोटारी वाटेल त्या रस्त्यावर भाड्यानें चालविण्यास हरकत नसे. अगदीं खुला बाजार होता. आतां हिं०सरकारनें या मोटार धंद्याचें, म्हणजे भाड्यानें मोटारी हांकण्याच्या धंद्याचें नियमन केलें,त्यांवर नियंत्रण घातलें. निरनिराळ्या मोटारींना रस्ते ठरवून दिले. त्यामुळें या मोटार धंद्यांतल्या ये, जा ला थोडा आळा बसला. नाहीं तर उठावें त्यानें मोटार हप्तेबंदीनें घ्यावी, कांहीं दिवस चालवावी व शेवटीं नुकसानींत निघून जावें ! कांहीं दिवस हा धंदा फायदेशीर होता. शेंकडों मजूर, कारागीर, योजक यांत आले; त्यांचें पुढें काय झालें, हें येथें सांगण्याचें कारण नाहीं. मुद्दा एवढाच कीं, जेथें जास्त मजुरीची आशा असेल तेथें लोक दुसरा धंदा सोडून येतात. कांहीं ठिकाणीं सरकार ये, जा वर नियंत्रण घालतें हें वर सांगितलेंच. तसेंच कांहीं धंद्यांत प्रवेश करावयाचा म्हणजे एक किमान लायकी असावी लागते, त्या धंद्यांची परिक्षा द्यावी लागते; अगर कांहीं काळ त्यांत उमेदवारी करावी लागते. वकील, डॉक्टर वगैरे धंदे वाटेल त्याला करतां येत नाहींत. परिक्षा पास होऊनच ते करतां येतात, याचा अर्थ यशस्वीपणें ते धंदे करतां येतात असा नव्हे. पण किमान लायकी असल्याशिवाय हे धंदे करण्याला सरकार परवानगी देत नाहीं. राजकारण हा एकच धंदा असा आहे कीं, त्यांत येणारा प्रत्येकजण स्वतःला मनापासून लायक समजतो व उमेदवारीची जरूर बिलकूल मानीत नाहीं ! असो; वरील कांहीं प्रतिबंधक गोष्टी सोडल्या तर भांडवलशाही युगांतील प्रत्येक देशांत कोणाहि मनुष्यास या धंद्यांतून त्या धंद्यांत जाण्यास कायदेशीर बंदी नाहीं. इकडे अजून मोठ्या प्रमाणावर ही हालचाल, ही ये, जा, होत नाहीं व जी थोडी होते ती बदललेल्या उत्पादनाच्या परिस्थितींत झटकन मेळ बसवील इतक्या लवकर होत नाहीं. याचें कारण संकल्पाशिवाय, योजनेशिवाय, उत्पादन घडतें हेंच आहे.

वर लिहिलेल्या, मेळ न बसलेल्या परिस्थितीचें वर्णन जास्त करण्याची अवश्यकता नाहीं. हें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील धंद्यागणिक मजुरीचे दर पाहिले तर कळून येण्यासारखें आहे. शेतावर काम करणाऱ्या मजुरांचे बाबतींत तर विसंगतीचें

चित्र भयंकरच दिसेल. १९३१ च्या खानेसुमारींत ब्रिटिश हिंदुस्थानांत ज्यांच्याजवळ कांहीं जमीन नाहीं व जे शेतकी काम करतात, अशा मजुरांची संख्या ३,६३,४०,००० होती. त्यांची सरासरी मजुरी एक आण्यापेक्षांहि कमी होती. १९३९ मध्यें म्हणजे युद्धाचे सुरुवातीस कांहीं भागांत शेतमजूर दररोज दहा आणेपर्यंत मिळवी, तर कांहीं भागांत दीड आणा सुद्धां त्यास मिळत नसे. जेथें मजुरी जास्त मिळणें शक्य आहे तेथें ताबडतोब मजूरपुरवठा होत नाहीं—मेळ बसत नाहीं. मजूरहि जाण्यास नाखूष असतात. तथापि युद्धकालांत सर्वत्र मजुरीचे दर वाढले. गांव व प्रांत सोडून अन्यत्र जाण्याची वृत्ति पण वाढली. या प्रवृत्तीचा परिणाम मजुरींत देशपरत्वें सारखेपणा उत्पन्न करण्याकडे होऊं लागला आहे. उद्योगधंद्यांत गेल्या ३० वर्षांत कितीतरी वाढ झाली, पण ज्या प्रमाणांत वाढ झाली, त्या प्रमाणांत मजुरांची, कारागिरांची वाढ झाली नाहीं. १९११मध्यें व्यापारांत काम करणाऱ्यांची संख्या ८लक्ष १०हजार होती ती १९३१ मध्यें ७ लक्ष ३१हजार झाली. उद्योगधंद्यांत १९११ मध्यें १७ लक्ष ३०हजार होती ती १९३१ मध्यें १५ लक्ष ३५ हजार झाली. १९४१ सालीं युद्धामुळें उत्पादन वाढले असल्यामुळें ही संख्या २० लाखावर गेली. उद्योगधंदे युद्धोत्तरकालांत वाढतील तर ही संख्या आणखीहि वाढेल.

तात्पर्य, मजूरवर्ग उत्पादनाच्या दृष्टीनें त्याबरोबर झटकन पाऊल टाकूं शकत नाहीं याचें कारण शिक्षणाबद्दल अनुत्साह असो अगर आपलें गांव सोडण्याबद्दल नाखुषी असो. इतर भांडवलशाही देशांतहि हाच अनुभव आहे. कांहीं प्रदेश असे आहेत कीं तेथें उत्पादन कमी होत चाललें आहे, बेकारी वाढत आहे, पण मजूर दुसरीकडे जात नाहींत. खुद्द इंग्लंडमध्यें कांहीं धंदे तेजींत तर कांहीं मंदींत असून, एकंदर उत्पादनाचा मेळ बसत नाहीं, आणि ही लढाई चालू असतांनासुद्धां, हीच स्थिति होती. खचलेले, मंदावलेले भाग (Depressed areas) म्हणजे ज्यांत उत्पादन कमी, कारण तेथील धंद्यांत मागणी नाहीं म्हणून व त्यामुळें बेकारी त्या भागांत जास्त, असे अनेक भाग इंग्लंडमध्यें युद्धापूर्वी होते. योजनापूर्ण पुनर्घटना झाली नाहीं तर पुनः तसेंच होईल. ज्या देशांत राष्ट्राच्या दृष्टीनें बिनहिशोबी उत्पादन चाललें आहे तेथें या गोष्टी अपरिहार्य आहेत; हिंदुस्थानचा सर्वच भाग इतर देशांच्या भरभराटीचे दृष्टीनें मागासलेला आहे. कांहीं ठिकाणी बिनहिशेबी उत्पादनामुळें होणारी बिकट परिस्थिति सोडून दिली तर, मजुरांची, कारागिरांची या धंद्यांतून त्या धंद्यांत, त्याच धंद्यांतील निरनिराळ्या शाखांत, कांहीं ना कांहीं, ये, जा, चालू असतेच. जास्त मजुरीच्या अगर निव्वळ रोजगार मिळेल या आशेनें ह्या गोष्टी होत असतात; व

व्यवहाराचा, उत्पादनाचा गाडा चालू राहतो. मजूर एका ठिकाणाहून दुसरीकडे मोठ्या प्रमाणावर क्वचितच जातात. साधारणपणें सरासरी काम चालू राहील, इतक्या बेतानें या गोष्टी होत असतात. मोठमोठालीं बांधकामें निघालीं अगर दुष्काळी कामें निघालीं तर हिंदुस्थानांत माणसें गांवचेगांव सोडून काम मिळेल तेथें जातात. एरव्हीं गांवांत शेतकाम संपलें अगर जरूरीपेक्षां जास्त माणसें शेतावर झालीं तर खेडेगांवचीं माणसें मजुरीकरितां शहरांकडे विशेषतः उद्योगधंदे, गिरण्या वगैरे जेथें आहेत अशा शहरांकडे जातच असतात. उद्योगधंद्यांना, कारखान्यांना अशा रीतीनें साधारणतः मजुरांचा पुरवठा होत जातो व उत्पादनाचें काम चालू राहातें. पुष्कळ वेळां लोकवस्तीचें स्वरूपच बदलतें. शहरें वाढत जातात, त्यांच्याजवळ उपनगरें वाढत जातात आणि शहरांचा विस्तार जसा वाढत जातो, तसें जवळपासच्या खेडेगांवचे लोक मजूर म्हणून शहरांत जास्त येऊं लागतात. वाहतुकीचीं वाढतीं साधनें, मोटारी, लोकलगाड्या यांनीं मजूरपुरवठा जास्त होण्यास मदत होते. परिस्थिति बदलली कीं, पुष्कळ माणसें या धंद्यांतून त्या धंद्यांत जातात. आज हजारोंनीं मोटार ड्रायव्हर्स आहेत, हे कोठल्या धंद्यांतून आले ? कोणी पूर्वी शिपाई होते, कारकून होते, शाळामास्तर होते, टांगे हांकणारे होते, फिटर होते; कांहींनीं नव्यानेंच हा धंदा हातांत घेतला. २० वर्षांपूर्वी पुण्यांत किंवा महाराष्ट्रांत किती उपाहारगृहें होतीं आणि आतां किती झालीं ? हीं चालविणारे पूर्वी शिक्षक होते, दुकानदार होते, वाढपी होते, आचारी होते, सिनेमा डायरेक्टर होते; कांहींनीं हा धंदा प्रथमच सुरू केला आहे. महारकीच्या हडकीचा लोभ ज्यांनीं सोडला व गांव घाण सोडून शहरांत आले, असे हजारों महार आज उत्तम कारागीर, मजूर, अन्य धंदे करणारे आहेत. कुलकर्णी वतनांतून निघाले म्हणून किती तरी लोक आज डॉक्टर, वकील, कारकून असे अनेक धंदे करीत आहेत. नाहींतर अजून सुद्धां ते ७–१२ चे उतारे व दुसऱ्यांची पीकपहाणी करीत अर्धपोटीं बसलेले दिसते. या प्रांतांत २० वर्षांत धंद्यांचा चित्रपट सर्व बदलला. जातिविषयक धंदा हा नियम परिस्थितीनें शतशः तुकडे करून मोडून टाकला. जोडे विकणारा आज चांभारच असेल असें नाहीं, फर्निचर करणारा सुतारच असेल असें नाहीं, व्याकरण रचणारा ब्राह्मणच असेल असें नाहीं, शिपाईगिरी करणारा रजपूत अगर मराठाच असेल असें नाहीं अगर साफसफाईचें काम करणारा हरिजनच असेल असेंहि नाहीं. सर्वच बदल झाला; उत्पादनसृष्टीनें आपला मेळ मनुस्मृतीच्या आज्ञा धुळीला मिळवून जमवून घेतला. वर्णाश्रम ज्या वेळीं सांगितला, त्या वेळीं तो श्रमविभागणीचे तत्त्वानुसारच सांगितला असला पाहिजे.

त्या वेळच्या उत्पादनयंत्राला तें जरूर होतें. आजच्या आधुनिक उत्पादनतंत्राला तें अवश्य नाहीं म्हणूनच तें निरुपयोगी ठरलें, तें तत्त्व निकालीं लागलें. सामाजिक संस्था व धर्मसंस्कृति हीं सर्व उत्पादनतंत्राची आश्रित आहेत; त्याविरुद्ध तीं जाऊं शकत नाहींत. तात्पर्य, धंद्याचा चित्रपट परिस्थितीप्रमाणें बदलत जातो. लोकसंख्येंत ज्या मानानें काम करणाऱ्या वयाच्या लोकांचें प्रमाण असेल, त्यामानानें हा बदल कमीजास्त होत जातो. आपल्याकडे फॅक्टरी कायद्याप्रमाणें १५ वर्षांखालील मुलांस कामास लावतां येत नाहीं. १७ वर्षांपर्यंत सबंध दिवस कामास लावतां येत नाहीं. साधारणतः १७ ते ५० वर्षेपर्यंतच्या अवस्थेंत जितके लोक त्या देशांत असतील, त्यांच्यावर उत्पादनांतील पुष्कळ गोष्टी अवलंबून असतात. हिंदुस्थानांतील लोकसंख्या वाढत असल्यामुळें म्हणजे दरसाल मृत्यूपेक्षां जन्म जास्त होत असल्यामुळें ( १७ ते ५० ) या अवस्थेंतील लोकांची संख्याहि वाढत आहे. पण इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांत, लोकसंख्या घटत चालली आहे; मुलें कमी प्रमाणांत जन्माला येत आहेत, त्याचा परिणाम असा होत आहे कीं, १५ ते ५० या वर्गांत येणारे दरसाल कमी होत आहेत. या वर्गांतले लोक मुख्यत्वें करून राष्ट्रांत सर्व प्रकारच्या उत्पादनाचें काम करीत असतात. ज्या धंद्यांत जास्त मजुरी मिळेल, जास्त "प्रॉस्पेक्टस्" ज्यांत आहेत असाच धंदा सुरवातीस माणसें घेतात. त्यांत त्यांना अपेक्षेप्रमाणें मिळालें तर ठीक, नाहीं तर निराशा हें ठरलेलेंच आहे. तथापि मजुरी जास्त मिळेल अगर प्राप्ती जास्त मिळेल, याचा अर्थ त्या धंद्यांतील उत्पादनाला मागणी जास्त आहे, गिऱ्हाइकी जास्त आहे, हें विसरतां कामा नये. कालांतरानें ती आंकसली तर पुष्कळांना तो धंदा सोडून दुसरीकडे जावेंच लागतें, उत्पादनाशीं जुळवून घ्यावें लागतें ! वकिली सोडून शिक्षक व्हावें लागतें, डॉक्टरी करण्याऐवजीं औषधविक्रीचें दुकान काढावें लागतें, नांगर सोडून गोदींत पोतीं उचलावीं लागतात; पिकांवरचीं पांखरें हाकण्याऐवजीं कारखान्यांतील गरम हवेंत लोखंडावर घण हाणावे लागतात. तात्पर्य, उत्पादनपरिस्थिति बदलली कीं माणसांना पडेल तें काम करावें लागतें. जेथें अन्नपाणी मिळेल तेथें जावें लागतें. उत्पादनसृष्टीचा हा कडक न्याय आहे. आयुष्याच्या सुरुवातीस विचार करून आपल्याला ज्यांत गम्य आहे, जिकडे आपला कल आहे, असें सर्व पाहून जरी मनुष्य आपला व्यवसाय सुरू करतो, तरी सर्व त्याच्या इच्छेप्रमाणें घडत नाहीं ! कित्येक ठिकाणीं सरकार धंदेशिक्षणाच्या शाळा काढून मुलांच्या बुद्धीला अनुसरून शिक्षण देतें. कित्येक ठिकाणीं शिक्षणसंस्था नोकऱ्या कुठें मिळतील, याचीहि माहिती पुरवतात. कारकून, कारागीर, कार्यकर्ते तयार करण्याचें

काम समाजांत चालूच असतें व तेथेंहि कोणत्या धंद्यांत अगर 'लाईनींत' जाण्यानें जास्त प्राप्ती आहे, हें मनुष्य बघत असतो व 'चान्स' घेत असतो. उत्पादनसृष्टींतील आपली योग्य जागा शोधून काढण्याचे कामीं मनुष्याची सारखी खटपट चालू असते. १० वर्षांपूर्वी निरनिराळया धंद्यांत व व्यवसायांत किती लोक होते व आतां किती आहेत हें जर पाहिलें तर माणसांची उत्पादनसृष्टींत ये जा कशी चालते हें कळून येण्यासारखें आहे. १९२१ सालीं ब्रि. हिंदुस्थानांतील शें. ७०.९ लोक शेतींत खपत होते, शेतीवर अवलंबून होते. १९३१ सालीं हें प्रमाण शें. ६५.६ झालें. शेतीप्रमाणें हिंदुस्थानांतील इतर धंद्यांतील लोकसंख्येचे कोष्टक पुढें (पृष्ठ १९५ वर) दिलें आहे.

लोकसंख्येंतील मिळवत्या लोकांची परिस्थिति १० वर्षांत सापेक्षतेनें व एकंदरीनें कशी बदलत जाते हें वरील आंकड्यांवरून सहज लक्षांत येण्यासारखें आहे. येथें जें कांहीं झालें तें कोणी घडवून आणलें नाहीं, तें घडत गेलें; भांडवलशाही उत्पादनांत हें असेंच होतें; लोकांना भावी कालाचा अनिश्चितपणा सारखा भासत असतो. लोक पोटासाठीं जागा बदलतील, धंदा बदलतील, व्यवसाय बदलतील हें योजक गृहीत धरूनच उत्पादनांत वावरत असतो. त्यांच्या श्रमाचा हरतऱ्हेनें उपयोग स्वतःला जास्तींत जास्त फायदा कसा होईल या तऱ्हेनें करावयाचा हा त्याचा संकेतच असतो. श्रम, या उत्पादक घटकाचा, हा जरूर तेथें जाऊन जुळवून घेण्याचा गुण, तल्लखपणा अगर चलनक्षमता ( Mobility ) याचा योग्य उपयोग सर्व समाजाचे कल्याणासाठीं न होतां, योजकाच्या व्यक्तिगत फायद्यासाठीं होतो.

आतांपर्यंत उत्पादन घटकांपैकीं, श्रम या घटकाची चलनक्षमता, स्थलांतर तसेंच रूपांतर करण्याची, याबद्दल विचार केला. परंपरागत दृष्टीनें उत्पादन घटकांचा दुसरा वर्ग म्हणजे जमीन; म्हणून या घटकाचा त्या दृष्टीनें थोडासा विचार करूं. नद्यांचे प्रवाह बदलतां येतात, माती इकडून तिकडे नेतां येईल, जमिनीच्या पोटांतील खनिज वस्तु, कोळसा, दगड, सोनें, कच्चें लोखंड वगैरे वर काढतां येतील. पण एक एकर जमीन फुरसंगीहून पुण्यास आणणें शक्य नाहीं. जमीन ही अशी वस्तु आहे कीं, ती एक इंचभर सुद्धां हालवितां येत नाहीं म्हणून चोरतांहि येत नाहीं. तिचें स्थलांतर करतां येणार नाहीं, परंतु योजकाला उत्पादनाचे दृष्टीनें तिचें रूपांतर करतां येतें. किंबहुना आज जगांत लागवडीस जेवढी जमीन आहे, ती मनुष्याच्या कष्टानें व कमाईनेंच लागवडीस योग्य झाली आहे. मूळ स्थितींत ती तशी नव्हती. हल्लींचें हें तिचें रूपांतर आहे. कांहीं जमिनी जास्त सुपीक, कांहीं कमी, कांहीं अगदीं नापीक—नाठाळ अशा आहेत. जमीन, याचा अर्थ लागवडीस, मनुष्याचे उपभोगास

## उद्योगधंद्यानुसार हिंदुस्थानांतील कामकऱ्यांची विभागणी

| उद्योगधंदा | १९३१ खानेसुमारी | | | | १९२१ खानेसुमारी |
|---|---|---|---|---|---|
| | धंदा करणाऱ्यांची × एकूण संख्या | प्रत्यक्ष कारागीर ऽ पुरुष | प्रत्यक्ष कारागीर ऽ स्त्री | दुय्यम धंदे | एकूण कामकरी व त्यांचेवरील अवलंबित |
| (अ) कच्च्या मालाचे उत्पादन | ११११६४५८६ | ७४७००५८५ | २८९३९८५४ | ७५२४१४७ | २३११९४४०३ |
| (१) गुरें व शेती | ११०७६०३२४ | ७४४४१००२ | २८८५३४३७ | ७४६५८८५ | २३०६५२३५० |
| (२) खनिज संपत्ती | ४०४२६२ | २५९५८३ | ८६४१७ | ५८२६२ | ५४२०५३ |
| (ब) पक्क्या मालाचें उत्पादन | २९६३९४७१ | १८६८२३४१ | ६२४६१५ | ४०३२५१५ | ५५६१२६९४ |
| (१) उद्योगधंदे | १७५२३९८२ | १०७९७५२७ | ४५५४४२६ | २१७२०२९ | ३३१६७०१८ |
| (२) वाहतुक | २७७८५२० | २०९११९८ | २४२२०८ | ४३७११४ | ४३३१०५४ |
| (३) व्यापार | ९३३६९६९ | ५७८५६१६ | २११२७९८१ | १४२३३७२ | १८११४६२२ |
| (क) राज्यकारभार व पांढरपशी उद्योगधंदे. | ४८१९४५२ | ३७८३४९४ | ३६३४४५ | ६७२५५३ | ९८४६०५० |
| (१) पब्लीक फोर्स | ९४१३२३ | ८३४४५३ | ७०२१ | ९९८४९ | २१८१५९७ |
| (२) सनदी राज्यकारभार | ११५३९६३ | ९६२७४१ | ३२५४३ | १५८६७९ | २६४३८८२ |
| (३) पांढरपेशे धंदे | २७२४१६६ | १९८६२६० | ३२३८८१ | ४१४७२५ | ५०२०५७१ |
| (ड) किरकोळ | २३२०३४८९ | ७९१७४३२ | १२६०१२०८ | २६८४८४९ | १९४०२०८४ |
| (१) एतखाऊ | २८०९५५ | १६८८२९ | ४७०४५ | ६५०८१ | ४७९८३५ |
| (२) घरगुती कामें | १२६७४११० | २०९४४८७ | ८८०३७९० | १७७५८३३ | ४५७०१५१ |
| (३) न वर्णन करण्यासारखें | ८४९९६७९ | ४५९९२३८ | ३१७९४०४ | ७११०४७ | ११०९८५६६ |
| (४) अनुत्पादक | १७४८७३५ | १०५४८७८ | ५७०९६९ | १२२८८८ | ३२५३५३२ |
| एकूण | *१६८८३०११४ | १०५०८३८१२ | ४८८२९१२२ | १४९११४०६४ | ३१६०५५२३१ |

×दुय्यम धंदे मिळून. ऽ मिळवते अधिक अवलंबून असणारे. *यांमध्यें ३११६ कामकऱ्यांचा (ज्यांची माहिती मिळाली नाहीं) समावेश केला आहे.

येणारी जमीन असाच आपण घेतला पाहिजे. नुसती निर्विकार म्हणजे उत्पादन—उपयोगाच्या दृष्टीपलीकडील जमीन असा घेणें बरोबर नाहीं; कारण व्यवहारशास्त्र ज्या वस्तूंचा उपयोग आहे व जिला किंमत येतें त्याच वस्तूंची, त्याच सोयींची दखल घेतें. मनुष्यानें केलेले कष्ट व त्यापासून झालेली सुधारणा जर काढून टाकली तर, जमिनींत खरोखर धूळच राहील. कांहीं जमिनी नुसत्या एकदांच सुधारून चालत नाहींत. सारखें खतमूत घालून, ताली बांध घालून, त्यांना लागवडीचे दृष्टीनें चांगल्या स्थितींत ठेवाव्या लागतात. दलदलीच्या जमिनींतून पाणी काढावें लागतें, वाहून जाऊं नयेत म्हणून दरडी, ताली, बांधाव्या लागतात. जमिनी चांगल्या स्थितींत ठेवण्यासाठीं सद्धां, चालू खर्च करावाच लागतो. आणि म्हणूनच खंडकऱ्यांना आपल्या भाडेपट्टयांत 'जमिनीची निगा राखूं', 'बांधबंदस्ती योग्य ठेवूं', 'जमिनींत नुकसान होईल असें कांहीं करणार नाहीं' असें लिहून द्यावें लागतें. मेहनत—मशागत वाढविली कीं जमिनीचें उत्पादनहि कांहीं मर्यादेपर्यंत वाढतें,ती कमी केली कीं कमी होतें. कोरडवाहू जमिनी विहिरीं खणून अगर पाटबंधाऱ्याचे सहाय्यानें बागाइती अगर पाण्याखालच्या होतात. त्यांत चांगलीं पिकें येतात. जास्त पिकें येतात. या घटकांचे उपयोगांत मनुष्यानें किती तरी फरक भूतकालांत केले आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानांतीलच आंकडे घेतले तर, आपल्याला असें आढळून येईल कीं, १९००सालीं लागवडीस असलेली जमीन, २०९·३७ द. ल. एकर होती. १९३३—३४ सालीं ती २२९.७१ द. ल. एकर झाली. त्यापैकीं १९०० सालीं पाण्याखालीं भिजणारीं जमीन ३५·२७ द. ल. एकर म्हणजे १७ टक्के होती; ती १९३३—३४ सालीं ४८·३६ दशलक्ष एकर म्हणजे २१ टक्के झाली. पाण्याचा पुरवठा झाला कीं पीक जास्त येतें, चांगल्या तऱ्हेचें येतें, दुसऱ्या प्रकारचेंहि काढतां येतें. खालील आंकडे बोधप्रद आहेत.

| काळ | खाद्य धान्य | | गळिताचें धान्य | | व्यापारी पिकें | |
|---|---|---|---|---|---|---|
| | लागवड एकर* | निर्देशांक | लागवड एकर* | निर्देशांक | लागवड एकर* | निर्देशांक |
| १९००–०१ ते १९०९–१० | १८८·१० | १०० | १३·३६ | १०० | १९·६७ | १०० |
| १९१०–११ ते १९१९–२० | १९९·५० | १०६ | १४·१९ | १०५ | १८·३६ | ९३ |
| १९२०–२१ ते १९२९–३० | २०२·७२ | १०८ | १२·११ | ९० | २०·०० | १०२ |
| १९३०–३१ ते १९३३–३४ | २०३·८८ | १०९ | १६·९५ | १२६ | २४·४० | १२४ |

* एकरांचे आंकडे दश लक्ष एकरांचे आहेत.

यावरून १९०० ते १९३३—३४ या मुदतींत खाण्याच्या धान्यांचें उत्पादन ९ टक्के व गळिताच्या धान्यांचें २६ टक्के वाढलें. व्यापारी पीक (कापूस, ज्यूट) २४ टक्के बाद झाल्याचें दिसून येतें. धान्याच्या बाबतींत असें आढळेल कीं, १९००सालीं जें भाताचें उत्पन्न होतें तें शेंकडा ११ नें वाढलें. जर ब्रह्मदेश वगळला तर मात्र कमी झालें. गहूं १९ टक्के वाढला, हरबरा ९ टक्के, तूर ४ टक्के. कडबा व गवताकडे १९०० सालीं ३·०३द.ल. एकर जमीन होती ती १९३३—३४ सालीं १०·२० द. ल. एकर झाली. या एकंदर माहितीवरून जमीन जरी हालवितां येत नसली, तिचें उत्पादनाचें दृष्टीनें स्थलांतर होत नसलें तरी रूपांतर कसें होत जातें हें दिसून येईल. तथापि माणसानें कांहीं जरी केलें तरी उष्ण प्रदेशांतील हवा तो थंड करूं शकत नाहीं अगर थंड प्रदेशांतील हवा उष्ण करूं शकत नाहीं. निसर्गानें ज्या न बदलणाऱ्या मर्यादा घातल्या आहेत त्यांवरच मनुष्य फक्त जय मिळवू शकत नाहीं. अन्य ठिकाणीं निसर्गाला हलविण्याचें काम पुरातन कालापासून चालू आहे.

मनुष्य आपल्या प्रयत्नानें जमिनीचें स्वरूप बदलूं शकतो हें तर उघड आहे. तथापि कांहीं जमिनी ह्या विशिष्ट उपयोगालाच ठेवल्या तरच त्यांचा उपयोग होतो. डोंगराळ जमिनी गायरानांकरितां, कांहीं जमिनी जंगलांकरितां, ठेवणेंच ठीक होतें. त्यांच्यावर खर्च करून त्यांत पीक काढणें म्हणजे वेड्या महंमद तघलखाचें अनुकरण करण्यासारखें होईल. जेथें पाऊस कमी तेथें शेळ्यामेंढ्यांचें कळप वाढविणेंच योग्य. तथापि अशा स्वरूपाच्या जमिनी सोडल्या तर बाकीच्या जमिनींचा उपयोग निरनिराळ्या प्रकारांनीं करतां येतो व उत्पादनसृष्टींत तो होत असतो. मुंबई शहर ज्या जागीं वसलें आहे त्या ठिकाणीं कितीतरी बारके ओढे, लहान खाड्या होत्या. आतां तर समुद्र हटवून, भर घालून जमीन तयार करून नवीन वस्ती केली आहे. आसपासची दलदलीची जमीन भरून काढावयाची व शहराचा विस्तार वाढवावयाचा, हा तर क्रम सर्वत्र चालू आहे. पूर्वीं पाण्याच्या व संरक्षणाच्या सोयी पाहून शहरें वसवीत, आतां शहरें वसलीं म्हणजे संरक्षण व पाणीपुरवठा तेथें येतो. मुंबईस ४० मैलांवरून पाणी येतें. वस्तीकरितां जमिनीचें स्वरूप मनुष्य जसें पाहिजे तसें बदलून घेत आहे. पुण्याच्या नदीपलीकडील शेत जमिनींतील निवडुंगांचें अधिराज्य जाऊन तेथें आज रम्य 'शिवाजीनगर' दिसत आहे. सर्व जगांत मोठा समजला जाणारा 'फोर्ड'चा कारखाना आज ज्या जागीं आहे, ती सर्व जागा दलदलीची होती. त्यावर काँक्रीटचे ठोकळे टाकून, मनुष्याचा निसर्गावर जय आहे याची साक्ष कायम ठेवण्याकरितांच कीं काय, त्यानें जमीन तयार करून कारखाना उभारला. कोणत्या उपयोगाला

जमीन आणावयाची हें योजकाचें काम आहे. निसर्गाच्या न बदलणाऱ्या मर्यादा वगळून मनुष्य काय वाटेल तें करूं शकतो. तथापि हें जमिनीचें रूपांतर करणें म्हणजे त्यांत श्रम करावे लागतात, भांडवल खर्च करावे लागतें व कांहीं वेळां उत्पादन हातीं येईपर्यंत थांबावेंहि लागतें. उदा०, रबराची लागवड, संत्र्याची लागवड वगैरेचें उत्पन्न हातीं येण्यास कालावधि लागतो.

आतांपर्यंत जमीन या उत्पादनघटकाचा थोडा विचार केला; आतां उत्पादन-घटकांपैकीं तिसरा प्रकार भांडवल, याचा याच दृष्टीनें थोडा विचार करूं. भांडवल म्हणजे उत्पादनसंच, कारखान्यांच्या इमारती, उत्पादनाच्या अवस्थेंत असलेला कच्चा अगर अर्धवट तयार माल वगैरे. स्थलांतर व रूपांतराच्या दृष्टीनें विचार करतां, यंत्रें, सर्व सामग्री इमारतीसुद्धां पाडून, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणें शक्य असलें तरी तें नेण्यांत येणारें नुकसान व पुन्हां जुळवून आणण्यांत होणारा खर्च, हे लक्षांत घेतां योजक ह्या तऱ्हेनें क्वचितच वागेल. इमारत मोडली म्हणजे त्यांतील दगड, माती, विटा, या क्षुद्र किंमतीच्या होतात. शिवाय इमारत बांधते वेळीं ती अमुक तऱ्हेनें तिचा उपयोग व्हावा अशाच तऱ्हेनें बांधलेली असते. तेव्हां त्या दृष्टीनें दारें, छप्पर, खिडक्या, अन्य सोयी केलेल्या असतात. त्यांचा उपयोग दुसऱ्या तऱ्हेच्या इमारतीस करणें नुकसानीचें होतें. इमारती कायम ठेवून यंत्रें बदलणें, अगर इमारती, यंत्रे, कायम ठेवून उत्पादनाचें स्वरूप बदलणें हेंहि होत असतें. कांहीं यंत्रें अशा स्वरूपाचीं असतात कीं, थोडा फरक केल्याबरोबर नवीन स्वरूपाचें उत्पादन त्यायोगें होऊं शकतें. जर्मनीनें चालू युद्धापूर्वी याच नीतीचा अवलंब केला होता व वेळ आल्याबरोबर प्रत्येक धंद्यांतील उत्पादनसंच ( Plant ) दारूगोळ्याचें उत्पादन करूं लागला. हें रूपांतर जर्मनीनें उत्पादनसंचांत नाममात्र फरक करून केला. जेथें शिवण्याचीं यंत्रें तयार होत, तेथें शरीराचे तुकडे तुकडे करणारे तोफेचे गोळे तयार होऊं लागले. जेथें शक्तिवर्धक आसवें तयार होत होतीं, त्या कारखान्यांतून घेरी आणणारे, बेशुद्ध करणारे विषारी वायु तयार होऊं लागले. तात्पर्य जो उत्पादनसंच, मनुष्यमात्राच्या सुखाकरितां, सुखसंवर्धनाकरितां, जीवनाकरितां काम करीत होता तो आतां मनुष्याच्या वधाचें प्रमाण जास्तींत जास्त ज्यायोगें होईल, अशा शस्त्रास्त्रांचें काम करूं लागला. जीवनाचा सुखविस्तार हा उत्पादनाचा हेतु जाऊन, मृत्यूचा अंधार पसरविणें, हेंच कार्य सुरू झालें. सर्व युध्यमान राष्ट्रांतील उत्पादनसंच, असाच होत गेला. तात्पर्य हल्लींच्या युगांतील भांडवल, उत्पादनसंच वगैरे यांत तंत्राच्या दृष्टीनें इतकी प्रगति झाली आहे कीं, त्यांचा उपयोग, फार थोड्या

फरकानें या उत्पादनांतून त्या उत्पादनांत करतां येतो. हें रूपांतर आपल्याला सर्वत्र दिसत आहे.

कायम स्वरूपी भांडवल, यंत्रे, इमारती वगैरे युध्यमान परिस्थिति जर सोडून दिली तर, साधारणतः ज्या विशिष्ट उत्पादनासाठीं योजलें असेल, त्याकरितांच त्याचा उपयोग करण्यांत येतो; तें जमलें नाहीं तर अडगळीचे किंमतीनेंहि प्रसंगविशेषीं योजक तें काढून टाकतों. याचा अर्थ त्या उत्पादनसंचापासून रूपांतर करून, नवीन उत्पादन करतां येणार नाहीं असा नाहीं. तीच इमारत, तींच यंत्रें, तोच संच, दुसऱ्या कित्येक तत्सम उत्पादनाचे उपयोगीं पडूं शकतो. तेंच सांचे बारीक अगर जाड कापड काढूं शकतात, त्याच चात्या बारीक अगर जाड सूत काढूं शकतात; तींच दाबणारीं यंत्रें निरनिराळीं गळितें गाळूं शकतात. त्याच यंत्रांवर पीठ, चुना, थोडा फरक करून मळला जातो. इमारतीचाहि उपयोग अन्य रीतीनें होऊं शकतो. ज्या जागेंत बँक होती तीच जागा हॉटेलाकरितांहि उपयोगी पडते. किरकोळ वाणी दुकानहि तेथें निघूं शकतें. तात्पर्य, रूपांतरानें त्या भांडवलस्वरूपी घटकांचा उपयोग होऊं शकतो व योजक तो करीतहि असतो. पण ज्या विशिष्ट उत्पादनाकरितां सर्व संच जमविला असेल, त्याच्याकरितां तो कायम ठेवण्याचा त्याचा प्रयत्न प्रथम, नच जमलें तर रूपांतर, तेंहि न जमलें तर, अडगळीच्या भावानें विकून मोकळें होणें असा क्रम असतो. तात्पर्य भांडवलस्वरूपी घटकांचें रूपांतर होत असतें, हें जसें कायम भांडवलाच्या बाबतींत आपण पाहिलें तीच गोष्ट कच्चा माल व अर्धवट तयार झालेल्या मालाच्या बाबतींत अनुभवास येते. जरी मुख्य यंत्र एकाच तऱ्हेचें उत्पादन करीत असलें तरी, त्या उत्पादनाचा उपयोग अनेक प्रकारांनीं करतां येतो. समजा, कारखान्यांतील काहील फक्त लोखंड तयार करते, त्यावर दुसरें कांहीं उत्पादन होणार नाहीं. पण लोखंडापासून मागणीप्रमाणें खिळ्यांपासून रेल्वेरूळांपर्यंत, जें वाटेल तें योजक, तयार करून घेईल. घराला लागणाऱ्या गर्डर्सपासून, जहाजाला लागणाऱ्या जाड पत्र्यापर्यंत वाटेल त्या प्रकारें तो माल काढूं शकेल. मोठ्या प्रमाणावर ऊंस तयार झाला तर त्यापासून गूळ काढील, वाटेल तर साखर काढील. जशी मागणी येईल, त्याप्रमाणें रसाचें रूपांतर तो गुळांत अगर साखरेंत करील. योजक विजेचा पुरवठा, नागरिकांना करील तसाच कारखान्यांना करील. वाहतुकीचीं साधनें म्हणजे रेल्वे, मोटारी, जहाजें तयार झालीं, कीं योजक फायदेशीर असेल त्याचीच वाहतूक करील. तात्पर्य, कच्चा माल व अर्धवट तयार झालेलें उत्पादन यांचें रूपांतर करून योजक आपल्याला पाहिजेल तसें उत्पादन करून घेऊं शकतो. कायम भांडवलाचें

रूपांतर करतां येतें, त्याचप्रमाणें या चालू भांडवलाचेंहि करतां येतें. किंबहुना कायम भांडवलाचें मूळ स्वरूप कायम ठेवून त्याच्या उत्पादनाचा निरनिराळ्या रीतीनें उपयोग करून, निरनिराळें उत्पादनहि करतां येतें. शिवाय कालांतरानें कायम भांडवलहि झिजत जात असतें. त्याच्या जागीं निराळ्या स्वरूपाचें भांडवल घालणें जरूर वाटल्यास, सोपें असतें. झीज भरून निघावी म्हणून योजक आपल्या हिशेबानें जमाखर्चांत कांहीं रक्कम ठेवीत असतो आणि ही रक्कम गुंतलेली नसल्यामुळें पहिलीं यंत्रें निकामीं झालीं कीं, तीं नवीन पद्धतीचीं घेऊन त्यांचा उपयोग करणें त्यास परवडतें. यंत्रें, इमारती पुष्कळ काळ टिकतात हें खरें. पण त्यायोगें त्यास वरील प्रकारें वागण्यास हरकत येतें असें नाहीं. त्याचप्रमाणें जर समाजांतील भांडवल वाढलें तर तें सुद्धां धंद्यांत येतें, व ज्या धंद्याला तेजी आहे, त्यांत भांडवलाची भर पडते. लोकसंख्या वाढली म्हणजे मजुरांचा पुरवठा वाढतो हें आपण पाहिलेंच आहे. त्याचप्रमाणें समाजांत भांडवल वाढलें म्हणजे तें धंद्यांत येतेंच. चालू भांडवल म्हणजे कच्चा माल, अर्धवट तयार झालेला माल, याचा पुरवठाहि चालूच असतो. माल पक्का होऊन बाजारांत जातो, तसा नवीन कचा माल तयार होऊन उत्पादनाकडे येतच असतो. तात्पर्य, भांडवल सर्वस्वरूपी आहे, तें सारखें हालचाल करीत असतें. रूपांतरानें, स्थलांतरानें योजक त्याचा उत्पादनाकडे उपयोग करीत असतो.

आतांपर्यंत या तीन मुख्य घटकांचा विचार केला. त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, हल्लींच्या जगांतील हा उत्पादनाचा व्यवहार अगदीं २+२=४ या गणिती स्वरूपाचा नाहीं; त्यांत परिस्थितीप्रमाणें बदल होत जातो. उत्पादनतंत्र हें लवचिक असून कसें बदललें जातें हें वरील विवेचनावरून लक्षांत आलें आहे. भांडवलशाहींत आर्थिक परिस्थितींत, व्यवहारांत बदल झाल्याबरोबर त्याचा परिणाम बाजारांवर, भावयंत्रांवर होतो. वस्तूंच्या किंमती कमीजास्ती होतात व त्यांच्या अनुमानानें योजक हें आपलें उत्पादनाचें तारूं हांकीत असतात. कोणतें उत्पादन वाढवावें, कोणतें कमी करावें, हें ते भावयंत्राकडे, बाजाराकडे, पाहून ठरवीत असतात. जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांतून कांहीं उद्योगधंदे कमी होत आहेत तर कांहीं नवीन नवीन, मोटार, विमाने वगैरेंचे अस्तित्वांत येत आहेत, एकंदरीनें ते वाढत आहेत, त्यांचें उत्पादन मोठ्या प्रमाणांत चालू आहे. जगांतील उत्पादनाचा प्रवाह कधीं जोरानें, कधीं हळू, पण अखंड चालू आहे. येणाऱ्या अडचणी, उपस्थित झालेले अडथळे, यांना दूर सारून सांधमोड करून बदलत जाणाऱ्या परिस्थितीबरोबर उत्पादनाचें पाऊलहि परिस्थितीला अनुरूप पडेल असें प्रयत्न चाललेले असतात. उत्पादनतंत्र

बदलून, उत्पादनसामग्री बदलून, रूपांतरानें, स्थलांतरानें, जें जरूर अर्थात् नफ्याचें दृष्टीनें, तें व तसें उत्पादन कमीअधिक वेळांत जुळवून आणण्याची पराकाष्ठा केली जात असते. वाढती लोकसंख्या व वाढतें भांडवल जेथें आहे तेथें ही जुळवणूक लवकर जमते. अडचण फक्त माणसांच्याच बाबतींत येते. कारण मजूर, कारागीर हे सामान्यतः आपलें गांव सोडून जाण्यास तयार नसतात; जेव्हां सर्व व्यापार मंदावतो, मालाला मागणी नाहींशी होते तेव्हां कित्येक उद्योगधंद्यांत तर बेकारीच माजते; आणि त्यावेळीं त्या त्या धंद्यांतील कारागिरांची, मजुरांची कुचंबणा साहजीकच जास्त होते. ते असतात तेथें काम नाहीं, दुसरीकडे जाण्यास नाखूष ! दुसरीकडे काम असतेंच असें नाहीं. तथापि हा मंदाईचा काळ सोडला तर सर्वसामान्यतः वर लिहिल्याप्रमाणें भांडवलशाही उत्पादनांत घडत असतें.

---

# १४. मक्तेदारी ( Monopoly )

मागें उत्पादनाचा विचार करतांना, मक्तेबाजी असली म्हणजे बाजारावर काय परिणाम होतो हें नुसतें नमूद केलें होतें. आतां मक्तेबाजी याचा जरा जास्त विचार करूं. सर्वत्र मोकळीक, बाजारांत देवघेव करण्यास कोणालाच आठकाठीं नाहीं, मोकळा बाजार, या शब्दप्रयोगांनीं जी कल्पना येते, तिच्या विरुद्ध कल्पना मक्तेबाजी या शब्दप्रयोगानें येते. योजक काय करीत असतो याचा विचार केला, म्हणजे मक्ते-बाजी कशी असते याची कल्पना चांगली समजेल. योजक जेव्हां एकंदर उत्पादनाचा, मग कोणत्याहि वस्तूचें उत्पादन असो, अगदीं थोडा हिस्सा उत्पादन करीत असतो त्यावेळीं त्याला बाजारांतील त्या वस्तूंच्या किंमतीवर कांहीं परिणाम करतां येत नाहीं. समजा, पुण्यांत एक लाख शेर दूध रोज खपतें, त्यापैकीं १००० शेर एका डेअरींतून येतें. या हजार शेरांचे पुरवठ्यानें अगर न पुरवठ्यानें, एकंदर दुधाचे किंमतीवर विशेष परिणाम होणार नाहीं. उलट बाजारांत जी किंमत असेल त्याप्रमाणेंच या योजकाला—डेअरीवाल्याला—आपला माल विकावा लागेल. त्यानें जास्त किंमत लावली तर त्याचे जवळून कोणी दूध घेणार नाहीं, कारण दुधाचा पुरवठा करणारे शेंकडों आहेत. गिऱ्हाईक तिकडे जाईल आणि आपली मागणी पुरी करून घेईल. उलट त्यानें किंमत—भाव कमी लावला तरी, जास्तींत जास्त १००० शेर दूध तो कमी भावानें विकील; त्यालाच प्राप्ती कमी होईल, बाकीच्या दुधाचा भाव कमी होणार नाहीं. कारण कमी भावानें विकलें जाणारें दूधच १००० शेरांपेक्षां जास्त नाहीं म्हणून भावहि कमी होणार नाहीं, फक्त त्याचेंच एकट्याचें नुकसान होईल. याच्या उलट जेवढे दूधवाले आहेत त्या सर्वांच्या दुधाचा पुरवठा कमीजास्त झाल्यास त्याचा किंमतीवर परिणाम होईल हें आपण मागें पाहिलें आहे. पण एकटादुकटा अल्प प्रमाणावर उत्पादन करणारा योजक, किंमतीवर कांहीं परिणाम करूं शकत नाहीं. आकाशांतील एक तारा असण्यानें अगर नसण्यानें, आकाशावर कांहीं परिणाम होत नाहीं. पण समजा, योजक त्या वस्तूचें उत्पादन सर्वस्वीं एकटाच करीत असेल

अगर एकंदर उत्पादनापैकीं फार मोठा हिस्सा तो करीत असेल, तर त्याचा बाजारावर काय परिणाम होईल ? जर त्या वस्तूंचा सर्वस्वीं तोच एकमेव उत्पादन करणारा असला तर, त्या बाबतींत तो पूर्णपणें मक्तेबाजी गाजवूं शकेल. अर्थात् पुष्कळ वेळां वस्तूवस्तूंत फरक असूनसुद्धां एका दृष्टीनें त्या एकच असतात. त्यांच्या बाबतींत थोडें निराळें दृश्य दिसेल. उदा०, लिप्टनचा चहा. या चहाचा योजक एकच, या तऱ्हेचा चहा दुसरा कोणी उत्पादन करीत नाहीं. तथापि चहाचहांत अनेक प्रकार असल्यामुळें अशा वस्तूंच्या प्रकारांत पूर्ण मक्तेबाजी चालत नसते. समजा, सर्व चहांच्या प्रकारांचें उत्पादन दुर्दैवानें एकाच योजकाकडे आलें; त्यामुळें चहांत त्याला मक्तेबाजी मिळाली, तरी त्याला चहांत मक्तेबाजी गाजवतां येणार नाहीं. कारण पेय म्हणून चहाला स्पर्धा करणारी कॉफी आहेच. तसेंच पाहिलें तर प्रत्येक वस्तु व प्रत्येक होणारी सोय, दुसऱ्या वस्तूंशीं व सोयींशीं स्पर्धाच करीत असते. कारण गिऱ्हाईक या अनेक वस्तूंपैकीं कोणत्या घ्याव्यात, याचा विचार करीत असतोच. त्या दृष्टीनें शंभर टक्के मक्तेबाजी कोठेंच नाहीं. पण हें तात्त्विक झालें; व्यवहारांत कित्येक बाबतींत उत्पादनांत जवळजवळ पूर्ण मक्तेबाजी झालेली आढळून येते.

प्रत्यक्ष व्यवहारांत मक्तेबाजीची स्थिति मोठ्या प्रमाणावर दिसते. कित्येक योजक इतक्या प्रमाणावर एखाद्या वस्तूंचें उत्पादन करतात कीं, त्याचा परिणाम किंमतीवर होतो. ही गोष्ट योजक जाणून असतात व ती लक्षांत घेऊनच उत्पादनाचे दृष्टीनें फायदेशीर होईल येवढें प्रमाण काढीत असतात. आपलें उत्पादन कोणतें हें लोकांस कळावें म्हणून सर्वच योजक आपापल्या निशाण्या, शिक्के, लेबलें, त्या त्या वस्तूंवर दाखवीत असतात. यामुळें गिऱ्हाइकालाहि कोणाचा माल आहे हें नक्की कळतें. प्रत्येक योजक आपल्या मालाची किंमत निश्चित करीत असतो. आपल्याशीं स्पर्धा करणाऱ्या कंपनीच्या अगर योजकाच्या मालापेक्षां किंमत जास्त लाविली तर विक्री कमी होईल याची जाणीव त्याला असते. तथापि कांहीं गिऱ्हाईक एका विशिष्ट मालाचें, म्हणजे विशिष्ट कंपनीच्या योजकाच्या मालाचें शौकीन असतें व त्यामुळें कांहीं वेळां जास्त किंमत देऊनसुद्धां तो माल पसंत करतें. जसें, "गोल्डफ्लेक सिगारेट्स," "पीअर्स साबू" वगैरे. कारण गिऱ्हाइकांचे दृष्टीनें सर्व सिगारेट्स सारख्या नसतात. तसेंच चहा पिणाऱ्या इसमास अगदीं उत्कृष्ट कॉफी दिली तरी त्याचें समाधान होणार नाहीं. चहाबदली कॉफी चालणार नाहीं. चहाला त्याच्या दृष्टीनें बदलीं नाहींच. आणि या दृष्टीनें 'चहा', 'गोल्डफ्लेक' हें एक मक्तेबाजीचें, कमी प्रमाणाचें कां होईना उदाहरण झालें. जास्त किंमत देऊन गिऱ्हाईक तोच माल घेतें, तत्सम

दुसरा घेत नाहीं; याचाच अर्थ एक प्रकारची मक्तेबाजीच. याच न्यायानें एखाद्या डॉक्टराला, वकिलाला लोक जास्त फी देतात, कारण दुसरा डॉक्टर अगर वकील त्यांना नको असतो, तोच पाहिजे असतो. त्याच दृष्टीनें कांहीं मासिकें जास्त वर्गणी देऊन लोक वाचतात. त्याच न्यायानें कांहीं कंपन्यांचे चित्रपट जास्त दर असून लोक पाहतात. तेथें, या मासिकाऐवजीं तें, अगर या चित्रपटाऐवजीं तो, असा प्रश्नच नसतो; तेंच मासिक तोच चित्रपट पाहिजे असतो. हाहि एक मक्तेबाजीचा अल्प प्रमाणांत कां होईना नमुना आहे. लांब नानाचे पेठेंतून धान्य आणण्यापेक्षां शेजारच्या कोपऱ्यावरील दुकानांत जास्त किंमत देऊन गिऱ्हाईक माल घेतें हासुद्धां त्याच प्रकारचा नमुना आहे. त्या वस्तींत दुकान काढून गिऱ्हाइकी घेणें याचा अर्थहि तोच. हडपसरचे बाजारांत भाजी स्वस्त मिळते पण तेथून जाऊन आणावयाची कोणी? म्हणून मंडईत गिऱ्हाईक भाजी घेतें व जास्त किंमत देतें. खेडेगांवीं सरपण स्वस्त, पण तें पुणें येथें आणण्याचा खर्च लक्षांत घेतां, कोणता गिऱ्हाईक खेडेगांवांतून सरपण आणण्याचा उपद्व्याप करतो? म्हणूनच वखारवाले जास्त भावानें माल विकीत असतात. तात्पर्य, प्रत्येक व्यवहारांत सूक्ष्म प्रमाणांत, अपूर्ण अवस्थेंत मक्तेबाजी चालूच असते.

तसाच विचार केला तर, प्रत्येक वस्तूचें उत्पादन करणारा हा दुसऱ्या वस्तूंचें उत्पादन करणाराशीं स्पर्धाच करीत असतो. या न्यायानें संपूर्ण १०० टक्के मक्तेबाजी असणेंच शक्य नाहीं. हें जरी खरें मानलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत काय चालतें हें थोडेसें आपण वर पाहिलें आहे. आपल्याला विचार करावयाचा आहे तो अशा स्वरूपाच्या मक्तेबाजीसंबंधीं कीं, ज्या उत्पादनांत ती आहे, त्याला स्पर्धा करणारा कोणी नाहीं अगर तत्सम उत्पादन अस्तित्वांत नाहीं. जगांतील भांडवलशाही राष्ट्रांत कित्येक धंदे असे आहेत कीं, त्यांचें उत्पादन जवळ जवळ मक्तेबाजीच्या स्वरूपाचें झालेलें आहे. उदा०, 'ब्राझिल कॉफी संस्था' या संस्थेच्या अंमलाखालीं जगांतील बहुतेक कॉफी तयार होते. त्याचप्रमाणें इंग्लंडमध्यें 'मेसर्स कोटस्' या कंपनीचे हातांत शिवण्याचीं यंत्रें तयार करण्याची सर्व सत्ता आहे. अशीं मक्तेबाजीची पुष्कळ उदाहरणें देतां येतील. आपल्याला अपूर्ण व पूर्ण अशा दोन्ही मक्तेबाजीचें स्वरूप समजून घ्यावयाचें आहे.

समजा, 'अ' हा एका वस्तूच्या उत्पादनाचा एकमेव मक्तेदार असून त्याला जास्तींत जास्त नफा काढावयाचा आहे. समजा कीं, धंद्यांतील भांडवलहि त्याचेंच असून त्याची किंमत पण निश्चित आहे. अशा स्थितींत वाटेल तो भाव त्या वस्तूला

त्याला लावतां येईल, त्याला वाटेल तेवढें उत्पादन, जसें लागेल तसें, काढतां येईल. जर भाव कमी ठेवला तर विक्री जास्त होईल. भाव जास्त ठेवला तर त्या मानानें विक्री कमी होईल. तथापि वाटेल तो भाव ठेवून, वाटेल तितकें तो खपवूं म्हणेल तर तें होणार नाहीं. कारण कोणत्या एका भावांत काय मागणी राहील हें मागणीवर अवलंबून आहे, त्याच्या इच्छेवर नाहीं. गिऱ्हाइकांची सोय, इच्छा, ऐपत वगैरे गोष्टींनीं उत्पन्न झालेल्या परिस्थितीवर मागणी अवलंबून राहणार, ही गोष्ट नेहमीं त्याच्यापुढें दत्त म्हणून उभी असते. त्याला तिचा विचार करावाच लागतो. किंमत कमी केली तर मागणी वाढेल ही गोष्ट खरी; पण विवक्षित भावांत इतकीच मागणी कां, हें त्याच्यावर अवलंबून नाहीं. तें वर लिहिल्याप्रमाणें परिस्थितीवर अवलंबून आहे. किंमत व तत्सम वस्तूंचा पुरवठा यांवर त्या वस्तूची मागणी कमीजास्त होत असते. कारण मक्तेदारानें जर किंमत वाढविली व त्या किंमतीपेक्षां थोडया कमी किंमतीस, त्या वस्तूच्या ऐवजीं दुसरी वस्तु घेऊन गिऱ्हाइकाची गरज भागत असेल तर, गिऱ्हाईक तिकडे वळेल. पुणें ते लोणावळा रेल्वेनें जातां येतें, ही मक्तेबाजी आहे. तथापि वाटेल तो दर ठेवून कंपनीला चालणार नाहीं--सरकार मालक आहे म्हणून, सरकारलाहि चालणार नाहीं. कारण त्या दरापेक्षां कमी दरानें मोटारी उतारूंना नेतील. म्हणून रेल्वेचें गिऱ्हाईक कमीजास्त होत जाईल. या बाबतींत आपल्या भाषेंत सांगावयाचें तर मागणी लवचिक आहे. या सोयीला स्पर्धा करणारी तत्सम सोय आहे; व त्याबद्दल किंमत जवळपास तितकीच किंवा कमीच द्यावी लागत असेल तर, मक्तेदारांनासुद्धां त्यांच्या इच्छेप्रमाणें किंमत लावतां येणार नाहीं. कारण मागणीवर ताबडतोब परिणाम होईल म्हणून जास्तींत जास्त नफा करावयाचा ही गोष्ट सर्वस्वीं बाजाराचे परिस्थितीवर म्हणजे मागणीचे परिस्थितीवर अवलंबून राहील. मागें आपण पाहिलें आहे कीं, ज्या मर्यादेपर्यंत, त्याच्या वाढत्या उत्पादनाचा खर्च, वाढत्या उत्पादनाच्या उत्पन्नाच्या मेळांत आहे, तोंपर्यंत जास्तींत जास्त नफा मिळणें शक्य होतें. समजा, त्याला कांहींहि उत्पादनखर्च येत नाहीं तर, त्याचा माल जेव्हां खपेल तेव्हांच त्याला जास्तींत जास्त नफा मिळेल. पण त्याच्या खपालाहि मर्यादा आहे. कारण गिऱ्हाईक तरी घेऊन किती घेणार ? घेण्यालाहि मर्यादा आहे, म्हणून तो जर उत्पादन खपापेक्षां जास्त वाढवूं लागला तर तें खपणार नाहीं व अर्थात् प्राप्तींत भर पडणार नाहीं. म्हणून जितका खप तितकेंच उत्पादन केलें असतां जास्तींत जास्त नफा त्याला होईल. अर्थात् या उदाहरणांत त्याला उत्पादनखर्च शून्य धरला आहे. बोरघाटांत गाडी थांबली असतां करवंदें विकणारें बाया-पुरुष येतात, अर्थात् त्यांना करवंदें तोडण्यापलीकडे खर्च

नाहीं व उत्पादनखर्च नाहीं असें समजलें तरी हरकत नाहीं. जेवढें खपत असेल तेवढेंच आणलें तर त्यांना जास्तींत जास्त नफा होईल; पुष्कळ करवंदें आणली पण तीं खपलीं नाहींत तर कांहीं फायदा नाहीं. म्हणून जेवढें उत्पादन खपेल तेवढेंच काढण्यांत त्यांना जास्तींत जास्त प्राप्ती आहे. जरी एखाद्या वस्तूचें उत्पादन वाढलें तरी ती वस्तु घेण्यासाठीं गिऱ्हाईक किती खर्च करील याला मर्यादा असते, हें विसरतां कामा नये. या दृष्टीनें, त्या वस्तूची विक्री कांहीं मर्यादेपर्यंत वाढत जाईल व त्याबरोबर पुरवठा, उत्पादनहि वाढत जाईल. त्यानंतर मागणी कमी होत जाईल. विक्री वाढत असते त्यावेळीं मागणीचा विस्तार होत असतो व तिचा लवचिकपणा जास्त–जास्त दिसतो. कारण विक्री वाढते याचा अर्थ, पूर्वीं न घेणारे लोक ती वस्तु घेत आहेत असा झाला. पूर्वीं त्या वस्तूशिवाय पुष्कळ लोकांचें भागत होतें. एका दृष्टीनें ती अवश्यक नव्हती. आतां किंमतीचे फरकामुळें लोक घेऊं लागले, कारण त्या बाबतींत मागणी लवचिक कमीजास्त होणारी अशा स्वरूपाची होती म्हणूनच किंमत कमी झाल्याबरोबर विक्री वाढली. विक्रीची कमाल मर्यादा झाली कीं, साहजीकच त्याचा अर्थ असा होतो कीं, आतां ती वस्तु जास्त खपणें शक्य नाहीं. मागणीतला लवचिकपणा, जेवढी माया त्यांत होती तीं संपली म्हणून खलास झाला; आणखी या मर्यादेपलीकडे उत्पादन केलें तर त्यापासून उत्पन्न नाहीं, विक्री नाहीं; कारण आतां ती वस्तु घेईल असें गिऱ्हाईक नाहीं. मागणींतील लवचिकपणा संपला, तिची कमाल मर्यादा संपली या स्थितींत जें उत्पादन, जेवढें उत्पादन होतें, तेवढेंच केलें तर मक्तेदाराला जास्तींत जास्त फायदा होईल. अधिक उत्पादनाचें उत्पन्न शून्य, तेव्हां जास्त उत्पादन करणें, हें अयोग्य, अनावश्यक, बिननफ्याचें; या परिस्थितीचे मेळांतच कमाल नफा मक्तेदाराला होत असतो.

वरील विवेचनांत मक्तेदाराला उत्पादनखर्च पडत नाहीं, अशी परिस्थिति धरून विचार मांडला. आतां उत्पादनाला खर्च पडतो आणि तो नेहमींच पडतो अशी परिस्थिति असतांना, त्याला कमाल नफा केव्हां होईल याचा विचार करूं. जसजसें तो उत्पादन वाढवीत असतो, तसतशी त्याच्या खर्चांत भर पडत जाते. जास्त उत्पादनाचे विक्रीपासून येणाऱ्या उत्पन्नापेक्षां जास्त उत्पादनाचा खर्च कमी असेल अगर जास्त असेल अगर सारखा असेल; पण उत्पादन थोडें जरी जास्त झालें तरी एकंदर उत्पादनखर्च, वट उत्पादनखर्च वाढतच असतो. तो कांहीं कमी होत नाहीं, कायम राहत नाहीं. जास्त उत्पादन झालें कीं वट खर्चांत भर पडणारच. म्हणून जेव्हां अधिक उत्पादनाचें उत्पन्न, अधिक उत्पादनाचे खर्चापेक्षां जास्त असेल तेव्हांच

त्याच्या नफ्यांत भर पडेल. अधिक उत्पादनाचा खर्च कमी होत गेला व अधिक उत्पादनाचें उत्पन्न वाढत गेलें तरी त्यालाहि मर्यादा आहे. कारण एक बिंदु ( क्षण ) असा येईल कीं, त्यापुढें विक्री होणें शक्य नाहीं म्हणजे, एका नगानें अगर एका प्रमाणानें उत्पादनांत भर टाकून, जो अधिक खर्च होईल, तो त्या नगाच्या विक्रीतून येणाऱ्या उत्पन्नापेक्षां जास्त होईल म्हणजे अधिक उत्पादन करणें परवडणार नाहीं. याच स्थितींत, म्हणजे या वाढत्या खर्चाचा व वाढत्या उत्पन्नाचा मेळ बसतो आहे या स्थितींत, तो जें व जितकें उत्पादन करील, त्यापासूनच, तेवढ्यापासूनच, त्यास जास्तींत जास्त कमाल नफा मिळेल. हीच कमाल नफ्याची उत्पादनाच्या दृष्टीनें मर्यादा.

आपण ही गोष्ट उदाहरण घेऊन पाहूं. एक नांगराचा कारखानदार एकमेव नांगर काढणारा आहे असें समजूं. तो दर महिन्याला १००० नांगर काढतो व वाढ जी करतो ती १०० प्रमाणानें. खालील तक्त्यांत कशी वाढ झाली म्हणजे कसा खर्च वाढतो व प्राप्ती कशी वाढते हें दाखविलें आहे. खर्च व मागणी कशी राहील ही उदाहरणादाखल घेतली आहे.

| महिन्यांत उत्पादन | नगामागें किंमत रु. | एकंदर विक्री रु. | वाढलेल्या उ० विक्री | एकंदर खर्च रु. | वाढ. उ० खर्च | नफा रु. |
|---|---|---|---|---|---|---|
| १००० | ५० | ५०००० | — | ४६००० | १६०० | ४००० |
| ११०० | ४८ | ५२८०० | २८०० | ४७६०० | १६०० | ५२०० |
| १२०० | ४७ | ५६४०० | ३६०० | ४९२०० | १६०० | ७२०० |
| १३०० | ४५ | ५८५०० | २१०० | ५०८०० | १६०० | ७७०० |
| १४०० | ४३ | ६०२०० | १७०० | ५२४०० | १६०० | ७८०० |
| १५०० | ४१ | ६१५०० | १३०० | ५४००० | १६०० | ७५०० |
| १६०० | ३९ | ६२४०० | ९०० | ५५६०० | १६०० | ६८०० |
| १७०० | ३७ | ६२९०० | ५०० | ५७२०० | १६०० | ५७०० |
| १८०० | ३५ | ६३००० | १०० | ५८८०० | १६०० | ४२०० |
| १९०० | ३३ | ६२७०० | ३०० | ६०४०० | १६०० | २३०० |

त्याचा अधिक उत्पादनाचा खर्च दर—अधिक उत्पादनाचें प्रमाणामागें म्हणजे १०० नांगरामागें १६०० रु. आहे व तो कायम आहे. ज्या वेळेस तो दरमहा १४०० नांगर काढतो त्या वेळेस जास्त उत्पादनाचें उत्पन्न १७०० रु. येतें व खर्च १६०० रु. येतो म्हणजे जवळ जवळ मेळ बसतो. त्या वेळेस त्याची प्राप्ती जास्तींत

जास्त म्हणजे ७८०० रुपये आहे. जर त्यानें उत्पादन १५०० केलें तर खर्च १६०० रुपयांनीं वाढेल पण उत्पन्न फक्त १३०० रुपयांनींच वाढेल, म्हणजे एकंदर प्राप्ती ३०० रु. कमीच होईल; उलट जर उत्पादन १३०० केलें तर उत्पादन खर्च १६०० रु. कमी होईल, पण उत्पन्नहि १७०० रु.नीं कमी होईल, म्हणजे एकंदर प्राप्ती १०० रुपयांनीं कमी होईल म्हणून १४०० उत्पादन हें कमाल, नफा देणारें आहे. कारण त्या उत्पादनाचे मेळांत वाढत्या उत्पादनाचें उत्पन्न, वाढत्या उत्पादनाचे खर्चापेक्षां अधिक आहे म्हणून, १४०० नांगर काढणें हेंच कमाल फायदा देणारें, व त्या दृष्टीनें, १४०० ही उत्पादनाची मर्यादा होय.

वरील विवेचनांत मक्तेदार हा सर्व नग एकाच भावानें विकतो असें आपण मानलें. तो मक्तेदारच असल्यामुळें निरनिराळ्या ठिकाणच्या बाजारांत तसलें नग निरनिराळ्या भावानेंहि विकूं शकेल. उदा०, एखादा डॉक्टर श्रीमंत रोग्याला जास्त फी मागेल व घेईल, गरिबाला अगदीं त्याच गोष्टीसाठीं कमी घेईल. विजेच्या कंपन्या तर उघड उघड असा दुजाभाव करतात. खाजगी घरांत वीज घेतली तर दर जास्त, कारखान्यांत घेतली तर दर कमी, दुकानांत घेतली तर आणखी दर निराळा, कमिटीनें रस्त्यावरच्या रोषणाईला घेतली तर आणखी दर निराळा, हा अनुभव पुण्यांत आहे, सर्वत्र आहे! वास्तविक सर्वांना देण्यांत येणारी वीज ही सारखीच व तिचा उत्पादन खर्चहि सारखाच. कारखान्यांत पुरविण्यांत येणारी वीज कांहीं निराळी नाहीं, किंवा तिच्यासाठीं कंपनीला खर्च जास्त पडतो असें नाहीं. तसेंच रेल्वे कंपन्या निरनिराळ्या मालांना निरनिराळे दर, मणामागें अगर टनामागें, दर मैला-गणिक लावतात. त्याहिपेक्षां ढळढळीत उदाहरण म्हणजे एका देशांतून मक्तेदारानें दुसऱ्या देशांत माल नेऊन तेथें स्वदेशापेक्षां कमी भावानें विकावयाचा व अशा रीतीनें, तो तेथें कोंबण्याचा (Dumping) प्रयत्न करावयाचा. एका बाजारांत मात्र एकाच दरानें विकावयाचा. अशा रीतीनें निरनिराळे दर लावून तो निरनिराळ्या पेठा स्वतःच्या मालाला तयार करीत असतो. रेल्वे कंपनी निरनिराळे दर लावून निरनिराळ्या प्रकारांनीं गिऱ्हाइकी उत्पन्न करीत असते. एखादें गिऱ्हाईक तोच माल दोन ठिकाणीं दोन दरांनीं घेऊं शकेल. मात्र जेथें स्वस्त मिळेल तेथें घेऊन, जेथें महाग विकलें जात आहे, त्या ठिकाणीं नेऊन, वाहतुकीचा खर्च भागवून, फाय-देशीर होणार असेल तर, ही परिस्थिति मक्तेदार उत्पन्न करूं देणार नाहीं, कारण तसें झालें तर तो मक्तेदारच राहत नाहीं. त्याचाच माल त्यालाच स्पर्धा करावयास लागतो असें होतें. म्हणून हें सर्व लक्षांत ठेवूनच मक्तेदार निरनिराळ्या ठिकाणीं

निरनिराळे भाव त्याच उत्पादनाचें, मालाचे लावीत असतो. अशा तऱ्हेच्या मक्तेबाजीला धोरणी मक्तेबाजी म्हणू. कोणी व्यापारी चांगला पोषाख करून आलेल्या गिऱ्हाइकाला जास्त, अगर सामान्य पोषाख करून आलेल्याला कमी भाव, असा वागत नाहीं; कारण मग सर्व लोक त्याचा फायदा घेतील. कारण श्रीमंत स्वतः न जातां नोकरामार्फत माल आणवितील. सिनेमागृहांत फॅमिली सर्कलमध्यें कमी दरानें तिकीट मिळतें, मात्र बरोबर कोणी तरी 'ती' असली म्हणजे झालें. असें जाणून कित्येक वेळां या सवलतीचा दुरुपयोग होतोच कीं नाहीं. म्हणून पक्का व्यापारी, मक्तेदार, जेथें गिऱ्हाइकाला हा फायदा, म्हणजे निरनिराळ्या दरांचा फायदा घेणें शक्य आहे तेथें तो निराळे दर ठेवणारच नाहीं. जेथें गिऱ्हाइकाला हा फायदा घेणें अशक्य आहे, तेथेंच तो निरनिराळे दर ठेवील, म्हणजे आपलें मक्तेदारी स्वरूप कायम ठेवील. रेल्वेनें कोळसा व लोखंड यांच्या वाहतुकीचे दर निरनिराळे ठेवले आहेत. कारण कोळसा म्हणून लोखंड भरतां येणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें दुकानाला निराळा मीटर, खाजगी घराला निराळा मीटर कारखान्याला निराळा मीटर लावूनच, निरनिराळे दर वीज कंपनी वसूल करते. मक्तेदार परदेशांत माल कमी दरानें विकतो, कारण तेथें तो विकत घेऊन पुनः देशांत परत आणून विकणें कोणालाहि परवडणार नाहीं, अशी खात्री करून व त्याच हिशोबानें दर ठरवून, तो परदेशीं विक्री करीत असतो. निरनिराळ्या ठिकाणीं मागणीची परिस्थिति निरनिराळी असेल तर, निरनिराळे दर ठेवून विक्री करणें मक्तेदाराला फायद्याचें होतें; व प्रत्येक ठिकाणीं जास्त उत्पादनाची विक्री अगर उत्पन्न, जास्त उत्पादनाचे खर्चापेक्षां जास्त असेल अशा मेळांत त्यानें प्रत्येक ठिकाणीं किंमत—भाव ठेवला म्हणजे सीमागत उत्पन्न, सीमागत खर्चापेक्षां अधिक राहील; या हिशोबानें त्यानें भाव ठेवला म्हणजे प्रत्येक ठिकाणीं त्याला कमाल नफा मिळत जाईल व अशी परिस्थिति निर्माण होईल कीं, इकडून तिकडे माल धाडण्यांत अगर कोठलेंहि उत्पादन वाढविण्यांत फायदा वाटणार नाहीं. म्हणजे जेवढी सर्व ठिकाणची मागणी मिळून, भावाचा बदल करून वाढवितां येणें शक्य होतें, ती मर्यादा गांठली त्याच वेळेस त्यास कमाल फायदा मिळेल.

आपलें नांगराचें उदाहरण घेऊं. आपण पाहिलें कीं, १४०० नांगर काढले म्हणजे कमाल नफा त्याला मिळतो व भाव नांगरामागें ४३ रुपये ठेवावा लागतो. समजा, दोन ठिकाणीं त्यानें विक्री करावयाची ठरविलें. एका ठिकाणीं मागें सांगितल्याप्रमाणें १४०० नांगर तयार करून तो ४३ रु.चे भावानें विकतो. दुसऱ्या ठिकाणीं समजा,

| नग | किंमत रु. | एकंदर विक्री रु. | जास्त विक्री |
|---|---|---|---|
| १०० | ४० | ४००० | — |
| २०० | ३० | ६००० | २००० |
| ३०० | २६ | ७८०० | १८०० |
| ४०० | २१ | ८४०० | ६०० |

वरील कोष्टकाप्रमाणें परिस्थिति आहे. जास्त उत्पादनाचा खर्च एका प्रमाणामागें म्हणजे १०० नांगरांमागें पूर्वीइतकाच म्हणजे १६००रु. आहे. या बाजारांत २६ रु. चे भावानें विक्रीचे १८०० रु. जास्त आले. म्हणजे एकंदर १७०० नांगर (१४००+३००) उत्पादन करणें, त्याला दोन्ही बाजारांची स्थिति लक्षांत घेतां, जास्तींत जास्त फायदा देणारें होईल. कारण एकंदर नफा रु. ६०२००÷१४०० (नांगराची विक्री) + ७८००÷३०० (जास्त विक्री) – ५७२००÷१७०० (नांगरांचा उत्पादन खर्च)=रु. १०८०० रु. होईल; व ह्यापेक्षां जास्त नफा जास्त उत्पादन करून होणार नाहीं. कमाल नफ्याचे दृष्टीनें दोन्ही बाजारांचा विचार करून एके ठिकाणीं १४०० व दुसरे ठिकाणीं ३००, पहिले ठिकाणीं ४३ रु.चे भावानें व दुसऱ्या ठिकाणीं २६ रु.चे भावानें विकणें हेंच त्यानें केलें पाहिजे. अशी धोरणी मक्तेबाजी जर निरनिराळ्या ठिकाणच्या मागणीचें स्वरूप निरनिराळें असेल, तरच शक्य आहे एरव्हीं नाहीं. जर मागणी सर्वत्र सारख्याच स्वरूपाची असेल अगर कमी भाव करून जबाब न देणारी, न वाढणारी असेल, तर या भानगडींत मक्तेदार पडणार नाहीं. तसेंच ज्या ठिकाणीं मागणी लवचिक, किंमत कमी झाल्याबरोबर वाढणारी, तेथें कमी किंमतीनेंच विकणें जास्त फायदेशीर होतें. त्याचप्रमाणें परदेशीं माल स्वस्त दरानें विकणें म्हणजे स्वदेशीं तो महाग करणेंच आहे. कारण तो स्वदेशांत राहिला तर अधिक पुरवठ्यानें किंमत कमी झाली असती. जर वाढत्या उत्पादनाचा खर्च वाढत्या उत्पादनाच्या उत्पन्नापेक्षां जास्त होत गेला तर, स्वदेशांत तीच वस्तु आणखी महाग होईल. कारण खर्च भरून काढणें आहे. उलट तो वाढता खर्च वाढत्या उत्पन्नाचे मानानें कमी होत गेला तर, स्वदेशांतसुद्धां भाव कमी होईल.

येथपर्यंतच्या विवेचनावरून कोणी असें म्हणेल कीं, मक्तेदार हा एक सुलतानच असून कांहीं मर्यादा सोडल्या तर, उत्पादनसृष्टींत तो वाटेल तें करूं शकेल असें दिसतें. मग आपण जें आतांपर्यंत पाहिलें कीं, गिऱ्हाईक—उपभोगी गिऱ्हाईक, हा उत्पादनसृष्टीचा नियंता, राजा, हें खोटें झालें! या शंकेचा आपण विचार करूं. मक्तेदारानें

कांहीं जरी केलें तरी त्याला गिऱ्हाइकाला विवक्षित भावांत, इच्छेपेक्षां जास्त घेण्यास लावणें शक्य नाहीं. समजा, मक्तेदार योजकानें एक भाव लावला, गिऱ्हाईक एकंदर विचार करून कांहीं माल घेईल. त्यापेक्षां जास्त माल योजकाजवळ आहे, पण गिऱ्हाईक घेत नाहीं. घेणें न घेणें हें सर्वस्वीं गिऱ्हाइकांवर—उपभोगींवर अवलंबून आहे. जर मक्तेदारानें खुशामत केली म्हणजेच किंमत कमी केली तर, माल जास्त खपेल. उलट मक्तेदारानें जास्त केल्यास गिऱ्हाईक घेणार नाहीं. त्यालाच उत्पादन कमी करावें लगेल. मक्तेदाराचा अधिकार उत्पादनावर, पुरवठ्यावर आहे, कारण तो कमी जास्त करण्याचें त्याच्या हातांत आहे. पण अमूक किंमतींत गिऱ्हाइकानें मी म्हणेन तेवढा माल घेतलाच पाहिजे, तर तें चालणार नाहीं. तो रागावून उत्पादन कमी करील, त्यालाच फायदा कमी होईल. तेली रुसला तर त्यालाच अंधारांत बसावें लागेल. पण जास्तींत जास्त फायदा हा त्याचा हेतु असल्यामुळें, गिऱ्हाईकाचा अनुनय करणें, खुशामत करणें, अर्थात् भाव कमी करून, हें त्याला अवश्यक होतें; म्हणून मक्तेबाजी अगदीं शंभर टक्के असूं शकत नाहीं. व जी उत्पन्न होते तिला कांहीं मर्यादा असतात हें उघड आहे. मात्र त्या मर्यादेच्या आंत त्याला गिऱ्हाइकाला लुबाडतां येतें, हेंहि खरें. कारण प्रत्यक्ष व्यवहारांत तसा अनुभव मिळतो. जर मक्तेबाजी नसती, उत्पादन कोणीहि करावें व करणारेहि पुष्कळ असते तर, उत्पादनाचा खर्च व उत्पादनाचें उत्पन्न, यांचा मेळ बसेल, ते जवळजवळ येतील, अशा रीतीनें बाजारभाव राहील. कारण अधिक उत्पादन करणें, कोणाला परवडणार नाहीं, कारण त्यापासून येणारी विक्री अगर उत्पन्न, हें अधिक होणाऱ्या खर्चापेक्षां कमी असणार. तात्पर्य, त्या धंद्यांत जास्तींत जास्त प्राप्ती होण्याची मर्यादा उत्पादनानें गांठली. म्हणून धंद्यांतील उत्पादन कोणी वाढवणार नाहीं व बाहेरचें कोणी या स्थितींत येणार नाहीं. पण मक्तेबाजी असली म्हणजे मक्तेदाराला जर खर्चाचे मानानें परवडलें नाहीं तर, तो पुरवठा कमी करील व त्याबरोबर त्याचा उत्पादनखर्च त्या मानानें कमी होऊन, उत्पन्न वाढून, ऐन प्राप्ती जास्त होईल. जास्तींत जास्त फायदा कोणत्या प्रमाणांत उत्पादन केलें म्हणजे होईल त्या प्रमाणापर्यंत तो उत्पादन कमी करीत जाईल. म्हणजे त्या वेळीं उत्पादनाच्या नगाला अगर प्रमाणाला येणारी किंमत, त्या नगाच्या अगर प्रमाणाच्या उत्पादन खर्चापेक्षां जास्त असेल. हा सिद्धांत पूर्वी आपण समजून घेतला आहे. पुष्कळ वेळां खुला बाजार असतांना, अनेक योजक उत्पादन करीत असतांना, एक वेळ अशी येते कीं किंमत कितीहि कमी केली, तरी मागणी वाढणें शक्य नाहीं. गिऱ्हाइकांची त्या उत्पादनाच्या मागणीची माया संपली, त्यांनीं मागणीची हद्द गांठली. यापुढें विक्री जास्त होणें शक्य

नाहीं असें होतें. अशा स्थितींत, जेव्हां त्यांना उत्पादन वाढवून कांहीं मिळत नाहीं हें समजलें म्हणजे ते उत्पादन कमी करून जास्त प्राप्ती होईल का हें पाहतात. कारण योजकांना उत्पादन कमी किंवा जास्त याची क्षिति नसते, तर कमाल फायदा कसा होईल याची काळजी असते. म्हणून उत्पादन इतकें कमी करावयाचें कीं, वर सांगितल्याप्रमाणें बाजारांतील उत्पादन प्रमाणाची अगर नगाची किंमत त्याच्या खर्चापेक्षां जास्त होईल. कारण तेव्हांच कमाल नफा होतो हें आपण पाहिलें. मग हें उत्पादन कमी करण्याकरितां त्या धंद्यांतील सर्व योजक संघटित होतात. स्पर्धा केली तर सर्वांचेंच नुकसान अगर नाममात्र फायदा होणार. याच्या उलट संघटना केली, एकी केली व वट उत्पादन कमी केलें तर, वर लिहिल्याप्रमाणें जास्तींत जास्त फायदा होणार. तेव्हां ते योजक संघ करतात व अशा रीतीनें स्पर्धा नाहींशी करून मक्तेबाजी उत्पन्न करतात; मक्तेबाजी उत्पन्न झाली कीं, उत्पादन वाढवून, किंमत कमी करून, विक्री वाढविण्यापेक्षां, उत्पादन कमी करून, खर्च कमी करून फायदा वाढविण्याकडे प्रवृत्ति होते. लोकांची सोय हें ध्येय नसून, स्वतःचा स्वार्थ, कमाल स्वार्थ, हेंच साध्य, भांडवलशाही उत्पादनांत असतें. मक्तेबाजी उत्पन्न झाली म्हणजे प्रत्यक्ष उत्पादनापेक्षां जास्त उत्पादन केलें तर मागणी असते. मागणीची मर्यादा संपली नसते मात्र किंमत—भाव कमी करावा लागतो. हें करणें मक्तेदाराला परवडत नाहीं. नुसती विक्री जास्त व्हावी, हा त्याचा हेतु नाहीं. ज्या विक्रीपासून जास्तींत जास्त नफा राहील, इतकीच विक्री तो करील, तितकेंच उत्पादन तो करील. म्हणजे मक्तेबाजीचें यश, कमी उत्पादन म्हणजे जास्त फायदा, या सूत्राचें आचरण करण्यांत आहे.

उत्पादन मर्यादित ठेवलें म्हणजे किंमत स्थिर राहते; व या स्थितींत मक्तेदाराला आपल्या मिळकतीचा व मेहनतीचा जास्तींत जास्त मोबदला मिळतो. मग हा मक्तेदार एक असो अगर अनेक योजकांचा एक संघटित संघ असो. ज्या वस्तु गिऱ्हाइकांना अवश्यक असतात, त्या वस्तूंची मागणी कमीजास्त होत नाहीं. म्हणून अशा वस्तूंच्या उत्पादन करणाऱ्यांना संघटित होणें जास्तच फायद्याचें. मक्तेबाजी उत्पन्न होऊन जास्त फायदा होऊं लागला तर, इतर धंद्यांत असलेले योजक विचार करून आपलें भांडवल तिकडून काढून अगर नवीन भांडवल मक्तेबाजी उत्पन्न झालेल्या धंद्यांत घालून, फायदा होणार असेल तर त्याप्रमाणें ते करतात. मग पुनः स्पर्धा सुरू झाली, खुला बाजार झाला, खूप उत्पादन होऊं लागलें व त्याबरोबर किंमत कमी होऊं लागली कीं, त्याचा परिणाम मक्तेबाजी संपुष्टांत आणण्यांत होतो. मग मक्तेबाजी जर कायम ठेवावयाची असेल तर नव्या योजकाला तो धंदा बंद केला

पाहिजे, प्रवेशबंदी केली पाहिजे. प्रवेशबंदी करून उत्पादन मर्यादित करण्याच्या शक्तीवरच मक्तेबाजीची सत्ता अवलंबून आहे. तेव्हां प्रवेशबंदी कशी करतात व ती किती प्रमाणांत शक्य असते, याचा विचार करूं.

कांहीं वेळां ही मक्तेबाजी एखाद्या वस्तूच्या कांहीं अगर सर्वच उत्पादनघटकांत असते; व ते घटक अगर पदार्थ त्या वस्तूंच्या उत्पादनाकरितां अगदीं अवश्य असतात अशी स्थिति असते. कोठें ही मक्तेबाजी कच्च्या मालांत असेल, कोठें एखाद्या उत्पादनाच्या तंत्रांत, माल करण्याच्या पद्धतींत असेल. इंटरनॅशनल निकेल कार्पोरेशन ऑफ कानडा (**International Nickle Corporation of Canada**) या कंपनीचे ताब्यांत जगांतील उत्पन्न होणारें बहुतेक निकेल आहे. त्याचप्रमाणें नवीन लावलेले शोध व त्यांचें पेटंट ताब्यांत असल्यामुळें, कायद्याप्रमाणें त्याचा उपयोग त्या एकट्यालाच करतां येतो, म्हणजे ही मक्तेबाजीच होते. पुण्यांत वीज उत्पन्न करून विकणारी दुसरी कंपनी काढणें शक्य नाहीं. कारण एकाच कंपनीला परवाना, याच शर्तीवर मिळाला. त्याचा परिणाम वीज पुरवठा ही एक मक्तेबाजीची बाब बनली, त्यांत दुसरा येऊं शकत नाहीं. तसेंच जेथें व्यक्तिगत गुणांचा संबंध येतो, तेथें हीच स्थिति असते. बालगंधर्वांचें गायन अगर एखाद्या नटाचे हावभाव, हीं सर्व प्रवेशबंदीचींच उदाहरणें असून, यांत मक्तेबाजी कायमच राहते. कांहीं बाबतींत देशांतील सरकार प्रवेशबंदी करीत असतें. उदा०, पेटंटचा कायदा करून, ट्रेडमार्कचा कायदा करून, कांहीं काळपर्यंत तसा माल दुसरा कोणी करील तर सरकार त्याला बंदी करतें. इतकेंच नव्हे तर तसलें लेबल सुद्धां मालाला चिकटविणें बंद करतें. कांहीं ठिकाणीं सरकारच कांहीं वस्तूंचें मक्तेदार होतें. उदा०, हिंदुस्थानांत दारू गाळणें, दारूगोळा तयार करणें, नभोवाणीनें करमणूक करणें वगैरे. कांहीं ठिकाणीं सरकार एखाद्या कंपनीला कांहीं काळपर्यंत मक्ता देतें. उदा०, बहुतेक वीज पुरविणाऱ्या येथील कंपन्या, ट्राम कंपन्या, गॅस कंपन्या वगैरे. या सर्व बाबतींत सरकारच प्रवेशबंदी करीत असतें. कित्येक बाबतींत देशांतलें सरकार त्या देशांतच मक्तेदारांशिवाय इतरांना प्रवेशबंदी करतें इतकेंच नव्हे तर, बाहेरदेशचा मालसुद्धां मक्तेदारांचे संरक्षणाकरितां येऊं देत नाहीं अगर त्याच्यावर खूप आयात कर ठेवून फायदेशीर रीतीनें तो विकणें अशक्य करतें. आयात कर एखाद्या वस्तूवर बसला कीं, त्याचा परिणाम पुष्कळ वेळां, देशांतील त्या वस्तूंच्या उत्पादकांची संघटना होण्यांत होतो; व उत्पादकांची—योजकांची अशी संघटना म्हणजे मक्तेबाजीचें पुण्याहवाचनच होय. जास्तींत जास्त नफा मिळवावयाचा म्हणजे

उत्पादनसंचहि मोठा व एकंदर तंत्रहि अगदीं आधुनिक असावें लागतें; हें करणें म्हणजे मोठें भांडवल लागणार. यामुळें योजकांची संख्या साहजिकच कमी असते व जे थोडे असतात ते ताबडतोब संघटित होऊन, मक्तेबाजी उत्पन्न करतात. मोठ्या भांडवलाचा प्रश्न असल्यामुळें नवीन येणारा इसम फार विरळा; यामुळें आपोआप प्रवेशबंदी होते. लोखंड व पोलादाचें उत्पादन करणें म्हणजे फार मोठें भांडवल, अफाट उत्पादनसंच लागतो आणि म्हणून हा धंदा बहुतेक ठिकाणीं थोड्या योजकांचे हातांत आहे. या बाबतींत बहुतेक सर्वत्र मक्तेबाजी झालेली दिसते. कायम भांडवल येवढ्या प्रमाणावर घालावें लागतें कीं, कोणी नवा इसम त्या धंद्याकडे जाण्यास धजत नाहीं. शिवाय असल्या धंद्यांत चांगले दिवस दिसावयास कालावधि लागतो. वर्षानुवर्ष तेजीसाठीं थांबावें लागतें. जे पूर्वींच त्या धंद्यांत पडले आहेत तेच तग धरूं शकतात. शिवाय येवढें साहस करून कोणी नवीन शिरेल, मोठें भांडवल खर्च करील तर अधिक उत्पादनानें भाव खूप कमी होईल, नुकसान होऊं लागेल, तेव्हां नवे व जुने दोघेहि बुडतील हीहि भीति असते. हें बुडणें म्हणजे कांहीं लहानसहान योजकांचें बुडणें नव्हे; देश हादरेल इतक्या प्रमाणावर तें व्हावयाचें, म्हणून असल्या स्वरूपाच्या धंद्यांत मक्तेबाजी लवकरच होते. नवीन कोणी प्रवेश करूं शकत नाहीं. शिवाय सुरुवातीस मोठा खर्च करून, भांडवल घालून भागत नाहीं तर वर सांगितल्याप्रमाणें फार काळ वाट पहावी लागते. म्हणजेच चालू भांडवलहि पुष्कळ लागणार; शिवाय उत्पादनसंचहि अशा स्वरूपाचा असणार कीं, त्याचा उपयोग रूपांतरानें दुसऱ्या उत्पादनासाठीं करणें कठीण. पुन्हां उत्पादनसंच अखंड म्हणजे कमी उत्पादनासाठीं कमी करतां येईल असा नव्हे. एक एंजिन वीस डबे ओढतें. दहा डबे न्यावयाचे तरी एक एंजिन लावावें लागतें व एकच डबा असला तरी एकच. म्हणजे त्याचा उपयोग विभागतां येत नाहीं; त्याचें स्वरूप अखंड. तसेंच या मोठ्या धंद्यांत उत्पादनसंच अखंड स्वरूपाचा म्हणून खर्च जास्तच. अशा अनेक कारणांस्तव नवीन येणारे बिचकतात व जुने मक्तेदार बनून फायदा मिळवतात. याचा अर्थ दुसऱ्यांना बंदी आहे असा नव्हे. पण वरील कारणासाठीं सहसा कोणी धजत नाहीं. फार काळ जुन्या योजकांना नफा मिळत गेला, म्हणजे पुष्कळांच्या तोंडाला पाणी सुटतें व एखादा भांडवलवाला धाडसहि करतो. अशा स्वरूपाचे धंदे म्हणजे सामान्यतः लोखंड, पोलाद तयार करणें, जहाजें बांधणें, यंत्रें तयार करणें वगैरे; हे उभारणीच्या व उत्पादक स्वरूपाचे असतात, त्यामुळें इतर धंद्यांपेक्षां या धंद्यांवर तेजीमंदीचा परिणाम फार होतो व तो फार काळ टिकणाराहि

असतो. तेजी असली म्हणजे खूप नफा मिळतो व त्यामुळें नवीन धाडसी योजकहि येतात व मंदी आली म्हणजे इतर सर्व धंद्यांपेक्षां यांना जास्त जाणवते. तेव्हां तेजीचे काळांत मक्तेबाजीच असल्यामुळें हे धंदेवाले खूप नफा मारतात. रेल्वे, ट्रॅम, विजेच्या कंपन्या, टेलिफोन कंपन्या वगैरे सार्वजनिक सोयी पुरविणाऱ्या कंपन्यांनासुद्धां मोठें भांडवल लागतें. मोठी यंत्रसामग्री, मोठे संच लागतात. तथापि सरकार त्यांना कायद्यानेंच ठरलेल्या प्रदेशाची, शहरांची अगर भागांची, कायमची अगर कांहीं काळपर्यंतची मक्तेबाजी देतें. या मक्तेबाजीचा उपयोग ते योजक धोरण ठेवून मागें सांगितल्याप्रमाणें निरनिराळे दर लावून जास्तींत जास्त नफा काढण्याकडे करतात. त्यांचें उत्पादन सार्वजनिक दृष्ट्या महत्त्वाचें असल्यामुळें, सार्वजनिक सोयी त्यांच्या-योगें होत असल्यामुळें, सरकार त्यांच्यावर दराच्या व इतर बाबतींतहि नियंत्रण घालतें. तथापि स्पर्धा नसल्यामुळें, जनतेला त्यांचें उत्पादन ( सोय ) घ्यावेंच लागतें. सरकार मक्तेबाजी उत्पन्न करतें व होणारा फायदा मात्र खाजगी व्यक्तींच्या पदरांत पडतो. पैसा लोकांचा, सोय सर्वांसाठीं, सरकारी कृपेनें मक्तेबाजी, पण सर्व फायदा मात्र खाजगी व्यक्तींचा, असा भांडवलशाही उत्पादनसृष्टींतील विचित्र न्याय आहे.

एखाद्या धंद्यांतील सर्व अगर जवळ जवळ सर्व उत्पादन एका योजकाचे नियंत्रणाखालींहि असणें शक्य आहे. ही मक्तेबाजी नुसती एकाच देशापुरती न राहतां जगभरसुद्धां त्या धंद्याबाबत होऊं शकते. अशीं उदाहरणें आहेत. उदा०, एका काळीं हिरे करण्याचा धंदा 'डी बीर्स' या कंपनीचे ताब्यांत होता. जगांतील बहुतेक सर्व हिऱ्यांच्या खाणींवर तिचें नियंत्रण होतें. एखाद्या देशांतील एखाद्या धंद्यांतील उत्पादनावर योजकांचें संपूर्ण नियंत्रण असल्याचीं उदाहरणें पुष्कळ देतां येतील. जेथें भांडवलशाही जास्त प्रमाणावर आहे व देश जास्त उद्योगप्रधान आहे, तेथें अशा मक्तेबाजीचा व्याप जास्त. इंग्लंडमध्यें पुष्कळ धंद्यांत मक्तेबाजी झाली आहे. उदा०, इंपीरियल केमिकल वर्क्स लि०, कोटस् लि०, वगैरे. हें सर्व त्या त्या धंद्यांतील योजक आपली संघटना करून घडवून आणतात. मागें सांगितल्याप्रमाणें जास्त उत्पादन करून, निरनिराळ्या योजकांना प्राप्ति वाढवितां येत नाहीं, म्हणून उत्पादन मर्यादित करून, किंमत तीच ठेवून नफा वाढविणें हा एकच मार्ग राहतो. तेव्हां सर्व योजक एक होतात, वट उत्पादन किती कमी करावयाचें हें ठरवितात, तें प्रमाणानें वांटून घेऊन नफा कमवितात. या त्यांच्या संघटनेला संघ किंवा कार्टेल ( Cartell ) असें म्हणतात. आपण त्याला जूट म्हणूं.

ही उत्पादनाची मक्तेबाजी त्या धंद्यांतील योजक निरनिराळ्या पद्धतीनें अमलांत

आणतात. सर्वसामान्य धोरण एक ठेवून प्रत्येक योजक तें अमलांत आणण्याचें काम स्वतंत्र रीतीनेंहि करूं शकतो. सामान्य धोरण जर ठराविक भावापेक्षां कमी अगर जास्त भाव कोणीहि लावावयाचा नाहीं असें फक्त किंमतीबाबतच असेल तर ही एकी फार दिवस टिकावयाची नाहीं. कारण भाव तोच ठेवून प्रत्येक कंपनी अगर योजक, आपल्याकडे जास्त गिऱ्हाईक ओढण्याचा प्रयत्न करील; त्यामुळें कांहींना जास्त 'ऑर्डरी' व कांहींना कमी. त्याचा परिणाम, मग कांहींजण गुप्त रीतीनें कमी भाव करून विकतील; त्याच भावानें विकून ठराविक कसर कापून देतील अगर सरळ संघटना मोडून, जूट मोडून, धंदा करूं लागतील. उदाहरण घेऊन आपण पाहूं. ज्या वेळीं मोटारीचा धंदा जोरांत होता, त्या वेळीं जो उठे तो अर्धा टनी गाडी घेऊन धंदा सुरू करी, असा क्रम सुरू झाला. पुढें कॉंपिटिशननें सर्वच नुकसानींत येऊं लागले, मग लायनी लायनीनें एक झाले; दर ठरविले, कोणी दरापेक्षां कमी अगर जास्त घ्यावयाचा नाहीं असें ठरलें. परिणाम असा झाला कीं, स्टॅंडवर उतारूंची ओढाताण, ज्याचा एजंट चलाख त्याला उतारू जास्त; तेव्हां लबाडी सुरू झाली. कोणी एका दराचें तिकीट फाडून कमी पैसे घेऊं लागले. शेवटीं ही जूट मोडली हा अनुभव वाचकांनीं पाहिला असेलच. तेंच मोठ्या धंद्यांत होतें. लांकूडवाले संघ काढतात, भाव ठरवितात व कसर कापून देऊन जूट मोडतात. प्रत्येकजण गिऱ्हाईक वाढविण्याचा प्रयत्न करतो. तात्पर्य नुसत्या किंमतीबद्दल जूट करून भागत नाहीं, संघटना टिकत नाहीं. कोणी किती उत्पादन करावयाचें, किती गिऱ्हाईक घ्यावयाचें, हें ठरविलें तरच संघटना टिकणें शक्य असतें. पुनः कोणी लबाडीनें जास्त विकूं नये म्हणून, सर्व विक्री त्या संघामार्फतच व्हावी अशी व्यवस्था करण्यांत येते. आपण मोटारवाल्याचेंच उदाहरण घेऊं. स्टॅंडवर नंबरानें गाड्या सोडल्या म्हणजे गिऱ्हाईक योग्य वाटेल तिकडे जाईल. तिकिटेंसुद्धां 'संघ' कचेरींतून 'युनियन'मधूनच विकली म्हणजे लबाडीला वाव कमी. म्हणून 'संघा'मार्फत विक्री व 'संघा'मार्फतच ऑर्डरी घेणें हें योग्य ठरतें. माल खूप शिल्लक आहे, त्यामुळें किंमती कमी होतील या आशेनें गिऱ्हाईक उतावीळपणा दाखवीत नाहीं. कारण त्याला असें वाटतें कीं, उत्पादन चालूच आहे, शिल्लक माल खूप आहे, तेव्हां आज ना उद्यां किंमती घसरतील व मग खरेदी करतां येईल. पण जर संघ असला तर ताबडतोब उत्पादन कमी करतां येतें. साधारणपणें गिऱ्हाईक किती राहील, जास्तींत जास्त नफा मिळण्याचे दृष्टीनें उत्पादन किती प्रमाणांत कमी केलें पाहिजे, हें तो 'संघ' ठरवील. त्याप्रमाणें उत्पादनाचें नियंत्रण करून त्या संघामधील निरानिराळ्या योजकांत तें वांटून देईल व प्रत्येक योजक आपल्या हिश्शाप्रमाणें उत्पादन तयार करील व

संघामार्फत—कोंडीमार्फत—तें विकलें जाईल. प्रत्येकाचा हिस्सा किती हें प्रत्येकानें घातलेलें भांडवल, त्याचा उत्पादनसंच व धंद्यांतील वडीलकी वगैरे लक्षांत घेऊन सर्वांच्या संमतीनेंच ठरविला जातो. पुनः आपण मोटारीचें उदाहरण घेऊं. 'यूनियन' ऑफिस साधारण प्रत्येक लायनीवर रोज सरासरी किती उतारू येतात, जातात याचें प्रमाण काढील. प्रत्येक मालकाच्या, म्हणजे जो 'मेंबर' आहे त्याच्या गाड्या किती, त्या मानानें पाळ्या ठरवील, नंबर लावील. अशा रीतीनें स्पर्धेमुळें 'कॉंपिटिशन'नें होणारें नुकसान टाळतां येतें. अगदीं हीच गोष्ट मोठ्या धंद्यांत होते.

असा संघ करून, कोंडी करून, फायदा होईल, नुकसान टळेल, हें माहीत असून सुद्धां पुष्कळ धंद्यांत हें होत नाहीं. अर्थात् हें आपल्यासारख्या गिऱ्हाइकांचें भाग्य आहे. प्रत्येक योजक जास्त हिस्सा मागत असतो. कोणी मागच्या नफ्याच्या जोरावर पुढेंहि त्याच प्रमाणांत वांटा मिळावा म्हणून प्रयत्न करतो, कोणी आपली व्यवस्था उत्तम आहे, तेव्हां पुढें जास्त नफा आपल्याला मिळणें शक्य आहे, म्हणून जास्त वांटा मागतो. तात्पर्य, या सगळ्या गोष्टी जमवून आणणें कठीण असतें, आणि जर त्या धंद्यांत पुष्कळ योजक असले तर तें जास्तच कठीण होतें. अगदींच थोडे असले तर ते बहुतेक जमवून घेतात, त्यामुळें फायद्याचे दृष्टीनें त्यांच्या धंद्याची परिस्थिती ताबडतोब बदलते. म्हणून मागें सांगितल्याप्रमाणें उभारणीच्या—उत्पादक-स्वरूपाच्या, म्हणजे यंत्रे तयार करणें, पोलाद, लोखंड वगैरे धंद्यांत थोडे योजक असतात, म्हणून त्यांची सांधिक संघटना लवकर होते. जेथें पुष्कळ उत्पादन करणारे आहेत, पुष्कळ योजक आहेत, तेथें सरकारनेंच आपण होऊन हात घातला तर कांहीं नियंत्रण होणें शक्य आहे. हाच अनुभव मोटारीचे धंद्याबाबत आला. धंदेकरणारे फार, संघ टिकेनात, कारण प्रवेशबंदी नाहीं. पुनः नवीन माणसांस भांडवल फार लागत नाहीं, हप्तेबंदीच्या पद्धतीनें तर सुरुवातीसहि थोडे लागे. त्यामुळें सर्वत्र बेबंदशाही झाली. शेवटीं सरकारनें १९३८ सालीं, कायद्यानें नियमन व नियंत्रण केलें. त्याचे परिणाम कांहीं तरी बरें झाले. हाच अनुभव भांडवलशाही पद्धतीनें उत्पादन करणाऱ्या सर्व देशांत आला आहे. इंग्लंडमध्यें सरकारनें कोळशाच्या उत्पादनावर १९३० सालीं नियंत्रण घातलें; रबराचे लागवडीवर व उत्पादनावर सीलोन, मलाया या देशांतील सरकारांनीं १९२४ सालपर्यंत घातलें. अमेरिकेंत रूझवेल्ट सरकारनें कापसाचें उत्पादनावर घातलें. तात्पर्य, जेथें उत्पादन करणारे अनेक व स्पर्धा अनिर्बंध, तेथें सरकारच मध्यें पडलें तरच उत्पादन करणारांचा कांहीं फायदा झाला तर होईल; मग ते शेतकरी, असोत, विणकर असोत, किंवा

मळेवाले असोत. किंबहुना सरकारी नियमन व नियंत्रण हें आतां असल्या परिस्थितींत सर्वसामान्य धोरण झालेलें आहे.

असे संघ करून उत्पादन मर्यादित करावयाचें व मक्तेबाजी उत्पन्न करावयाची ही गोष्ट अगदीं सोपी आहे असें नाहीं. तसेंच एकदां अशी संघटना झाली म्हणजे सुद्धां ती टिकविणें फार कष्टाचें असतें. बाजाराची परिस्थिती बदलत असते. ठराविक हिश्शापलीकडे उत्पादन करावयाचें नसल्यामुळें पुष्कळ योजकांना ही संघटना जाचक वाटते. कांहींच्या उत्पादनाला गिऱ्हाइकांची मागणी असून त्यांना फायदा घेतां येत नाहीं. केव्हां केव्हां खास प्रकारचा माल, जो एक विशिष्ट योजक काढीत असेल, याला खूप गिऱ्हाईक आले, म्हणजे तें सर्वांत वांटलें जातें व त्यामुळें तसेंच व त्या प्रकारचें खास उत्पादन सर्व करतात; हा अन्याय समजला जातो. एखाद्या योजकानें नवीन शोध लावून, उत्पादनतंत्रांत प्रगति केली तरी, त्याचा फायदा त्याला घेतां येत नाहीं, कारण जास्त उत्पादन शक्य असून तो संघटनेनें बांधला गेला असल्यामुळें त्याला गप्प बसावें लागतें. एकंदर मागणी कमी झाली म्हणजे सर्व बाजूंनीं उत्पादन कमी होतें व योजकांच्या कारखान्यांत काम नाहीं अशी स्थिति होते. किती तरी उत्पादन करणें शक्य असून उत्पादनसंचाचा पुरा फायदा घेतां येत नाहीं, त्यामुळें उत्पादनशक्ति वाढत जाते. तेव्हां संघटना मोडून कांहींजण बाहेर पडतात व किंमती कमी करून उत्पादन वाढवून निदान आपले कारखाने पूर्ण काम देतील काय हे पाहतात. जरी सरकारी नियंत्रण असलें तरीहि असली संघटना टिकत नाहीं हें मोटारवाल्यांच्या बाबतींत आपण पाहिलेंच आहे. खुद्द संघटना करणारांचेहि हात मोडतात. जर उत्पादनाची हिस्सेराशी बदलली, तर पुनःहि जुळतात. पण याचा अर्थ जो मोठा भांडवलवाला त्यांत असतो तो हुकूमशाही चालवितो. म्हणून असली संघटना टिकवावयाची तर ही संघटना चालू असतांना, त्याच धंद्यांत नवीन आलेले व जुने पण संघटनेंत नसलेले योजक, त्यांत सामील करून घेणें, हा एक आणखी मार्ग आहे. जे संघटनेच्या बाहेर असतात, त्यांची स्थिति जरा बरी असते; कारण संघानें ठरविलेल्या किंमतीचा फायदा ते धोरणानें घेऊं शकतात व स्वतः वाटेल तेवढें उत्पादन करण्यास मोकळे असतात. जितकी किंमत वाढेल अगर उत्पादनखर्च कमी होईल व जितका वेळ ती कायम राहील तितका या बाहेरील योजकांना जास्त फायदा होईल. त्याचप्रमाणें या परिस्थितीचा फायदा घ्यावा म्हणून नवीन योजकहि यांत येतात. त्याचा परिणाम संघटनेवर असा होतो कीं, ते संघटित उत्पादक आणखी उत्पादन कमी करून भाव कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत राहतात. शेवटीं हीहि

गोष्ट अशक्य होऊन संघटना मोडते किंवा जे संघटनेबाहेर आहेत त्यांना सामील करून घेऊन पुनः उत्पादनाची हिस्सेराशी बसवून, पुनः नवीन संघटना होऊन हा जुना संघ, कायाकल्प करून पुनः मक्तेबाजी प्रस्थापित करतो. नव्या योजकांना यांत सामील होणें जरूर होतें, कारण ते तसें न करतील तर भाव उतरण्याची भीति व नंतर नुकसान, हें दृश्य त्यांच्या डोळ्यांपुढें असतें म्हणून ते संघटनेंत सामील होतात. ज्याला ज्याला रहस्य कळलें त्याला त्याला टोळींत सामील करून अल्लाउद्दीनाचे चाळीस चोर संघटित झाले. अगदीं तोच प्रकार भांडवलशाहींत मक्तेबाजीच्या स्वरूपानें होतो.

सरकारी नियमन असो अगर नसो, उत्पादन कमी करून, मर्यादित करून, नफा जास्तींत जास्त करण्याचे अनेक प्रयत्न अयशस्वी झाले आहेत. १९३१ सालीं जगांतील साखरेची पैदास नियमित करण्याचा करार जर्मनी, पोलंड, क्यूबा, जावा वगैरे १० देशांत झाला. त्यावेळेस हे देश जगांतील निम्मी साखर तयार करीत असत. १९३४–३५ सालीं त्यांचे हें उत्पादन ३० टक्क्यांवर आलें. १९३५ सालीं करा-राची मुदत संपल्यावर पुनः करार केला नाहीं. १९३७ सालीं दुसरा करार झाला, त्यांत निरनिराळ्या देशांना गिऱ्हाइकीकरितां, प्रदेश वांटून दिले. तोहि करार महायुद्ध सुरू झाल्याबरोबर अस्तित्वांत राहिला नाहीं. १९३७ च्या करारांत हिंदुस्थान सामील असून हिंदुस्थानांतील साखरेच्या धंदेवाल्यांचे वांट्यास हिंदुस्थान व ब्रह्मदेश एवढा प्रदेश आला. हिंदुस्थानांतील वाढत्या धंद्यावर हा अन्याय आहे, अशी कायदेमंडळा पुढें हा करार संमतीसाठीं आला, त्यावेळीं अनेकांबरोबर प्रस्तुत लेखकानेंहि तक्रार केली होती. रबराचे उत्पादनाबद्दल पूर्वीं दोनदां करार होऊन, ते मोडून पुनः आतां १९३४ सालीं नवीन करार झाला आहे. ज्या कारणानें राष्ट्रांतील संघटना टिकत नाहीं त्याच कारणानें आंतरराष्ट्रीय संघटना, एखाद्या वस्तूच्या उत्पादनाबाबत टिकत नाहीं. कारण सर्वच राष्ट्रें या संघटनेंत सामील होत नाहींत. जग उत्पादनाचे बाबतींत कित्येक वर्षांपासून आंतरराष्ट्रीय दृष्टि सोडून राष्ट्रीय दृष्टीनें पाहूं लागलें आहे. प्रत्येक राष्ट्र आपल्या सर्व गरजांबाबत स्वयंपूर्ण व स्वावलंबी कसें होईल या दृष्टीनें उत्पादनाची मोहरीं हालवीत आहे. या राष्ट्रीय, स्वयंपूर्ण उत्पादनाचे दृष्टीमुळें, धोरणामुळें, उत्पादनाचे बाबतींत आंतरराष्ट्रीय संघटन होणें कठीण, झाल्यास टिकणें कठीण व आतां महायुद्धानंतरच्या 'नवीन जगांत' तर अशक्यच. तथापि मनुष्य प्रयत्नवादी आहे. आंतरराष्ट्रीय व्यापार व विनिमय नियमित व संघटित व्हावा या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय बँक व विनिमयनिधिस्थापन करण्यांत आला आहे. (**International Bank and Monetary Fund**).

तसेंच व्यापाराबाबत नियमन करण्यासाठीं आंतरराष्ट्रीय परिषदेचीं तयारी चालू आहे. तात्पर्य, संघटनेंतील घटकांमध्यें इमानदारी असली तर संघटना टिकून सर्वांना फायदा होईल. हा फायदा, ही नफेबाजी, जास्त काळ टिकवावयाची असल्यास, ही संघटना व्यापक, नविनांना आंत घेणारी अशी असली पाहिजे. तशी नसली तर सरकारनें नियमन करूनहि यशस्वी होत नाहीं, याचा अनुभव अमेरिकेंत आला आहे. प्रे. रूझवेल्ट यांनीं कायद्यानें कापसाचें प्रीक मर्यादित केलें व भाव कायम ठेवला. त्याचा परिणाम म्हणजे अमेरिकेंतल्या शेतकऱ्यांना, सरकारी बंदीमुळें पीक काढण्यास मिळालें नाहीं म्हणून नुकसानभरपाई द्यावी लागली. जे देश त्यांच्या संघटनेच्या बाहेर होते, त्यांचा मात्र फायदा झाला,कारण भाव रूझवेल्ट सरकारच्या धोरणानें कायम राहिला. रूझवेल्ट यांच्या धोरणाचा परिणाम असा झाला कीं, जनतेचा करानें घेतलेला पैसा नुकसानी म्हणून शेतकऱ्यांना मिळाला, नियमनानें भाव कायम राहिले कमी झाले नाहींत म्हणून गिऱ्हाइकांना फायदा मिळाला नाहीं, उत्पादनखर्च कमी न झाल्यामुळें मजुरी वाढली नाहीं व शेवटीं एकंदर उत्पादन मर्यादित झाल्यामुळें, भांडवलवाल्यांचें होणारें नुकसान टळलें. त्यांचाच अखेरीस फायदा झाला !

वर अमेरिकेच्या उदाहरणानें मक्तेबाजीचे परिणाम कसे होतात हें थोडेसें सांगितलें. त्या दृष्टीनें आणखी थोडासा विचार करूं. समजा, एखाद्या वस्तूच्या उत्पादनाची मक्तेबाजी होऊन तिजवर नियंत्रण एक अगर अनेक संघटित योजकांचें आहे; आणखी असेंहि समजू कीं, ती वस्तु अशी आहे कीं, तिच्याऐवजीं दुसरी घेणें शक्य नाहीं, तत्सम दुसरी वस्तु नाहीं. गिऱ्हाइकाला घ्यावयाची तर तीच घ्यावी लागेल. जर या उत्पादनांत मक्तेबाजी नसती तर काय झालें असतें व मक्तेबाजीमुळें काय झालें याची तुलना आपण केली पाहिजे. एकाच उत्पादनसंचापासून जर हें सर्व उत्पादन होईल तर तें मोठ्या प्रमाणावर खर्चाचे दृष्टीनें स्वस्त होईल. ट्रॅम, गॅस, वीज वगैरे सार्वजनिक सोयी पुरवणाऱ्या कंपन्या, एकाच ठिकाणीं अनेक असण्यापेक्षां, एकच असलेली बरी असें कोणींहि म्हणेल. पुण्यांत तीन चार विजेच्या कंपन्या निघाल्या अगर मुंबईत दोन तीन ट्रॅम कंपन्या निघाल्या तरी फार वेळ त्या चालू शकणार नाहींत, त्या एक होतील. त्यांची संघटना होईल, ती होणें अपरिहार्य आहे. अशा सोयीचें उत्पादन एकहातीं झाल्यास उत्पादनखर्च कमी, त्यामुळें किंमतहि कमी असणार हें सरळ आहे. तथापि ही किंमत त्या योजकाला, मक्तेदाराला होणाऱ्या खर्चापेक्षां किती तरी जास्त असतेच. अधिक उत्पादनाचा खर्च प्रमाणामागें प्रमाणाचे किंमतीपेक्षां कमी राहणार, नाहींतर तो मक्तेदार अधिक उत्पादन करणार नाहीं, तसें करणें

त्याला परवडणार नाहीं. परवडेल इतकीच किंमत ठेऊन आपला नफा जास्तींतजास्त करण्याचा तो प्रयत्न करील. अशा सार्वजनिक सोयीच्या वस्तूंच्या उत्पादनांवर सरकारी नियंत्रण असणें अवश्य आहे, व सरकारनें भाव ठरवितांना धंद्यांत चढाओढ झाली असतां सामान्यतः काय भाव राहील, हें गणित करून तो ठरविला पाहिजे. कारण ही मक्तेबाजी सरकारी कृपेनें साध्य झालेली असते; पण असें होतेच असें नाहीं. भांडवलशाहींत, एकतर सरकारी नियंत्रण योजकांना नको असतें; त्यानें फायदा होणार असेल तर ते मान्य करतील व त्यांतहि आपला डाव साधतील. कारण भांडवलशाहींत सरकार, म्हणजे भांडवलवाल्यांचें, संचितवाल्यांचें हितसंरक्षण करणारा एक पहारेकरीच होत असतो, असा अनुभव आहे. जनतेच्या दृष्टीनें, सार्वजनिक सोयींचें उत्पादन सरकारी मालकीचेंच पाहिजे पण तें भांडवलशाहींत अशक्य. लोकहितासाठीं सरकार दक्ष आहे हा देखावा करण्याकरितांच हें थोडेसें नियंत्रण अशा उत्पादनावर सरकार ठेवींत असतें; त्याचा परिणाम सरकारी कृपेनें मक्तेबाजी निर्माण होतें व लोकांना दुसरा मार्ग नसतो, तेंच उत्पादन घ्यावें लागते! लोकांना होणारी सर्व प्राप्ती सरळ खाजगी व्यक्तीच्या खिशांत, मक्तेदाराच्या खिशांत जाते, अनेकांपासून घेऊन एका हातीं संपत्ति देण्याचा हा सरळ मार्ग आहे. मक्तेबाजीचा संपत्तीच्या वांटपाच्या दृष्टीनें हा एक परिणाम आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

मक्तेबाजीमुळें संपत्तीची अन्याय्य विषम वांटणी एवढाच कांहीं परिणाम होतो असें नाहीं. पुष्कळ वेळां मक्तेबाजी ही प्रगतीला आडकाठी आणणारी असते. नवीन शोध लागला, नवीन तंत्रानें जास्त उत्पादन होणें शक्य झालें तरीसुद्धां, या गोष्टीचा उपयोग मक्तेदार करीलच असें नाहीं; कारण चालू उत्पादनसंच, त्यांत टाकलेलें भांडवल, हें सगळें निकालीं लावून नवीन यंत्रें व नवीन तंत्र, यांच्या सहाय्यानें उत्पादन करणें त्याच्या हिशोबानें फायदेशीर पडणार नसेल तर, तो तें करणार नाहीं. ते शोध, ती प्रगति समाजाचे उपयोगी पडणार नाहीं. तसेंच पूर्वीचा संच कायम ठेऊन, नवीन पद्धतीनें उत्पादन करण्यापासून जर नवीन पद्धतीनें मिळालेला फायदा, जुन्यांतील नुकसान भरून काढून शिल्लक कांहीं राहिला तरच, तो या भानगडींत पडेल. तात्पर्य, नफा हा त्याचा हेतु असल्यामुळें ज्ञानाकडे सुद्धां तो सकाम बुद्धीनेंच पाहत असतो. 'ज्ञानासाठीं ज्ञान' व 'प्रगतीसाठीं प्रगति' हीं ध्येयवाक्यें, विश्वविद्यालयाच्या द्वारांवर ठीक दिसतात. उत्पादनाचे वातावरणांत त्यांना जागा नाहीं. ज्ञान, विज्ञान सर्व कांहीं प्राप्तीचे दास होत असतील तरच त्यांना व्यवहारांत स्थान आहे नाहींतर नाहीं. तात्पर्य, नफा होत नसेल तर प्रगति अगर शोध यांचा उपयोग तो

करणार नाहीं. पण जर मक्तेबाजी नसेल तर, ताबडतोब नवीन शोधांचा, नवीन तंत्रांचा फायदा घेऊन उत्पादन करणारे पुढें येतात. नवीन पद्धतीनें उत्पादन करून, भाव खालीं आणतात. कारण नवीन पद्धतीनें उत्पादन, कमी खर्चाचें असणार व त्यामुळें जास्त पुरवठा म्हणून साहजिक भाव कमी होतो. जुन्यांची प्राप्ती पण त्यामुळें कमी होते.

वर मक्तेबाजीचा परिणाम प्रगतीच्या विरुद्ध कसा होतो हें दाखविलें. मक्तेबाजीचें महत्त्व, मागें सांगितल्याप्रमाणें उत्पादन कमी करून फायदा जास्त मिळविण्यांत आहे. हे उत्पादन अनेक प्रकारें मर्यादित करण्यांत येतें. एक सरळ मार्ग म्हणजे, तयार झालेला अगदीं विक्रीस तयार झालेला माल नाहींसा करणें व अशा रीतीनें पुरवठा कमी करून भाव सांवरून धरणें. १९३१ तें ३४ या वर्षांत 'कॉफी इन्स्टिटयूट ऑफ ब्राझिल' या मक्तेदार कंपनीनें २० लाख टन कॉफी जाळून टाकली. गहूंहि असेच कित्येक ठिकाणीं १९२९ ते ३१ चे दरम्यान जाळण्यांत आले. सर्वच कारखाने न चालवितां अगर कांहीं वेळ चालवून उत्पादन कमी करणें हा दुसरा मार्ग आहे. सर्वच साधनसामग्री उपयोगांत न आणतां कांहीं आणावयाची, कांहीं रिकामी ठेवावयाची, आणि अशा रीतीनें उत्पादन कमी करावयाचें. उदा०, कपाशीची लागवड कमी करणें, रबराच्या झाडांचा चीक न काढतां तशींच ठेवणें, उंसाची लागवड कमी करून साखरेचें उत्पादन मर्यादित करणें, गिरण्यांतील रात्रपाळी बंद करून एक पाळीनेंच गिरणी चालविणें वगैरे. जर या बाबतींत मक्तेबाजी नसेल, तर उत्पादनसामग्री सर्वच्या सर्व उपयोगांत आणली जाईल. कारण चढाओढ, स्पर्धा असलीं कीं, प्रत्येक योजक कोठलीहि सामग्री निरुपयोगी ठेवणार नाहीं. मक्तेबाजींत तशी निरुपयोगी ठेवून उत्पादन मर्यादित केल्याशिवाय नफाच मिळणें शक्य नसतें. म्हणून मक्तेदार ती निरुपयोगी ठेवितात. जर सर्व सामग्री उपयोगांत आणली, तर होणारा खर्च येणारे किंमतीचे मानानें, त्यांना परवडणार नाहीं. तेव्हां मर्यादित उत्पादन, हेंच त्यांचें अमृत होतें, हेंच त्यांना जिवंत ठेवतें. अर्थात् जनतेचें तें विष होतें हें सांगण्याचें कारण नाहीं. मक्तेबाजी झाली म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें जरी सामग्री रिकामी पडली नाहीं, विद्यमान सामग्री उपयोगांत आली तरी मक्तेदाराला जास्त भांडवल घालून उत्पादन वाढविणें शक्य असलें तरी, तो तें करणार नाहीं. नुसतें उत्पादन वाढविणें हें त्याचें ध्येय नाहीं. उत्पादनाचे वाढीबरोबर वट प्राप्ति जर वाढणार असेल, तरच तो उत्पादन वाढवील. या दृष्टीनेंहि तो उत्पादन मर्यादित करीत असतो. शिवाय मक्तेबाजी असल्यामुळें नवीन योजक या धंद्यांत येत नाहींत. फायदेशीर असूनसुद्धां

त्यांना येता येत नाहीं व त्यामुळें पुनः उत्पादनाला मर्यादा बसतेच. मक्तेदार स्वतः वाढवीत नाहीं, नविनांना प्रवेश नाहीं, अशा रीतीनें तो उत्पादन मर्यादित करीत असतो; व हें त्याचें उत्पादन चढाओढ असतांना होणाऱ्या उत्पादनापेक्षां केव्हांहि कमीच असणार. मक्तेबाजीमुळें उत्पादन कमी होतें तें असें.

हें उत्पादन कमी होण्यामुळें अनेक परिणाम घडून येतात. ज्या उत्पादक वस्तूंपासून मक्तेबाजीनें उत्पन्न होणारी वस्तु अगर माल तयार होतो, त्यांच्या उत्पादनावर परिणाम होतो. त्यांची मागणी कमी होते. मोटारीवर नियंत्रण झाल्याबरोबर त्यांची संख्या कमी झाली. मोटार ड्रायव्हरना मागणी कमी, त्यांचा पगार कमी कमी झाला, हा आपला अनुभव आहे. पेट्रोल कमी खपूं लागलें कारण बिन उतारूंच्या अगर कमी उतारू घेऊन कॉंपिटिशननें जाणाऱ्या गाड्या कमी झाल्या. लोखंड व पोलाद करण्यांत नियमन झालें कीं त्याचा परिणाम दगडी कोळशाच्या उत्पादनावर होणारच. तसेंच संघटना झाली, संघ झाला, मक्तेबाजी झाली कीं मागें सांगितल्याप्रमाणें प्रत्येक योजक आपला संच वाढवून, आपला हिस्सा वाढवून घेण्याची खटपट करीत असतो. परंतु ही उत्पादनाची वाढती शक्ति सर्वस्वी उपयोगांत आणली जात नाहीं, ती रिकामीच रहाते. हा एक मर्यादित उत्पादनाचा विचित्र परिणाम होतो. तसेंच मक्तेबाजींत हिस्सेराशीनें उत्पादन करावयाचें म्हणून पुष्कळ वेळां जास्त चांगली साधनसामग्री असून, तिला कमी हिस्सा मिळून खर्च मात्र प्रमाणानें जास्त येतो. मोटारीच्या धंद्याचेंच उदाहरण घेतलें तर हें सहज दिसून येण्यासारखें आहे. गाड्यांच्या संख्येवर हिस्सेराशी ठरविली तर सामान्य दर्जाच्या गाड्यांच्या मालकांना जितका हिस्सा येईल, तितकाच हिस्सा, ज्यांच्या गाड्या जास्त धांवणाऱ्या व उत्कृष्ट मेकरच्या आहेत त्यांना येईल, यांतील अन्याय उघड आहे. पण हेंच सर्वत्र, जेथें जेथें उत्पादन मर्यादित झालें आहे, मक्तेबाजी झाली आहे, तेथें तेथें दिसून येईल. इग्लंडमध्यें कोळसा काढण्याच्या धंद्यांत हाच अनुभव आला. इतकेंच नव्हे तर १९३० ते ३५ सालीं सर्व जगाची आर्थिक पहाणी झाली. त्याच्या रिपोर्टांतहि हाच अनुभव सर्वत्र आहे, असें सांगितलें आहे. "ज्या ज्या ठिकाणीं खाण्याचीं धान्यें व अन्य कच्चा माल, यांच्या उत्पादनांतील चढाओढ व त्यामुळें होणारें नुकसान टाळण्याकरितां, उत्पादनाचें नियमन व नियंत्रण करण्यांत आलें त्याचा परिणाम जेथें खर्च कमी असून उत्पादन जास्त कसोशीनें होत होतें, त्याच ठिकाणीं तें प्रमाणाबाहेर कमी होण्यांत झालें." याचा अर्थ नियमन करतांना जनतेचें हित ही दृष्टी न ठेवतां धंद्यांतील भांडवल एकंदरीनें कसें संरक्षित होईल,

ही दृष्टि ठेवली जाते. नाहींतर खर्चाचे मानानें महाग पडणारें उत्पादनच कमी करण्यांत आलें असतें व परिणामीं तें कमी दरांत विकणें परवडलें असतें.

उत्पादन मर्यादित होतें व तें मक्तेदार आपल्या दृष्टीनें करीत असतो. याचा अर्थ, एकंदर उत्पादनाचा मेळ, उत्पादनाची मांडणी, गिऱ्हाइकांच्या सोयीपेक्षां, त्यांच्या मागणीपेक्षां, आपल्याला नुकसानी न येतां जास्त फायदा कसा होईल या हिशोबानें तो करीत असतो. मक्तेबाजीमुळें वर सांगितल्याप्रमाणें कितीतरी उत्पादन-सामग्री रिकामी राहते. उत्पादनशक्ति पूर्णपणें उपयोगांत आणली जात नाहीं म्हणून गिऱ्हाइकांना जो फायदा झाला असता त्याला ते मुकतात. चांगल्या मेकरच्या गाड्यांत बसून प्रवास करण्याची गिऱ्हाइकांची इच्छा असते; पण मक्तेबाजीमुळें त्या गाडीची, त्या मोटार सर्व्हिसची, पाळी नसते. त्यांस नाइलाज म्हणून दुसऱ्या तऱ्हेच्या हलक्या मेकरच्या गाडींतून जावें लागतें. 'गणेश मोटार सर्व्हिस'च्या गाडींतून जाण्याची इच्छा असून एखाद्या हनुमंताचे खांद्यावर बसून जावें लागतें. अगदीं हेंच, मक्ते-बाजीमुळें मर्यादित झालेल्या इतर उत्पादनाचे बाबतींत अनुभवास येतें. जरी कांहींहि साधनसामग्री रिकामी राहिली नाहीं तरी, जोंपर्यंत दुसरे योजक या मक्ते-बाजी उत्पादनांत येऊन उत्पादन वाढवीत नाहींत तोंपर्यंत उत्पादन कसें राहावें, हें बऱ्याच अंशीं तो मक्तेदारच ठरवील; आणि त्या दृष्टीनें तितक्यापुरती उत्पादन-सृष्टीचा राजा जो उपभोगी गिऱ्हाईक त्याच्या सत्तेला थोडी मर्यादा आली, हें मान्य केलें पाहिजे. कांहीं धंद्यांतील उत्पादनांत सरकार एकमेव उत्पादक व योजक होऊं लागलें आहे. ही प्रवृत्ति बहुतेक भांडवलशाही राष्ट्रांत वाढत्या प्रमाणांत दिसून येत आहे. कांहीं धंद्यांत सरकार मक्तेबाजी उत्पन्न करतें अगर झाली असल्यास ती टिक-विण्याचा प्रयत्न करतें, हेंहि आपण पाहिलें आहे. कांहीं मक्तेवाले भाव फार वाढविले तर, सरकार हस्तक्षेप करील म्हणून धोरणानें वागतात. शिवाय गिऱ्हाईक चिडलें तर मालावर बहिष्कारहि घालील, यांचीहि त्यांना भीति असते. नवीन शोध, नवीन तंत्र, यांची भीति तर कायमच. कारण, त्यांच्या सहाय्यानें नवीन योजक उत्पादन करून, चढाओढींत शिरून, जुन्यांची बाजारांतील दादागिरी नाहींशी करतील, हाहि विचार त्यांना सतावीत असतोच. संघटनेंतील दुवे केव्हां धोका देतील याचा भरंवसा नसतो, हा अनुभव त्यांचे डोळ्यांपुढें असतोच. शेवटीं मक्तेदार, मागें सांगितल्या-प्रमाणें अमुक भावांत, अमुक माल, गिऱ्हाइकानें घेतलाच पाहिजे अशी सक्ति करूं शकत नाहीं. त्याच्या प्रचंड असणाऱ्या शक्तीलासुद्धां वर लिहिल्याप्रमाणें मर्यादा असतातच. पण त्या मर्यादेच्या आंत तो अनंत भानगडी करतो. गिऱ्हाइकाला

जुमानीत नाहीं, ज्ञान व प्रगति अडवूं शकतो, उत्पादनसामग्री, उत्पादनशक्ति, निरुपयोगी व निकामी करूं शकतो. गिऱ्हाइकाला जें हवें तें न देतां जें हा देईल तें घ्यावयास लावतो. संपत्तीचें वांटप विषमतेनें करून श्रीमंत व गरीब यांच्यांतील अंतर वाढवितो. मागें सांगितल्याप्रमाणें भावयंत्र ( बाजारांतील किंमतीचें मान ) जें गिऱ्हाईक व योजक यांचा मेळ बसवून, त्यांच्या हितसंबंधाची जुळणी करण्याचें काम करीत असतें, त्याच्या कामांत ही मक्तेबाजी चढाओढीच्या अभावामुळें विपर्यास उत्पन्न करते. कारण बाजारांतील भावांच्या चढउतारावर, मागणी व पुरवठा पूर्णपणें अवलंबून न राहतां मक्तेबाजी उत्पादनांतील तंत्रावर या गोष्टी अडल्या जातात, व त्यामुळें योजक व गिऱ्हाईक यांच्यामधील विपर्यास व विरोध वाढतो. भांडवलशाहींत हा विरोध असणारच, कारण उत्पादनसामग्रीचे मालक व गिऱ्हाईक, यांचे हितसंबंध एक असले तर भांडवलवाल्यांना नफा कुठला ? म्हणून जसजसें उत्पादनतंत्र प्रगतिपर होत जातें तसतसा हा विरोध वाढत जातो. उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊं लागलें म्हणजे योजकांची संघटना अपरिहार्य. तशी संघटना झाली कीं मक्तेबाजी अपरिहार्य व ती झाली म्हणजे, वर पाहिल्याप्रमाणें दोन वर्गांचा विरोध वाढतच जाणार ! कारण योजक जास्तींत जास्त नफा काढूं इच्छिणार. समाजाची गरज ही गोष्ट त्यांच्या तंत्रांत नाहीं, व त्यामुळें संपत्तीचें, भांडवलाचें केंद्रीकरण, एका हातांत अगर मर्यादित लोकांच्या हातांत येणें अपरिहार्य होतें. हें जसजसें होत जातें तसतसें दुसऱ्या टोंकास दारिद्र्य वाढत जातें. सुखाचा मक्ता थोड्यांना, दुःखाचा वांटा शें. ९९ ना हें विरोधी दृश्य समाजांत दिसतें. किंबहुना भांडवलशाही उत्पादनांत हें असें होणें अपरिहार्य आहे. मग ती भांडवलशाही मक्तेबाजी, १०० टक्के मक्तेबाजीच्या स्वरूपाची असो अगर कमी प्रमाणाची असो. थिजलेलें तूप व पातळ तूप दोहोंतहि तुपाचाच स्वभावधर्म असतो; थिजलेलें तूप थोड्या जागेंत राहूं शकतें आणि पातळ थोडी जास्त जागा व्यापतें इतकाच फरक.

---

# १५. मजुरी

आतांपर्यंत उत्पादनाचा विचार करतांना योजक, मक्तेबाजी यासंबधीं आपण विवेचन केलें; व मक्तेबाजीमुळें वर्गविरोध कसा वाढत जातो हेंहि पाहिलें. उत्पादन-घटकांपैकीं एक प्रमुख घटक म्हणून श्रम, मजुरांचे श्रम, याबद्दल थोडासा उल्लेख मागें आला आहे. उत्पादनसामग्रींतील हा मेरुमणि याचा विचार जास्त विस्तारानें व्हावा हे अगदीं रास्त आहे. म्हणून या भागांत या गोष्टीचा निरनिराळ्या दृष्टींनीं विचार करावयाचा आहे. निरनिराळ्या धंद्यांत मजुरीचे दर निरनिराळे कां? एकाच धंद्यांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे कां? हे दर कसे ठरले जातात? उत्पादनाच्या तंत्राचा व मजुरीच्या दराचा संबंध काय असतो? मजुरांचा पुरवठा होण्याचे कामीं कोणत्या गोष्टी उपयोगी पडतात, व कोणत्या अडथळा आणतात? वगैरे अनेक प्रश्नांचा विचार करून मग मजुरांचे संघ, किमान राहणी, बेकारी वगैरे प्रश्नांचा विचार करावयाचा आहे.

सर्वच माणसें सारखीं असलीं, सर्वच मजुरी करीत असलीं तरी सर्वांचे श्रम सारखेच नसतात. श्रमाश्रमांत फरक आहे. चिखल तुडविणारा कुंभार पायानें श्रम करतो, घण मारणारा लोहार हातानें, गवंडी, सुतार, हातानेंच पण निराळा प्रकार; त्याचप्रमाणें सांचा चालविणारा कारागीर याचेहि श्रम निराळे; कारण ज्या वस्तूंच्या संबंधांत हे श्रम करावयाचे त्यांचें स्वरूपहि निराळें. एकाच व्यवसायांत अगर धंद्यांत सुद्धां, श्रमांचे निरनिराळे प्रकार असतात. कोणी माती तुडवील, कोणी थापील, कोणी चाक फिरवील, कोणी वाणांना रंग देईल वगैरे. डॉक्टर, नाडीपरीक्षा करणारा व उत्तम सर्जन शस्त्रक्रिया करण्यांत हुशार, या दोघांच्याहि श्रमांत अर्थात् बुद्धीचे श्रमांत फरक आहे. प्राथमिक शाळेचा शिक्षक व कॉलेजचा प्रोफेसर, यांच्याहि श्रमांचे प्रकारांत फरक असणारच. विणकर व सूत पिंजणारा त्याचप्रमाणें गिरणींतील निरनिराळ्या खात्यांतील मजूर हे सर्व निरनिराळ्या प्रकारचे श्रम करीत असतात. फार काय रस्ते साफ करणारा मजूर व ऑफिस साफ करणारा मजूर, यांच्याहि श्रमांत फरक आहे.

म्हणून श्रमांचे दृष्टीनें व्यवसाय अगर रोजगार याची व्याख्याच जर करावयाची म्हटलें तर, ज्यामध्यें सारख्या स्वरूपाचे श्रम सर्वजण करतात ते सर्व एका रोजगारांतले, एका व्यवसायांतले. ही अगदीं कांटेकोर व्याख्या नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. निरनिराळ्या धंद्यांतील कामगार निरनिराळ्या दरानें मजुरी मिळवितात, हें प्रत्यक्ष आपण पाहतों. या दृष्टीनें वरील व्याख्या लक्षांत घेतली पाहिजे. एकाच महिन्यांत एक मजूर दुसऱ्यापेक्षां जास्त मिळवितो. कांहीं कारखाने एकच पाळीनें चालतात, कांहींत दोन पाळ्या चालत असतील. कांहीं मजुरांना दिवसांतला सर्व वेळ काम मिळतें असें नाहीं. कांहीं मजूर जास्त श्रम करतात, त्यामुळें त्यांना जास्त मिळतें. जर तासांवर मजुरी नसून प्रत्यक्ष केलेल्या कामावर असेल, तर निरनिराळे मजूर निरनिराळ्या प्रमाणांत मिळवितात. जो जास्त काम करील तो जास्त मिळवील. जेथें दररोज अमुक वेळ काम करावयाचें असें असेल, तेथें अर्थात् सर्वांच्या मजुरीचें प्रमाण सारख्या श्रमाचे कामास सारखें. सर्वच धंद्यांत कांहीं मापानें काम देतां येत नाहीं. दहा मुलांना शिकविल्यास १०० रु. पगार व विसांना शिकविल्यास २०० रु. अशी व्यवस्था करणें अशक्य असतें. नक्यावरील कारकुनास १०० पास फाडण्यास दरमहा १५ रु. पगार आणि १५० फाडील तर २५ रु. असें करणें शक्य नाहीं. गांवांत किती माल येणार हें त्याच्या स्वाधीन नाहीं. कापडाच्या गिरणींत काम करणाऱ्या मजुरांना कांहीं खात्यांत मापावरून मजुरी देणें अशक्य असतें. किंबहुना यंत्रामुळें मापानें काम देणें हें कमी कमी होत आहे; साधारणपणें दर दिवसाचे ठराविक तास काम करावयाचें व त्यावर मजुरीचे दर ठरवावयाचे; शिवाय जेथें मापानें काम देणें शक्य असतें, तेथें जास्त प्राप्तीचे आशेनें कामगार काम जास्त करतात. पण काम हलक्या प्रतीचें निघतें. शिवाय कामाची प्रतहि ठरविणें कठीण असतें. मापानें रचाई दिली कीं, गवंडी लवकर उरकून टाकण्याचे मागें असतो व कामहि चांगलें होत नाहीं, हा अनुभव आहे. शिवाय काम योग्य झालें कीं नाहीं, याबद्दल बखेडा उत्पन्न होतो तो निराळाच. यंत्रांनीं चालविलेल्या कारखान्यांत व मोठाल्या धंद्यांत तर मापानें काम देणें, हें आणखी अवघड व धोक्याचें ठरतें. यंत्रविरहित धंद्यांत मापानें काम देणें ठीक असेल, पण वर सांगितल्याप्रमाणें यंत्रानें सिद्ध होणाऱ्या उत्पादनांत तें क्वचित् दिलें जातें. रोजंदारीनें काम दिलें म्हणजे चांगला कामगार, प्रामाणिक व नेकीनें काम करणारा कामगार, जास्त काम करतो, पण त्याला मजुरी जास्त द्यावी लागत नाहीं. कोणी जास्त केलें व कोणी कमी केलें हें सांगणें पुष्कळ वेळां कठीण असतें. म्हणून सर्वांना सारखाच रोजमुरा देण्यांत येतो. कामगार मोठ्या प्रमाणावर घ्यावयाचे झाले तर, प्रत्येक मजुराशीं विचारपूस करून,

ठराव करणें कठीण असतें. हजारोंनीं कामगार पाहिजेत तेथें योजक कामाचें स्वरूप व दर सांगतो व कामगार कामावर घेण्यांत येतात. जेथें कामगार संघटित आहेत, त्यांचे संघ झाले आहेत, तेथें मालक अगर मालकसंघ मजुरांचे संघांशीं ठराव करून, मजुरीचे दर निश्चित करीत असतात. जुन्या मजुरांना जास्त मजुरी देणें, हेंहि घडत असतें. वास्तविक ते कांहीं जास्त काम करतात असें नाहीं; पण फार काळ त्याच मालकाकडे अगर कारखान्यांत काम केल्यामुळें त्यांना जास्त मजुरी मिळाली तरी, नवीन मजूर तक्रार करीत नाहींत, हेंहि दृश्य दिसतें.

त्याच धंद्यांत काम करणारे, पण निरनिराळ्या ठिकाणीं काम करणारे, यांच्या मजुरींत फरक असूं शकतो. मुंबईत सुतार रोज मजुरी ३ रु. ८ आ. पर्यंत मिळवितो. पुण्यास २ रुपयाच्या पुढें नाहींच. आणखी तालुक्याचें गांवीं १२ आणे फार तर १ रु. पर्यंत चांगला सुतार रोजानें मिळतो. मुद्दाम युद्धपूर्व कालांतील दर दिले आहेत. युद्धकालांत व युद्धोत्तर, मजूरीचे दरांत झालेली वाढ दीर्घकाल टिकणारी नाहीं. आजहि वाढलेले दर सर्वत्र सारखे वाढले आहेत असें नाहीं. प्रदेशपरत्वें राहणींत फरक असल्यामुळें हे होणें अपरिहार्य आहे. मुंबईतील राहणी खर्चाची म्हणून तेथील दर अधिक, हें उघड आहे. 'लंकेंत सोन्याच्या विटा' मुबलक, पण पावशेर तेलास सोन्याच्या पांच विटा पडणार, तोच न्याय येथेंहि लागू पडतो. भयंकर घरभाडें, कामाची खात्री कमी, शिवाय अन्य खर्च जास्त. पैशाच्या दृष्टीनें, पैशाच्या मापानें, मुंबईत मजुरी जास्त, पण वस्तूंच्या व सोयींच्या दृष्टीनें म्हणजे खऱ्या दृष्टीनें, खरो-खरच तितकी जास्त असतें असें नाहीं. शिवाय खऱ्या दृष्टीनें जरी जास्त असली तरी, कामगार पटकन् स्थान सोडून जात नाहीं. एका जागींच चिकटून राहण्याची ही त्याची वृत्ति असल्यामुळें, हाहि फरक पडत असतो. कामगार जर अगदीं तल्लख असला तर ताबडतोब जिकडे जास्त मजुरी तिकडे जाईल व सर्वत्र मजुरीचे दर सार-खेच होतील. पण जन्मगांवांना, नाहींतर जेथें एकदां काम मिळालें, सुरुवात केली, त्याच गांवीं चिकटून राहण्याची त्याची सनातनी वृत्ति असल्यामुळें तो तसें करीत नाहीं, त्यामुळेंच मजुरीचे दरांत हे फरक राहतात. काम कमीजास्त झाल्यामुळें होणारे फरक, त्याचप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं दिसणारे मजुरीचे फरक हे कां होतात, हें सहज समजून येण्यासारखें आहे. पण एकाच ठिकाणीं एकाच धंद्यांत, सारखेंच काम असतांना सद्धां, निरानिराळ्या मालकांकडे अगर योजकांकडे मजुरींत फरक असतो, हा अनुभव प्रत्यक्ष आपण पहातों. असें कां व्हावें ? जो मालक तेजींत धंदा करीत असतो, तो मजुरांना जास्त देतो. दुसरा मालक धंदा बंद करणें परवडत नाहीं

म्हणून मंदींत चालवितो व कमी मजुरी देतो. मजूरहि अगदीं बेकारीपेक्षां थोडी कमी मजुरी पतकरून काम करतात. पण पहिल्या मालकानें आपले पहिले मजूर कमी केले व थोडेसे दरहि कमी केले तरी, तेच मजूर कमी केलेल्या दरावर काम करतील. कारण नाहीं तर बेकारी ! किंवा दुसऱ्या मालकाचे मजूर, पहिल्या मालकाची मजुरी जरी कमी केलेली असली तरी त्यांना मिळणाऱ्या मजुरीपेक्षां जास्त असेल तर इकडून तिकडे जातील; व असें होतच असतें. अखेरीस सर्वत्र सारखाच दर बसतो; म्हणजे कमीच होतो. पण हें घडून येईपर्यंत हा फरक राहतो व याचें कारण पुष्कळवेळां, मालकांना माहिती नसतें, व ही बदलाबदलीची क्रिया होण्याला वेळ लागतो हेंहि खरें आहे. एकदां कमी दरानें मजूर मिळत आहेत हें कळल्यानंतर त्याचा फायदा न घेणारा योजक भांडवलशाहींत मिळणें दुर्मिळ. 'मनुष्याणां सहस्रेषु' सुद्धां नाहीं; अगदीं नाहींच म्हटलें तरी चालेल. पुढील विवेचनांत एकाच धंद्यांत सारख्या श्रमाला सारखी मजुरी हाच अनुभव खरा; म्हणून तात्कालिक असणारे फरक सोडून देऊन त्यालाच अनुसरून अन्य प्रश्नांचें विवेचन केलें पाहिजे.

मजुरी म्हणजे काय ? केलेल्या कामाचा जो मोबदला ठरल्याप्रमाणें कामगाराला मालकांकडून मिळतो, त्याला आपण मजुरी म्हणूं. मजुरी आणि पगार यांत वस्तुतः कांहींएक फरक नाहीं. पगार, महिन्याची मजुरी अगर वर्षाची मजुरी. कामगारांची मजुरी, सामान्यतः रोजावर अगर आठवड्यावर व कांहीं ठिकाणीं तासांवर ठरत असते येवढेंच. दोन्हीं ठिकाणीं मेहनतीचा, केलेल्या श्रमांचा मोबदला, म्हणजेच मजुरी अगर पगार; म्हणून यांत मूलभूत अगर महत्त्वाचा कांहीं फरक नाहीं. तथापि अगदीं रोजंदारीनें काम करणारा मजूर व स्वतंत्र कामगार यांत फरक आहे. मजुराला दुसऱ्यासाठीं काम करावें लागतें. शेतावरचा मजूर दुसऱ्याच्या शेतांत काम करील. गिरणींतला मजूर दुसऱ्याच्या गिरणींत काम करील. त्यांच्या श्रमापासून होणाऱ्या उत्पादनाशीं त्यांचा संबंध नसतो. कापूस वेंचणाऱ्या मजुरांचा कापूस काय भावानें विकला जातो, याच्याशीं संबंध नसतो. कारण तो शेताच्या मालकासाठीं वेंचतो व मजुरी घेतो. गिरणींतला मजूर सांचा चालवील, मजुरी घेईल. झालेल्या कापडाशीं त्याचा संबंध नाहीं. वकील काम चालवील आपली फी घेईल, खटल्यांत होणाऱ्या निकालाशीं त्याचा संबंध नाहीं; मिळकत मिळाली किंवा गेली तर अशिलाची. थोडक्यांत तो दुसऱ्यासाठीं काम करतो व श्रमांचा मेहनताना घेतो, तेवढयापुरता त्याचा संबंध. याचे उलट फेरीवाल्याचें उदाहरण घेऊं. तो माल गाडींत घालून अगर खांद्यावर वाहून विकतो; जें कमी अगर जास्त मिळेल तें त्याचेंच. उत्पादनाशीं, विक्रीशीं

त्याचाच संबंध; नफानुकसानीस तोच जबाबदार म्हणून आपल्या व्याख्येप्रमाणें तो योजक. तसेंच ग्रंथलेखक. हाहि योजकच. हा दुसऱ्यासाठीं खपत नाहीं. जें मिळेल अगर न मिळेल त्याची जबाबदारी त्याचीच. योजकाला दुसरीकडे तेंच कांम नोकर या नात्यानें केल्यापासून होणाऱ्या प्राप्तीपेक्षां जास्त मिळण्याचा संभव असेल तर तें तो करील हें आपण मागें पाहिलें आहे. समजा, हा फेरीवाला नुसत्या आठ आणे रोजावरचा नोकर आहे, होणारी विक्री सर्व मालकाकडे जावयाची व फक्त आठ आणे त्याला मिळावयाचे. असें झालें तर तो निव्वळ मजूर झाला, पण जर त्याला असें वाटत असेल कीं, आपल्या जबाबदारीवर माल घेऊन, दिवसभर हिंडून आठ आण्यांपेक्षां जास्त मिळवूं, तर तो हें काम हातीं घेतो. पण बहुतेक त्याची अशा रीतीनें होणारी प्राप्ती, तेंच काम नोकरीनें करून होणाऱ्या प्राप्तीपेक्षां फार कांहीं जास्त असत नाहीं. मजूर व स्वतंत्र मजूर यांच्यांतला वर लिहिल्याप्रमाणें असलेला फरक लक्षांत घेतला पाहिजे. तथापि, प्रत्यक्ष स्वतंत्र मजूर वर लिहिल्याप्रमाणें फार थोड्या प्रमाणांत जास्त मिळवितो; व यामुळें प्रत्यक्ष मजुरीचे दर ठरतांना स्वतंत्र मजुराच्या अस्तित्वाचा त्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. इतर मजुरांबरोबरच त्याचेहि 'दर' म्हणा अगर प्राप्ति ठरली जाते. छापखान्यांत खिळे जुळणारे कांहीं ठिकाणीं रोजंदारीनें असतात. कांहीं ठिकाणीं त्यांना मापाप्रमाणें मजुरी दिली जाते. कांहीं ठिकाणीं स्वतंत्र मजुरासारखे ते असतात म्हणजे काम अंगावर घेऊन तें करतात; व त्यांतील होणाऱ्या नफानुकसानीची जबाबदारी पतकरतात. तथापि त्या तिन्ही तऱ्हांनीं केलेले करार, त्या कामाचे दर ठरवतांना सारख्याच गोष्टी विचारांत घेऊन, मालक ठरवीत असतात. या कामांत मजुरांचा पुरवठा कसा होईल हें ठरवितांनाहि सारख्याच गोष्टी विचारांत घेऊन अंदाज करावा लागतो; व शेवटीं कशाहि तऱ्हेनें काम केलें तरी, मजुरीचे दर अखेरीस सारखेच पडतात; अखेरीस म्हणण्याचें कारण स्वतंत्र मजुरास नफानुकसान ताबडतोब जाणवतें. कारण तो जबाबदार असतो. तो स्वतःसाठीं काम करतो. दुसरे मजूर यांना उत्पादनांतलें नफानुकसान ताबडतोब जाणवत नाहीं. कारण त्याचा पहिला मारा मालकावर बसतो. पण कालांतरानें अखेरीस त्यांच्यापर्यंत, नफ्याचें नसलें तरी नुकसानीचें लोण येतें व दर कमी होतात. ताबडतोब मजुरीचे दर मालक बदलीत नाहीं. पण बदलल्याशिवायहि तो रहात नाहीं हेंहि निश्चित. किंमतींतील फरक, स्वतंत्र मजुरांचे चेहऱ्यावर ताबडतोब उठतात. तसें नुसत्या मजुरांचें बाबतींत होत नाहीं. पहिला धक्का मालकाला बसतो, पण, मलईहि पण त्यालाच मिळते.

शेतकीच्या धंद्यांत वरील दृश्य जास्त उठावानें दिसतें. कारण बहुतेक शेतजमिनींत

त्यांचे मालक मेहनत करीत असतात, अर्थात् ते स्वतंत्र मजूर असतात. एकतर जमीन त्यांच्या मालकीची असते, नाहींतर ती खंडानें घेतलेली असते. कांहीं जरी असलें तरी तो जेव्हां ती स्वत: कसतो तेव्हां, जें पीक होईल, त्याची जबाबदारी त्याचीच असते. तो योजक असून नफा अगर नुकसान, या दोन्हीला तोच जबाबदार असतो. धान्याचा अगर तो जें पीक उत्पन्न करीत असेल त्याचा भाव उतरला कीं, पहिला परिणाम त्याचेवर होतो. तो खंडकरी असल्यास, मालक कांहीं भाव कमी झाला म्हणून खंड कमी घेत नाहीं. त्याच शेतावर काम करीत असलेले साधे रोजंदारीचे मजूर, भाव कमी झाला म्हणून मजुरी कमी घेत नाहींत, त्याची स्थिति भयंकर होते. शेती सोडून नुसती मजुरी करण्यास तो तयार नसतो. पुढील वर्षीं स्थिति सुधारेल म्हणून पदरचे घालून पुनः दुसरें वर्षी पिकवीत असतो. पण पुनः भाव चढला नाहीं तर अगर आणखी मंदावला तर, तो जवळ जवळ निकालीं लागतो. दुसरीकडे मजुरी करून त्यास जास्त मिळालें असतें. पण येथें तें तर नाहींच; उलट पदरचें भांडवल घालवावें लागतें. १९२९ पासून ते जवळ जवळ १९३४–३५ पर्यंत सर्वत्र जगभर जी मंदी झाली, ती सर्वांत अशा स्थितींतील शेतकऱ्यांना जास्त जाणवली. त्याच्या उलट जे नुसते मजूर होते, त्यांना ही झळ प्रथम लागली नाहीं. कारण नफानुकसानीशीं त्यांचा संबंध नव्हता. कांहीं काळानें त्यांच्या मजुरीचे दरहि अर्थात् मंदाईमुळें कमी झाले, पण निदान ते संपूर्णपणें अगदीं बेकारींत आले नाहींत. ज्या देशांत धान्य पुरवठा अगर शेतींतून पैदास होणारा माल, परदेशांतून येत असे, त्या देशांतील शेतकऱ्यांना तेथील सरकारांनीं आयात कर बसवून संरक्षण दिलें; त्यामुळें भाव कांहीं तरी टिकून राहिले. ज्या देशांतून असा माल परदेशीं जात असे, त्या देशांत सरकारनें शेतीच्या उत्पादनावर नियंत्रण घातलें व उत्पादन कमी करून भाव कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. आपल्या हिंदुस्थानांत सरकारनें यांपैकीं धड कांहींहि केलें नाहीं व त्यामुळेंच तर १९२९ ते १९३५–३६ पर्यंत, शेतकऱ्यांचे फारच हाल झाले. १९४२ पर्यंत या मंदाईचे परिस्थितींतून हिंदुस्थानांतील शेतकरी मुक्त झाला नव्हता. शेतीच्या धंद्यांत कांहीं मजूर, कांहीं स्वतंत्र मजूर असे दोन्ही प्रकार असतात. कांहीं धंदे असे आहेत कीं, तेथें स्वतंत्र मजुराला जागाच नाहीं. खाणींतून कोळसे काढण्याचा धंदा, यांत काम करणारे मजूर, सर्व मजूर, मालकांवर अवलंबून असतात, स्वतंत्र कोणी नाहीं. तसेंच गोदींत काम करणारे, रेल्वेंत काम करणारे, सर्वस्वीं कंपनीवर अवलंबून असतात. समजा, कोळशाचे धंद्यांत मंदाई आली, माल काढून किंमत येईनाशी झाली म्हणजे साहजिकच मजुरीचे दरावर गदा आली. मालक म्हणणार

तुझ्या श्रमांमुळें निघालेल्या मालाला किंमत कमी आली म्हणून तुझ्या श्रमालाहि किंमत कमी दिली पाहिजे. परंतु या धंद्यांतील मजूर संघटित झाले तर ते आपली मजुरी, किमान मजुरीपेक्षां कमी होऊं देणार नाहींत. याचा परिणाम खर्चाचे मानानें कमी प्रमाणांत उत्पादन निघणाऱ्या खाणींवर होऊन त्या बंद होतील. त्यामुळें कांहीं मजूर अगदीं बेकार होतील. पण जे राहतील, त्यांची मजुरी कमी होणार नाहीं. कमी उत्पादनानें भाव स्थिर होतील; व जे मजूर कामावर राहतील, त्यांचे श्रम त्यांना पूर्वी इतकाच मोबदला मिळवून देतील. तीच स्थिति अशा स्वरूपाच्या धंद्यांत मजुरांबाबत होते. रेल्वे कंपन्या होणारें नुकसान दोन प्रकारांनीं भरून काढतात. एक सर्वत्र पगारकाट करून म्हणजे प्रत्येक कामगाराच्या पगारांत काट करून व दुसरा पगार कायम ठेवून पण नोकरांची संख्या कमी करून. दुसऱ्यांत जे राहतात त्यांचें ठीक होतें. पण जे बेकार झाले त्यांची स्थिति वाईट ! मजूर कमी करून श्रमाची किंमत कायम ठेवणें, म्हणजेच उत्पादन कमी करून भाव अगर किंमत कायम सांवरुन धरावयाची. मजूर कमी करून मजुरीचा दर कायम ठेवणें हें कित्येक ठिकाणीं मजुरांची संघटना फोडण्याकरितांच मालकांकडून अमलांत आणलें जातें. तथापि स्वतंत्र मजूर व अवलंबी मजूर, यांच्यांत वरील प्रकारें फरक दृष्टीस पडतात. हीच गोष्ट एका निराळ्या दृष्टीनें आपण मांडून पाहिल्यास आणखी एक फरक दिसून येईल. शेतकरी अगर स्वतंत्र मजूर हे जें उत्पादन करतात त्यांत मागणी मंदावली, कमी झाली, तर त्यांचें उत्पादन कमी होतें; पण मजूर ज्या धंद्यांत काम करतो त्यांत मागणी मंदावली, कमी झाली म्हणजे बेकारी उत्पन्न होतें. शेतकऱ्यांच्या उत्पन्नापेक्षां उद्योगधंद्यांतील मजुरांची मजुरी, ही पुष्कळ निश्चित खरी पण बेकारीचें क्षेत्रहि उद्योगधंद्यांतच जास्त. उद्योगधंद्यांतच बेकारी अधिक. गिरणी बंद झाली कीं एकदम काम बंद, पुनः केव्हां उघडेल हें मालकावर अवलंबून. शेतींत कांहीं ना कांहीं तरी मिळतेंच, म्हणजे तींत पीक चांगलें येतें, मंदीमुळें फक्त धान्याला भाव नसतो, कमी पिकलें तरी टाळेबंदी नाहीं.

उत्पादनाच्या अनेक घटकांप्रमाणें श्रमाला मागणी, मजुरांना मागणी ही परावलंबी. म्हणजे उत्पादनाला, वस्तूंना मागणी आली कीं, ती तयार करण्याकरितां कच्चा माल, मजूर वगैरे ज्या गोष्टी लागतात त्यांना मागणी. कापडाला मागणी आली म्हणजे कापसाला म्हणजेच कामगारांना, हें उघड आहे. गिऱ्हाईक कापड मागतें कापूस मागत नाहीं अगर विणकर मागत नाहीं, त्याला कापड हवें असतें, व तें सरळ कापड मागते; गिऱ्हाइकाची मागणी अगदीं सरळ व मूलस्वरूपीं. त्याच्या उलट मालक—योजक हे जे मजुरांच्या श्रमांची मागणी करतात, ते त्यांचे श्रम त्यांना श्रम

म्हणून हवे असतात म्हणून नव्हे; तर त्यांच्या श्रमांपासून जे पदार्थ तयार होतात जें उत्पादन ते तयार करतात, त्याकरितां त्यांची जरूरी असते. मालक, मजुरांचे श्रम, ते किती तास व किती मेहनत करतात, या दृष्टीनें मोजीत नाहीं; तर त्या श्रमांनीं किती उत्पादन झालें व त्याची किंमत किती येईल, या दृष्टीनें तो मोजीत असतो. म्हणून उत्पादनाचे मागणीवर, तयार वस्तूंच्या मागणीवर, मजुरांची मागणी, त्यांचे श्रम हवेत कीं नकोत, हें योजक ठरवीत असतो. एका दृष्टीनें योजक मजुरांचे श्रम विकत घेतो; व इतर साधनसामग्रीशीं ते मिळवून, त्यामुळें तयार झालेलें पदार्थ विकतो असा याचा अर्थ होतो. ज्याच्या श्रमांमुळें वस्तूंना किंमत आली, त्याला काय मिळतें, याचाहि विचार आपण केला पाहिजे; व तो आपण पुढें करूं. तूर्त या भागाचे सुरुवातीस उपस्थित केलेले प्रश्न, आपण समजून घेऊं.

पुष्कळ धंद्यांत कांहीं कामें सारखीं असतात व तीं कामें करणारे या धंद्यांतून त्या धंद्यांत जातात. उदा०, कारकून, पट्टेवाले, नुसतें फिटर काम करणारे वगैरे. परंतु कांहीं काम त्या त्या धंद्यांतच होतें व तें काम करणारे दुसऱ्या धंद्यांत निकामी ठरतात. खाणींत ज्यांनीं काम केलें असेल, अशांनाच खाणीवाले लोक कामावर घेतील हें उघड आहे. माहितगार कामगार नेमल्यानें, उत्पादन वाढून त्यांची प्राप्ति वाढतें; म्हणूनच योजक त्यांना कामावर घेतात. जास्त प्राप्ती होण्याचा जितका संभव अधिक, त्या प्रमाणांत योजक अधिक कामगार कामावर घेत जाईल. त्याच्या उत्पादनापासून जर बाजारभावावर परिणाम होत नसेल, म्हणजे उत्पादन मोठ्या प्रमाणावर नसेल, त्या उत्पादनापासून अधिक कामगार नेमून त्यांच्या मजुरीपेक्षां अधिक प्राप्ती होत नसेल, तर तो उत्पादन वाढविणार नाहीं. कारण तें वाढवून फायदा नाहीं. त्याचप्रमाणें अशा परिस्थितींत तो कामगार कमीहि करणार नाहीं. कारण कामगार कमी केलें तर त्याची प्राप्तीहि कमी होईल. थोडक्यांत तो उत्पादन व उत्पन्न यांच्यांत कमाल नफा करण्याचे दृष्टीनें मेळ बसवील व तो मेळ बसवितांना मजुरीचा दर किती देणें परवडेल, हेंहि त्याला समजून येईल. अधिक मजूर लावून होणारा अधिक मजुरी-खर्च व अधिक होणाऱ्या उत्पादनाची किंमतहि सारखी झाली कीं, मजुरीचा दर निश्चित होईल. मजुरांची मजुरी या परवडणाऱ्या उत्पादनाचे किंमतीइतकी—सीमागत उत्पादनाचे किंमतीइतकी राहते. पूर्वीपेक्षां एक मजूर अधिक लावून जो अधिक कोळसा निघतो त्याची किंमत जर त्याच्या मजुरीइतकीच मिळाली, तर तोच मजुरीचा दर योजक सामान्यपणें ठरवितो. यापेक्षां जास्त ठरविल्यास त्यास नकसान येईल. हें उघड आहे म्हणून तें उत्पादन त्यास परवडणार नाहीं.

बाकी सगळी उत्पादनसामग्री कायम असेल, व नुसते मजूरच जर कमीजास्त होत असतील, तर त्या मानानें योजकांचा उत्पादनखर्च कमीजास्त होईल; आणि आपण मागें पाहिलें आहे कीं, एकच उत्पादकघटक कमीजास्त होतो व बाकीचे कायम आहेत अशा स्थितींत एका मर्यादेनंतर तो बदलणारा घटक वाढत गेला, तर त्यापासून कमी कमी उत्पादन होत जातें, उतरत्या उत्पादनाचा नियम लागू पडतो. मजुरांची संख्या ठराविक मर्यादेपलीकडे गेली कीं, त्या मानानें उत्पादन कमी होऊं लागतें, मात्र बाकी सगळी उत्पादनसामग्री कायम आहे, त्यांत भर पडली नाहीं अशी परिस्थिति पाहिजे. जमिनीचें उदाहरण आपण मागें पाहिलें आहे. जमीन कायम, अशा स्थितींत कामगारांची संख्या मर्यादेपलीकडे वाढविली कीं, उत्पादन कमी कमी होत जातें. म्हणजे कामगारांच्या संख्येच्या मानानें कमी कमी होत जातें. पूर्वी एक कामगार लावून जें उत्पादन होत होतें, तें आतां कमी होऊं लागलें. समजा, एका डेअरींत प्रत्येकीं चार शेर दूध देणाऱ्या १०० म्हशी पिळण्याकरितां १० गवळी मजूर लावले. त्या वेळीं एका गवळ्यामागें, एका मजुरामागें, ४० शेर दूध निघतें. समजा, आठ गवळी ठेवले तर कांहीं म्हशी पिळावयाच्या राहतात; कारण एक मजूर जास्तींत जास्त दहा म्हशी पिळतो असें धरलें तर वीस म्हशी राहिल्या, नऊ लावले तर दहा राहिल्या, पण एकंदर दूध वाढत गेलें, व शेवटीं दहा मजूर लावले, त्या वेळीं सर्व म्हशी पिळल्या व ४०० शेर दूध निघालें. आतां ११ गवळी लावले पण म्हशींची संख्या तीच कायम. एक गवळी वाढला, पण दूध वाढलें नाहीं. समजा, गवळी १२ केले, १३ केले, तरी दूध वाढणार नाहीं. याचा परिणाम एवढाच होईल कीं, १० गवळी असतांना प्रत्येक गवळी ४० शेर दूध काढीत होता; आतां अकरा झाले कीं हें प्रमाण ४०० ÷ ११, बारा झाले कीं ४०० ÷ १२ तेरा झाले कीं ४००÷१३, याप्रमाणें होत जाईल. म्हणजे अधिक गवळी लावला कीं त्याची पैदास, तो काढणारें दूध कमी कमी होत जातें म्हणजे उतरत्या उत्पादनाच्या पैदाशीचा नियम लागू होऊन, कमी होते. म्हणून दहा गवळ्यांपेक्षां डेअरीच्या मालकानें जास्त गवळी ठेवल्यास त्यांपासून जेवढें काम मिळावयास पाहिजे तेवढें मिळत नाहीं. त्यानें म्हशी वाढविल्या म्हणजे अन्य उत्पादनसामग्री वाढविली तर गोष्ट निराळी. तात्पर्य, जितके मजूर धंद्यांत जास्त त्या मानानें मजुरीचा दर कमीच होणार; कारण जर उत्पादनसंच कायम, अन्य घटक कायम, व फक्त मजुरांची संख्याच वाढणार, तर वर लिहिल्याप्रमाणें जास्त मजूर आले कीं, उतरतें उत्पादन सुरू होतें; व उतरत्या उत्पादनाचे मानानें मजुरीचा दर राहतो. अगदीं शेवटला मजूर जें उत्पादन करील व त्याची

जी किंमत येईल, त्या मेळांत त्याची मजुरी, असें गणित बसेल. समजा, एकंदर वरील डेअरीवाल्यानें वीस गवळी लावले, तर २०व्या गवळ्याचे वेळीं उत्पादन ४००÷२० म्हणजे वीस शेर हें आलें. आतां नवीन गवळ्यांचा पुरवठा नाहीं म्हणजे वीस शेर हें सीमागत-उत्पादन. दहा गवळी भरपूर काम करीत तेव्हां, त्यांना तो आठ आणे रोज देई म्हणजे मजुरांना देण्याकरितां त्याचे ५ रु. खर्च होत. जसजसे गवळी वाढतील, तशी ही रक्कम वाढण्याचें कारण नाहीं. उलट गवळी वाढला कीं वाढत्या गवळ्यामागें दूध पिळण्याचें प्रमाण कमीच होत गेलें व शेवटच्या गवळ्याचे वेळीं २० शेर झालें. या वीस गवळ्यांना मिळून रुपये पांचपेक्षां तो कधींहि जास्त देणार नाहीं. म्हणून मजुरीचा दर, प्रत्येक गवळ्यामागें चार आण्यापेक्षां जास्त होणार नाहीं. वाढत्या गवळ्यामागें उत्पादन कमी कमी होत जातें, त्यामुळें हा परिणाम होतो. समजा, डेअरीवाला रोकड न देतां गवळ्याला ५ शेरांमागें एक पावशेर दूध, अशी मजुरी देतो. १० गवळी जेव्हां असतील तेव्हां प्रत्येक गवळ्याला मजुरी दोन शेर दूध मिळेल व जसजसे गवळी वाढतील तसतशी दुधांतहि मजुरी कमी होईल. वीस गवळी असतांना प्रत्येक गवळी २० शेर दूध काढतो, म्हणजे मजुरी प्रत्येकीं एक शेर दूध, जास्तींत जास्त मिळेल म्हणजे पूर्वींचा दर दोन शेर पडत होता तोहि कमी झाला, व कदाचित् हें मजुरीचें दूध बाजारांत काय भाव देईल हेंहि अनिश्चित. तात्पर्य, मजुरांची संख्या वाढत गेली कीं, त्यांच्या श्रमांचें उत्पादन, त्या मानानें कमी होतें व शेवटला मजूर जें उत्पादन करील, त्यावर मजुरीचा दर अवलंबून राहतो. त्याच्या मेळांत मालक दर ठरवितो. मजुरांचें सीमागत, परवडणारें उत्पादन व मजुरीचा दर, यांचा मेळ बसतो.

मजुरी ही पैशानेंच दिली जाते. क्वचित् ती धान्यांत अगर वस्तूच्या रूपानें दिली जाते. भांडवलशाहींत मजुरी पैशांतच दिली जाते. शेतींत काम करणाऱ्यांना धान्यरूपानें मजुरी देतात, पण तेंहि आतां कमी होऊं लागलें आहे. प्रत्येक ठिकाणीं मजूर रोकड मागतो. धंद्यांत चढाओढ असली म्हणजे मालाची येणारी किंमत धरूनच, मालकाला मजुरीचा दर ठरवावा लागतो. शिवाय चढाओढीमुळें उत्पादन वाढणें, पुरवठा वाढणें, साहजिक असतें; त्यामुळें मालाचा भाव, किंमत कमी होणें हेंहि चुकत नाहीं. मजुराला त्याच्या उत्पादनाच्या प्रमाणाप्रमाणें त्याच्या श्रमांची किंमत मिळणार. मजुरांची संख्या वाढली कीं, एकंदर वट उत्पादन वाढणार, पण मजुरांचें उत्पादन व्यक्तिशः कमीच होणार. शेवटला लागलेला मजूर जें उत्पादन करील त्यावर सर्व मजुरांचें उत्पादनप्रमाण, व तें अर्थात् कमीच होत गेलेलें असणार. याचा परिणाम असा कीं, श्रमांचें मोल कमी होणार व वट उत्पादन वाढलें

म्हणून, बाजारभावहि कमी होणार; इतकेंच नाहीं तर श्रमांचें मोल जास्त प्रमाणांत कमी होणार. समजा, कोळशाच्या खाणींत काम करणारे पांच हजार मजूर आहेत, व मजुरांच्या उत्पादनाचें प्रमाण (सीमागत उत्पादनाचें प्रमाण) ६ टन कोळसा प्रत्येक आठवड्याला आहे अशी कल्पना करूं. सहा हजार मजूर लावले कीं, हें उत्पादनाचें प्रमाण (सीमागत उत्पादनाचें) ५·५ टन आठवड्याला पडतें असें धरूं. पण सहा हजार मजूर झाल्याबरोबर एकंदर उत्पादन वाढलेंच; समजा, ४० लक्ष टन होतें तें ४६ लक्ष झालें. मग हें सर्व वाढलेलें उत्पादन खपावयाचें झालें तर कोळशाची किंमत भाव, कांहींतरी कमी झाला तर हें शक्य आहे. समजा, भाव पूर्वींच्यापेक्षां कमी झाले, भाव कमी झाल्याबरोबर मजुरानें केलेल्या उत्पादनाची किंमत पैशांत कमी झाली. भाव कमी झाल्यामुळें मजुरीची किंमत कमी होण्याचें प्रमाण जास्त. ६ पासून ५·५ टनांपर्यंत मजुरांचे उत्पादनप्रमाण आलें म्हणजे १/१२ ने कमी झालें, भाव तेच राहिले असते तर किंमतीतहि तेंच प्रमाण राहिलें असतें; पण भाव कमी झाल्यामुळें १/१२ पेक्षां जास्त प्रमाणांत श्रमांची किंमत, खरें मोल कमी झालें. समजा, पूर्वीं टनाचा भाव १० रु. ८ आ. होता, तो १० रु. झाला. उत्पादनाचें प्रमाण ६ पासून ५·५ पर्यंत १/१२ नें कमी झालें; मजुरीचें प्रमाण (६×१०½) म्हणजे ६३ पासून ते (५½ × १०) ५५ पर्यंत कमी झालें, (६३ रु. – ५५ रु. हे) १/८ नें कमी झालें. पण हें १/१२ पेक्षां जास्त आहे हें उघड आहे. म्हणजे मजुरी नुसती पैशांच्या दृष्टीनें कमी होते इतकेंच नव्हे तर, खऱ्या स्वरूपांत, ऐन मूल्यांत सुद्धां कमी होते. आपण गवळ्याचेंच उदाहरण घेऊं. आठ गवळी लावले तेव्हां कांहीं म्हशी पिळण्याच्या राहिल्या, म्हणजे वट उत्पादन डेअरीवाल्याला वाढवितां आलें नाहीं. समजा, त्यावेळीं दुधाला शेरीं ४ आणे भाव होता. पुढें १० गवळी लावले. वट उत्पादन वाढलें, त्यावेळीं मजुरी गवळ्यामागें ८ आ. दिली अगर दोन शेर दूध दिलें. पुढें वीस गवळी लावले, तेव्हां उत्पादनाचें प्रमाण ४० शेरांवरून २० शेरांवर आलें, म्हणजे निम्म्यानें कमी झालें. जर २० गवळी लावले त्यावेळीं दुधाचा भाव जर कमी झाला तर काय होईल पहा. समजा, एक रुपयास पांच शेर असा भाव झाला म्हणजे त्याच्या १ शेर मजुरीच्या दुधाची किंमत १/५ रु. म्हणजे ३ आ. २ २/५ पै- इतकी झाली. उत्पादनप्रमाण गवळ्यामागें निम्म्यानें कमी झालें. मजुरीचें प्रमाण मात्र ८ आ. पासून ३ आ. २ २/५ पै इतकें, म्हणजे निम्म्यापेक्षां जास्त प्रमाणांत कमी झालें.

वरील विवेचनांत मजुरीच्या दरावर कसा अन्यायी परिणाम होतो, हें आपण

पाहिलें. सारखें काम करणारे मजूर मग ते कोठल्याहि धंद्यांत जावोत हाच अनुभव त्यांना लागू होईल. त्याचप्रमाणें जेथें मजूर सारख्याच स्वरूपाचें काम करीत आहेत व मजुरांची ये जा, या धंद्यांतून त्या धंद्यांत फार विलंब न लागतां होऊं शकते, तेथेंहि हाच अनुभव येईल. टायपिस्ट, पट्टेवाला, फिटर, कुठल्याहि धंद्यांत गेले म्हणून त्यांच्या मजुरीच्या दरांत फारसा फरक होणार नाहीं. एकंदर टायपिस्ट, कारकून अगर असल्यासारखें काम करणाऱ्या मजुरांचा पुरवठा जसा असेल, त्या मानानें त्या कामगारांचें उत्पादनप्रमाण (सीमागत उत्पादन प्रमाण) व त्याच मेळांत, वर सांगितल्याप्रमाणें त्यांची मजुरी. जर एखाद्या धंद्यांत जास्त असली कीं, चढाओढीनें दुसरीकडील तेंच काम करणारे मजूर तेथें जातील, व त्याचा परिणाम मजुरीचे दर कमी होऊन सर्वत्र तसल्या श्रमांना सारखी मजुरी करण्याकडे होईल; व तो दर वर सांगितल्याप्रमाणें, एकंदर मजूरसंख्येवर व त्यांच्या उत्पादनप्रमाणावर अवलंबून राहील. समजा, एखाद्या योजकानें एका प्रकारचे मजूर वाढवून उत्पादन वाढविलें, कारण मागणी वाढली, ती पुरी करावयाची होती. त्याला अर्थात् मजुरांची संख्या वाढविल्यापासून प्राप्ति वाढत होती, म्हणूनच त्यानें ती वाढविली, हें उघड आहे. वाढत्या उत्पादनाचें उत्पन्न वाढत्या खर्चापेक्षां जास्त असेपर्यंत तो हें करीत राहील. एक मजूर वाढवून जें उत्पादन वाढलें त्याचें उत्पन्न, त्या मजुराला द्याव्या लागणाऱ्या मजूरीपेक्षां जास्त आहे, म्हणूनच तो जास्त मजूर घेत असतो. जर आणखी मजूर पाहिजे असतील तर तो मजुरीचे दर वाढवील, कारण त्याशिवाय तसले कामगार मिळत नाहींत, अशी स्थिति झाली. याचा परिणाम असल्या मजुरांचा भाव, मजुरीचे दर सर्वत्र वाढले. त्याबरोबर असल्या मजुरांची वाढती मजुरी, कांहीं धंद्यांना परवडणार नाहीं. मग ते त्यांची संख्या कमी करतील व उरलेल्या कामगारांना वाढलेली मजुरी देऊन, त्यांच्या उत्पादनाचें प्रमाण (सीमागत उत्पादनाचें) जास्त करून दोहोंचा मेळ बसवितील. काढून टाकलेले कामगार जेथें मागणी आहे तिकडे जातील, मजुरीचे दर सर्वत्र सारखे होतील व शेवटीं ते दर मजुराच्या परवडणाऱ्या उत्पादनाचे प्रमाणांत राहतील, त्यांच्या मेळांत राहतील.

पण प्रत्यक्ष सृष्टींत मजुरीचा दर परवडणाऱ्या उत्पादनाच्या (म्हणजे वाढत्या उत्पादनाच्या सीमागत उत्पादनाच्या) मेळांत खरोखर राहतो कां? खरोखरच प्रत्येक मालक, अमुक प्रमाणानें मजूर वाढविले, तर अमुक प्रमाणांत उत्पादन वाढतें, असा विचार करून अगर प्रत्यक्ष अनुभव घेऊन वागतो कां? साधारणपणें प्रत्येक कारखान्यांत अगर खात्यांत देखरेख करणारा मॅनेजर अगर व्यवस्थापक कोणता मजूर

किती काम करतो, कसें काम करतो, त्याचें परिमाण तो पाहत असतो. अदलाबदल करून काम वाढतें का, हेंहि पाहत असतो. मोठाल्या गिरण्यांतून व मोठमोठ्या कारखान्यांत, उत्पादनाच्या खर्चाचा तक्ता ठेवीत असतात. समजा, परदेशांना कामाला लावून काम जास्त होत असेल तर, त्यांना कारखानदार लावील. दक्षिणी मजुरांनीं काम केलें तर फायदेशीर पडतें असा अनुभव आल्यास, दक्षिणी मजूर लावील. हें साध्या मजुरांबद्दल झालें. यंत्रें जास्त लावून, कुशल कामगार लावून, कसें उत्पादन होईल व तें फायदेशीर होतें का हें तो हिशेब करून पाहील. प्रत्यक्ष हें सर्व मोठमोठ्या धंद्यांतून ह्या गोष्टी खर्चाचे तक्ते तयार करून ठरविल्या जातात. हल्लींचें उत्पादन अत्यंत भानगडीचें, मोठ्या प्रमाणावरचें व म्हणून अनुमान-धक्क्यानें कोणी वागत नाहीं, अगदीं गणिती हिशेब करीत असतात. मोठमोठ्या कचेऱ्यांतून सुद्धां, किती कारकून लागतील, किती टायपिस्ट लागतील, हें, काम मांडून एक मनुष्य किती करूं शकतो, त्याचा अंदाज करून, तें अनुभवून त्याप्रमाणें व्यवस्था होत असते. हल्लींच्या युगांत उत्पादन म्हणजे गांवचा भंडारा नव्हे, कीं अदमासानें करावयाचें. प्रत्येक गोष्ट कमी खर्चात कशी करतां येईल, ही दृष्टि असल्यामुळें मालकवर्ग कांटेकोरपणें वागतो. खर्चाचे तक्ते तयार करवितो. अनुभवी रंगारी जसा रंग पाहिजे असेल त्याप्रमाणें निरनिराळे रंग घालून तो ते तयार करतो. अगदीं त्याचप्रमाणें योजक आपले गणित बसवीत असतो. बिनहिशेबी कारभार तेथें होऊं शकत नाहीं. कारण मजुरांना पोसणें हा उद्देश नाहीं. शक्य तितकी थोडी मजुरी पडून काम जास्त पाहिजे असतें, म्हणून वर लिहिल्याप्रमाणें मजुरीचे दर ठरले जातात. अगदीं आठवड्याच्या आठवड्याला याप्रमाणें होतें असें नव्हे. मजुरीचा दर व उत्पादनाचें प्रमाण, एकमेकांशीं मेळ बसवितात. याचा अर्थ प्रत्येक क्षणाला हें होतें असा नव्हे; तो मेळ बसविण्यांत जेवढा वेळ जाईल, तेवढा सोडलाच पाहिजे. तात्पुरता या दोहोंत फरक पडेल. पण एकंदरीनें हा मेळ बसतो, हें निर्विवाद. योजकाला एखादे वेळेस मागणी कमी झाली तर, ती कायमची कमी झाली असें वाटत नाहीं; म्हणून तो पुढील आशेनें मजूर अगर त्यांची मजुरी लगेच कमी करीत नाहीं, जमलेला फड मोडीत नाहीं. त्याचप्रमाणें मागणी एकदम वाढली तरी ती कायम राहील अशी खात्री नसते; म्हणून तो मजुरींत ताबडतोब वाढ करीत नाहीं. तथापि ही स्थिति फार काळ राहूं शकत नाहीं. जो योजक आपल्या खर्चाचा व उत्पन्नाचा मेळ घालूं शकत नाहीं, त्यास नुकसानींत जावें लागतें. कारण न परवडणारें उत्पादन तो

कोठपर्यंत करील ? इतर धंदेवाले हुशारीनें वागत असतात, म्हणून त्याला एक तर तसेंच वागलें पाहिजे नाहीं तर निकालीं निघालें पाहिजे.

वरील विवेचन, जे योजक बाजारांत विकण्याकरितां माल तयार करतात, त्यांच्या-पुरतें लागू आहे. म्हणजे ज्यांचा हेतु उत्पादनापासून नफा मिळविणें हाच आहे त्यांना लागू आहे. परंतु हल्लीं कित्येक राष्ट्रांत कांहीं धंदे सरकारी मालकीचे, सरकारीं नियंत्रणाखालीं चालू असतात; सरकारच त्या धंद्यांचें मालक असतें, त्याचा नफा मिळविणें हा हेतु नसून समाजाची सोय व्हावी, गरज भागावी, हा प्रधानहेतु त्या त्या उत्पादनांत असतो. म्हणून सरकारला जी योग्य वाटेल ती मजुरी सरकार आपल्या कामगारांना देऊं शकतें. तथापि, किती मजुरी द्यावयाची यालाहि मर्यादा असतेच. इतकेंच नव्हे तर सरकारी खात्यांतील मजुरांचा दर, कामगारांचें वेतन, खाजगी रीतीनें तसलेंच काम करणाऱ्या कामगारांच्या वेतनाशीं, अगर मजुरीच्या दरांशीं, विसंगत नसतें. किंबहुना सरकार आपले मजुरीचे दर, बाजारांत काय दर आहेत, खाजगी धंद्यांतून तसलेच कामगार काय मिळवितात, हें पाहूनच ठरवीत असतें. अर्थात ज्या जागा वशिल्यानें भरल्या जातात, राजकारणांतील झब्बूगिरीनें भरल्या जातात, जातवार पद्धतीनें अगर निव्वळ हुकूमशाहीनें भरल्या जातात, त्यांना हें लागू नाहीं. आज हिंदुस्थानांतील वरच्या दर्जाचे अधिकाऱ्यांना पगार त्यांच्या लायकीपेक्षां जास्त मिळतो. त्यांच्या लायकीची बाजारभावानें किंमत कितीतरी कमी आहे. हे लोक, आय. सी. एस्., न्यायाधीश, मामलेदार वगैरे बडे पगारवाले अधिकारी, धंद्यांत शिरले तर त्यांच्यापैकीं एखाददुसराच नोकरींत मिळतें तेवढें मिळवील. बाकीच्यांना धंद्यांतल्या सर्वसाधारण प्राप्तीवरच संतुष्ट रहावें लागेल. कित्येक न्यायाधीश वकिली करूं लागलें तर, त्यांना एकहि अशील मिळणार नाहीं. म्हणून जेथें लायकी, अंगचे गुण, यावरच नोकरी अवलंबून आहे, अशा ठिकाणीं सरकारी खात्यांत मिळणारें वेतन, हें वर लिहिल्याप्रमाणें सरकार बाजारभाव पाहून ठरवितें. हजारों पदवीधर झाल्याबरोबर त्यांचा भाव उतरला. आज सरकारी नोकरींत पदवीधरसुद्धां ३० रु. वर लागतो. अर्थात् हें चढाओढीच्या वातावरणांत घडून येतें. समजा, चढाओढीचें वातावरण नाहीं, बाजार मोकळा नाहीं, त्यांत मक्तेबाजी आहे, तर काय परिणाम होईल ? मागें आपण कोळशाचें उदाहरण घेतलें, तेंच पुनः घेऊं. समजा, हा सर्व कोळसा खाणींतून काढण्याचा धंदा एका हातीं आहे. पुष्कळ योजक थोडें थोडें उत्पादन करीत असले तर त्याचा, बाजारभावावर परिणाम होत नाहीं. पण एकाच हातीं सर्व उत्पादन असलें, एकाच्याच नियंत्रणाखालीं तें असलें, तर तो बाजारभावावर

परिणाम करूं शकतो, हें आपण पाहिलें आहे. म्हणून जास्त मजूर लावून उत्पादन वाढविलें तर, त्याचा परिणाम भाव कमी होण्यांत होऊन, प्राप्ति म्हणजे वाढलेल्या उत्पादनाचें उत्पन्न, वाढलेल्या खर्चापेक्षां कमीच येईल. म्हणून मक्तेदार, जर वाढत्या उत्पादनाचें उत्पन्न, त्याला जो जास्त खर्च लागला त्यापेक्षां जास्त येत असेल तर तो मजूर वाढवील, नाहीं तर नाहीं. नवीन मजूर जेवढें उत्पन्न करतो, त्याची पुरी किंमत जर त्यानें मजुरी म्हणून दिली तर त्याला कांहींच फायदा नाहीं; म्हणून मजुरांना परवडणाऱ्या ( सीमागत ) उत्पादनाच्या किंमतीपेक्षां ती कमीच मजुरी देईल. पांच टन जास्त कोळसा एक मजूर अधिक लावून निघाला आणि जर ५ टनांची येणारी किंमत सर्वच मजुरी म्हणून दिली, तर मालकाला काय फायदा राहिला ? हें उत्पादन तो करणार नाहीं. जर त्याच्या लागणाऱ्या मजुरीपेक्षां थोडीशी तरी जास्त किंमत त्याच्या श्रमानें झालेल्या उत्पादनापासून येणार असेल, तरच तो अधिक मजूर लावील. जेथें चुरस आहे, चढाओढ आहे, तेथें आपण पाहिलें आहे कीं, मजुरीचा दर परवडणाऱ्या उत्पादनाचे ( सीमागत ) किंमतीशीं मेळ घालतो. येथें तसें होत नाहीं, कारण मक्तेबाजी असल्यामुळें जास्त उत्पादन केलें कीं भावावर परिणाम होतो. हीच गोष्ट निराळ्या दृष्टीनें आपण पाहिली असतां आणखी एक परिणाम दाखविते. जर चढाओढ असेल, पुष्कळ योजक उत्पादन करीत असतील, व अमुक एक मजुरीचा दर असतांना जेवढे मजूर कामावर असतील, त्यापेक्षां मक्तेबाजी असेल तर तोच दर असतांना, कमी मजूर कामावर असतील. कारण चढाओढींत योजक, जोंपर्यंत जास्त उत्पादनाचा खर्च, जास्त उत्पादनाच्या उत्पन्नापेक्षां कमी असेल तोंपर्यंत, मजूर वाढवून उत्पादन वाढवितील; व जेव्हां अधिक उत्पादनाचा खर्च, अधिक उत्पादनाचे उत्पन्नापेक्षां जास्त होऊं लागेल तेव्हां, लागलीच ते उत्पादन थांबवितील. मजुराची मजुरी त्याच्या उत्पादनाच्या किंमतीइतकी होईपर्यंत ते मजूर वाढवितील. मक्तेबाजींत, मक्तेदार, मजूर वाढवून होणारा अधिक खर्च, अधिक उत्पन्नापेक्षां कमी असेल तरच वाढवील. मागें सांगितल्याप्रमाणें एखाद्या धंद्यांत अशा स्वरूपाचें काम असतें कीं, तें करणारा मजूर दुसरीकडे निकामी होतो, उदा०, कांचेचे कारखान्यामधील कांच फुंकणारे. असला धंदा करणारा एकच योजक असला तर त्याच्यावर सर्वस्वीं असल्या मजुरांचें म्हणजे एककामी मजुरांचें जीवन अवलंबून राहील. तो मजुरांना जी मजुरी देईल ती घेणेंच त्यांना प्राप्त आहे. पण हेंहि फार काळ टिकणार नाहीं. कारण मजूर तें काम सोडून दुसरें काम शिकून दुसऱ्या धंद्यांत जातील. योजक ही स्थिति येऊं देणार नाहींत. शिवाय, एखादी वस्तु

उत्पादन करणारा योजक अगदीं एकच अशी स्थिति क्वचितच असते. उलट असले तज्ज्ञ कामगार जास्त लागले तर जास्त मजुरी दिल्याशिवाय भागत नाहीं; ही जास्त मजुरी नव्या व जुन्या सर्वांना द्यावी लागते. कारण एकाच कामावर असतांना व सारखें काम करीत असतांना, एकास मजुरी कमी व एकास जास्त, ही गोष्ट होत नाहीं व यामुळें परवडणाऱ्या उत्पन्नापेक्षां खर्च जास्त होईल, म्हणून असले मजूर वाढविण्याच्या अगर असलेले घालविण्याच्या भानगडींत योजक पडणार नाहीं. म्हणून असल्या प्रकारच्या एककामी मजुरांचे दर फारसे बदलत नाहींत. गुऱ्हाळावर काम करणारे गुळवे, हे मजूर याच तऱ्हेचे; ते दुसरें काम करीत नाहींत व त्यांच्या मजुरीचे दर इतर मजुरांच्या दरांप्रमाणें क्वचितच कमीजास्त होतात. कित्येक ठिकाणीं अगदीं वर्षासनाप्रमाणें त्यांचें वेतन असतें. ते मोसमाला येतात, काम करतात व मोसम संपला कीं जातात. त्यांचें हें काम अन्य मजूर करूं शकत नाहींत व तेहि दुसरें काम करीत नाहींत.

वरील विवेचनांत एका विशिष्ट श्रमांत मक्तेबाजी आहे अशा स्थितीचें विवेचन केलें, त्याचप्रमाणें मक्तेबाजीचें उत्पादन असलें तर, मक्तेदार जास्त मजूर लावून उत्पादन वाढविण्याऐवजीं उत्पादन कमी करून, मजुरांच्या उत्पादनाचें प्रमाण वाढवून, प्राप्ती जास्तींत जास्त मिळवितो हेंहि पाहिलें. आतां उत्पादनाची अन्य सामग्री—अन्य घटक, हे मजुरांच्या कमीजास्त होण्याशीं सहज जुळवून घेतां येत नाहींत, अशा स्थितींत मजुरांच्यावर काय परिणाम होईल तें पाहूं. जेथें ही जुळणी सहज करतां येते, यंत्रें कमीजास्त करतां येतात, कच्चा माल सहज मिळतो, तेथें वर लिहिल्याप्रमाणें घडून येईल. पण आतां ही जुळणी लवकर होत नाहीं, सहज करतां येत नाहीं, या परिस्थितीचा विचार करावयाचा आहे. जुळणी करतांच येणार नाहीं असें नाहीं. कांहीं धंद्यांच्या बाबतींत उत्पादनतंत्र मोठें भानगडीचें असल्यामुळें वेळ लागतो. जास्त मजूर लावावयाचे म्हणजे त्यांना काम करण्याला अवश्य तेवढी उत्पादनसामग्री पाहिजे; व तें उत्पादन जर अवश्यक यंत्रें, अवश्यक संच, तयार होण्यास कालावधि लागणें अपरिहार्य आहे, अशा स्वरूपाचें असेल तर मजुरांच्या मागणीवर त्याचा कांहीं लवकर परिणाम होणार नाहीं. काम नसतांना नुसता बयाणा देऊन, मजूर गुंतवून ठेवणें, हें मोठ्या उत्पादनांत, मोठमोठ्या उद्योगधंद्यांत शक्य नसतें. पण त्याबरोबर हेंहि खरें कीं, असले धंदे, असले उत्पादन, सुरू करतांना योजक दूरदृष्टीनें वागत असतो. मागणी वाढल्यास ताबडतोब उत्पादनसंच वाढवितां येणार नाहीं, हें जाणून सुरुवातीपासूनच चालू गरजेपेक्षां जास्त प्रमाणावर उत्पादनसंचाची उभारणी केलेली

असते. म्हणून प्रत्यक्ष व्यवहारांत मागणी वाढली कीं, जास्त मजूर घेऊन जो संच कांहीं प्रमाणांत वायां जात असे, त्याकडून पुरें काम करून घेण्यांत येतें हें दृश्य दिसतें. सुरुवातीपासून जास्त उत्पादनशक्तीचाच संच मांडला म्हणजे मागणी वाढल्यास, अडचण पडत नाहीं. अगदीं लहान स्टेशनावर सुद्धां उतारूंना देण्याकरितां कोरीं तिकिटें ठेवलेलीं असतात. एकदम उतारू वाढले अगर नेहमीचीं गांवांचीं नांवें असलेलीं तिकिटें संपली, तर ताबडतोब या कोऱ्या तिकिटांवर नांवें घालून काम चालू होतें. जसा हा कोऱ्या तिकिटांचा संच तयार असतो, त्याचप्रमाणें उत्पादनसंच वाढत्या उपयोगाला जुळवून घेतां येईल असाच ठेवावयाचा हा बहुशः प्रघात आहे, किंबहुना हेंच करणें अखेरीस फायद्याचें ठरतें. ज्या उत्पादनांत मजुरांच्या संख्येशीं जुळणी करून घेणें सोपें आहे, तेथें योजक उत्पादन जास्तींत जास्त स्वस्त कसे पडेल, या दृष्टीनें जुळणी करतो. जर एखाद्या खात्यांतील मजुरीचे दर वाढले तर ते मजूर कमी करून तो जुळणी करून घेईल, आणि असें करतांना अन्य साधनसामग्रींत फरक करील. पण कांहीं वेळा हें शक्य नसतें. कांहीं यंत्रें अशीं असतात कीं, त्यांवर काम करणारीं माणसें कमी करतां येत नाहींत. अशा वेळीं योजकाला वाढलेली मजुरी देणें भाग पडतें. पण यंत्रें कांहीं काळानें तरी बदलावी लागतात; त्यावेळीं साहजीकच दूरदर्शी योजक जुन्या मांडणीचीं यंत्रें घेणार नाहीं. वाढते मजुरीचे दर अगर दुसऱ्या सामग्रीचे वाढते दर लक्षांत घेऊन, अशीं यंत्रें खरेदी करील कीं, ज्यांवर विशेष हुशार व जास्त वेतनाचीं माणसें ठेवण्याची जरूर भासणार नाहीं. त्याचप्रमाणें उत्पादनसंच असा घडवील कीं, महागाईची सामग्री वापरणें अवश्य पडणार नाहीं. पेट्रोल तेल वापरण्यानें उत्पादन महाग पडतें म्हणून नवीन यंत्रें विजेच्या सहाय्यानें चालणारीं लावील; आणि तींही अशीं असतील कीं साधारण मनुष्य सुद्धां त्यांवर देखरेख करूं शकेल. तात्पर्य, योजक तात्पुरता बदल करून, स्वस्त रीतीनें जुळवितां आलें नाहीं तरी अखेरीस जुळणी करून उत्पादन शक्य तितकें कमी खर्चाचें केल्याशिवाय राहणार नाहीं. पण बहुतेक उत्पादनांत अगदीं सहज बदल करतां येण्यासारखी उत्पादनसंचांची मांडणी असते, व त्यामुळें मजुरीच्या अगर मजुरांच्या कमीजास्त होण्याबरोबर, योजक सामग्रींत अदलाबदल करून उत्पादनाची जुळणी करून घेतो व उत्पादनखर्च शक्य तितका वाढूं देत नाहीं. जेथें मजूर व इतर साधनसामग्री यांच्यामधील प्रमाण निश्चित असतें, तेथें कांहीं अडचण येत नाहीं. समजा, एका यंत्रामागें एक मजूर असलाच पाहिजे अगर एका मजुराला इतकें काम दिलेंच पाहिजे, अशी स्थिति असेल तेथें मजूर, यंत्र अगर त्याला दिलेलें काम हें

योजक निराळें मानणार नाहीं. तर मजूर व यंत्र, अगर मजूर व त्यास दिलेला कच्चा माल, हें एक प्रमाण समजून, इतर साधनसामग्रीचे प्रमाणांत कांहीं फरक करतां येईल कीं नाहीं हें पाहील; व तो करतां येत असेल तर, तसें करणें परवडेपर्यंत त्या रीतीनें तो योजक उत्पादन जळवून घेईल, व चढाओढीचें वातावरण असल्यामुळें जर परवडत असेल तर, हें प्रमाण ( मजूर + यंत्र अगर मजूर + कच्चा माल ) तो वाढवील म्हणजे अधिक उत्पादनाचा खर्च, अधिक उत्पादनाच्या मेळांत असेपर्यंत, तो उत्पादन वाढवील, व मजुरीचा दर या परवडणाऱ्या उत्पादनाचे मेळांत राहील. सीमागत उत्पादनाच्या किंमतीचे मेळांत राहील. समजा, शिवण्याचे कारखान्यांतील शिंप्याची मजुरी वाढली; प्रत्येक कारागिराला एक यंत्र हें असलेंच पाहिजे, तेव्हां ही वाढती मजुरी जुळवून घ्यावयाची असेल तर यंत्रें कांहीं कमी करतां येत नाहींत. समजा, एक कारागीर एका यंत्रावर एका दिवसांत ६ सदरे शिवतो व त्यास १२ आणे मजुरी होती, ती आतां ३ आण्यांनीं वाढली; म्हणजे सदऱ्यामागें २ पैशानें वाढली. एकतर त्या कारखानदाराला सदऱ्याची किंमत २ पैशानें वाढवावी लागेल, किंवा तो कापडांत, कटरचे पगारांत अगर काजेगुंड्या करणाराचे वेतनांत कमी करून ही कसर भरून काढील. तसें जमलें तर ठीक, नाहींतर तो काय विचार करील हें आपण पाहूं. सदऱ्याची किंमत वाढवून जमलें तर ठीक, नाहीं तर एक यंत्र व एक शिंपी कमी करून व राहिलेल्या शिंप्यांना अर्थात् वाढलेली मजुरी देऊन, पूर्वी इतकाच नफा राहतो कां कमी होतो तें पाहील. कारण नुसते जास्त सदरे तयार करणें हें त्याचें ध्येय नाहीं. किंवा नुसत्या माणसांनीं कारखाना भरावयाचा हेंहि ध्येय नाहीं. कमी यंत्रें व कमी माणसें लावून जास्त नफा होत असेल तर, तेंहि तो करील, व या दृष्टीनें एक एक प्रमाण म्हणजे (यंत्र व शिंपी) तेथपर्यंत करीत जाईल कीं, जेथें त्याला जास्तींत जास्त नफा मिळाला असें दिसेल; म्हणजे जी मजुरी त्यास जास्त द्यावी लागली, तिचेपासून तो या रीतीनें उत्पादन जुळवून ती मजुरी परवडेल असें करील. उलट एक प्रमाण (यंत्र व शिंपी) वाढवून फायदा होतो अशी परिस्थिति असेल तर, अगदीं अधिक उत्पादन परवडेपर्यंत तो तें वाढवीत जाईल. कारण वाढती मजुरी जरी द्यावी लागली, तरी तिजपासून होणाऱ्या उत्पादनाची किंमत अधिक आहे; आणि तोंपर्यंतच तो उत्पादन वाढवील. तात्पर्य, मजुरी परवडणाऱ्या उत्पादनाचे किंमतीचे मेळांत राहील. हेंच, ठराविक कचा माल, कामगारांना दिल्यास अनुभवास येईल. विड्यांच्या कारखान्यांत ठराविक माल द्यावयाचा व ठराविक काम करून घ्यावयाचें असते. कामाचा दर वाढला तर उत्पादन कमी करून जुळत असेल तर तें कमी

करून, जर अन्यत्र काटकसर करून जुळत असेल तर तसें, पण कसेंहि असलें तरी जी मजुरी द्यावी लागेल, त्यापासून होणारें उत्पादन परवडणारें केल्याशिवाय योजक राहणार नाहीं. मजुरांचे श्रमांपासून जर फायदा होत नसला, तर मग धंदा कसा चालणार? कमी मजूर झाल्यास अगर जास्त मजुरी द्यावी लागल्यास, अशी जुळणी करावयाची कीं, शेवटीं मजुरी, उत्पादनाच्या किंमतीचे मेळांत बसली पाहिजे. तसें न झालें तर नुकसानी; म्हणून योजक तसेंच करीत असतो. परवडणाऱ्या उत्पादनाच्या किंमतीशीं अखेरीस मजुरीचा मेळ बसतो. उत्पादन सुरू केल्याबरोबर कांहीं विक्री सुरू होत नाहीं. माल संपूर्णपणें तयार होऊन बाजारांत जाऊन त्याचे पैसे येईपर्यंत पुष्कळ काळ जातो. या काळांत योजकाला कच्च्या मालासाठीं, मजुरीसाठीं पैशाची जरूरी असते. त्याच्या हातांत खेळतें भांडवल नसेल तर त्याला अडचण उत्पन्न होईल. ज्या मानानें माल तयार होण्यास व त्याची विक्री होण्यास काळ लागेल त्या मानानें हें भांडवल कमीजास्त लागेल हें स्पष्ट आहे, मग जास्त मजूर लावतांना, त्याला असा विचार करावा लागेल कीं, जास्त उत्पादनाचें जें उत्पन्न येईल, तें वाढवलेल्या मजुरांच्या खर्चापेक्षां नुसतें अधिक असून उपयोगी नाहीं तर, या दरम्यानच्या काळांत त्यांना जी मजुरी द्यावी लागली, जें खेळतें भांडवल खर्चावें लागलें, त्याच्यावरचें व्याजहि त्या उत्पन्नांतून भागलें गेलें पाहिजे. तसें न झालें तर अधिक मजूर लावून अगर अधिक उत्पादन करून काय फायदा? अशा स्थितींत मजुरी ठरवितांना याहि गोष्टीचा विचार करणें योजकाला प्राप्त होतें. जर माल तयार होण्याला थोडा वेळ लागत असेल तर, त्या मानानें खेळतें भांडवल लागेल, व तेंच तें पुनः पुनः उपयोगांत आणतां येईल. अर्थात् याहि गोष्टींचा धंद्यावर परिणाम होत असतो, पण तो परिणाम फारच थोडा होतो म्हणून त्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. कांहीं ठिकाणीं सरकार किमान वेतन ठरवीत असतें, कांहीं धंद्यांत संघटित मजुरांचे संघ त्या त्या धंद्यांतील किमान वेतन ठरवीत असतात व आपल्या संघटनेच्या जोरावर हें मजुरीचें प्रमाण कायम राखतात, कमी होऊं देत नाहींत. जेथें सरकार अगर मजूरसंघ किमान वेतन ठरवीत नाहींत, तेथें ज्या मजुरीनें काम करणाऱ्या मजुरांचा भरपूर पुरवठा होईल, असा मजुरीचा दर होतो. त्यापेक्षां जर दर जास्त असला तर, जे बेकार असतील ते कमी दर घेऊन काम करतील, व तो दर इतका कमी होईल कीं, कोणीहि बेकार राहणार नाहीं. जर त्यापेक्षां कमी असला तर, योजकांमध्यें चढाओढ असल्यामुळें, कमी दरानें जास्त मजूर लावून नफा वाढविण्याचा ते प्रयत्न करतील, व त्यामुळें पुनः तो दर वाढेल. याचा अर्थ कोणत्याहि धंद्यांत एक

प्रकारचें काम करणाऱ्यांची जी संख्या असेल, तीवर मजुरीचा दर अवलंबून राहील. जर मजुरांचा पुरवठा जास्त असेल तर मजुरीचा दर कमी होईल, पुरवठा कमी असेल तर दर जास्त होईल. तेव्हां पुरवठा कसा होतो, तो कोणत्या गोष्टींवर अवलंबून असतो हें आपण पाहिलें पाहिजे.

कोणत्या गोष्टीमुळें मजुरांच्या संख्येचें नियमन होतें याचा विचार करावयाचा म्हणजे सर्व लोकसंख्येच्या प्रश्नाचाच विचार करावयास पाहिजे. पण तो सर्व विचार करणें येथें अशक्य आहे. एवढी गोष्ट निश्चित आहे कीं, मजुरीचे दर वाढले म्हणजे लोकसंख्या वाढते, असें जें एका काळीं तत्त्व मानलें जात होतें तें खोटें आहे. मजुरी वाढली म्हणून लोकसंख्या वाढत नाहीं किंवा ती कमी झाली म्हणून लोकसंख्या कमी होत नाहीं. लोकसंख्येची वाढ समाजरचना, सामाजिक संस्था, लोकांची शरीरप्रकृति, त्यांची सांपत्तिक स्थिति वगैरे अनेक गोष्टींवर अवलंबून आहे. अलीकडे संतति नियमन करण्याचें तत्त्व कित्येक राष्ट्रांत सुरू झाल्यामुळें त्या ठिकाणीं लोकसंख्या वाढविणें किंवा कमी करणें हें सर्व स्त्री पुरुषांच्या स्वतःच्या इच्छेवर अवलंबून राहील. म्हणून लोकसंख्या वाढेल अगर कोणत्या प्रमाणांत वाढेल, हें सांगणें कठीण. जेथें संतति नियमनाचा प्रसार झाला नाहीं तेथें सुद्धां अंदाजानेंच सांगावें लागतें. मोठमोठ्या रोगांच्या सांथी, केव्हां येतील याचा कोणी भरंवसा सांगावा? १९१८ च्या तापसरींत हिंदुस्थानांत ५४ लाख लोक मृत्युमुखीं पडले! १९१४ ते १९१८ च्या महायुद्धांतसुद्धां एवढी प्राणहानि झाली नाहीं. तात्पर्य, कालांतरानें लोकसंख्येंत किती भर पडेल, हें अंदाजानेंच सांगतां येईल. मनुष्याच्या उत्पन्नावर, त्याच्या प्राप्तीवर संतति अवलंबून आहे, हेंहि खरें नाहीं. अनुभव असा आहे कीं जेथें दारिद्र्य जास्त, तेथेंच बहुधा प्रजा जास्त. कांहीं माणसें, त्यांना जरूर असेल त्यापेक्षां जास्त मिळवितात. जरूरीप्रमाणें पगार मिळत नाहीं, म्हणून पगाराप्रमाणें, मजुरीप्रमाणें माणसाला आपली राहणी ठेवावी लागते. पुष्कळ मुलें असलीं म्हणून मालक पगार जास्त देत नाहीं किंवा जास्त मुलें झालीं म्हणून मजुरींत वाढ होत नाहीं. मनुष्य मात्र जास्त प्राप्ति व्हावी म्हणून इच्छीत असतो. १० मिळाले तर १०० ची इच्छा धरतो. ते मिळाले कीं हजारांची, याप्रमाणें त्याची इच्छा, महत्त्वाकांक्षा, वाढत्या प्रमाणांत असते. महत्त्वाकांक्षेच्या मानानें प्रयत्न करीत असेल, लायकी वाढवीत असेल, व शिवाय नशीबहि हात देत असेल तर तो आपली प्राप्ति वाढवीत जातो. जेथें लोकसंख्या जास्त व उत्पादनाची साधनसामग्री मर्यादित, तेथें उत्पादन थोडें; मजुरीचें उत्पादन थोडें व त्यामुळें मजुरीचे दरहि कमी. मारवाडांत लोकसंख्येच्या मानानें शेती,

उदीमधंदा कमी, त्यामुळें लोकांना रोजगार कमी, उत्पादनहि कमी व मजुरीचे दरहि त्याच मानानें. ज्या देशांत लोकसंख्या जास्त व लोकसंख्येच्या मानानें उद्योगधंदे वाढले नाहींत, तेथें मजुरीचे दर अर्थात् कमीच असणार. युरोपमधल्या उद्योगांत पुढारलेल्या पण त्या मानानें लोकसंख्या कमी असलेल्या देशांत, मजुरीचे दर हिंदुस्थानापेक्षां अगर चीनपेक्षां जास्त असणार व आहेत. तथापि एकाच देशांत निरनिराळ्या व्यवसायांत काम करणाऱ्या कामगारांच्या मजुरींत, अनेक कारणांमुळें फरक असतात. पण हें लोकसंख्येमुळें नव्हे; त्याचा लोकसंख्येच्या कमी अगर जास्त असण्याकडे कांहीं संबंध नाहीं. इकडून तिकडे जाण्यास लोक खूष नसतात, अगर मजुरांचा बाजार म्हणा संघटित नसतो, मजूरइतके तल्लख नसतात व त्यामुळें या फरकाचा ते फायदा घेत नाहींत.

तथापि मागें सांगितल्याप्रमाणें अमूक वेळीं राष्ट्रांत काम करणारे लोक किती असतील, हें सांगणें शक्य आहे. १५ ते ४५ वयाच्या आंत असणारे लोक, श्रम करण्यास लायक धरले तर, त्यांची संख्या किती असेल हें सांगतां येईल. त्याचप्रमाणें ही काम करणारी मंडळी, साधारणपणें किती काम करतील, याचा अंदाज करणें अवघड नाहीं. त्याचप्रमाणें सर्वच माणसें पैसा अगर मजुरी मिळते म्हणून, रात्रंदिवस अगर मरेपर्यंत काम करणारी नसतात, विश्रांति सर्वांनाच हवी असते. तथापि कामाकामांत श्रम कमी जास्त करावे लागतात, धंद्याधंद्यांत फुरसत कमीजास्त मिळते, हेहि लोक जाणतात, व त्यामुळें धंद्यांत शिरतांना आपल्या पसंतीप्रमाणें शक्य असल्यास, मनुष्य धंदा बघत असतो. सकाळच्या सातच्या भोंग्यापासून संध्याकाळचे सहाच्या भोंग्यापर्यंत गिरणींत उभें राहून काम करून ३० रु. मिळविण्यापेक्षां २०-१/४-२५ च्या स्केलवर प्राथमिक शाळेंत मास्तर होणें एखाद्याला मानवेल. तेथें सहा तासांपेक्षां काम नाहीं. विश्रांति पुष्कळ. एखादा वर्तमानपत्रें विकणारा सकाळीं तीन तास वर्तमानपत्रें विकून राहिलेला वेळ विश्रांति घेईल. त्याला जर आपलें उत्पन्न वाढवावयाची इच्छा असेल तर त्यानें आणखी पायपिटी केली पाहिजे, म्हणजे विश्रांति कमी करून काम जास्त केलें पाहिजे. एक तास जास्त हिंडून त्याला जी प्राप्ति होईल, ती त्याच्या विश्रांतीच्या तासाची अगर विश्रांतीची किंमत झाली. समजा, एक विडया करण्याचा कारखाना आहे व तेथें मोबदला अगर मेहनताना काम मापून देतात. एक इसम ८ तास काम करून १ रु. मिळवतो. त्यानें एक तास काम कमी केलें, तर १४ आणे मिळतील, व एक तास अधिक केलें, तर १ रु. २ आणे मिळतील. पण तो ८ तास काम करतो याचा अर्थ असा होतो

कीं, ८ तास काम केलें म्हणजे १६ तास विश्रांति मिळते, ती ७ तास काम केलें तर १७ तास मिळेल. पण त्या सतराव्या तासाच्या विश्रांतीपेक्षां त्याला ८ वा तास काम करून २ आणे मिळविणें हें जास्त पटतें, म्हणून तो ८ वा तास काम करतो. त्याचप्रमाणें ९ वा तास काम केलें तर आणखी २ आणे मिळतील, पण विश्रांति १५ तास होईल. म्हणून विश्रांतीच्या सोळाव्या तासाची किंमत त्याला २ आण्यापेक्षां जास्त आहे म्हणून तो ९ वा तास काम करीत नाहीं. समजा, आतां कामाचा दर मालकानें वाढविला व जें काम एका तासांत होत होतें, त्या कामाला २ आण्याऐवजी तो ३ आणे देऊं लागला. आतां आपला हा कामगार किती तास काम करील ? १६ आणे मिळविण्याला जितके तास लागतात, म्हणजे ५$\frac{1}{3}$ तास काम करील, कां पूर्वीं जी ८ तासांची मर्यादा, त्यानें स्वतः पसंत केली होती, तितके तास काम करील ? या परिस्थितींत कोण कसा वागेल हें सांगणें कठीण. पण साधारणपणें ५$\frac{1}{3}$ तासांपेक्षां कमी काम खास करणार नाहीं. कारण विश्रांति व प्राप्ति यांचें गणित त्यानें बसविलें होतें, त्यांचा मेळ त्यानें बसविला होता. विश्रांतीला प्राप्तीच्या मानानें किती किंमत द्यावयाची हे त्यानें ठरवून, ८ तास काम करून तो १६ आणे मिळवीत होता. आतां ८ तास काम केलें तर १ रु. ८ आणे मिळतील, व शिवाय १६ तास विश्रांतीहि मिळेल. याचा अर्थ प्राप्तीच्या दृष्टीनें विश्रांतीच्या १ तासाची किंमत वाढली. १ तास जास्त काम केल्यास ३ आणे जास्त मिळतील. २ आणे जास्त मिळत होते त्या वेळीं तो ९ तास काम करण्यास तयार नव्हता. तो नक्की काय करील हें सांगणें कठीण. १ तास कमी करून १ रु. ५आणे प्राप्तींत खूष राहील, व एक तास मिळालेली जास्त विश्रांति ज्ञानार्जनांत अगर करमणुकींत घालवील; एकंदरींत काय करील हें सांगणें कठीण. त्याचप्रमाणें मजुरांना दररोज ८ तासांप्रमाणें ६ दिवस काम करणें पसंत पडेल कां दररोज ९ तास काम करून ६ वें दिवशीं ३ तास काम करून सुट्टी घेणें पसंत पडेल हें सांगणें कठीण आहे. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत वर लिहिल्याप्रमाणें पसंतीची संधि मजुरांना क्वचितच मिळते. आठवड्याचे तास किती, हें फॅक्टरी कायद्यानें अगर अन्य कायदे करून, सरकार ठरवितें. जेथें कायदा लागू नाहीं तेथें वहिवाटीप्रमाणें दररोज किती काम मजुरानें अगर कारागिरानें करावयाचें, हें ठरलेलें असते. जसा धंदा असेल त्याप्रमाणें त्यांत बदलहि असतो. कितीतरी ठिकाणीं अगदीं सूर्योदयापासून तों सूर्यास्तापर्यंत काम करावें लागतें. "दिवस बुडाला गडी उडाला" ही म्हण प्रसिद्ध आहे. बांधकामांत जेवढ्या तासांचा दिवस तेवढा शेतकामांत नाहीं. दुकानदारींत काम करणारे कामगार, यांचा दिवस म्हणजे रात्रीं १० वाजेपर्यंत संपत नाहीं. नवीन झालेल्या गुमास्ता

कायद्यानें दिवसाचे ८ तासच ठरविले. तथापि जेथें हा कायदा लागू नाहीं तेथें, वरीलप्रमाणेंच स्थिति आहे. कुठल्याहि धंद्यांत दिवसाचे तास किती अगर कामाच्या दृष्टीनें किती तासांचा आठवडा, हें कामगारांच्या इच्छेवर अवलंबून नाहीं, हें कांहीं खोटें नाहीं. कमी तासांचा आठवडा अगर दिवस धरला तर मजुरी कमी मिळेल ही भीति, म्हणून जास्त काम करण्याची तयारी; त्याचप्रमाणें जास्त तासांचा दिवस अगर आठवडा धरून, जादा तास काम केल्यास जास्त मिळेल, ही आशा दाखवून सुद्धां, तेथें जास्ती काम होत नाहीं. कारण ८–९ तास काम केल्यानंतर, जास्त श्रम करण्याची इच्छा अगर उत्साह राहत नाहीं. मागणी जास्त आली व उत्पादन जास्त पाहिजे आहे, अशा वेळीं मालक एकतर कामाचे तास वाढवून जास्त कामाबद्दल अधिक मेहनताना देईल अगर मजुरांची संख्या वाढवील. पुष्कळ वेळां मजूरसंघ, मालकाला मजुरीचे दर वाढविण्यास भाग पाडतात. त्या वेळीं एकतर पूर्वींइतकेच तास काम करून, वेतन जास्त घेतात अगर पूर्वींचेंच वेतन कायम ठेवून, कामाचे तास कमी करून घेतात. परंतु वेतन वाढविण्याकडेच कल जास्त. रोज किती तास काम करावयाचें व किती तासांचा आठवडा समजावयाचा हें वर सांगितल्याप्रमाणें वहिवाटीनें अगर कायद्यानें ठरलेलें असतें.

राष्ट्रांत काम करणारे किती, कामाचे तास किती हें निश्चित असेल तर प्रत्येक धंद्यांत किती कामगार येतात, त्यांची संख्या कशी ठरली जाते, त्यांचा पुरवठा कसा निश्चित होतो, हें पाहणें सुलभ होते. जर प्रत्येक मनुष्याला पाहिजे व जें पसंत असेल असें काम मिळालें तर, सर्वच धंदे सोईच्या दृष्टीनें, सारखेच होतील. कांहींत मजुरी जास्त, कांहींत कमी असेल. कांहीं धंद्यांत एकंदर वातावरण बरें, श्रम कमी; कांहींत उलट श्रम जास्त, तथापि ज्याला जें काम पाहिजे तें मिळतें, अशी स्थिति असेल तर, धंद्यागणिक कमीजास्त श्रम व एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन सर्वजण यथा पसंती धंदा पतकरतील व त्यायोगें मजुरीचा दर सारखाच राहील. कारण जर एखाद्या धंद्यांत मजुरीचा दर वाढला तर दुसरीकडील मजूर तेथें जाऊन, ताबडतोब दर पूर्वींच्याप्रमाणें होऊन स्थिरावेल. कारण तेथें जास्त पुरवठा झाल्याबरोबर, श्रमांचें उत्पादनप्रमाण, अर्थात् परवडणारें, कमी होईल व त्याबरोबर मजुरीचा दरहि कमी होईल. उलट एखाद्या व्यवसायांत मागणी कमी झाल्यामुळें, मजुरांची संख्या कमी होईल, पण त्यामुळें राहिलेल्या मजुरांच्या श्रमांचें उत्पादन, परवडणारें उत्पादन, वाढेल व त्यामुळें मजुरीचे दरहि वाढतील. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, प्रत्येकाला पसंत असलेला व पाहिजे असलेला व्यवसाय अगर नोकरी मिळत नाहीं. जें हवें तें

मिळत नाहीं व नको असेल तें करणें भाग पडतें. तसेंच सर्व धंदे प्राप्तीच्या दृष्टीनें सारखे नसतात. सुखसोयीच्या दृष्टीनेंहि सारखे नसतात. वास्तविक ज्यांत काम किचकट अगर घाणेरडें, एकंदर वातावरण मनास ताण व त्रास देणारें, तेथें मेहनताना जास्त असावयास पाहिजे. पण अनुभव उलट येतो. रस्ते झाडणारे, भंगीकाम करणारे, कातडें कमविणारे, लांकूडतोडे हे इतर धंद्यांतील मजुरांपेक्षां कमी कमावतात. शिक्षक, प्रोफेसर हे काम चांगल्या वातावरणांत करतात; श्रमहि कमी, विश्रांति जास्त व इतकें असून कमाईहि जास्त ! आणि याचें कारण, वाटेल त्याला शिक्षक, प्रोफेसर अगर त्या प्रकारचे धंदे करतां येत नाहींत. कारण तेथें प्रवेश मिळविण्याकरितां कांहीं किमान लायकी ठेवलेली असते. तसेंच कांहीं धंद्यांत किती जणांनीं असावें याबद्दल सरकार मर्यादा घालतें, अगर त्यांत प्रवेश मिळणें कायद्यानें कठीण करतें. पूर्वीं घरीं अभ्यास करून वकील होतां येत असे. आतां विद्यालयांतच गेलें पाहिजे. येवढेंच नव्हे तर परीक्षा पास झाल्यानंतर एक वर्ष जुन्या वकिलाकडे उमेदवारी केली पाहिजे असा नियम झाला. हें करण्याचा हेतु धंद्याची प्रतिष्ठा व त्यांतील काम करणारांची लायकी वाढवावी, हा जरी असला तरी त्याचा परिणाम संख्या मर्यादित करण्यांत होईल हें उघड आहे. विजेच्या धंद्यांतील, त्याचप्रमाणें यंत्राच्या धंद्यांतील कारागिरांना, वायरमन, फिटर, मेकॅनिकल इंजीनियर वगैरेना नुसतीच परीक्षा पास होऊन चालत नाहीं. परीक्षा पास झाल्यानंतर किंवा पूर्वीं, कांहीं काळ उमेदवारी करून कामाचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावा लागतो. धंदेशिक्षण संस्थांत किती विद्यार्थी घ्यावयाचे याला मर्यादा आली म्हणजेच त्या त्या धंद्यांतील कुशल कारागिरांच्या संख्येला मर्यादा आली. कित्येक माणसें प्रवेश मिळत नाहीं म्हणून इंजीनिअरिंगचा अभ्यासक्रम घेत नाहींत. तीच गोष्ट वैद्यकी, डॉक्टरकीचे बाबतींत. शिक्षणसंस्थांत विद्यार्थ्यांवर मर्यादा, खाजगी शिकून धंदा करणें कायद्याविरुद्ध, किमान लायकीसाठीं परीक्षा व धंद्याकरितां परवाना या सर्व गोष्टी चांगल्या, पण त्यानें प्रवेश करणारांची संख्या मर्यादित होते. अर्थात् याकडे याच दृष्टीनें आपणाला पहावयाचें आहे. तसेंच जे धंदे सरकार सर्वस्वीं आपण करतें त्या धंद्यालाच लागणारे खास असे कारागीर किती पाहिजेत, हें सरकार ठरवितें व त्यामुळें तेथेंहि प्रवेशबंदी हें उघड आहे. रेल्वे, पोस्ट, नभोवाणी वगैरे धंदे सर्वस्वी सरकारी, तेव्हां किती ट्रेन एक्झॅमिनर, किती रेल्वे इंजीनियर, किती एंजिन हांके, हें सरकारच ठरवील; त्याचप्रमाणें इतर सरकारी धंद्यांत. तात्पर्य प्रत्यक्ष व्यवहारांत जें पाहिजे तें मिळत नाहीं. लायकी असूनहि वाव नाहीं. प्राप्तीचे दृष्टीनें प्रतिष्ठित असलेल्या धंद्यांत थोड्यांनाच प्रवेश.

कांहीं धंदे असें असतात कीं, त्यांत कांहीं विशेष गुण कारागिरांत असल्याशिवाय त्याला प्रवेश मिळणें शक्य नाहीं. म्हणून कोणाला विशेष बुद्धिमता नाहीं म्हणून प्रवेश नाहीं, कोणाला व्यापारी कसब अंगांत नाहीं म्हणून प्रवेश नाहीं, कोणाला यंत्रांतल्या भानगडी उमगत नाहींत म्हणून प्रवेश नाहीं. तात्पर्य, पुष्कळ माणसें या नाहीं त्या कारणामुळें वरच्या वर्गाच्या कारागिरांचें काम करूं शकत नाहींत. तथापि या कारणांनीं सर्व अन्याय्य परिस्थितीची मीमांसा होत नाहीं. मुख्य कारण असें आहे कीं, बहुसंख्यांक माणसांना गरिबीमुळें शिक्षण घेऊन लायकी वाढविण्याची अगर कलासंपन्न होऊन आपली प्राप्ती वाढविण्याची संधिच मिळत नाहीं. वकील, प्रोफेसर, डॉक्टर अगर अन्य प्रतिष्ठित धंदे करण्याची लायकी, कांहीं जन्मानें येत नाहीं. जन्मतांना पुढें होणारा डॉक्टर हातांत थर्मामिटर घेऊन जन्मत नाहीं किंवा पुढें होणारा कायदेपंडित कराराचा कायदा म्हणत म्हणत जन्म घेत नाहीं. पंजाबांत जन्मल्यानें मनुष्य अजानुबाहु अगर हातांत तलवार घेऊन जन्मत नाहीं; पण विवक्षित वातावरणांत जन्मल्यामुळें व संपत्तीमुळें शिक्षण घेणें सोपें होतें, गुणाला वाव मिळतो. शिक्षणाला पैसा पाहिजे, तो सर्वांनीं कोठून आणावयाचा ? शेंकडों कारागीर भांडवलशाहींत, या संपत्तीच्या विषम वांटणीनें, आपल्या अंगांतील कलेला पूर्णता आणूं शकत नाहींत. संधीच्या अभावीं व्यक्तीच्या सुप्त गुणांना चालना मिळत नाहीं. ही खरी खरी गुणसंपत्ती, भांडवलशाही समाजरचनेंत धुळीस मिळते; त्यांचें चीज होत नाहीं. येथेंहि समाजाचे पुढारी, जास्त उत्पादन करून फायदा होत नाहीं म्हणून या कलासंपत्तीचें, या गुणसंपदेचें उत्पादन कमीच करतात. कारण येथेंहि प्रतिष्ठेची, संपत्तीची, सत्तेची मक्तेबाजी टिकवावयाची असल्यामुळें, कमी उत्पादनांतच कमाल फायदा, हें सूत्र ते विसरत नाहींत. तात्पर्य, इच्छा असून, लायकी असून, शेंकडों माणसें शिक्षण घेऊं शकत नाहींत. मुलगा १३–१४ वर्षांचा झाला कीं त्यानें मिळवलेंच पाहिजे नाहींतर उपाशीं राहण्याची पाळी यावयाची ! मग अशा स्थितींत जास्त शिक्षण कोठलें ? म्हणून प्रतिष्ठित धंद्यांत जावयाचें म्हणजे भांडवल पाहिजे. याचा अर्थ त्या धंद्यांत सर्वांना वाव नाहीं, म्हणूनच त्या धंद्यांत प्राप्ती जास्त. ओझें वाहण्यास शिकण्याची जरूरी काय आहे ? भांडीं घांसण्याचें काम शिकण्यास कन्याशाळेंत जाण्याचें कारण नाहीं; आणि म्हणून या धंद्यांत, म्हणजे ज्यांत शिक्षणाची जरूरी नाहीं तेथें मजुरी कमी. कारण तो धंदा हवा तो इसम करूं शकतो. तो शिकण्याकरितां भांडवलहि घालावें लागत नाहीं. हेलकऱ्याचा धंदा करण्यापूर्वी शरीरशास्त्र त्यास वाचावें लागत नाहीं, किंवा भांडीं घासण्याचें काम करण्या-

पूर्वी कोणत्या धातूपासून कोणती भांडीं होतात, हें जाणण्याची अवश्यकता नाहीं. उलट डॉक्टर व्हावयाचें म्हणजे ५–७ वर्षे कॉलेजांत काढावयाचीं व ८–१० हजार रुपये खर्च करावयाचे; येवढें केल्यानंतर जर महिना १०० रु. प्राप्ती झाली तर, नवल करण्याचें कारण नाहीं. कारण खर्च केलेल्या रकमेवर थोड्या जास्त दरानें व्याज येईल येवढेंच. पण डॉक्टरच मेला, तर अर्थात् कांहींच भांडवल शिल्लक राहत नाहीं हेंहि खरें. त्याचप्रमाणें इतर प्रतिष्ठित धंद्यांत, जो खर्च शिक्षणासाठीं करावा लागतो त्या मानानें प्राप्ती होईल, म्हणूनच शिक्षण घेतात. अर्थात् तेथेंहि नाहीं चाललें तर गोष्ट निराळी. तथापि साधारणपणें व सापेक्षतेनें तुलनेनें प्रतिष्ठित धंद्यांतील प्राप्तीचें मान जास्त असतें. अगदीं सावकारी हिशेब केला तरी खर्च केलेल्या रकमेवर चालू व्याजाचे दरापेक्षां जास्त प्राप्ती होते. डॉक्टर १०० रु. महिना मिळवून राहत नाहीं. ५–१० हजारांपर्यंतहि जातो, निदान ३–४ शेंपर्यंत जाणारे डॉक्टर बहुसंख्य. त्याचप्रमाणें इतर प्रतिष्ठित धंद्यांतील प्राप्तीचें मान असतें, आणि याचें मुख्य कारण त्या त्या धंद्यांत प्रवेश करणें खर्चाचें असतें. शेंकडों तरुण, लायक हुशार असून गरिबीमुळें त्यांत जाऊं शकत नाहींत व त्याचा फायदा जे त्यांत आधींच आहेत त्यांना मिळतो. एखादें काम करणारे थोडे असले म्हणजे त्यांच्या उत्पादनाची किंमत जास्त म्हणून त्यांची प्राप्तीहि जास्त. असल्या धंद्यांत शिरावयाचें म्हणजे सधन कुटुंबांतच जन्म घ्यावयास पाहिजे अगर नातेवाईक सधन पाहिजेत. सरकार शिष्य-वृत्त्या ठेवून कांहीं मर्यादित संख्या गरिबांना मोकळी ठेवतें. पण त्यानें मोठा फरक होत नाहीं. जे जन्मानें श्रीमंत ते केव्हांहि फायद्यांत राहतात. त्यांच्या लायकीची चिकित्सा अगर परीक्षा जशी गरिबांच्या मुलांची होईल, तशी होत नाहीं. शिष्यवृत्ती मिळवावयाची म्हणजे पहिला अगर दुसरा नंबर पटकावला पाहिजे, तसें श्रीमंतांच्या मुलांसाठीं नाहीं. पास झाले व पैसे असले कीं प्रवेश, हा सरळ अनुभव आहे. शिष्यवृत्त्यांमुळें २–४ अधिक येतील येवढेंच. नुसत्या वकील, डॉक्टर वगैरे प्रतिष्ठित धंद्यांपुरताच हा अन्याय मर्यादित नाहीं. व्यापारांत, उद्योगधंद्यांत सुद्धां लायकी असून गरिबीमुळें प्रवेश मिळणें कठीण पडतें. व्यापारधंदा म्हणजे बुधवार चौकांत कुंचलीं अगर कुदळफावडें घेऊन उभें रहाणें नव्हे, तेथें भांडवल पाहिजे. तें गरिबांनीं कोठून आणावयाचें? श्रीमंत भांडवलवाले जितक्या सुलभतेनें व्यापारांत शिरतात अगर आपल्या मुलांना, नातेवाईकांना प्रवेश करून देतात, तितकी सुलभता गरिबांना कशी मिळणार? नुसतीं बिन-पगारी उमेदवारीसुद्धां गरिबांना, लायक गरीब तरुणांना मिळणें कठीण असतें. याच्या उलट, योजकांचे नातेवाईक कसेंहि असले

तरी कोठल्याहि धंद्यांत भरले जातात. अशा प्रकारचीं शेंकडों उदाहरणें महाराष्ट्रांत-सुद्धां दृष्टीस पडतात. किंबहुना भांडवलशाहीचा हा परिणामच आहे. भांडवलशाही म्हणजे संपत्तीच्या विषमतेबरोबर, संधीचीहि विषमता पाहिजे. नाहीं तर संपत्तीची विषमता राहणार नाहीं. व्यापार सुरू करावयाचा म्हणजे भांडवल लागतें; अर्थात् तें थोड्या लोकांच्या हातांत असल्यामुळें, व्यापार हाहि एक विशिष्ट वर्गाचा मक्ता होतो. उद्योगधंदा हाहि विशिष्ट वर्गाचा मक्ता होतो. पैसेवाल्यांकडे पैसा जातो, त्याच न्यायानें दुःखितांकडे दुःख जातें. गरिबीला आश्रय देणारे गरीबच, कारण गरिबांना आश्रय देण्याइतका उदात्त अतिथिधर्म श्रीमंतांनीं कां पाळावा ? एखादे वेळेस, लायक पण गरीब साहसी माणसानें श्रीमंत माणसाशीं भागी केली अगर त्याचें भांडवल घेऊन उद्योग केला, तर किती अडचणी व किती अपमान, किती तीव्र अटी त्याच्या-वर लादल्या जातात, याचा अनुभव महाराष्ट्रांत चांगलाच आहे; तोच सर्वत्र आहे. वशिल्यानें नोकऱ्या मिळतात, भांडवल मिळतें, उत्तेजन मिळतें हें सर्व खरें, पण गरिबांची गरिबी ही वशिल्याचे कामीं बिन किंमतीचीच असते. सामाजिक दर्जा हा नोकरी मिळवून देतो, तसाच व्यापारांतहि उपयोगीं पडतो. विमा उतरावयाचा असला तर, मनुष्य ओळखीच्याच एजंटामार्फत उतरवितो. आणि ओळखी असणें आणि विमा उतरण्याची ऐपत असलेल्या समाजांत ओळख असणें म्हणजे त्या समाजांतलाच मनुष्य पाहिजे. अशाच एजंटाचें जमतें. आज सामाजिक दर्जा प्राप्तीं-नेंच ठरला जातो. भांडवलशाहींत, सर्व गुण कांचनाचाच आश्रय घेतात. त्यांनाहि व्यापक अर्थानें भांडवलशाहींत, भांडवलवाल्यांचा आश्रय नसल्यास निरुपयोगी राहावे लागते. तात्पर्य, संपत्तीच्या विषम वांटणीमुळें, जास्त उत्पन्नाचे, जास्त प्रतिष्ठेचे धंदे व व्यवसाय, थोड्या लोकांच्या हातांत राहतात. त्यांत थोड्या लोकांचा प्रवेश होतो व थोड्या लोकांना प्रवेश मिळून संख्या मर्यादित व त्यामुळें पुनः प्राप्ती जास्त, असें हें चक्र आहे.

मजुरीच्या बाबतींत स्त्री व पुरुष यांच्या दरांत साहजिकच फरक राहतो. घर-घराऊ धंदे सोडले तरी, मोठमोठाल्या कारखान्यांतून सर्वत्र स्त्रिया मजूर म्हणून कामें करूं लागल्या आहेत. जेथें उद्योगधंदा जास्त वाढला आहे व उत्पादन मोठ्या प्रमाणावर आहे अशा पाश्चात्य देशांत स्त्रियांना बहुतेक सर्व व्यवसायांत प्रवेश आहे. हिंदुस्थानांतहि तीच परिस्थिति येऊं पहात आहे. घरांतील कामें करणें व तीं बिन-तक्रार करणें, हा तर आमच्या समजुतीप्रमाणें त्यांचा सनातन धर्म आहे, व त्यांना देवता म्हणून त्यांचेकडून कामें करून घ्यावयाचीं, हें सरळ चालूच आहे. पण

एकंदर परिस्थिति बदलली त्यामुळें स्त्रिया गिरणींत मजूर म्हणून काम करूं लागल्या आहेत. लहान लहान कारखान्यांतून त्यांची संख्या वाढत आहे. शेतींत तर त्या पहिल्यापासून आहेतच. प्रतिष्ठित धंद्यांत, कारकून, वकील, डॉक्टर यांतहि त्यांचा प्रवेश होऊं लागला आहे. सुरुवातीस जरी हें हौसेसाठीं होत असलें तरी, थोडयाच काळांत अवश्य म्हणून करावें लागेल; कारण या देशांतील जुनी उत्पादनव्यवस्था बदलत चालली, त्याबरोबर समाजव्यवस्थाहि बदलत चालली. सुखानें, बिनश्रमानें, बसून खाणाऱ्यांची संख्या कमी होत जाऊन, काम करावें तेव्हां जगावें, या वर्गाची संख्या वाढत जाईल, हें सरळ दिसत आहे. त्यामुळें नोकरीच नाहीं तर लग्न न करण्याकडे अगर उशीरां करण्याकडे तरुणांची प्रवृत्ति होत आहे. त्याबरोबर अनेक नवीन नवीन प्रश्न उत्पन्न होत आहेत. मुलींनीं स्वत: मिळवून आपलें पोषण करावें म्हणून त्यांना शिक्षण द्यावयाचें असें होऊं लागलें आहे. एकत्र कुटुंबें कमी होऊं लागलीं, त्याबरोबर स्त्रियांना श्रम करून उपजीविका करणें अवश्य होऊं लागलें आहे. समाजांतील सर्व वर्गांच्या स्त्रिया, कांहीं श्रीमंत अपवाद सोडल्यास, या परिस्थितीकडेच जातील. प्रत्येकीला कष्ट करावे लागतील, व ती चांगलीच गोष्ट होईल. आणि तसें झपाट्यानें घडून येत आहे. रेशनिंगखात्यांत तर स्त्रियांची संख्या मोठ्या प्रमाणावर नोकरींत आहे. साधे कारकून म्हणून अनेक खात्यांत त्या आतां झळकत आहेत. विक्री करणाऱ्या म्हणून दुकानांना शोभा आणीत आहेत. तथापि आपल्याला येथें विचार करावयाचा तो, स्त्री व पुरुष यांच्या मजुरीचे दरांत फरक कां राहतो याचा. एक तर स्त्रिया ह्या पुरुषाइतकें काम करूं शकत नाहींत. त्यांचें उत्पादनाचें प्रमाण कमी, म्हणून साहजिक मजुरी पण कमी; कारण, एक पुरुष लावून जें उत्पादन होऊन उत्पन्न येईल त्यापेक्षां एक स्त्री लावून जें येईल तें कमी असतें. स्त्रियांचे बाबतींत परवडणारें उत्पादन कमी असतें. मोठाल्या कारखान्यांत अगर जेथें शक्तिच जास्त लागते तेथें, स्त्रियांपेक्षां पुरुष जास्त उपयोगी म्हणून त्यांना मजुरी जास्त. उलट दायीपणाचा धंदा, स्वयंपाक करणें, घरघराऊ कामें, या व्यवसायांत बहुतकरून स्त्रियाच असतात; व त्या पुरुषापेक्षां हुशारीनें व दक्षतेनें काम करतात हा अनुभव प्रसिद्ध आहे. कांहीं ठिकाणीं स्त्रियांच्या हाताखालीं काम करण्यास माणसें तयार नसतात. म्हणून मालकांना, योजकांना, अशा जागीं पुरुषच नेमावे लागतात. त्यांच्या विरुद्ध पुष्कळ ठिकाणीं पूर्वग्रह असतात. तात्पर्य, त्यांची ताकद कमी म्हणून किंवा त्यांच्याकडून काम कमी होतें म्हणून त्यांची मजुरी कमी असते, ही गोष्ट मात्र खरी. विडयांचा कारखाना असो, गिरणी असो अगर शेतांतील कापूस वेंचणें असो, सर्वत्र त्यांची मजुरी, पुरुष मजुरापेक्षां कमी;

प्रतिष्ठित धंद्यांत सुद्धां हाच अनुभव. आधीं असल्या धंद्यांत स्त्रिया अगदीं थोडया, कारण मुलांवर पैसा खर्च करणें, आईबापांस परवडतें. मुलांना पदवीधर करतील, मुलींना करणार नाहींत. तिचें शिक्षण चांगला वर मिळेल या दृष्टीनेंच केलें जातें. हिंदुस्थानांतच नव्हे तर, सुधारलेल्या देशांतहि प्रतिष्ठित धंद्यांत स्त्रियांची संख्या कमीच आहे. तेथेंहि लोक, स्त्रीकायदेपंडितापेक्षां पुरुष कायदेपंडिताकडेच जातात. स्त्री डॉक्टरकडे रोगी कमी, पुरुष रोगी तर अर्थात् नाहींच. मोठमोठाले कारखानदार, पुरुष मजुरांना कांहीं ठिकाणीं खर्च करून शिक्षण देतात, पण स्त्री कामगारावर ते खर्च करावयास तयार नसतात. कारण अद्यापि स्त्रियांचें ध्येय लग्न करून संसार करणें, हें असल्यामुळें त्यांना असें वाटतें कीं, शिकवून तयार केल्यावर लग्न जमलें कीं गेल्या; कांहीं धंद्यांत तर स्त्रियांना कायद्यानें, वहिवाटीनें म्हणा पाहिजे तर, प्रवेशच नाहीं ! खाणींत स्त्रियांना काम नाहीं, त्याचप्रमाणें लोखंड, पोलाद, इंजिनियरिंगचे असे मोठे धंदे, त्यांना बंदच आहेत. गवंडीकाम, सुतारकाम, यांतहि त्यांना कुठल्याहि देशांत प्रवेश नाहीं. वाहतुकीच्या धंद्यांत त्यांचा प्रवेश होऊं लागला आहे पण अगदीं अल्प. रेल्वे, ट्राम यांत, हिंदुस्थानांत तर नाहींच. सरकारी सर्व खात्यांतहि प्रवेश नाहीं. पण पुढारलेल्या राष्ट्रांतहि सर्वत्र नाहीं. खुद्द इंग्लंडमध्यें स्त्री प्रधानमंडळांत असेल, पण ज्या खात्यावर तिचा अधिकार असेल, तेथें साधा नोकर म्हणूनहि कांहीं शाखांत तिला प्रवेश मिळणार नाहीं. बरेंच व्यवसाय स्त्रियांना बंद असल्यामुळें ज्यांत त्यांना प्रवेश आहे, तेथें त्या जास्त आहेत. त्यांची संख्या अर्थात् जास्त व त्याचा परिणाम साहजिकच मजुरी कमी हाच होणार.

येथपर्यंत कुठल्याही तऱ्हेच्या मजुराचा मजुरीचा दर, मागणी व पुरवठा या नियमानें कमीजास्त होतो, असें समजून विवेचन केलें. पण पुष्कळ धंद्यांत किमान वेतन, सरकार अगर मजूरसंघ ठरवितात; तेथें काय घडतें हें आपण पाहिलें पाहिजे. मजूर व मालक यांच्या संबंधांत नियमन करणारे कायदे बहुतेक सर्व देशांत आहेत. कामाचे वेळाबद्दल, सुट्टयांबद्दल, सुखसोईबद्दल, वेतनाबद्दल त्यांच्यांत तंटा सुरू झाल्यास तो तोडण्याची व्यवस्था, त्या त्या कायद्यांत केलेली असते. एक तडजोडीनें अगर कोर्टमार्फत साक्षी पुरावा घेऊन, कोर्टानें दिलेला निकाल उभयपक्षांनीं मान्य करावा. ही कोर्टे खास कोर्टें असतात. तथापि कांहीं कायदे असले तरी, मालक जोंपर्यंत उत्पादन हें भांडवलशाही पद्धतीवर चालवीत आहे तोंपर्यंत, त्याच्या हिताविरुद्ध असलेली गोष्ट तो मोडून काढील. उत्पादनापासून नफा हें तत्त्व जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत मालक एका मर्यादेपलीकडे सरकारचेंहि ऐकणार नाहीं. वेतनाबद्दल

तंटा उपस्थित झाला, महागाई झाली, म्हणून पगार वाढ व्हावी, वेतन वाढावें, अशी मजुरांनीं तक्रार केली. या कामीं कोर्टानें अगर लवादानें निवाडा देऊन ५ टक्के वाढ केली; या वाढलेल्या दरापेक्षां कमी मजुरी देतां कामा नये असें ठरविलें. त्याचा परिणाम मालकाला, योजकाला किमान मजुरी तितकी द्यावीच लागेल; पण कायदा कांहीं अमुक मजूर ठेवलेच पाहिजेत, असें सांगूं शकत नाहीं. धंदा एका ठरीव प्रमाणांत चालविलाच पाहिजे, अशी सक्ती कायदा करूं शकत नाहीं. जास्तींत जास्त तडजोड चालू असेपर्यंत जसें संप करणें हें बेकायदेशीर केलें, त्याप्रमाणें, टाळेबंदी बेकायदेशीर झाली. पण तडजोड झाल्यावर दुसरे दिवशीं योग्य नोटीस देऊन मालक वाटेल तितके कामगार कमी करूं शकेल; याचा परिणाम कमी झालेले कामगार बेकार होतील, कारण सरकारनें किमान दर सर्वत्र ठरविला असल्यामुळें, त्याखालीं कोणी मालक देणार नाहीं व मजूर दुसरीकडे जेथें किमान दर ठरला नसेल तेथें, कमी मजुरीनें जातील, नाहीं तर बेकार होतील. जेथें बेकारी भत्ता मिळतो, तेथें भत्त्यावर त्यांना अवलंबून राहावें लागेल, नाहींतर भिक्षेवर, हें उघड आहे. जर हा किमान दर पुष्कळ जास्त असला तर, इतर धंद्यांतले कामगार, कारागीर, या धंद्यांत येतील व मालक ते जास्त चांगले म्हणून जुन्यांना काढून नव्यांना घेतील. यामुळें ज्यांनीं तक्रार केली त्यांचें नुकसानच होईल. तसेंच मजुरीचे दर असे वाढले तर, योजक कमी मजूर लागतील अशीं यंत्रें आणून, उत्पादनतंत्र बदलून, एकंदरीनें पुन्हा कमी खर्च करून, आपला नफा कायम करील. तथापि मजुरी वाढली कीं त्याचा परिणाम मालकांच्या नफ्यावर झालाच पाहिजे. कारण नफा हें फळ मजुरांच्या श्रमरूपी वृक्षाला येत असतें. मात्र त्याचा भोक्ता योजक असतो. नफा कमी झाला, किंवा मजुरी वाढल्यामुळें होईनासा झाला तर, पुष्कळ योजक तो धंदा बंद करतील. आपलें भांडवल त्यांतून काढून दुसरीकडे नेतील. याचा परिणाम त्या धंद्यांतील एकंदर उत्पादन कमी होईल, तें कमी झालें म्हणजे बाजारभाव वाढेल, व तो वाढला म्हणजे जास्त द्यावी लागणारी मजुरी व तिजपासूनचें उत्पादन परवडणारें होईल.

एकंदरीनें विचार करतां किमान वेतन ठरविलें म्हणजे त्याचा परिणाम कामगारांची संख्या मर्यादित होण्यांत होतो. अर्थात् तत्काल संख्या कमी होते असें नाहीं. जसजसा मालकांचा नफा कमी होत जाईल, त्या प्रमाणांत हें घडून येईल. सर्व उत्पादनघटकांत मजुरांचे श्रम हाच घटक असा आहे कीं, ज्यापासून मालकाला नफा मिळत असतो. इतर सामग्री इतर उत्पादनघटक यांची किंमत तो कांहीं विशेष कमीजास्त करूं शकत नाहीं. समजा, तयार कपडे करण्याचा कारखाना आहे. योजक कापड

विकत आणतो, यंत्रें विकत आणतो, शिंपी कामगार लावतो व कांहीं भावानें तो विकतो; जो नफा होतो तो कोणत्या घटकापासून ? भाव एकदम थोडा कमी झाला तर कोणत्या घटकाकडे त्याचें लक्ष जाईल ? कापडाची, यंत्राची किंमत तो कांहीं कमी करूं शकत नाहीं. येऊनजाऊन शिंप्यांची मजुरी तो कमी करील. शिंप्याची मजुरी हीच एक गोष्ट कमीजास्त होणारी आहे. मग जेवढी त्याची मजुरी कमी तेवढा मालकाचा फायदा जास्त; व जेवढी मजुरी वाढेल तेवढा फायदा कमी. म्हणून सदऱ्याच्या मोलाचें खरें जनकत्व शिंप्याच्या श्रमांकडे. त्याला किंमतरूपी पाणी चढतें तें शिंप्याच्या श्रमांमुळेंच. श्रमरूपी रामाचा पदस्पर्श होतांच त्या वस्तूपासून मोलाची अहिल्या उत्पन्न होते. पण बिचाऱ्या मजुराला हें मूल्य, हा नफा, कधींच भेटत नाहीं. मजुराला, त्याच्या श्रमाला, मालकानें दिलेली किंमत व त्या श्रमाच्या उत्पादनाला आलेली बाजारांतील किंमत, यांतील फरक, जेवढा जास्त तेवढा नफा मालकाला जास्त. मजुरी वाढली म्हणजे हा फरक कमी होतो; त्यामुळें मालकाला परवडत नाहीं व तो हळूहळू गाशा गुंडाळत जातो. चालू उत्पादनसंच यंत्रसामग्री, निकामी झाली कीं नवीन घेत नाहीं अगर अशी घेतो कीं, मजूर कमी लागून उत्पादन जास्त व्हावें. दरम्यान तो मजूर कमी करीतच असतो; व असें दाखविण्याचा प्रयत्न करतो कीं, नालायक तेवढेच काढलें, अगर उत्पादनतंत्र बदललें म्हणून काढलें; कारण असें जर तो करणार नाहीं तर कदाचित् कायद्याचे कचाटींत येईल.

मजुरांची संख्या अशा रीतीनें त्या धंद्यांत किती कमी होईल, हें अखेरीस त्या प्रकारच्या मजुरांना मागणी किती राहील, व विशेषतः ती कमीजास्त होणारी आहे कीं नाहीं, यावर अवलंबून राहील. ही मागणी म्हणजे या विशेष धंद्यांत काम करणारे कामगार किती लागतील, हें त्या धंद्यांत उत्पन्न होणाऱ्या उत्पादनाचे मागणीवर अवलंबून राहील. तसेंच योजक किती सुलभतेनें आपलें उत्पादनतंत्र जुळवून घेतो, यावरहि अवलंबून राहील. जर धंद्यांतील उत्पादित मालाची मागणी बदलणारी नसली तर, मजुरांची मागणी पण त्याच स्वरूपाची राहील; उलट जर मागणी मालाचा भाव कमीजास्त झाल्याबरोबर कमीजास्त होणारी असेल, त्याला जाब देणारी असेल तर मजुरांचे मागणीवरहि तसाच परिणाम होईल. कारण मालाला मागणी वाढत चालली तर मालक, किमान वेतन वाढलें तरी, उत्पादन वाढविणें फायदेशीर आहे म्हणून मजूरसंख्या कमी करणार नाहीं. त्याचबरोबर प्रथम तो उत्पादनतंत्र जुळवून त्याच मजूरसंख्येंत, अगर कमी करून सुद्धां, जास्त उत्पादन करण्याचा प्रयत्न करील, तें न जमलें तर जास्त मजूर घेईल हें उघड आहे. समजा, तो ज्या

मालाचें उत्पादन करतो, तो माल परदेशांतून येऊन देशी मालाशीं चढाओढ करीत असेल तर काय होईल ? परदेशी माल पूर्वींच्याच भावानें विकला जाईल. देशी माल तयार करणाऱ्या योजकाला किमान वेतन वाढलें म्हणून उत्पादनाचा खर्च वाढला. एक तर त्याला नफा कमी घेऊन तो माल विकला पाहिजे, कारण तो किंमत वाढवूं शकत नाहीं. बाजारांत, तोच परदेशी माल पूर्वींच्याच किंमतीस विकतो आहे, तेव्हां किंमत वाढविली तर याच्या मालाला विक्री नाहीं. अशा स्थितींत त्या धंद्यांतील मजुरांना मागणी कमी राहील. उलट किंमत वाढवून, जर मालाची विक्री पूर्वींइतकीच राहिली अगर विशेष कमी झाली नाहीं, तर मजुरांच्या मागणीवर फारसा परिणाम होणार नाहीं; व योजक पूर्वींचीच संख्या साधारणपणें कायम ठेवील. जर उत्पादनतंत्र बदलून जुळणी करतां आली तर मात्र, वर सांगितल्याप्रमाणें तें प्रथम करून पाहील; कारण ज्या ज्या रीतीनें उत्पादनखर्च कमी करतां येणें शक्य आहे, ती प्रत्येक गोष्ट केल्या-शिवाय भांडवलशाही योजक कधींहि राहणार नाहीं. मजुरांचा मेहनताना वाढला आहे, अशा स्थितींत नवीन यंत्रें घेऊन, नवीन तंत्र अमलांत आणून, उत्पादन-खर्च सर्व गोष्टींचा विचार करतां पूर्वींपेक्षां कमी येत असेल तर, तो ही गोष्ट जरूर अमलांत आणील, मग मालाला मागणी कशीहि राहो.

वरील सर्व विवेचनांत किमान वेतन ठरविलें अगर वाढविलें तर सामान्यतः त्याचे परिणाम मालक कशा रीतीनें टाळूं पाहातो हें पाहिलें. त्याबरोबरच मजुरांवर त्याचा काय परिणाम होतो हेंहि सामान्यतः पाहिलें. किमान वेतनापासून मजुरांचा फायदा अखेरीस होतच नाहीं असें म्हणणें बरोबर नाहीं. मालकांच्या क्लृप्त्यांना न जुमानतां कांहीं फायदा या किमान वेतनाच्या योजनेनें होतोच. मालकांना जो नफा होतो तो कोठून येतो हें वर सांगितलें आहे. मजुरांच्या श्रमांची द्यावी लागणारी किंमत व त्यांच्या श्रमांपासून झालेल्या उत्पादनाला बाजारांत आलेली किंमत, यांत जो फरक राहतो, त्यावर नफा अवलंबून आहे. ती त्याची जन्मभूमि आहे. गणिताच्या भाषेंत हें सांगतां येईल. समजा वस्तु 'अ' ही तयार होतांना कच्चा माल, यंत्र वगैरे उत्पा-दनसामग्री जी खर्च झाली ती, आपण 'क' समजूं व जो मजुरांना मेहनताना द्यावा लागला, त्याला 'म' समजूं. म्हणजे 'क + म' = वस्तूला लागलेला उत्पादनखर्च. त्याला आपण 'ख' म्हणूं. आतां बाजारांत या वस्तूला जी किंमत येते त्याला आपण भाव—'भा' म्हणूं. मग 'भा – ख' = नफा, हें अगदीं सरळ आहे. किंमत उणें, झालेला खर्च, म्हणजे नफा हें समजलें. आतां 'ख' जेवढा जास्त, तेवढा नफा कमी, हें अगदीं उघड आहे. खर्च जितका जास्त तितका नफा कमी. आतां 'ख' म्हणजे

क + म, 'क' म्हणजे कच्च्या मालाचा व इतर सामग्रीचा खर्च, व 'म' म्हणजे मजूर खर्च. कच्चा माल वगैरे सामग्रीचा खर्च योजक तात्काल कमी करूं शकत नाहीं, मजुरीच कमी करूं शकेल. तेव्हां 'क' कायम, त्यांत विशेष फरक होऊं शकत नाहीं. तेव्हां जर 'म' वाढला तर 'ख' वाढतो व 'म' कमी झाला तर 'ख' कमी होतो. म्हणजे मजुरी वाढली कीं नफा कमी, मजुरी कमी कीं नफा जास्त, म्हणजेच मजुरांच्या श्रमांत नफ्याचा जन्म. मजुरांच्या उत्पादनाला किंमत जास्त येऊन, ती त्यांना न देण्यांत म्हणजे कमी देण्यांत, मालकाचा नफा आहे. म्हणून मजुरी वाढली कीं हें अंतर कमी होतें. क + म = ख, व हा वाढला म्हणजे भा − ख = नफा हा कमी होत जातो. म्हणून भा = ख सारखा झाला तर नफा शून्य. या दृष्टीनें विचार करतां योजकाची इतर उत्पादनसामग्री व संच हीं तात्काल बदल करतां येतील अशीं नसतात. मोठमोठालीं यंत्रें काढून टाकून, नवीन यंत्रें, जीं चालविण्यास कमी मजूर लागतील अशीं, ताबडतोब आणणें शक्य नसतें. म्हणून मालक जोंपर्यंत भा = ख हें प्रमाण येत नाहीं तोंपर्यंत, धंदा चालू ठेवण्याचा प्रयत्न करतो. याचा अर्थ जास्त मजुरी ही मालकांना नफ्यांतून द्यावी लागते. हें देणें जिवावर येतें हें निराळें. पण त्यांना पदरचें द्यावें लागत नाहीं हेंहि खरें. जर थोडेसें उत्पादन आंखडतें घेऊन, भाव वाढविणें शक्य असेल तर, योजक तें करतील व धंदा वाढत्या मजुरींत चालू ठेवून, ही वाढलेली मजुरी, किंमत वाढल्यामुळें गिऱ्हाइकांचे खांद्यावर अलद बसवतील! आमचा गरीब ग्यानबा जास्त किंमत देतांना त्याला मालकांची ही टगेगिरी न कळल्यामुळें, गरीब मजुरांना शिव्याशाप देत राहील. कारण मालक मजुरी जास्त द्यावी लागते म्हणून किंमत वाढली असेंच सांगत राहतात. तथापि यामुळें निदान त्या धंद्यांतील कामगारांना वाढलेलें वेतन मिळत राहून त्यांची संख्या एकदम कमी होत नाहीं व वाढलेल्या मजुरीमुळें, त्यांच्या कामावर परिणाम होऊन, ते जास्त हुशार, कार्यक्षमहि होणें अशक्य नसतें; ते तसे झाले तर अर्थात् त्यांची संख्या कमी होणारहि नाहीं.

मजुरी जास्त वाढली तर मजूर आपली राहाणी सुधारील, जरा जास्त चांगलें अन्न खाईल, पुरेसें खाईल, स्वतःची थोडी करमणूक करील. एकंदरीनें त्याचें मन पूर्वीपेक्षां थोडे कमी उदास व जास्त प्रसन्न राहील व त्यामुळें त्याच्या कामावर चांगला परिणाम होईल. तें तो मन लावून चांगलें करील. हा नित्य येणारा अनुभव आहे. मजुरी जास्त दिली कीं काम सुधारतें हे सांगण्याची गरज नाहीं. काम चांगलें होऊं लागलें व उत्पादन जास्त होऊं लागलें आणि त्यामुळें मागणी जरी कमी झाली

तरी एकंदरीनें मजुरांचें काम चांगलें व जास्त होऊं लागल्यामुळें, प्रमाणानें उत्पादन-खर्च कमीच होतो, व शेवटीं अशा मजुरांना मागणी वाढलीच पाहिजे. पण त्या-बरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, जास्त मजुरीमुळें सर्वत्र व निरपवाद कार्यक्षमता वाढतेच असें नाहीं व त्याचीं कारणें मजूर वाढती मजुरी वाटेल तशी खर्च करतात हें नव्हे, तर उत्पादनाकडे आपलेपणें बघण्याची दृष्टि मजुरांत नसते व ते अगदीं साहजिक आहे. कारण मजुरी करण्यापलीकडे त्या उत्पादनांत त्यांना भांडवलशाहींत स्थान नसतें, या गोष्टीचा त्यांचे मनावर परिणाम होत असतो, हें नाकबूल करून चालणार नाहीं.

किमान वेतन देऊन अगर तें वाढलेलें असलें तर तेंहि देऊन, मालक आपली नफेबाजी कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत असतो. तथापि जरी असल्या धंद्यांत मक्ते-बाजी असली, म्हणजे एका अगर अनेक संघटित योजकांच्या नियंत्रणांत त्या मालाचें सर्व अगर बहुतेक उत्पादन असलें तरी, योजकांच्या नफेबाजीला या किमान वेतन-योजनेनें थोडा तरी आळा बसतोच. जे मजूर या धंद्यांत काम करतात तसलेंच काम करणारे मजूर दुसऱ्या धंद्यांत असतील व तेथें चढाओढ असेल तर, या किमान वेतनामुळें, जास्त झालेलें वेतन देऊन सुद्धां, मालकांना त्या मजुरांना ठेवणें प्राप्त होतें. नाहीं तर ते दुसरीकडे जातील, कारण तेथें चढाओढीमुळें मागणी राहणें साह-जिक आहे. जेथें अगदीं अशी स्थिति असेल कीं, जें काम तेथील मजूर करतात, तसलें काम त्या धंद्याशिवाय कोठेंहि नाहीं व त्या मजुरांना दुसरें काम करतां येत नाहीं, अशा ठिकाणीं मालक किमान वेतनाला आळा घालून आपली नफेबाजी कायम ठेवतील. एक तर असे धंदे थोडे हें आपण पूर्वींच पाहिलें आहे. शिवाय मजुरांना कांहीं नवीन धंदा शिकणें अजिबात अशक्य, हेंहि खरें नाहीं. कालांतरानें मजूरहि जुळवून घेतो, नवीन धंदा शिकतो. अर्थात् नाइलाज म्हणून, हें मात्र खरें. तथापि मालक नफेबाजी करण्याचा प्रयत्न करतात. जेथें मजूर दुसरीकडे जाण्यास नाखूष अगर दुसरा धंदा करण्यास अपात्र तेथें मालकाला नफेबाजी करण्यास वाव जास्त. पण भांडवलशाहीची रचनाच अशी कीं, जेथें मजुरीचा उत्पादनाचे मानानें दर कमी पडत असेल तेथें इतर भांडवलवाले जमतात. व त्याबरोबर चढाओढ व त्यामुळें मजुरांना उत्पादनाचे मानानें योग्य दर मिळणें शक्य होतें. नफा हा कावळ्यासारखा असतो. कावळ्याला कांहीं खाद्य मिळालें कीं तो ओरडून सर्व जातबांधवांना आमंत्रण देत असतो. नफातोटापत्रकें हेंच करतात. एक भांडवलवाला जणुं काय जातबांधवांना कुठें खाद्य आहे हें सांगत असतो व ते भांडवलवाले तेथें जातात आणि त्याचा परिणाम

वर लिहिल्याप्रमाणें होतो. मात्र, हे सगळे जातबांधव संघटित झाले तर मजूरवर्गावर आपत्ती हें निश्चित. पुष्कळ वेळां मालक व्यक्तिशः मजुरांशीं करार करण्याचा प्रयत्न करतात, पण त्यामुळें जरी मजुरी कमी द्यावी लागली तरी मजूर असंतुष्ट राहतात व संधि येतांच काम सोडून जातात. म्हणून योग्य वेतन देणेंच अखेरीस परवडतें. हें जेथें किमान वेतन नाहीं तेथें होतें. मग जेथें किमान वेतन कायद्यानें अगर करारानें ठरलें आहे, तेथें तर मालकाला कांहीं कमीजास्ती करतां येत नाहीं, त्याचा परिणाम मजुरी वाढल्यामुळें अगर किमान वेतन ठरल्यामुळें त्याच्या नफेबाजीला आळा बसतो. तें प्रमाण कमीजास्त असेल, पण आळा बसतो हें तितकेंच खरें. तात्पर्य, किमान वेतनयोजनेनें ज्या प्रमाणांत नफेबाजीला आळा बसेल त्या प्रमाणांत मजुरांना खरा फायदा होतो. कारण वाढलेली मजुरी, मालक नफा कमी करून देत असल्यामुळें मजुरांची संख्या स्थिर राहते किंवा मालकच मजूर कमी करीत नाहीं.

जेथें किमान वेतन कायद्यानें ठरविलें जातें, तेथें बेकारभत्ताहि सरकारला द्यावा लागतो. जर किमान वेतनानें मजुरीच्या दरांत वाढ झाली व त्यामुळें बेकारी वाढली, तर मजूर वर्गाचा फायदा होणार नाहीं. कांहीं मजुरांचा म्हणजे जे कामावर राहतील त्यांचा होईल. पण बेकारी भत्ता मिळतो तो मजूर कामावर असतांना जी मजुरी मिळत असे, त्या मानांत जेथें असतो तेथें या किमान योजनेनें मजूरवर्गाचें नुकसान होत नाहीं.

बेकारी भत्त्याच्या सामान्य योजनेंत कामकरी व मालक या दोहोंवरहि वर्गणी बसविलेली असते; परंतु ही रक्कम कमी पडल्यास शेवटीं सरकारला आपल्या उत्पन्नांतून भत्ता देणें भाग पडतें. आणि हा बेकारी भत्ता मिळत असलेल्या मजुरीच्याच मानानें असावयास पाहिजे व बहुशः असतोहि. मजूर काम करावयास तयार असला तर मजुरांस काम देणें अगर बेकारी भत्ता देणें असा प्रश्न भांडवलशाहींत सरकारपुढें उभा रहातो. भांडवलशाही टिकविण्याकरितां सरकार हा बेकारी भत्ता लोकांकडून करानें पैसा वसूल करून बेकारांना देत असतें, व कर बसावावयाचा म्हणजे कांहीं तरी ऐपतीचे मानानेंच बसविणार. या दृष्टीनें किमान वेतनयोजनेनें बेकारी झाली तरी, बेकारभत्ता द्यावा लागत असल्यामुळें सरकारला कर बसवून, एक प्रकारें संपत्तीची वांटणी करावी लागते, व त्यामुळें मजूरवर्गाचा फायदा होतो.

तात्पर्य चालू मजुरीचे दरापेक्षां जास्त दर वाढवून किमान वेतन जर कायद्यानें अगर करारानें ठरलें, तर प्रथम जे कामावर राहतील त्यांचा तर नक्कीच फायदा होतो. या किमान वेतनांतील वाढीमुळें कांहीं कामगार बेकार होणें शक्य आहे, पण

किती प्रमाणांत होतील याचीं कारणें आपण मागें पाहिलीं. जे बेकार होतील व कामाशिवाय राहतील अगर दुसऱ्या धंद्यांत कमी मजुरीवर जातील, त्यांचें नुकसान हें नक्कीच. किमान वेतन वाढल्याबरोबर, कांहीं काळ योजकांना नफा कमी मिळेल. जेथें शक्य तेथें योजक मालाची किंमत वाढवितील, त्यामुळें गिऱ्हाइकाला वस्तु महाग होईल व बेकारी भत्ता द्यावा लागल्यास करवाढ होऊन लोकांना पूर्वीपेक्षां कर जास्त द्यावे लागतील. मजूरांची, वर्ग या दृष्टीनें स्थिति बरी होईल. व्यक्तिशः कांहींचें नुकसान व कांहींचा फायदा होईल. योजकांना तात्कालिक थोडासा नफा कमी, पण अखेरीस कालांतरानें, ते आपलें उत्पादन कमाल नफ्याचे दृष्टीनें जुळवून घेतील. मांजर कितीही उंचाहून जरी फेंकलें तरी पायांवरच पडतें. तोच न्याय भांडवलशाही उत्पादनांत योजकांच्या वर्तनाला लागू पडतो. नफा वाढल्यास तो योजकच घेणार. नुकसान आल्यास गिऱ्हाइकांवर टाकण्याचा तो प्रयत्न करणार.

वरील विवेचनांत आपण सर्व व्यवसायांत किमान वेतनयोजना आहे असें मानलें नाहीं. कांहींत आहे व कांहींमध्यें सरळ मागणी व पुरवठा या न्यायानें मजुरी मिळते असें मानलें. पण समजा, एखाद्या राष्ट्रांतील सरकारनें सर्व धंद्यांत मजुरी वाढविण्याचें टरविलें, व त्या दृष्टीनें प्रत्येक व्यवसायांत किमान वेतन निश्चित केलें. नंतर समजा, सर्वत्र २० टक्के वाढ केली, कुणालाहि कमी घेऊन काम करण्याची परवानगी नाहीं. पदार्थांच्या किंमती वाढून ही पगार वाढ अगर वेतन निरर्थक होऊं नये म्हणून, जी वाढ २० टक्के केली आहे, ती अगदीं खरी व्हावी म्हणजे नुसती पैशाच्या स्वरूपांत नव्हे तर वास्तविक स्वरूपांत व्हावी म्हणून असेंही ठरविलें कीं, जर पदार्थांच्या किंमती वाढल्या तर, त्या मानानें वेतन वाढावें मग काय होईल तें पाहूं. किमान वेतन कांहीं धंद्यांत, कांहीं व्यवसायांतच असल्याकारणानें, त्याचा पुरा फायदा मजुरांना ज्या गोष्टीमुळें घेतां येत नाहीं त्या गोष्टी नाहींशा होतील. जे मजूर किमान वेतन मिळविण्याचे लायकीचे नसतील त्यांना कमी वेतनावर दुसरीकडे काम करतां येणार नाहीं. या धंद्यांतून त्या धंद्यांत मजुरांची अदलाबदल व्हावयाची नाहीं. जे मजूर कमी होतील ते बेकार राहतील, कारण त्यांना कमी पगारावर काम करतां येणार नाहीं. उत्पादन कमी करून, किंमत वाढवून नफा वाढविणें योजकाला शक्य नाहीं. कारण किंमत वाढली कीं, त्याला मजुरीहि वाढवावी लागेल. त्याचप्रमाणें यंत्रें बदलून, नवा संच करून, उत्पादनतंत्र बदलून नफा वाढवूं लागेल तर, या सर्वांची किंमत मजुरी वाढल्यामुळें वाढलेली असणार. त्यामुळें तेंही त्याला करतां येणें कठीण होईल. याचा परिणाम धंद्यांत भांडवल राहणार नाहीं, नफा मिळत नाहीं म्हणून

कोणी धंद्यांत पडणार नाहीं, व धंद्यांतलें भांडवल कमी होऊं लागलें तर, मजुरांच्या श्रमाचें परवडणारें उत्पादन कमी होईल. जर वेतन कायद्यानें ठरलें नसतें, तर ताबडतोब मजुरीचे दर सर्वत्र कमी होऊन निराळी परिस्थिति उत्पन्न झाली असती. पण वास्तविक मजुरी, खरी मजुरी जी वाढली आहे ती कायम ठेवावयाची म्हणजे अधिक अधिक बेकारी होईल. याचा परिणाम योजकांच्या नफेबाजीवर येवढा होईल कीं, थोड्या काळांत ती नामशेष होईल व त्यामुळें उत्पादन कमी होऊन बेकारी जास्त वाढेल. बेकारी भत्ता द्यावयाचा म्हणजे पुनः करवाढीनें भांडवलावर आणखी परिणाम व्हावयाचा. हें सर्व चित्र पाहून कोणी असें म्हणेल कीं, किमान वेतन न ठेवणेंच बरें. सरकारचें नियंत्रण नसलेलेंच बरें. वर जें चित्र रेखाटलें आहे, तें अगदीं काल्पनिक नाहीं. आस्ट्रेलियांत मजूरपक्षानें अधिकारारूढ असतांना असा प्रयत्न केला, त्याचा परिणाम वर लिहिल्याप्रमाणेंच झाला. जेथें मजुरीचे दर कायद्यानें किमान वेतनयोजनेबरहुकूम करण्याचा प्रयत्न झाला तेथें असाच अनुभव आला. किंबहुना उत्पादनसाधनांपैकीं भांडवल हा घटक अनियंत्रित ठेवून खाजगी मालकीचा ठेवून, नुसतें मजुरीचें नियंत्रण करणें म्हणजे हाच अनुभव यावयाचा. एखादा धंदा सरकारनें सार्वजनिक मालकीचा केला अगर चारदोन धंदे सरकारनें नियंत्रणाखालीं घेतले अगर योजकांना व भांडवलवाल्यांना मोकळें ठेवून नुसती मजुरीच नियंत्रित करण्याचा प्रयत्न केला, येवढ्यानें भांडवलशाही उत्पादनांतील अन्याय अगर विषमता दूर होत नाहीं. उलट सरकारचें नियंत्रण, हें घातकी आहे असें दाखविण्याकडे व तसें घडवून आणण्याकडे भांडवलवाले योजक आपली शक्ति खर्च करीत असतात. समजा, वरील चित्रांत योजक हे खाजगी नसून सर्व उत्पादन, राष्ट्रांतील सर्व उत्पादन सरकार करीत आहे. उत्पादनाची सर्व साधनसामग्री सरकारच्या मालकीची, सरकारच्या नियंत्रणाखालीं आहे; मग तें सरकार प्रथम प्रत्येक माणसाला एक किमान राहणीसाठीं किती वेतन द्यावें लागेल हें ठरवील. राष्ट्रांतील वस्तूंना कोणत्या प्रमाणांत मागणी राहील याचीं कोष्टकें तयार करील. त्याला लागणारा कच्चा माल, यंत्रसामग्री, यांची नोंद करील. उत्पादनाकरितां मजूर, कारागीर, तज्ज्ञ, व्यवस्थापक, किती लागतील व ते कसे तयार करावयाचे हें ठरवील. तयार झालेला माल कसा वांटावयाचा, त्याची संघटना तयार करील. तात्पर्य योजनापूर्वक उत्पादन व योग्य उपभोग असा मेळ तें सरकार करील. नुसती मजुरीबाबत योजना करून योजकांना मोकळें सोडणें म्हणजे भांडवलवाल्यांना हें योजनेचें तत्त्व घातुक आहे, असें ठरविण्याची संधि देणें आहे. उत्पादन जोंपर्यंत नफ्यासाठीं आहे तोंपर्यंत

तें उपयोगाकरितां नव्हे म्हणून गरजेपेक्षां कमी असणार व अशा स्थितींत किमान वेतनयोजना हा एक चालचलाऊ उपाय आहे व त्यांतल्या अडचणीहि वर आपण पाहिल्या.

किमान वेतनाचा विचार करतांना आपण तें सरकार ठरवितें अगर करारानें मजूरसंघ ठरवितो असें म्हटलें. मजूरसंघ हें केव्हां ठरवूं शकेल याचाहि थोडा विचार करूं. मजूरसंघाची शक्ति नुसता संघ आहे येवढ्यावर नाहीं. त्या धंद्यांतील अगर व्यवसायांतील बहुसंख्याक मजूर जर त्या संघांत असतील तर उपयोग; नाहीं तर, कामावर दहा हजार मजूर असावेत व मजूरसंघांत पांचशें ! या पांचशांनीं संप केला किंवा संपाची नोटीस दिली, त्यानें मालकांवर कांहीं परिणाम होणार नाहीं. कारण त्यांची संख्या क्षुद्र आहे. त्यांचें काम नवीन माणसें घेऊन अगर राहिलेल्या माणसांकडून होण्यासारखें असेल तर तो कांहीं काळजी करणार नाहीं. बेकारी असली तर आणखी त्याचाच फायदा होईल. कारण नवीन कामावर येणारांना पूर्वीच्या लोकांपेक्षां तो कमीच मजुरी देईल. समजा, त्या धंद्यांतील त्या ठिकाणीं काम करणारे मजूर बहुतेक संघांत सामील आहेत, पण मालकाला दुसरीकडून संप फोडे आणणें सोपें जात असेल तर, त्या मजूरसंघाला मालक जुमानणार नाहीं. मजूरसंघांत सर्व मजूर सामील, संपफोडे आणणें अवघड, तरी सुद्धां कांहीं काळ संप टिकविण्याची तयारी असली पाहिजे. म्हणजे फंड पाहिजे अगर संपावर असतांना मजुरांच्या पोटाची व्यवस्था पाहिजे. तसें नसेल तर संघाच्या दमदाटीला मालक भीक घालणार नाहीं. बेकारीभत्ता जर सरकारकडून मिळत असेल तर, बेकार लोक संपफोडे होणार नाहींत. आणि तसें झालें तर ती मजूरसंघाला मदतच होते. म्हणून मजूरसंघ व्यापक असून त्यांत बहुतेक मजूर सामील होऊन संप टिकविण्याची ताकद असेल तर, त्या मजूरसंघाची सत्ता मालकांना कबूल करावी लागेल, व ते त्याच्याशीं मजुरांच्या वेतनाबाबत, कामाबाबत, सुखसोईबाबत बोलणें करतील, करार करतील. किमान वेतनामुळें काय परिणाम होतात हें पूर्वी सांगितलें आहे. हें किमान वेतन सरकारनें ठरविलें असो अगर मजूरसंघाशीं करार होऊन ठरलें असो, तें मान्य होत असलें म्हणजे वर लिहिल्याप्रमाणें त्या त्या धंद्यांत साधारणपणें परिणाम घडून येतील. पुष्कळ वेळां मजूरसंघ संघटनेच्या जोरावर त्यांच्यासारख्या श्रमाला दुसरीकडे कमी मजुरी मिळत असतां सुद्धां, जास्त मजुरी मिळवितात. त्याचा परिणाम मजुरी वाढली तर, कांहीं मजूर बेकार होण्यांत होईल. जर उत्पादनतंत्र बदलून, नवीन यंत्रें आणून, मजूर कमी करून, उत्पादन परवडत नसेल तर, मालक मजूरहि कमी करणार नाहीं. पण त्याचा अर्थ असा कीं, मजुरांना

द्यावी लागणारी मजुरी, एकंदर उत्पादनाच्या खर्चाचे मानानें कमी. जर हें प्रमाण जास्त असेल तर, मग त्याला नफा फारच कमी करावा लागेल. अशा वेळीं तो मजुरांची संख्या खास कमी करून, उत्पादनतंत्र बदलून, नवीन यंत्रसामग्री घेऊन, पुनः आपलें बस्तान बसवील. त्याचप्रमाणें त्या धंद्यांतील उत्पादनाला येणारी मागणी जर कमीजास्त होणारी नसेल, म्हणजे जवळ जवळ स्थिर असेल तर, तो कमी न करतां वाढलेली मजुरी देऊन पूर्वींच्याच सामग्रीवर, संचावर, उत्पादन चालू ठेवील. कारण संच बदलून, उत्पादनतंत्र बदलून, उत्पादन वाढविलें तरी, मागणी वाढणार नसल्यामुळें तसें करणें फायदेशीर होणार नाहीं. म्हणून वाढलेली मजुरी देऊन पूर्वीप्रमाणें उत्पादन चालू ठेवील. अर्थात् पूर्वींपेक्षां त्याला नफा कमी होईल, हें उघड आहे. पण अशा स्थितींत वाढलेली मजुरी, फार काळ वाढलेली राहील असें नाहीं. कारण नवीन शोध लागत असतात. तसेंच ज्या उत्पादनाचे कामीं या मजुरांचा उपयोग होतो, त्याच वस्तु अगदीं दुसऱ्या उत्पादनपद्धतीनेंहि होणें शक्य असतें. ज्या मजुरांची मजुरी वाढली, त्यांचेंच पाहून त्याच उत्पादनांतील इतर कामगार कारागीर, यांच्याहि मजुरीची वाढ होण्याचा संभव. मग त्यामुळें सर्वच उत्पादनखर्च वाढेल. कापडाच्या गिरणींत अनेक प्रकारचीं कामें करणारे कामगार आहेत. त्यांपैकीं समजा, एका खात्यांतील मजूर संघटित असून त्यांनीं संघटनेच्या जोरावर आपली मजुरी वाढवून घेतली. एकंदर खर्चांत त्यांची मजुरी अल्प. त्याचप्रमाणें तेवढ्याकरितां नवीन यंत्रें आणून, त्या खात्याचें आणखी यंत्रीकरण करणें परवडणारें नसेल तर, वाढती मजुरी सर्वांना देऊन मालक त्या सर्वांना कामावर ठेवील. पण याचा परिणाम दुसऱ्या खात्यांतील कामगार व शेवटीं अगदीं गिरणींतील साधे मजूर सुद्धां, पगारवाढ मागतील व ती देणें जरूर पडल्यास एकंदर उत्पादनखर्च वाढेल; तो वाढला कीं, योजक उत्पादन कमी करून नफा जास्त करण्याचा प्रयत्न करील. म्हणजे साहजिक पुष्कळ लोकांना तो कामावरून काढील, ते लोक बेकार होतील. समजा, हेंहि जरी झालें नाहीं तरी जोंपर्यंत सारख्या कामाला एका ठिकाणीं कमी मजुरी, व दुसरीकडे मजूरसंघाच्या संघटनेमुळें जास्त मजुरी हें दृश्य आहे, तोंपर्यंत दुसरीकडील तसलेंच काम करणारे मजूर अगर तसलेंच काम शिकून तयार झालेले लोक चढाओढ करण्याचा प्रयत्न करतील आणि अशा रीतीनें या विशिष्ट प्रकारच्या मजुरांचा पुरवठा वाढला म्हणजे मालकांचें फावतें. मजूरसंघाला एक तर या नवीन येणाऱ्या अगर दुसरीकडून येणाऱ्या लोकांना संघांत सामील करून घेऊन आपली एकजूट निर्माण केली पाहिजे, नाहीं तर मालकांशीं नवीन करार करून थोडी मजुरी कमी करून घेतली पाहिजे. पुष्कळ वेळां मालक या नवीन

येणाऱ्या अगर दुसरीकडून येणाऱ्या मजुरांना त्यांचा संघ करण्यास उत्तेजन देतात व अशा रीतीनें दोन मजूरसंघ उत्पन्न करून त्यांच्यांत स्पर्धा उत्पन्न करून, आपला कावा साधतात. सरकारी कायदेहि भांडवलशाहींत मालकांच्याच बाजूनें असल्यामुळें, कोणत्या मजूरसंघास मान्यता द्यावयाची हें मालकांवरच अखेरीस अवलंबून असतें. मालकानें मान्यता दिलेल्या संघांत सामील होणें मजुरांना हितावह वाटतें. व यामुळें एकंदर मजूरवर्गाच्या संघटनेवर परिणाम होतो व मजुरीवरहि ताबडतोब परिणाम होतो. जें निर्वाणीचें शस्त्र म्हणजे संप त्याचा उपयोग ते करूं शकत नाहींत. कारण एकाच व्यवसायांत दोन संघ याचाच अर्थ त्यांचे हितसंबंध एक नाहींत. व त्यामुळें संप करणें म्हणजे मालकांस जें पाहिजे तेंच नेमकें करणें होय. कारण संप केला म्हणजे मालक दुसरे कामगार ताबडतोब भरील व जे बेकार होते ते कामावर आले, व जे कामावर होते ते बेकार झाले असें होईल, आणि या बदलाबदलींत मालक मजुरीचा दर कमी करून, आपला फायदा करून घेईल, हा अनुभव सर्वत्र येत आहे. समजा, नवे जुने सर्वांनीं एकजूट केली तर मजुरीचा दर कायम राहील, पण मालक माणसें काढील व त्यांत जुनेच काढणें जास्त शक्य असतें. हा अनुभव असल्यामुळें एकजूट होत नाहीं. जुना संघ दर कमी करण्यास तयार होतो आणि हें सगळें खुषीनें होत असल्यामुळें सरकारी कायदा त्यांत हस्तक्षेप करीत नाहीं, पण मालकांच्या हिताचा प्रश्न आला कीं सार्वजनिक शांततेच्या व सुव्यवस्थेच्या नांवाखालीं सरकार हस्तक्षेपच काय, पण जरूर पडल्यास मजुरांचे प्राण, गोळीबार करून घेईल. तात्पर्य, कुठलाहि मजूरसंघ दुसरीकडे असलेल्या तत्सम कामाच्या मजुरीपेक्षां जास्त दर मालकाकडून फार काळ घेऊं शकत नाहीं. जर प्रत्येक मजूर, संघाचा सभासद असलाच पाहिजे व संघप्रवेशाला सुद्धां कांहीं काळ उमेदवारी अवश्य अशी कायद्यानेंच योजना केली तर मात्र गोष्ट निराळी. मग त्याचा अर्थ असा होतो कीं, मजुरांचा पुरवठा मर्यादित झाला व त्यामुळें त्यांची मजुरी वाढली, म्हणजे उत्पादन कमी करून नफा वाढविणें हें जें मालक, योजक, करतात तेंच करणें होय. पण सरकार मालकांना तसें करूं देतें व मजुरांना तें सरकारच्या मदतीशिवाय करतां येणें शक्य नसतें. भांडवलशाहींतील सरकार असें म्हणणार कीं, सरकार दोहोंतहि हस्तक्षेप करूं इच्छित नाहीं. सरकार निःस्पृह व निःपक्षपाती राहूं इच्छितें यांतच सरकारचा पक्षपातीपणा असतो.

आधुनिक जगांत बेकारी नाहींशी कशी व्हावयाची हा एक मोठा प्रश्न आहे. आतांपर्यंतच्या विवेचनांत योजक, मालक, नफा हाच उत्पादनाचा एकमेव हेतु

असल्यामुळें मजुरांना कामावरून कमी करतात, व त्यामुळें ते बेकार होतात असें आपण पाहिलें. पण बेकारीचें तेवढेंच एक कारण आहे असें मात्र नव्हे. मजूरसंघांतील कांहीं मजूर त्यांच्या अंगांत उत्पादनांत जास्त काम करण्याची शक्यता असतांना जास्त काम करीत नाहींत. हेतु हा कीं मालकांना मजुरांची संख्या कमी करतां येऊं नये. त्याचा परिणाम त्या उत्पादनभागाचा खर्च वाढतो. त्यामुळें कदाचित् एकंदर उत्पादन कमी होऊन पुनः बेकारी येतेच, अगर किंमती वाढल्यामुळें वाढत्या मजुरीचा पुरा फायदा मिळत नाहीं. भांडवलशाही उत्पादनांत नुसत्या मजुरांची अगर नुसत्या मजुरीबाबत संघटना झाली अगर कायद्यानें केली तरी, बेकारीचा प्रश्न सुटत नाहीं. स्टेशनवर उतारूंची गर्दी पुष्कळ, स्टेशनमास्तरनें नियमाप्रमाणेंच डब्यांत उतारू बसविले, ज्यांना जागा मिळाली त्यांची सोय झाली, पण जे शेंकडों प्लॅटफॉर्मवर उभे आहेत त्यांचा प्रश्न शिल्लकच राहिला. त्याला उपाय म्हणजे जास्त डबे जोडणें हाच. तसेंच बेकारी नाहींशी करणें, यास उत्पादनाची वाढ हाच उपाय. पण कमी उत्पादन व कमाल नफा हें तर भांडवलशाहींतील जीवनतत्त्व. तात्पर्य, चालू उत्पादनपद्धतीमुळें बेकारी ही क्रमप्राप्त आहे, हें तिचेंच उत्पादन आहे! तिचेंच अपत्य आहे! विश्वामित्री पवित्र्यांत हात वर करून 'नाहीं' म्हणून, सरकारवर त्याची जबाबदारी टाकण्याची कला भांडवलवाल्यांनीं बरेच ठिकाणीं साधली आहे. कांहीं माणसें शरीरानें व्यंग असलेलीं असतात म्हणून ती कांहीं काम करूं शकत नाहींत, अगर चांगलें काम करूं शकत नाहींत, अशांना साहजिक सरकारवर, भिक्षेवर, समाजाच्या दातृत्वावर अवलंबून रहावें लागतें. पण अशांची संख्या कुठल्याहि राष्ट्रांत थोडीच असणार. कांहीं धंद्यांत मजुरांना सतत व सारखें काम मिळत नाहीं, उदा०, गोदी, बांधकाम, शेती वगैरे; त्याचप्रमाणें कांहीं उद्योगधंद्यांत कांहीं मजूर कायम व कांहीं मोसमाप्रमाणें कमीजास्त होतात. कांहीं धंदे वर्षांतून कांहीं दिवसच चालतात. उदा०, साखरेचे कारखाने, गुऱ्हाळें, जिनिंग व प्रेसिंगचे कारखाने वगैरे. यांतील मजुरांना मोसमापुरतेंच काम. त्याचप्रमाणें कांहीं धंद्यांत जास्त मजुरी द्यावी लागत असल्यामुळें, मालक उत्पादन कमी करून जुळणी करतात. त्यामुळें माणसें तेंच काम कमी मजुरीनें करण्यास तयार असून, त्यांना बेकार रहावें लागतें. बाजाराची स्थिति सारखी नसते, तो सनातन 'नित्यनूतनु' असा आहे हें मागें सांगितलें तेंच खरें. वस्तूंची मागणी कमीजास्त होत असते, त्यामानानें मालक आपलें उत्पादन कमीजास्त करीत असतात. कांहीं योजक निकालीं लागतात व त्यामुळेंहि बेकारींत भर पडते. मालकांना मंदींत एकतर पगार कायम ठेवून लोक कमी करावे लागतात अगर लोक कायम

ठेवून पगार कमी करावा लागतो. मालकांस कायम नुकसानीत काम चालू ठेवणें शक्य नाहीं. जेथें मजूर संघटित तेथें पगारकाटीस विरोध, मग माणसें कमी केलीं जातात. ती बेकारींत आणखी भर. जर सर्वत्र मंदीचें वातावरण असेल तर बेकारांना इतरत्र कामहि मिळणें कठीण. कारण सर्वत्र तीच स्थिति. कांहीं धंद्यांत मंदी व कांहींत तेजी असली तरी, सर्व बेकारांना काम मिळेल, हेंहि अशक्य. पुनः मजूर स्थलांतर करण्यास नाखूष. तेजी येईल, त्याच कारखान्यांत जागा मिळेल, मजुरींत वाढ होईल, अशी भावी आशा धरून, चालू बेकारीचें दुःख पुष्कळ लोक धैर्यानें सोसतात पण स्थलांतर करीत नाहींत. जर बेकारी भत्ता मिळत असेल तर, तेथेंच राहण्यांत आणखी एक सोय. दुसरीकडे साधेल अगर जमेल असें काम मिळेल याचा भरंवसा नसतो. नवीन काम शिकण्याचें वय नसतें अगर तितका उत्साह नसतो. उत्पादनाच्या दृष्टीनें सर्व प्रगति खुंटलेली नसते. नवीन शोध, नवीन यंत्रें तयार करण्याचें काम चालूच असतें. जसजसें उत्पादनांत यंत्रांचें प्रमाण जास्त, त्यामानानें मजुरांची संख्या कमी. यंत्र, मजुरांचे श्रम कमी करतें म्हणून त्यांचा मित्र, पण भांडवलशाहींत तें त्यांचा शत्रु होतें. यंत्रमय उत्पादन झालें म्हणजे मजुरांना वाव कमी, पुनः बेकारींत भर. कांहीं वेळां उत्पादनखर्च या यंत्रीकरणानें कमी होतो, त्यामुळें मालकाला मालाची किंमत कमी करून मागणी वाढवितां येते. विक्री वाढली कीं साहजिकच त्याचा उत्पादनावर परिणाम होऊन तितकी बेकारी कमी होईल. पूर्वीं मोटार करण्याच्या कामांत जितके मजूर लागत असत, तितके आतां लागत नाहींत. यंत्रीकरणामुळें बहुतेक भाग यंत्रांचे सहाय्यानें होतात. तथापि मोटारींची मागणी येवढी वाढली कीं, पूर्वीपेक्षां कितीतरी जास्त मजूर या धंद्यांत एकंदरीनें आहेत. यंत्रीकरणामुळें कांहीं धंद्यांत मजूर कमी झाले तरी यंत्रें करण्याच्या धंद्यांत मजुरांना जास्त मागणी येते. बेकारांची संघटना केली म्हणजे, निदान त्या संघाच्या चिटणिसाला तरी काम मिळेलच कीं नाहीं? तथापि यंत्रयुग सुरू होऊन १०० वर वर्षें झालीं आहेत. पाश्चात्य देशांत यंत्रयुगामुळें एकंदरीनें उत्पादन इतकें वाढलें आहे कीं, मजूर उद्योगधंद्यांत वाढलेच आहेत. यंत्रामुळें मजूर तात्काल थोडें कमी होतात, पण त्याबरोबर त्याच धंद्याचें नव्हे तर सर्वच उत्पादन वाढत जातें. बेकारी ही यंत्रामुळें उत्पन्न होत नसून यंत्रांचा अगर उत्पादनशक्तीचा पूर्ण उपयोग भांडवलशाहींत होत नाहीं, कमाल नफ्यासाठीं उत्पादन कमी केलें जातें, व उत्पादन व उपयोग यांचा समास व समन्वय अगर मेळ बसवावयास पाहिजे तो बसविला जात नाहीं म्हणून बेकारी उत्पन्न होते व वाढते. जर यंत्रामुळें बेकारी वाढत असती तर गेल्या १०० वर्षांत जशी यंत्रमयता वाढली तशी बेकारी वाढावयास

पाहिजे होती, तसें झालें नाहीं. हिंदुस्थानांत १९०१ ते १९३४ पर्यंत उद्योग धंद्यांत किती तरी प्रगति झाली, पण त्यायोगानें उद्योगधंद्यांतील मजुरांची संख्याहि वाढली. यंत्रयुग ही आतां अटळ गोष्ट आहे. आधुनिक जगांत कोणी असें म्हणूं लागेल कीं, यंत्रें निकालीं लावून पुनः सर्वत्र चरखा व बैलगाड्या सुरू व्हाव्या तर तें टिकणार नाहीं. उत्पादनाचा ओघ जो जास्त खोल, जास्त रुंद व जास्त गतिमान् होत आहे, तो कांहीं थांबणार नाहीं. यंत्रमय उत्पादनसृष्टींतून मोटार घेईन, रेल्वे घेईन, पण कापड मात्र घेणार नाहीं, तर तसें होणें शक्य नाहीं. जीवनाची घडण नवीन पद्धतीच्या उत्पादन सांच्यांत घडली गेली आहे. ती घडण बदलणें अशक्य, तींतील दोष काढण्याचा मार्ग ती घडण मोडावयाची हा नव्हे. यंत्रांमुळें माणसें व्यक्तित्व गमावून बसलीं, याला उत्तर यंत्रें मोडणें हें नव्हे; तर ज्या भांडवलशाहीनें हें होतें, ती दूर करणें हें होय. घड्याळाच्या गजराबरोबर झोंप मोडून उठावें लागतें, म्हणून घड्याळ मोडणें हा उपाय नाहीं; तर जेव्हां आपणांस विश्रांति पुरी होईल असें वाटतें त्या वेळेचा गजर लावणें हा होय. चरखा म्हणजे कामधेनु, हें वाक्य चांगलें. त्याच्याबद्दल आदर असला तरी त्याच्या गुणाची अतिशयोक्ति करणें हा आदर दाखविण्याचा मार्ग नव्हे. हिंदुस्थान, आज उत्पादनाचे दृष्टीनें बदलत्या परिस्थितींत आहे, संक्रमण कालांत आहे, तेव्हां ज्यांना काम नसेल अगर पुरें काम नसेल, त्यांना चरखा थोडी कमाई देईल. याचा अर्थ हिंदुस्थानांत होणारें उद्योगमय जीवन बंद करणें किंवा औद्योगीकरणाला, उद्योगधंदे वाढविण्याला बंदी करणें असा नव्हे. १९२९ च्या मे मध्यें अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या ठरावांत नमूद केल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील समाजरचना व व्यवहारपद्धति, उत्पादनपद्धति, यांत क्रांतिकारक बदल केल्याशिवाय हिंदुस्थानांतील दारिद्र्य व विषमता नाहींशी होणार नाहीं व हा बदल करावयाचा तर हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर उत्पादन व्हावयास पाहिजे आणि तें व्हावयाचें म्हणजे यंत्रमय उत्पादन केलें पाहिजे, ही गोष्ट नॅशनल प्लॅनिंग कमिटी ( N. P. C. ) नें मान्य केली आहे. तेव्हां यंत्रयुग जाणार नाहीं. तें आतां आपला सवंगडी आहे असें समजून भविष्यकाळचा उत्पादनपट आपण तयार केला पाहिजे. यंत्र मनुष्याचा शत्रु न होऊं देतां मित्र केला पाहिजे. कमी श्रम, जास्त उत्पादन व त्याचबरोबर जास्त विश्रांति असा मेळ घातला पाहिजे; यंत्रयुक्त, विश्रांति प्रधान, निष्काम, बिननफी उत्पादनयोग, हें जीवनगीतेचें रहस्य समजलें पाहिजे; व तें साम्यवादी वातावरणांतच होईल, हें सांगण्याची अवश्यकता नाहीं. कारण तेथेंच निष्काम कर्म व बिननफी उत्पादन शक्य आहे. तात्पर्य यंत्रामुळें

मजुरांची संख्या कमी होत असली तरी, उत्पादनाचें प्रमाण वाढतें, एकंदरीनें मजुरांचीहि संख्या वाढते, हा १०० वर्षांचा अनुभव आहे. बेकारी ही यंत्रामुळेंच झाली, हें बरोबर नसून उत्पादनतंत्र चुकीचें आहे म्हणजे नफ्याच्या दृष्टीनें तें वापरलें जातें म्हणून बेकारी वाढतें, ही खरी मीमांसा आहे. उत्पादन व त्याचा उपयोग यांत मेळ नसला म्हणजे आपत्ति सुरू होतात; व सर्वांत मोठी आपत्ति म्हणजे बाजारांत होणारा चढउतार, होणारी तेजी व मंदी. मंदी आली कीं बेकारांची संख्या वाढते. या बाजारांतील चढउतारांविषयीं आपण जास्त विचार करावयास पाहिजे, तो आपण पुढें करूं. तथापि मंदी आली असतांना, मजुरीचे दरांबाबत काय होतें, हें थोडक्यांत पाहूं. मजरांची मजुरी वाढविली म्हणजे त्यांची पदार्थ विकत घेण्याची ऐपत वाढते, त्यांची क्रयशक्ति वाढते व त्याचा परिणाम ते पुष्कळ वस्तु विकत घेतील, त्यामुळें एकंदर मागणी वाढून बाजार सुधारेल; या दृष्टीनें विचार करणारे कांहीं आहेत. उलट, कांहींचें म्हणणें असें कीं, मजरीच्या दरांत वाढ केली कीं उत्पादनखर्च नक्की जास्त होईल, व त्यामुळें योजक माणसें आणखी कमी करतील, आणि जर सर्वत्र असें होऊं लागले तर, पुनः मजुरीचे दर कमी होऊन, बाजार आणखी मंदावेल. परंतु योजक भांडवलशाहींत कसे वागतील हें निरपवाद कोणी सांगूं शकत नाहीं. विवक्षित परिस्थितींत जें त्याला परवडेल तें तो करीत असतो. मजुरीचा दर कमीहि होईल व जास्तहि होईल, पण त्यानें मंदी नाहींशी होत नाहीं. मंदी नाहींशी करावयाची म्हणजे बाजारांतील मागणी वाढविली पाहिजे, ती वाढवावयाची म्हणजे राष्ट्रांतील लोकांची ऐपत, क्रयशक्ति वाढविली पाहिजे. लोक बेकार असतील तर हें शक्य नाहीं म्हणून सर्वांना काम पाहिजे. याचा अर्थ उत्पादन वाढलें पाहिजे. मग त्यापासून नफा होवो किंवा न होवो. सर्वांस काम मिळालें कीं त्यांची ऐपत वाढली, ऐपत वाढली कीं सरळ बाजार सुधारला. जर्मनींत हीच गोष्ट करण्यांत आली. देशांत असलेली सर्व उत्पादनसामग्री व उत्पादन संच, जो पूर्णपणें काम करीत नव्हता, जी उत्पादनशक्ति वायां जात होती, तिची योजना जर्मन राष्ट्रसूत्रधारांनीं, युद्धसामग्री तयार करण्याकडे केली. परिणाम असा झाला कीं, सर्वत्र बेकारी नाहींशी झाली व त्यामुळें राष्ट्रांतील लोकांची ऐपत वाढली, क्रयशक्ति वाढली; कारण मजुरांना मजुरी मिळूं लागली. त्याबरोबर सर्वत्र व्यापार सुधारला, निस्तेज देश ताजातवाना झाला. उत्पादन वाढवून त्यांनीं संहारक वस्तूंचें उत्पादन केलें म्हणून, वाटलें तर त्यांना कमी लेखा. पण उत्पादन वाढवून, त्याचा मेळ बसवून, या परिस्थितींतून, मंदीतून त्यांनीं डोकें वर काढलें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं.

# १६. व्याजाबद्दल विचार

उत्पादनघटकांचे परंपरागत जे तीन प्रकार जमीन, श्रम व भांडवल म्हणून आपण पाहिले, त्यांपैकीं श्रम म्हणजे मजूर त्याच्याबद्दल, मागील भागांत आपण ऊहापोह केला. श्रमांबद्दल मजुरांना मिळणारा मेहनताना, मोबदला, याचाहि स्थूलमानानें विचार केला. भांडवलशाही उत्पादनपद्धतींत भांडवल हा सर्वांत महत्त्वाचा उत्पादन-घटक समजला जातो, व श्रमांची मजुरी ज्याप्रमाणें देणें प्राप्त आहे त्याचप्रमाणें भांडवलाचा जो उपयोग होतो त्याबद्दल, त्याच्या उपयोगाबद्दल भाडें द्यावें लागतें. मजूर ज्याप्रमाणें श्रमाची किंमत मागतो. त्याचप्रमाणें भांडवलाचा पुरवठा करणारे हेहि आपल्या भांडवलाची किंमत मागत असतात. भांडवल कसें होतें, त्याचें उत्पादन-कसें होतें, याचें स्वरूप आपण मागें पाहिलें. सांचवून, उत्पादनसामग्री उपयोगास देणें, वस्तूचा उपयोग चालू काळांत न करतां ती सांचवून उत्पादनाकरितां सामग्री निर्माण करणें, याचाच अर्थ भांडवल तयार करणें, उत्पन्न करणें होय. आजच्या त्यागावर उद्यांचें सुख निर्माण करण्याकरितां साधनसामग्री तयार करणें, असें त्याचें स्वरूप आपण पाहिलें; अर्थात् हें स्वरूप भांडवलशाही तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें आहे. आजकाल भांडवलाचें स्वरूप पैशानें, चलनानें, आपण ओळखतों. पैशानें यंत्रसामग्री, कच्चा माल, मजुरी सर्व विकत घेतां येतात. पण खरें भांडवल म्हणजे वस्तु, उत्पादक वस्तु. पैसा हा एक देवघेवींतील दलाल आहे. मजजवळ जास्त गहूं आहेत, मला कापड पाहिजे आहे. मीं गहूं विकून पैसे करतों व पैसे देऊन कापड घेतों. समाजाच्या बाळपणीं जेव्हां उत्पादनतंत्र साधें होतें, तेव्हां गहूं देऊन कपडा सरळ घेतला जात होता. अजूनहि दूरच्या खेडेगांवांतून वस्तु–वस्तूंची अदलाबदल, कधीं कधीं होते. ही अदलाबदल, हा विनिमय, सोपा जावा म्हणून पैसा, चलन, ही गोष्ट अमलांत आली. आज भांडवलाचें वास्तविक स्वरूप वस्तुगत असूनसुद्धां आपण त्याचा विचार पैशाच्याच, चलनाच्याच दृष्टीनें करीत असतों. भांडवलाचें खरें स्वरूप वस्तूत आहे. वस्तु मनुष्याचे श्रमानें निर्माण होतात. सृष्टींत असलेला वस्तुसंसार मनुष्यांच्याच श्रमानें संस्कार पावला असून वस्तूला

उपयोगीपणा व किंमत त्यानेंच प्राप्त झाली आहे. या दृष्टीनें भांडवलसुद्धां मनुष्यांच्या श्रमांपासूनच निर्माण झालेलें आहे, असें विधान केलें तर तें चुकीचें कसें होईल ? सुताराची करवत, पटाशी, रंधा इत्यादि हत्यारें हें त्याचें भांडवल. पण ही सर्व सामग्री, कोणाच्या तरी श्रमानेंच झालेली आहे. कारखान्यांतील यंत्रें, कच्चा माल, इमारती हें आपण भांडवल समजतों, पण ह्या सर्व गोष्टी कोणाच्या तरी श्रमानेंच झाल्या आहेत. यंत्रें बनविलीं, तीं कांहीं भूमातेनें सीतेप्रमाणें बाहेर फेंकलीं नाहींत. प्रचंड इमारती शेखमहंमदाप्रमाणें कंपनीच्या चालकांनीं, अगर योजकांनीं, चहा पितांना मनोराज्य करून तयार केलेल्या नाहींत. हजारों गवंडी, मजूर, यांच्या श्रमांचे तें फळ आहे. त्यांच्या श्रमाला दिलेल्या किंमतीपेक्षां त्यांच्या श्रमांपासून झालेल्या उत्पादनाची किंमत ही जास्त असते, व ही सगळी माया सांचवूनच भांडवल होतें. भांडवल म्हणजे मजुरांना त्यांच्या मेहनतीची किंमत कमी देऊन सांचलेली संपत्ती व सांठवलेली शक्ति. प्रत्येक उत्पादक वस्तु म्हणजेच मजुरांच्या श्रमांचें फळ व तेंच घेऊन आणखी श्रम घेऊन, नवीन उत्पादन करणें व नफा मिळविणें, हा क्रम चालू आहे. गंगेचें पाणी घेऊन गंगेचीच पूजा करून, पुण्य संपादन करण्यासारखेंच हें आहे. तथापि ही विचारसरणी भांडवलशाही तत्त्वज्ञानाला पटत नाहीं. भांडवल म्हणजे त्यांच्या मतें त्यागाचें फळ; चालू उपभोग घेतला नाहीं व त्यामुळें जी सांठवण झाली तें भांडवल. भांडवलशाहींत भांडवलाला भाडें द्यावें लागतें, व व्यवहारांत पैसा हें त्याचें व्यक्त स्वरूप असल्यामुळें, पैशाच्या उपयोगाचें भाडें द्यावें लागतें. हें भाडें म्हणजेच व्याज होय.

जगांत व्यवहार सतत चालू असतात. माणसें कर्ज देत असतात, घेणारे घेत असतात. राष्ट्रांतील सरकार सुद्धां, कर्जें काढीत असतात व फेडीत असतात. स्थानिकस्वराज्यसंस्था, म्युनिसिपालिट्या, कॉर्पोरेशनें, हींहि कर्जें काढीत असतात व फेडीत असतात. खाजगी माणसें चालू गरजेकरितां अगर उत्पादनाकरितां ऋण काढतात. सरकार प्रसंगविशेषीं लोकोपयोगी कामांकरितां, तर कधीं युद्धाचा सण साजरा करण्याकरितां ऋण काढतें. सडका, इमारती, पाणीपुरवठा वगैरे लोकांच्या कायम सोयी करण्याकरितां स्थानिकसंस्था कर्ज काढतात. बँका, सोसायट्या, लोकांकडून ठेवी घेऊन त्यांना व्याज देऊन, रकमा कर्जाऊ घेतात व जास्त व्याज घेऊन पुनः योजकांना, धंदेवाल्यांना अगर व्यापाऱ्यांना कर्जाऊ देतात. कांहीं व्यक्तिही हा सावकारीचा धंदा करतात. तात्पर्य, जगांतील व्यवहारांत कर्ज घेणें व देणें ही अगदीं श्वासोच्छ्वासाइतकी अवश्य व अंगभूत गोष्ट झालेली आहे. हें कर्ज देणें व घेणें हें सर्व पैशाच्या साधनानें होतें. या पैशाचें

भाडें, वापरणावळ म्हणजे व्याज, हें वर सांगितलेंच आहे. हा व्यवहार कसा चालतो तें थोडें विस्तारानें पाहूं. समजा, १०० रु. मी व्याजानें दिले व माझ्या ऋणकोनें दरसाल मला ३ रु. व्याज द्यावयाचें ठरविलें. जर १०० रु. मी बिनमुदत कर्जाऊ दिले तर, त्याचा अर्थ मला वर्षास ३ रु. मिळावयाचे, १०० रु. परत मिळावयाचे नाहींत. मी १०० रु. कायमचे देऊन दरसाल ३ रु. मिळविण्याचा एक हक्कच विकत घेतला, हें वर्षासनच विकत घेतलें. हा हक्क मी विकला तरी विकत घेणाराला वर्षाचे ३ रु. मिळण्याचाच हक्क प्राप्त होईल. कधीं काळीं मूळ रक्कम परत मिळण्याचा प्रसंग आला तर १०० रु.च मिळतील असें नाहीं, कमीजास्तहि होईल. कारण परत मिळण्याचा हक्क नाहीं. खाजगी व्यवहारांत अशीं बिनमुदतीचीं कर्जें कोणी देत नाहीं. पण सरकारी रोखा जो कायम स्वरूपाचा आहे, म्हणजे अमुक सालीं फेड करावयाची अशा मुदतीचा नाहीं, त्याचें मालकांस फक्त वार्षिक व्याज घेण्याचाच हक्क आहे. सर्व राष्ट्रांतून असे बिनमुदतीचे रोखे असतात. सरकार व्याज देण्यास बांधलें असतें. समजा, सरकारनें ३ टक्के व्याजानें हे रोखे काढले, याचा अर्थ, या दरांत लोक हे रोखे विकत घेतील, कर्ज सरकारास देतील. पण सरकार जरी मुद्दल परत देण्यास बांधलें नसले तरी, कालांतरानें १०० रु. रोखा, बाजारांत जास्त किंमतीस जातो तसाच कमी किंमतीसहि जातो. त्याचप्रमाणें नेहमींच त्याच दरानें सरकारला कर्ज मिळेल असेंहि नाहीं. व्याजाचा बाजारभावहि बदलेल. ३ चा ४ होईल अगर २ ही होईल. समजा, व्याजाचा दर द. सा. द. शें. ४ झाला, याचा अर्थ ७५ रु. देऊन सालाला ३ रु. व्याज मिळेल, किंवा ज्या रोख्यापासून ३ रु. व्याज मिळतें, त्याची किंमत ७५ रु. झाली. जर व्याजाचा दर २ झाला तर ३ व्याज येण्याकरितां माणसाला १५०रु. व्याजीं द्यावे लागतील. म्हणजे त्या ३ रु. व्याज देणाऱ्या रोख्याची किंमत १५० रु. झाली. अशा रीतीनें व्याजाचे दरांत बदल झाला म्हणजे, रोख्यांची किंमतहि बदलते व रोख्यांची किंमत म्हणजे जो व्याजाचा दर ठरला असेल, त्याला शंभरांनीं गुणून, चालू दरानें भागलें म्हणजे जी रक्कम निघेल ती.

$$\text{उदा०,}\quad \frac{\text{३ (ठरलेला दर)} \times \text{१००}}{\text{४ (चालू दर)}} = \text{७५.}$$

कर्ज काढावयाचें म्हणजे नुसतें तोंडानें पाहिजे म्हणून मिळत नाहीं. जो व्याजाचा दर मान्य केला असतां कर्ज मिळेल, तो मान्य करावा लागतो, नाहीं तर कर्ज मिळणार नाहीं. म्हणून ज्या दरानें कर्ज मिळतें तो चालू दर म्हटला पाहिजे. कारण त्याच दरांत कर्ज मिळणें शक्य आहे. रक्कम कर्जाऊ दिली म्हणजे सालोसाल व्याज

मिळण्याचा हक्क कर्ज देणारांस प्राप्त झाला. त्याच्या मुद्दलाची खरी किंमत, खरें मूल्य, काय राहील हें बदलणाऱ्या व्याजाचे दरावर अवलंबून आहे हें आपण पाहिलें. ज्या रोख्याचें व्याज ३ टक्के होतें, त्याचा कालांतरानें ५ टक्के व्याजाचा दर झाल्यास, ६० रु. किंमत होईल. ४ टक्के आहे म्हणून आज ७५ रु. आहे. कोणत्या वेळीं रोख्यांची किंमत काय राहील, हें त्या वेळच्या व्याजाचे दरावर अवलंबून राहील. कोणाला रोखा खरेदी करतांना, काय किंमत द्यावी लागली, हे कोणी विचारीत नाहीं. आज व्याजाचा दर असेल त्या मानानें बाजारांत त्याची किंमत ठरली जाईल.

व्याजाचे चालू दराप्रमाणें रोख्याला किंमत येते हें जरी खरें, तरी एकाच वेळीं एकच व्याजाचा दर अगदीं कांटेकोर असतो असें मात्र नाहीं. आज ता. १०।३।४१च्या रोख्यांचे बाजारांतील भाव पाहिले तर, निरनिराळ्या रोख्यांची किंमत अगदीं चालू व्याजाचा दर असेल त्या प्रमाणांत दिसत नाहीं. ५ टक्क्यांच्या रोख्यांचा भाव, ३½ चे, अगर ४ चे रोख्यांचा भाव पाहिला तर निरनिराळा व्याजाचा दर दिसेल. अर्थात् फरक थोडा राहील, हें उघड आहे. कारण सर्वच रोखे एकाच हिंदुस्थान सरकारचे आहेत. त्याचबरोबर जर स्थानिक संस्थांच्या रोख्यांकडे पाहिलें तर व्याजाचा दर निराळा निघेल. तसेंच तात्पुरती रक्कम पाहिजे असल्यास त्यावरील दर व लांब मुदतीनें पाहिजे असल्यास त्यावरील व्याजाचा दर, यांतहि फरक राहतो. कांहीं रोखे अशा संस्थांचे असतात अगर सरकारचे असतात कीं, त्यांच्या पतीबद्दल लोकांची खात्री असते. व्याज व मुद्दल शर्तीप्रमाणें मिळेल हा अनुभव; व या पतीमुळें त्यांना कमी दरानें कर्ज मिळतें. ज्यांची एवढी पत नसेल त्यांना जास्त दरानें व्याज दिल्याशिवाय कर्ज मिळत नाहीं. व्याज आणि मुद्दल दोहोंना खाका वर करणाऱ्या खाजगी व्यक्तिच असतात असें नाहीं, राष्ट्रेंहि पण ही टगेगिरी करतात. मागील महायुद्धाचें अमेरिकेला द्यावयाचें कर्ज बहुतेक राष्ट्रांनीं बुडविलें. इंग्लंडनें तरी सगळें कुठें फेडलें आहे! म्हणून व्याज मुद्दल बुडण्याचा धोका अगदीं मानीव नाहीं व त्यामुळें पुष्कळ लोक कमी व्याज आलें तरी चालेल पण त्याला शाश्वती पाहिजे, या न्यायानें वागतात. जास्त व्याज म्हणजे जास्त धोका हें सूत्र लक्षांत घेऊन वागणें, हेंच अंतीं शहाणपणाचें व धोरणाचें ठरतें.

सरकार, संस्था, योजक पुनः पुनः कर्जें काढीत असतात. त्यांच्या जुन्या कर्जाची—रोख्याची चालू किंमत जशी असेल त्याप्रमाणें त्यांची पत व जो व्याजाचा दर त्यावर बसत असेल, त्या दरानें साधारणतः त्यांना नवीन कर्ज काढणें शक्य होतें. पुष्कळ वेळां थोडा जास्त दर द्यावा लागतो. कारण एकंदर कर्ज पुष्कळ असलें तर कर्ज

देणारे जरा सावधपणें वागतात. नव्या व जुन्या कर्जाच्या शर्ती सारख्याच असल्या तर, दोन्ही कर्जांची—रोख्यांची बाजारी किंमत सारखीच राहील. परंतु पुष्कळ वेळा शर्ती सारख्या नसतात. कांहींची फेड १०वर्षांनीं तर कांहींची ३०–४० वर्षांनीं. अशा रीतीनें परत फेडीच्या वेळांत फरक असतो. कांहीं वेळां त्या त्या देशाच्या चलनावर पुष्कळ गोष्टी अवलंबून असतात. हिंदुस्थानांत सर्वत्र एक शिक्का चालू आहे—एक चलन आहे; पण एखाद्यानें अमेरिकन सरकारी रोखे घेतलें, एखाद्यानें फ्रेंच सरकारचे अगर दुसऱ्या कोणत्या तरी सरकारचे घेतले तर त्याला जें व्याज मिळेल तें, त्या सरकारच्या नाण्यांत, त्या देशाचे चलनांत; आणि हें चलन, हा पैसा, जो सर्वांची किंमत करतो त्याचीच किंमत या आधुनिक जगांतील बाजारांत कमीजास्त होत असते. ज्यांनीं गोष्टी मापावयाच्या त्यांचेंच माप स्थिर नाहीं, असें दृश्य दिसत असतें. इंग्लंडमधील पौंडाचा भाव कमीजास्त होतो, त्याचप्रमाणें अमेरिकन डॉलर, व हिंदुस्थानांतील रुपया. आज हिंदुस्थानांतील रुपयाची किंमत इंग्लिश नाण्यानें १ शिलिंग ६ पेन्स आहे. म्हणजे १ रु.ला १ शि. ६ पे. मिळतात. हैद्राबादी रुपयाची किंमत, ब्रिटिश हद्दींतील नाण्यांत १४ आणे आहे. ही किंमत कायम नसते. समजा, एखाद्याला इंग्लिश रोख्यांपासून दरसाल ३ पौंड व्याज मिळतें. तें व्याज त्याला इंग्लंडमध्यें पौंडांत मिळेल. समजा, नवीन कर्ज निघालें, त्या वेळीं व्याजाचा दर जरी तोच ठेवला, मात्र सुवर्ण पौंडाऐवजीं पौंडाच्या नोटांत व्याज देण्याची शर्त असली कीं, ताबडतोब त्याचा परिणाम रोख्याच्या किंमतीवर होईल, व १०० चा रोखा १०० ला न जातां कमीला जाईल. त्यामुळें दुसऱ्या कर्जावर व्याजाचा दर वस्तुतः कमी बसतो. पुष्कळ वेळां सरकार काढलेल्या कर्जाचा बोजा, आपल्या कांहीं उत्पन्नाचे बाबींवर ठेवीत असतें व अशी गोष्ट झाली म्हणजे कर्ज देणारे जरा जास्त खुशींत असतात. पुष्कळ ठिकाणीं सरकार परदेशांत कर्ज काढतें व कांहीं उत्पन्नांवर कर्ज देणारांना देखरेख करण्याचा अधिकार देतें. चीनमध्यें हा प्रकार मोठ्या प्रमाणांवर झाला, व सर्व आयातकरांवर या सावकारांचें नियंत्रण बसलें. त्याचा परिणाम काय झाला हें सांगण्याची जरुरी नाहीं. परदेशी कर्ज घ्यावें कीं नाहीं, घेतल्यास काय अटीवर घ्यावें, हा प्रश्न येथें नाहीं. व्याजाचा दर कसा राहतो, याचा विचार आपण करीत आहों. युरोपमधील बहुतेक राष्ट्रें, हीं इंग्लंड, अमेरिका यांच्या सावकारींत सांपडलेली आहेत. दक्षिण अमेरिकेंतील लहान राष्ट्रें म्हणजे इंग्लंड, व अमेरिकेंतील सावकारशाहीच्या लीलांचें खास क्षेत्र म्हटलें तरी चालेल. मोठ्या राष्ट्रानें कर्ज काढलें तर त्याला कांहीं सावकारांना नियंत्रण करण्याचा अधिकार द्यावा लागत नाहीं, त्यांची

पत असते. लहान राष्ट्रें अगर मागसलेलीं राष्ट्रें यांना मात्र तारण द्यावें लागतें, एवढेंच नव्हे तर, कर्ज देणारांना कांहीं उत्पन्नाचे बाबींवर नियंत्रणहि द्यावें लागतें. त्याच्याशिवाय कमी दरानें कर्ज मिळत नाहीं. तात्पर्य, ज्या मानानें ऋणकोची पत व पैसा परत मिळेल कीं नाहीं याबद्दल साशंकता, त्या मानानें व्याजाचे दरांत प्रत्यक्ष फरक राहतो. म्हणून बाजारांत जरी व्याजाचा चालू दर असेल त्या मानानें रोख्यांची किंमत होते तरी, वर लिहिलेल्या कारणांमुळें त्यांत थोडेफार फरक होत असतात.

त्याचप्रमाणें व्याजाचे दरांत फरक होण्याचें आणखी एक कारण कर्ज परत करण्याचे वेळांत फरक असतो हें वर सांगितलेंच आहे. कांहीं कर्ज, अगदीं मागाल त्या वेळेस देऊं या शर्तीवर काढलेलें असतें. ज्या वेळीं सावकार मागेल त्या वेळेस तें परत केलें पाहिजे. कांहीं कर्ज मुदतीनें परत करावयाचें असतें, मग ती मुदत ३ महिने असो, ३ वर्षें असो अगर ५० वर्षें असो. पुष्कळदां बिनमुदती कर्ज असूं शकतें, अर्थात् हें खाजगी व्यवहारांत क्वचितच. सामान्यतः या कर्जांचे तीन प्रकार पडतात. एक थोड्या मुदतीचीं कर्जें, दुसरीं लांब मुदतीचीं व तिसरी सर्वसामान्य कर्जें. थोड्या मुदतीच्या कर्जांत, एक वर्षाच्या आंत परत करावयाच्या शर्तीवर काढलेली सर्व कर्जें येतात व १० वर्षांपुढील मुदत असलेलीं कर्जें, यांना लांब मुदतीचीं व १ ते १० वर्षें दरम्यान मुदतीच्या कर्जांना सर्वसामान्य कर्जें म्हणण्याचा प्रघात आहे. पुष्कळ वेळां मुदत भरतांच कर्ज परत करावें लागतें, तर पुष्कळवेळां पुनः मुदत वाढवून मिळते, व्याज चुकतें केलें म्हणजे झालें. तथापि या परत करण्याच्या मुदतींत फरक असल्यामुळें प्रत्यक्ष व्याजाचे दरांत फरक पडतो. आपण हिंदुस्थान सरकारचेंच उदाहरण घेऊं. हिंदुस्थान सरकारचे कांहीं रोखे बिनमुदतीचे आहेत, कांहीं मुदतीचे आहेत. शिवाय हिंदुस्थान सरकार तातडतोबीच्या गरजेकरितां ट्रेझरी बिल्स–हुंड्या, काढीत असतें. आज ता. ११।३।४१ ला यांचे निरनिराळे बाजारभाव घेऊन, जर व्याजाचा दर काढला तर, प्रत्येकीं निरनिराळा निघेल. ३½ जी. पी. चा भाव ९५ इतका आहे, त्याचा दर ३ रु. १० आ. ११ पै. पडतो. ३ टक्के १९५४ चे परत फेडीचा भाव ९८ रु. १४ आ. आहे. ३ टक्के १९४१ चे परतफेडीचा रोखा, त्याचा भाव आज १०० रु. १३ आ., १९४७ चा रोखा ३॥ टक्केचा भाव १०२ रु. आहे. समजा, १९४७ चा रोखा आज १०२ रु. देऊन घेतला, तर त्याला १९४७ मध्यें १०० रु. मिळतील, २ रु. कमी मिळतील. या दृष्टीनें त्याचा व्याजाचा दर $१००\times३\frac{१}{२}\div१०२$ म्हणजे $३\frac{२२}{५१}$ हा जरी दिसत असला, तरी ६ वर्षांनीं २ रु. अजीबात मिळणार नाहींत; हें जर लक्षांत ठेवलें तर व्याजाचा दर निदान $\frac{१}{३}$ रुपयानें कमी होईल. कारण

६ वर्षांत २ रु. नाहींसे होतील असें धरून, हा तोटा दरवर्षास ⅓ रु. भरून काढावा लागेल. त्याचप्रमाणें सरकार ट्रेझरी बिल्स काढतें, त्यांची फेड ३ महिन्यांत करतें, त्यामुळें त्यांवर व्याजाचा दर अगदीं कमी असतो. द. द. १ टक्कासुद्धां बसत नाहीं. पण हीं बिलेंहि लोक विकत घेतात. कारण ३ महिन्यांनीं रक्कम नक्की मिळते. तसेंच १०२ रु. देऊन १०० रु. चा १९४७ चा रोखा कमी व्याज पडलें तरी लोक घेतात, कारण १९४७ मध्यें १०० रु. नक्की परत मिळतील ही खात्री असते. तात्पर्य, परतफेडीच्या मुदतींत फरक असल्यामुळें व्याजाचा दर निरनिराळ्या रोख्यांना निरनिराळा पडतो. म्हणून जरी रोख्यांची किंमत चालू व्याजाचे दरांवर अवलंबून असली तरी निरनिराळ्या रोख्यांना व्याजाचे दर निरनिराळे पडतात, हें आपण वर पाहिलें; व हे फरक कां पडतात त्याचीं स्थूल कारणें पण पाहिलीं. अगदीं विस्तारशः या प्रश्नाचा विचार करावयाचा म्हणजे, एकंदर नाणेबाजार, रोखेबाजार व त्यांतील विविध गोष्टींचा विचार करावा लागेल. अनंत गोष्टी या बाजारांतून घडत असतात; त्यांचा कमीजास्त परिणाम रोख्यांवर, व्याजाचे दरांवर, चलनावर होत असतो. या सर्वांचा विचार न करतां कांहीं सामान्य विवेचन केलें तर तें आटोपशीर होईल.

आपण प्रत्यक्ष काय होत असतें हें सामान्यपणें पाहूं. मुंबई हें एक उद्योग-धंद्यांचें केंद्र आहे, इतकेंच नव्हे तर तेथील नाणेबाजार, रोखेबाजार, हा हिंदुस्थानांत पहिल्या प्रतीचा समजला जातो. लहानमोठ्या अनेक बँका, पेढ्या तेथें आहेत. शेंकडों लोक बँकांत पैसे ठेवतात. याचा अर्थ हे लोक सदरहू बँकांना कर्ज देत असतात. आणि हीं कर्जें थोड्या मुदतीच्या स्वरूपाचीं असतात. कारण चालू खात्यांतील रक्कम वाटेल तेव्हां काढतां येते, याचा अर्थ मागाल त्यावेळीं देऊं असाच करार बँक करीत असते. चेक आला व रक्कम जमा असली कीं ती दिलीच पाहिजे. अर्थात् वाटेल त्या वेळेस रक्कम द्यावी लागते, यामुळें चालू खात्यांत क्वचित् अल्प व्याज, पण बहुतेक व्याज मिळतच नाहीं. जर रक्कम सेव्हिंग खात्यांत ठेवली असेल तर आठवड्यांतून एकदां काढतां येते, व त्यावर थोडें जास्त व्याजहि मिळतें. जर १ वर्ष अगर जास्त मुदतीनें ठेवली असेल तर, अर्थात् आणखी जास्त व्याज मिळतें. व्याजाचे आशेनेंच लोक बँकेंत रकमा ठेवीत असतात. पोस्ट ऑफिस बँकांत ठेवीची रक्कम मर्यादित असते, त्यामुळें अन्य बँकांकडे ठेवी जास्त याप्रमाणें व्यवहार चालत असतो. कांहीं लोक उत्पादन करणाऱ्या कंपन्यांना रकमा कर्जाऊ देत असतात. तथापि थोड्या मुदतीला व्याज अल्प, व जास्त मुदतीला व्याज जास्त मिळतें हें सर्वत्र दिसून येते. आपल्याकडे जमा असलेल्या रकमा, बँका जास्त व्याज घेऊन थोड्या अगर लांब

मुदतीनें लोकांना कर्जाऊ देत असतात. त्यांवरील व्याजाचा दर हा, जसा ऋणको असेल, त्याची पत असेल, जसें त्याचें तारण असेल, त्या मानानें असतो. कुणाला ४ टक्क्यानें देतील, कुणाला ६ टक्क्यानेंहि देतील. शिवाय. हुंडया स्वीकारून बँक कर्ज देत असते, त्यावरहि ज्याची हुंडी असेल त्याच्या पतीप्रमाणें व्याजाचा दर असतो. कांहीं गिऱ्हाइकांना त्यांच्या तारणाच्या किंमतीवर अमूक एक मर्यादेपर्यंत बँका रकमा देत असतात. त्यावरहि गिऱ्हाइकाला पाहून दर लावतात. बहुतेक बँका दरमहिन्याकरितां, ३ महिन्यांकरितां, अशीं अल्प मुदतीचीं कर्जें देतात. मुदत संपतांच एकतर सर्व रक्कम येते, नाहींतर व्याज घेऊन पुनः मुदत वाढविली जाते; अशा रीतीनें व्यवहार सारखा चालू असतो. खुद्द बँका आपली शिल्लक सर्व तऱ्हेच्या सरकारी रोख्यांतहि गुंतवतात. पण बँका या रोख्यांपासून येणाऱ्या व्याजाच्या दरापेक्षां कर्जावर जास्त व्याज आकारतात. कारण जरूर पडली तरी, मुदतीपूर्वीं कर्ज परत मिळत नाहीं. उलट रोखे ताबडतोब बाजारांत विकून, त्यांची रक्कम हातीं आणतां येते. एका दृष्टीनें रोखे म्हणजे रोकडच समजली जाते; कारण कमीजास्त कां होईना पण रोख्यांची रोकड ताबडतोब मिळूं शकते. उलट मुदतीपूर्वीं ऋणकोनें रक्कम परत देत नाहीं म्हटलें तर बँका त्यांचें कांहीं करूं शकत नाहींत. थोडया मुदतीकरितां बँका कमी व्याज घेऊन रकमा देत असतात. पुष्कळ वेळां सरकार चालू गरजेकरितां ३ महिन्यांचे मुदतीच्या ट्रेझरी हुंडया काढतें, म्हणजे आज ९९ रु. घेऊन अगर ९९।। रु. घेऊन ३ महिन्यांनीं १०० रु. परत करतें. या हुंडया बहुतेक बँका घेतात, कारण त्यांच्याजवळ मुबलक पैसा असतो व तो अगदीं थोडया मुदतीकरितां गुंतवितां येतो व ऋणको सरकार असल्यामुळें रक्कम परत मिळण्याची निश्चिती असते. कांहीं लोक केवळ हुंडया वटविण्याचा धंदा करणारे असतात, ते बँकाकडून कर्ज घेऊन सरकारी हुंडया घेतात तथापि अगदीं थोडया मुदतीकरितां कर्ज घेणारें गिऱ्हाईक साधारणपणें कमीच, व त्याचबरोबर असें कर्जहि अगदीं अल्प दरानेंच मिळतें.

कर्ज २।३ महिन्यांत परत द्यावयाचें असल्यामुळें व्यापार अगर उद्योग करणाऱ्या इसमाला असली रक्कम, यंत्रखरेदी अगर अन्य उत्पादनसामग्री तयार करण्याकडें खर्च करणें शक्य नसतें. कारण उत्पादनसंच तयार होऊन, माल बाजारांत विकल्यानंतर पैसे हातीं येणार; हें सर्व झटपट होणारें नाहीं. म्हणून योजक अल्प मुदतीचीं कर्जें घेत नाहीं अगर घेतलींच तरी, या स्वरूपांत खर्च करीत नाहीं. कर्ज नाममात्र अल्प मुदतीचें म्हणून कमी व्याजाचें, पण मुदत पुनः पुनः वाढवून मिळणारें असें असेल तर, योजक या गोष्टीचा फायदा जरूर घेऊन कायम भांडवलांत त्याचा विनियोग

करील; म्हणजे यंत्रसामग्री, उत्पादनसंच, इमारती वगैरे तयार करण्याकडे खर्च करील. लांब मुदतीचे कर्ज काढावयाचें म्हणजे, बँका फार चिकित्सा करतात. तारण जास्त भरीव मागतात व व्याजाचा दरहि अधिक मागतात. शिवाय बाजाराची परिस्थिति पण लांब मुदतीचें कर्ज देण्यासारखी असावी लागते. जर सर्वत्र अस्थिर वातावरण असेल तर, बँका लांब मुदतीचें कर्ज देणार नाहींत. ठेवीदार कोणत्या वेळीं दाराशीं उभे राहतील याचा नेम नसतो; व लांब मुदतीचें कर्ज कांहीं ताबडतोब हांकेसरशीं परत येत नाहीं. म्हणून बँका बाजाराचे परिस्थितीवर लांब मुदतीचें कर्ज द्यावयाचें कीं नाहीं हें ठरवतात. शिवाय लांब मुदतीचें कर्ज उद्योगधंद्याकरितां असेल तर, त्यांत धोकाहि पतकरावा लागतो. कारण तो धंदा अयशस्वी झाला तर, त्याचा परिणाम बँकेनें दिलेल्या कर्जावर होतो. सर्वसामान्यपणें योजक मर्यादित जबाबदारीवर उत्पादन करीत असल्यामुळें, चालकांची जबाबदारी व्यक्तिशः नसते, तथापि बँका अल्प मुदतीचें कर्ज देऊन तें कोणत्या वेळीं परत मागतील, मुदत वाढवून देतील किंवा नाहीं ह्याचा नियम नसल्यामुळें धंदेवाले योजक, जास्त व्याज देऊन लांब मुदतीचें कर्ज घेणें पसंत करतात. किंबहुना अल्प मुदतीचें कर्ज घेणारें गिऱ्हाईक निराळें व लांब मुदतीचें कर्ज घेणारें गिऱ्हाईक निराळें. एकाऐवजीं दुसऱ्या स्वरूपाचें कर्ज घेऊन जमत नाहीं. त्यामुळें अल्पमुदतीचें कर्ज, व्याजाचा दर कमी असूनसुद्धां, घेणारें गिऱ्हाईक मर्यादित असतें. जास्त मुदतीनें कर्ज देण्यांत धोका तर कमी मुदतीनें कर्ज घेण्यांत सारखी काळजी. कारण मुदत भरतांच तें परत केलें पाहिजे नाहींतर पत राहणार नाहीं. जास्त मुदतीचे रोखे घेतले तर पुढेंमागें त्यांची किंमत कमीजास्त होण्याचा संभव. जर अल्प मुदतीनें कर्ज दिलें अगर हुंड्या घेतल्या तर, किंमत कमी होण्याची भीति कमी पण व्याजहि कमी; पण घेतलेली हुंडी मुदतीपूर्वी वटणावळ (बट्टा) देऊन विकतां येते व रोकड करणें शक्य असतें. समजा, सरकारनें ट्रेझरी बिलें ३ महिने मुदतीचीं काढली व १०० ची हुंडी ९९ रु. ८ आ.ला एखाद्यानें घेतली. तीन महिन्यांची मुदत संपण्यापूर्वी त्याला रकमेची जरूरी आहे. तो बाजारांत अगर बँकेंत जाईल, वटणावळ देऊन ती हुंडी विकील; त्याला कदाचित् ९९ रु. ८ आ. न येतां ९९ रु. येतील; पण रोख्यांच्या बाबतींत हा फरक फार पडेल. ३ वर्षांपूर्वी ८० चे भावानें घेतलेल्या रोख्याची किंमत ६० झाली असेल. अल्प मुदतीचें कर्ज देणें बँकांना एकंदरीनें परवडतें. कारण रक्कम येत असते, जात असते, व त्यामुळें प्रसंगविशेषीं वाढलेल्या दराचा ताबडतोब फायदा घेतां येतो.

व्यापारांत मंदीचें वातावरण उत्पन्न झालें म्हणजे बँकांकडे ठेवी जास्त येऊं

लागतात. कारण व्यापारांत, उद्योगधंद्यांत तेजी नसल्यामुळें, तिकडे रकमा गुंतविणारे कमी होतात, व सुरक्षिततेच्या दृष्टीनें लोक बँकांकडे कमी व्याज पतकरून ठेवी ठेवूं लागतात. मंदीमुळें बँकांकडूनहि कर्जे घेणारे थोडे; शिवाय मंदींत कर्ज देतांना बँका जास्त चिकित्सा करतात; आणि सुरक्षितपणाची खात्री असल्याशिवाय कर्ज देत नाहींत. अशा स्थितींत बँकांना आपली शिल्लक अल्प मुदतीचे कर्जांतच गुंतवावी लागते व पैसा मुबलक झाल्यामुळें, त्यांना अगदीं कमी व्याजाचे दरानेंहि रक्कम देणें भाग पडतें. याचा फायदा अशा तऱ्हेचें कर्ज घेणारा जो वर्ग त्याला होतो. आणि हा बहुतेक वर्ग म्हणजे सरकार, आणि सरकारला स्वस्त दरानें अल्प मुदतीच्या हुंड्या खपवितां येतात. त्याचप्रमाणें मंदी फार वेळ राहिली तर बँकांचा शिलकी पैसा वाढतो. एकंदर बाजारांत पैसा मुबलक होतो. अशा वेळीं सरकारनें कमी दरानें नवीन कर्जे काढलें तर फायदेशीर होतें अगर जुनें कर्जसुद्धां फेडणें फायदेशीर होतें; अर्थात् सरकार प्रजेचें हित पाहणारें पाहिजे. हिंदुस्थानांत असे अनेक प्रसंग येऊन हिंदुस्थानसरकारनें त्याचा फायदा घेतला नाहीं. उलट हिंदुस्थानांत कमी दरानें कर्ज मिळणें शक्य असतां सरकारनें तें जास्त दरानें लंडन येथें काढलें, अशी उदाहरणें पुष्कळ आहेत. हिंदुस्थानसरकार प्रजेचें हित याचा अर्थ गोऱ्या प्रजेचें हित असा करतें. नुकतेंच ( फेब्रुआरी १९४१ ) इंग्लंडमधील कांहीं कर्ज हिंदुस्थानसरकारनें मुदतीपूर्वी फेडलें, व त्यांत हिंदुस्थानचें हित केलें असें सांगण्यांत आलें. यांत हिताचा कांहींच संबंध नाहीं. हित झालें असल्यास इंग्लंडचें झालें. कारण युद्धांकरितां जो माल हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्यें नेला, त्याची किंमत हिंदुस्थानाला द्यावयाची; म्हणजे एकतर सोनें द्यावयाचें ते अमेरिकेकडे गेलें, कारण त्यांनीं रोखीनेंच माल विकला; नाहींतर दुसरा माल धाडून फेड करावयाची. तें पाणबुड्या बोटींच्या धोक्यामुळें कठीण झालें, म्हणून इंग्लंडमधील हिंदुस्थानचे सावकार म्हणजे रोखेवाले, त्यांचे रोखे इंग्लंडनें घेतले व त्यांना रकमा दिल्या व तेवढ्या रकमा हिंदुस्थानसरकारनें पुरविलेल्या मालाच्या किंमती म्हणून जमा केल्या. सावकार इंग्लंडनें भागविला, माल हिंदुस्थानसरकारनें तेवढ्या किंमतीला दिला. असा एकंदरीनें हिशेब करून इंग्लंडची सोय केली; हिंदुस्थानचें हित केलें हें म्हणणें थोतांड आहे. उलट हा अन्याय आहे हें कदाचित् पुढेंमागें ठरलें असतें, ती संधिहि नाहींशी केली. तात्पर्य, मंदींत पैसा मुबलक, व्याजाचा दर कमी, व त्याचमुळें बँकांना या पैशाचें काय करावें, हा नेहमीं प्रश्न पडतो. कारण त्यांच्या ठेवीदारांना कांहीं ना कांहीं तरी व्याज द्यावें लागतें. नुसती रोकड ठेवावी तर त्यावर व्याज नाहीं, अल्प मुदतीनें कर्ज द्यावें तर व्याजाचा दर कमीच झालेला

असतो. लांब मुदतीच्या रोख्यांत गुंतवावें तर, पुढें भाव काय होईल हें अनिश्चित. शेअर्स—भागामध्यें गुंतवावें तर मंदी दिसत असतां हें करणें धोक्याचें आहे हें उघड असतें.

खाजगी व्यक्तीजवळ जर मुबलक पैसा झाला तर तो सामान्यतः कसा वागेल हें त्याच्या जवळ किती पैसा आहे, यावर बरेंचसें अवलंबून राहील. जितका पैसा जास्त, तितका मनुष्य सामान्यपणें छातीठोकपणें वागतो, व कमी सुरक्षितता पण जास्त व्याज अगर नफा देणाऱ्या रोख्यांत अगर भागांत पैसा गुंतविण्यास भीत नाहीं. कांहींना सट्टेबाजी करावयाची नसते. फक्त प्राप्ति वाढवावयाची असते म्हणून, त्या दृष्टीनें तो आपला पैसा गुंतवील. सट्टेबाज मनुष्य निराळ्या दृष्टीनें वागेल, अर्थात् त्याला प्राप्ति नको असते असें नाहीं, उलट जास्त हवी म्हणूनच तर तो सट्टा करीत असतो. पण प्राप्ति आणि धोका व त्यामुळें होणारें नुकसान यांकडे पाहण्याची दृष्टि प्रत्येकाची निराळी असते. तसेंच पुढें काय होईल याबद्दल अनेकांचीं अनेक मतें असतात. सर्वच जर एकमताचे असतील तर बाजारांतहि तेंच घडून येईल, पण तसें नसतें. शिवाय प्रत्यक्ष शेअर, भाग घेणारे, कर्ज घेणारे, हजारों असतात. ते स्वतः कधीं बाजारांत जात नाहींत. खरेदीविक्रीचें हें सर्व काम बँकांमार्फत, दलालांमार्फत होत असतें. पुष्कळ वेळां, सरकार कायद्यानें रकमा रोख्यांत गुंतविल्याच पाहिजेत असा निर्बंध घालतें. उदा०, विमा कंपन्यांना ४५ टक्के रकम सरकारी रोख्यांत गुंतविलीच पाहिजे अशी सक्ती आहे. त्याचप्रमाणें अज्ञानांच्या रकमा, संस्थांच्या शिल्लकाहि अशाच रोख्यांत गुंतविल्या जातात. त्याचा परिणाम रोख्यांच्या किंमतीवर होत असतो. तथापि एकंदरीनें पाहतां पैसा मुबलक झाला म्हणजे बँका लांब मुदतीनें कर्ज देण्यास तयार नसतात, तसेच लांब मुदतीचे रोखे घेण्यासहि तयार नसतात. कारण त्यांच्या किंमती काय होतील हें निश्चित नसतें. अल्प मुदतीनें कर्ज देण्यास तयार असतात. अर्थात् व्याजाचा दर कमी असतो, त्यामुळें त्यांना प्राप्ति कमी होते, हें उघड आहे. पण मंदीचे वातावरणांत हेंच करणें त्यांना जास्त श्रेयस्कर ठरतें.

रोखे अगर भाग अगर हुंडया हे सर्व बाजारांत विकले जातात, व त्यांची ताबडतोब रोकड करतां येते. एका दृष्टीनें हे अगदीं तयार पैशाच्या स्वरूपाचे आहेत, म्हणजे यापासून पैसा ताबडतोब मिळतो. तथापि या गुणांत सर्व सारखे असें मात्र नव्हे; सर्वांना बाजारांत विकतां येतें हें खरें, तथापि रोख्यांच्या किंमतींत फरक होत असतो, त्यापेक्षां भागाच्या किंमतींत जास्त होतो. हुंडया, अर्थात् अल्प

मुदतीच्याच असल्यामुळें, त्यांच्या किंमतींत फरक मोठ्या प्रमाणांत होत नाहींत. रोखे अगर भाग मोठ्या प्रमाणांत विकूं लागले कीं, त्यांचा भाव उतरतो. भागांचा नफा कमी होऊं लागला कीं त्यांची किंमत कमी होते. तसेंच लांब मुदतीच्या कर्जाचे व्याजाचा दर वाढला तर, सामान्य रोख्यांचीहि किंमत कमी होते. लांब मुदतीच्या कर्जाचे व्याजाचा दर वाढला, आणि त्या प्रमाणांत भागावरील नफा येईनासा झाला कीं, भागांची किंमत कमी होते. कारण भागांत अगर सामान्य रोख्यांत रक्कम गुंतविण्यापेक्षां लांब मुदतीचें कर्ज देऊन गुंतविण्यानें, जास्त व्याज मिळतें. ज्याच्याजवळ पैसा 'तयार' स्वरूपांत आहे त्याला नेहमींच बाजाराचे स्थितीचा फायदा घेतां येतो. थोडया मुदतीनें रक्कम गुंतविली तर धोका कमी, व रक्कमहि मुदत भरतांच ताबडतोब परत मिळते. अर्थात् तोंपर्यंत प्रत्यक्ष रक्कम जवळ नसते. तथापि घेतलेलें कर्ज विकून पैसा तयार करतां येतो, हें आपण वर पाहिलें आहे. जर पुष्कळ लोक 'तयार' पैशाची मागणी करूं लागले तर मग अल्प मुदतीचे कर्जावर व्याजाचा दर जास्त होईल; कारण पैसा गुंतविणारे लोक कमी; लोकांना पैसा अगदीं 'तयार' पाहिजे. व त्याचा परिणाम व्याजाचा दर वाढविण्यांत होणार हें अगदीं सरळ. बाजारांत धांदल उडाली म्हणजे प्रत्येक व्यापाऱ्याला, योजकाला, बँकेला ताबडतोब 'तयार' पैसा हवा असतो, कारण त्यांच्याकडे घेणेकऱ्यांचा तगादा सुरू होतो. तेव्हां तो ताबडतोब भागवून पत राखावयाची असते म्हणून अल्प मुदतीकरितां, चालू गरज भागविण्याकरितां त्यांना रकमा हव्या असल्यामुळें त्यावर ते जास्त व्याज देण्यास तयार असतात; अशा रीतीनें अल्प मुदतीच्या कर्जावरील व्याजाचा दर वाढतो.

तेजीचें वातावरण सुरू झालें म्हणजे पदार्थांचे भाव वाढूं लागतात; भाव वाढण्याचा संभव असेल तर पैसेवाले ठराविक व्याज देणाऱ्या रोख्यांत रकमा गुंतविणार नाहींत अगर नुसती शिल्लकहि ठेवणार नाहींत. कारण भाव वाढूं लागला तर पूर्वी १ रु. ला जितकें मिळत असे त्यापेक्षां कमी मिळणार; म्हणून पैसेवाले रोकडींत पैसा ठेवणार नाहींत. कारण त्यापासून नुकसान. यासाठीं भागांत अधिकाधिक पैसा गुंतविला जाईल. कारण तेजीमुळें नफा जास्त येणार; रोख्यांत गुंतविला तर व्याजाची रक्कम ठराविक, ३—३॥—४ जी काय असेल ती. उलट तेजीमुळें उत्पादन वाढून नफा वाढला कीं भागांवरील 'डिव्हिडंड' अगर नफा वाढणार. हेंच निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे तेजीच्या वातावरणांत, ज्याचा संबंध उत्पादनाशीं येईल अशा भागांत अगर व्यवहारांत पैसेवाले रकमा गुंतवितील. उत्पादन तेजींत असल्यामुळें

योजकांना, रकमेची गरज जास्त; त्याचा परिणाम व्याजाचे दर वाढण्याकडे होतो. योजकांना मागणी वाढत असल्यामुळें वाढणाऱ्या विक्रीपासून नफा वाढत असल्यामुळें जास्त भांडवलाची अधिक उत्पादनासाठीं जरूरी असते; म्हणून जास्त व्याजानें रकमा कर्जाऊ घेणें, त्यांना परवडतें. उलट जर मंदीचें वातावरण असेल तर भाव कमी होतात; भाव मंदावतील अशी स्थिति झाली कीं व्याजाचे दरहि कमी होतात. कारण, योजकांना उत्पादन कमी करण्याची पाळी येते. त्यांना रकमेची जरूरी नसते. पैसा मुबलक होत जातो व व्याजाचे दर कमी होतात. तेजी अगर मंदी ही सामान्यतः हळुहळू होत जाते; अगदीं मुंगीचे पायानें नव्हे. पण अगदीं हत्तीचे पायानेंहि पण नव्हे. मात्र एकदां तेजी अगर मंदी सुरू झाली कीं तिचा क्रम वाढता असतो; या क्रमाबरोबर वर लिहिल्याप्रमाणें व्याजाचे दर कमीजास्त होत असतात. अकल्पित कारणामुळें होणारी तेजी अगर मंदी, वाटेल ती धांदल बाजारांत करील; पण सर्व-सामान्यपणें जी स्थिति दिसून येते, त्या अनुरोधानेंच वर विचार केला आहे.

तेजी सुरू झाली कीं, लोक वर सांगितल्याप्रमाणें शेअर्स, भाग, घेऊं लागतात. कारण नफा वाढत असल्यामुळें भागीदारालाहि 'डिव्हिडंड' नफा जास्त मिळतो. त्याचा परिणाम लागलीच भागांची किंमत वाढण्याकडे होतो. युद्ध सुरू झालें, लोकांनीं बरोबर जाणलें कीं लोखंडी मालाला भाव जास्त, त्याबरोबर टाटा कंपनीचे भागांची किंमत वाढूं लागली, त्याचप्रमाणें अन्य भागांची. पण तेजी सुरू झाली कीं रोख्यांची किंमत कमी होते. कारण त्यावरील प्राप्ति, व्याज हें ठरलेलें असतें. सर्वत्र पैशाला मागणी, कारण वाढत्या उत्पादनाला त्याची जरूरी, त्यामुळें पुष्कळ योजक लांब मुदतीचें कर्ज काढण्याऐवजीं अगर नवीन भाग खपवून भांडवल वाढविण्याऐवजीं थोड्या मुदतीचें कर्ज घेऊन रक्कम हातीं घेतात; व विक्री वाढत असल्यामुळें परत-फेड लवकर करणें शक्य होतें. त्यामुळें अल्प मुदतीचे कर्जावरचाहि व्याजाचा दर वाढतो. पुष्कळ वेळां बाजारांत विक्रीस आलेल्या शेअर्सची खरेदी करण्याकरितां लोक बँकेकडून थोड्या मुदतीनें कर्ज घेतात. कारण प्रत्येकाला उत्पादनापासून नफा वाढत आहे असें वाटतें व त्यांतील भागांची खरेदी चढाओढीनें होते. या सगळ्या तेजीच्या चढत्या वातावरणांत सरकारी रोख्यांना कोणी विचारीत नाहीं. अगदीं त्याच्या उलट मंदी आली म्हणजे परिणाम होऊं लागतो. भागांना भाव कमी, त्यांची किंमत उतरत जाते, कारण नफा नाहींसा होत चाललेला असतो. रोख्यांचे भाव वाढत जातात कारण प्राप्ति—व्याज, निश्चित असतें. तात्पर्य, तेजीमंदी दोहोंची एक एक पाळी झाली, व सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे, अल्प मुदतीच्या कर्जाच्या व लांब मुदतीच्या

कर्जाच्या, वाढणारे व कमी होणारे व्याजांच्या दरांची जर सरासरी काढली तर, दोन्ही दरांत या दृष्टीनें विचार केल्यास, कदाचित् फारसा फरक पडणार नाहीं. कारण प्रत्यक्ष भांडवलशाही व्यवहारांत कमी व्याजानें रकमा घेऊन, जास्त व्याजानें रोख्यांत अगर भागांत गुंतविणें हें सारखें चालू असतें, व या व्यवहारांत शेवटीं मागणी व पुरवठा याचा नियम लागून सर्वसाधारणपणें दोन्ही व्याजांचे दरांचा (अल्प व दीर्घ मुदतीचे कर्जावरील) मेळ बसणें अशक्य नसतें. भागांची व रोख्यांची खरेदीविक्री कर्ज काढून करणें, हा भांडवलशाहींतील व्यवहाराचा एक महत्त्वाचा भाग आहे. १९२९ सालीं अमेरिकेंत हजारों लोकांनीं कर्ज काढून शेअर्स घेतले व पुढें मंदी आली त्यामुळें हजारों लोकांचें नुकसान झालें. बाजारांत हाहाःकार उडाला. कांहीं बँका बंद झाल्या, कांहीं अगदीं सरासरी वांचल्या. १०० चा भाग जो १००० देऊन घेतला त्याला कोणी १० स विचारीना, अशी स्थिति झाली. उत्पादन कमी झालें, बेकारी वाढली, सर्वत्र नाश झाला. त्याचा परिणाम अमेरिकेपुरताच राहिला नाहीं, त्याचे पडसाद जगभर उमटले !

वरील विवेचनांत योजक सामान्यतः लांब मुदतीचीं कर्जे घेतात असें सांगितलें. कारण त्यांना अल्प मुदतीनें कर्ज घेऊन परत करणें अवघड असतें. उत्पादन होऊन, माल विकून, विक्रीचा पैसा हातीं येईपर्यंत कालावधि लागतो. या दृष्टीनें उद्योगधंद्याला लागणारें भांडवल, हें दीर्घ मुदतीनेंच घेतलेलें असतें. देशांत शांतता असली म्हणजे दीर्घ मुदतीनें कर्ज घेऊन, योजक उद्योगधंद्यांची मांडणावळ करीत असतात. उत्पादनसंच जमविणें, कारखानें उभारणें, उत्पादक वस्तूंची जुळवाजुळव करणें अगर त्यांचा व्याप वाढविणें, याकडे त्यांचा खर्च होतो. त्यावर द्यावें लागणारें व्याज देऊन सुद्धां, नफा राहील अशी आशा योजकांना असते म्हणूनच ते कर्ज काढून उद्योग चालू ठेवीत असतात. राष्ट्रांतील शांततेचा काळ संपला, युद्ध सुरू झालें कीं, तें यशस्वी करण्याकरितां दारूगोळा तयार करणें, अन्य युद्धसामग्री तयार करणें, सैनिकांची व्यवस्था करणें, याकरितां सरकारला कर्ज काढावें लागतें. आणि चालू युद्धाचा खर्च, हा चालू उत्पादनांतून चालणें शक्य नाहीं म्हणून, सर्वत्र भयंकर प्रमाणावर कर्ज काढावें लागतें. युद्ध संपल्यानंतर, या सर्व रकमेचा मागमूस राहत नाहीं. दारूगोळा उडून गेलेला असतो, अन्नसामग्री खाऊन फस्त झालेली असते. तात्पर्य ती सर्व रक्कम खर्च होऊन निकालीं लागलेली असते. उलट उत्पादनाचे कामीं कर्जी घेतलेली रक्कम कायम भांडवलस्वरूपानें यंत्रसामग्री वगैरे शिल्लक असते. एकांत, भांडवलासुद्धां ऐन रक्कम संपलेली असते, तर दुसऱ्यांत ती उत्पादनसाहित्याच्या

स्वरूपांत कायम असते. तथापि राष्ट्राच्या अस्तित्वासाठीं युद्ध करावें लागतें;व नागरिक त्याग व कष्ट करण्यास, प्रसंगीं प्राणहि देण्यास तयार होतात. कोणतें कर्ज हितवर्धक व कोणतें हानिकारक हें सांगणें सोपें नाहीं किंवा हितवर्धक व हानिकारक असे दोन भाग करणें हेंहि बरोबर नाहीं. ज्यापासून प्राप्ति होईल कांहीं उत्पन्न होईल अशी गोष्ट अगर उत्पादन करण्याकरितां काढलेलें कर्ज हितवर्धक म्हणणें गैर नाहीं, ही गोष्ट खरी. पण समजा, सरकारनें रस्ते तयार करण्याकरितां, पुरानें प्राणहानि होऊं नये म्हणून कांहीं बंधारे घालण्याकरितां अगर सार्वजनिक शिक्षण करावयाचें म्हणून सर्वत्र शाळा बांधण्याकरितां, कर्ज काढलें तर त्यापासून वार्षिक उत्पन्न कांहीं नाहीं, म्हणून तें कांहीं हितवर्धक नाहीं असे म्हणतां येणार नाहीं. मुलांच्या शिक्षणाकरितां जर बापानें कर्ज काढलें तर त्या कर्जांत व सरकारनें वर सांगितलेल्या कार्याकरितां कर्ज काढलें तर त्यांत फरक कसा करतां येईल? घर बांधण्याकरितां कर्ज काढलें तर हितवर्धक, कारण त्यापासून जरी तो त्यांत राहिला नाहीं तरी भाडें येणें शक्य आहे. पण समजा, एखाद्यानें स्वतःची करमणूक व्हावी म्हणून भारी किंमतीची बाजाची पेटी कर्ज काढून घेतली, तर हें कर्ज हानिकारक आहे असें म्हणतां येणार नाहीं; त्या बाजाच्या पेटीपासून त्याला समाधान होत आहे, त्याच्या जीवनाला ती अवश्य आहे. लोक कर्ज काढीत असतात ही मुख्य गोष्ट आहे. कर्जाला जशी मागणी असेल त्यामानानें व्याजाचा दर राहील; मागणी कशी असेल हें, ज्यांना कर्ज हवें आहे त्यांच्या गरजेवर व इच्छेवर अवलंबून राहील.

लोक पुष्कळ वेळां चालू गरजा भागविण्याकरितां कर्ज काढीत असतात. लग्नकार्यें, मुलांचें शिक्षण वगैरे अनेक गोष्टी संसारांत, लोकांना कर्ज काढण्यास भाग पाडतात. मोठमोठाले योजक, धंदेवाले उत्पादनासाठीं, व्यापारधंद्यासाठीं कर्ज काढीत असतात व तें काढतांना त्यांना त्यावरील व्याज देऊन नफा उरेल असें वाटत असतें. खाजगी माणसांची गरज भागविणाऱ्या कर्जापासून ऋणकोला कांहीं उत्पन्न होत नसतें हें उघड आहे. तें सर्व चालू उत्पन्नांतून जीवनांतील गरजा भागत नाहींत म्हणून काढलेलें असतें व तें जास्त व्याजासुद्धां फेडावयाचें असतें; ही फेड त्याला त्याच्या नेहमींच्या प्राप्तींतूनच करावयाची असते. आज त्याला १०० रुपयांची गरज आहे, म्हणजे त्याचें उत्पन्न आज त्याला पुरेसें नाहीं व त्याला १०० रु. ची गरज लागली सबब ते त्यानें कर्जाऊ काढले. ५ वर्षांनीं ते फेडावयाचे म्हणजे, त्याची त्या वेळीं अशी स्थिति असली पाहिजे कीं, चालू गरजा भागवून त्याचेजवळ कर्ज परत करण्याकरितां रुपये १०० + त्यावरील होणारे व्याज इतकें उत्पन्न असलें पाहिजे.

अशी स्थिति होईल अशी त्याला आशा असते म्हणूनच तो कर्ज काढतो. कर्ज देणारालाहि तसाच विश्वास वाटतो म्हणून तो देतो. ऋणको आपलें उत्पन्न वाढवून फेड करील नाहीं तर आपल्या गरजा कमी करून तो फेड करील. आज त्याला उत्पन्नाचे मानानें जास्त खर्च करणें पसंत आहे, व ५ वर्षांनीं त्याला जास्त खर्च करणें पसंत पडणार नाहीं. उलट उत्पन्नाचे मानानें तो खर्च कमी करील. लोक जोंपर्यंत उत्पन्नापेक्षां जास्त खर्च करणें अर्थात् चालू गरजांकरतां पसंत करतात अगर त्यांना तें करणें प्राप्त होतें, तोंपर्यंत ते कर्ज काढतील. मग कर्जाला व्याज जास्त असो अगर कमी असो किंवा मुळींच नसो. एखाद्यानें १०० रु. कर्ज घेतलें व तें बिनव्याजीं आहे. तरीसुद्धां घेणाराला तें फेडलें हें पाहिजेच. तो कर्ज घेतो याचाच अर्थ आज उत्पन्नापेक्षां जास्त खर्च करणें ही गोष्ट त्याला श्रेयस्कर वाटते, अवश्य वाटते, म्हणूनच तो कर्ज घेऊन ती भागवितो. पुढें पैसे मिळतील व कर्ज फेडतां येईल ही आशा अगर विश्वास कर्ज घेण्याच्या मुळाशीं असतो. पांच वर्षांनीं मिळणारा पैसा आजच मिळाला तर मनुष्य त्याबद्दल कांहीं तरी मोबदला द्यावयास तयार असतो. आज शंभर रुपये पाहिजे आहेत ते त्याच्याजवळ नाहींत, ५ वर्षांनीं त्याला १०० रु. मिळतील हा विश्वास त्याला आहे. एकतर आज अडचण सोसून ५ वर्षें थांबून १०० रु. मिळाल्यावर त्याचा विनियोग करणें हा एक मार्ग, अगर जी रक्कम (१०० रु.) त्याला मिळणार आहे ती भावी रक्कम आजच खर्च करून, पुढें परत करावयाची हा दुसरा मार्ग. आज १०० रु. कर्ज काढून घेतलें म्हणजे भावी पैसा —पुढें मिळणारा, आज घेणें त्याला पसंत पडतें. ही रक्कम १०० रु. आज घेतली तर त्याला त्याबद्दल मोबदला म्हणून ५ वर्षांनीं १०० रु. व त्यावर व्याज दिलें पाहिजे. लोक या दृष्टीनें व्याज देण्यास तयार होतात कारण आज त्यांना रक्कम हवी असते.

लोकांना चालू गरजा भागविण्याकरितां कर्जें काढावीं लागतात. त्यांचें चालू उत्पन्नांतून भागत नाहीं म्हणूनच त्यांना कर्ज काढणें भाग पडतें. उत्पन्न कमी व चालू घडीला खर्चाचें तोंड मोठें. या स्थितींत कर्ज काढण्यावांचून दुसरा उपाय नसतो. पुढेंमागें उत्पन्न व खर्च यांचा मेळ बसेल असें वाटतें व त्या आशेवर मागें सांगितल्याप्रमाणें व्यक्ति वागत असते! आजची गैरसोय दूर करून जीवनांत समाधान उत्पन्न करावें असें प्रत्येकाला वाटणें साहजिक आहे. भविष्यांत काय होईल यापेक्षां आज काय शक्य आहे हें पाहून पुष्कळ लोक वागत असतात. ऋण काढून सण करणारे बेफिकीररावहि जगांत पुष्कळ असतात. "ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" कर्ज काढून ऐटीनें

रहावें हें तत्त्वज्ञान फार पुराणें आहे, चार्वाकापासून आहे. तथापि सर्वजण असें करीत नाहींत. किंबहुना सर्वजण करूं लागले तर त्यांना कर्ज देणारे तरी भेटले पाहिजेत. कर्ज देणारा सावकार ऋणकोची पत पहातो, त्याची मिळकत पाहतो. अलीकडे तर विमा उतरला असला तर पॉलिसी सुद्धां लावून घेऊन जीवन व एकप्रकारें मृत्यूला सुद्धां तारण घेतो. मढ्यावरचें लोणी सुद्धां या अर्थानें सावकार सोडीत नाहीं. नुसतें जास्त व्याज दिलें म्हणजे वाटेल तेवढी रक्कम कर्जाऊ मिळेल अशी वस्तुस्थिति नसते. लाउड स्पीकर लावला म्हणजे वाटेल तेवढे प्रेक्षक येतीलच असें नाहीं, तेहि वक्ता व विषय पाहतात. पैशापासून पैसा विनश्रमानें उत्पन्न होतो हें भांडवलशाहींत जरी खरें असलें तरी, त्याहि उत्पादनाचें कांहीं ठरलेले तंत्र आहे!! रकमेला व्याज म्हणजे स्वतः कांहीं श्रम न करतां समाजाच्या उत्पादनावर, श्रमांवर मिळालेली सत्ता, हाच त्याचा अर्थ आहे. तथापि वाटेल तेवढें व्याज मिळेल हेंहि शक्य नाहीं; किंवा वाटेल तें व्याज देऊन, वाटेल तितकी रक्कम मिळेल हेंहि शक्य नाहीं. सावकार (कर्ज देणारे) धंदेवाले असतात, ते कर्ज घेणाऱ्यासारखे बेफिकीरराव नसतात.

कर्ज घेणाऱ्याला आज पैसा हवा असतो कारण त्याला उत्पादनांतून चालू घडी पुरी पाडतां येत नाहीं. उलट कर्ज देणाराची स्थिती अशी असते कीं, आज त्याला पैशाची गरज नसते; पुढें गरज लागेल म्हणून तो ज्या रकमेची त्याला आज गरज नसते ती लोकांस देऊन पुढें व्याजासुद्धां घेण्याची त्याची तयारी असते. याप्रमाणें तो आजची गरज भागवून उरलेली जास्त रक्कम कर्जाऊ देणें पसंत करतो. त्याला हें न करतां आजहि सर्व रक्कम खर्च करतां येईल. पण त्याला असें वाटतें कीं, पुढें उत्पन्न कमी होईल तेव्हां ही रक्कम त्यावेळेस उपयोगी पडेल; म्हणून तो सर्व रक्कम आजच खर्च न करतां पुढील काळाकरितां शिल्लक टाकतो. आजचा पैसा तो भावी पैसा करतो. कर्ज दिलेल्या रकमेला पुढें मिळणाऱ्या पैशाचें स्वरूप येतें. याप्रमाणें अनेक लोक कर्ज घेत असतात व देत असतात व त्यामुळें व्याजहि देतात व घेतात. ज्याचेजवळ जरूरीपेक्षां जास्त पैसा आहे तो विचार करतो कीं घरीं ठेवून काय उपयोग? त्याचप्रमाणें बँकेंत अगर इतरत्र बिनव्याजी ठेव ठेवली तरी काय उपयोग? म्हणून एकतर घरीं ठेवून काळजी करण्यापेक्षां तो बँकेंत व्याजानें ठेवील अगर दुसरीकडे व्याजानें लावील. कांहीं लोकांना कर्जाची जरूर असते तर कांहींना आपला पैसा गुंतवावयाचा असतो. एका दृष्टीनें कर्जाला मागणी असते व कर्जाचा पुरवठा होत असतो; या मागणी—पुरवठ्यांत मेळ बसविण्याचें काम व्याजाचा दर करीत असतो, असें म्हटलें तर तें चुकीचें होणार नाहीं. समजा, व्याजाचा दर ५ टक्के झाला आहे. जर

बिनव्याजीं रकमा मिळत असतील तर मागणी इतकी वाढेल कीं पुरवठा होणार नाहीं. पण ५ टक्के दर आहे, याचा अर्थ ५ टक्के व्याज देण्यास लोक तयार असल्यास कर्ज देणारे तयार आहेत, मागणीचा जबाब देणारा पुरवठा आहे. व व्याज ५ टक्के द्यावें लागतें म्हणून मागणीहि मर्यादित झाली. ५ टक्के व्याज मिळत आहे म्हणून जेव्हां व्याज मिळत नव्हतें तेव्हां कर्ज देण्यास तयार नव्हते ते आज कर्ज देण्यास पुढें आले; म्हणजे ५ टक्के व्याजानें कर्जाचा पुरवठाहि बाजारांत आणला. तात्पर्य व्याजाचे दरानें अगर आपल्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे या भावाचे कांट्यानें, मागणी व पुरवठा यांचा ताजवा सारखा केला, व हीच त्याची प्रवृत्ति असते. नफा मिळेल म्हणून कर्ज घेणारे योजक यांनीं व्याज द्यावें हें सरळ आहे. पण जेथें नफ्याचा अगर नुकसानीचा प्रश्न नाहीं, असे शेंकडों व्यवहार चालू आहेत त्यांत लोकांना कर्ज घ्यावें लागतें; व त्यांना कर्ज घेतांना जे नफ्यासाठीं, उद्योगधंद्यासाठीं व्याज देऊन कर्ज घेतात त्यांच्या बरोबरीनें व्याज द्यावें लागतें! कारण कर्जाच्या बाजारांत व्याजाचा दर एकंदरींत, असणाऱ्या मागणी व पुरवठ्यावर अवलंबून असतो.

व्यापारधंद्यांत गुंतविलेलें भांडवल, सामान्यपणें भागीदारांकडून 'शेअर' रूपानें घेतलेलें असतें अगर योजकाच्या स्वतःचे मालकीचें असतें. उद्योगधंद्यापासून मिळणारी प्राप्तिहि कमीजास्त होणारी असल्यामुळें भांडवलावरील नफाहि कमीजास्त होत असतो; हा नफा भागीदारांना 'डिव्हिडंड' म्हणून वांटतात. हा होणारा नफा भांडवलावरील व्याज नव्हे. व्याज म्हणजे कराराप्रमाणें ठरलेल्या वेळीं, ठरल्याप्रमाणें घेतलेल्या कर्जाबद्दल द्यावी लागणारी रक्कम. कर्जाऊ रक्कम घेऊन दरसाल अगर दरमहा त्याबद्दल कराराप्रमाणें व्याजाची रक्कम द्यावी लागते, व ती काय असेल, काय दरानें असेल हेंहि ठरलेले असतें. धंद्यांतील भांडवलाला अशी ठरलेल्या वेळीं परत देण्याची रक्कम ठरलेली नसते, किती मिळेल तें निश्चित नसतें, कदाचित मिळणारहि नाहीं मिळाल्यास नफा न मिळाल्यास नफा नाहीं उलट नुकसानच. ज्यांनीं भांडवल घातलें अगर भाग विकत घेऊन भांडवल पुरविलें त्यांना, अपेक्षेप्रमाणें नफा मिळेल अगर मिळणारहि नाहीं. त्यांना हें माहित असून त्यांनीं हा धोका पतकरलेला असतो. धंद्यांतील प्राप्ति चढउतार होणाऱ्या स्वरूपाची असते. धंद्याला जरी सुरुवात भांडवल घालून वर सांगितल्याप्रमाणें झाली असली तरी, पुष्कळ धंदे कर्ज काढून उभारले जातात अगर त्यांचा व्याप वाढविला जातो. कांहीं योजक दुसऱ्याकडून ठराविक व्याजानें कर्ज काढून ती रक्कम भांडवल म्हणून धंद्यांत घालून धंदा उभारतात; पुष्कळ वेळां धंदा वाढवावयाचा असल्यास व्यक्तिगत योजकाला अगर कंपनीला कर्ज काढावें लागतें. त्यांना

त्यांच्या गरजा भागविण्याकरितां बँका कर्ज देत असतात. कांहीं खाजगी व्यक्तिहि कर्ज देत असतात. त्या कर्जाबद्दल ठराविक व्याज द्यावें लागतें. पुष्कळ वेळां प्रत्यक्ष कर्ज न घेतां, बँकांकडे अमुक एक रकमेपर्यंत 'ओव्हरड्रॉफ्ट' अंगावर उचल करण्याची सोय केली जाते. त्यावरहि व्याज द्यावें लागतें. कांहीं वेळां नाणावलेल्या कंपन्या लांब मुदतीचे व ठराविक व्याज देणारे रोखे काढून, ते बाजारांत विकून रक्कम उभी करतात. त्याला 'डिबेंचर्स' म्हणतात. यांवरील व्याज ठरलेलें असतें. कंपनीला नफा होवो अगर न होवो यांवरील शर्तीप्रमाणें व्याजमुद्दलाची फेड करावीच लागते. शिवाय कंपनींची सर्व मिळकत या रोख्यांना तारण असते. सरकारी रोख्यांपेक्षां या रोख्यांवर व्याज साहजिक जास्त मिळतें; कारण सामान्यतः सरकारइतकी कंपन्यांची पत नसते. लोकांना सरकारी रोख्यांतील रक्कम साहजिकच जास्त सुरक्षित वाटते. म्हणून जास्त व्याजाचा दर दिल्याशिवाय हे रोखे खपणें कठीण असतें. घेतलेल्या कर्जापासून, झालेल्या उत्पन्नांतून प्रथम रोखेवाल्यांचें व्याज द्यावें लागतें, शिल्लक राहिल्यास ती कंपनीच्या भागीदारांची. शिल्लक न राहिलें तरी अगर नुकसान आलें तरी कंपनीला त्यांचें व्याज भरावेंच लागतें. रोखेदार, फक्त कंपनीच्या धंद्याकडे, व्याज मिळेल कीं नाहीं याच दृष्टीनें पाहतात. कारण नफा झाला तर त्यांत त्यांचा कांहीं अंश नसतो. खाजगी योजकाचा सावकारहि त्याच दृष्टीनें बघत असतो, कारण त्याचाहि संबंध नफानुकसानीशीं नसतो. कूळ तरतें असलें म्हणजे झालें; कारण कूळ तरतें असेल तरच व्याज व मुद्दल परत मिळण्याची आशा. पैसे गुंतवितांना मनुष्य विचार करूनच गुंतवितो. ठराविक व्याज घेऊन रक्कम गुंतविली तर व्याज निश्चित मिळेल, पण एखादे वेळेस तो धंदाच बुडाला तर सर्वच बुडेल हा धोका असतो. जर प्रत्यक्ष धंद्यांतच पडून, आपली स्वतःची मिळकत भांडवल म्हणून घालून, व्यापार सुरू केला तर, जो नफा होईल तो मिळेल, अगर नुकसान झाल्यास तेंहि सहन करावें लागेल. काय होईल हें साहजिकच अनिश्चित असणार! तथापि प्रत्यक्ष व्यवहारांत ज्यांचा धंदा निव्वळ व्याजावर अगर भागांपासून मिळणाऱ्या नफ्यावर राहण्याचा आहे, ते पैसा गुंतवितांना दक्षतेनें वागतात, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. भांडवलशाहींत श्रम न करतां हातीं असलेल्या संपत्तीच्या उत्पन्नावर जगणारा एक वर्ग, मोठा नामवंत आहे. रकमा व्याजीं लावून अगर भागांच्या नफ्यावर जगणारा अगर जमिनीचे खंडावर जगणारा, हे सर्व या वर्गाचे सन्मान्य सभासद आहेत. ते आपली रक्कम सुरक्षित कशी राहील व तिजपासून जास्तींत जास्त फायदा कसा मिळेल, हें पाहत असतात. सरकारी रोख्यांत गुंतवील, कंपन्यांचे 'शेअर्स' घेतील, चाळी विकत घेतील. तात्पर्य, नुसत्या पैशाच्या जोरावर

कांहींहि श्रम न करतां प्राप्ति कशी मिळवितां येईल, अगर वाढवितां येईल या दृष्टीनें त्यांचीं पावलें गति घेत असतात.

प्रत्येक पैसेवाल्याला धंदा करतां येतो असें नाहीं. भांडवल जमवावयाचें, उत्पादनसंच उभारावयाचा, मजूर मिळवावयाचे व तयार झालेल्या उत्पादनाची विक्री करावयाची, याला चातुर्य, दूरदृष्टी, बाजाराचें ज्ञान, धिम्मेपणा, गोड वागणूक वगैरे अनेक गुण अंगांत असावे लागतात. हें सर्व जुळवून आणावयाचें म्हणजे मनुष्य खरोखरच योजक असावा लागतो व म्हणूनच आपण योजक ही पदवी सार्थपणें योजिली आहे. ज्या पैसेवाल्यांना योजक होतां येत नाहीं, ते भाग विकत घेतील, ठराविक व्याज देणाऱ्या कंपनीचे रोखे घेतील अगर त्या योजकाला अगर कंपनीला सरळ कर्जहि देतील. कोणी भाग पसंत करतात, व नफानुकसानी दोन्हीची तयारी दर्शवितात. तर कोणी आपली प्राप्ति निश्चित असावी म्हणून रोखे घेतात. तात्पर्य पैसेवाल्यांकडून त्याच्या पसंतीला पडेल अशा तऱ्हेनें, भाग, प्रेफरन्स भाग, रोखे वगैरे मार्गांनीं, उद्योगधंद्यांतील योजकवर्ग, त्याला लागणारें कर्ज मिळवीत असतो, व उद्योगधंद्यांत भांडवल म्हणून गुंतवीत असतो. सरकार जेव्हां कर्ज काढतें तेव्हां तें ठराविक व्याज देतें, कारण तेथें नफ्याचा प्रश्नच नसतो. त्यामुळें बाजारांत सरकारी रोखे, कंपन्यांचे रोखे, भाग, निरनिराळ्या स्वरूपाचे खरेदी-विक्रीसाठीं येत जात असतात व कांहींपासून ठराविक उत्पन्न तर कांहींपासून मिळणारी प्राप्ति अनिश्चित, असे दोन्ही प्रकार एकाच वेळीं असतात, व ज्याला जसें पसंत पडेल त्याप्रमाणें तो आपली रक्कम गुंतवीत असतो, कर्जाऊ देत असतो. भागावर येणारा नफा हा कमीजास्त होत असतो. उद्योगधंद्यांत गुंतविलेलें भांडवल, त्यावरील नफा हा कमीजास्त होत असतो. पण कोणत्या धंद्यांत किती नफा सुटतो हें काढतां येतें व त्याप्रमाणें नफातोटा पत्रकांत अगर जमाखर्चाचे तक्त्यांत माहिती मिळूं शकते. निव्वळ नफा घेतला तर त्याचें प्रमाण खर्चाशीं काय पडतें हें काढतां येतें, व तें प्रमाण म्हणजे त्या धंद्यांतील नफ्याचा दर; त्या धंद्यांत त्या दरानें प्राप्ति. समजा, धंद्यांतील एका सालांतील उत्पादनाचा खर्च १०० रु. आला व त्याचे विक्रींतून खर्च म्हणजे व्याज, झीज, घसारा, भाडें वगैरे सर्व वजा जातां निव्वळ नफा १० राहिला, तर या धंद्यांत नफ्याचा दर १० टक्के पडला; १० टक्के नफा सुटतो असें म्हणतां येईल. धंद्यांत नफ्याचा दर काय पडतो हें पाहणें महत्त्वाचें आहे, कारण त्यामुळें व्याजाचे दरावर परिणाम होतो. धंद्याला लागणारें, व्यापाराला लागणारें भांडवल हें कसें उभारलें जातें हें वर सांगितलें आहे. भांडवलाची मागणी, कर्जाची मागणी करणारें मुख्य गिऱ्हाईक हे योजक, व्यापारधंदा

करणारे, मोठमोठ्या प्रमाणावर उत्पादन करणारे कारखानदार, हेंच मुख्यत्त्वें असतात. पैसे गुंतविणारें लोक या नफ्याच्या दराकडे पाहून तो कुठें गुंतवावयाचा याचा विचार करीत असतात. ठराविक व्याज देणारे रोखे किंवा भाग यांत ज्यापासून जास्त प्राप्ति होण्याचा संभव असेल तिकडे मनुष्याचा कल साहजिकच असतो व याचा परिणाम असा होतो कीं, त्या धंद्यांत जो नफ्याचा दर असतो, त्या मानानें व्याजाचा दर बसतो. व तेवढा व्याजाचा दर दिल्याशिवाय कर्ज मिळणें कठीण होतें. ज्यावेळीं तेजी होते व नफा वाढत जातो, त्यावेळीं रोख्यांच्या—म्हणजे ठराविक व्याज ज्यापासून येतें त्यांच्या किंमती कमी होतात; याचा अर्थ व्याजाचा दर वाढतो, कारण किंमत कमी झाली तरी व्याज तितकेंच असल्यामुळें दर वाढतो. १०० रु.चा रोखा ३ व्याज देत होता, आतां त्याची किंमत ५० रु. झाली म्हणजे ५० रु.ला ३ व्याज आलें, पण दर ६ टक्के झाला, दुप्पट झाला ! याच्या उलट मंदी झाली, नफा नाहींसा होत चालला, म्हणजे रोख्यांचे भाव वाढतात; पण व्याजाचा दर कमी होतो. १०० रु. चा रोखा १५० रु.ला झाला म्हणजे ३ व्याज हें १५० रु.चें झालें, म्हणजे व्याजाचा दर २ टक्के झाला.

योजकवर्ग ठराविक व्याज देऊन अगर भाग काढून भांडवल उभारीत असतो. ठराविक व्याज देऊन तो किती प्रमाणांत भांडवल उभारील याचा थोडा विचार करूं. समजा, कायम भांडवल म्हणजे इमारती, यंत्रें वगैरे, हें सर्व त्याच्या स्वतःच्या मालकीचें आहे, व जी रक्कम त्यानें कर्जाऊ काढली तिचा उपयोग, कच्चा माल, मजुरांची मजुरी वगैरेकरितां केला. या परिस्थितींत त्याची दृष्टि कशी राहील ? कर्जापासून जें उत्पादन झालें त्याचा खर्च व जास्त उत्पादनापासून येणारें अधिक उत्पन्न यांत मेळ बसेल तरच, कर्ज काढणें योग्य ठरेल. जर उत्पन्नापेक्षां खर्च अधिक असेल, तर त्याला कर्ज काढणें परवडणार नाहीं. समजा, १ हजार रुपये ५ टक्के व्याजानें घेऊन धंद्यांत घातले, व त्यापासून जें उत्पन्न येईल त्याच्यांतून खर्च वजा जातां, १००० रुपये व त्यावरील व्याज ५ टक्क्यानें होईल तें वजा जातां, जर त्याला फायदा राहिला तर कर्ज घेतल्याचें सार्थक झालें. फायदा राहील तोंपर्यंत वरीलप्रमाणें कर्ज काढणें त्याला परवडेल. त्याचप्रमाणें त्याचें जें कायम भांडवल इमारती, यंत्रें वगैरे आहे, त्यांच्यांत जी रक्कम त्यानें गुंतविली असेल, त्यावर हिशेबानें जर चालू व्याजाचे दरापेक्षां जास्त नफा सुटत असला तर, त्या दरानें कर्ज घेऊन, अधिक यंत्रसामग्री घेणें त्याला परवडेल. म्हणजे त्याला जोंपर्यंत नफ्याच्या दरापेक्षां कमी व्याजाचे दरानें कर्ज मिळेल, तोंपर्यंत तें घेणें त्याला परवडेल. कारण तें घेऊन, व्याज देऊन

प्राप्ति होते—फायदा राहतो, म्हणून तें करणें त्याला परवडतें. म्हणजे चालू व्याजाचा दर व नफ्याचा दर, यांच्यांत मेळ बसत जातो. मेळ बसत जातो असें म्हणण्याचें कारण, ही गोष्ट क्षणाक्षणाला घडत नाहीं. तडकाफडकी कर्ज घेऊन यंत्रसामग्री वाढविणें, व उत्पादन वाढविणें शक्य नसतें. त्यामुळें नफ्याचा दर चालू व्याजाचे दरापेक्षां जास्त, पुष्कळ वेळ राहतो, व तसें झालें कीं, लगलीच त्या योजकाच्या अगर योजक कंपनीच्या भागांची किंमत वाढते. ठराविक व्याज देणाऱ्या रोख्यांना विचारणारे थोडे, व जास्त नफा देणारे—डिव्हिडंड रूपानें—भाग घेण्याकडे गिऱ्हाईक वळतें. एखाद्या धंद्यांत नफ्याचा दर जास्त असेल तर लागलीच इतर योजक त्यांत शिरतात; व त्याचा परिणाम स्पर्धेत होऊन तो दर चालू व्याजाचे दराइतका होतो; तसा झाला म्हणजे त्या धंद्यांत भांडवल घालण्यांत कांहीं विशेष स्वारस्य राहत नाहीं. त्याचप्रमाणें वर लिहिल्याप्रमाणें योजकाला कर्ज घेऊन उत्पादन परवडत असेल तर, तो अधिकाधिक कर्ज घेत जातो, व त्यायोगानें व्याजाचा दर वाढतो व शेवटीं व्याजाचा चालू दर व नफ्याचा दर या दोहोंचा मेळ बसतो.

धंद्यांत चढाओढ असली म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें ज्या धंद्यांत नफ्याचा दर जास्त, त्यांत भांडवलवाले शिरतात; त्याचा परिणाम अखेरीस सर्वच धंद्यांत नफ्याचा दर सारखा होण्यांत होतो. कारण एखाद्या धंद्यापासून जास्त नफा होतो असें झालें कीं, तिकडे भांडवल जास्त जाईल; त्या योगानें उत्पादन वाढेल व खूप पुरवठा झाला म्हणजे भाव उतरेल, तो उतरला म्हणजे नफा कमी झाला हें उघड आहे. पुष्कळ घरें झालीं कीं, भाड्याचा दर कमी होतो. पुष्कळ मोटारी झाल्या कीं स्वारीचा दर कमी! तात्पर्य, जिकडे नफा जास्त तिकडे भांडवलाचा ओघ वळतो; भांडवल जास्त झालें कीं उत्पादन वाढलें; ज्या धंद्यांत जास्त उत्पादन त्यांत नफा कमी व शेवटीं सर्वच धंद्यांतील नफा सारखा होऊं लागतो. जेथें चढाओढ नाहीं व मक्तेबाजी आहे तेथें मक्तेदार हा चालू व्याजाचे दरापेक्षां जास्त नफा कसा मिळवूं शकतो हें आपण मागें पाहिलें आहे. त्याच्या धंद्यांत नवीन भांडवल येऊं शकत नाहीं. म्हणून जुन्या भांडवलापासून तो अधिक कमाई करीत असतो. धंद्यापासून काय नफा मिळेल हें अनिश्चित असतें, तथापि साधारणपणें त्यांतून काय नफा मिळेल हें योजक आपल्या योजनापत्रांत दर्शवीत असतात, व पैसे गुंतविणारेहि मनाशीं कल्पना करून, त्याप्रमाणें भाग घेत असतात. नफा होऊं लागला कीं, वर सांगितल्याप्रमाणें भांडवलाचा ओघ तिकडे वळतो, व त्यांत मिळणारा नफा इतर धंद्यांइतकाच करण्यास तो कारणीभूत

होतो. पण त्यांत पैसा गुंतवितांना प्रत्येकाचे मनांत निदान दुसऱ्या धंद्यांत मिळतो इतका नफा तरी निदान मिळेल, ही कल्पना मात्र असतेच.

उत्पादनतंत्र जसें जास्त प्रमाणांत भांडवलशाही स्वरूपाचें होतें, तसतसें जास्त उत्पादन वाढविण्याची शक्ति त्यामध्यें येते. भांडवल वाढवून उत्पादन वाढविणें, हें सहज करतां येण्यासारखें आहे. हजारों योजना या जगांत अशा आहेत कीं, जर बिनव्याजीं भांडवल मिळेल तर उत्पादन कैक पटीनीं वाढवितां येईल. वाहतुकीचीं साधनें मुबलक व सुखावह करतां येतील, झोंपड्यांत राहणाऱ्या गरीबांना हवेशीर घरें बांधून देतां येतील, शहरें चांगल्या पद्धतीनें वसवितां येतील, शेती फायदेशीर करतां येईल, उद्योगधंदे वाढवितां येतील. सर्वांच्या सुखांत व सोयींत भर टाकतां येईल. पण भांडवलशाहींत बिनव्याजीं, बिनमोबदल्यानें भांडवल मागणें म्हणजे तिला आत्महत्या कर, असाच आदेश देणें आहे. हें होणें शक्य नाहीं. म्हणून या शेंकडों योजना उत्पन्न होतात व दरिद्री लोकांच्या मनोरथांप्रमाणें नाहींशा होतात. व्याजाचा दर जो असेल त्याप्रमाणें देऊन, जो भांडवल कर्जाऊ घेण्यास तयार असेल त्यासच तें मिळेल, व यामुळें ज्या योजनांपासून चालू व्याजाचे दराइतका फायदा मिळणार नाहीं, त्या योजना आपोआप गारठतात. फुकट भांडवल मिळणें अशक्य, तथापि भांडवलाला वाटेल तेवढी प्राप्ति मिळते असेंहि नाहीं. पैसा मुबलक झाला किंवा धंद्यांत खूप भांडवल झालें कीं, त्यापासून प्राप्ति कमी होते. कोणत्याही धंद्यांत मागणी किती जरी वाढली तरी, तिला अखेर मर्यादा असते. गिऱ्हाइकांची ऐपत, सामान्य परिस्थिति वगैरे गोष्टी कुठल्याहि उत्पादनाला मर्यादा घालतात हें आपण मागें पाहिलें. त्याप्रमाणें धंद्यांतील मागणी कमाल झाली व त्यानंतरहि त्यांत भांडवल येऊन उत्पादन जास्त होऊं लागलें तर, त्या धंद्यांतील नफा घातलेल्या भांडवलामागें कमी कमी होत जाईल, हें उघड आहे. म्हणून राष्ट्रांत अधिकाधिक भांडवल उद्योगधंद्यांत गुंतविलें जाऊं लागलें म्हणजे त्याचा परिणाम धंद्यांतील नफ्यावर होऊन शेवटीं चालू व्याजाचे दरापर्यंत तो नफ्याचा दर उतरतो. धंद्यांत त्यापेक्षां जास्त प्राप्ति जोंपर्यंत आहे तोंपर्यंत हा भांडवलाचा ओघ तिकडे वळतो. दोन्ही सारखे झाले म्हणजे साहजिक धंद्यांतील धोका पतकरण्यापेक्षां ठराविक व्याजाचा दर पतकरणें, भांडवलवाल्यांस परवडतें. सर्वत्र सर्व धंद्यांत जास्त भांडवल गुंतवलें जाऊं लागलें व त्यायोगें उत्पादन वाढलें व तें तसेंच वाढूं लागलें तर शेवटीं जास्त पुरवठ्यामुळें किंमती उतरतील, व शेवटीं सर्व धंद्यांत नफ्याचे दरहि उतरतील. किंमती उतरूं लागल्या म्हणजे सर्व वस्तूंच्या उतरतात; यंत्रसामग्री वगैरे उत्पादक वस्तूंच्याहि

उतरतात. हें जरी खरें असलें तरी उद्योगधंद्यांत भांडवल जास्त झालें तर त्याचा परिणाम शेवटीं नफा कमी होण्याकडे होतोच. भांडवलाचें दर्शनीं स्वरूप जरी पैसा असलें तरी खरें भांडवल म्हणजे वस्तु, यंत्रें, उत्पादनसंच, कच्चा माल वगैरे, हें आपण जाणतों. कांहीं वस्तु, उत्पादकवस्तु, उत्पादनसाधनें, अशीं असतात कीं त्यांना मर्यादेपलीकडे वाढवितां येत नाहीं व कांहींची वाढ करावयाची म्हणजे त्याबरोबर खर्चहि वाढत जातो. कापडाच्या गिरण्या पुष्कळ वाढविल्या, पण त्याबरोबर कापूस किती वाढेल यालाहि मर्यादा आहे. त्याचप्रमाणें तो वाढला तरी त्याची किंमतहि जास्त उत्पादनाबरोबर वाढेल. कारण पूर्वी जेथें कापसाची लागवड होत नसेल तेथें करावयाची म्हणजे, त्या जमिनींत सुधारणा करावयास पाहिजे, खर्च करावयास पाहिजे; खर्च करावयास पाहिजे म्हणजे त्याचा उत्पादनखर्च वाढला. शिवाय जमिनी तरी मर्यादितच. मुंबईत गिरण्या काढणें अगर अहमदाबादला जास्त गिरण्या काढणें ठरविलें तरी, तेथें जागा मिळणें कठीण व मिळाल्यास भयंकर किंमती द्याव्या लागतील. बुधवारांत दुकानें वाढवावयाचीं मनांत आणलें तरी पेठेंतील जागा मर्यादित. त्यामुळें जास्त भांडवल घालूनहि कांहीं मर्यादा दूर करतां येत नाहींत. समजा, सर्व जमलें तरी वाटेल तेवढें मजूर कांहीं यंत्रानें तयार करतां येत नाहींत. तात्पर्य, वाटेल तेवढें भांडवल पैशाच्या रूपानें गुंतवावयाचें म्हटलें तरी, वर सांगितल्याप्रमाणें उत्पादनाला सर्व धंद्यांत, कमीजास्त प्रमाणांत, मर्यादा आहेत. भांडवल वाढविलें म्हणजे उत्पादनसाधनांत भर पडते, व सर्वच सामग्रींत भर पडली तर उत्पादन वाढेल हें खरें. पण वर सांगितल्याप्रमाणें सर्वच साधनें अगर सर्वच उत्पादक वस्तु वाटेल तेवढ्या वाढत नाहींत. त्यामुळें कांहीं साधनांतच भर पडली तर त्यामानानेंच उत्पादन वाढणार व शेवटीं मर्यादित होणार हेंहि निश्चित. समजा, बुधवारांत दुकानाला जागा मिळाली. पण ती लहान, मग वाढवून वाढवून किती माल त्यांत राहील, हेंहि मर्यादित. मुबलक जागा, वाटेल तेवढा माल, हवीतशी मांडणी, गिऱ्हाइकाला खूष करतील अशा वागणुकीचीं नोकर माणसें, असें सर्वच असेल तर, जास्त विक्री होईल, पण कुठें ना कुठें तरी मर्यादा असते; व त्यामुळें उत्पादनाला मर्यादा येते व नुसतें वाटेल तेवढें भांडवल म्हणजे पैसा असून चालत नाहीं. याचा परिणाम शेवटीं नफ्याचें प्रमाण सर्वत्र कमी करण्याकडे होतो. भांडवल घालून उत्पादनशक्ति वाढवितां येते हें खरें; पण त्याच्या मर्यादा काय हें वर आपण पाहिलें. त्यामुळें कमी भांडवल घालून जास्त नफा मिळविणें पुष्कळ वेळां घडून येतें. जास्त भांडवल घालून नफ्याचें प्रमाण कमी करून घेण्यापेक्षां कमी भांडवल

घालून नफ्याचें प्रमाण जास्त ठेवणें बरें. पण भांडवलवाले स्वस्थ बसत नाहींत, एकंदर भांडवल वाढतच असतें व अल्लाउद्दिनाचे राक्षसाप्रमाणें त्याला कांहीं तरी काम द्यावें लागतें. नवीन शोध लागत असतात, नवीन यंत्रें तयार होत असतात, त्यांचा उपयोग करून उत्पादन वाढविण्याचा उद्योग, भांडवलशाही जगांत सारखा चालू असतो. म्हणून ज्यामानानें भांडवलाला मागणी व ज्यामानानें भांडवलाचा पुरवठा असेल, त्यामानानें व्याजाचा दर देऊन, तें उपयोगांत आणलें जातें.

भांडवलाचा पुरवठा जसा असेल तसा व्याजाचा दर राहील. जिकडे जास्त नफा मिळण्याचा संभव तिकडे भांडवलाचा ओघ वळतो वगैरे गोष्टींचा विचार केला. पण हा भांडवलाचा पुरवठा कसा होतो हें आपण पाहूं. व्यक्ति अगर बँका योजकांना, कंपन्यांना, भांडवल पुरवतात, कर्जें देतात; पण त्यांना तरी हा पैसा कोण पुरवतो ? बँकांत लोक ठेवी ठेवतात हें खरें, पण हा तरी पुरवठा कसा होतो हें समजणें जरूर आहे. मनुष्य आपली सर्व प्राप्ति खर्चून टाकतो असें नाहीं. समजा, एका इसमास ५० रु. दरमहा प्राप्ति आहे, त्याच्या चालू गरजा भागवून त्याच्याजवळ रु. १० शिल्लक राहतात. त्याला हे १० रुपये सुद्धां खर्च करणें शक्य आहे; पण त्याला त्याची अवश्यकता वाटत नाहीं. पुढें केव्हां गरज पडेल तेव्हां हे १० रुपये खर्च करतां येतील. म्हणून हे १० रुपये तो शिल्लक टाकतो. हे १० रुपये त्याला अनेक रीतींनीं गुंतवितां येतील. समजा, तो साधा कारकून आहे व त्याला हिशेबनीस व्हावयाचें आहे तर तो हिशेबनिसाचा अभ्यासक्रम शिकेल, त्याबद्दल त्याला द्यावी लागणारी फी या शिलकेंतून देईल व अभ्यास पुरा करून परीक्षा देऊन हिशेबनीस होईल. यामुळें त्याची प्राप्तिहि अर्थातच वाढेल. तो जर कारागीर असेल तर आपली लायकी आणखी वाढवावी म्हणून जास्त शिक्षण रात्रीच्या शाळेंत घेऊन, त्याला लागणारा खर्च या शिलकेंतून करून, तो आपली लायकी वाढवील व पुढें आपली प्राप्ती पण वाढवील. या दृष्टीनें त्यानें खर्च केला तर त्यानें एक प्रकारें आपलें भांडवल वाढविलें असें म्हणतां येईल. त्यानें आपली उत्पादनशक्ति वाढविली असेंहि म्हणतां येईल. कारण पूर्वींपेक्षां तो आतां जास्त मिळवूं शकतो, हें उघड आहे. माणसें जर पूर्वींसारखीं विकतां येत असतीं तर, या आपल्या इसमाची किंमत पूर्वींपेक्षां जास्त झाली असती!! याप्रमाणें त्यानें आपल्या किंमतींत भर न टाकतां शिल्लक रक्कम—रोकड त्यानें घरांत ठेवली असती तर त्या १० रु. चे १० रु. च राहिले असते! पेटींत रकमेची वाढ होत नाहीं. तेथेंच ती रक्कम पडून राहिली असती. त्यानें आपल्या खोलीसाठीं चांगली सतरंजी घेतली व त्यांत शिल्लक खर्च केली.

सतरंजी १० वर्षें टिकेल असें धरलें तर ह्या १० रुपयांचा उपभोग दरसाल १ रु. प्रमाणें तो सतरंजीचे रूपानें घेतो असा त्याचा अर्थ झाला. तो दरमहा १० रु. शिल्लक टाकूं शकतो, हे १० रु. विम्याची पॉलिसी घेण्यांत त्यानें गुंतविले तर, २० वर्षांनीं एकदम ३००० रुपये मिळविण्याची तजवीज त्यानें केली. त्यानें ही रक्कम पोस्टांत ३ टक्के व्याजानें टाकली अगर एखाद्या कंपनीचा भाग खरेदी केला तरी त्याचा अर्थ पुढील गरजेकरितां, भावी उपयोगाकरितां त्यानें ही व्यवस्था केली असाच होतो. बाजारांत मनुष्य गेला म्हणजे नाना वस्तु पाहतो. मनुष्य आपल्या पसंतीप्रमाणें व ऐपतीप्रमाणें घेत असतो, तसेंच आपली शिल्लक मनुष्य आपल्या पसंतीप्रमाणें ऐपतीप्रमाणें गुंतवीत असतो. मग ती पसंती टिकणाऱ्या सतरंजीचे रूपानें असो, अगर भाग खरेदीचे रूपानें असो. ज्याप्रमाणें मनुष्याचा हेतु वस्तु घेतांना त्या वस्तूपासून जास्तींत जास्त समाधान व्हावें असा असतो तसाच तो येथेंहि असतो. सतरंजी घ्यावी का १० रु. देऊन भाग घ्यावा, याचा निकाल तो आपल्या पसंतीप्रमाणें आपल्या ऐपतीप्रमाणें, आपल्या परिस्थितीचा विचार करूनच ठरवील. चार स्नेही येतात त्यांना जमिनीवर बसविणें बरें नाहीं म्हणून तो सतरंजी घेईल. जर त्याला असें वाटलें कीं, चार माणसें येऊन, चकाट्या पिटतात त्यांत कांहीं प्राप्ति नाहीं, उलट १० रु. च्या भागापासून सालअखेर १ रुपया ८ आणे मिळाले तर तेवढाच भाजीपाल्याला उपयोगीं पडेल, तर तो भाग घेईल. तात्पर्य, त्याच्या समाधानाच्या दृष्टीनें व सोईच्या दृष्टीनें तो वागेल.

शिकण्यास खर्च करणें, टिकाऊ वस्तु घेणें अगर पेटींत अगर बँकेंत ती शिल्लक ठेवणें ह्या निरनिराळ्या गोष्टी एकाच गोष्टीपासून घडल्या. सदरहू इसमानें आपलें उत्पन्न सर्व चालू गरजांवर खर्च न करतां त्यांतून कांहीं 'वांचविलें' म्हणून वरील गोष्टी शक्य झाल्या. सर्व खर्च न करण्यांत, सर्व उत्पन्न न उधळण्यांत त्यानें 'कळ' काढली, अगर 'संयम' दाखविला अगर 'त्याग' केला म्हणूनच हें झालें. कारण सर्वच्या सर्व रक्कम आज उडवून चैन करतां आली असती, ती त्यानें केली नाहीं हा एक त्यागच त्यानें केला पण हा त्याग लोकांकरितां नव्हे, तर जी गोष्ट आज करतां येण्यासारखी होती ती त्यानें पुढें ढकलली, पण तिचा मालक तोच राहिला. आजच्या संयमामुळें उद्यांची शक्ति त्यानें निश्चित केली. मी माझी प्राप्ति सर्व खर्च करीत नाहीं, शिल्लक टाकतों, शेअर्स घेतों, घरें घेतों याचा अर्थ, मी आज संयम दाखवून माझ्या मुलाबाळांची व्यवस्था करतों, त्यांच्याकरितां सोय करतों, हाच होतो. तथापि जेव्हां मी शेअर्स घेतों, रोखे घेतों अगर बँकेंत पैसे ठेवतों तेव्हांच मी भांडवलाचा पुरवठा

करतो. म्हणून जेव्हां शिल्लक अशा रीतीनें उपयोगांत आणिली जाते तेव्हां ती भांडवलाचा पुरवठा करण्याचे कामीं उपयोगी पडते.

राष्ट्रांत माणसें आपली शिल्लक म्हातारपणीं उपयोगी पडावी, अडचणीचे वेळीं उपयोगीं पडावी, आपल्या मागें मुलाबाळांची सोय व्हावी म्हणून व्याजीं लावून गुंतवितात; पण किती गुंतवितील हें त्यांच्या पुढील काळांतल्या गरजा व व्याजाचा दर यांवर अवलंबून राहतें. समजा, एका गृहस्थाला सालाची १ हजार रुपये प्राप्ति होते व त्याचा सालिना होणारा खर्च ७०० रु. पर्यंत जातो. ही ३०० रु. ची शिल्लक तो ४ टक्के व्याज देणाऱ्या सरकारी रोख्यांत गुंतवितो व त्याला दुसऱ्या वर्षापासून १२ रु. व्याज मिळूं लागतें. या ३०० रु. चा विनियोग त्यानें अशा रीतीनें केला, याचा अर्थ त्याला जेवढे खर्च करावयाचे होते तेवढे खर्च केले व जेवढे शिल्लक टाकावयाचे होते ते टाकले, व ते टाकतांना दरसाल १२ रु. येत जातील व ते उपयोगी पडतील, या सर्वांचा मेळ घालून त्यानें आपलें वर्तन व वांटणी कायम केली. जर त्याला आणखी खर्च करण्याची अवश्यकता असती तर, ७०० रु. पेक्षां जास्त खर्च केला असता; त्याचप्रमाणें जास्त शिल्लक टाकणें अवश्य वाटत असतें तर ३०० रु. पेक्षां जास्त टाकले असते. पण ज्याअर्थीं त्यानें ही वांटणी केली त्याअर्थीं या दोहोंपासून होणारें समाधान व उपयोग यांचा मेळ त्यानें बसविला. त्याचें उत्पन्न एक हजारांपेक्षां कमीजास्त झालें असतें अगर व्याजाचा दर कमीजास्त झाला असता तर अर्थात् त्यानें चालू खर्च व भविष्याकरितां शिल्लक, यांत निराळा मेळ बसविला असता. आज ३०० रु. शिल्लक टाकून पुढील वर्षास १२ रु. मिळतील व सालोसाल ते वाढत जातील हें लक्षांत घेऊनच तो वागला. मनुष्य जर चालू गोष्टींवर जास्त खर्च करूं लागला तर त्याचा अर्थ त्याला शिलकेचें तितकेसें महत्त्व वाटत नाहीं. पुढें होणाऱ्या उपयोगापेक्षां चालू घडींत होणारा उपयोग त्याला जास्त महत्त्वाचा व जास्त उपयुक्त वाटतो. प्रत्येकाला वाटणारें महत्त्व हें सर्वस्वीं त्याच्या ऐपतीवर, परिस्थितीवर अवलंबून राहील; व जे जास्तींत जास्त सोईचें असतें, त्याप्रमाणें तो वागून, चालू खर्च व शिल्लक यांची वांटणी करीत असतो; हें करतांना तो व्याजाच्या दराचाहि विचार करतो. कारण त्यावरून आपलें पुढील उत्पन्न कसें राहील याचा अंदाज तो घेत असतो. तो शिलकेचा विनियोग रोखे, भाग, बँक, यांपैकीं कोठें तरी ती ठेवून करीत असतो, व तसें करतांना व्याजाचा दर हा त्याचा मार्गदर्शक असतो असें म्हटलें तर ते योग्य होईल. मनुष्य अमुक उत्पन्न असले तर अमुक शिल्लक ठेवील, अगर अमुक व्याजाचा दर असला तर अमुक शिल्लक ठेवील, असें निश्चितपणें

कोणी सांगूं शकणार नाहीं. कांहीं लोक कंजुषमामा असतात, खर्च अगदीं कमी करीत असतात. तर कांहीं माणसें उधळी असतात व वाटेल तसा खर्च करतात. कांहीं पोटालासुद्धां न खातां बँक बुकाचेंच पोट अगर पेटीचें पोट शिल्लकेनें भरीत असतात, तर कांहींचें पोट, कधींही पोट न भरणाऱ्या दुर्वासऋषीची आठवण करून देतें. मनुष्य आपल्या उत्पन्नांतून किती खर्च करील व किती सांचवील हें त्याच्या स्वभावावर व परिस्थितीवर अवलंबून राहील. मनुष्य, त्याची प्राप्ति वाढत जाणारी असेल तर कमी शिल्लक टाकील. पेन्शन मिळणार असेल तर शिल्लक टाकण्याकडे कमी प्रवृत्ति; पण जर पुढें म्हातारपणीं कांहीं मिळणार नाहीं अशी स्थिति असेल तर, शिल्लक टाकून कांहीं तजवीज करावी याकडे जास्त प्रवृत्ति. एकटा जीव असेल तर चैन करून रहावें असें वाटणें स्वाभाविक, उलट, घरांत मुलेंबाळें असतील, प्रजापरिषद असेल तर त्यांच्या शिक्षणासाठीं, लग्नकार्यासाठीं शिल्लक टाकण्याकडे प्रवृत्ति असणें हेंहि स्वाभाविक.

एखादा मनुष्य पुष्कळ खर्च करीत असला तरी जर त्याची मिळकत खूप असेल तर त्याची शिल्लकहि मोठ्या प्रमाणांत राहणें शक्य आहे. श्रीमंत मनुष्य खूप खर्च करून-सुद्धां त्याजजवळ पैसा शिल्लक राहतोच व तो मोठ्या प्रमाणांत असतो. एक हजार रु. मासिक उत्पन्न असणाऱ्या माणसाचा खर्च जाऊन जी शिल्लक राहील, ती ५० रु. पगार असणाऱ्या माणसाचे शिलकेपेक्षां खास जास्त असेल. हिंदुस्थानांतील लोकांचें उत्पन्न दरसाल माणशीं ७५ रु. आहे व आज हिंदुस्थानांतील लोकांच्या ज्या ठेवी बँकांत आहेत, त्यांचें प्रमाण घेतलें तर, माणशीं ७ रुपये पडतें. उलट अमेरिकेंत माणशीं उत्पन्न दरसाल १३३५ रु. इतकें, ठेवी १३७८८ कोटी रुपये इतक्या, व त्यांचें प्रमाण माणशीं सुमारें ९०० रु. इतकें पडतें. यावरून ज्यांचें उत्पन्न जास्त ते जास्त शिल्लक टाकूं शकतात हें स्पष्ट होतें. मनुष्याच्या गरजा किती जरी वाढल्या तरी, त्या भागवून श्रीमंत मनुष्य पैसा शिल्लक टाकूं शकतो. समाजांत जेथें गरीब व श्रीमंत या वर्गां-तील अंतर मोठें आहे, तेथें जास्त पैसा शिल्लक टाकला जाणें स्वाभाविक आहे. जेथें गरीब खूपच गरीब आहेत तेथें ते कांहींच शिल्लक टाकूं शकत नाहींत; जे खूप श्रीमंत आहेत त्यांना खूप शिल्लक टाकतां येते. त्यामुळें श्रीमंत आणखी श्रीमंत होत जातात, भांडवल जास्त प्रमाणांत वाढून थोड्या लोकांचे हातांत जातें. राष्ट्रांतील उत्पन्न जर सारखें वांटलें गेलें किंवा निदान त्यांतील विषमता कमी झाली तर राष्ट्रांतील दर-सालची एकंदर शिल्लक कदाचित् कमी होईल, पण दुःखहि कमी होईल; व समा-जांतील लोकांना जास्त न्याय मिळेल. तात्पर्य, जास्त प्राप्ति असणारी माणसें जास्त

शिल्लक टाकतात. त्याचप्रमाणें व्याजाचा दर जास्त असेल तर व्याजाचे आशेनें माणसें जास्त शिल्लक टाकतील, असें होणें शक्य आहे. कांहीं माणसें अगदीं हिशोबी असतात. कांहींची वागणूक अगदीं नियमित असते. तीं आपल्या उत्पन्नांतून ठराविक रक्कम शिलकेंत टाकावयाचींच. कांहीं माणसें जर व्याजाचा दर चांगला असेल तर, जास्त शिल्लक टाकतात, कारण त्यांना पुढील काळाकरितां उत्पन्न तयार करून ठेवावयाचें असतें. बँकांचाहि अनुभव असाच आहे कीं व्याजाचा दर वाढविला कीं ठेवी जास्त येतात. म्हणजेच माणसें शिल्लक जास्त टाकतात.

ज्याप्रमाणें माणसें आपलें सर्व उत्पन्न खर्च न करतां अडचणीचे वेळीं उपयोग व्हावा म्हणून त्यांतील कांहीं शिल्लक टाकतात, तशीच गोष्ट मोठमोठाल्या व्यापारी व उद्योगधंदा करणाऱ्या कंपन्या करीत असतात. सालअखेर जो निव्वळ नफा राहील तो सर्वच्या सर्व भागीदारांना वांटीत नाहींत, तर त्यांतील कांहीं भाग बाजूला काढून म्हणजे शिल्लक ठेवून, त्यांतून अधिक यंत्रसामग्री घेतात, तें भांडवल म्हणून धंद्यांत घालून त्याचा व्याप व विस्तार वाढविण्यांत खर्च करतात. जर बहुसंख्यांक भागीदारांना हें पसंत नसलें तर असें करीत नाहींत; पण असें क्वचितच होतें. ज्याला हें धोरण पसंत नसतें तो आपले भाग खुशाल विकूं शकतो. तात्पर्य, भांडवलशाहींत मर्यादित जबाबदारीच्या कंपन्या मोठ्या प्रमाणावर उत्पादन करीत असतात, व त्याहि आपलें उत्पन्न सर्वच खर्च न करतां त्यांतून कांहीं शिल्लक टाकून भांडवल वाढवीत असतात. सरकारहि त्याच दृष्टीनें लोकांकडून करानें रकमा घेऊन, रस्ते, कालवे, बंधारे, इमारती वगैरे बांधून राष्ट्रांतील भांडवल हातीं असलेल्या शिलकेंतून वाढवीत असतें. शिक्षण, शोध यांच्याकडे खर्च करून होणारी ही वाढ, याच स्वरूपाची म्हणणें गैर नाहीं. मात्र हें सरकार लोकमतानें चालणारें पाहिजे, म्हणजे या गोष्टींत स्वारस्य आहे. परकी सरकारहि रस्ते करतें पण त्यावरील चाल गुलामीची. परकी सरकारहि कालवे बांधतें पण त्यांपासून होणारें पीक माणसांना निर्जीव करतें. तेंहि सरकार शिक्षण देतें, पण त्यापासून आत्मज्ञान होऊन स्वाभिमान बाणण्याऐवजीं सेवकवृत्ति उत्पन्न होऊन हांजीहांजीपणाच वाढतो.

वरील विवेचनांत शिल्लक म्हणजे उत्पन्नांतून सर्व खर्च वजा जाऊन जी ऐन शिल्लक राहते ती असा अर्थ धरला. खर्चांत भांडवलावरील व्याज, झीज वगैरे सर्व गोष्टींचा समावेश होतो. कारण कंपन्या ज्यावेळीं नफातोटापत्रक करतात त्यावेळीं, देणें घेणें पत्रक तयार करतात त्यावेळीं व्याज, घसारा, झीज या गोष्टी खर्च खातीं टाकतात व नंतरच ऐन नफा काढतात; व मग त्यांतून कांहीं भाग पुनः वर

सांगितल्याप्रमाणें धंद्यांत, भांडवल म्हणून टाकून, तो वाढवितात. घसारा, झीज वगैरेकेरितां जर रक्कम खर्ची टाकली नाहीं तर कांहीं दिवसांनीं तो उत्पादनसंच निरुपयोगी होईल. त्याप्रमाणें करण्यास कोणालाहि मोकळीक आहे. एखादा मनुष्य रोख्यांच्या येणाऱ्या व्याजांतून खर्च भागवतो व रोखे कायम ठेवतो; त्याला वाटलें तर रोखेसुद्धां विकून तो सर्व मिळकत नाहींशी करूं शकेल. भांडवल कायम ठेवून उत्पादनावर राहणें, अगर भांडवल अगर ऐन मुद्दल विकून सुद्धां मोकळें होणें, ज्याच्या त्याच्या इच्छेवर अवलंबून आहे. घरभाडें येईल त्यांतून घरदुरुस्ती वगैरे करून, तें कायम ठेवणें व उत्पन्न खात राहणें हा एक मार्ग, अगर घर विकून टाकून जी रक्कम येईल त्यावर राहणें हा दुसरा मार्ग. यांतून कोणता स्वीकारावा हें ज्याचें त्यानें ठरवावयाचें असतें. व्यवहारांत माणसांना सर्व उत्पन्न खर्च करावयाचें कां कांहीं शिल्लक टाकावयाचें, हें जसें ठरवावें लागतें तसेंच नुसत्या उत्पन्नावर रहावयाचें कां ऐन मुद्दल, ऐन भांडवल पण खर्च करावयाचें हेंहि ठरवावें लागतें. कारण पुष्कळ वेळां भांडवल कायम ठेवण्याचा, दुरुस्तीचा वगैरे खर्च करून, रोजच्या खर्चाला पुरेसें उत्पन्न राहत नाहीं. तात्पर्य माणसें ज्याप्रमाणें शिल्लक टाकीत असतात त्याप्रमाणें त्यांच्याकडून भांडवलाचा पुरवठा होत जातो.

देशांत पैशाचा मोठा व्यवहार करणाऱ्या संस्था म्हणजे बँका. हिंदुस्थानांत मर्यादित जबाबदारीवर नोंदलेल्या बँका ९०० वर आहेत. त्यांचेकडे १९४३ सालीं ८७७ कोटी रु. ठेव म्हणून होते. बँका सगळीच रोकड आपलेजवळ ठेव म्हणून ठेवीत नाहींत. कायद्यानें त्यांना कांहींएक ठराविक रक्कम रोखींत ठेवावी लागते. पण सर्वसाधारणपणें ठेवीच्या रकमेच्या १० टक्के रक्कम रोख ठेवतात व बाकीची रक्कम बँका कर्ज देऊन गुंतवीत असतात. सरकारी अल्प मुदतीच्या हुंड्या, नामवंत व्यापाऱ्यांच्या हुंड्या, उद्योगधंद्यांतील योजकांना कर्ज देणें, जातीवर रकमा उचल करूं देणें वगैरे प्रकारांनीं बँका रकमा गुंतवीत असतात. एवढेंच नव्हे तर हातांत पैसा खेळता असल्यामुळें बँकांना त्यांच्याजवळ असलेल्या ठेवीपेक्षां सुद्धां जास्त कर्ज देतां येतें. त्यांची पत त्या मोठ्यां प्रमाणांत वाढवूं शकतात. समजा एका व्यापाऱ्याला बँकेनें १ लाख रु. कर्ज दिलें. सदरहू कर्ज त्यानें कच्चा माल वगैरे घेण्यांत खर्च केलें; अर्थात् तो व्यापारी ही सर्व रक्कम कांहीं उचलून घरीं नेत नाहीं. त्याच बँकेंत ती ठेवून त्यावर चेक काढीत असतो. कच्चा माल विकणाऱ्या ज्या पेढ्या आहेत, त्यांनीं हे चेक वटवून प्रत्यक्ष रक्कम न घेतां त्याच बँकेंत आपल्या खातीं जमा केले, तर रक्कम कोणीहि न उचलतां १ लाख रु. कर्ज बँकेनें दिलें, व ही पत बँकेनें उत्पन्न

केली. ज्या वेळीं कच्च्या मालाचे व्यापारी त्यांना माल विकणाऱ्यांना चेक देतील, त्या वेळीं बँकेनें रक्कम देऊन ते वटविले म्हणजे झालें. पुनः शेतकरी ज्यानें कच्चा माल पुरविला त्याला पैसे मिळाले, त्यालाहि पण खत, अवजारे वगैरे सामान घ्यावें लागतें, व तें विकणारे लोक पुनः शिलकी पैसा बँकेंत टाकतात. ज्याप्रमाणें जगांत माणसें सारखी जन्मतात व मरतात, त्याचप्रमाणें बँकेचे सृष्टींत पैसा मिनिटामिनिटाला येत असतो व जात असतो. बँकेला जरूर त्या वेळीं रोकड देण्याची खात्री असते म्हणून, बँका मोठ्या प्रमाणांत कर्ज देत असतात, पत वाढवीत असतात. बँका रोख्यांतूनहि रकमा गुंतवितात. पण जर कर्ज घेणारे असतील, तर त्यांना कर्ज देण्यास व पत देण्यास म्हणजे अमूक एक रकमेपर्यंत उचल करूं देण्यास तयार असतात. बँकेचा व्याजाचा दर कमी झाला तर कर्ज घेण्यास पुष्कळ तयार होतात. तसेंच बँका ऋणकोकडून कांहीं तरी तारण मागतात, मग तें तारण स्थावर मिळकत, सरकारी अगर खाजगी रोखे, भाग अगर सोनें, जवाहीर असो, किंवा लायक जामीन असो. या तारणाच्या बाबतींत बँकेनें जरा ढिलाईचें धोरण ठेवलें तर कर्ज घेणारे जास्त कर्ज घेण्यास तयार होतात. समजा, एका व्यापाऱ्यास १ लाख रु. कर्ज पाहिजे आहे, त्यानें आपली स्थावर मिळकत तारण म्हणून देण्याची तयारी दाखविली. बँक म्हणणार स्थावरापेक्षां सोनें, रोखे हे जास्त चांगलें; कारण त्यांची विक्री करून रोकड तेव्हांच तयार करतां येते. शिवाय स्थावरांत नाना भानगडी, कोणाचे हक्क, दावासंबंध असावयाचे, पुनः विक्री करावयाची म्हणजे कोर्टदरबार आले! अशा स्थितींत व्यापाऱ्याला कर्ज मिळणें कठीण होतें. पण बँकेनें स्थावर तारणावर सोय केली तर ताबडतोब पुष्कळ लोक या रीतीनें तारण देऊन कर्ज घेतील. त्याचप्रमाणें धंदा तेजींत असला, व्यापारांत नफा जास्त मिळण्याची आशा असली कीं, जास्त दरानें सुद्धां कर्ज घेणारे असतात. सामान्यतः बाजारांत तेजीचें वातावरण झालें म्हणजे बँकांचें व्यवहार वाढतात. लोकांना बँका कर्ज व पत जास्त प्रमाणावर देत असतात. पैशाचा पुरवठा योजकांना, व्यापाऱ्यांना सारखा लागतो. बँका हा पुरवठा सारखा करीत असतात, व तो होत असल्यामुळें नवीन पैसा, नवीन भांडवल व्यवहारांत येत जातें.

बँका जेव्हां आपल्याजवळ असलेल्या ठेवीपेक्षां जास्त कर्ज देतात व पत वाढवितात तेव्हां त्याचा अर्थ नवीन पैसाच ते उत्पन्न करीत असतात. त्यामुळें व्यवहारांत पूर्वी असलेल्या पैशापेक्षां जास्त पैसा होतो, पैशाचा पुरवठा जास्त होतो व त्यामुळें त्याचा परिणाम वस्तूंचे भावावर होतो—किंमतीवर होतो. व्यवहारांत जास्त पैसा झाला

म्हणजे पदार्थांच्या किंमती वाढतात व पैसा कमी झाला म्हणजे किंमती कमी होतात हें आपण पूर्वी पाहिलें आहे. लंकेंत सोन्याच्या विटा, पण नुसती एक शेर भाजी घ्यावयाची तरी सोन्याची वीट द्यावी लागते हाच न्याय येथें लागू होतो. त्याचप्रमाणें व्यवहारांत पैसा वाढला कीं उद्योगधंद्यांत भांडवल जास्त येतें, त्यामुळें उत्पादन वाढतें व त्याबरोबर पुष्कळ साधनसामग्री व माणसें जीं कामाला कमी येत होतीं अगर बेकार होतीं, तीं पूर्णपणें काम देऊं लागतात, बेकारी कमी होते. कांहीं मर्यादेपर्यंत उत्पादन वाढत असतांना पदार्थांच्या किंमतीहि थोड्याशा वाढतात; कारण सर्व वातावरण तेजीचें असतें. पण समाजांतील उत्पादनशक्ति शंभर टक्के काम देऊं लागली, व बहुतेक लोक काम मिळून काम करूं लागले म्हणजे परिस्थिति थोडीशी निराळी होते. अशा परिस्थितींत जर आणखी पैसा व्यवहारांत आला तर मात्र पदार्थांचे भाव झपाट्यानें वाढतात. बँका आणखी कर्ज देऊं लागल्या म्हणजे धंद्यांत जास्तजास्त भांडवल येऊं लागतें. योजक, उद्योगधंदा वाढविण्याचे दृष्टीनें यंत्रसामग्री वगैरे उत्पादक वस्तूंची खरेदी जास्त करूं लागतात. त्याचा परिणाम त्या त्या वस्तूंच्या किंमती वाढतात, व त्या वस्तु उत्पन्न करणारे धंदे वाढतात. त्या धंद्यांतील मजुरांची मजुरी वाढते, मालकांचा नफा वाढतो. कारखाना वाढवावयाचा म्हणजे इमारती पाहिजेत, नव्या इमारती म्हणजे लांकूड, लोखंड, चुना, सीमेंट, विटा यांना जास्त मागणी म्हणून त्यांचा भाव वाढतो. त्याचप्रमाणें सुतार, मजूर, गवंडी यांचीहि मजुरी वाढते. नवीन यंत्रें पाहिजेत म्हणजे यंत्रें तयार करणाऱ्या कारखान्यांना जास्त काम, त्याबरोबर यंत्रांच्या किंमतीहि वाढतात व त्यांतील काम करणाऱ्या मजुरांची, कारागिरांची मजुरी पण वाढणार. जरी प्रथम साधनसामग्रींत–उत्पादक वस्तु घेण्यांत जास्त पैसा खर्च होत असला तरी त्याचा परिणाम जास्त मजुरी मिळण्यांत व जास्त लोकांना काम मिळण्यांत होतो. त्यांना मिळणारा हा पैसा पुनः चालू गरजेच्या वस्तु घेण्यांत उपभोग्य वस्तु घेण्यांत, खर्चिला जातो; त्यामुळें याहि वस्तूंच्या किंमती वाढतात. उत्पादन वाढवावयाचें म्हणजे, भांडवलस्वरूपी–यंत्रें वगैरे वस्तूंचा भाव प्रथम वाढतो. त्यामुळें त्या वस्तूंच्या धंद्यांतील मजुरांना जास्त मागणी व जास्त मजुरी मिळते. मजूर आपली मिळकत रोजच्या उपयोगाला लागणाऱ्या वस्तु, धान्य, कपडा वगैरे घेण्यांत खर्च करतात, त्यामुळें त्या वस्तूंचा भावहि जास्त वाढतो. तात्पर्य, उत्पादक व उपभोग्य, दोन्ही वस्तूंचे भाव वाढतात. ज्यांची मिळकत, प्राप्ति ठराविक असते उदा०, पगारदार लोक, त्यांचे मात्र, भाव चढले म्हणजे हाल होतात. कारण भाव वाढल्याबरोबर पगार वाढत नाहीं, म्हणून त्यांना आपल्या गरजा कमी कराव्या लागतात. युद्धामुळें महागाई

झाल्याबरोबर मजुरीचे दर वाढले, पण पगारवाढ मात्र झाली नाहीं. उलट बाजारभाव कमी झाले कीं लगेच मजुरी कमी होते, पण पगार कमी होत नाहींत हेंहि विसरतां कामा नये. व्यवहारांत जास्त भांडवल वाढूं लागलें कीं, भांडवलस्वरूपी वस्तूंना, उत्पादक वस्तूंना, मागणी जास्त, म्हणून त्यांचें उत्पादन वाढतें. तें ज्या प्रमाणांत वाढतें त्या प्रमाणांत उपभोग्य वस्तूंचें उत्पादन वाढत नाहीं. सर्व उत्पादनतंत्र जास्त जास्त भांडवलशाही स्वरूपाचें होत जातें. व हा सर्व परिणाम बँकांनीं वाटेल तेवढें कर्ज देऊन, पत देऊन व्यवहारांत पैसा मुबलक केला, भांडवल मुबलक केलें म्हणजे होतो. व्यक्तींनीं जास्त रकमा वांचवून शिल्लक वाढविली नाहीं, सरकारनेंहि तसें कांहीं केलें नाहीं, केवळ बँकांनीं पैशाचा पसारा वाढविला, पत वाढविली कीं असा परिणाम होतो हें विसरतां कामा नये. या बाबतींत भांडवलशाहींत बँकांवर नियंत्रण नाहीं, सरकार सहसा हस्तक्षेप करीत नाहीं हेंहि सत्य डोळ्यांआड करतां येत नाहीं.

बाजारभाव वाढले म्हणजे लोकांना आपल्या चालू गरजा कमी कराव्या लागतात, त्यामुळें चालू गरजा भागविणाऱ्या वस्तूंची, उपभोग्य वस्तूंची, मागणी कमी होते. तर उलट वर म्हटल्याप्रमाणें भांडवलस्वरूपी वस्तूंची, उत्पादक वस्तूंची मागणी त्या मानानें वाढते. योजकवर्ग कर्ज घेऊन धंद्यांत जास्त जास्त भांडवल घालीत असतो, धंदा वाढविण्याकडे, त्याचा व्याप व विस्तार करण्याकडे, त्या कर्जाचा विनियोग करतो. म्हणून त्याला अवश्यक असणाऱ्या म्हणजे उत्पादक वस्तूंचा, यंत्रें, अन्य साधन-सामग्री यांचा भाव वाढतो. पत व पैसा व्यवहारांत वाढल्यामुळें शेवटीं सर्वत्रच भाव वाढतात हें खरें. पण बँका पत वाढवून वाढवून किती वाढवतील, पैशाचा पसारा किती वाढवितील ? या वाढविण्यालाहि सीमा आहेतच. सर्वत्र सरसहा किंमती वाढूं लागल्या तर त्याचा परिणाम राष्ट्रांतील चलनांवर होतो. चलन म्हणजे राष्ट्राच्या पतीचें निशाणच होय, तें खालीं झालें तर दुर्लौकिक, म्हणून चलनाला धक्का बसेल अशी परिस्थिति मात्र सरकार होऊं देणार नाहीं. तसेंच बँकांना मागें सांगितल्या-प्रमाणें कांहीं तरी रोकड तयार ठेवावी लागते. बँकेकडे जास्त जास्त ठेवी येऊं लागल्या म्हणजे रोकडीचें प्रमाण कमी होतें. १ लाख ठेवी असतांना जर दहाहजार रोकड बँक ठेवीत असेल व १० लाख ठेवी झाल्या तर १ लाख रोकड ठेवील तर हें प्रमाण अर्थात् ठेवीच्या मानानें कमी म्हणून हातांत असलेल्या रोकडीचे मानानें बँकांना पत वाढवितां येईल, कर्जे देतां येतील. कारण त्यांना ठेवीदार रकमा परत मागतील त्या वेळीं, त्या दिल्या पाहिजेत ही दक्षता घ्यावी लागते. त्याचप्रमाणें कर्ज-दारांचे चेक जसें येतील तसें वटविण्याचीहि व्यवस्था त्यांना करावयाची असते. म्हणून

बँका त्या धोरणानेंच वागत असतात. त्यांचेजवळ जर कोणी मुबलक रोकड आणून दिली तर त्या केव्हांहि आपला पसारा वाढविण्यास तयार होतील. परंतु व्यवहारांत पैसा वाढूं लागला कीं लोक पैशाऐवजीं वस्तूंची साठवणूक करण्याकडे वळतात; कारण पैशाची किंमत कमीजास्त होण्याचा संभव असतो. पैसा सारखा वाढत गेला तर वस्तूंच्या किंमती वाढतील व सर्वत्र महागाई होईल. त्यामुळें मजुरीचे दर वाढतील, पगारवाढ होईल, व पुनः पैशाची कमतरता होईल, पुनः पैसा वाढवितां आला नाहीं तर त्याचा धंद्यावर परिणाम होईल. योजकवर्ग, ज्यानें उद्योगधंदे वाढविण्याचे दृष्टीनें कर्ज काढून उत्पादनांत भांडवल घातलें, त्याला नुकसान होईल. कारण सर्वच वस्तूंचे भाव वाढले! शेवटीं हें तेजीचें वातावरण खलास होऊन, सर्वत्र धांदल, हाहाःकार उडतो हें दृश्य अनुभवाला येत असतें! म्हणून बँका आपल्या पतीचा व पैशाचा पसारा या दृष्टीनें मर्यादित करतात. भांडवलशाहींत बँकासुद्धां नफ्याकरितांच असतात. त्यामुळें समाजाची योग्य गरज भागविणें हा त्यांचा प्रधान हेतु नसतो. भांडवलाचा पुरवठा करण्यांत समाजाचें हित किती, हें त्या पाहत नाहींत, तर त्यापासून त्यांना किती नफा मिळेल हें पहात असतात. तथापि कोठल्याहि कां हेतूनें होईना भांडवलाचा पुरवठा, उत्पादनाला—व्यापाराला लागणारें कर्ज पुरविण्याचें काम बँका करीत असतात.

व्यवहारांत व्यक्ति व बँका वर लिहिल्याप्रमाणें जरूर असलेलें भांडवल, कर्ज, व्यक्तींना व व्यापारधंद्याकरितां योजकांना पुरवितात. व्याजाचा दर कसा बदलत जातो व एकाच वेळीं व्याजाचे दरांत कां फरक पडतो, याचें विवेचन यापूर्वीं आलेच आहे. जर व्याजाचा दर हा एकच असता तर मागणी व पुरवठा या नियमानें जशी वस्तूंची किंमत ठरते, त्याचप्रमाणें कर्जाला मागणी व पुरवठा जसा राहील त्यामानानें व्याजाचा दर राहिला असता. व्यापार व उद्योग यांना किती भांडवल लागेल हें आपण काढलें व खाजगी व्यक्तींना चालू गरजा भागविण्याकरितां किती कर्ज लागेल हें काढलें तर, या दोहोंचे बेरजेपासून समाजांत किती कर्जाची, किती भांडवलाची जरूरी आहे, हें आपणाला कळेल. आणि जर बँका आपली पत वाढवून पैशाचा पसारा वाढवीत नाहींत असें धरलें तर, समाजांत जेवढी प्रत्यक्ष शिल्लक असेल, मग ती व्यक्तीजवळ असो अगर बँकांत ठेव म्हणून असो, ती पुरवठा म्हणून आपणास मानतां येईल. आणि या मागणी व पुरवठ्यांत जसा बदल होईल त्यामानानें, व्याजाचा दर राहील. व्याजाचा दर जास्त झाल्यास पुरवठा जास्त होईल, लोक व्याजाचे आशेनें जास्त शिल्लक टाकतील. व्याजाचा दर कमी झाल्यास शिल्लक

टाकण्याची प्रवृत्ति कमी होईल, व त्यामुळें पुरवठाहि कमी होईल. व्याजाचा दर हा मागणी व पुरवठा यांच्यांत मेळ घालण्याचेंहि काम करतो. किंबहुना भाव, ज्याप्रमाणें वस्तूंच्या मागणी व पुरवठ्यांत समभाव उत्पन्न करून आपण स्थिर राहतो, हें मागें पाहिलें, तीच गोष्ट व्याजाचा दर करीत असतो. व्याजाचे दरांत एकाच वेळीं कां फरक पडतो हें पूर्वी आपण पाहिलेंच आहे; त्याचप्रमाणें बँका पत वाढवून पैशाचा पुरवठा प्रत्यक्ष शिलकेपेक्षां कसा वाढवितात, हेंहि आपण पाहिलें आहे, व त्यामुळें व्याजाचे दरांवर काय परिणाम होतो हेंहि पाहिलें पाहिजे. योजक उद्योगधंद्याकरितां, व्यापाराकरितां भांडवल बँकांकडून कर्जाऊ घेत असतात, कारण त्यांना नफा मिळविण्याची आशा असते, व ही आशा ज्या मानानें असेल —नफ्याचा दर काय पडेल—यावर व्याजाचा दर अवलंबून राहतो. व्याज देऊन कांहीं तरी फायदा राहात असेल तरच योजक कर्ज काढून धंद्यांत भांडवल घालील. म्हणजे व्याजाचा दर व नफ्याचा दर यांचा मेळ असेपर्यंत तो योजक कर्ज घेत राहील. व्याज देऊन जर कांहीं नफा राहत नसेल तर व्यर्थ उद्योग तो करणार नाहीं.

योजकाकडून जें व्याज मिळण्याचा संभव असतो त्याच दरानें इतरांना म्हणजे खाजगी व्यक्ति अगर ज्यांना चालू कामासाठीं खर्च करावयाचा आहे त्यांना, कर्ज घ्यावें लागतें. नफ्याचा दर ज्या मानानें असेल त्या मानानें व्याजाचा दर असल्या-मुळें, नफ्याचा दर सुद्धां एकंदर धंद्यांतील भांडवलाची मागणी व पुरवठा यावर अव-लंबून असतो. धंद्यांत लागणारें बरेंचसें भांडवल, कंपन्या आपल्या नफ्यांतून कांहीं नफा बाजूला काढून पुरवितात हें मागें पाहिलेंच आहे. म्हणजे ज्यांनीं प्रथम भाग घेऊन भांडवल पुरविलें तेच पुनः त्यांतूनच आणखी भांडवल पुरवितात, हा त्याचा अर्थ आहे. शिलकेंतून आणखी शिल्लक निघते असें या घटनेचें स्वरूप आहे. समजा, एखाद्यानें बँकेंत ठेव ठेवली अगर विमा उतरविला अगर डिबेंचर्स घेतलीं तरी त्याचाच पैसा, भांडवलाचा पुरवठा करीत असतो; मग तो पुरवठा बँकेमार्फत, विमा कंप-नीच्या मिळकतीमार्फत अगर अन्य दलालामार्फत असो. इकडून तिकडे अशी पैशाची सारखी ये जा चालू असते व मूळ ऐन रकमेंत भर न पडतां त्याचा पसारा वाढत जातो व भांडवलाचा पुरवठा कसा होत जातो, हें पाहण्यासारखें असतें. वस्तुतः पुरवठा वाढला नसतांना तो वाढला जातो व त्यामुळें व्याजाचे दर निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळे राहतात.

जेव्हां खरोखर पुरवठा कमी होतो त्यावेळीं व्याजाचा दर वाढतो, किंवा जास्त मागणी आली म्हणजे तो वाढतो. लोक खरोखर शिल्लक कमी टाकूं लागले म्हणजे

बँकांतील ठेवी कमी होतात, त्याबरोबर त्यांचे पत वाढवून पैसा वाढविण्याचे खेळहि कमी होतात, त्यामुळें एकंदर पैशाचा पुरवठा कमी होऊन व्याजाचा दर वाढतो. अतिवृष्टि झाली अगर पाऊसच पडला नाहीं, त्यामुळें पीक बुडालें अगर व्यापार बसला, उद्योगधंदे मंदावले म्हणजे उत्पादन आंकसतें. त्याबरोबर लोकांची प्राप्ति कमी होते व प्राप्ति कमी झाली कीं लोकांना चालू घडी भागविणें कठीण होतें, मग शिल्लक टाकणें लांबच राहिलें! तसेंच राजकीय वातावरण अस्थिर झालें, पुढें काय होईल याची शाश्वती वाटेनाशी झाली कीं, लोक बँकांतून असलेली शिल्लक काढून ती नुसती सांचवून ठेवतात! अशा अनेक कारणांनीं पैशाचा पुरवठा कमी होतो. उलट बाजारांत तेजी झाली कीं पैशाची मागणी वाढत जाते, युद्ध सुरू झालें म्हणजे तर, मागणी मोठ्याच प्रमाणांत वाढते. लोकसंख्येच्या वाढीबरोबरहि मागणी वाढणें स्वाभाविक आहे. नवीन शोध लागले, नवीन पद्धतीनें उत्पादन करणें फायद्याचें वाटूं लागलें कीं, पुनः पैशाकरितां मागणी वाढते. उत्पादनांत नफा होण्याचा संभव असला कीं, पैशाची मागणी वाढावयाची; अशा अनेक कारणांनीं मागणी वाढली म्हणजे व्याजाचा दरहि वाढतो.

व्याजाचा दर सर्वसामान्यतः वाढला म्हणजे त्याचे निरनिराळे परिणाम होतात. कच्च्या मालाचा व्यापार करणारे दलाल, त्याचप्रमाणें उत्पादनांतील अपूर्ण भाग विकणारे लोक, यांना फार दिवस माल सांठवून ठेवणें परवडत नाहीं, कारण व्याज जास्त भरावें लागतें म्हणून ते माल काढूं लागतात, व त्यामुळें असल्या मालांच्या किंमती उतरतात. तसेंच हळु हळू उत्पादनसंच व सामग्री नवीन तयार होणें थांबतें, कारण व्याजाचा दर वाढला कीं नफा होणें जास्त कठीण होतें. तसेंच घरें बांधण्याकडे लोकांचा कल कमी होतो कारण भाडें वाढत नाहीं. घरांत पैसा गुंतविण्यापेक्षां जास्त व्याज अन्यत्र मिळतें म्हणून तिकडे गुंतविला जातो. एकंदर व्याजाचे दरांत वाढ झाली कीं साहजिक इतक्या वाढत्या दरानें घेणारेहि पण कमी होतात. व्याजाचा दर कमी झाला तरी वाटेल तेवढी रक्कम कोणी कर्जाऊ घेत नाहीं. वाढतें व्याज देऊन धंदा करणें परवडत असेल तरच योजक कर्ज काढतील. त्याचप्रमाणें जरी व्याजाचा दर कमी झाला असला तरी, धंद्यांत भांडवल घालून नफा राहत असेल तरच योजक कर्ज घेतील. मंदींत व्याजाचा दर कमी होतो पण नफ्याची आशा नसते. बँका जेव्हां पत वाढवून पैसा वाढवितात तेव्हां कमी व्याजाचा दर असला तरी त्याचा परिणाम ताबडतोब होत नाहीं. कांहीं वेळां यामुळें सरकारी व अन्य रोखे व डिबेंचर्स यांच्या किंमती वाढतात; कारण त्यांवरचा व्याजाचा दर जास्त सुटत असतो. पुष्कळ वेळां

व्याजाचा दर कमी असला म्हणजे स्थावरांत रक्कम गुंतविण्याकडे प्रवृत्ति होते. कारण येणारें भाडें, व्याजाचे दरापेक्षां थोडें जास्त असतें. बांधकामें जोरानें सुरू होतात. जेथें बांधकाम करण्याच्या मंडळ्या असतात त्या या संधीचा फायदा घेऊन आपला कार्यक्रम जोरानें अंमलांत आणतात. त्यांना कमी व्याजानें रकमा मिळत असतात व येणारें भाडें त्या मानानें चांगलें येतें. पैसा मुबलक झाला म्हणजे व्याजाचा दर कमी होतो. लोक जास्त शिल्लक टाकूं लागले म्हणजे चालू गरजांवर खर्च कमी करतात. त्यांची शिल्लक समाजांतील भांडवलाचा पुरवठा वाढविते. त्याचा फायदा योजकांना कमी व्याजानें भांडवल मिळण्यांत होतो. योजक हें अधिक भांडवल धंदे वाढविण्यांत म्हणजे यंत्रसामग्री, उत्पादनसंच वगैरे भांडवलस्वरूपी वस्तूंत, खर्च करतात व त्यामुळें एकंदर उत्पादनशक्ति वाढते, उत्पादनतंत्र जास्त भांडवलशाही स्वरूपाचें होतें. ही क्रिया चालू असतां मजुरांचा भाव वाढतो, त्यांची मजुरी वाढते. धंद्याची वाढती मांडणी पुरी झाली, आणि उत्पादन वाढून तें बाजारांत येऊं लागतें, वस्तूंच्या किंमती कमी होतात, त्याचा फायदा सर्वांना मिळतो. जर या सर्व गोष्टी होत असतांना, चलनांत ढवळाढवळ झाली, तर मात्र त्याचा परिणाम निराळा होईल. व्याजाचा दर हा भांडवल-शाहींतील एक शक्ति आहे. त्याचा परिणाम उत्पादनावर, समाजांतील जीवनावर कसा होतो हें आपण पाहिलें. व्याजावर जगणारे लोक भांडवलशाहींत महत्त्वाचें स्थान धरून आहेत; धंद्यांत पडून धोका पतकरून नफा मिळविणारे योजक 'उद्योगसूत्रधार' हेहि त्यांचेच आप्त आहेत. कधीं काळीं ताब्यांत आलेल्या जमिनी खाजगी मालकीच्या झाल्या, व त्यांवर कष्ट न करतां केवळ उपयोग करूं देण्याबद्दल मिळणारा खंड घेऊन अखंड चैन करणारे जमीनदारपुत्र यांचेंहि गोत्र तेंच. किंबहुना या तिघांचें एकत्र कुटुंब असून खरा हितविरोध त्यांच्यांत नसून कोणालाहि त्यांपैकीं फायदा झाल्यास सर्वांना तो मिळतो. भांडवलशाहींतील हे तीन शिलेदार, सर्व सुखें, सर्व संपत्ती, सर्व सत्ता हातांत घेऊन सरकारला आपल्या हितसंरक्षणाचे पहारेकरी बनवतात. समाजां-तील संस्था, समजांतील संस्कृति त्यांच्या इशाऱ्याबरहुकूम काम करते. हे सर्व एका बाजूस व बाकी सर्व समाज दुसऱ्या बाजूस असे दोन भाग समाजांत पडतात. जसजसें उत्पादन जास्त जास्त भांडवलशाही स्वरूपाचें होतें, तसतसा हा फरक जास्त पडत जातो. त्याचे परिणाम काय होतात हें जग जाणून आहेच. आपणहि त्याचा थोडा विचार पुढें करूं. आपण व्याज व त्याची करामत पाहिली, पुढील भागांत, खंड व त्याची करामत पाहूं.

---

# १७. खंड

व्याजाचा विचार करतांना मनुष्य जें कर्ज घेतो त्याबद्दल त्यास कर्ज देणाराला जें भाडें द्यावें लागतें त्याला आपण व्याज असें म्हटलें आहे. १०० रु. एक वर्षभर वापरले म्हणून त्याबद्दल किंमत (व्याज) ३ अगर ४ रु. देऊन व घेतलेले १००रु. परत दिले म्हणजे तो व्यवहार पुरा झाला. समजा, एक घर राहण्यास घेतलें व त्याबद्दल—घराचा उपयोग केला त्याबद्दल—दरमहा ३०रु. द्यावयाचे, म्हणजे उपयोगाची दरमहा किंमत द्यावयाची; त्यास आपण भाडें म्हणतो. मालकाचें घर मुदत संपतांच खालीं करून द्यावें लागतें. घर कायम आहे व चांगल्या स्थितींत आहे तोंपर्यंत त्यास कमीजास्त भाडें मिळणार. जरी तें रिकामें राहिलें तरी, त्याची हें उत्पन्न देण्याची शक्ति कमी झाली असें नव्हे तर, उपभोग घेणारा कोणी नाहीं म्हणून रिकामें हाच त्याचा अर्थ आहे. मालक वर्षाचे बोलीनें अगर जास्त मुदतीनें कुळास जमीन वहिवाटीकरितां देतो व त्याबद्दल दरसाल किंमत म्हणून रोकड अगर उत्पन्नाचा भाग घेतो. याचा अर्थ कूळ त्या जमिनीचा जो उपयोग करतें, त्याबद्दल त्याला किंमत म्हणून कांहीं तरी द्यावें लागतें, त्याला खंड म्हणतात. खंड म्हणजे एखाद्या वस्तूची तिच्या उपयोगाबद्दल ठराविक मुदतीनें द्यावी लागणारी ठराविक किंमत. मग ती वस्तु जमीन असो, घर असो, थिएटर असो अगर नांगर असो. कारण नांगरसुद्धां भाड्यानें देतात. बैलजोड्या भाड्यानें देतात. खेडेगांवांतून हें नेहमीं चालू असतें. आइस्क्रीम तयार करण्याचें भांडेंसुद्धां भाड्यानें देतात, हाहि अनुभव आहे. हे भाडें पैशांत घेतलें जाईल अगर वस्तूच्या स्वरूपांतहि घेतलें जाईल. मी कुळाला जमीन देतों व करार करतों कीं, त्यानें सालअखेर मजला १० मण ज्वारी अगर ३० रु. द्यावेत. जशी पद्धत असेल त्याप्रमाणें खंड, त्या त्या स्वरूपांत दिला जातो. एका शेतकऱ्यानें दुसऱ्यास नांगराकरितां बैल जोडी दिली, त्याबद्दल तो शेतकरी कडबा देईल, धान्य देईल अगर स्वतःची बैलजोडी पहिल्याला जमीन नांगरण्याचे वेळेस देईल. तात्पर्य खंडाचें स्वरूप करारांत जसें ठरेल अगर जशी वहिवाट असेल त्याप्रमाणें राहील.

जमीन, अगर घर भाड्यानें दिलें म्हणजे जमीनमालक अगर घरमालक यांना ठरल्याप्रमाणें ठराविक रक्कम कुळाकडून अथवा भाडेकऱ्यांकडून मिळण्याचा हक्क असतो. जसा एखाद्यानें सरकारी रोखा घेतला म्हणजे दरसाल ठरलेलें व्याज त्याला मिळण्याचा अधिकार असतो, त्याचप्रमाणें, या घरमालकाची व जमीनमालकाची स्थिति असते. मालक व कूळ यांच्यांत करार होऊन दरसाल द्यावयाची खंडाची रक्कम निश्चित असते, व त्या कराराप्रमाणें दोघांना वागावें लागतें. सालोसाल तीच परिस्थिति राहत नाहीं. भाव बदलत असतात. मजुरीचे दर कमीजास्त होत असतात. खंडचिठ्ठीचे वेळीं असलेला भाव कायम राहत नाहीं, तथापि करारांतील मुदत संपेपर्यंत मालकाला, कूळ काढतां येणार नाहीं; उलट लागवड परवडेनाशी झाली तरी कुळाला ठरलेला खंड द्यावा लागतो, व जमीन सोडावयाची असल्यास नुकसानीहि द्यावी लागते. करारांतील मुदत संपतांच, मालक आणि कूळ पुनः करार करतात; नव्या शर्तीवर करार करतात. मालक दुसरें कूळ घालतें, कूळ दुसरी जमीन बघतें. बाजारभाव तेजींत असेल तर खंडाची रक्कम वाढेल, मंदींत असेल तर कमी होईल. तात्पर्य, जमिनीचे उत्पन्नाची किंमत जशी बाजारांत येईल त्या मानानें खंड कमीजास्त होईल. समजा, एका भातजमिनींत २ खंडी भात येतें व त्याची किंमत ६० रुपये भावानें १२० रु. होते; खंड ४० रु. ठरला आहे असें समजूं. पुढें भाव कमी झाला व २ खंडीचे ८० रुपये आले, तर कूळ ४० रु. खंड देण्यास तयार होणार नाहीं. फार तर २५ रु.पर्यंत देईल. उलट भाव वाढला व २ खंडी भाताचे १६० रुपये आले तर, मालक ४० रु. खंडावर संतुष्ट होणार नाहीं, कांहीं तरी जास्त मागेल. तात्पर्य, जें ऐन उत्पन्न पैशांत जमिनीचें येत असेल त्या मानानें खंड राहील. कोठल्याहि वस्तूंचें भाडें, या दृष्टीनें तिच्या ऐन उत्पन्नाचे मानानें राहील. मग त्या वस्तूंचें स्वरूप कांहींहि असो. आणि जर ही वस्तु वाढवितां येण्यासारखी असेल म्हणजे तींत भर टाकतां येण्यासारखी असेल तर, त्या वस्तूला जो खर्च लागला असेल त्यावर चालू दरानें जें व्याज येईल, त्या मानानें त्या वस्तूला भाडें मिळेल. उदाहरणार्थ, एक बंगला बांधला, त्याला १० हजार रुपये प्लॉट सुद्धां खर्च आला. आजच्या व्याजाचे दरानें ४ टक्क्यानें या दहा हजाराला दरसाल ४०० रु. व्याज आलें असतें म्हणून त्या बंगल्याचें वार्षिक भाडें ४०० रुपयांचे आंतबाहेर राहील; कारण बंगला ही वस्तु अशी आहे कीं त्यांत भर घालतां येण्यासारखी आहे; जर हजार आठशें भाडें येऊं लागलें तर इतर पैसेवाले नवीन बंगले बांधतील, कारण नुसती रक्कम व्याजीं गुंतविली तर, ४ टक्क्यापेक्षां जास्त दरानें व्याज येत नाहीं. शेवटीं बंगले खूप झाले म्हणजे

भाडें, व्याजाच्या दराचे मेळांत येईल. भाडें व्याजाच्या मेळापेक्षां कमी येऊं लागलें तर पैसेवाले घरें बांधणार नाहींत. पुनः रकमा व्याजीं लावतील, व पुनः व्याजाचा दर व भाडें यांचा मेळ बसेल. पण वर सांगितल्याप्रमाणें वस्तूंत भर घालतां आली पाहिजे तर हें होईल; पण जर वस्तूंत भरच घालतां येत नसेल, अगर त्या वस्तूंचें रूपान्तर सुद्धां करतां येत नसेल, तर मात्र त्या वस्तूंला तिच्या उपयोगाबद्दल येणारें भाडें अगर खंड, यांचा व्याजाचे दराशीं कांहीं संबंध राहणार नाहीं. वस्तूंचें प्रमाण स्थिर आहे, त्यांत कमीजास्त कांहीं होत नाहीं, अगर वस्तूंचा एकच एक उपयोग आहे, तिचें रूपांतर होत नाहीं, दुसऱ्या कामाकडे तिचा उपयोग करतां येत नाहीं; त्यावेळीं त्या वस्तूंला एक प्रकारें मक्तेबाजीचें स्वरूप येतें, व तिला मिळणारी किंमत अगर खंड तिच्या योग्यतेचे मानानें अधिक असतो. हें अधिक महात्म्य, ती वस्तु कमीजास्त होत नाहीं, रूपान्तरित करतां येत नाहीं यामुळेंच आहे.

आपण असें समजूं कीं, एक जमीन आहे व तींत भाताशिवाय दुसरें पीकच निघत नाहीं, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका जमिनींत भाताचें पीक निघत नाहीं. पहिल्या जमिनींतील प्रत्येक एकरामागें १ खंडी भात निघतें असें धरलें तर, या जमिनीचें वार्षिक उत्पन्न, म्हणजे जें भात निघेल त्याची किंमत होय. आणि भाताला जी मागणी असेल त्यावर त्याची किंमत अवलंबून राहील. एका जमिनींत फक्त भातच पिकतें व दुसरींत भात पिकत नाहीं, या स्थितींत सालोसाल किती भात उत्पन्न होईल हेंहि साधारणपणें कायम. कारण खूर पिकले तरी त्याला मर्यादा आहे. जास्त पीक आलें तर त्याचा फायदा जमीन मालकाला होईल किंवा नाहीं हें बाजारांतील मागणीवर अवलंबून राहील. मागणी वाढली तर मालकांना फायदा अधिक होईल; मागणी पूर्वींइतकीच राहिली तर, पुरवठा जास्त झाला म्हणून भाव कमी होऊन, मालकाचें नुकसान होईल; पण मागणी वाढली व मालकांना जास्त फायदा झाला तर त्याचा अर्थ मालकांना कांहींहि अधिक श्रम न करतां तो झाला. तसेंच पुरवठा जास्त झाल्यामुळें मागणी कमी झाली तर तोटा मालकांचाच हेंहि येथें ध्यानांत घेतलें पाहिजे. त्याचें मुख्य कारण इतर जमिनींत भात पिकत नाहीं हे आहे. लोकांनीं भांडवल घालावयाचें मनांत आणले तरी कांहीं उपयोग नाहीं, म्हणून चढाओढ नाहीं. भात-जमिनींत भर पडूं शकत नाहीं; या स्थितींत जो फायदा किंवा तोटा झाला तो खरोखर वाजवीपेक्षां जास्त झाला हें उघड आहे. जर दुसऱ्या जमिनींत भाताचें पीक काढणें शक्य असतें तर, त्यांत भांडवल घालून मालकांनीं मजूर लावून भात उत्पन्न केलें असतें, व त्यामुळें कोणालाच अधिक फायदा झाला नसता. मागणी वाढली कीं

जास्त उत्पादन व्हावयाचें, या नियमानें सर्व व्यवहार झाला असता, व गिऱ्हाइकाला आपल्या मागणीच्या द्वारें काय पाहिजे, किती पाहिजे हें ठरवितां आलें असतें. पण भातजमिनींत भर टाकतां येत नाहीं असें आहे म्हणून, हा अधिक फायदा ज्यांच्या त्या जमिनी आहेत त्यांना या उदाहरणांत मिळतो. म्हणून खंड म्हणजे नुसत्या उपयोगाबद्दल भाडें हा सरळ अर्थ न करतां, खंड म्हणजे ज्या वस्तूंचा पुरवठा कमीजास्त करतां येत नाहीं, ज्यांचें प्रमाण स्थिर आहे व ज्या वस्तूंच्या उपयोगांत रूपान्तर करतां येत नाहीं त्या वस्तूंना, याच कारणामुळें मिळणारें भाडें अगर किंमत हा अर्थ समजला पाहिजे. यांत वाजवीपेक्षां अधिक फायदा मिळतो, ही वस्तुस्थिति विसरतां कामा नये. वरील उदाहरणांत जर भातजमिनींत दुसरें पीक होत असतें तर, तें मालकांनीं केलें असतें व होणारें नुकसान टाळलें असतें; त्याचप्रमाणें इतर जमिनींत भाताचें पीक होत असतें तर, मालकांनीं भांडवल घालून, पीक काढून, वाढत्या भावाचा फायदा घेतला असता. पण हें होत नाहीं म्हणून, जें या उदाहरणांतील भातजमिनींना मिळतें, जें वाजवीपेक्षां जास्त मिळतें; या प्राप्तीला आपण खंड म्हणूं.

आपण वर विशिष्ट प्राप्तीला खंड अशी संज्ञा दिली आहे. ज्या वस्तूंना असा खंड येतो, त्या वस्तूंचें प्रमाण स्थिर आहे, त्यांचा पुरवठा कमीजास्त होत नाहीं. अगदीं मागणी शून्य झाली तरी तोच पुरवठा, अगर अगदीं खूप वाढली तरी तोच पुरवठा. धान्याला खूप भाव आला म्हणून जमीन कांहीं वाढत नाहीं, किंवा भाव पडला म्हणून जमीन कमी होत नाहीं. अमुक भाव झाला म्हणजे पुरवठा वाढेल असें जें आपण सामान्यपणें वस्तूंच्या बाबतींत पाहिलें, तें या स्वरूपाच्या वस्तूंना लागू नाहीं. भावाचा पुरवठ्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. त्याचप्रमाणें सरकारनें कर बसवून या वस्तूंचें सर्व उत्पन्न हस्तगत केलें तरी, त्यांच्या पुरवठ्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं, कारण तो स्थिर आहे. भाव वाढला तर या वस्तूंचें उत्पन्न वाढेल पण पुरवठा वाढणार नाहीं. त्यामुळें जो परिणाम वाढत्या पुरवठ्यानें भावावर होतो, तो येथें होणार नाहीं. सर्व वाढत्या भावाचा फायदा ऐन जिनसीं त्या वस्तूंचे मालकांना मिळतो. त्याचप्रमाणें खंड अगर फायदा वाढला म्हणूनहि या वस्तूंचा पुरवठा मालकांना वाढवितां येत नाहीं. प्रत्यक्ष व्यवहारांत काय होतें, तें आपण पाहूं. कोणत्या वस्तु या स्वरूपाच्या आहेत ? जमिनींना कोणत्या स्वरूपांत या अर्थानें खंड मिळतो ? जमीन ही मर्यादित पण ती कोणत्या अर्थानें मर्यादित आहे, हें आपण समजून घेऊं.

(१) विशिष्ट कामाला उपयोगी येणारी जमीन. उदा०, भातजमीन, बागायती जमीन, अगर गांवठाण जमिनी, कीं ज्यांचा उपयोग इमारती बांधण्यासाठीं होतो

(२) जगांतील एकंदर जमीन,(३) एखाद्या देशांतील, विशिष्टभूभागांतील अगर जिल्ह्यांतील जमीन, असे साधारण तीन प्रकार कल्पितां येतात. विशिष्ट उपयोगाच्या जमिनींत फेरबदल करून रूपांतर करतां येतें. जगांतील जमीन कांहीं वाढणें शक्य नाहीं. तथापि महत्त्वाची गोष्ट म्हणजे एखाद्या भागांतील जमीन ही केव्हांहि निश्चित असते व तींत दुसरीकडून आणून भर टाकतां येत नाहीं. हीच गोष्ट आपल्या विवेचनाला अत्यंत महत्त्वाची आहे. प्रथम विशिष्ट उपयोगाच्या जमिनीचा विचार करूं. कापसाला भाव वाढूं लागला म्हणजे कापसाचे लागवडीस जास्त जमीन येऊं लागते. शेंगदाण्याला अगर गळिताचे धान्याला भाव येत चालला म्हणजे शेतकरी भुसार मालाऐवजीं, तीं धान्यें लावतात. त्यांचे भाव पडून, भुसार मालाला भाव येत चालला तर पुन्हा भुसार माल लावतात. अर्थात् कांहीं जमिनी अशा असतात कीं, त्यांत वाटेल तो बदल होऊं शकत नाहीं. उदा०, सोलापूर, नगर जिल्ह्यांत कांहीं भातजमिनी तयार करतां येणार नाहींत, या अर्थानें भातजमिनीचा पुरवठा वाढत नाहीं हें खरें आहे. उलट, वाढत्या शहरांजवळ असणारी शेतजमीन भाव येऊं लागला कीं बिगर शेतीचे उपयोगांत आणतां येते. याप्रमाणें विशिष्ट जमिनीचे पुरवठ्यांत भर टाकतां येते, व जेथें ही टाकणें शक्य आहे व जेथें हें होतें तेथें, या जमिनींना मिळणारें भाडें वाजवी राहील; कारण वस्तूंत भर घालणें शक्य आहे, चढाओढ शक्य आहे, व त्या कारणामुळें, ज्या अर्थानें आपण खंड याची व्याख्या केली आहे, त्या अर्थानें तेथें जमिनींना खंड मिळणार नाहीं. जगांतील जमीन ही कायम आहे त्यांत वाढ होणार नाहीं हें उघड आहे. जगांत लोकसंख्या वाढत आहे व ती पुढें अशाच प्रमाणांवर वाढत राहिली तर साहजिक जमिनीला मागणी वाढणार, कारण जीवनाला अवश्यक म्हणजे धान्यादिक वस्तु, त्या जमिनींतूनच होत असल्यामुळें जमिनीला भाव वाढेल, त्याचा परिणाम जमिनीचे मालकांचें उत्पन्न वाढण्यांत होईल. उलट जगांतील लोकसंख्या, युद्धामुळें, रोगांचे सांथीमुळें घटत गेली तर जमिनीची मागणी कमी होईल, व मालकांना फायदा कमी राहील. जगांतील जमिनींत भर घालतां येत नाहीं याचा फायदा मालकांना मिळणार. कांहीं ठिकाणीं समुद्र हटवून जमीन करण्यांत आली आहे. उदा०, मुंबईत बॅकबे जवळ; पण ही भर म्हणजे खंडींत रती इतकीसुद्धां नाहीं. आणि त्याला झालेला खर्च लक्षांत घेतां डोळे पांढरेच व्हावयाचे ! शिवाय जरी अशी गोष्ट स्वस्तांत करणें शक्य झालें तरी, जमिनीच्या किंमती तेथें येवढया वाढतील कीं, नवीन जमीन काढणें परवडणार नाहीं, आणि हा अनुभव अन्य देशांत आलाहि आहे.

जगांतील जमीन जरी वाढवितां आली नाहीं तरी, तिच्यांत होणाऱ्या उत्पादनाचें प्रमाण तरी वाढवितां येईल कीं नाहीं हेंहि पाहिलें पाहिजे. शास्त्रीय शोध, नवीन तऱ्हेचीं खतें, नवीन पद्धतीचें बीं वगैरे सुधारलेल्या साधनांचा उपयोग करून जमिनीची पैदास वाढविणें शक्य झालें आहे. तथापि यालाहि एक मर्यादा आहे. ज्या मानानें हें करण्यास खर्च लागतो त्या मानानें, उत्पन्न येतेंच असें नाहीं. थोड्या मर्यादेपर्यंत ही सुधारलेली शेती परवडते. शिवाय वाढून वाढून उत्पन्न किती वाढेल, यालाहि नैसर्गिक मर्यादा आहे. मनुष्याला ताकद येण्यासाठीं, वजन वाढण्यासाठीं खुराक लावला तरी त्याला कांहीं हत्तीची ताकद येणार नाहीं. बेडूक फुगला तरी बैल होणार नाहीं. जमिनीची पैदास याच दृष्टीनें मर्यादित आहे. वाटेल तेवढें भांडवल, खत वगैरे रूपानें त्यांत ओतलें तरी एका मर्यादेपलीकडे जमिनीचें उत्पन्न वाढणार नाहीं, आणि फायदा होत असेल तरच, मनुष्य जास्त भांडवल घालण्यास तयार होईल; व फायदा होतो, याचाच अर्थ जमिनीच्या मालकांना मिळणारा फायदा वाजवीपेक्षां जास्त मिळतो हाच होतो. हा फायदा खंड स्वरूपाचा आहे. शेतीच्या मालकांना भाव वाढला म्हणजे कांहीं होणारें ऐन जिनसी उत्पादन, होणारा माल वाढत नाहीं, त्याची पैशांत होणारी किंमत वाढते. १० टक्के धान्याचा भाव वाढला म्हणजे त्या प्रमाणांत मालकाचा फायदा वाढला. म्हणजे त्या जमिनी-पासून त्याला मिळणारा खंडच वाढला; तो अधिक अधिक होत जाईल. वाढत्या किंमतीचा सर्व फायदा खंड स्वरूपाचा राहणार, कारण जमिनींत भर घालतां येत नाहीं किंवा तिचें उत्पन्न—पैदास हीहि कांहीं मर्यादेपलीकडे वाढवितां येत नाहीं.

वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, जमीन ही कांहीं जास्त होत नाहीं. तिच्या पैदाशीचीहि वाढ मर्यादेपलीकडे होत नाहीं, त्यामुळें मागणीबरहुकूम पुरवठा न झाल्यानें किंमती वाढतात, व त्यांचा फायदा मालकांना मिळतो. तो वाजवीपेक्षां जास्त असल्यामुळें तो खंड स्वरूपाचा आहे. मात्र विशिष्ट उपयोगाच्या जमिनीचा पुरवठा कमीजास्त होतो, हें वर आपण पाहिलें आहे. बाजारभाव कमी-जास्त झाले म्हणजे त्याला अनुसरून निरनिराळीं पिकें शेतकरी काढतात, पण त्या-योगानें एकंदर जमीन वाढत नाहीं अगर कमी होत नाहीं. हिंदुस्थानांत कापसाला सारखी वाढती मागणी असल्यामुळें, कापसाचे लागवडीची जमीन वाढत चालली आहे. त्याचप्रमाणें गळिताच्या धान्यांची लागवडहि जास्त प्रमाणांत होत आहे. तथापि त्यापासून फायदा होतो म्हणून कोणी नवीन भांडवल घालूं म्हटलें तरी त्याला जमीन ही पाहिजेच व ती किती हें ठरलेलें आहे. बँकेंत लाखों रुपये असले

तरी, कापूस कांहीं त्या बँकेचे बोर्डाचे बैठकीचे खोलींत होणार नाहीं; आणि या मर्यादेमुळें जमिनीचे मालक जो फायदा मिळवितात, तो खंड स्वरूपाचा असतो. कोणी अशी शंका काढील कीं मजुरांची संख्यासुद्धां मर्यादित नाहीं का ? मग त्यांना वरील सिद्धांत लागू कां होऊं नये ? कोणत्याहि क्षणाला काम करणाऱ्या स्त्रीपुरुषांची— मजुरांची संख्या निश्चित असते हें खरें. पण मजुरीचे दर वाढल्याबरोबर एकदम मजुरांची संख्या वाढेल असेंहि नाहीं किंवा दर कमी झाले तर ती घटेल असेंहि नाहीं. मनुष्याच्या ऐपतीचा आणि लोकसंख्येचा फारसा संबंध नाहीं हें आपण मागें पाहिलें आहे. जमिनीचा उपयोग बदलतां येतो, तसेंच मजुराला शिक्षण देऊन त्याला निराळा धंदा, निराळी कला शिकविणें शक्य आहे. हें जरी सर्व खरें असलें तरी, मजुराचे मजुरीला ' खंडाचें ' स्वरूप येऊं शकत नाहीं. जमीन उचलून इकडची तिकडे नेतां येत नाहीं. समजा, पुण्यांत केळीच्या पानाला भाव आला, तरी किती जमीन त्या कामाला उपयोगी आहे, हें निश्चित आहे. माळशिरसची माळरान जमीन पुण्यास आणतां येणार नाहीं. किंवा दूरदेशीं होणारीं पानें येथें विकणें परवडणार नाहीं ! उलट पुण्यास मजुरी माणशीं २ रुपये झाली तर, मद्रासी कोंगाडयापासून मथुरेच्या भय्यापर्यंत लोक, ही मजुरी मिळविण्यासाठीं गर्दी करतील. मजुरांचा पुरवठा एकंदरीनें वाढला नसला तरी वाटेल त्या ठिकाणीं अवश्य तेवढा येतो व मजुरी कमी करतो. पुण्यांत वाढप्यांना २ रुपये रोज मिळावयास लागल्या-बरोबर, कितीतरी शाळामास्तर लग्नसराईत हीं कामें करूं लागले. एखाद्या विशिष्ट परिस्थितींत मजुराला, कारागिराला, कलावंताला, मिळणारी मजुरी 'खंड' स्वरूपाची असते हें खरें, पण सर्वसामान्य मजुरांचे बाबतींत हें लागू नाहीं. नामांकित वकील जेव्हां मागेल ती फी घेतो तेव्हां, ती खंडस्वरूपाची असते. एखादी चित्रपट तारका आपल्या स्वरूपाचा, स्वराचा अगर लोकप्रियतेचा फायदा घेऊन, वाटेल ती रक्कम मिळविते, तीहि खंडस्वरूपाची. कारण त्या वकिलासारखा तोच वकील व त्या तारकेसारखी तीच. व्यक्तिगत कलेचे बाबतींत असें होणें शक्य असतें. तथापि हें सुद्धां फार काळ चालत नाहीं. दुसऱ्या तारका रुपेरी पडद्यावर येत असतात. चाणाक्ष व हुशार दिग्दर्शक नवीन नवीन रत्नें हुडकत असतात. धंद्यांत नवीन वकील येत असतात, व तेहि स्पर्धा करीत असतात. बिनजोड स्थिति फार काळ कोठेंहि राहत नाहीं.

जगांतील जमिनींत भर घालतां येत नाहीं त्याचप्रमाणें जमीन इकडून तिकडे उचलून नेतां येत नाहीं. भातजमीन जास्त पाहिजे म्हणून नगर जिल्ह्यांतील माळरानें

उचलून मुळशीपेट्यांत नेतां येत नाहींत, अगर शिवाजीनगरजवळ जमिनीच्या प्लॉटना किंमत वाढली म्हणून दुसरीकडून जमीन तेथें नेतां येणार नाहीं. या परिस्थितीमुळें, कांहीं जमिनीच्या किंमती बेसुमार वाढतात. लक्ष्मीरोडवरील चौकांतील जागा १ चौरस फुटास ११ रुपयेप्रमाणें विकल्या गेल्या. मुंबईत, कोटांतील कांहीं जागांना १ चौरस फुटास १२० रु. किंमती आल्या. वास्तविक ही सर्व किंमत त्या त्या जागेच्या ऐपतीप्रमाणें नाहीं. पण ती जागा तेथेंच असल्यामुळें भरवस्ती, बाजाराची मांड, गिऱ्हाइकांची वग, परंपरा, व्यापारी लौकिक इत्यादि गोष्टींमुळें त्या जागेला किंमत आली व ही किंमतीची वाढ, मालकाच्या श्रमानें आली नसून केवळ सामाजिक परिस्थितीचा फायदा त्याला मिळत असतो. ही संपत्ति उत्पन्न करण्यांत त्याचा कांहींहि भाग नाहीं. तथापि तिचा उपभोग तो घेतो! वास्तविक या बिनश्रमानें मिळालेल्या संपत्तीवर समाजाचा हक्क असावयास पाहिजे. पण तें भांडवलशाहींत योग्य रीतीनें होत नाहीं. उलट नुसता थोडा कर जास्त बसवून, मालकांना जास्त फायदा राहील, अशीच सर्वत्र व्यवस्था केलेली दिसते. त्याचप्रमाणें पुष्कळ देशांत बाहेरून येणाऱ्या शेतीमालांवर कर बसवून देशांतील त्या मालाच्या किंमती वाढविण्यांत येतात; त्याचा परिणाम जमिनीच्या किंमती वाढण्यांत होतो. येथेंहि समाजाच्या कृत्याचा फायदा जमिनीच्या मालकांना मिळतो; व जेथें जमीनदार वर्ग मोठा व आपल्या हिताला दक्ष आहे तेथें, तो स्वतःचा फायदा करून घेतल्याशिवाय राहत नाहीं व त्यांना होणारा फायदा प्रत्यक्ष जमीन करणारे यांच्यापर्यंत जात नाहीं. आयात कर नसता तर स्वस्ताईचा फायदा सर्वसामान्य जनतेला मिळाला असता, परंतु सरकारनें आयातकररूपीं संरक्षण दिल्यामुळें तो फायदा जनतेला न मिळतां जमिनीच्या मालकांना मिळतो; जमीन करणाऱ्या शेतकऱ्यांना मिळत नाहीं! दुष्काळीं सूट मिळाली कीं, ती मालकांना मिळते, मालक आपल्या कुळांना खंडांत सूट देतात हें दृश्य फार क्वचित् दिसतें; हा अनुभव सर्वत्र आहेच. जमीन मर्यादित व हालवितां येणारी नसल्यामुळें जमिनीची किंमत वाजवीपेक्षां जास्त होते व तिचें उत्पन्न त्याच न्यायानें वाजवीपेक्षां जास्त म्हणून अशा प्राप्तीला आपण खंडस्वरूपाची प्राप्ति म्हटलें आहे.

जमिनीप्रमाणें दुसऱ्याहि कांहीं गोष्टी अशा स्वरूपाच्या असतात कीं, त्यांचा पुरवठा ताबडतोब करतां येत नाहीं; व या कारणानें पुष्कळ वेळां त्यांच्या किंमतींत वाढ होते, तीहि एका अर्थानें वाजवीपेक्षां जास्त असते. जगामधील सर्व निकेल धातूचें उत्पादन करण्याचें काम एकाच कंपनीकडे आहे. त्यामुळें त्या कंपनीला मक्तेबाजी स्वरूप आलें आहे. ही कंपनी वाजवीपेक्षां जास्त किंमत घेते. जर चढाओढ

असती, दुसरीकडून निकेलचा पुरवठा असता तर हें शक्य नव्हतें. स्थानमहात्म्यामुळें कांहीं गोष्टींना महत्त्व येतें. गंगेवर हजामत करणाऱ्या न्हाव्याला जास्त मजुरी द्यावी लागते. सिंहस्थ पर्वणी आली कीं भटजी संकल्पाची दक्षणा जास्त घेतो. कांहीं ठिकाणचें पाणी औषधी म्हणून त्या पाण्याला किंमत येते. भावनेमुळें काशी, रामेश्वर, ही क्षेत्रें, रायगड, सिंहगडासारखे किल्ले, यांना महत्त्व आहे व याचा फायदा घेऊन त्या त्या ठिकाणच्या वस्तूंना महत्त्व येतें व वाजवीपेक्षां जास्त भावहि येतो. पंढरपूर दुसरें स्थापतां येत नाहीं किंवा काशीविश्वेश्वराचें देऊळ दुसरीकडे, जास्त स्वच्छ, प्रशस्त, सुंदर असें जरी बांधलें तरी, लोक तिकडे जाणार नाहींत. येथें पुरवठा वाढविण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. ज्या वस्तूंचा पुरवठा वाढविणें शक्य आहे, त्या वस्तूंच्या किंमती कमीजास्त होतात. ज्यांचा पुरवठा वाढविणें शक्य आहे, अशा गोष्टींचें उत्पन्न अखेरीस चालू व्याजाचे दराचें मानानें राहील. कारण जास्त असल्यास ताबडतोब पुरवठा जास्त होऊन नफ्याचें, प्राप्तीचें, प्रमाण कमी होईल. परंतु प्राप्तीचें प्रमाण व व्याजाचा दर, यांचा मेळ लवकर बसतो असें नाहीं. पुरवठा वाढण्यास वेळ लागतो व तोंपर्यंत जी जास्त प्राप्ति मिळते, ती एका दृष्टीनें वाजवीपेक्षां जास्त असते. एका अर्थानें खंडस्वरूपाची असते. अर्थात् येथें खंड शब्द मर्यादित अर्थानेंच घेतला पाहिजे. कारण पुरवठा वाढतो, मात्र कालावधि लागतो. त्याचप्रमाणें या वस्तूंची मागणी कमी झाली तरी, त्या एकच उपयोग देणाऱ्या असल्यामुळें, त्यांचें रूपांतर होऊं शकत नाहीं, व त्यामुळें मालकांना नुकसानहि पुष्कळ होतें, हेंहि तितकेंच खरें. समजा, मुंबई ते रत्नागिरी यांत वहातूक करणारें एक जहाज आहे, व त्याला एक ठराविक प्रमाण मालाचें व उतारूंचें मिळालें म्हणजे त्या जहाजाचे मालकाची जी प्राप्ति होतें, ती चालू व्याजाचे दराचे मेळांत असते. म्हणजे जें भांडवल त्यानें या जहाजांत घातलें, व जो खर्च त्याला करावा लागला, त्या रकमेवर जें व्याज बाजारांत येईल, इतकी प्राप्ति त्याला मिळते. पण समजा, या प्रमाणापेक्षां कमी माल व कमी उतारू येऊं लागले तर, त्या मालकाची स्थिति केविलवाणी होत जाईल. अनेक जहाजें मुंबई ते रत्नागिरी या दरम्यान वहातूक करतात, व त्या सर्वांच्या बाबतींत मेळ देणाऱ्या प्रमाणापेक्षां उतारू व माल कमी येऊं लागला तर काय होईल तें आपण पाहूं. जहाजांची संख्या कमी केली तर होणारी घसरगुंडी थांबणें शक्य आहे. पण जहाजांची संख्या कमी करणें अवघड आहे. तीं निरुपयोगी होण्यास फार वेळ लागतो. शिवाय, जीं निरुपयोगी होतील त्यांची संख्या थोडी नसेल तरच राहिलेल्या जहाजांना प्राप्ति बरी

मिळण्याची आशा. तसेंच जहाजांचा उपयोग एकच, म्हणून त्यांचा पुरवठा रूपांतर करून कमी करतां येत नाही. मोटारी जास्त झाल्या तरी मोटारीचें आयुष्य ४।५ वर्षांपेक्षां जास्त नसतें. शिवाय मोटारीचे कांहीं भाग दुसरीकडे उपयोगांत आणतां येण्यासारखे असतात. जहाजांचें रूपान्तर करणें कठीण. मोडतोडीच्या भावानें विकणें म्हणजे भांडवलावर पाणी सोडणेंच होय. अशा स्थितींत, मागणी कमी झाली, उतारू व माल कमी जाऊं लागला म्हणजे जहाजांच्या मालकांची स्थिति किती तरी केविलवाणी होईल! उलट जेथें वस्तूचें रूपांतर करून दुसरा उपयोग करणें शक्य आहे, तेथें नुकसान होणार नाहीं. पुण्यांत नाटकगृहें होतीं, चित्रपट, बोलपटांचें युग सुरू झालें, त्याबरोबर नाटकगृहांना गिऱ्हाईक कमी झालें, पण लागलीच नाटकगृहांचें रूपांतर सिनेमागृहांत झालें, नाटक कंपन्या जास्त, थिएटरें थोडीं म्हणून पुण्यांतील थिएटरांना वाजवीपेक्षां जास्त प्राप्ति झाली. नाटककंपन्या संपल्या, लोकरुचि बदलली, बोलपट गर्जू लागलें. रूपान्तर शक्य होतें म्हणून थिएटरांच्या मालकांचें नुकसान झालें नाहीं त्यांनीं नाटकगृहांचे चित्रपट मंदिरांत रूपांतर केलें. किर्लोस्कर नाटकगृह जाऊन 'वसंत' फुलला नसता तर सर्वस्वीं नुकसान झालें असतें.

ज्या वस्तूंचें रूपांतर करणें शक्य नाहीं, त्या निकालीं लावल्या पाहिजेत अगर नुकसानींत चालू ठेवल्या पाहिजेत. चालू ठेवावयाच्या म्हणजे निदान चालू खर्चा-इतकें तरी उत्पन्न यावयास पाहिजे! बंद करणें फारच नुकसानकारक, चालू ठेवणें कमी नुकसानीचें, म्हणून पुष्कळ वेळां चालू ठेवणें पतकरतें. जहाज बंद ठेवणें म्हणजे साधी गोष्ट नाहीं; धक्कयाचें भाडें, यंत्रें योग्य स्थितींत ठेवणें, हें सर्व मिळून मोठी खर्चाची बाब आहे! मालकांना धंदा पुनः तेजींत येईल असें वाटत असतें म्हणून कांहीं काळ नुकसान सोसून ते तो धंदा चालू ठेवीत असतात. मोठमोठीं यंत्रें असणारे कारखाने याच कारणाकरितां नुकसानींत चालू ठेवले जातात. यंत्राचा जर दुसरा उपयोग होत नसेल तर, हाच मार्ग पतकरावा लागतो, व चालू खर्चाइतकें उत्पन्न मिळविण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. यंत्रदुरुस्ती, निकामीं झालेलीं उत्पादनसामग्री दूर करून नवीन संच तयार करणें या गोष्टी टळत नाहींत. तें करावयाचें म्हणजे आणखी भांडवल गुंतवून नुकसान वाढवावयाचें. अशा परिस्थितींत सामग्री मोडीचे भावानें विकून तिचा निकाल करावयाचा, अगर कारखाना बंद ठेवून, चांगले दिवस येतील म्हणून वाट पहावयाची! मध्यंतरी यंत्रें चांगल्या स्थितींत ठेवण्याकरितां कांहीं-तरी खर्च करावा लागतोच. चांगलें दिवस आले तर नुकसान भरून निघेल, न आले तर अधिक नुकसान, हेंहि निश्चित समजलें पाहिजे. ज्यांनीं यांत पैसे घातलें त्यांचें

योजक म्हणून नुकसान होणार, कारण नुकसानीची जबाबदारी त्यांची हें उघडच आहे. पण ज्यांनीं कर्जाऊ रक्कम दिली असे रोखेवाले अगर अन्य सावकार, त्यांचेंहि नुसतें व्याजाचेंच नव्हे तर मुद्दलांतसुद्धां नुकसान होतें. पुष्कळ वेळां कांहीं कमीजास्त करून नवीन घटना करून, तोच धंदा पुनः चालू करण्याचा प्रयत्न करणेंहि दुरापास्त होतें. आतांपर्यंत, मागणी कमी झाली म्हणजे ज्या वस्तूंचें रूपांतर करून दुसरा उपयोग करतां येत नाहीं, अशा धंद्यांचें काय होते याचे विवेचन झालें. पण ज्या वेळीं मागणी चांगली व वाढती असते त्यावेळीं नफ्याचें केवढें पीक येतें हेंहि पाहिलें पाहिजे. धंद्यांतील भांडवलाला बाजारांत येणाऱ्या व्याजापेक्षां जास्त दरानें नफा मिळत असतो, कारण ताबडतोब नवीन भांडवल घालून, या वस्तु करणें शक्य नसतें. या वस्तूंचें स्वरूप लक्षांत घेतां या वस्तूंचा पुरवठा ताबडतोब होणारा नाहीं. आपण जहाजाचेंच उदाहरण घेऊं. माल व उतारू जास्त प्रमाणांत येऊं लागले तरी नवीन जहाजें चुटकीसरशीं होत नाहींत, त्यामुळें चालू जहाजांना उत्पन्न वाजवीपेक्षां जास्त होईल. घातलेल्या भांडवलावर व होणाऱ्या खर्चावर चालू व्याजाचे दरापेक्षां जास्त दर सुटेल. नवीन पुरवठा ताबडतोब शक्य नाहीं, मागणी वाढत आहे, याचा अर्थ त्या धंद्याला मक्तेबाजीचें स्वरूप प्राप्त होऊन होणारी प्राप्ति खंड स्वरूपाची म्हणजे वाजवीपेक्षां जास्त. पुण्यांत ४।५ नाटकगृहें होतीं, त्यांत ताबडतोब भर घालणें शक्य नव्हतें. नाटककंपन्या वाढत गेल्या असल्या, म्हणजे नाटकगृहांना मागणी वाढली असती, कीं नाटकगृहवाल्यांचें उत्पन्न वाढलें असतें. नाटकगृह बांधण्यांत झालेल्या खर्चावर चांगलेंच व्याज सुटलें असतें. पुण्यांत लक्ष्मीरोड झाल्याबरोबर बाजाराचें स्वरूप बदललें. या नवीन रस्त्यावर ज्यांचीं घरें होतीं त्यांचे भाडें अनेक पटीनीं वाढलें. वास्तविक या मालकांनीं कांहींच श्रम केलेलें नसतां त्यांची प्राप्ति वाढली. खणाला भाडें २ रु. येत असे तेथें २५ रु. येऊं लागले. वाटेल तेवढीं घरें त्या रस्त्यावर अगर चौकांत बांधणें शक्य नाहीं, यामुळें ही प्राप्ति, वाजवीपेक्षां जास्त म्हणून, मर्यादित अर्थानें खंडस्वरूपाची. मागणी बरहुकूम पुरवठा होत नाहीं, या परिस्थितीमुळें हा फायदा होतो. ज्या वस्तूंचा पुरवठा ताबडतोब होत नाहीं अगर जास्त पुरवठा पुष्कळ खर्चाशिवाय होत नाहीं, अशा वस्तूंना मागणी वाढली म्हणजे वाजवीपेक्षां जास्त प्राप्ति होते, मग ती वस्तु जहाज असो, नाटकगृह असो, यंत्र असो, घर असो अगर निष्णात कारागीर असो.

कांहीं वस्तूंचा पुरवठा जरी ताबडतोब वाढवतां अगर कमी करतां येत नसला तरी, त्यांचें रूपांतर करून त्यांचा दुसऱ्या वस्तूंच्या उत्पादनाकडे उपयोग करतां येतो.

धान्य स्वस्त झालें तर, कापसाची लागवड करून अगर गळिताची लागवड करून, जमिनीचें एका अर्थानें रूपांतर करतां येतें. पुष्कळशीं यंत्रें कमीजास्त करून, दुसऱ्या उत्पादनाला उपयोगी पडतील अशीं करतां येतात. समजा, उतारूंकरितां मोटार घेतली; जर उतारूंची वाहतूक जमत नसेल तर तिचें रूप बदलून तिला माल वहाणाऱ्या लॉरीचें रूप देतां येईल. कांहीं माणसें एकाच धंद्यांत काम करण्यास लायक असतात, पण नाइलाजानें दुसराहि धंदा तीं शिकतात. नाटकांत काम करणारे किती तरी नट चित्रपटांत गेले. वकिली जमली नाहीं तर किती तरी वकील शिक्षक होतात. एखाद्या धंद्याला मंदी आली कीं तो धंदा कमी होत जातो. त्यांतील योजकाची प्राप्ति कमी होते. त्यांतील अन्य उत्पादक गोष्टींची प्राप्ति कमी होते, त्यांतील लोक दुसरीकडे जाऊं लागतात, त्याच धंद्यांत राहून पूर्वीइतकें मिळणार नाहीं असें त्यांना वाटतें व दुसरीकडे जाऊन जास्त मिळेल असा भरंवसा असतो. उलट धंद्याला तेजी आली कीं दुसरीकडील लोक त्यांत येतात, कारण त्यांना त्या धंद्यांत जास्त किफायत होईल असें वाटतें.

कारागीर अगर मजूर हा एक दृष्टीनें रूपांतर करीत असतो. शेतकरी जमिनीचें रूपांतर पिकें बदलून करीत असतो. परंतु कांहीं जमिनी एखादें विशिष्ट पीकच देतात. त्या जमिनींत दुसरें पीक होत नाहीं. त्यांत प्राप्ति नाहीं झाली तरी तिचा उपयोग दुसऱ्या कामीं होत नाहीं, व त्यामुळें जी कांहीं प्राप्ति होईल ती, एका अर्थानें खंडस्वरूपाची होईल. कारण त्या वस्तूंचा पुरवठा वाढूं शकत नाहीं व रूपांतर करून त्यांचा दुसरा उपयोग करतां येत नाहीं. जेव्हां मागणी वाढून प्राप्ति वाजवीपेक्षां जास्त वाढूं लागते तेव्हां प्राप्तीचें स्वरूप वर उल्लेखिल्याप्रमाणें स्पष्ट होतें. जेव्हां एखादा मजूर अगर कारागीर अगर एखादी वस्तु निरनिराळ्या रीतींनीं उपयोगांत आणण्यासारख्या स्वरूपाची असते, तेव्हां स्वरूप बदललें कीं प्राप्तिहि बदलते. बदललेल्या प्राप्तीपेक्षां जेव्हां त्या वस्तूला जास्त प्राप्ति होते, तेव्हां ती एका अर्थानें 'खंड' स्वरूपाचीच समजतात. कापसाची लागवड केली असतां समजा, एकरीं ४० रु. फायदा होतो. पण कापसाऐवजीं गहूं पेरला तर, ३० रु. फायदा झाला, म्हणजे कापूस पेरला तेव्हां जो १० रु. जास्त फायदा होत होता, तो मर्यादित अर्थानें 'खंड' स्वरूपाचा. समजा, एक नट नाटकांत काम करीत असतां २०० रु. मिळवीत होता, तो बोलपटांत काम करूं लागला तेव्हां त्यास १५० रु. मिळूं लागले, तर याचा अर्थ ५० रु. त्याला जे जास्त मिळत होते, ते मर्यादित अर्थानें 'खंड' स्वरूपाचे होते. याच्या उलट जर बदललेली प्राप्ति जास्त असेल तर, ती खंड स्वरूपाची होणार नाहीं.

# १८. राजसत्ता

आतांपर्यंत केलेल्या विवेचनांत अनेक ठिकाणीं सरकारचा उल्लेख आला. नियमन, नियंत्रण, कर वगैरेंचा उल्लेख करतांना सरकारचें धोरण जसें असेल, त्याप्रमाणें व्यवहारावर परिणाम होतो, हें आपण पाहिलें. प्रत्येक राष्ट्रांत सरकार हें असलेंच पाहिजे. शासनपद्धति कोणती चांगली, लोकसत्ताक कां हुकूमशाही या प्रश्नाचा विचार तूर्त करण्याचें कारण नाहीं. आपणांस सरकारच्या धोरणामुळें व्यवहारावर काय परिणाम होतो हें पहावयाचें आहे. सरकारी धोरणाचे परिणाम आपण मोजूं शकतों, त्याची छाननी करून कोणत्या वस्तूचे भावांवर अगर पुरवठ्यावर अगर उत्पादनावर काय परिणाम होतील हें सांगूं शकतों. आयात मालावर कर बसवून एखाद्या धंद्याला संरक्षण देणें चांगलें कां वाईट, हा मताचा प्रश्न आहे. पण संरक्षण दिलें तर गिऱ्हाइकांना ती जिन्नस महाग मिळेल ही गोष्ट कांहीं मताचा प्रश्न नाहीं; हीं वस्तुस्थिति आहे, सत्य आहे व तें आपण मोजूं शकूं, त्याचे होणारे परिणाम सांगूं शकूं. त्याचप्रमाणें विशिष्ट परिस्थितींत सरकारनें कोणतें धोरण स्वीकारावें व कोणतें चांगलें हाहि मताचा प्रश्न आहे. पण अमुक धोरणापासून अमुक परिणाम होतील हें शास्त्रीय सिद्धांताप्रमाणें सांगतां येईल. राजसत्तेनें अगर सरकारनें होतां होईल तोंपर्यंत, व्यवहारांत, व्यापारांत, ढवळाढवळ करूं नये, असें मत फार दिवसांपासून प्रस्थापित झालें आहे. तथापि अलिकडे परिस्थितीमुळें हें मत डळमळलें असून, भांडवलशाहीचीं मूलतत्त्वें न सोडतां, सरकारनें व्यापार—व्यवहारांत हस्तक्षेप करावा याकडे प्रवृत्ति वाढत आहे. मजूर आणि मालक यांच्यांत सरकारनें पडण्याचें कारण नाहीं. कारण मजूर परवडलें म्हणून काम करतो, मालक त्यास मजुरी देतो, यांत सरकारचा संबंध नाहीं, अशी विचारसरणी एका काळीं होती. आज प्रत्येक राष्ट्रांत मजुरांच्या बाबतींत कायदे झाले आहेत; कामाचे तास, विश्रांति, विमा, बेकारीभत्ता, कामाच्या जागा कशा असाव्यात वगैरे बाबतींत कमीजास्त प्रमाणांत कायदे आहेत. सरकारनें हस्तक्षेप केला आहे. कोणते पीक काढावें, किती काढावें, कोणता माल तयार करावा, मक्तेबाजी

कोठपर्यंत जावी वगैरे बाबतींतहि कायदे झालेले आहेत. दोन माणसें एके ठिकाणीं आली म्हणजे खाजगी त्याचप्रमाणें सामाजिक संबंध, उत्पन्न होतात. दोन माणसें रस्त्यानें चाललीं व ओरडूं लागलीं तर सार्वजनिक शांतता बिघडते, म्हणून सरकारनें मध्यें पडलें पाहिजे. रस्त्याच्या कोणत्या बाजूनें जावें हें सरकारनें ठरविलें पाहिजे, नाहीं तर अपघात होतील; त्याच न्यायानें वाटेल त्यानें वाटेल तो धंदा करावा, वाटेल तें उत्पादन करावें, सर्वत्र हाहा:कार व्हावा व त्याचे परिणाम सर्व समाजाला भोगावे लागावेत हें बरोबर नाहीं, म्हणून सरकारनें या बाबतींत हस्तक्षेप केल्यास तो योग्य, ही गोष्ट आतां मान्य होऊं लागली आहे.

सरकारनें कोणत्या सोई कराव्यात अगर कोणतें उत्पादन करावें याचा विस्तारशः विचार करणें येथें शक्य नाहीं. समाजसत्तावादी लोक असें म्हणणार कीं सर्व उत्पादनसामग्री सरकारी मालकीची व्हावी, उत्पादन हें सर्वस्वीं सरकारी असावें; याप्रमाणें आज रशियांत वस्तुस्थिति आहे. उलट जगांतील अन्य देशांत बहुतेक उत्पादन खाजगी मालकीचें आहे. कांहीं उत्पादन व कांहीं सुखसोई सरकार करतें. देशाचें संरक्षण ही एक महत्त्वाची बाब आहे. देशांत शांतता राखणें व परकीयांचा हल्ला आल्यास, त्यापासून देशाचा बचाव करणें, ही गोष्ट कांहीं खाजगी रीतीनें करतां येण्यासारखी नाहीं. जर प्रत्येक माणसानें स्वतःचें संरक्षण करावयाचें म्हटलें तर अनावस्था होईल. जे टगे असतील, धडधाकट असतील त्यांचीच चलती होईल. रस्त्यांतून मन मानेल तशा गाड्या चालविल्या तर अपघात होतील, म्हणूनच नियम मान्य करून लोक वागतात. यांत थोडें स्वातंत्र्य गेलें, पण यामुळें सामुदायिक सोय व सुख आलें. त्याचप्रमाणें देशांत प्रत्येकानें कांहीं नियम पाळले पाहिजेत. सशक्त झाला म्हणून त्यानें अशक्तास मारावें असें झालें तर त्यालाहि मारणारा भेटेल. म्हणून प्रत्येकानें कांहीं नियम मानले पाहिजेत, कांहीं गोष्टी वर्ज केल्या पाहिजेत, कारण तसें झालें तरच सर्वांची सोय होणार आहे. सर्व लोक ही गोष्ट सर्वांना चांगली व सुखावह, म्हणून करतीलच असें होत नाहीं, अगर अगदीं सर्वांनीं कबूल करून नियमाप्रमाणें वागावयाचें ठरविलें तरी ते तसें वागतील असा भरंवसा नाहीं. म्हणून नियमाप्रमाणें न वागल्यास त्यास शासन करण्याची जरूरी असते. म्हणून पोलीस, न्यायाधीश, किंबहुना सर्व शासनसंस्थेची जरूरी उत्पन्न होते, व त्याचा परिणाम म्हणजे जे नियम अगर कायदे सरकार करील ते पाळावयास पाहिजेत ही दृष्टि उत्पन्न होते. जेथें सरकार लोकांचें आहे तेथें हे कायदे म्हणजे लोकांनीं आपण होऊन आपल्या स्वातंत्र्यावर सामाजिक हितासाठीं घातलेलें नियंत्रण असा अर्थ होतो. सर्वांच्या

हितासाठीं व सुखासाठीं व्यक्तीचें स्वातंत्र्य मर्यादित करणें, याचाच अर्थ तें कायम टिकविणें व प्रत्येकाला तें मिळेल अशी सोय करणें हा होय. सरकार अगर शासनतंत्र हें एका दृष्टीनें व्यक्तीचें सार्वजनिक स्वरूप व सार्वजनिक मालकीची वस्तु, म्हणून ती सर्वांच्या उपयोगी पडली पाहिजे, हा तिच्यांतला विशेष गुण समजला पाहिजे.

सर्वांच्या उपयोगी पडणाऱ्या अशा कोणत्या गोष्टी सरकारनें करावयास पाहिजेत याचा विचार करूं. कांहीं व्यक्तींना अगर हरएक व्यक्तीला सहज करतां येण्यासारखी गोष्ट सरकारनें करण्याचें कारण नाहीं. माणसानें कोणते कपडे करावेत, काय खावें, या गोष्टी प्रत्येक व्यक्तीला ठरवितां येण्यासारख्या आहेत, यांत सरकारला पडण्याचें कारण नाहीं. पण समजा, देशावर हल्ला झाला, अगर प्लेगची सांथ आली तर, या गोष्टींना तोंड द्यावयाचें तर तें सरकारनेंच द्यावयास पाहिजे. हें काम व्यक्तींचें नाहीं, हल्ल्यापासून संरक्षण करावयाचें तें सर्वांचें करावयाचें, एखाद्या व्यक्तीचें नाहीं म्हणून ही बाब सरकारनें करावयाची. तेथें गरिबांचें अगर श्रीमंतांचें संरक्षण, कर देणारांचें अगर न देणारांचें संरक्षण असा भेद होऊं शकत नाहीं. सबंध राष्ट्राचें संरक्षण म्हणून तें सरकारनेंच केलें पाहिजे. एखाद्या रस्त्यावरील वाहतुकीचा मक्ता देतात, तसा कांहीं हा संरक्षणाचा मक्ता खाजगी व्यक्तींना देतां येणार नाहीं, अगर एकाच देशांत जसा एकच माल करणारे अनेक योजक असतात, तसाहि प्रकार येथें आधुनिक युगांत शक्य नाहीं. पूर्वी हा धंदा करणाऱ्या लोकांच्या टोळ्या होत्या, आतां प्रत्येक राष्ट्राजवळ खडें सैन्य आहे. संरक्षण व शांतता ठेवावयाची सर्व जबाबदारी सरकारवर आहे; किंबहुना हें सरकारचें आद्य कर्तव्य समजलें जात आहे. ज्याप्रमाणें शांतता व संरक्षण या गोष्टी सरकारनें कराव्यात, त्याप्रमाणें देशांतील रस्ते, कालवे, वाहतुकीचे मार्ग हेंही काम सरकारनें करणें योग्य आहे; यांतहि कोणा एकाची सोय नसून सर्वांची सोय आहे. नदीवर कोणी खाजगी पूल बांधला व त्याचा उपयोग करणारावर कर ठेवण्याची परवानगी दिली, रस्ते खाजगी रीतीनें बांधले व त्यांवर नाकीं बसविलीं, कालवे खाजगी रीतीनें बांधले व त्यांचें पाणी विकलें तर, तें सोयीचें होणार नाहीं. या सर्व गोष्टी अशा स्वरूपाच्या आहेत कीं त्या सरकारनेंच करावयास पाहिजेत. कारण त्या एकाहातीं म्हणजेच सरकारच्या हातीं असणें जास्त सोयीचें. या ज्या सोयी आहेत त्यांचा फायदा सर्वांना मिळाला पाहिजे. समजा, पुण्यांतील नवापूल खाजगी मालकीचा असता व प्रत्येक जाणाऱ्या व्यक्तीला कर द्यावा लागला असता तर, सर्व जनतेला त्याचा उपयोग करतां आला नसता. कर दिल्याशिवाय त्यावर पाऊल टाकतां आलें नसतें, त्याच्या कट्ट्यावर बसून सिंहगडावरून येणारी हवाहि फुकट खातां आली

नसती ! नदी जनतेची, सरकारी मालकीची, म्हणून त्यावरील पूल सरकारी मालकीचा असणें योग्य. सर्व देशांतून या प्रकारच्या सोयी सरकारनें कराव्यात असें मत आहे, तें योग्य आहे. सार्वजनिक सोयी सरकारनेंच करावयास पाहिजेत.

समाजांत सर्वच लोक सशक्त नसतात; कांहीं लुले, पंगु, अंध, वृद्ध असतात त्यांची सोय कोणी करावी ? काम करण्यास तयार असतां काम मिळत नाहीं तेव्हां बेकारी होते त्याबाबत सोय कोणी करावी, हाहि विचार करण्यासारखा प्रश्न आहे. भिकारी तर रस्तोरस्तीं आहेत. खाजगी रीतीनें लोकांनीं मदत करावी हें म्हणणें ठीक; पण कोणी मदत करतात कोणी करीत नाहींत. वास्तविक बेकारी हा व्यक्तीचा प्रश्न नाहीं, समाजरचनेचा प्रश्न आहे म्हणून तो सरकारनेंच सोडवावयास पाहिजे. लोक भिकारी आहेत हाहि समाजरचनेचा दोष आहे. संपत्तीची व संधीची वांटणी बरोबर नाहीं हा त्याचा अर्थ आहे. हाहि प्रश्न सरकारनेंच सोडवावयास पाहिजे. जे वृद्ध झाले, जे अपंग त्यांचीहि व्यवस्था सरकारनेंच करावयास पाहिजे. सरकारनें करावयाची म्हणजे जनतेकडून कर घेऊन करावयाची हें उघड आहे. व ही विचार-सरणी मान्य झालेली असून बहुतेक राष्ट्रांतील सरकारें वृद्धपणीं पेन्शन, बेकारभत्ता वगैरे गोष्टीबाबत आपली जबाबदारी पार पाडण्याचा प्रयत्न करीत असतात. कांहीं गोष्टींचें उत्पादन खरोखरच सार्वजनिक सोयींच्या स्वरूपाचें असतें. पण पुष्कळ वेळां त्यांत मक्तेबाजी झालेली असते. विजेचा पुरवठा, ट्रामची सोय, रेल्वे वगैरे गोष्टी, या प्रकारची उदाहरणें होत. पुणें, मुंबईत कांहीं दोनचार रेल्वे कंपन्या काढतां येत नाहींत. अगर पुण्यांत विजेचा पुरवठा करावयाचा तर कांहीं १०।५ कंपन्यांना परवानगी देतां येत नाहीं. पण त्याबरोबर ही सोय एकहातीं ठेवल्यानें मक्तेबाजी होते, व त्याचा परिणाम जनतेला भोगावा लागतो. तेव्हां असल्या स्वरूपाच्या सर्व सुखसोयी एकतर सरकारी मालकीच्या पाहिजेत, नाहीं तर त्यांवर सरकारी नियंत्रण पाहिजे, हें उघडच दिसतें. कंपनीनें वाटेल तसे दर वाढवावे व नफा मारावा, हा अन्याय आहे. म्हणून यावरील मालकी सरकारी असावी, निदान या सार्वजनिक सोयींवर सरकारी नियंत्रण असावें हें मान्य झालेलें आहे. त्याचप्रमाणें सार्वजनिक सोयींसाठीं—रस्त्यांसाठीं, शाळागृहासाठीं एखादी जमीन घेणें अगर घर घेणें व त्या मालकांस ती देण्यास भाग पाडणें हेंहि योग्य आहे. जर एखादा मालक म्हणेल कीं मी देत नाहीं तर तें चालूं नये. कारण समाजाच्या हितापुढें त्याचें हित जास्त असतां कामा नये. तसें नसेल तर प्रगतिच होणार नाहीं. सामान्यतः हल्लींच्या जगांत निरनिराळ्या राष्ट्रांतील सरकारें आपण होऊन काय सोयी करतात, याचें

स्थूलमानानें दिग्दर्शन केलें. या गोष्टी करतांना सरकारला पैसा खर्च करावा लागतो आणि तो पैसा सरकार कर्ज काढून अगर कर बसवून उभा करतें. कोणत्या गोष्टीवर किती खर्च करावा हें त्या देशाचे परिस्थितीवर व लोकमतांवर अवलंबून राहील. विमानतळ जास्त बांधावेत कां आरमारी गोद्या जास्त बांधाव्यात, तोफा जास्त तयार कराव्यात कां बंदुका, शिक्षणावर जास्त पैसा खर्च करावा कां संरक्षणावर जास्त करावा हे मताचे प्रश्न आहेत. पण कांहीं किमान गोष्टी प्रत्येक सरकारनें केल्याच पाहिजेत. किंबहुना सरकारनेंच त्या करणें इष्ट आहे, हें तत्त्व आतां सर्व-मान्य झालें आहे. सर्व उत्पादन सरकारनें करावयास पाहिजे; त्याशिवाय संपूर्ण न्याय व समाजांत समाधान नांदणार नाहीं, हें मत विचार करण्यासारखें आहे. तूर्त आपण वस्तुस्थितीचा विचार करीत आहोंत.

सरकारला कामें करावयाचीं, सोयी करावयाच्या या सर्वांना पैसा लागतो, व सरकार तो कररूपानें अगर कर्ज काढून उभा करीत असतें हें वर सांगितलेंच आहे. राष्ट्रांत लोकांची प्राप्ति अगर उत्पन्न ज्या प्रमाणांत असेल त्यांतूनच सरकारला पैसा द्यावा लागतो. सरकारी अधिकाराखालीं असणाऱ्या गोष्टींचा व्याप जितका वाढेल, तितका खर्चहि वाढेल. सरकार म्हणजे फक्त शांतता व संरक्षण येवढेंच करणारें असेल तर, खर्च कमी; पण सरकार लोकांच्या सुखसोयी स्वतः करीत असेल तर जास्त खर्च लागेल. आरोग्य, शिक्षण, बेकारी, वृद्ध व पंगू यांची व्यवस्था वगैरे गोष्टी सरकारनें करावयाच्या म्हणजे खर्च आणखी वाढला. विद्यमान राष्ट्राची प्रवृत्ति कशी आहे हें आपण वर पाहिलें आहे. सरकार राष्ट्रांतील वार्षिक उत्पन्नांपैकीं, मोठा हिस्सा खर्च करीत असतें. शेंकडों नोकरांना पगार देत असतें. पाटीलतलाठ्यापासून मंत्र्यापर्यंत, शिपायांपासून सेनापतीपर्यंत, दूर जंगलांतील गांवांत पत्र पोंहचविणाऱ्या डांकवाल्यापासून, छोटी सही करून महिना हजारों रुपये आरामांत बसून कमवि-णाऱ्या अधिकाऱ्यापर्यंत, हें वेतन सरकार देत असतें. सैन्याकरितां दारूगोळा, कापड, अन्नसामग्री, खरेदी करावी लागते. शाळागृहापासून किल्ल्यापर्यंत कराव्या लागणाऱ्या बांधकामाचा माल घ्यावा लागतो. जमिनींत खणून, कालवे, बंधारे, बांधावयाचे म्हणजे त्यांची सामग्री विकत घ्यावी लागते. जमिनीवरील रेल्वे व आकाशांतील विमानें, तयार करावयाचीं म्हणजे पैसा खर्चून मालमसाला घ्यावा लागतो. सरकार प्रजेकडून घेतलेला पैसा, कांहीं मालाकरितां, कांहीं मजुरी, वेतन म्हणून खर्च करीत असतें. कांहीं पैसा काढलेल्या कर्जावरील व्याज देण्यांत खर्च होतो. कांहीं निकामी झालेल्या लोकांना, कांहीं बेकारांना, कांहीं वृद्धांना पेन्शन म्हणूनहि सरकार खर्च

करीत असतें. तात्पर्य, सरकार मिळालेला पैसा स्वतः खर्च करतें अगर भत्ता वगैरे देऊन दुसऱ्यांना खर्च करावयास देतें. पण या सर्व खर्चाच्या बाबींचा परिणाम व्यवहारावर होत असतो. मनुष्याचे हातांत पैसा असल्याशिवाय, ऐपत असल्याशिवाय, तो वस्तूंच्या भावांवर परिणाम करूं शकत नाहीं. ही जी एवढी क्रयशक्ति, विकत घेण्याची शक्ति, सरकार वांटते, याचा परिणाम अनेक प्रकारांनीं होतो. करानें अगर कर्जरूपानें पैसा येत असतो; पगार, मालाची किंमत, भत्ता, व्याज वगैरे रूपानें तो सरकारमार्फत वांटला जात असतो. यामुळें एकंदर उत्पादनावर परिणाम होणें साहजिक आहे. कांहीं वस्तु, ज्या सरकार खरेदी करतें, त्यांची मागणी वाढते, त्यांचा भाव वाढतो ! युद्ध सुरू झाल्याबरोबर कांद्यांची व बटाट्यांची खरेदी सरकार करूं लागलें त्याबरोबर त्यांचा भाव वाढला. सरकारी कामें निघालीं, दारूगोळा तयार करण्याचे कारखाने बांधणें, बराकी बांधणें वगैरे कामें मोठ्या प्रमाणावर सुरू झालीं, त्याबरोबर पुण्यांत मजूर, गवंडी वगैरेंची मजुरी वाढली, लांकडांचा भाव वाढला. तात्पर्य, मागणीवर या गोष्टींचा परिणाम होतो. सरकार जर नुसतें पोलिसी अगर रखवालदारीवृत्तीचें असेल तर, त्याचा व्यापारावर कांहीं परिणाम होणार नाहीं. पण आधुनिक सरकार हें नुसतें रखवालदारी स्वरूपाचें नाहीं, तें समाजाचे जीवनाकडे जास्त व्यापक दृष्टीनें पाहत असल्यामुळें पुष्कळ सार्वजनिक सुखसोयींचें हिताचें उत्पादन करणें हें त्याचें कर्तव्यच होतें.

सरकारजवळ पैसा असतो याचा अर्थ, वस्तूंची मागणी करण्याची ऐपत सरकारजवळ असते. मजजवळ १ रु. आहे याचा अर्थ तेवढ्या किंमतीला मिळणारी वाटेल ती वस्तु घेण्याची शक्ति मजजवळ आहे. मी बाजारांत गेल्याबरोबर तेवढ्या प्रमाणांत मी जी वस्तु घेईन, त्या वस्तूच्या मागणीवर मी परिणाम करतों हें उघड आहे. मागणी परिणामकारक असली म्हणजे त्याला अनुसरून उत्पादन होतें, पुरवठा होतो. विकत घेण्याची ऐपत असणारें गिऱ्हाईक बाजारांत आलें म्हणजे पुरवठा होऊं लागतो. मागणारानें मागणी केली कीं पुरवठ्याची, उत्पादनाची, प्रेमगंगा वाहूं लागते ! ! सरकारनें कर घेतला नसता तर, लोक आपलें उत्पन्न ज्या तऱ्हेनें खर्च करते, ती तऱ्हा निराळी असती हें उघड आहे. कर घेतला गेला म्हणजे तेवढ्या प्रमाणांत लोक व्यक्तिशः कमी खर्च करणारे झाले; पण सरकार त्या प्रमाणांत जास्त खर्च करणारें झालें; सरकार कोणत्या गोष्टींवर खर्च करील हें ठरलेलें आहे. करांमुळें, कर्जामुळें, ह्या ऐपतीची, क्रयशक्तीची वांटणी होते. लोकांकडून सरकारकडे व सरकारकडून अनेक मार्गांनी पुनः लोकांकडे ती येतें हें खरें; पण या वांटणीनें

निरनिराळ्या वस्तूंच्या भावांवर परिणाम होतात. कर नसता तर कदाचित् लोकांनीं चैनीच्या वस्तु घेतल्या असत्या, मागणीमुळें त्यांच्या किंमती वाढल्या असत्या. करांमुळें निराळ्या वस्तूंना भाव आला. सरकारनें रस्ते तयार करण्याचें ठरविलें असल्यास, खडीला भाव आला, मजुरांना काम मिळालें. लोकांनीं ज्या वस्तूंकडे खर्च केला असता, त्यांकडे सरकार खर्च करणार नाहीं. समजा, प्राप्तीवरील कर नाहीं अशी स्थिति झाली कीं, हा वांचणारा पैसा लोक निरनिराळ्या दृष्टींनीं खर्च करतील. ज्यांवर खर्च करतील, त्या वस्तूंची मागणी वाढेल, त्यांना भाव येईल; जास्त भाव येत आहे म्हणून योजकवर्ग मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याचें ठरवील. मोठया प्रमाणावर उत्पादन केलें म्हणजे त्या मानानें उत्पादनखर्च कमी होतो; जास्त उत्पादनानें जरी पुरवठा वाढून किंमत कमी झाली तरी, उत्पादनखर्च कमी झाला म्हणून, योजकांना तीहि परवडणारी वाटेल. जास्त उत्पादन म्हणजे मजुरीहि वाढण्याचा संभव. लोक जास्त फळें घेऊं लागले तर फळांचें उत्पादन वाढेल, बागायतीला भाव येईल. लोक रेडिओ खरेदी करूं लागले तर त्याला मागणी वाढेल, त्यांची दुकानें वाढतील. रेडिओची सामग्री विकणारे, दुरुस्त करणारे, तयार होतील. त्यांना मजुरीहि जास्त मिळेल. कदाचित् उंची कापड घेण्याकडे लोक वळले तर त्या कापडाला भाव येईल, त्याचें उत्पादन वाढेल. ज्या वस्तूची मागणी वाढेल त्या वस्तूचें उत्पादन वाढेल. त्याचबरोबर ज्या वस्तूंची मागणी कमी होईल, त्यांचें उत्पादनहि कमी होईल, भावहि कमी होईल. उलटपक्षीं कररूपानें सरकारकडे पैसा गेल्यास, पुनः तो बाजारांत येणारच. सरकारी नोकर हे तरी सामान्य गिऱ्हाइकाप्रमाणेंच आहेत. पण ज्या सार्वजनिक कामावर सरकार पैसा खर्च करील, त्यांना लागणाऱ्या कच्च्या मालाच्या मागणी व पुरवठ्यावर परिणाम होईल. वर सांगितल्याप्रमाणें जसें कामाचें स्वरूप राहील, त्याप्रमाणें बाजारभावांवर परिणाम होईल. दारूगोळा तयार करणें ठरल्यास, लोखंड, पोलाद, निकेल वगैरेंना भाव येईल; कुशल कारागीर, फिटर, टर्नर यांची मजुरी वाढेल. लढाऊ जहाजें बांधावयाची ठरविल्यास पुनः लांकूड, लोखंड, कारागीर, यंत्रें, यांना भाव येईल. सारंग व तांडेल यांची मागणी वाढेल, त्यांना जास्त मजुरी मिळेल. तात्पर्य, ज्या वस्तूंची मागणी वाढेल त्यांना भाव येईल, ज्यांची मागणी कमी होईल त्यांचा भाव सामान्यतः कमी होईल. या ऐपतीची वांटणी झाल्यामुळें नुसत्या वस्तूंच्या भावावर परिणाम होतो असें नाहीं, तर काम करणाऱ्या मजुरांच्या, कारागिरांच्या वेतनावरहि परिणाम होतो, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. समजा, सरकारनें प्राथमिक शिक्षण सर्वत्र देण्याचें ठरविलें कीं ताबडतोब सरकारला हजारों शिक्षकांची

गरज लागेल, त्यामुळें इतर धंद्यांच्या मानानें शिक्षकांना मागणी जास्त झाल्यामुळें त्यांना वेतन जास्त मिळेल. विमानें बांधण्याचें ठरविलें तर, हवाबाजांना मजुरी अगर वेतन जास्त मिळेल. सडका तयार करण्याची योजना करून तिजवर खर्च केल्यास, तें काम करणाऱ्यांची मजुरी वाढेल. सरकारचें धोरण जसें असेल तसा परिणाम होत जातो हें विसरतां कामा नये. सरकारनें कर घेतले म्हणजे तेवढा पैसा जनतेकडून घेतला व त्या प्रमाणांत उत्पादनावरील अधिकार हातीं घेतला, हें उघड आहे. लोकांनीं कर दिला नसता तर, तो पैसा कदाचित् सांचविला असता व त्या दृष्टीनें तो वायां गेला, असें कोणी म्हणेल तर तें चुकीचें होईल. सर्व जनतेच्या संरक्षणाकरितां कांहीं खर्च होतो व त्याचाच परिणाम म्हणून लोक शांततेनें आपला व्यवहार करूं शकतात. घर राखण्याकरितां तरी राखणदार लागतो कीं नाहीं ? शेत राखण्याकरितां तरी खर्च करावाच लागतो. शिवाय, सरकार सार्वजनिक सोयी करून देशाच्या संपत्तींत भर टाकीत असतें. कालवे, सडका, इमारती वगैरे गोष्टी, त्याचप्रमाणें ज्ञानदान, जनतेला दिलेलें शिक्षण, या गोष्टी अगदीं खऱ्या अर्थानें राष्ट्राची संपत्तिच आहे. जें सरकार असें वागत नाहीं तें प्रजेनें ठेवूं नये, किंबहुना तें काढून टाकण्याचा प्रजेचा अनादि व जन्मसिद्ध हक्क आहे. सरकार प्रजेचें मुनीम आहे व हिताकरितां आहे. ऊन लागूं नये म्हणून शेतकरी डोक्याला मुंडासें बांधतो, पण त्यांत जर ढेंकूण शिरले असले, त्यापासून त्याला त्रास होत असला तर डोकीचें काढून झटकून टाकण्याचा त्याला हक्क आहे. सुखाकरितां विद्यमान सरकारशीं संसार करावयाचा, तो जर होत नसेल तर प्रजेला तो मोडून, दुसरी मांडणी करण्याचा अधिकार आहे.

सरकारला द्यावे लागणारे कर, सरकार अखेरीस लोकांकडून वसूल करतें. वस्तू-वर जरी कर बसविला तरी, ती वस्तु लोक घेतात व शेवटीं लोकांनाच कर द्यावा लागतो. यामुळें कर जीवर आहे अशी वस्तु घ्यावी किंवा नाहीं, किती घ्यावी वगैरे प्रश्न साहजिकच गिऱ्हाइकांचे मनांत येत असतात. करांमुळें लोकांच्या वस्तु घेण्याचे पसंतीवर परिणाम होतो. करामुळें साखर महाग झाली तर, लोक साखर कमी घेतील व गूळ जास्त घेतील; रेशमी कापडावर कर वाढल्यास तें घेणार नाहींत. तात्पर्य, करांमुळें गिऱ्हाइकाला एका दृष्टीनें विवेक करावा लागतो; ही वस्तु कां ती वस्तु घ्यावी याचा निर्णय घ्यावा लागतो. सरकारनें डोईपट्टीच बसविली तर मात्र, लोकांना ती चुकवितां येणार नाहीं. साखरेवर कर बसला, तर लोक साखर न घेतां कर वांचवतील, पण डोइपट्टी चुकवूं शकणार नाहींत. कारण, जर राष्ट्रांत रहावयाचें तर हा कर दिलाच पाहिजे. परागंदा व्हावयाचें, राष्ट्र सोडावयाचें, असें होतच नाहीं. जर हा डोईपट्टीचा

कर एखाद्या जातीवर अगर एखाद्या वर्गावर असला, तर मात्र त्यांच्या बाबतींत देशत्याग शक्य आहे. परंतु जर हा कर सार्वत्रिक असेल, तर मात्र तो कोणी चुकवूं शकणार नाहीं! तो देण्याकरितां कदाचित् लोक जास्त काम करतील; तो प्रश्न निराळा. परंतु असला डोईपट्टीचा कर हल्लींचे जगांत कोठेंच नाहीं. औरंगजेबानें हिंदूंवर जिझीया कर बसविला, पण त्यानंतर हिंदुस्थानांत तो पुनः दिसला नाहीं. युरोपमध्येंहि फार पूर्वीं तो कर होता, आतां नाहीं. कर वस्तूंवर असो अगर उत्पन्नावर असो, त्यामुळें लोकांच्या ऐपतीवर परिणाम होतो, आणि म्हणून त्यांना निरनिराळ्या प्रकारांनीं आपल्या व्यवहाराचा मेळ बसवावा लागतो. तंबाखूवर कर बसला तर, त्याचा परिणाम तंबाखूचे व्यापारावर व तंबाखू खाणारांवर अगर ओढणारांवरहि होणार हें अगदीं उघड आहे. कर बसल्याबरोबर तंबाखूचा भाव वाढेल, तंबाखूचें व्यसन अगर मागणी अगदीं सक्त आहे, तिच्यामध्यें बदल होणें शक्य नाहीं तेव्हां त्याचा परिणाम सदरहू कर गिऱ्हाइकांचे डोक्यावरच बसण्यांत होईल. किंमत वाढली पण तंबाखूशिवाय चालत नाहीं अगर तिचें प्रमाण सुद्धां कमी होऊं शकत नाहीं, याचा परिणाम वर सांगितल्याप्रमाणें गिऱ्हाइकाला तो कर सोसावा लागतो. व्यापारी जाणून असतोच कीं मागणी कमी होणार नाहीं, तेव्हां कराचा भाग आपल्या नफ्यांतून देण्याचें कारण नाहीं. जरी कर प्रत्यक्ष तंबाखूच्या व्यापाऱ्यानें दिला, तरी तो जशाचा तसा गिऱ्हाइकाचे डोक्यावर बसणार. व्यापाऱ्यानें तो आगाऊ भरला इतकाच त्याचा अर्थ झाला. तंबाखू वापरणाऱ्यांवर कर बसवून जें झालें असतें तें तंबाखूवर कर बसवून सरकारनें करून घेतलें. पण पूर्वींपेक्षां तंबाखूवर जास्त खर्च करावा लागल्यामुळें, या करामुळें लोकांना दुसऱ्या कांहीं तरी वस्तूंवर त्या प्रमाणांत खर्च कमी करणें क्रमप्राप्त आहे. परंतु जिची मागणी अगदीं सक्त, न बदलणारी आहे अशी वस्तु क्वचित् म्हणून कर बसला कीं, लोक त्या वस्तूचा उपयोग कमी कमी करूं लागतात. जो जास्त उपयोग करील त्याला जास्त कर द्यावा लागेल; जो कमी उपयोग करील त्याला कमी द्यावा लागेल. कारण वस्तु विकत घेतली तरच कर बसणार व ज्या प्रमाणांत गिऱ्हाईक ती घेईल त्या प्रमाणांत त्याच्यावर कर बसेल. कर बसल्यामुळें कांहीं लोक ती वस्तु निःसंशय कमी प्रमाणांत घेतील. आतां आपण सरकारनें तंबाखूवर कर बसवून जें उत्पन्न वाढविलें तें तंबाखूवर कर न बसवितां लोकांच्या उत्पन्नावर कर बसवून वाढविलें तर काय होईल तें पाहूं. मनुष्य पूर्वींइतकीच तंबाखू घेणें शक्य आहे, कारण त्यावर आतां कर नाहीं. त्याला जी वस्तु हवी आहे, ती तो घेईल. पूर्वीं तीवर कर होता म्हणून त्याला कमी घ्यावी लागली. वस्तूवर कर बसला

म्हणजे ती घ्यावी न घ्यावी याचा विचार गिऱ्हाइकास करावा लागतो, व त्याचा परिणाम त्या वस्तूच्या विक्रीचें प्रमाण कमी होण्यांत होणें शक्य आहे. त्याचाच परिणाम सरकारला या करांपासून उत्पन्न मूळ खपाच्या मानानें कमी होण्यांत होईल. वस्तूंवर कर बसविला म्हणजे सरकारला मूळ अपेक्षेहून उत्पन्न कमी, ज्या प्रमाणांत गिऱ्हाईक ती वस्तु घेणार नाहीं त्या प्रमाणांत गिऱ्हाइकाचेंहि समाधानाच्या दृष्टीनें नुकसान. कर नसता तर ती वस्तु गिऱ्हाइकाला स्वस्त मिळाली असती. करामुळें ती ज्या प्रमाणांत महाग झाली त्या प्रमाणांत त्याचें नुकसान झालें. समजा एक इसम दररोज १०० विड्या ओढतो व त्यावर एक आणा कर सरकारनें बसविला, व त्यामुळें ३ आणे + १ आणा मिळून ४ आणे किंमत झाली. त्याला ३ आण्यापेक्षां जास्त खर्च करणें शक्य नाहीं तेव्हां त्यानें ३ आण्यांच्याच विड्या घेतल्या. २५ टक्के मागणी घटली. याप्रमाणें कांहीं गिऱ्हाइकांची मागणी अजिबातहि नाहींशी होईल. जी मागणी कमी झाली त्यावर सरकारला कांहीं कर मिळाला नाहीं. मात्र गिऱ्हाइकाला किंमत जास्त देऊन वस्तु घ्यावी लागली, हें त्याचें नुकसान झालें. लोक कर लादलेली वस्तु घेणें बंद करतात अगर कमी प्रमाणांत ती घेतात. ते दुसऱ्या वस्तु घेतील; दुसऱ्या रीतीनें आपलें उत्पन्न खर्च करतील. तात्पर्य, वस्तूवर कर बसविला म्हणजे त्याचा परिणाम मनुष्याचे ( वस्तु घेण्याचे ) ऐपतीवर तर होतोच, पण त्याचे पसंतीवरहि होऊन त्याप्रमाणें तो वागत असतो.

कराचा परिणाम ऐपतीवर, पुरवठ्यावर, पसंतीवर जसा होतो तसा उत्पादनाच्या, व्यापाराच्या संघटनेवरहि होतो. समजा, विक्रीकर सरकारनें बसविला, म्हणजे पदार्थ विकला कीं त्याच्यावर कर. मग तो किती वेळां कां विकला जाईना. समजा, गिरणींत दलालानें कापड घाउक घेतलें, त्याला कर द्यावा लागेल. मुंबईचे दलालानें पुण्यांतील व्यापाऱ्याला विकलें कीं पुनः कर, पुण्यांतील व्यापाऱ्यानें गिऱ्हाइकांस म्हणजे उपभोगी गिऱ्हाइकांस विकलें कीं पुनः कर. यामुळें पुण्यांतील व्यापारी एकदम गिरणींतूनच खरेदी करतील व एक कर वांचवितील. अगर गिरणीवाले स्वतःचींच दुकानें पुण्यांत काढतील व एकदांच कर देतील. यामुळें व्यापाराची संघटना बदलेल. तसेंच शेतकऱ्याकडून कापूस घेतला कीं कर, दलालाकडून जिनिंग कंपनीनें घेतला कीं कर, त्यांचेकडून मुंबईचे दलालांनीं घेतला कीं कर, अशी कर कर, सुरू झाली तर गिरणीवाले आपले दलाल ठेवून, सरळ शेतकऱ्यांकडून कापूस विकत घेतील. स्वतःची जिनिंग फॅक्टरी काढून, तेथें त्यांच्या गांठी करतील. तात्पर्य, नवीन संघटना उत्पन्न होईल. कराचा परिणाम चालू उत्पादनाचे संघटनेवर होईल. आज जादा प्राप्तीवर

जादा कर बसविला जात आहे. युद्धापूर्वी धंद्यांत जो सामान्य नफा होत होता त्यापेक्षां जास्त नफा होऊं लागला तेव्हां त्यावर ९० टक्के अधिक कर बसविण्यांत येत होता. असल्या व येवढ्या कराचा परिणाम उद्योगधंद्याचे संघटनेवर होणारच. जादा नफा मिळाला नाहीं हें दर्शविण्याकरितां मालक जादा खर्च दाखवितील. नातेवाइकांना अगर दोस्तांना त्या धंद्यांत मोठ्या पगाराच्या जागा देऊन, खर्च फुगवितील. धंद्यांत देखरेख करणारांची गर्दी होईल. अनेक नवीन खातीं, म्हणजे जीं नफा खाऊन दाखवतील अशीं निर्माण होतील. तात्पर्य, संघटनेवर परिणाम होईल. त्याचबरोबर जादा नफ्यावर कर नसता तर, कदाचित् उत्पादनांत जास्त भांडवल आलें असतें तें येणार नाहीं. त्याचप्रमाणें जास्त नफा मिळवून सरकारला कर देण्यापेक्षां कमी नफा मिळणारें उत्पादन करण्याकडे प्रवृत्ति वाढेल. याहि दृष्टीनें कराचा परिणाम उत्पादनाचे संघटनेवर होईल. पुष्कळ वेळां करामुळें व्यापार, उद्योग, एका जागेहून दुसरीकडे जातो, त्याचा ओघ बदलतो. पुण्यांत होणाऱ्या मालावर कर वाढल्यामुळें पुण्याचे व्यापारावर परिणाम झाला आहे. खेडोपाडीं कापड पूर्वी पुण्याहून जात असे. आतां परस्पर मुंबईहून जातें. अहमदाबादेस स्थानिक कर मुंबईपेक्षां कमी, म्हणून तेथें कापड गिरण्यांची वाढ होण्यास मदत झाली. कच्च्या मालावर कर न घेण्याचें धोरण स्वीकारलें तर पुण्यास सुद्धां व्यापार व उत्पादन वाढणें शक्य आहे. कर कमी अगर अजीबात नाहींत या कारणामुळें पुष्कळशा देशी संस्थानांतून नवीन नवीन कारखाने निर्माण होत आहेत. कर द्यावा लागतो म्हणून कोणी उद्योगधंदा बंद करीत नाहींत हें खरें. प्राप्तीवरील कर कांहीं प्राप्ति झाली तरच द्यावा लागतो, हें जरी खरें असलें, तरी वाढता कर द्यावा लागेल या भीतीनें नुसते व्याजावर राहणारे लोक पैसे गुंतवितांना विचार करतात. प्राप्तीवरील कर बहुतेक सर्वत्र वाढत्या पद्धतीनें घेतात, व त्यामुळें एखाद्या धंद्यांतील भागांवर उत्पन्न जास्त आलें तर, तें बहुतेक सरकार घेईल, या धोरणानें लोक तिकडे पैसे गुंतविणार नाहींत. वाढत्या दराची पद्धत म्हणजे जसें उत्पन्न वाढेल त्या मानानें कराचा दरहि वाढतो. उदाहरणार्थ २००० रु. वार्षिक उत्पन्नावर जर रुपयामागें ४ पै कर असेल तर ५००० रु. उत्पन्नावर रुपयामागें कांहीं तरी जास्त ६ ते ८ पै, त्याचप्रमाणें उत्पन्न आणखी वाढलें तर १ रुपयास एक आणा अगर जास्त, या पद्धतीनें प्राप्तीवर जो कर घेतात त्याला वाढत्या दराच्या पद्धतीचा कर म्हणतात. जर रुपयामागें ४ पै हा एकच दर कराचा ठेवला तर, त्यांत न्याय होत नाहीं. दोन हजार रुपये उत्पन्नवाल्याला तोच दर व दोन लाखवाल्याला तोच दर, म्हणजे न्याय नाहीं. साजेलसें, झेपेलसें ओझें प्रत्येकावर घातलें पाहिजे हें तत्त्व

या पद्धतींत आहे. वाढत्या पद्धतीनें, प्राप्तीवर कर जेथें घेतला जात असेल तेथें त्याचा परिणाम पैसे गुंतविण्यावर होतो. निश्चित व्याज येईल अशा रोख्यांत गुंतविण्याकडे प्रवृत्ति होते. स्थावर मिळकतीवर कर बसविला कीं लोक तिकडे पैसे कमी गुंतवितात. मागें आपण पाहिलें आहे कीं, पुष्कळशा जमिनींची किंमत बिनश्रमानें स्थानमहात्म्यामुळें वाढते. भरवस्तींत व्यापार वाढला म्हणजे, परंपरेमुळें वाढलेल्या किंमतीवर कर घेण्याचा प्रघात पुष्कळ देशांत आहे. भांबुर्ड्यांच्या जमिनींचें शेतसाऱ्याचें उत्पन्न, कांहीं वर्षांपूर्वी २ हजारांपेक्षां जास्ती नव्हतें. शहर वाढलें, रस्ते झाले, त्यामुळें जमिनीच्या किंमती वाढल्या; या मालकांच्या श्रमानें वाढल्या नाहींत. त्यांना पूर्वी एकरीं जें १० रुपये सुद्धां भाडें येत नसे तेथें एकरीं एक हजारांपर्यंत येऊं लागलें ! हें भाडें 'खंड' स्वरूपीं आहे. यावर सरकारला चांगलाच कर बसविण्याचा अधिकार आहे. कारण समाजाच्या कृत्यामुळें किंमती वाढल्या. आज भांबुर्ड्यांच्या जमिनीवर बिगर शेतसारा एकरीं २०० रु.पासून ६०० रु.पर्यंत वाढला आहे. पण हा कर योग्य असला तरी, त्याचा परिणाम तेथील जमिनीचे खरेदीविक्रीवर होऊं लागला हेंहि खरें. कारण जुन्या मालकांच्या जमिनींच्या किंमती वाढल्या तरी, नवीन गिऱ्हाइकाला वाढती किंमत द्यावी लागणार म्हणून तोहि विचार करील. कर वाढला नसता तर, गिऱ्हाईक कांहीं तरी जास्त असतें. जिकडे कमी कर व जास्त प्राप्ति होण्याचा संभव, तिकडे समाजांतील पैसेवाले वळतात. आधुनिक सरकार करांवांचून चालणें शक्य नाहीं. तथापि करांचे परिणाम कसे कसे होतात हें स्थूल मानानें आपण पाहिलें.

सरकारानें आपलीं कामें करण्याकरितां कर बसवावे हें ठीक, पण कर तरी किती प्रकारचे असावेत यालाहि कांहीं मर्यादा हवी कीं नको ? आज पहावें तों चहावर कर, साखरेवर कर, पेट्रोलवर कर, घरांवर कर, नफ्यावर कर, प्राप्तीवर कर, मृत्यूवर कर; स्थानिक संस्थांचे कर, प्रांतिक सरकारचे कर, मध्यवर्ती सरकारचे कर, सर्वत्र करच कर. कर कोणी घ्यावेत, कसे घ्यावेत, कोणत्या पद्धतीनें घ्यावेत हे प्रश्न महत्त्वाचे आहेत. तथापि या सर्वांचा विचार करणें शक्य नाहीं. जेव्हां आपणास हिंदुस्थानांतील कराबद्दल विचार करावयाचा असेल तेव्हां, हें सर्व सांगणें योग्य ठरेल. आज सर्वसामान्य तत्त्व पहावयाचें आहे. स्थानिक व मध्यवर्ती कर हे सर्वत्र आहेत. कांहीं कामें, कांहीं स्थानिक स्वरूपाच्या सोयी, त्या दृष्टीनें हीं कामें स्थानिक संस्था—म्युनिसिपालिट्या, बोर्डें वगैरे करतात व त्यांनीं कोणत्या बाबींवर कर बसवावे, हें ठरवून देण्यांत आलेलें असतें; व त्या बाबींदेखील अशाच स्वरुपाच्या असतात कीं, त्यांवर कर बसविणें स्थानिक संस्थांना शक्य असतें. घरपट्टी, चाकपट्टी, शहरांत येणारा

माल, करमणुकीचे साधनांवर कर वगैरे बाबी या स्वरुपाच्या आहेत. उलट प्राप्तीवरील कर, देशांत येणाऱ्या अगर देशांतून बाहेर जाणाऱ्या मालावर कर वगैरे बाबी मध्यवर्ति व मुख्य सरकारच्या हातीं असणेंच योग्य आहे. हिंदुस्थान देशांत अनेक प्रांत आहेत व प्रांतागणिक एक सरकार. त्यांनीं कोणते कर बसवावे हेंहि ठरविण्यांत आलेलें आहे. सामान्यतः जी वस्तु सर्व देशभर तयार होते अगर देशभर विकली जाते, अशा वस्तूवर कर मुख्य सरकारनेंच बसविणें योग्य होईल. उदा०, साखरेवरचा कर, आगपेटयांवरील कर, मिठावरील कर. शिवाय यांत सोय आहे. जर या बाबी स्थानिक अगर प्रांतिक केल्या तर, एकाच वेळीं देशांत एकाच वस्तूवर कांहीं ठिकाणीं कर, तर कांहीं ठिकाणीं नाहीं, कोठें कमी तर कोठें जास्त, असें होण्याचा संभव आहे. म्हणून बहुतेक राष्ट्रांत कराच्या बाबींची वांटणी केलेली असते. स्थानिक-संस्थांच्या कराचें क्षेत्र निराळें, मुख्य सरकारचें निराळें. जेथें राष्ट्र मोठें आहे, व प्रांत अगर त्यांत समाविष्ट असलेली संस्थानें मोठीं आहेत, त्यांच्या करांचें क्षेत्र निराळें व मुख्य व मध्यवर्ति सरकारच्या करांचें क्षेत्र निराळें. जशी अधिकाराची व कामाची वांटणी राष्ट्राच्या घटनेप्रमाणें केलेली असते, त्याला अनुरूप असेंच प्रत्येकाचें कर बसविण्याचें क्षेत्र ठरविलेलें असतें. देशाचें परचक्रापासून संरक्षण करणें, हें काम जसें मुख्य सरकारचेंच असलें पाहिजे, तसेंच एकंदर देशाचें व्यापारी धोरण कसें असावें, देशांत येणारा व देशांतून बाहेर जाणारा माल, यांवर किती कर बसवावा, हेंहि काम मुख्य सरकारचेंच असलें पाहिजे. कर कोणीहि बसविलें तरी ते करच, व कोणीहि वसूल केलें तरी ते करच. मात्र कर वसूल करतांना त्याच्या वसुलीसाठीं खर्च शक्य तितका कमी लागेल, असें धोरण ठेवावें लागतें; १०० रुपये कर वसूल करण्याकरितां ५० रुपये खर्च आला तर तें बरोबर होणार नाहीं. समजा, उद्यां प्रत्येक चहाचे कपावर कर बसविला तर तो वसूल करणें किती अवघड आणि त्रासाचें व किती खर्चाचें आहे याची कल्पनाच करतां येणार नाहीं. याच्या उलट मळ्यांतून चहा तयार होऊन बाहेर जाऊं लागला कीं, तेथेंच कर दर पौंडामागें बसविला तर खर्च व त्रास कमी. आज सुद्धां साखरेवर कर आहे. कारखान्यांत साखर तयार झाली व ती विकण्यासाठीं कोठाराचे बाहेर निघाली कीं तीवर कर द्यावा लागतो; हा मार्ग सोपा व कमी खर्चाचा. तसेंच आयात कर बसवितांना ज्या वस्तूंवर बसवावयाचा त्या वस्तूंचा पुरवठा देशांत आहे कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. त्याच-प्रमाणें जकात बसविली तर त्याचा किंमतीवर कितपत परिणाम होईल हें पाहिलें पाहिजे. तात्पर्य, करानें जनतेची फारशी गैरसोय होऊं नये हें तत्त्व लक्षांत ठेवावें

लागतें. तथापि किती कर घ्यावा, व किती तऱ्हांनीं घ्यावा हें सरकारच्या गरजेवर अवलंबून आहे, व सरकारची गरज ही सरकार कोणत्या गोष्टी करणार आहे यावर अवलंबून राहणार. जनतेचें शिक्षण, आरोग्य, किमान वेतन, वृद्धपणाची व्यवस्था, बेकारी भत्ता, वगैरे गोष्टी सरकार करणार असेल तर, जास्त जास्त कर सरकार बसवील. कारण या ठिकाणीं सरकार निव्वळ रखवालदारी स्वरूपाचें राहिलें नसून, समाज-जीवनाची जबाबदारी तें अंगावर घेत असतें. समाजांत उत्पन्न होणारी संपत्ती जर केवळ समाजामुळें होते, तर त्यावर समाजाचा अग्रहक्क पाहिजे, असें कोणी म्हटलें तर तें चूक कसें ? राष्ट्रांतील मनुष्य आपली संपत्ती सुरक्षित समजतो. व आपल्या पश्चात् आपल्या इच्छेप्रमाणें ती वांटूं शकतो, याहि गोष्टी समाजाच्या कृपेमुळें होतात. संपत्तीची असलेली विषमता ही, समाज सहन करतो सरकार तिला कायद्यानें मान्यता देऊन तिला संरक्षण देतें. मग जर कोणी या संरक्षणाबद्दल मेहनताना मागूं लागला तर तक्रार करण्याचें कारण नाहीं. समाजांत सर्व व्यक्तींना न्याय मिळाला पाहिजे. उत्कर्ष करून घेण्याची संधि सर्वांना मिळाली पाहिजे, सर्वांना काय मिळालें पाहिजे या गोष्टीची जबाबदारी सरकारवर आहे, म्हणजे एका दृष्टीनें समाजावर आहे. ही जबाबदारी जसजशी भांडवलशाहींतील सरकारांना पटत जात आहे, तसतसा सरकारांनीं काय गोष्टी, काय सोयी, कराव्यात, याचा व्याप व विस्तार वाढूं लागला आहे; व त्याबरोबर करहि वाढूं लागले आहेत. प्राप्तीवरील करांत आतां सर्वत्र वाढती पद्धत स्वीकारली जात आहे. कर बसवितांना न्याय व्हावयास पाहिजे, हेंच या पद्धतीचे मुळाशीं आहे. वारसाकर अगर मृत्यूकर याच्या मुळाशीं हाच न्याय आहे. केवळ 'अ'च्या पोटीं जन्माला आला, म्हणून त्याची सर्व संपत्ती त्याला मिळावी हें बरोबर नाहीं. म्हणून वारसा मिळतांना त्यावर कर बसविणें योग्य आहे, व त्या-प्रमाणें बहुतेक देशांत तो चालू आहे. जसजसा वारसा जास्त, तसतसा कर जास्त, हेंहि अगदीं सरळ आहे. त्याचप्रमाणें वारसा जर दूरच्या नातलगांना मिळणार असेल तर, कराचा दर जास्त, हेंहि तत्त्व योग्य आहे. कारण ज्यांना खरोखर कांहींच मिळण्याचा संभव नव्हता, त्यांना जर फुकटांत मिळत असेल तर, त्यावर त्यांनीं जास्त कर दिला पाहिजे, हें कोणी अमान्य करणार नाहीं. जादा प्राप्तीवरील नफा याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. खुद्द भांडवलावर कर बसविणें योग्य आहे हेंहि मत अगदीं भांडवलशाही राष्ट्रांत आज बोलले जात आहे. तात्पर्य, भांडवलशाही राष्ट्रांतील सरका-कारांनासुद्धां नवीन नवीन कर बसवून, आपलें कार्यक्षेत्र वाढवून, राष्ट्रांतील व्यक्ति-मात्राला सामाजिक न्याय मिळवून देण्याचा, उत्कर्षाला वाव देण्याचा, प्रयत्न करणें

भाग पडत आहे. तेव्हां जसें सरकारचें कार्यक्षेत्र वाढेल त्याप्रमाणें कर वाढतील, हें उघड आहे.

कोणी अशी शंका विचारील कीं, करच बसविणें जरूर आहे तर, अगदीं एकच ठणठणीत कर बसविणें सोईचें होईल. आज स्थानिक कर, मध्यवर्ति कर, वस्तूंवर कर, मनुष्याचे प्राप्तीवर कर, जिवंतपणीं कर, मेल्यानंतर वारसावर कर, व्याजावर कर, मुद्दलावर कर, चैनीचे वस्तूंवर कर, अवश्यक वस्तूंवर कर, कांहीं ठिकाणीं लग्नावर कर, तर कांहीं ठिकाणीं ब्रह्मचाऱ्यांवर कर, असें आहे. हा येवढा खटाटोप व खर्च करण्यापेक्षां एकच कर बसविणें सोयीचें होईल. हें म्हणणें सरळ दिसतें, पण तो एकच कर कसा बसवावयाचा ? वस्तूंवर किंवा मनुष्यांवर ? कांहींचें म्हणणें आहे कीं, जमिनी-वरच कर असावा. कारण जमिनीचा पुरवठा वाढत नाहीं. लोकवस्ती वाढली म्हणजे तिच्या किंमतींत वाढ होते, व ही मालकाच्या श्रमानें झालेली नसते, तेव्हां झालेली वाढ सर्व अगर जास्तींत जास्त, सरकारनें कर म्हणून घ्यावी यांत अन्याय नाहीं व यापासून उत्पन्नहि पुष्कळ मिळेल. वाढलेली किंमत सरकारनें घेणें यांत अन्याय नाहीं हें खरें; पण येवढ्या कराचे उत्पन्नांतून आधुनिक सरकारच्या गरजा भागणार नाहींत. शिवाय जे लोक जमिनीचे मालक नाहींत, परंतु लक्षाधीश, कोट्यधीश आहेत, त्यांना जवळ जवळ कांहींच कर द्यावा लागणार नाहीं. घरभाड्यांत जेवढा भाग जाईल तेवढा. यामुळें कर न्याय्य असावा, सर्वांना त्यांच्या ऐपतीप्रमाणें जरी सर्वस्वीं नाहीं तरी, कांहीं तरी द्यावें लागेल, असा तरी असावा हें साधत नाहीं. शिवाय जमिनीच्या किंमती वाढण्याला कांहीं तरी मर्यादा आहेच. लोकसंख्या वाढली तरी वाटेल त्या प्रमाणांत जमिनीच्या किंमती वाढणार नाहींत; शिवाय या किंमती सालोसाल वाढणार नाहींत; जमिनीवर कर म्हणजे एकाच वर्गावर कर हेंहि बरोबर नाहीं ! तात्पर्य, एकच कर बसवावयाचा म्हटलें तर जमिनीवर बसवून तो चालणार नाहीं. कांहींच्या मतें फक्त मनुष्याच्या प्राप्तीवर कर असावा. कारण वस्तूंवर जरी बसविला तरी, मनुष्यानें त्या घेतल्या तरच कर सरकारला मिळणार. म्हणजे शेवटीं कर मनुष्यावरच पडतो. हें जर खरें तर तो वसूल करण्याकरितां वस्तूंची मध्यस्थी कशाला ? सरळ प्रत्येक माणसाची वार्षिक प्राप्ति किती आहे हें पाहून त्यावर कर बसविणें योग्य होईल अशी ही विचारसरणी आहे. ज्यांना प्राप्ति अगदींच कमी आहे, अशांकडून फार तर कर घेऊं नये व ज्यांची प्राप्ति जास्त आहे, त्यांच्याकडून वाढत्या दरानें घ्यावा म्हणजे अन्याय होणार नाहीं, असें तत्त्व मांडण्यांत येतें. प्राप्तीवरच फक्त कर असावा हें तात्त्विकदृष्ट्या योग्य आहे. कांहीं जणांना प्राप्ति श्रम न करतां होते.

रोख्यांवरील व्याज, भागांवरील नफा, जमिनीचा खंड, घरभाडें, जमीनभाडें वगैरे-पासून मिळणारी प्राप्ति, ही बिनश्रमाची. उलट, मजुरांची मजुरी, प्रोफेसरांचा पगार, व्यापारांतील फायदा, गाणारांची बिदागी वगैरेपासून होणारी प्राप्ति, कांहीं तरी श्रमांपासूनची आहे. श्रम कमीजास्त प्रमाणांत असतील व श्रमांच्या मानानें प्राप्ति कमीजास्त असेल, पण बिनश्रमाची मात्र म्हणतां येणार नाहीं. मग जर न्याय मिळावा असें असेल तर, या दोन तऱ्हेच्या उत्पन्नांवर निरनिराळे दर लावले पाहिजेत. त्याचप्रमाणें श्रमाचे मानानें, जर जास्त प्राप्ति होत असेल, म्हणजे ती प्राप्ति जर ' खंड ' स्वरूपाची असेल तर, त्यावरहि जास्त दर लावावयास पाहिजे. मक्तेबाजीमुळें मिळालेली प्राप्ति यावर समाजाचा हक्क, निदान जास्त प्रमाणांत तरी असावयास पाहिजे. पण या तऱ्हेनें प्राप्तींत प्रतबंदी करून निरनिराळे दर बसविणें, अशक्य नसलें तरी अवघड आहे; व त्यामुळें श्रीमंतावर अधिक बोजा पडत असल्यामुळें, फारशा प्रमाणांत हें होत नाहीं. प्राप्तीवर कर बसवितांना त्या माणसाची गरज किती याचा विचार करावयास पाहिजे. ' अ ' ला मूलबाळ नाहीं, व ' ब ' ला आठ मुलें व बायको आहे आणि दोघांचें उत्पन्न सारखें आहे म्हणून जर सारखा कर बसविला तर तो योग्य होणार नाहीं. कांहीं देशांत अज्ञान व न मिळवित्या मुलामागें कांहीं प्रमाणांत सूट देऊन, मग राहिलेल्या उत्पन्नावर कर बसवितात. कांहीं ठिकाणीं ठराविक मर्यादेपेक्षां कमी प्राप्ति असेल तर करांपासून ती माफ असते. हिंदुस्थानांत सध्या १५०० रु. चे खालीं जर उत्पन्न असेल तर, त्यावर प्राप्तिकर नाहीं. यंत्रदुरुस्ती, मोडतोड, घसारा, याबाबत होणारा खर्च यांवर कर घेत नाहींत; कारण उत्पादनसंच चालू स्थितींत ठेवण्यास हा खर्च अवश्यक आहे. त्याच न्यायानें अन्न, वस्त्र, कपडालत्ता वगैरे अवश्यक गोष्टींवर होणारा जो खर्च असेल तो करांपासून माफ असावा, कारण हा खर्च मनुष्यास प्राप्ति मिळविण्याकरितां, योग्य स्थितींत रहाण्यास अवश्य आहे, म्हणून त्यावर कर असूं नये. या दृष्टीनें ठराविक मर्यादेखालील प्राप्तीवर कर घेतला जात नाहीं. तथापि अवश्यक वस्तूंवर कर असेल तर, पुष्कळ लोक त्या घेतात व घेणारे ज्या मानानें गरीब असतील, त्या मानानें त्यांचेवर कर जास्त बसेल, हें उघड आहे. दहा हजार उत्पन्न असणाऱ्या माणसाला साखर, एक रुपयास दोन शेर करांमुळें झाली तर कांहींच वाटणार नाहीं. मात्र ज्याचें उत्पन्न हजार पांचशांचे आंत आहे त्याला हा चांगलाच जाणवेल; म्हणून नुसता प्राप्तीचा कांहीं भाग करांपासून माफ केला म्हणजे भागत नाहीं, तेवढ्यानें न्याय मिळत नाहीं. ज्या वस्तु लोकांना अवश्यक आहेत, किमान राहणीला जरूर आहेत, निदान अशा

वस्तूंवर तरी कर असतां कामां नये. या दृष्टीनें जर फक्त प्राप्तीवरच कर असेल, व दुसरा कोणताहि कर नसेल तर, वरील अन्याय होणार नाहीं हें खरें. नुसते वाढत्या पद्धतीनें प्राप्तीवरील कर वसूल केला, जास्त उत्पन्नावर जास्त दर बसविला, व कांहीं मर्यादित प्राप्ति, करांपासून माफ केली तरी, जोंपर्यंत वस्तूंवर, अवश्यक वस्तूंवर, कर आहे तोंपर्यंत न्याय मिळणार नाहीं. उलट वस्तु, व विशेषतः सर्वसामान्य लोकांना अवश्यक असणाऱ्या वस्तूंवर कर असेल तर तो, जशी गिऱ्हाइकाची गरिबी अधिक तसा तो वाढत्या प्रमाणांत त्यावर बसतो. कारण वस्तूंची किंमत गरिबांना व श्रीमंतांना सारखी, पण ती घेतांना गरिबाला ऐपतीचे मानानें जास्त द्यावें लागतें. म्हणून त्या कराचा परिणाम गरिबांवर जास्त. जर राष्ट्रांत फक्त एकच प्राप्तीवरील कर असेल तर, वरीलप्रमाणें अन्याय होणार नाहीं हें वर सांगितलेंच आहे. एकच कर ठेवावयाचा तर प्राप्तीवरीलच कर ठेवणें हें सयुक्तिक व शास्त्रीय आहे. तथापि कोठल्याहि राष्ट्रांत हें होत नाहीं, किंबहुना असा प्रयत्न जेथें झाला तेथें भांडवलवाल्यांनीं विरोध केला आहे व त्यांच्या विरोधापुढें त्या देशांतील सरकारचें चाललेंहि नाहीं हें सांगण्याची अवश्यकता नाहीं. भांडवलशाहींत सरकार हें भांडवलवाल्यांचें रखवालदार आहे, हा प्रत्यय सर्वत्र आला आहे.

कांहींच्या मतें, वारसाकर सुद्धां प्राप्तीचे करांत मिळवून घ्यावा म्हणजे जास्त सोय होईल. राष्ट्रांत किती माणसें दरसाल मरतील व ते किती संपत्ती ठेवतील याचें पक्कें गणित करणें अवघड आहे. म्हणून या बाबीपासून किती उत्पन्न येईल हेंहि सांगणें कठीण. 'अ' मेला त्याचा वारसा 'ब' कडे आला; समजा 'ब' एका वर्षांत मेला त्याचा वारसा 'क'कडे आला. या उदाहरणांत अवघ्या एक वर्षांत एकाच मिळकतीवर दोनदां कर बसला. उलट समजा, 'अ' मेला 'ब' ५० वर्षें जगला, तर ५० वर्षांत मिळकतीवर हा कर बसणार नाहीं. यांत थोडा अन्याय दिसतो. म्हणून कांहींच्या मतें मिळकतीवरच अधिक कर बसवावा म्हणजे वारसाकर बसविण्याचें काम पडणार नाहीं, व होणारा अन्याय वांचेल. वस्तूंवर कर बसविला म्हणजे ती घेतली नाहीं तर तो टाळतां येतो. शिवाय प्रत्यक्ष द्यावा लागत नसल्यानें त्याचा मनावर मोठा परिणाम होत नाहीं. पुष्कळ वेळां या मार्गानें किती कर देतों, हेंहि नागरिकांना समजत नाहीं. प्राप्तीवरील कर प्रत्यक्ष कापून द्यावा लागतो म्हणून तो जाणवतो. या न्यायानें वारसा आला व त्यांतून कर द्यावा लागला, तर कर जाणवणार नाहीं. कारण एवीतेवी जें मिळावयाचें तें बिनश्रमानें व फुकट, थोडें कमी मिळालें म्हणून तक्रार करण्याचें कारण नाहीं. उलट जर अधिक कर मिळकतीवर ठेवला व त्याचा

अंतर्भाव प्राप्तीचे करांत केला तर तो जास्त जाणवतो आणि म्हणूनच सर्वत्र अप्रत्यक्ष कर, वस्तूंवर कर जास्त, व प्रत्यक्ष कर त्या मानानें कमी, अशी स्थिति आहे. भांडवलशाहींत होणाऱ्या अन्यायावर अशा रीतीनें मुलामा दिला जातो. प्रत्यक्ष कर असला म्हणजे गरिबांना त्यांतले त्यांत न्याय मिळतो. पण गरिबांना न्याय मिळावा, विषमता नाहींशी व्हावी अशी जर करांची मांडणी केली तर मग भांडवलशाही समाजरचनाच राहणार नाहीं. प्रत्येकाकडून ऐपतीप्रमाणें घ्यावयाचें असें ठरलें कीं, प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणें, त्याच्या लायकीप्रमाणें, द्यावेंच लागेल, आणि असें झालें तर, कित्येक गाढवांना ब्रह्मदेवानें दिलेलें वैभव नाहींसें होईल. त्यांच्या दृष्टीनें हा कल्पांत होईल व तो टळावा म्हणून तर विषमता पाहिजे. विषमता हें गरिबांचें विष व तेंच नेमकें भांडवलशाहीचें अमृत ठरते.

कर बसला म्हणजे तो वस्तूवर असो अगर प्राप्तीवर असो, तो मनुष्यालाच द्यावा लागतो; हें जरी खरें असलें तरी त्याचा खरा बोजा कोणावर पडतो हेंहि विचार करण्यासारखें आहे. जर वस्तूवर कर बसला व त्या वस्तूची मागणी अगदीं सक्त, कमी न होणारी असेल तर, तो कर जशाचा तसा गिऱ्हाइकाला द्यावा लागेल. कारण मागणी कमी होणार नाहीं म्हणून मालक कराची रक्कम किंमतींत घालून वस्तूची किंमत वाढवील. हिंदुस्थान सरकारानें १९४१ मध्यें सर्व रेल्वेच्या तिकिटांवर रुपयामागें एक आणा वाढ केली, अर्थात् ही वाढ सर्व उतारूंना द्यावी लागली. कांहीं कंपन्या अद्याप खाजगी नियंत्रणाखालीं आहेत, त्यांनीं सुद्धां याचा फायदा घेतला. वाढ सर्व उतारूंकडून वसूल करून घेतली हें मक्तेबाजी असलेल्या गोष्टींचें उदाहरण झालें. समजा, तंबाखूवर कर बसविला व तंबाखू सोडणें शक्य नाहीं, तिची मागणी कायम आहे, असें समजलें तर मालक पूर्वीच्या किंमतींत कराची रक्कम मिळवून भाव अधिक ठेवतील व तो गिऱ्हाइकांना द्यावा लागेल. समजा, शहरांतील जमिनीवर कर बसविला, व किंमतीच्या पैकीं शेंकडा तीन रुपये सरकारनें घेण्याचें ठरविलें; त्याचा परिणाम जमिनींत सुधारणा होणार नाहीं, कारण सुधारणा केली तर किंमत वाढते, व लागलीच सरकार कर घेईल! कर बसला कीं, द्यावा लागतोच, व त्यामुळें मिळकतीची किंमत मालकाच्या दृष्टीनें कमी होते. समजा, एक हजार रुपये किंमतीचा प्लॉट आहे, त्यावर शेंकडा १ रुपयाप्रमाणें १० रु. दरसाल कर बसला; अर्थात् चालू मालकालाच तो द्यावा लागेल व जर त्यानें ती मिळकत विक्रीस काढली तर, तिची किंमत एक हजार येणार नाहीं. कारण घेणारा असें म्हणेल कीं, जें उत्पन्न पूर्वीं या मिळकतीपासून आलें असतें त्यांत १० रु. कमी येणार, तेव्हां

त्या मानानें तो किंमत कमी देईल. चालू व्याजाचा दर ५ टक्के असेल तर घेणारा मूळ किंमतींत २०० रु. कमी करून, म्हणजे ८०० रु.ला घेईल. कराचे रकमेची मुद्दल किंमत त्यानें कमी केली. अवश्यक व जिची मागणी कमी होणार नाहीं त्या वस्तूवर कर बसला तर तो गिऱ्हाइकाला द्यावा लागतो; जी वस्तू अवश्यक नाहीं तीवर कर बसला तर तो मालकाला द्यावा लागतो. पहिल्यांत वस्तूची किंमत वाढते, ती गिऱ्हाईक देतें. दुसऱ्यांत किंमत कमी होते, व तें नुकसान मालकाला सोसावें लागतें. एखाद्या वस्तूवर सरसहा कर बसविला, उदाहरणार्थ साखरेच्या मणामागें १ रु. कर बसविला तर जे साखरेचे कारखानदार असतील त्यांना प्रत्येक मणामागें प्रथम कराची रक्कम सरकारला दिली पाहिजे. साखरेची मागणी सक्त नाहीं, कमी-जास्त होणारी आहे; याचा परिणाम एकंदर विक्रीवर होऊन नफा पूर्वीइतका मिळणार नाहीं. कांहीं योजक, साखरेऐवजीं ज्यावर कर नाहीं अशी वस्तु तयार करण्याचा प्रयत्न करतील. पण जर यंत्रसामग्री, उत्पादनसंच, दुसऱ्या कामीं उपयोगीं पडणारा नसेल अगर त्याचा उपयोग साखरेचे उत्पादनाशिवाय दुसरे कामीं केल्यास फायदा होणें शक्य नसेल तर साखरेवर कर बसला तरी योजकांना साखरेचेंच उत्पादन फायदेशीर होतें. करामुळें नवीन कारखाने निघणार नाहींत, नवीन योजक या धंद्याकडे वळणार नाहींत, यामुळें कांहीं काळानें, एकंदर उत्पादन कमी होईल, आणि तसें झालें म्हणजे भाव वाढतील. पण ही स्थिति येईपर्यंत कराचा बोजा सामान्यतः उत्पादकावर बसतो. मात्र जर कां या धंद्यांत संघटना असेल किंवा मक्तेबाजी असेल, तर सर्व कारखानदार एकजूट करून साखरेची किंमत कर वाढल्याबरोबर वाढवून, ती गिऱ्हाइकांवर लादतील. वाढत्या किंमतीमुळें मागणी कमी झाल्यास ते त्या मानानें उत्पादन कमी करतील, पण वाढलेली किंमत कमी करणार नाहींत. उलट, जर कर, मणामागें अगर उत्पादन प्रमाणामागें, न बसवितां नफ्यावर बसविला तर उत्पादन कमी होणार नाहीं. कराच्या रकमेएवढा नफा कमी होईल, व जास्त नफा डोळ्यांवर येऊं नये म्हणून कदाचित् हे योजक किंमत वाढविणार नाहींत. तथापि जेथें मक्तेबाजी नाहीं व वस्तूंवर व उत्पादन प्रमाणावर कर बसविला असेल, म्हणजे मापांवर अगर संख्येवर, नफ्यावर नव्हे, अशा परिस्थितींत जर त्या वस्तूंची मागणी कायम राहणारी असेल, वाटेल ती किंमत वाढली तरी तींत कांहीं कमी होणार नाहीं, अशी स्थिति असेल तर, बसविलेला सर्व कर, गिऱ्हाइकांवर बसेल व कराच्या रकमेइतकी वाढ त्या वस्तूंच्या किंमतींत होईल. उलट, किंमत कमी झाली तरी त्या वस्तूंचा पुरवठा कमी होणार नाहीं अशी स्थिति असेल तर, किंमत कर बसला म्हणून वाढणार

नाहीं; व कर वस्तूंचें उत्पादन करणारांवर असेल. वस्तु अवश्यक, ती घेतल्याशिवाय चालत नाहीं म्हणून गिऱ्हाईक जास्त किंमत देऊन घेणार, म्हणून उत्पादक कराची रकम किंमतींत मिळवून ती वाढविणार व त्याचा बोजा गिऱ्हाइकावर लादणार. कर बसला, किंमत वाढविली तर लोक ती वस्तु कमी घेतील व नुकसान होईल, विक्री कमी होईल, अशी स्थिति असली कीं, उत्पादक तीच किंमत ठेवील, व सरळ कराचा बोजा सहन करील. जेथें मक्तेबाजी आहे, तेथें काय होईल हें वर सांगितलेंच आहे.

हल्लीं बहुतेक राष्ट्रांत वसूल केल्या जाणाऱ्या करांच्या रकमेंत, प्राप्तीवरील कराचा भाग बराच मोठा असतो. हिंदुस्थानांत मध्यवर्ति सरकारचें करांपासून एकंदर उत्पन्न १९४४—१९४५ सालीं २५५ कोटी रु. होते. त्यापैकीं १६५ कोटी रु. प्राप्तीचे करापासून मिळालें. बहुतेक राष्ट्रांत प्राप्तीचा कर वाढत्या पद्धतीनें घेण्यांत येतो. जास्त प्राप्तीवर जास्त दर, हें तत्त्व हिंदुस्थानांतील प्राप्तीचे करांच्या बाबतींतहि लागू आहे. हल्लीं प्राप्तीकर पुढीलप्रमाणें आहे. पहिले १५०० रुपयांवर कांहीं कर नाहीं. १५०० रु. ते ५००० रु. पर्यंत रुपयामागें १२ पै; पुढील ५००० रु. वर रुपयामागें २४ पै अगर २आणे. पुढील ५००० रु. वर रुपयामागें ३ आणे ६ पै. त्यापुढील रकमेवर रुपयामागें ५ आणे याप्रमाणें आहे. याशिवाय २५००० रु. पेक्षां जास्त उत्पन्नावर वाढत्या पद्धतीनें अधिक कर (Super Tax) आहे. त्याचा कमाल दर रुपयामागें ९ आणे आहे. याशिवाय व्यापारी संघावर व अन्य संघावर संघकर (Corporation Tax) आहे.

वस्तूंवर कर बसविला म्हणजे किंमतीवर काय व कसे परिणाम होतात हें वर आपण पाहिलें. पण प्राप्तीवर कर बसविला म्हणजे त्याचा वस्तूंचे भावांवर परिणाम होतो कीं काय तें पाहिलें पाहिजे. वस्तूंवरील कर मनुष्याला द्यावा लागतो, मग तो उत्पादक योजक देवो अगर घेणारें गिऱ्हाईक देवो. पण प्राप्तीवरील करांमुळें वस्तूंवर परिणाम होतो कां नाहीं, होत नसल्यास कोणत्या परिस्थितींत होत नाहीं हें समजणें जरूर आहे. योजकावर प्राप्तीचा कर बसला व त्यानें जर आपल्या धंद्यांतील उत्पादनाच्या, वस्तूंच्या किंमती वाढविल्या, तर तसें करणें त्याला शक्य आहे काय? तो किंमत निश्चित करूं शकत असेल तर हें शक्य आहे. याचा अर्थ तो मक्तेदार आहे व मक्तेबाजीमुळेंच तो तसें करूं शकतो, हें उघड आहे. जास्तींत जास्त नफा मिळेल या दृष्टीनें त्यानें किंमत ठेवलेली असणार व या स्थितींत जर त्यानें किंमत वाढविली तर, त्याचा नफा कमी होईल, हें उघड आहे. मक्तेदार हा नेहमीं जास्तींत जास्त

नफा, कोणत्या भावांत येईल, या दृष्टीनें भाव अगर किंमत ठरवीत असतो हें आपण मागें पाहिलें आहे. म्हणून कमाल नफ्याची मर्यादा गांठणारी किंमत तर त्यानें आधींच ठरविली आहे. प्राप्तीवरील कर त्यावर बसला म्हणून, जर त्यानें किंमत वाढविली तर त्याचा नफा कमी होईल हें उघड आहे. उलट, जर योजक वस्तूची किंमत बाजारांत निश्चित करूं शकत नाहीं, म्हणजे बाजार मोकळा असून तेथें चढा-ओढ आहे, मक्तेबाजी नाहीं, अशा स्थितींत जी बाजारांत किंमत असेल तीच त्याला मान्य करावी लागते. उत्पादनाचे किंमतीवर प्राप्तीचे कराचा परिणाम होत नाहीं. प्राप्तीवरील कर वाढला अगर बसला म्हणून, योजक उत्पादन करीत असलेल्या वस्तूंचे भाव वाढवूं शकत नाहींत. एकंदर मागणी वाढली अगर पुरवठा कमी झाला तर, किंमतीवर परिणाम होईल. सरकार कर घेतें म्हणजे जनतेपासून ऐपत घेतें, क्रयशक्ति घेतें व पुनः ती वांटून टाकतें, व त्यामुळें कांहीं पदार्थांची मागणी वाढते, कांहींची घटते, कांहीं वस्तूंचा पुरवठा वाढतो, कांहींचा कमी होतो, हें आपण मागें पाहिलें. या करांमुळें सर्वसाधारण भाव वाढण्याचें कारण नाहीं. तथापि एकंदर उत्पादनावर प्राप्तीवरील कराचा काय परिणाम होतो हेंहि पहाणें महत्त्वाचें आहे. प्राप्तीकर हा मनुष्याचे प्राप्ती-वर बसत असल्यामुळें त्याला तो चुकवितां येत नाहीं. वस्तूवर कर बसविला, तर योजक त्या वस्तूऐवजीं जीवर कर नाहीं ती वस्तु तयार करील. रंगीत कापडावर कर असेल तर गिरणीवाला पांढरें कापड काढील. कापसाचे लागवडीवर कर बसला तर, शेतकरी गहूं पेरील व कर चुकवील. पण गिरणीवाला, शेतकरी किंवा कोणीहि मनुष्य याचें प्राप्तीवर कर बसविला तर तो चुकवूं शकत नाहीं. प्राप्ति झाली कीं कर दिलाच पाहिजे. मग ती प्राप्ति, व्याजापासून, पगारापासून, दलालीपासून, दगलबाजीपासून होवो, ती कशी झाली हें पाहण्याचें कारण नाहीं. लक्ष्मीला कमला म्हणतात व कमल चिखलांत उत्पन्न होतें. भांडवलशाहींतील लक्ष्मी अन्याय व गरिबांच्या दुःखाच्या व दारिद्र्याच्या चिखलांतूनच उत्पन्न झालेली असते. म्हणून प्राप्तीचें मूळ पाहण्याचें कारण नाहीं. प्राप्ति झाली कीं सरकार कर बसविणार. देशत्याग केला व त्याजबरोबर भांडवल नेलें तर, त्याचा उत्पादनावर परिणाम होईल, तें कमी होईल व त्यामुळें भाव वाढतील. प्राप्तीचे कराचे भीतीनें, इंग्लंडमधून पुष्कळ संपत्ति बाहेर जाऊन परदेशांत गुंतविल्याचीं मोठमोठ्या देशभक्तांचीं उदाहरणें आहेत. युद्ध सुरू झाल्याबरोबर प्राप्तीवरील कर वाढेल म्हणून फ्रान्स व इंग्लंडमधून कोट्यवधि रुपयांचें भांडवल अमेरिकेंत गेलें हें जगजाहीर आहे. तथापि प्राप्तीवरील कर चुकवावयाचा म्हणजे कायम देशत्याग करावयास पाहिजे. प्राप्ति स्वदेशांत होवो अगर परदेशांत होवो; जर माणसानें देश कायमचा सोडला नसेल तर, त्याला

बहुतेक देशांतील कायद्याप्रमाणें कर द्यावा लागतो. 'अ' मुंबईस मूळचा राहणारा. हल्लीं राहतो लंडनमध्यें पण जोंपर्यंत तो मुंबईचा रहिवाशी कायद्यानें आहे तोंपर्यंत, त्याला हिंदुस्थानांत जी प्राप्ति होईल त्यावर व त्याचप्रमाणें लंडन अगर जगांत कोठेहि प्राप्ति होईल त्यावर कर द्यावा लागतो. मग तें उत्पन्न त्यानें हिंदुस्थानांत आणलेलें असो अगर नसो. लंडनला उत्पन्न झालें व तें त्यानें जरी आणलें नाहीं तरी हिंदुस्थानांत त्या उत्पन्नावर कर द्यावा लागतो. उत्पन्न मिळालें म्हणजे झालें तें कोठेंहि मिळो, कोठेंहि राहो, ज्या देशाचा नागरिक तो असेल त्या देशाचें सरकार, सर्व उत्पन्नावर कर घेईल. हा क्रम बहुतेक राष्ट्रांच्या कायद्यांत आहे. यामुळें देशत्यागानें कोणी प्राप्तीवरील कर फारसा चुकवूं शकत नाहीं. लबाडीनें प्राप्ति कमी दाखविणें हा सनातन मार्ग आहे. पण तो सत्याचा नाहीं व त्यानेंसुद्धां फारसा परिणाम होणार नाहीं. प्राप्तीवरील कर चुकवावयाचा म्हणजे प्राप्ति कमी करून घेणें हा आहे. जास्त काम करून जास्त उत्पन्न झालें, व सरकार जर त्यांतून वाढत्या पद्धतीनें कर कापून घेणार असेल तर कांहीं माणसें कदाचित् जास्त काम करणार नाहींत. त्याचबरोबर कर द्यावा लागतो म्हणून, प्राप्ति कमी होते ती वाढविण्याकरितां जास्त काम करणेंहि शक्य आहे. प्राप्तीवरील करामुळें लोकांची प्रवृत्ति कमी शिल्लक टाकण्याकडे होणें साहजिक आहे. जास्त प्राप्ति असेल तर शिल्लक जास्त टाकतील हेंहि साहजिक आहे. करामुळें लोकांची प्राप्ति जरी कमी झाली तरी, सरकार लोकांचें शिक्षणावर, आरोग्यावर, सुखसोयींवर पैसा खर्च करून त्यांचें आयुष्य जास्त सुखी करण्याचा प्रयत्न करीत असतें; देशाचे भांडवलांत भर टाकीत असतें. लोक जास्त कार्यक्षम होत जातात. प्राप्तीवरील करामुळें, मग तो व्यक्तींकडून घेतला जावो अगर कंपन्यांकडून घेतला जावो, देशांतील उत्पादनावर परिणाम होऊन तें कमी होईल असें खात्रीपूर्वक सांगतां येणार नाहीं. प्राप्तीचा कर जबर असून सुद्धां, कित्येक राष्ट्रांत उत्पादन वाढलें आहे. साधारण कर असतां तें क्वचितच कमी झालेलें आहे. प्राप्तीचे करामुळें सर्वसाधारणपणें वस्तूंचे भाव वाढतात हें म्हणणें तर चुकीचेंच आहे. प्राप्तीवरील कर वाढविला म्हणजे भांडवल कमी पडेल, म्हणून उत्पादन कमी होईल, त्यामुळें भाव वाढतील, ही विचारसरणी स्वार्थी आहे. या विचारसरणीच्या मागें संपत्ति थोड्या लोकांजवळ रहावी, हाच उद्देश आहे. विषम समाज रचनेनें मिळविलेली प्राप्ति कायम ठेवण्याकरितां उद्योगधंदे कमी होतील, भाव वाढतील, बेकारी वाढेल, वगैरेंची भीति दाखवणें ही युक्ति आहे. शास्त्रीयदृष्ट्या विचार केला असतां, प्राप्तीवरील करांमुळें उत्पादन कमी होईलच, हें म्हणणें बरोबर नाहीं. सर्वसाधारणपणें भाव

वाढतील हें म्हणणें तर पूर्णपणें चुकीचें आहे. उलट प्राप्तीवरील करामुळें संपत्तीची विषम वांटणी कांहीं तरी कमी होणें शक्य आहे.

सरकार जनतेकडून करानें पैसा घेतें याचा परिणाम काय होतो हें वर पाहिलें. कर्ज उभारूनसुद्धां सरकार जनतेकडून पैसा घेत असतें. कराचा पैसा परत मिळत नाहीं. पण संरक्षण, शिक्षण, सामाजिक सुखसोयी वगैरे रूपानें तो जनतेला परत मिळत असतो; उलट कर्ज सरकारला ऐन जिनसीं परत द्यावें लागतें व तें फिटेपर्यंत त्यावर, व्याज द्यावें लागतें. सरकारला अनेक कारणांकरितां कर्ज काढावें लागतें. कांहीं कर्जें जनतेच्या सुखसोयी, रस्ते, पूल, शाळा, कॉलेजें वगैरे वाढविण्याकरितां, कांहीं कर्ज सरकार स्वतः उत्पादन हातीं घेतें त्याकरितां काढते. रेल्वेमार्ग, पाटबंधारे वगैरे, यांपासून सरकार केवळ नफा मिळवूं इच्छित नसतें. तरी केलेलें उत्पादन फुकट देण्याचा हेतु नसतो. सरकार कालव्याचे पाण्यावर कर घेतें, उतारूंकडून भाडें घेतें. सरकार, कांहीं कर्जांचा उपयोग लोकांच्या सोयीसाठीं अगर उत्पादनासाठीं न करतां देशाचे संरक्षणाकरितां करतें. युद्ध सुरू झालें, देशावर परचक्र आले, म्हणजे त्याचें निवारण करावयास पाहिजे. पूर्वी युद्ध सुरू झालें म्हणजे वर्षानुवर्ष तें सारखें चालत नसे. हल्लींचें युद्ध म्हणजे सारखें मोठया प्रमाणावर वर्षानुवर्षे चालणारें झालें आहे. पूर्वी युद्ध जेथें चालू असेल तेथेंच भीति; हल्लीं सर्व देश रणक्षेत्र होतो. विमानें, बॉंब टाकतांना नागरिक व सैन्य यांत भेद करीत नाहींत, दारूगोळ्याचे कारखाने अगर प्रार्थनामंदिरें यांत भेद करीत नाहींत. तात्पर्य, हल्लींच्या युगांतील युद्ध म्हणजे नुसत्या सैन्यासैन्यांतील युद्ध नव्हे, तर राष्ट्राराष्ट्रांतील मनुष्यामनुष्यांत तें व्यापून राहतें, त्यामुळें तें अत्यंत खर्चाचें होतें. युद्धांत इंग्लंडचा रोजीं ११ कोटी रुपये खर्च होता. येवढा प्रचंड खर्च कोणतेंहि राष्ट्र चालू उत्पन्नांतून करूं शकणार नाहीं. निव्वळ कर बसवून या खर्चाची तोंडमिळवणी होऊं शकत नाहीं. किंबहुना आतांपर्यंतचा अनुभव असाच आहे. पूर्वीं झालेल्या युद्धांचा खर्च भागविण्यासाठीं बहुतेक राष्ट्रांनीं कर्जें काढलेलीं आहेत, व त्यांतील बरीच अद्यापि फिटावयाचीं आहेत. कर बसवून युद्धाच्या खर्चाची तोंडमिळवणी करणें म्हणजे चालू पिढीवर सर्व बोजा टाकणें अशी विचारसरणी आहे. उलट कर्ज काढलें व तें ३०।४० वर्षांत फेडलें म्हणजे फेड करण्यास सोपें जातें व कर्जाचा भार पुढील पिढीवर पडतो. देशाचें संरक्षण कांहीं चालू पिढीकरितांच करावयाचें नाहीं, तर पुढें येणाऱ्या पिढ्यांकरितांहि आहे. मग खर्चाचा बोजा कांहीं तरी त्यांचेवर पडावा हें म्हणणें अगदींच चुकीचें नाहीं. चालू पिढी प्राणदान देऊन देश वांचवितें, पुढील पिढीनें निदान द्रव्यदान तरी करावयास पाहिजे,

हाहि युक्तिवाद अगदीं बाजूस सारण्यासारखा नाहीं. कर्ज काढून, आणि देशांतच कर्ज काढून खरोखर बोजा पुढील पिढीवर लादला जातो काय? युद्धासाठीं पैसा पाहिजे म्हणजे खरोखर वस्तु पाहिजे असतात. सैन्यासाठीं माणसें पाहिजे असतात. दारूगोळा पाहिजे असतो, कपडे पाहिजे असतात, अन्नसामग्री पाहिजे असते. सरकारनें देशांत कर्ज काढलें म्हणजे त्यायोगानें माणसांत भर पडत नाहीं, किंवा जी कांहीं देशांत सामग्री असेल त्यांत भर पडत नाहीं. माणसें व सामग्री ताबडतोब पाहिजे असते. सैन्यांत येतील त्या माणसांना, पगार देण्याकरितां, सामग्री विकत घेऊन ती सैन्याला पुरविण्याकरितां पैसा पाहिजे असतो, म्हणून सरकार कर्ज काढतें. पण लागणारी प्रत्येक वस्तु व मनुष्य ताबडतोब लागत असल्याकारणानें सरकार चालू पिढीकडूनच, चालू क्षणांत त्यांना घेत असतें व त्यामुळें सर्व बोजा खरोखरी चालू पिढीवरच पडतो. लागणारीं माणसें व साधनसामग्री देशांतच असते. सरकारनें जर मनावर घेतलें तर, सक्तीनें सैन्य भरती करणें व साधनसामग्री हातीं घेणें शक्य आहे. किंवा या गोष्टी-साठीं पैसाच पाहिजे असेल तर, तो कर बसवून सुद्धां सरकार सर्वस्वीं वसूल करूं शकेल. देशांतल्या देशांत कर्ज काढून, तो बोजा पुढील पिढीवर जाईल हे खरें नाहीं. युद्धाचा बोजा चालू पिढीवर पडूं नये याला उपाय देशांत कर्ज काढणें हा नसून, तें परदेशांत काढणें हाच आहे. कारण परदेशांत कर्ज काढलें म्हणजे परदेशांतून साधन-सामग्री, दारूगोळा, अन्नवस्त्राचा पुरवठा वगैरे वस्तु युद्धासाठीं आणल्या, व त्यामुळें देशांतील युद्धोपयोगी साधनसामग्रींत भर पडली असें होतें. हें कर्ज व्याजासुद्धां द्यावयाचें म्हणजे, कर्ज काढणाऱ्या देशावर खरा बोजा असतो. कारण ज्यावेळीं कर्ज परत द्यावें लागेल त्या वेळच्या पिढीला श्रमानें तयार केलेल्या वस्तु कांहींहि मोबदला न घेतां सावकारी राष्ट्राला द्याव्या लागतील. कारण युद्धाचे वेळीं जी सामग्री कर्ज म्हणून घेतली, त्याबद्दल कालान्तरानें ही फेड करावी लागत आहे. फेड करणाऱ्या पिढीवर मात्र हा खरा बोजा आहे. कर्ज म्हणजे नुसत्या नोटा अगर नाणें नव्हे. कर्ज म्हणजे वस्तूंचा पुरवठा. याच न्यायानें कर्जाची फेड म्हणजे नोटा अगर नाणें परत करणें नव्हे तर, वस्तूंचाच पुरवठा करून फेड करणें होय. मागील महायुद्धांत अनेक राष्ट्रांनीं अमेरिकेचें कर्ज काढलें म्हणजे साधनसामग्री त्यावेळीं घेतली, व त्यानंतर साधन-सामग्रीच्याच रूपानें ती फेड करणें त्यांना प्राप्त झालें. राजकीय परिस्थितीमुळें कांहीं राष्ट्रांनीं अमेरिकेस 'खाका वर करून आंगठा दाखविला' हा भाग निराळा; पण त्याचा परिणाम दुसऱ्या महायुद्धांत अमेरिकेनें इंग्लंडला कर्जरूपानें साधनसामग्री न देतां ती भाड्यानें व खंडानें दिली म्हणजे मालकी अमेरिकेची व मोडतोड, झीज, भाडें

इंग्लंड देणार. आज अमेरिका जहाजें, विमानें, देणार व काम झाल्यावर तीं शिल्लक असल्यास परत घेणार. मोडतोडीबद्दल साधनसामग्रींत किंमत घेणार; म्हणजे अमेरिका म्हणेल ती सामग्री म्हणेल त्या वस्तु देऊन इंग्लंड फेड करणार. तात्पर्य, बोजा चालू पिढीवर पडूं नये याला उपाय परदेशीं कर्ज काढणें हा होय.

पण परदेशांत कर्ज मिळेल व वाटेल तेवढें मिळेल याची खात्री नसते. म्हणून युद्ध सुरू झाल्याबरोबर, देशांत कर्ज काढण्यास सुरुवात होते. जनतेचा विरोध असतांना हिंदुस्थान सरकारला युद्धाचे पहिल्या वर्षांत पुष्कळ कर्ज मिळूं शकलें. अर्थात् इंग्लंडला तर याहीपेक्षां जास्त कर्ज मिळूं शकलें यांत आश्चर्य नाहीं. युद्धाचा सर्व खर्च जर कर बसवून भागविला तर भांडवलवाले श्रीमंत लोक रागावतील. कारण कर बसवावयाचा म्हणजे त्याचा भार मोठ्या प्रमाणांत, ज्यांची प्राप्ति जास्त त्यांच्यावर बसणार हें उघड आहे. सक्तीनें, सामग्री व माणसें जमविणें मर्यादेपलीकडे शक्य नसते. सर्वस्वी याप्रमाणें युद्ध चालवावयाचें म्हणजे सरकारच्या स्वरूपांत आमूलाग्र फेर करणें असें होतें. देशांतील सर्व साधनसामग्री, सर्व उत्पादन, सरकारनें ताब्यांत घेणें म्हणजे भांडवलशाहीचा प्राण जी खाजगी मालकी त्यावर आघात करण्यासारखें आहे. एखाद्या उत्पादनावर व त्याच्या साधनसामग्रीवर सरकारी ताबा बसला म्हणजे तो परत मिळेल याचा भरंवसा नाहीं; म्हणून ही सक्ति सरकार—भांडवलशाही सरकार, करण्यास कचरतें. कर वाढविला तर लोक नाराज होतील म्हणून कर्ज काढणें हाच मार्ग सरकार पतकरतें. युद्धाचा खर्च इतका अवाढव्य असतो कीं तो समाजाच्या चालू उत्पन्नांतून भागविणें अशक्य असतें, श्रीमंत व धंदेवाल्या लोकांवर वाढते कर बसवूनहि सर्व युद्ध खर्च भागवितां येत नाहीं. वाढत्या करांखेरीज वाढतीं कर्जेंहि युद्धकालीं उभारावीं लागतात, तें याचमुळें होय. सामान्य लोकांना वाटतें कीं फेडीचा भार पुढील पिढीवर जाईल. जे कर्ज देतात त्यांना व्याज मिळतें व कर जास्त द्यावा लागला असता तो वांचतो. देशांत कर्ज काढून युद्ध चालविणें म्हणजे श्रीमंतांवर युद्ध चालू असतां फार बोजा बसूं न देणें, व युद्धानंतर त्यांना जास्त प्राप्ति करून देणें, हा अर्थ होतो. कर वाढत नाहीं म्हणून सामान्य प्राप्तीचे लोकहि नाराज होत नाहींत. पण त्यांच्यावर कराचा बोजा बसतोच हें ते जाणत नाहींत. देशांत कर्ज जास्त जास्त काढलें व त्यांतून युद्धाचे खर्चाची तोंडमिळवणी केली तर, चलनावर काय परिणाम होतो हें पाहणें महत्त्वाचें आहे. सरकारनें जास्त जास्त कर्ज काढण्याचें ठरविलें कीं चलनाचा पुरवठा वाढविण्याकडे त्या राष्ट्राचा कल असतो. अशा तऱ्हेनें पैसा मुबलक झाला कीं किंमती वाढतात व किंमती वाढल्या म्हणजे त्याचा परिणाम

जनतेच्या जीवनावर होतो. किंमती वाढल्याबरोबर सर्वांचें उत्पन्न त्या मानानें वाढत नाहीं: व वाढलें तरी त्याला वेळ लागतो, तोंपर्यंत आणखी कर्ज काढल्यामुळें पुनः पैसा मुबलक होतो व पुनः किंमती वाढतात. ज्यांची प्राप्ति कायम असते, असल्या लोकांचे हाल जास्त होतात. यापेक्षां सरळ कर बसवून, सरकारनें युद्ध चालविणें जास्त सुखावह; पण लोक कर देण्यास नाखूष, भाव वाढून किंमत जास्त द्यावी लागली तरी चालेल, या मताचे असतात. या त्यांच्या अज्ञानाचा, दुर्बलतेचा फायदा सरकार घेत असतें. देशांत कर्ज काढलें म्हणजे, ज्यांच्याजवळ पैसा तयार आहे अशींच माणसें कर्ज देतात. त्यांच्या पैशाला मागणी आली व त्यांचेंच उत्पन्न वाढलें. ज्यांचेजवळ रोकड पैसा नाहीं, ते कर्ज देऊं शकत नाहींत, किंवा ज्यांची प्राप्ति संसार भागविण्यापुरतीच आहे, अशींहि माणसें म्हणण्यासारखें कर्ज देऊं शकत नाहींत. मात्र कर्जाची फेड करण्याची वेळ आली म्हणजे सर्वांवर प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष कर बसतो, व स्वार्थत्यागांत मात्र बिनचूक साम्यवाद आणला जातो. एका अर्थानें ज्यांनीं आज कर्ज दिलें नाहीं, त्यांनीं उद्यांचे कर देऊन तें फेडणें म्हणजे कर्ज दिल्यासारखेंच होतें. आज त्यांना कर्ज देण्याची ऐपत नाहीं, पण त्यांचे जवळून कर घेऊन त्यांना कर्ज दिल्याचें श्रेय, देशासाठीं स्वार्थत्याग केल्याचें श्रेय, सरकारला या रीतीनें अर्पण करतां येतें; म्हणूनच कीं काय, भांडवलशाही सरकार, हा मार्ग स्वीकारीत असावें !

युद्धासाठीं काढलेलें कर्ज सोडून दिलें तर, इतर कर्ज मागें सांगितल्याप्रमाणें जनतेला मोफत सुखसोयी करून देण्याकरितां अगर राष्ट्रांतील उत्पादन वाढविण्याचे दृष्टीनें काढलेलें असतें. नद्यांचें पाणी वायां जातें, तें बंधारे बांधून, त्यांचे कालवे काढून, शेतीच्या उपयोगाला तें पाणी देतां येतें; देशांत रेल्वे काढून वाहतुकीची सोय करतां येते. अर्थात् या गोष्टी सरकारनेंच करणें योग्य आहे, पण यासाठीं पैसा पाहिजे; हा पैसा सरकार कर बसवून उभा करूं शकतें. असल्या योजनेपासून पुढें सरकारला कायम उत्पन्न होण्यासारखें असल्यामुळें, आज जरी कर बसवून हीं कामें केलीं तरी, पुढें उत्पन्न येऊं लागलें म्हणजे कर कमी होतील, हेंहि संभवनीय आहे. पण या योजना पुऱ्या होण्यास वेळ लागतो. विद्यमान कर भरणारास त्यापासून होणाऱ्या उत्पन्नाचा फायदा मिळेलच असें नाहीं. ही उत्पन्नाची वाढ कायम टिकणारी, राष्ट्राच्या भांडवलांत, संपत्तींत, यानें कायम भर पडणारी असते, व त्याचा फायदा पुढील पिढ्यांना मिळणारा असतो. या दृष्टीनें असलीं कामें कर्ज काढून करणें हें जास्त न्यायाचें आहे. यांत चालू पिढी व पुढील पिढी यांना योग्य न्याय मिळतो. योजनेचा फायदा घ्यावयाचा तर तिला लागलेला खर्चहि सोसला पाहिजे.

हा खर्च दोनतीन पिढयांवर पसरून वसूल केल्यास तें न्याय्यच होईल. सरकारनें ज्यापासून उत्पन्न येईल असल्याच योजना हातीं घ्याव्यात हें बरोबर नाहीं. समजा, जेथें दलदल आहे, तेथें ती भरून काढून तेथील लोकांचें आरोग्य वाढविणें हेंहि सरकारचें काम आहे. याकरितां कर्ज काढावें लागतें, व त्यापासून उत्पन्न होणार नसलें तरी, तें काम सरकारनेंच केलें पाहिजे. सार्वजनिक आरोग्य सुधारण्याकरितां, दवाखाने उघडण्यासाठीं कर्ज काढलें पाहिजे. शाळागृहांसाठीं कर्ज काढलें पाहिजे. सरकार रखवालदारी स्वरूप सोडून समाजसेवेची जबाबदारी थोडी तरी पत्करूं लागलें कीं, सरकारचें कार्यक्षेत्र वाढतें. भांडवलशाहीमुळें उत्पन्न होणारीं दुःखें, सरकारास कमी करणें व लोकक्षोभ थांबविणें भाग पडतें. उत्पादन जास्त जास्त भांडवलशाही स्वरूपाचें होऊं लागलें म्हणजे, संपत्ती थोड्या लोकांच्या हातांत जाते त्यामुळें गरीबांचा वर्ग वाढत जातो, तो बेकार होतो. बेकारी हें भांडवलशाहीचेंच अपत्य, उत्पादन, तेव्हां त्यांची व्यवस्था सरकारास करणें भाग पडतें म्हणजे कार्य-क्षेत्र वाढलें. उत्पादनांत यांत्रिकपणा जास्त आला, त्याबरोबर कामगारांच्या कामा-संबंधीं नियम करणें भाग पडलें, पुनः कार्यक्षेत्र वाढलें. काम करणारे आधुनिक उत्पादनांत हुशार असले पाहिजेत म्हणून त्यांना शिक्षण दिलें पाहिजे, पुनः कार्यक्षेत्र वाढलें. वृद्धांची काळजी घेतली पाहिजे, कार्यक्षेत्र वाढलें. तात्पर्य, भांडवलशाहींत विषमतेमुळें होणारा वर्गविरोध वाढून भडका उडेल, व " इंद्राय स्वाहा, तक्षकाय स्वाहा " या न्यायानें भांडवलवाले व त्यांचा भय्या सरकार, या दोघांचा निकाल उडेल, ही भीति असल्यामुळें गेल्या ५० वर्षांत भांडवलशाही राष्ट्रांतील सरकार, आपलें कार्यक्षेत्र वाढवीत आलें आहे. प्रत्येक योजनेपासून उत्पन्न झालेंच पाहिजे, असा हट्ट कोणी धरीत नाहीं. वाहतुकीचे रस्ते, त्याचप्रमाणें केवळ सोयीसाठीं अगर लष्करी दृष्टीनें बांधलेलें रेल्वे मार्ग, मोठमोठाल्या सार्वजनिक बागा व तशाच स्वरूपाच्या सोयी, मोफत शिक्षणाच्या योजना, दुष्काळनिवारणाच्या दृष्टीनें काढलेलें पाटबंधारे वगैरे अनेक बाबींवर कर्ज काढून करण्यांत आलेल्या खर्चापासून, उत्पन्न मिळत नाहीं. पण या गोष्टी करणें हें आतां सरकारचें सर्वमान्य कर्तव्य ठरलें आहे. या योजनेपासून सरकारला पैशाच्या रूपानें जरी उत्पन्न मिळालें नाहीं तरी, यामुळें देशाच्या भांडवलांत कायम भर पडते, देशांतील संपत्ती वाढते; व लोक जास्त सुखी झाले नाहींत तरी, त्यांचें दुःख थोडें तरी कमी होतें. केलेल्या खर्चावर झालेला हा फायदा, पैशानें मोजतां येण्यासारखा नाहीं. जनतेचें समाधान हेंच सरकारच्या

भांडवलावरील खरें व्याज आहे. किंबहुना जनतेचें समाधान व संतोष, हीच सरकारला अधिकारावर ठेवणारी खरी सनद आहे.

सरकारनें आपलें कार्यक्षेत्र वाढवून काय काय गोष्टी कराव्यात याला मर्यादा घालणें कठीण आहे. साम्यवादी लोक सर्वच गोष्टी, सर्वच उत्पादन सरकारनेंच करावयास पाहिजे, हें म्हणणार, किंबहुना तसें करणारें सरकार म्हणजेच साम्यवादी सरकार. पण आपण हल्लीं जगांत काय चाललें आहे याचा विचार करीत आहों. या दृष्टीनें प्रत्येक गोष्ट सरकार करीत नाहीं, व प्रत्येक गोष्टीपासून, प्रत्येक योजनेपासून, फायदा झालाच पाहिजे, असें ठरविलें तरी, तें चालणार नाहीं. रेल्वेचेंच उदाहरण घेऊं. रेल्वे बांधल्या त्या वेळीं मोटारीचा शोध नव्हता. आतां मोटारींची व रेल्वेची चढाओढ, सर्वत्र सुरू झाली, त्यामुळें रेल्वेचे उत्पन्नावर परिणाम होऊं लागला. समजा, मोटारी बंद केल्या तर रेल्वेचा फायदा पूर्वींइतका होईल. पण त्याचा परिणाम नवीन शोध व प्रगति, बंद करण्यांत होईल. जुनें यंत्र फायदेशीर रहावें म्हणून नवीं यंत्रें तयार करण्याचें कोणी बंद करीत नाहीं. तथापि सरकारच्या योजनेला चढाओढ करणारी दुसरी खाजगी योजना, सरकार चालूं देणार नाहीं; तिच्यावर नियंत्रण येणें क्रमप्राप्त आहे. जेथें रेल्वे सरकारी आहेत तेथें, मोटारीच्या वाहतुकीवर नियंत्रण आलें आहे. सरकारविरुद्ध स्पर्धा, फक्त भांडवलशाहींतच शक्य आहे. सर्वच उत्पादन सरकारच्या हातीं असतें तर ही स्थिति आली नसती. योजनेप्रमाणें मोटार वाहतुकीची मांडणी झाली असती. सरकारविरुद्ध खाजगी योजकांची स्पर्धा शक्य असल्यामुळें व होत असल्यामुळें, सर्वच योजनेंत, सर्व सरकारी उत्पादनांत, फायदा मिळेल असें नाहीं; म्हणून सरकारनें काय योजना, काय उत्पादन हातीं घ्यावें, याला मर्यादा नाहीं; व घेतलेल्या योजनेपासून उत्पन्न झालें पाहिजे अशीहि मर्यादा घालतां येणार नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें आधुनिक सरकारचें कार्यक्षेत्र वाढतच जात आहे. चालू युद्धानंतर भांडवलशाही सरकारचें काय स्वरूप राहील, व त्याचें कार्यक्षेत्र काय राहील हें सांगणें कठीण आहे. आज तरी युद्धामुळें युद्धांत गुंतलेल्या राष्ट्रांतील उत्पादनावर सरकारी नियंत्रण व ताबा बसला आहे, वस्तूंचे भाव नियमित केले गेले आहेत. उत्पादनतंत्रांत कायापालट होऊं लागलेला आहे. कर्ज, मग तें देशांत काढलेलें असो अगर परदेशांत काढलेलें असो, तें उत्पन्न देणाऱ्या गोष्टी करण्यांत खर्च झालें असलें म्हणजे, त्यापासून राष्ट्राची संपत्ति वाढते, उत्पादनसामर्थ्यहि वाढतें. त्याचप्रमाणें कर्ज, जनतेच्या सुखसोयी, आरोग्य, शिक्षण वगैरे गोष्टींकडे खर्च झालें असलें व त्यापासून राष्ट्राला जरी कांहीं उत्पन्न झालेलें दिसत नसलें तरी, राष्ट्राच्या संपत्तींत व कार्यक्षमतेंत

निःसंशय भर पडते. युद्धासाठीं काढलेलें कर्ज, याचा खरा बोजा चालू पिढीवरच पडतो, व तो बोजाहि, कर भरणारांवर पडतो. कारण, शेवटीं सरकार करांतूनच, कर्ज व्याज मुद्दलासुद्धां भागवीत असतें; म्हणजे एका वर्गाकडून संपत्ति घेऊन, दुसऱ्या वर्गाला देत असतें, आणि जगांतल्या नियमाप्रमाणें, संपत्ति संपत्तीकडे जाते ! ! श्रीमंत लोकच कर्ज देतात, त्यांनाच शेवटीं फायदा मिळतो. देशाबरोबर त्यांच्या संपत्तीचें संरक्षण होतें, नव्हे संवर्धन होतें; व या संरक्षणाचा भार मुक्या जनावरांप्रमाणें कररूपानें गरिबांनाच प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर देऊन सोसावा लागतो ! ! पुढील पिढ्यांवर बोजा तर बसत नाहींच. कर देणारे कर देतात व रोखेवाले—कर्ज घेणारे, व्याजमुद्दल खिशांत टाकतात. युद्धामुळें नाशिवंत वस्तु तयार करण्यांत राष्ट्र गुंबल्यामुळें भांडवलांत भर पडत नाहीं, सुखसोयींत भर पडत नाहीं. कायम संपत्तींत भर पडत नाहीं; येवढेंच काय तें नुकसान पुढील पिढीचें होतें. चालू पिढीवर नुसता युद्धांत प्राण अर्पण करण्याचा व त्यासाठीं काढलेल्या कर्जाचें व्याजमुद्दल देण्याचा बोजा पडतो असें नाहीं तर आणखी आपत्ति येतात. कर तरी कांहीं मर्यादेपलीकडे वाढवितां येत नाहींत. काढलेलें कर्ज देण्याकरितां दरसाल रक्कम या करांतून बाजूला काढून, त्यांतून व्याज व मुद्दल यांची फेड करावयाची असते; व एवढी रक्कम बाजूला काढल्यानंतर, गरिबांच्या, सर्वसामान्य जनतेच्या सुखसोयींसाठीं पैसा कमी उरतो, सावकारांचें व्याज भागवून मग गरीब जनतेची सोय; त्यांत कर्जावरील व्याजाची रक्कम मोठी असल्यास आणखी आपत्ति. जास्त कर बसवावयाचे तर ते श्रीमंतांवर म्हणजे सावकारांवरच, अर्थात् त्याला त्यांचा विरोध या सर्वांचा परिणाम, वर सांगितल्याप्रमाणें गरिबांच्या सुखसोयींवर होतो. तात्पर्य, युद्धकर्जामुळें, त्या पिढींतील गरीब व मध्यमवर्ग यांचें, चोहींकडून दुर्दैव ओढवतें.

---

# १९. जगाचें पुढें पाऊल

मागील भागांत कर व कर्ज यांचा विचार झाला; त्यांचे परिणाम चालू व पुढील पिढीवर काय होतात, त्याचप्रमाणें करांचा परिणाम उत्पादनावर, वस्तूंचे भावांवर काय होतो ह्याचें स्थूलमानानें विवेचन केलें. सरकार अस्तित्वांत आल्यास शेंकडों वर्षे झालीं. अगदीं रानटी स्थितींत समाज असतांनासुद्धां त्याचें नियंत्रण करणारा कोणी तरी होताच. दोन माणसें एकत्र आलीं कीं त्यांच्यांत काय संबंध रहावा हा प्रश्न उत्पन्न होतोच, व त्याचें स्वरूप सार्वजनिक असतें. कोणी कोणाचें ऐकावें, केव्हां ऐकावें, व न ऐकल्यास काय शासन मिळावें, हे प्रश्न उपस्थित होतात. समाज त्या त्या वेळेच्या त्याच्या स्वरूपाप्रमाणें या प्रश्नांची उत्तरें देत असतो. त्यांना अनुरूप अशा संस्था—शासनसंस्था, निर्माण करीत असतो. समाजांतील सत्ता, नियमांचा भंग करणारास शासन करण्यास समर्थ असलेली संस्था, म्हणजेच शासनसंस्था अगर देशाचें सरकार होय. ही सत्ता एका हातीं असो, थोड्या लोकांचे हातीं असो अगर सर्व समाजाचे संमतीनें ती चाललेली असो, या स्वरूपाच्या सत्तेशिवाय समाजाचें नियंत्रण होणें शक्य नाहीं. समाजांतील जीवन ज्या प्रकारचें असेल, त्याला अनुरूप अशी ही सत्ता असते. ज्यांच्यावर समाजांतील लोकांचें जीवन अवलंबून, त्यांच्यावरच ही सत्ता अवलंबून असणार. प्राचीनकाळीं टोळीच्या मुख्यानें शिकार करावी व सर्वांना द्यावी. शिकारीचीं साधनें त्याचेजवळच राहत. तोच त्या समाजाचा पुढारी, राजा व सरकार असे. कालान्तरानें मोठमोठ्या जमिनीच्या मालकांकडे लाखों लोक काम करीत व पोट भरीत. त्या जमिनींचे मालकांवर त्यांचे जीवन अवलंबून असे. जीवनाचें साधन जमीन व तिचे मालक, तेच समाजांतील प्रमुख व तेच त्या कारणामुळें सत्ताधारी व खरें सरकार बनले. उत्पादनाचीं साधनें कालांतरानें विविध प्रकारचीं झालीं. यंत्रें आलीं, उत्पादन विविध प्रकारचें झालें; उत्पादनाची साधनसामग्री पुनः ज्यांच्या हातीं, त्यांच्यावरच जनतेला अवलंबून रहावें लागलें. स्वतः सूत काढून अगर सूत आणून कापड विणणें, कच्चा माल आणून हातानें पदार्थ तयार करणें व विकणें, हें उत्पादनतंत्र

बदललें. पूर्वी कारागीर स्वतः कच्चा माल आणीत व आपल्याजवळील साधनांनीं त्याचा पक्का माल करीत, हें सर्व बदललें. यंत्रें आल्याबरोबर उत्पादन अनेक पटींनीं वाढलें. कारागिराला टक्कर देतां येईना, कारागीर मजूर झाले. गिरण्या आल्या, हातमाग संपले. तात्पर्य, उत्पादनांत क्रांति झाली. उत्पादनसामग्री एकाची व निव्वळ मजुरी एकाची असे वर्ग पडले. समाजांत मालक व मजूर हा भेद स्पष्ट व ठळकपणें दिसूं लागला. कारागिरानें घरीं बसून वस्तु निर्माण करणें नाहींसें झालें, त्यानें भोंगा झाल्याबरोबर कारखान्यांत पाऊल टाकणें, जरुरीमुळें पतकरलें. उत्पादनाचें प्रमाण वाढल्याबरोबर काम करणारा हा मजुरांचा वर्ग वाढला. उत्पादनाची साधनसामग्री ज्यांच्या हातीं आली त्यांच्या इच्छेवर व इशाऱ्यावर मजुरांना वागणें भाग पडलें. वस्तु विकत घ्याव्यात, तसे मजुरांचे श्रम बाजारांत परवडले तर घेतलें, नाहीं तर नाहीं, असें स्वरूप आलें. मजुरांना कामाशिवाय राहाणें शक्य नाहीं म्हणून कमी मजुरीनें काम करणें भाग पडूं लागले. मालकांना मजुरांच्या मेहेनतीपासून जें उत्पादन होई त्यापासून जास्त प्राप्ति होऊं लागली; कारण मजुरांना द्यावा लागणारा मेहेनतांना, व त्यांच्या श्रमापासून होणाऱ्या उत्पादनाची किंमत, यांत जास्त तफावत पडूं लागली. त्यामुळें जास्त फायदा झाला. नफ्यासाठीं उत्पादन होत असल्यामुळें, तो वाढविण्यासाठीं नवीन नवीन यंत्रें उपयोगांत येऊं लागलीं. स्पर्धेमुळें मोठे योजक लहानांना खाऊं लागले. आज विद्यमान जगांतील उत्पादन कांहीं अपवाद सोडल्यास या वरील पद्धतीनेंच चालू आहे. आणि उत्पादनतंत्र भांडवलशाही स्वरूपाचें असल्यामुळें उत्पादनसामग्री, उत्पादनाचीं साधनें, मोठ्या प्रमाणांत खाजगी व्यक्तींच्या हातांत आहेत. समाजाच्या जीवनाची नाडी या रीतीनें ज्यांचे हातांत आहे, त्यांच्याच हातांत खरी राजसत्ता आहे. सरकार त्यांच्या इच्छेप्रमाणें आयातमालावर कर बसवील व त्यांचें नुकसान थांबवील, त्यांना मक्तेबाजी मिळेल असे कायदे करील. त्यांच्यावर फारसा कर बसणार नाहीं, अशीच काळजी फडणीस घेईल. मजूरमालकांचे भांडणांत त्यांच्याच बाजूनें हस्तक्षेप सरकार करील. एका शब्दांत, सरकार ही भांडवलशाहीची राजकारणांत काम करणारी एक पोटशाखा आहे. तिनें कसें वागावें हें ठरविणारे उत्पादनसृष्टीचे चालकच असतात. कर व कर्ज यांचा विचार करतांना सरकार यांच्या हिताकडे पाहून वागत असतें. समाजाच्या मागसलेल्या स्थितींतील सरकार असो अगर आधुनिक सरकार असो, आजपर्यंत त्याचा कारभार करभाराशिवाय चालला नाहीं, व पुढेंहि चालणार नाहीं. करभारामुळें उत्पादनाची प्रगति खुंटली असें झालें नाहीं, किंवा सरकार विवक्षित

वर्गांच्या हिताकडे लक्ष देणारें आहे, म्हणून जगाची प्रगति, विशेषतः उत्पादनाची प्रगति खुंटली असेंहि झालें नाहीं.

गेल्या १५० वर्षांत जगांतील उद्योगक्षेत्रांत प्रचंड क्रांति झाली आहे. या औद्योगिक क्रांतीपासून कोणताहि देश सुटला नाहीं. जगांत होणारी प्रगति ही सार्वजनिक स्वरूपाची आहे. यंत्राचा शोध एका राष्ट्रांत लागला तरी थोड्याच वेळांत तो शोध सर्व जगाच्या मालकीचा होऊन त्याचा उपयोग सर्वत्र होऊं लागतो. जगांतील लोकसंख्या वाढत आहे. हिंदुस्थानांतील लोकसंख्या १९२१ सालीं ३१८·९ द. लक्ष होती. १९३१ सालीं ३५२·९ द. लक्ष झाली. १९४१ सालीं हिंदुस्थानची लोकसंख्या अदमासें ४० द. लक्ष झालेली आहे. ही लोकसंख्या शंभर वर्षांपूर्वी जी लोकसंख्या होती तिचे दुप्पट झाली; १०० वर्षांत व्यापार, उदीम, उद्योगधंदे वाढले. उत्पादन वाढत्या प्रमाणावर आहे. १८७० सालापूर्वी हिंदुस्थानांत कापडाची एकहि गिरणी नव्हती. १९४१ सालीं कापडाच्या व सुताच्या (रेशीम व जूट—तागासह) ३९८ गिरण्या असून त्यांत ५१५८१३ मजूर काम करीत होते. या गिरण्यांतून ३५७२ द. लक्ष वार कापड तयार होत होतें. पहिली रेल्वे लाईन १८५८ सालीं झाली. आज १९३७ सालामध्यें हिंदुस्थानांत ४११२८ मैल लांबीचा रेल्वे मार्ग आहे; सन १९३१ मध्यें रेल्वेंत काम करणारे मजूर ७,७७,००० होते. १९३०–३१ सालीं पाटबंधाऱ्याखालीं भिजणारें क्षेत्र अदमासें ३५·७७ द. लक्ष एकर होतें, तेंच १९३३–३४ सालीं ४८·३६ द. लक्ष एकर झालें. लोखंडाचे कारखाने, यंत्र तयार करण्याचे कारखाने, या देशांत ५० वर्षांपूर्वी नव्हते, आज ज्यांना फॅक्टरी कायदा लागू आहे, म्हणजे ज्यांना कारखाने म्हणतां येतील असे १२६१ आहेत; त्यांत १८४०५९२ मजूर काम करीत आहेत. सर्वत्र उद्योगधंद्याची वाढ होत आहे. शेतकीकडेही जास्त जास्त जमीन लागवडीस येत आहे. १९०१ सालापासून १९३४ सालापर्यंत यांत कशी वाढ झाली हें मागें आपण पाहिलें आहे. वाढत्या लोकसंख्येच्या मानानें वाढलेलें उत्पादन पुरेसें आहे कीं नाहीं, ह्या दृष्टीनें आपणास येथें विचार कर्तव्य नाहीं. उत्पादन वाढलें कीं नाहीं, या दृष्टीनें पहावयाचें झाल्यास तें वाढलें आहे असेंच म्हणावें लागेल. जगांतील स्थितीकडे पाहिल्यास हेंच दिसून येतें. पाश्चात्य राष्ट्रांत लोकसंख्या बेतानें वाढत गेल्यामुळें साहजिकच त्या राष्ट्रांतील राहणीचा दर्जा वाढला; कारण वाढलेलें उत्पादनाचें प्रमाण माणशीं जास्त जास्त बसूं लागलें. हिंदुस्थानांतील दारिद्र्य कमी झालें. असें म्हणतां यावयाचें नाहीं अगर राहणीचा दर्जा वाढला असेंहि म्हणणें कठीण जाईल. या देशांतील उत्पादनसामर्थ्य गेल्या

४० वर्षांत ज्या प्रमाणांत वाढलें, त्या प्रमाणापेक्षां लोकसंख्या जास्त वाढली. देशांतील सर्व उत्पादनसामग्री, पूर्णपणें १०० टक्के उपयोगांत आणून राहणी वाढवितां येईल असें मानणारा एक वर्ग आहे. देशांतील दारिद्र्य व हीन राहणी नाहींशी करावयाची असेल तर, देशांत सर्वत्र उद्योगधंदे वाढवून उत्पादन वाढविलें पाहिजे हें अगदीं उघड आहे. मात्र त्याबरोबर लोकसंख्येच्या वाढीलाहि मर्यादा घातली पाहिजे. कारण देशांतील उत्पादनसामग्री व उत्पादकशक्ति अमर्याद आहे, असें समजणें चुकीचें होईल. आज जी सर्वसामान्य राहणी दिसते, ती पाश्चात्य देशांतील राहणीपुढें कांहींच नाहीं. तथापि ५० वर्षांपूर्वी, दुष्काळ पडला असतां माणसें अन्नाचे अभावीं मरत; आज तशी स्थिति येत नाहीं; कारण वाहतुकीच्या साधनांत प्रगति झाल्यामुळें धान्याचा पुरवठा होऊं शकतो. १९४३ मधील बंगाल प्रांतांत पडलेला दुष्काळ हा मनुष्यनिर्मित होता. तेथील सरकार कार्यक्षम असते तर तो टळला असता व १५ लाख लोकांचे प्राण वाचले असते असाच अभिप्राय वुड–कमिशननें नमूद केला आहे. आज १९४६ सालांत आंतरराष्ट्रीय संघटन करून अन्नधान्याचा पुरवठा सर्वत्र करण्याचे प्रयत्न चालू आहेत यावरून एकंदर प्रगति किती झाली हे स्पष्ट होते. पूर्वींच्यापेक्षां कापड गेल्या ५० वर्षांत माणशीं जास्त वापरण्यांत येत आहे. मजुरांची मजुरी उद्योगधंद्यांतील क्षेत्रांत जास्त वाढली आहे. शिक्षणाचा प्रसार थोडा कां होईना झाला आहे. सरकारी कायद्यामुळें रोजच्या कामाचे तास कित्येक धंद्यांत कमी झाले आहेत. ५० वर्षांपूर्वी असलेल्या करमणुकीच्या साधनांत हल्लीं किती तरी वाढ झाली आहे. बहुतेक मोठ्या शहरीं डझनवार सिनेमागृहें आहेत. तालुक्याच्या ठिकाणींहि बहुतेक एखाददुसरें आहे. तात्पर्य, अपेक्षेप्रमाणें राहणींत फरक झाला नसला तरी, ५० वर्षांत फरक झालाच नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. जसें उत्पादन वाढलें आहे तसा त्याचा परिणाम झाला आहे व तो होणेंच प्राप्त आहे. प्रगति समाधानकारक नाहीं ही गोष्ट सत्य, दारिद्र्य संपलें असें नाहीं, पण तुलनेनें पाहतां पूर्वीपेक्षां कांहीं अंशानें तरी तें कमी झालेलें दिसत आहे. पाश्चात्य देशांत ५० वर्षांत झालेली प्रगति अफाट आहे. त्यांच्या सामान्य मजुरांच्या राहणींत सुद्धां क्रांतिकारक फरक पडला आहे. हिंदुस्थान देश शेतकऱ्यांचा, जास्त प्रगति व्हावयाची असेल तर उद्योगधंद्यांची वाढ जास्त जास्त प्रमाणांत केल्याशिवाय व्हावयाची नाहीं. जगांतील उत्पादनाची प्रगति थांबली, असें कोणीच म्हणूं शकत नाहीं. लोकसंख्येबरोबर शास्त्राचीहि वाढ होत आहे. या मागासलेल्या राष्ट्रांत तिचा वेग कमी आहे. नवीन शोध, नवीन धंदे, सारखे निघत आहेत. मोटारी आल्या, विमानें आलीं, वीज

आली, विजेच्या यंत्रांचे कारखाने निघाले, कांच कारखाने वाढले, पेट्रोलनें व विजेनें दगडी कोळशास मागें टाकलें. पूर्वी हालतीं चित्रें होतीं, पुढें मूक चित्रपट झाले, आतां बोलपट आले. या धंद्यांतून हजारों माणसें गुंतलीं आहेत; नभोवाणी आतां नवीन वाटेनाशी झाली. हाहि धंदा वाढता आहे. त्यांतील कारागीर तज्ज्ञ निराळे, साधनसामग्री निराळी, त्यांचेंहि उत्पादन वाढत आहे. ५० वर्षांत जगांतील प्रत्येक धंद्यांत उत्पादन किती वाढलें, हें पाहूं गेलें, तर प्रगति अचाट झाली असें दिसून येईल. १००|२०० माणसें नेणाऱ्या बोटी आतां राहिल्या नसून हजारों माणसें चैनीनें राहूं शकतील येवढाल्या बोटी झाल्या. खनिज संपत्ति असो, वाहतुक असो, धान्य असो, कापड असो, जगांत ५० वर्षांत सर्व वस्तूंचें उत्पादन वाढलें आहे. नवीन नवीन शोध लागतच आहेत व त्यामुळें उत्पादन वाढणें चालूच आहे. एका क्षेत्रांत शोध लागला कीं, त्याचा परिणाम सर्व उत्पादनक्षेत्रांवर होतो. विजेमुळें सर्व कारखान्यांचा फायदा झाला. मोटारीचा शोध लागला, त्याबरोबर रस्ते तयार करण्याचे शास्त्रांत प्रगति झाली. खडीचे रस्ते जाऊन सिमेंटचे आले. तात्पर्य कोठेंहि प्रगति झाली कीं ती सर्व उत्पादन क्षेत्रांत पसरते. नवे शोध सर्व जगाचे होतात; आणि आज सर्व जगाचे भाग, मापानें मोजले तर दूर अंतरावर जरी असले, तरी उत्पादनाचें दृष्टीनें इतके एकमेकांजवळ आहेत कीं, एका देशांत उत्पादनाला धक्का बसला कीं त्याचा परिणाम सर्व जगावर होतो. या झालेल्या प्रगतीमुळें आज जगाची अशी व्यापारी पेठ अस्तित्वांत आली आहे.

जगांत उत्पादनाची प्रगति झाली, उद्योगधंद्यांची, व्यापाराची वाढ झाली, याचें मुख्य कारण उत्पादनतंत्रांत यंत्रयुग अवतरलें. या यांत्रिक प्रगतीमुळें हें झालें हें उघड आहे. निरनिराळे शोध लागले, वाफेचें एंजिन निघालें, पोलाद शुद्ध करण्याचा नवीन शोध लागला, नाना तऱ्हेचे शोध लागले, त्यांचा परिणाम उत्पादनाचा वेग वाढविण्यांत झाला. एक शोध लागला, त्याच्यामागून दुसरा, याप्रमाणें हा क्रम चालू झाला. अमक्या शोधानेंच एकदम प्रगति झाली हें म्हणणें बरोबर नाहीं. एका पिढीनें जें ज्ञान मिळविलें त्यांत दुसऱ्या पिढीनें भर घातली. ज्ञानाचा वारसा हा कांहीं एका व्यक्तीला अगर एका राष्ट्राला मिळत नाहीं. ही ज्ञानसंपत्ति सर्वांची आहे. जो तिचा उपयोग करील त्याच्या उपयोगी ती पडणारी आहे. निरनिराळ्या देशांतील शास्त्रज्ञ या कामाकडे गुंतलेले असतात. माहीत झालेलें ज्ञान घेऊन, लागलेले शोध जमेस धरून, आपआपल्या प्रयोगशाळेंत नवीन शोध लावण्याचें काम ते करीत असतात. शोध लहान असो, मोठा असो. त्याचा उपयोग

करण्यांत येऊन उद्योगसृष्टींत त्याला स्थान मिळत जाऊं लागलें. अनेक शोधांचे परिणाम निरनिराळ्या प्रकारांनीं जरी झाले तरी, एकंदर उद्योगधंद्यावर, उत्पादनावर त्यांचा संकलित व सारखा परिणाम होत जातो. ज्ञान ज्ञानासाठीं नाहीं, तें जनतेच्या उपयोगासाठीं, जनतेच्या सुखसाधनांत भर घालण्यासाठीं आहे, ही दृष्टि असल्यामुळें ज्ञान व उद्योग यांत सहकार्य घडत गेलें. ज्ञानापासून मुक्ति ही आध्यात्मिक दृष्टि न राहतां त्याचा आधिभौतिकांत उपयोग करून मनुष्यांना लागणाऱ्या वस्तूंचा पुरवठा वाढविण्यांत, उत्पादनांत कष्ट कमी करण्यांत, दारिद्र्यापासून जगाची मुक्तता करण्याकडे होतो हें दृश्य दिसूं लागलें. संपत्तीच्या व समाधानाच्या कल्पनेंत बदल झाला. कमींत कमी गरजा, म्हणजे जास्तींत जास्त सुख ही कल्पना मागें पडली. भोग्य वस्तूंचा मुबलक पुरवठा यांतच सुख व समाधान हें नवीन प्रगतीचें ब्रीदवाक्य झालें. अनादिकालापासून मनुष्य परिस्थितीशीं रहाणीचा हिशोब जुळवीत असतो. जीवनाच्या इच्छा व प्राप्ती, गणितांतील लोभ ÷ लाभ हा अपूर्णांक आहे. इच्छेइतकी प्राप्ति झाली म्हणजे हा पूर्णांक होऊन मनुष्य संपूर्ण सुखी होईल, हें उघड आहे. इच्छा जास्त व प्राप्ति कमी अशा स्थितींत इच्छा कमी करून प्राप्तीबरोबर ती जुळविणें, अगर प्राप्ति वाढवून इच्छा पुरी करणें, हे दोन मार्ग आहेत. पहिला अध्यात्माचा, दुसरा आधिभौतिकाचा. आत्मा तरी शरिराच्याच मार्गें कार्य करतो. तेव्हां शरीरसंरक्षण, आधिभौतिक सुख हेंच खरें, व हें तत्त्वज्ञान या प्रगतीच्या मागें आहे. असें होणें चांगलें कीं वाईट याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. जगाच्या सुखसंपत्तींत वाढ झाली ही गोष्ट निर्विवाद. ती यंत्रयुगामुळें झाली याबद्दलहि मतभेद नाहीं. नुसत्या उद्योगधंद्यांच्या व वाहतुकीच्याच क्षेत्रांत प्रगति झाली असें नाहीं, व्यापारांतील पद्धतिहि बदलल्या. बँका वगैरे प्रकार, चलनाची फेड, मर्यादित जबाबदारीनें कामें हातीं घेण्याची पद्धत वगैरे गोष्टी आधुनिक आहेत. त्यांचा परिणाम व्यापार व उद्योग वाढविण्यांत, पत वाढविण्यांत, उत्पादन मोठ्या प्रमाणावर करण्यांत होऊं लागला. हिशोबाच्या पद्धतींतहि अनेक तऱ्हांनीं प्रगति झाली. मालाची नोंद असावी, वार्षिक मेळ असावा; उत्पादनाच्या खर्चाचे तक्ते असावेत वगैरे अनेक गोष्टी आल्या. निरनिराळे रोग असंख्य बळी घेत असत, नवीन वैद्यकीय शोध लागले. लोकांचे आयुर्मान वाढलें. प्लेग, कॉलरा, महामारी, ह्यांना आतां पूर्वींइतके बळी पडत नाहींत. सार्वजनिक आरोग्यरक्षणाच्या बाबतींतहि नवीन नवीन शोध लागून प्रगति झाली हेंहि उघड आहे. देशांतील कायदे व

शासनसंस्था यांवरहि या प्रगतीचा परिणाम झाला. कांहीं ठिकाणीं त्यामुळें प्रगतीला उत्तेजन मिळालें, कांहीं ठिकाणीं अडचणी उत्पन्न झाल्या.

उद्योगधंद्यांतील प्रगतीचा परिणाम शेतीवर झाला, आणि तसें होणें अपरिहार्य होतें; कारण मनुष्याची पहिली गरज अन्न. तेंच उत्पन्न करण्यांत जर राष्ट्रांतील सर्व-जण गुंतले तर, इतर क्षेत्रांत प्रगति होणें शक्य नाहीं. पाश्चात्य देशांत नवीन युग झाल्याबरोबर, लोक शेतीकडून उद्योगधंद्याकडे वळले. शेतीची सुधारणा करण्याकडे शास्त्रज्ञांचें लक्ष वळलें. नवीन तऱ्हेचे नांगर, वाफेचे नांगर, नवीन तऱ्हेचीं खतें, पीक पालट, नवीन शोधांचा उपयोग करून तयार केलेलें बीबियाणें वगैरे गोष्टी अस्तित्वांत आल्या. जनावरांच्या पैदाशींत सुधारणा झाली. कांहीं देशांत शेती मोठ्या प्रमाणांवर होऊं लागली. पिकांचें कीड वगैरेंनीं होणारें नुकसान यावर उपाय निघाले. नवीन नवीन प्रकारचीं धान्यें व फळें, भाजीपाला यांचा शोध लावून त्यांचें उत्पादन होऊं लागलें. एकरीं पिकाचें प्रमाण वाढलें. जमिनीची सुधारणा झाली. पुष्कळ नापीक असलेली जमीन दुरुस्त होऊन खत वगैरे पडून, पीक काढण्यास योग्य झाली. तात्पर्य, शेती व शेतकीशीं निगडित असलेले धंदे यांच्यांत प्रगति झाली. त्याचबरोबर वाहतुकीच्या साधनांत क्रांतिकारक प्रगति झाल्यामुळें शेतीच्या उत्पा-दनाला मोठी बाजारपेठ मिळूं लागली. इंग्लंडमध्यें दूध, अंडीं, हॉलंडमधून तसेंच लांबलांबच्या देशांतून भाजीपाला, फळफळावळ, येऊं लागली. कानडाचा गहूं जग-भर जाऊं शकतो. हिंदुस्थानचा कापूस व तांदूळ जगभर जातो. इटलीचा बटाटा हिंदुस्थानांत येतो. जपानमधील सफरचंद जगभर जातात. तात्पर्य, वाहतुकीच्या साधनामुळें शेतीमालाला निव्वळ त्याच देशाची पेठ न राहतां, तो माल जगभर जाऊं लागला. प्रगतीचा वेग कांहीं एकाच भागांत मर्यादित होऊन रहात नाहीं. उद्योग वाढले कीं शेती वाढते, शेती वाढली कीं उद्योगावर परिणाम होतो. किंबहुना सर्व उत्पादनाला, शरिराची उपमा दिली तर शरिराचा एक भाग सशक्त व दुसरा दुर्बल असें होत नाहीं. दंड काढलें तर नुसते हातच बळकट होतात असें नाहीं, सर्व शरिरास आरोग्य प्राप्त होतें. उत्पादनाचें असेंच आहे. एकदां चढती कमान झाली कीं, सर्वत्रच उभारीची हवा उत्पन्न होते. प्रगति सर्वव्यापी स्वरूपाची झाली आहे. शेतीसाठीं यंत्रें आलीं, त्याबरोबर शेता सुधारली. शेती सुधारल्याबरोबर यंत्रांना जास्त मागणी याप्रमाणें चक्र फिरत जातें. झालेली प्रगति आपोआप झाली असें नाहीं किंवा त्यांत कांहीं पूर्वयोजना होती, व त्याबरहुकूम झाली असेंहि नाहीं. पर्वता-वर पाऊस पडतो, त्याचा एखादा प्रवाह होतो तो जोरानें वाहूं लागतो, जे अडथळे

नाहींसें करतां येतील ते तो करीत जातो. कोठें वळण घेतो, कोठें जोरानें तर कोठें मंदगतीनें वाहतो; जसजसा तो प्रवाह पुढें जातो तसतसा त्याचा विस्तार व खोली वाढत जाते. त्याला अनेक प्रवाह येऊन मिळतात. नदी आपलें पात्र शोधत जाते, बनवीत जाते, तसेंच या औद्योगिक प्रगतीचें आहे. योजनेबरहुकूम नदीचा प्रवाह झाला नाहीं व तो कोणी आंखलाहि नव्हता. हजारों वर्षांनंतर सुद्धां कोठल्या वेळीं, त्यांत काय फरक होईल हें कोणी सांगूं शकत नाहीं. नदी पाण्यानें जीवन देते व जास्त पाण्यानें नाश करते. आजहि भांडवलशाहींत जास्त उत्पादन जीवनाचा नाश करीत आहे. नवे नवे शोध मूळच्या उत्पादनप्रवाहाला मिळाले, त्याचा व्याप वाढला, खोली वाढली, तथापि नवीन शोध झाले तरी ते नुसते कांहींच करूं शकत नाहींत. नवीन शोधाला भांडवलाची जोड मिळाली तेव्हांच त्याचा उपयोग झाला. जहाजें, रेल्वे, यंत्रसामग्री हीं प्राप्त झालेल्या ज्ञानाचीं, शोधांचीं मूर्तिमंत रूपें आहेत. प्रत्येक शोध अशाच वस्तूंत, मग यंत्र असो, संघटना असो, विलीन व्हावा लागतो, त्याशिवाय त्याला किंमत नाहीं. कांहीं शोध लहान लहान स्वरूपांत असले तरी, त्यांनीं देखील मोठी कामगिरी केली आहे. त्यांचा उपयोग करतांनासुद्धां भांडवल लागतेंच. जी प्रगति झाली ती आपोआपच झाली नाहीं. जें ज्ञान, जे शोध, शास्त्रज्ञांनीं लावले, त्यांना भांडवलाची जोड देऊन प्रत्येक उत्पादनसृष्टींत स्थान दिलें गेले. योजकांनीं हें घडवून आणलें; योजनेप्रमाणें सर्व घडतें असें नाहीं. प्रगति कांहीं कल्पिली, कांहीं झाली, कांहीं वेळां कल्पनातींत झाली.

जशी उत्पादनांत प्रगति झाली, उद्योगधंदे जसे वाढले, तसतशी श्रमविभागणी जास्त जास्त होऊं लागली. एकच वस्तु, एकच कारागीर न करतां हजारोंचे हात तिला लागूं लागले. दसकी मेहनत एकका माल असें म्हटलें तरी चालेल. एकाच धंद्यांत अनेक शाखा, तशाच उत्पादनांत अनेक अवस्था झाल्या. वस्तु पूर्ण होण्यापूर्वी अनेक संस्कारांतून तिला जाणें भाग पडूं लागलें. आधुनिक उत्पादनपद्धति अगदीं घड्याळा-प्रमाणें आहे. घड्याळांतील अनेक चाकें, पुढें मागें फिरली म्हणजे तक्त्यावरील कांटा फिरावयाचा; म्हणजे कांटा हलण्यापूर्वी अनेक चक्रांना गति द्यावी लागते, त्याचप्रमाणें कच्च्या मालापासून उपभोग्य वस्तु, संपूर्ण वस्तु, तयार होईपर्यंत अनेक यंत्रें फिरावी लागतात, अनेक कारागिरांचे देखरेखी खालून त्या कच्च्या मालाला जावें लागतें. मागें सांगितल्याप्रमाणें चौऱ्याशीं लक्ष नसले तरी अनेक उत्पादकयोनींतून प्रवास केल्यानंतर संपूर्ण वस्तु, उपभोग्य वस्तु, तयार होते. हें श्रमविभागणीचें स्वरूप, प्रगतीचा एक भाग आहे. यांत्रिक प्रगति, भांडवल, श्रमविभागणी, या सर्वांच्यामुळें उद्योगधंद्यांत

औद्योगिक क्षेत्रांत प्रगति झाली हें उघड आहे. यांत्रिक शोध अगर अन्य शोध लागला तरी, त्याला भांडवलाची जरूरी, व या दोघांनाहि कुशल कारागिराची जरूरी! त्यांचा जसा मेळ बसत गेला तशी प्रगति होत गेली, त्याबरोबर उत्पादन वाढलें. जास्त नफा होऊं लागला. जास्त नफ्याबरोबर भांडवल वाढले, ते वाढल्याबरोबर नवीन शोध, नवीन ज्ञान पैदा करण्याची व त्याचा उपयोग उत्पादनाचे कामीं करण्याची प्रेरणा वाढली. नवीन शोध, नवीन यंत्रें, नवीन पद्धतीनें उत्पादन, हें सारखें चालूच आहे. एकंदरींत गेल्या शंभर वर्षांत उत्पादनाची कमान वाढती आहे. हा विस्तार सारखा वाढत आहे. समुद्राची एक लाट यावी ती मागें जावी व पुनः दुसरी येऊन पहिली-पेक्षां जास्त प्रदेश भिजावा असेंच स्वरूप, या उत्पादनाच्या विस्ताराचें आहे. कांहीं वेळां प्रगतीचा आवेग जोराचा, कांहीं वेळां किंचित् स्तब्ध, कांहीं वेळां मागें गेलेलाहि वाटेल. पण या बाबतींत एकंदरीनें जगाचें पाऊल पुढेंच आहे.

वर प्रगतीचा आवेग सर्वकाळ सारखा नसतो असें सांगितलें. कांहीं खळबळ, कांहीं निवळ असें होत असतें तें कां? प्रगतीच्या वेगाला व विस्ताराला प्रतिबंध करणारी, विरोध करणारीं कारणें कोणतीं? मोठमोठाले पूर येऊन प्रदेशचे प्रदेश उध्वस्त होतात. ओरिसा व बंगाल्यांतील कांहीं भागांना, ही कायमची साडेसाती आहे. चीन देशांतील पुष्कळ भाग असल्या आपत्तीला सालोसाल बळी पडत असतो. प्रसंग-विशेषीं अतिवृष्टी होऊन माणसें व मालमत्ता यांचा पुष्कळ नाश होतो, धरणीकंपानें गांवचे गांव गडप होतात. टोळधाडी, झंझावात वगैरे गोष्टींनीं पिकांची व मालमत्तेची नासाडी होते. तुफानेंहि कांहीं कमी बळी घेतात असें नाहीं. पण या सर्व आपत्तीं-पासून जगाचें जेवढें नुकसान झालें नाहीं तेवढें जगांतील युद्धांमुळें झालेलें आहे. वरील आपत्ति सांगून येत नाहींत. मनुष्य त्यांपुढें निर्बल होतो. या निसर्गाच्या गोष्टींवर त्याचा ताबा नसतो. पण लढाया, युद्धें ही तर मानवांनीं जगांत उत्पन्न केलेली आपत्ति; ही टाळतां येण्यासारखी असून, ती टाळली जात नाहींच, तर उलट हल्लींचीं युद्धें जगाच्या मुळावर आलेलीं दिसतात. युद्ध म्हणजे सर्व दृष्टींनीं संकट आहे. प्रगतीला अडथळा करणारी सर्वांत मोठी धोंड युद्ध आहे. युद्ध सुरू झालें कीं, जवळ जवळ सर्व देशांतील उत्पादनसामग्री व साधनें युद्धसामग्री उत्पन्न करण्याकडे लावली जातात; माणसें उद्योग-धंद्यांतून काढली जाऊन त्यांची सैन्यांत भरती केली जाते. आरमार, सैन्य, विमान-तळ, यांच्यांतून वांचलेलीं माणसें, दारूगोळ्याच्या कारखान्यांत व अन्य युद्धसामग्री तयार करण्याचे कारखान्यांत गुंतविलीं जातात. याचा देशांतील नेहमींच्या उत्पादनावर परिणाम होतो. उपभोग्य वस्तूंचें—लोकांच्या नेहमींच्या उपयोगांतील वस्तूंचें—

उत्पादन कमी होतें. त्या मानानें लौकरच बाजारांत पैसा मुबलक होतो. त्यामुळें किंमती वाढतात. अवश्य असलेल्या व नेहमीं घेण्यांत येणाऱ्या गोष्टी कमी होऊं लागल्यामुळें त्याचा परिणाम रहाणीवर होतो. युद्धानंतर राष्ट्राची उत्पादकशक्ति शांततेच्या काळांत अवश्य असणाऱ्या उत्पादनाला पुरेशी रहात नाहीं. लाखों माणसें युद्धांत मरतात, लाखों जायबंदी होतात. विशेषतः युद्धांत मरणारे व जखमी होणारे तरुणच असल्यामुळें, राष्ट्राच्या कारागिरीच्या दृष्टीनें व लोकसंख्येच्या दृष्टीनें मोठी हानि होते. युद्धानंतर मुलें व म्हातारे यांचें प्रमाण जास्त होतें! युद्ध चालू असतांना उत्पादनसंच चांगल्या स्थितींत रहात नाहीं. माणसें, मालमत्ता, उत्पादनशक्ति, या सर्वांवर युद्धाचा परिणाम होतो, व त्यामुळें प्रगतीला अडथळा होतो; उत्पादन कांहीं काळ मंदावलेलें रहातें.

कांहीं लोकांच्या मतें लोकसंख्या मोठ्या प्रमाणांत वाढली म्हणजे उत्पादनाच्या वाढण्यामुळें झालेले फायदे नाहींसें होतात; व झालेली प्रगति निरुपयोगी ठरते. समजा, उत्पादन १०वर्षांत १०टक्के वाढलें व राष्ट्राची लोकसंख्या २५टक्के वाढली तर, पूर्वींपेक्षांहि उत्पादनाची माणशीं सरासरी कमीच होईल. वाढतें उत्पादन कांहीं वेळ रहाणी सुधारील, पण लोकसंख्या वाढत जाईल त्या प्रमाणांत उत्पादन वाढणार नाहीं व त्याचा परिणाम एकंदर रहाणी कमी दर्जाची होण्यांत होईल. रोगराई कमी झाली, जनतेचें आरोग्य सुधारलें म्हणजे मृत्युसंख्या कमी होईल, व जन्मसंख्या वाढेल. अगर पूर्वींइतकी जरी राहिली तरी, एकंदर लोकसंख्येंत भर पडेल व त्याचा परिणाम रहाणी पुनः पूर्वपदावर येण्यांत होईल. लोकसंख्येंत किती वाढ व्हावी हें ठरविण्याचें मनुष्याच्या हातीं आहे काय? उत्पादन किती वाढवितां येईल, किती करतां येईल, हें मनुष्य ठरवूं शकेल. पण लोकसंख्येचे बाबतींत तसें होणें शक्य आहे कां नाहीं हें पाहणें मोठें महत्त्वाचें आहे. सर्वसामान्यपणें लोकसंख्येंत दरसाल १ हजारीं ४५ भर जन्मानें पडली म्हणजे ती योग्य समजतात. त्याचप्रमाणें दरहजारीं दरसाल १५ मृत्यु झाले म्हणजे ते योग्य समजतात. या दृष्टीनें लोकसंख्या २३ वर्षांत दुप्पट होणें हें योग्य असें मानलें जातें. खालील आंकडे निरनिराळ्या राष्ट्रांचे दिले आहेत. त्यावरून जर पाहिलें तर पाश्चात्य देशांतील लोकसंख्या यथाप्रमाण वाढली नाहीं हें उघड आहे.

## १८७० ते १९३० पर्यंत लोकसंख्येंतील निरनिराळ्या देशांतील वाढ

| नांव | | १८७० | | १९३० | | शेंकडा वाढ |
|---|---|---|---|---|---|---|
| | | (आंकडें द. लक्षांत आहेत.) | | | | |
| युरोप | ... | ३०७·६५ | ... | ५०५·७ | ... | ६४ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| जर्मनी | ... | ४०·८६ | ... | ६४·८५ | ... | ६० |
| इटली | ... | २६·३५ | ... | ४१·१ | ... | ६३ |
| स्पेन | ... | १६·३३ | ... | २३·५८ | ... | ४४ |
| इंग्लंड वेल्स | ... | २२·८ | ... | ३९·८९ | ... | ७७ |
| फ्रान्स | ... | ३६·८ | ... | ४१·८ | ... | १४ |
| रशिया | ... | ७५·२ | ... | १६१·०० | ... | ११५ |
| डेन्मार्क | ... | १·७९ | ... | ३·५५ | ... | १०० |
| यु. स्टेटस् | ... | ५०·०० | ... | १२३·६ | ... | १२५ |
| जपान | ... | ३०·०० | ... | ६४·७ | ... | ११३ |

लोकसंख्याविषयक प्रश्न मोठा गुंतागुंतीचा आहे. पाश्चात्य देशांतील रहाणी लोकसंख्या वाढूनसुद्धां जास्त जास्त सुधारत गेली आहे. पण वरील आंकड्यांवरून ही वाढ मोठी आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. ही जी वाढ कमी प्रमाणांत होत आहे, ती जाणूनबुजून होत आहे. संततिनियमनाचा हा परिणाम आहे. हिंदुस्थानांत लग्नें लवकर म्हणजे अगदीं पाळण्यांत व शिवाय संततिनियमन वगैरे कांहीं नाहीं. उलट मुलें म्हणजे परमेश्वराची देणगी, मग ती कायम ठेवण्याकरितां त्यांना पुरेसें अन्न आहे कीं नाहीं, याचा विचार कोणी करीत नाहींत. पाश्चात्य देशांत लग्नाचें वय सरासरीनें मुलांचें व मुलींचें पुढीलप्रमाणें आहे. इंग्लंड व वेल्समधील आंकडे सर्वसाधारणपणें पश्चिम युरोपमधील आंकड्यांची कल्पना देतात म्हणून दिले आहेत.

| | पुरुष | स्त्री |
|---|---|---|
| खाणी कामगार | २४ | २२·४ |
| कारागीर | २५·३ | २३·७ |
| दुकानदार | २६·६ | २४·२ |
| इतर वर्ग | ३१·२ | २६·४ |

हिंदुस्थानांतील १५ ते ४० वर्षांच्या स्त्रियांमध्यें शें. ५ स्त्रिया अविवाहित असतात, तर इंग्लंड वेल्समध्यें हें प्रमाण शें. ३६ असतें. इंग्लंडमधील निरनिराळ्या धंद्यांतील लोकांचें लग्नाचें सरासरी वय वरीलप्रमाणें आहे. यावरून पुष्कळ बोध होण्यासारखा आहे.

तात्पर्य, मनुष्य लोकसंख्येवर नियंत्रण घालूं शकतो. पण हा विषय इतका नाजुक आहे कीं, त्याबद्दल बोलणें, चर्चा करणें सुद्धां, कांहींना धर्माविरुद्ध वाटतें. रहाणी चांगली असावी, हें ध्येय असलें तर, लोकसंख्येचें नियंत्रण, उत्पादनाच्या मानानें

करणें अवश्य आहे व तें शक्य आहे. एकदम लोकसंख्या कमी झाली तर उत्पादन कमी होईल; व रहाणी पण कमी प्रतीची होईल, हेंहि तितकेंच खरें. लोकसंख्या अफाट नसावी, अगदीं अपुरीहि नसावी. ज्याप्रमाणें उत्पादन त्याप्रमाणें ती असावी ही गोष्ट योजनापूर्ण रीतीनें शक्य आहे. चीन, हिंदुस्थान वगैरे देशांत लोकसंख्येची वाढ प्रमाणाबाहेर होत आहे; व देशांतील १०० टक्के सामग्री पूर्णपणें उपयोगांत आणून सुद्धां, सामान्य राहणीला ती पुरेल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. बालविवाहाला बंदी आणि त्याहिपेक्षां संततिनियमनाचा अवलंब करणें, अवश्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. या प्रश्नाचा नैतिक दृष्टीनें विचार येथें करतां येत नाहीं, पण त्यांत अनैतिक कांहींहि नाहीं हें मत नमूद करणें जरूर आहे. वेळींच उपाययोजना झाली तर योग्य होईल. ज्या देशांत उत्पादनाची वाढ मोठ्या प्रमाणावर झाली आहे, व लोकसंख्या त्या प्रमाणांत वाढलेली नाहीं, त्या देशांत या गोष्टीचा परिणाम उत्पादनावर होईल. उत्पादन कमी होईल व घटलेली लोकसंख्या प्रगतीला विरोधक होईल. तात्पर्य, प्रमाणाबाहेर जास्त लोकसंख्या अगर प्रमाणापेक्षां कमी लोकसंख्या, या दोहोंचाहि परिणाम उत्पादनावर होतो, व प्रसंगीं औद्योगिक प्रगति व विस्तार यांना त्यांचा अडथळा होतो.

निसर्गाच्या आपत्ति, मनुष्यांनीं केलेलीं युद्धें व लोकसंख्या, या गोष्टींचा परिणाम उत्पादनाच्या आवेगावर, प्रगतीवर होतो हें तर वर सांगितलेंच; पण मंदीचा परिणामहि एकंदर उत्पादनावर होत असतो. याचा थोडासा उल्लेख पूर्वी येऊन गेला आहे. बाजारांत कांहीं काळ तेजी व कांहीं काळ मंदी अशी उलटापालट चाललेली दिसून येते. व्यापारधंद्यांतहि हे चढउतार होतात, त्याचीं अनेक कारणें आहेत. उद्योगधंद्यांतील भांडवल कमीजास्त झाल्यामुळें, या चढउतारांवर काय परिणाम होतो, हें पाहणें जरूर आहे. कारण उत्पादनाचा व एकंदर औद्योगिक प्रगतीचा जो एवढा विस्तार झाला आहे, त्याचें कांहीं श्रेय भांडवलाला आहे, म्हणून त्याचा चढउताराशीं काय संबंध येतो हें पाहणें जरूर आहे. येथें भांडवल म्हणजे उत्पादक वस्तु, यंत्रें, इमारती, कच्चा माल वगैरे व त्याचप्रमाणें बऱ्याच काळ टिकणाऱ्या व्यक्तिगत उपयोगाच्या वस्तु, टेबल, खुर्च्या, राहण्याचीं घरें वगैरे या अर्थानें समजलें पाहिजे. यांतील कांहीं वस्तु, एकंदर उत्पादनसंच तसेंच मांडणी कायम राहण्याकरितां अवश्यक असतात. यंत्रांच्या मोडतोडीची दुरुस्ती करावी लागते, घरांची दुरुस्ती करावी लागते. या दृष्टीनें त्यांवर होणारा खर्च म्हणजे पुनः त्याच स्वरूपाचा समजला पाहिजे. एकंदर भांडवलांतून दुरुस्ती वगैरेंचा भाग कमी केला पाहिजे. नवीन उत्पादन करावयाचें म्हणजे, मजुरी द्यावयास

पाहिजे, मालाची किंमत द्यावयास पाहिजे, उत्पादनसामग्री जी लागेल ती ध्यावयास पाहिजे. या सर्व गोष्टी करण्याकरितां लागणारें भांडवल कोठून येतें तें पाहूं. जुन्या भांडवलांतूनच ही गोष्ट करावयाची, नवीन सांचविलेलें भांडवल असेल त्यांतून करावयाची अगर शिलकी पैसा किंवा पतीनें वाढविलेला पैसा घेऊन देखील करावयाची. बँका पत वाढवून नवीन पैसा उभा करतात, तो कसा होतो, हें आपण मागें पाहिलें आहे. नवीन पैसा आला म्हणजे तो जुन्यांत भर टाकतो; एकंदर बाजारांत पैसा मुबलक झाला म्हणजे पदार्थांच्या किंमती वाढतात. ज्यांची प्राप्ति कायम, त्यांचे हाल होतात त्यामुळें ते आपला खर्च आंखडता घेतात. शिलकी पैसा जो बँकांतून पडून असतो तो उपयोगांत आणला तरी हाच परिणाम होतो. कारण बाजारांत खेळता पैसा, मुबलक झाला कीं किंमती वाढणें अपरिहार्य होते. मुबलक पैसा झाला म्हणजे तो उद्योगधंद्यांत येतोच असें नाहीं. ज्यांना पैसा जास्त मिळूं लागतो व जे वांचवूं शकतात ते पुनः बँकेंत टाकतील अगर स्वतःजवळहि ठेवतील. बँकेंत ठेवल्यास बँकेजवळ आणखी पैसा वाढला, व बँकेनें व्याजाचा दर कमी केला तरी, योजकवर्ग—उद्योगधंदेवाले, तो घेणार नाहींत; कारण वाढत्या किंमतीमुळें अस्वस्थतेचें वातावरण निर्माण होतें, त्याचा परिणाम उत्पादनावर होतो. सर्वत्र किंमती वाढूं लागल्या म्हणजे उत्पादनसामग्रीच्याहि किंमती वाढतात. त्यामुळें उत्पादन वाढविणें परवडत नाहीं. उत्पादन कमी होऊं लागतें, व मुबलक पैसा असून बँका कमी व्याजानें देण्यास तयार असून तो घेतला जात नाहीं, व उत्पादनाला तेजी येत नाहीं. नुसता व्याजाचा दर कमी झाला म्हणजे उद्योगधंदा वाढेल असें नाहीं; त्यांत नफा होण्यासारखी परिस्थिति पाहिजे. तशी असेल तर त्यामध्यें पैसा गुंतविण्यास लोक तयार होतात. व्याज कमी द्यावें लागलें म्हणजे खर्च कमी होतो हें जरी खरें असलें तरी, तेवढयावर नफा अवलंबून नाहीं. उत्पादनाच्या विक्रीच्या उत्पन्नापेक्षां खर्च, सर्व खर्च कमी असेल तरच नफा होणार. म्हणून जर उत्पादनापासून जास्त उत्पन्न येणार असेल, मागणी वाढणार असेल तरच योजक उत्पादन वाढवितील अगर नवें सुरू करतील; म्हणजे नफा मिळेल अशी खात्री असल्याशिवाय, अशी बाजाराची परिस्थिति असल्याशिवाय, तें पुढें पाऊल टाकणार नाहींत. नुसता व्याजाचा दर कमी झाला येवढ्यानें भागत नाहीं. नफा होईल अशी निश्चित परिस्थिति असेल तरच, उत्पादनांत नवीन भांडवल येईल. जेव्हां जेव्हां बाजारांत, उद्योगधंद्यांत तेजी झाली, तेव्हां तेव्हां भांडवल मोठ्या प्रमाणांत गुंतविलें गेलें. मंदींत त्याच्या उलट झालें असें दिसून आलें. मंदींत भांडवल उत्पादक वस्तूंवर, उत्पादक सामग्री, या अर्थानें कमी कमी गुंतविलें गेलें. तेजीमध्यें उत्पादक

वस्तु, उत्पादकसामग्री वाढते, मंदींत कमी होते. तेजींत उपभोग्य वस्तूंचें उत्पादन, म्हणजे चालू गरजा भागविणाऱ्या वस्तूंचें उत्पादन, त्या मानानें वाढत नाहीं. मंदींत त्या वस्तूंचें उत्पादन त्या मानानें कमी होत नाहीं. तेजी झाली म्हणजे धंदा वाढवावयाचा म्हणून, भांडवल स्वरूपाच्या वस्तु, यंत्रसामग्री, इमारती वगैरे योजक जास्त घेतात. त्यांचेंच उत्पादन जास्त होतें. मंदींत त्याच्या उलट होतें. मंदींत भांडवल स्वरूपाच्या वस्तूंचें उत्पादन फारच कमी, उपभोग्य वस्तूंचें—रोजच्या गरजेच्या वस्तूंचें—उत्पादन तितकें कमी होत नाहीं, कारण रोजच्या गरजा मंदींत सुद्धां फारशा कमी करतां येत नाहींत. याचा विशेष परिणाम जे उभारणीचे धंदे आहेत, त्यांवर होतो. यंत्रें तयार करण्याचे, उत्पादकसामग्री तयार करण्याचे धंदे, यांच्यावर हे परिणाम ठळकपणें झालेले दिसतात. मागणी वाढली म्हणजे त्यांची भरमसाट वाढ होते, कमी झाली म्हणजे अगदीं निकालीं निघण्याची वेळ येते. योजकांना नफा मिळेल असें वाटूं लागलें कीं लागलीच भांडवल येऊं लागतें; व नुकसान येईल असें वाटूं लागलें कीं तें कमी होऊं लागतें; त्याचा परिणाम उत्पादनावर होतो व भांडवलावर तर होतोच होतो. व्यापारधंद्यांतील चढउतार, या रीतीनें भांडवलावर परिणाम करतात.

बाजारांतील ही तेजीमंदी, हे चढउतार हा एक ठरलेला क्रम गेल्या १५० वर्षांतील उद्योगधंद्याच्या इतिहासांत दिसून येतो. महिन्यांत १५ दिवसांनीं पौर्णिमा व नंतर १५ दिवसांनीं अमावास्या व पुनः १५ दिवसांनीं पौर्णिमा हा जसा सृष्टीचा क्रम अव्याहत चालू आहे, तसेंच व्यापारधंद्याच्या सृष्टींत तेजी, पुनः मंदी, पुनः तेजी, असा क्रम सारखा अव्याहत चालू आहे. व्यापारधंद्यांत कमीजास्त परिस्थिति असणें हें स्वाभाविक आहे. पण हे जे तेजीमंदीचे प्रकार दिसून येतात, ते व्यापक प्रमाणावर असून बराच काळ टिकणारे असतात. तेजी सुरू झाली कीं ५–१० वर्षें तरी तेजीचें वातावरण रहातें. मंदी सुरू झाली कीं ५–१० वर्षें मंदीचें वातावरण रहातें. रहाटगाडग्याचें काम चालू असलें म्हणजे कांहीं पोहरे भरतात, कांहीं रिकामें होतात, रिकामे पुनः भरतात तर भरलेले रिकामे होतात. भरून वर वर येणारे, शेवटीं एकदम आडवे पडून रिकामे होतात, जवळ जवळ तेंच दृश्य उत्पादनसृष्टींत असतें. हल्लीं उत्पादनसृष्टींत वरील रहाटगाडग्याचें दृश्य दिसत आहे. मंदी सुरू झाली म्हणजे लाखों लोक बेकार होतात, मोठ्या प्रमाणावर उत्पादन साधनसामग्री, काम नसल्यामुळें निरुपयोगी पडते. हें कां व्हावें ? अमावास्येमागून पौर्णिमा, दिवसामागून रात्र याप्रमाणें यांतहि कांहीं निसर्गाचा हात आहे काय ? सर्व

उत्पादन मनुष्य निर्माण करीत असतांना, मनुष्याकरितां निर्माण करीत असतांना हे प्रसंग कां यावेत ? हे खरोखरच अटळ आहेत काय ? वगैरे प्रश्न ताबडतोब दत्त म्हणून उभे राहतात. गेल्या शतकांत अनेक वेळां याप्रमाणें घडून आलें. प्रत्येक वेळेस कांहींना कांहीं तात्कालिक नाममात्र कारण घडलें असलें तरी, सर्वसामान्य कारणें विचारवंतांनीं शोधून काढलीं आहेत. अर्थात् यांत सर्वांचें एकमत नाहीं. तथापि, हीं कारणें कोणतीं तें आपण पाहूं. जेव्हां जेव्हां तेजी झाली, तेव्हां तेव्हां खेळता पैसा मोठया प्रमाणावर होता, व त्याचप्रमाणें शिलकी पैसा कमी होता, असें दिसून आलें. तसेंच तेजी झाली तेव्हां वस्तूंच्या किंमती वाढत्या होत्या हेंहि दिसून आलें. क्वचित् प्रसंगीं तेजी असून किंमती वाढल्या नाहींत, पण त्याचें कारण उत्पादनखर्च, नवीन शोधामुळें, प्रगतीमुळें, कमी झाला; पण मुख्य गोष्ट म्हणजे नफ्याचा दर वाढला होता. तेजींत नफ्याचा दर वाढता असतो, आणि म्हणून नवीन नवीन भांडवल उत्पादनांत, उद्योगधंद्यांत, शिरत असतें. नफ्याचा सुवर्णमृग मोह पाडून, दूर दूर नेतो व शेवटीं नाहींसा होऊन उजाड अरण्य, मंदी, नुकसान यांचें वातावरण दिसूं लागतें. बाजार तेजींत असला म्हणजे उत्पादनाचें प्रमाण वाढतें. मजुरांना काम पुष्कळ म्हणून बेकारी कमी होते. उलट मंदी सुरू झाली कीं उत्पादनाचें प्रमाण कमी, त्याबरोबर मजुरांना काम कमी म्हणून बेकारी वाढूं लागते. तेजींत योजक नफ्याच्या निशेंत धुंद असतात, मंदींत नुकसानीमुळें त्यांचे डोळे पांढरे होऊं लागतात.

जेव्हां जेव्हां मंदीचें वातावरण आलें, त्या त्या वेळेस उत्पादन आंकसलें, बेकारी वाढली, साधनसामग्री निरुपयोगी पडली, असें दिसून येतें. अर्थात् बेकारी ही उद्योगधंद्यांचे क्षेत्रांत जास्त प्रमाणावर असतें; व उत्पादन जें कमी होतें, तेंहि मुख्यत्वें उद्योगधंद्यांतील क्षेत्रांत आणि त्यांत विशेषतः उभारणीच्या धंद्यांतील उत्पादनांत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शेतीचें उत्पादन मंदींत कमी होत नाहीं, किंवा स्वतः मेहनतमशागत करणारा शेतकरी, कमी उत्पादन करतो असेंहि होत नाहीं. भाव कमी झाल्यामुळें त्याची प्राप्ति मात्र कमी होतें. मंदींत किंमती कमी होतात, पण शेती मालाच्या किंमती जास्त प्रमाणांत कमी होतात. इतर उत्पादनांत, उत्पादन आपोआप कमी होत जातें, किंमती सांवरून धरतां येतात. शेतकऱ्याला तेंहि शक्य नसतें. पूर्वी इतकेंच काबाडकष्ट करून, पिकविलेला माल मातीमोल किंमतीनें विकावा लागतो, हा अनुभव या देशांत अगदीं ताजा आहे. ज्या देशांत उद्योगधंदे जास्त, त्यांतील मजुरीवर राहणारा वर्ग मोठा, तेथें बेकारी वाढली म्हणजे कठीण परिस्थिति निर्माण होते.

आतांपर्यंतच्या मंदीचे काळाचा विचार करतां, ही बेकारी सरासरीनें १५ टक्के येत असली तरी, प्रसंगीं ३० टक्केपर्यंत गेलेली आहे. दर तिसरा मनुष्य बेकार म्हणजे कांहीं चांगली स्थिति नव्हे. २।४ टक्के बेकारी ही केव्हांहि असावयाचीच पुष्कळ वेळा लोक स्वतः नालायक असल्यामुळें बेकार होतात. मंदींत माणसाबरोबर, यंत्रांना, साधन-सामग्रीलाहि बेकार व्हावें लागतें, ती रिकामी पडते.

रिकामीं पडलेलीं उत्पादनाचीं साधनें व सामग्री, १०।१५ टक्के बेकार असलेली मजुरांची संख्या, याचा अर्थ राष्ट्रशरिरांत दोष असला पाहिजे हें उघड आहे. तो घालविण्याचे प्रयत्न सर्व भांडवलशाही राष्ट्रांत चालूच आहेत. कांहीं ठिकाणीं बेकारी-भत्त्याची योजना असून मुख्यत्वें त्याचा भार, नफा मिळविणाऱ्या योजकांवर व निव्वळ व्याजांवर रहाणाऱ्या लोकांवर टाकण्यांत येत असतो. मंदीमुळें लोक बेकार होतात, त्याचप्रमाणें जे कामावर रहातात त्यांच्या मजुरीवरहि धाड येते. मालकांना परवडत नाहीं म्हणून ते पगारकाट करण्याचा प्रयत्न करतात. जेथें मजुरांचे संघ संघटित असतात तेथें पगारकाट होत नाहीं व पगारकाट झाली नाहीं तर किंमती कमी झाल्यामुळें, या मजुरांचें खरें उत्पन्न वाढतेंहि. बेकारीभत्ता जो मिळतो तोसुद्धां, जो पगार, जी मजुरी होती, त्या मानानेंच असतो. एकंदर मंदीचें चक्र जाऊन, पुनः तेजी येऊन, पुनः मंदी आली तरी, पहिल्या मंदींचे मानानें, तिचें स्वरूप निराळें असतें. दोन मंदींच्या दरम्यान रहाणींत जी वाढ झाली असते, ती बाजूला सारून चालत नाहीं. दोन मंदींचे काळांतील तुलना करण्याजोगे मजुरीचे दर घेतलें तर, पहिल्यापेक्षां दुसरींत, म्हणजे मागाहून आलेल्या मंदींत मजुरीचे दर जास्त असतात. तेजीची परिस्थिति व मंदाईची परिस्थिति या दोहोंच्या वजावाटींत कांहीं तरी प्रगति शिल्लक राहातेच, व पुढील चढउतार या पुढील टप्प्यांत होतो, त्यामुळें एकंदर विस्तार व उत्पादनाची व्याप्ति, वाढतच आलेली आहे.

चढउताराचा हा फेरा कसा होत जातो हें आणखी विस्तारानें पहाणें जरूर आहे. मंदीचे वातावरण कसें बदलूं लागतें तें पाहूं. बरींच वर्षें मंदी चालू आहे, उत्पादन कमी झालेलें आहे, अशी स्थिति कांहीं काळ गेल्यावर हळुहळू उत्पादक वस्तु व उत्पादन साधनसामग्री वाढण्यास सुरवात होते; म्हणजे भांडवल वाढूं लागतें. चालू गरजांची मागणी वाढूं लागली म्हणजे, साहजिक त्यांचें उत्पादन वाढतें व तें उत्पादन वाढलें म्हणजे भांडवलस्वरूपाच्या उत्पादनांतहि वाढ होऊं लागते. कारण उत्पादनसामग्रीची व साधनांची जरूरी भासूं लागते. कुठें तरी धंदा सुरू केला तर नफा मिळण्याचा संभव दिसतो. लागलीच त्या दिशेनें हालचाल सुरू होते. एखादी

नवी रेल्वेलाईन निघाली, अगर नवीन खाणीचा शोध लागला, अगर विजेचा पुरवठा करण्याचें ठरलें, कीं लागलीच या गोष्टीसाठीं यंत्रें, उत्पादनसंच, साधनसामग्री, हवी असते. सर्वत्र हालचाल सुरू होते. एका क्षेत्रांत मागणी वाढली कीं त्याचा परिणाम सर्वत्र दिसूं लागतो. रेल्वे बांधावयाची ठरली कीं, लोखंडाला मागणी, इमारती नवीन होणार, बांधकामें निघणार, मजुरांना मागणी; तसेंच विजेचें कारखाने निघावयाचे म्हणजे, मोठ्या मोठ्या यंत्रांना मागणी, तारांना मागणी, इतर साधनसामुग्रीला मागणी, शेंकडों कारागीर व मजुरांना मागणी. याप्रमाणें एकदम सर्वत्र चैतन्य दिसूं लागतें. मृतवत् झालेली उत्पादनसृष्टि सजीव होऊन सर्वत्र आशेचें वातावरण पसरतें. हाच परिणाम सरकारनें मोठमोठीं कामें काढलीं म्हणजे होतो. मोठाले रस्ते, कालवे, पूल, रेल्वे-लाइन्स अगर इमारतीचीं कामें काढलीं कीं, लागलीच सर्वत्र हालचाल सुरू होते, मजुरांना कामें मिळूं लागतात. सरकारनें हीं कामें कर्ज काढून अगर पतीनें नवा पैसा उत्पन्न करून केली कीं, व्यवहारांत खेळणारा पैसा वाढतो. मजुरांना पैसा मिळूं लागला, बेकारी कमी होऊं लागली कीं चालू गरजांवर—उपभोग्य वस्तूंवर—ते जास्त खर्च करूं लागतात. ज्या मालाची मागणी वाढली, त्याच्या उत्पादनांत मजुरांना जास्त जास्त मागणी येऊं लागते. माल जास्त प्रमाणांत पाहिजे म्हणून उत्पन्न वाढवावयाचें, म्हणजे उत्पादनसंच व सामग्री वाढवावयास पाहिजे. त्यामुळें या उत्पादन वस्तूंचें, उत्पादनसाधनें जीं यंत्रें वगैरे त्यांच्या उत्पादनाचें प्रमाण वाढतें. कारण त्याला मागणी जास्त होत जाते. सर्वत्र खर्चहि वाढतो, कामहि वाढतें, पैसा पुनः मुबलक व स्वस्त झाला म्हणजे कमी व्याजानें मिळूं लागतो. मंदी पुष्कळ वेळ टिकून असली तर त्याचा फायदा घेऊन कांहीं तरी करावें असें पुष्कळांना वाटूं लागतें, उद्योगधंद्यांत जमणें शक्य नसलें तर भांडवल स्थावर मिळकतीकडे वळतें. नवीन घरें, नवीन मिळकती होऊं लागतात. पुष्कळ काळ मंदी टिकली कीं, पुनः लवकरच तेजीचें वातावरण येईल असें अनुभवानें वाटत असल्यामुळें उद्योगधंद्यांतील उत्पादन-संचांची, यंत्रसामग्रीची नवें जुनें करण्याची वेळ आली असें समजून त्याप्रमाणें योजक करूं लागतात. मंदींत नफा नाहीं म्हणून हा खर्च शक्य तितका लांबणीवर टाकला जात असतो, व किंमती कमी आहेत तोंपर्यंत या गोष्टी करून घेणें त्यांना इष्ट वाटतें. पुनः जर यंत्रांची निगा वेळींच केली नाहीं तर सर्व नुकसान व्हावयाची भीति असते. मंदींत पुष्कळ कारखाने बंदहि होतात. मंदींत मजुरीचा दर जेथें कमी होतो, त्या ठिकाणीं याचा फायदा घेऊन योजक आपलें बस्तान सांवरण्याचा प्रयत्नहि करीत असतात व तें जमत गेलें कीं, हळुहळू मंदीच्या वातावरणांतून ते बाहेर पडतात.

एकदां मंदीचें वातावरण संपून आशादायक वातावरण सुरू झालें कीं, मग सर्वत्र मागें सांगितल्याप्रमाणें चैतन्य दिसूं लागतें. मग हा प्रवाह नदीप्रमाणें वाढत जातो, त्याचा विस्तार होत जातो. एका धंद्यांत चलती झाली कीं त्याचा परिणाम दुसऱ्यावर, त्याचा बाकीच्यावर, याप्रमाणें सर्वत्र प्रगति होऊं लागते. एकदां अनुकूल वातावरणाला सुरुवात झाली म्हणजे तें आपोआप वाढत जातें. मंदींतील बेकारी नाहींशी होऊं लागते. बेकार पडलेलीं यंत्रें फिरूं लागतात. सतारीच्या एका तारेचा आवाज निघाल्याबरोबर ज्याप्रमाणें बाकीच्या तारांतूनहि नाद निघतो तसें उत्पादनसृष्टींत होतें. कापडाला भाव म्हणून मजुरांना, कच्च्या मालाला म्हणून कापसाला भाव, मजुरांना प्राप्ति म्हणून शेंकडों गोष्टींना मागणी. कापड, भांडीं, चैनीच्या वस्तु, करमणुकीचीं साधनें नाना तऱ्हेच्या वस्तूंना मागणी. त्यांना मागणी म्हणून त्यांचें उत्पादन वाढविण्याकरितां लागणाऱ्या साधनसामग्रीला मागणी, त्या धंद्यांत पुनः कारागिरांना मागणी. कारागिरांना मजुरी मिळाली कीं, पुनः चालू उपयोगी वस्तूंना मागणी; याप्रमाणें उत्पादनाची चढती कमान होत जाते, योजकांना आशेचें वातावरण दिसूं लागतें. मागणी वाढत असते ती तशीच सारखी वाढत राहील असा विश्वास वाटूं लागतो. नफा वाढूं लागला कीं तो आणखी वाढेल अशीं सुखस्वप्नें पडूं लागतात. मागणी आणखी वाढेल म्हणून उत्पादन वाढविण्याचे दृष्टीनें उत्पादनसंच व सामग्री ते वाढवूं लागतात. त्या धंद्यांत भांडवल (कायम स्वरूपीं) जास्त जास्त येऊं लागतें. बँकांकडून, जनतेकडून, कर्ज घेऊन योजक हें करीत जातात. एकंदर वातावरण आशादायक असतें म्हणून बँकाहि पैशाचा पुरवठा करीत असतात, व आपल्याजवळ पडून असलेला पैसा, व्याजानें उद्योगधंद्याला पुरवीत जातात. याप्रमाणें पैसा व्यवहारांत जास्त जास्त होत जातो व तो सारखा खेळता असतो. त्याचा परिणाम हळुहळू मालांच्या, वस्तूंच्या किंमती वाढविण्यांत होतो. राष्ट्रांतील साधनसामग्री व माणसें हळुहळू सर्व उत्पादनाचे कामीं गुंतलीं जातात. त्यानंतर उत्पादनाचा विस्तार व वाढ होणें बंद होतें. कारण जसजसा पैसा वाढत जातो. तसतशी वस्तूंची किंमत वाढत जाते, मजुरी वाढते, कच्च्या मालाची किंमत वाढते. तयार झालेल्या वस्तूंचीहि किंमत वाढते व त्याचा परिणाम उत्पादनावर होतो; कारण उत्पादनखर्च वाढला म्हणजे पूर्वींप्रमाणें उत्पादन करणें परवडत नाहीं. त्याचप्रमाणें उत्पादन आणखी वाढवावयाचें म्हणजे चालू गरजांच्या गोष्टींचें उत्पादन कमी करून, उत्पादक वस्तु म्हणजे यंत्रें, साधनसामग्रीचें उत्पादन प्रथम केलें पाहिजे व तें झालें म्हणजे चालू उपयोगी वस्तूंचें उत्पादन वाढणार. सर्व गिरण्यांना काम मिळाल्यानंतर आणखी उत्पादन वाढवावयाचें म्हणजे, नवीन गिरण्या

काढल्या पाहिजेत, म्हणजे नवीन यंत्रें, नवीन सामग्री तयार करण्याकडे भांडवल व मजूर वळविले पाहिजेत. तात्पर्य, उत्पादन वाढतां वाढतां सर्व सामग्री व मजूर उत्पादनांत गुंतले जातात व उत्पादनाचा विस्तार बंद होऊं लागतो. सर्व वस्तूंच्या किंमती वाढल्यामुळें, मांडणीच्या वस्तु, यंत्रसामग्री वगैरे नवीन तयार करणें खर्चाचें होतें, व उत्पादन वाढविण्यापासून नफा होत नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें उत्पादनाची स्थिति होण्याची वेळ आली कीं, वातावरण अस्वस्थ होतें. हा भरवेगानें चाललेला गाडा, कोठें तरी उलथणार असें वाटूं लागतें. ज्यांनीं पैसा उद्योगधंद्यांत गुंतविला असेल, असें लोक चलबिचल करूं लागतात. बँका दिलेलें कर्ज परत घेण्याची तयारी करूं लागतात. किंमती वाढलेल्या असतात, अशा परिस्थितींत कांहीं आळा न घातल्यास, एकदम धक्का बसून होणारें नुकसान टाळावें या हेतूनें सरकार किंमतीवर नियंत्रण घालूं लागतें. त्याचप्रमाणें बाजारांत मोठ्या प्रमाणांत आलेला पैसा, हळुहळू बाजारांतून काढण्याचा प्रयत्न सुरूं होतो. पुष्कळ वेळां देशांतील किंमती, परदेशांतील किंमतीच्या मानानें जास्त वाढलेल्या असल्यास सरकार चलनाची किंमत परदेशी कमी करतें; नाहीं तर, खुद्द सोन्याचें चलन असल्यास, सोन्यालाच भाव परदेशांत जास्त झाल्यामुळें, तें परदेशीं जाऊं लागतें. बँका जुनीं कर्जें वसूल करण्याचा सपाटा सुरूं करतात, नवीन देत नाहींत, योजकांच्या आशा फोल ठरतात. जास्त जास्त फायदा होईल म्हणून सारखें वाढविलेलें उत्पादन परवडत नाहींसें होतें. कारण सर्वच गोष्टींच्या किंमती वाढलेल्या असतात. नफ्याचें प्रमाण कमी कमी होऊं लागतें. मोठमोठाले मनसुबे थंड होऊन जातात. सर्वत्र धांदल, धांवपळ सुरूं होते. झंझावात जसा पसरत जातो तसें हें वातावरण सर्वत्र पसरत जातें. दिवाळीं निघूं लागतात. कल्पांत आला असें होतें. प्रत्येकजण जें हातांत असेल तें दाबून ठेवण्याचा प्रयत्न करीत असतो. पुढें काय होईल याचा अंदाज बांधतां येत नाहीं म्हणून जो तो असेल तें दाबून ठेवतो. ही स्थिति नुसत्या चलनांत फरक केल्यामुळें होते असें नाहीं; तर मागें सांगितल्याप्रमाणें उत्पादनाची नफ्याच्या दृष्टीनें कमालसीमा संपत आलेली असते, अत एव त्याचा परिणाम असा होऊं लागतो. स्थावर मिळकत, घरें वगैरे तरी किती बांधणार ? यंत्रसामग्री तरी किती तयार करणार ? उत्पादनसामग्री तरी किती वाढविणार ? अर्थात् नफ्याचे दृष्टीनेंच त्यांच्या उत्पादनाकडे योजक बघत असल्यामुळें आपोआपच त्या उत्पादनाला मर्यादा येते. त्याबरोबर मागणी कमी होऊं लागली म्हणजे पुनः चक्र उलटें सुरू होतें. त्या त्या धंद्यांतील मजूर बेकार होऊं लागतात. कर्जफेडीचा तगादा योजकांचे मागें लागतो; कारण जो

तो हातांत रोकड ठेवूं इच्छितो. कर्जफेड न झाली कीं पत गेली, दिवाळें निघालें! एकानें दिवाळें काढलें कीं त्याचा परिणाम सर्वत्र होतो. पत्त्यांचा किल्ला गडगडावा तसे योजक व धंदेवाले खालीं येऊं लागतात; भरलेले पोहरे आडवे होऊन रिकामे होऊं लागतात. सर्वत्र हाहाःकार होतो. उत्पादन झपाट्यानें कमी होऊं लागतें. बेकारी वाढत जाते, नफ्याचे आशेनें मोठमोठ्या योजना सुरू केलेल्या असतात. सुरू करण्याच्या वेळेच्या किंमती कांहीं काळानें वाढत जातात, उत्पादनाचा खर्च वाढला जातो, कच्चा माल, अन्य सामग्री, मजुरी, सर्वत्र वाढत गेल्यामुळें, हा खर्च वाढतो. त्या मानानें वस्तूंच्या किंमती वाढत नाहींत. नफा मिळणें दुर्मिळ होतें. इतकेंच नव्हे तर, नुकसानी सोसण्याचा प्रसंग येतो. वाढत्या उत्पादखर्चामुळें उत्पादन कमी होऊं लागतें. कित्येक योजक नफ्याच्या आशेनें धंद्यांत शिरून नुकसान खाऊन परत फिरतात. कांहीं बचावतात, सांवरतात, पण झळ लागली नाहीं असा क्वचितच असतो. कांहीं उद्योगधंद्यांवर तर जास्तच परिणाम होतो. जेव्हां तेजी होते, तेव्हां मांडणीचे धंदे, उभारणीचे धंदे, उत्पादक वस्तु तयार करण्याचे यांना काम फार वाढतें. पण एकदां वातावरण बदललें कीं, हे धंदे वाढण्याचे तर बंद होतातच, पण नेहमींचें कामहि त्यांना कमी करावें लागतें. कारण एकदां वातावरण अस्वस्थ झालें कीं, या भांडवल स्वरूपी वस्तूंकडे कोणी बघत नाहीं, उत्पादनसंच कायम ठेवण्यापुरता खर्च करण्याचें सुद्धां योजक टाळीत असतात. त्यामुळें हें नवें जुनें करण्याची, अवश्यक उत्पादनाची सुद्धां, मागणी कमी होते. त्याचप्रमाणें चालू गरजा भागविणारे धंदे, उपभोग्य वस्तु उत्पन्न करणारे धंदे, हे सुद्धां या झंझावातांतून अलगत सुटत नाहींत. याहि उत्पादनाची मागणी कमी होते. एकदां धांदल व धांवपळ सुरू झाली म्हणजे, गरीब आणि श्रीमंत दोघेहि मागणी कमी करतात. गरिबाजवळ पैसा नाहीं म्हणून व श्रीमंत अस्वस्थ वातावरणामुळें खर्च करूं इच्छित नाहींत म्हणून. ज्याच्याजवळ जी संपत्ती असेल ती, या धांदलींत जो तो राखून ठेवूं इच्छितो, यामुळें मागणी एकंदरीनें कमी होते. विकत घेण्याची ऐपत बहुसंख्यांक गरिबांना नसते व ज्यांना असते ते खर्च करूं इच्छीत नाहींत. शिवाय चालू गरजांवर तरी, खर्च करून करणार किती? यामुळें उपभोग्य वस्तूंची मागणी पण कमी होते. याप्रमाणें सर्व धंद्यांवर परिणाम होतो, व सर्वत्र निराशेचें वातावरण सुरू होतें. एकदां हें वातावरण सुरू झालें म्हणजे, त्याचा वेग व व्यापहि वाढतो; आणि पुनः कांहीं काळ याप्रमाणें गेल्यानंतर पुनः चक्र फिरूं लागून कांहीं तरी कारण घडून, वातावरणांत आशा उत्पन्न होते. याप्रमाणें हें चढउताराचें, तेजीमंदीचें, चक्र चालू असतें.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून हें चढउतार कसें होतात तें पाहिलें. जास्त उत्पादनामुळें हें होतें हें स्पष्ट दिसतें. जास्त उत्पादन म्हणजे गरजेपेक्षां जास्त उत्पादन केल्यानें हे प्रसंग येत नाहींत, तर केलेल्या उत्पादनापासून नफा होत नाहीं, यामुळें हे प्रसंग येतात. उत्पादन वाढवितांना त्यांत जास्त जास्त भांडवल घातलें जातें म्हणजे उत्पादनशक्ति वाढविण्यांत जास्त जास्त खर्च होतो, व शेवटीं तो परवडत नाहीं, अशी स्थिति होते. निव्वळ वस्तूंचें उत्पादन जास्त झालें, गरजेपेक्षां जास्त झालें तर, त्यानें उत्पादनसृष्टींत कल्पांत होण्याचें कारण नाहीं. गरज किती हें समजलें कीं, उत्पादन त्या प्रमाणांत, त्या मेळांत बसवितां येईल, पण उत्पादन हें नफ्यासाठीं असल्यामुळें व कमाल नफा हें ब्रीदवाक्य असल्यामुळें उत्पादनाचा विचार करतांना त्याचा उपयोग व त्याची गरज, यांकडे योजक जरूर तेवढें लक्ष देत नाहींत, व त्यामुळें जास्त झालेल्या उत्पादनापासून, हे चढउताराचे आघात अपघात घडून येतात. जेथें हें उत्पादन उपयोगी असेल, गरज असेल, तेवढेंच करावयाचें असें असेल, तेथें हे प्रसंग येणार नाहींत. तेवढेंच उत्पादन करावयाचें म्हणजे त्यावर नियमन पाहिजे. याचा अर्थ, सर्व उत्पादनसृष्टि, योजनेप्रमाणें चालली पाहिजे. योजनापूर्ण उत्पादन म्हणजे, समाजाच्या नेतृत्वाखालीं, देखरेखीखालीं, उत्पादन. असें उत्पादन म्हणजे खाजगी व्यक्तींचा संबंध तुटला. खाजगी मालकी संपली नसली तरी, मर्यादित झाली; मग समाज भांडवलशाही स्वरूपाचा राहूं शकत नाहीं. तात्पर्य, भांडवलशाहींत नफ्यासाठीं उत्पादन असल्यामुळें हे तेजीमंदीचे प्रसंग अपरिहार्य आहेत. उत्पादन खाजगी नफ्यासाठीं न होतां, उपयोगासाठीं, लोकांचे गरजेसाठींच होऊं लागलें म्हणजे हें सर्व बदलेल.

हे चढउतार ज्या देशांत उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर वाढले आहेत त्या देशांत चांगलेच जाणवतात. त्यावर उपाय केले नाहींत असें नाहीं, किंवा हे प्रसंग, हीं अरिष्टें अटळ आहेत, असेंहि नाहीं; पण ज्यानें हें टळेल तें करण्यास अद्यापि त्या त्या राष्ट्रांतील लोक तयार नाहींत. भांडवलशाही, खाजगी, मालकी, व नफेबाजी कायम ठेवून, चाललेली उपाययोजना फारशी उपयोगी पडत नाहीं, हा अनुभव सारखा येत आहे. जगांतील होणाऱ्या या चढउतारांचा परिणाम हिंदुस्थानांत होतो, कारण आधुनिक जग हें या दृष्टीनें इतकें संघटित आहे कीं, कोठेंहि कमीजास्त झालें कीं त्याचा परिणाम जगभर पसरतो. १९२९ सालीं जगभर पसरलेली मंदीची लाट हिंदुस्थानालाहि धक्का देऊन गेली, म्हणून हे प्रश्न समजून घेणें हिताचें व महत्त्वाचें आहे.

---

# २०. पैसा

उत्पादनाचा विचार करतांना किंमत, भाव यासंबंधीं आपण विचार केला. वस्तूंची किंमत अगर भाव पैशांत मोजला जातो. या दृष्टीनें पैसा याचा विचार जास्त करणें जरूर आहे. आधुनिक जगांत उत्पादन किंबहुना सर्व आर्थिक सृष्टिच श्रम-विभागणीवर आधारलेली आहे. बहुतेकजण स्वतः ज्या वस्तु उत्पन्न करतात त्यांचा उपभोग स्वतः क्वचितच घेतात. कारखान्यांतील शेंकडों मजूर नाना प्रकारच्या वस्तु उत्पन्न करतात, पण त्यांचा उपभोग ते सहसा घेत नाहींत. त्या सर्व वस्तु विक्री-करितां, बाजारांत खपविण्याकरितां तयार होत असतात. गिरणींतील मजूर हजारों वार कापड काढतात, पण तें बाजारांत विकण्याकरितां. खाणींतील मजूर कोळसा काढतो तोहि बाजारांत विक्रीकरितां; शेतकरी मात्र जें धान्य पिकवितात तें स्वतः-करितां व जें उरेल तें विक्रीकरितां! अन्य धंद्यांतील मजूर जें उत्पन्न करतात, तें बाजारांत विक्रीकरितां; मात्र त्यांना लागणारें तेंच उत्पन्न स्वतःसाठीं विकत घ्यावें लागतें. तयार झालेल्या वस्तु बाजारांत विकावयाच्या व विक्रींतून आपल्याला हवे असतील ते पदार्थ विकत घ्यावयाचे. तयार झालेलें कापड बाजारांत विकावयाचें व त्या विक्रीच्या पैशापासून कापूस व अन्य सामग्री विकत घ्यावयाची. त्याचप्रमाणें मजुरी देऊन मजुरांचे श्रम घ्यावयाचे. एका अर्थानें कापड देऊन कापूस घेणें, यंत्रें घेणें, हीच क्रिया मजुरांचे श्रम घेणें यांत होते. वस्तुवस्तूंचा विनिमय होतो, पैसा आहे म्हणून पैशाच्या मार्फत हा विनिमय ही अदलाबदल होते म्हणून ती दिसून येत नाहीं. पैसा नसता तर ही अदलाबदल कठीण व त्रासदायक झाली असती, नव्हे अशक्यच झाली असती. कारण हल्लींचें उत्पादन अनेक अवस्थांतून जात असतें, व त्या उत्पादनाची वांटणीसुद्धां समाजांत निरनिराळया प्रकारांनीं होत असतें. कापड देऊन कापूस घ्यावा हें ठीक; पण शेतकऱ्यास कापड नको आहे, त्यास मुलांस शाळेंत घालावयाचें आहे, तेथील शिक्षकांस घर बांधण्याकरितां विटा पाहिजे आहेत; कुंभारास भट्टीकरितां सरपण पाहिजे आहे; सरपण फोडणारे व

विकणारे यांना कापड पाहिजे आहे. असें असलें तर, त्यांना कापड देऊन सरपण घेणें, तें कुंभारास देऊन विटा घेणें व शिक्षकांस विटा देऊन शेतकऱ्याला आपल्या मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करावी लागेल; म्हणजे गिरणीवाल्याची मग कापसाची गरज भागणार. अशा समाजाच्या परिस्थितींत वस्तुवस्तूंचा विनिमय अदलाबदलीनें चालणें शक्य नाहीं. जेथें प्रत्येक मनुष्य शेतकऱ्याचें, शिक्षकाचें, कुंभाराचें, सरपण आणण्याचें म्हणजे सर्व कामें एकटाच करीत नाहीं, व जेथें श्रमविभागणी आहे, निरनिराळे लोक निरनिराळीं कामें करीत आहेत, तेथें पैशाशिवाय चालावयाचें नाहीं. वस्तूंची अदलाबदल करून व्यवहार चालविणें शक्य नाहीं. श्रमविभागणीवर उभारलेल्या समाजांत पैसा हा अवश्य असून, त्याचा उपयोग समाजांतील व्यवहारांत अनेक दृष्टींनीं होतो; त्यामुळें पैसा हा व्यवहाराचा एक अवश्यक भाग झाला आहे.

पैशाचा उपयोग विनिमयसाधन म्हणून होतो. त्याचप्रमाणें वस्तूंची किंमत मोजण्याचें माप, साधन, याहि दृष्टीनें होतो. कोठल्याहि वस्तूची परतफेड करावयाची म्हणजे त्याला प्रमाण म्हणून पैशाचा उपयोग होतो; त्याचप्रमाणें सांठवणुकीच्या दृष्टीनेंहि त्याचा उपयोग होतो. हे पैशाचे चार प्रमुख उपयोग आहेत. पैसा जसा प्रत्येक राष्ट्रांत उपयोगी पडतो, त्याचप्रमाणें राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहारांतहि त्याचा उपयोग आहे व तो अत्यंत महत्त्वाचा उपयोग आहे. पण तूर्त आपण राष्ट्रांतील पैसा व त्याचा उपयोग याचा प्रथम विचार करूं. पैशाचें खरें स्वरूप हेंहि या उपयोगांचा विचार करतांना आपोआप ध्यानांत येईल; कारण पैसा म्हणजे पैशानें जें घेतां येतें तें; 'दाम करी काम' याऐवजीं 'दाम म्हणजे काम' असें म्हटलें तर, तें चुकीचें होणार नाहीं.

पैसा हें विनिमयाचें साधन आहे. वस्तु विकून पैसा घ्यावयाचा व पैसा देऊन वस्तु विकत घ्यावयाची. पैसा हा विनिमयांतील या अदलाबदलींतील दलाल आहे. जर पैसा नसेल तर वस्तुवस्तूंची अदलाबदल केली पाहिजे. ही अदलाबदल सोपी नाहीं; शेतकऱ्याला कापड पाहिजे आहे, तेव्हां त्याला असा कापडवाला गांठला पाहिजे कीं ज्याला धान्य हवें आहे व कापड विकावयाचें आहे. उभयपक्षीं गरज असावी लागते. त्याशिवाय अदलाबदल सोपी नाहीं. अगदीं संपूर्णपणें तयार झालेल्या वस्तूंचें बाबतींतसुद्धां हें कठीण आहे. मग कच्चा माल, अर्धवट तयार झालेल्या वस्तू यांचे बाबतींत तर अतिशयच कठीण आहे. मागें सांगितल्याप्रमाणें, कापसासाठीं सरपण घ्यावयाचें तें कुंभारास द्यावयाचें, त्याच्या विटा शाळा मास्तरास, व त्या मोबदल्यांत शेतकऱ्याचा मुलगा शिकावयाचा व मग गिरणीवाल्यास कापूस मिळणार; हा एवढा द्राविडी प्राणायाम शक्य नाहीं. समजा, सरपणवाल्याजवळ कुंभाराला पाहिजे

त्यापेक्षां निम्मे सरपण आहे; त्यानें निम्या विटा दिल्या त्या शिक्षकाला पुरेशा नाहींत. मग शिक्षक मुलाला अर्धें शिकविणार का अर्ध्या मुलाला शिकविणार? मला नदी-पलीकडे जावयाचें आहे, माझ्याजवळचें धान्य मी कोळ्यास देण्यास तयार आहें. कोळ्यास तेवढ्या धान्याची जरूरी नाहीं; निम्मेच पुरे आहे; पण होडी कांहीं निम्मी करून पलीकडे नेतां येत नाहीं, किंवा अर्ध्या नदींत मला सोडतां येणार नाहीं. तात्पर्य, वस्तूंचा विनिमय वस्तूंनीं केल्यास अनेक अडचणी येतात. तसेंच वस्तूंनीं विनिमय करावयाचा ठरविला तरी, कोणत्या वस्तूला, दुसरी किती वस्तु मिळावी हें ठरविणें कठीण. सर्वांना लागू पडेल असें प्रमाण अगर वस्तु नाहीं. किती शेर गव्हाला किती वार कापड, सदरा शिवण्याबद्दल काय द्यावयाचें, शिंपी वाजवी घेतो कां जास्त घेतो हें कळण्याला काय मार्ग? मजुरांना मजुरी कशी द्यावयाची, किती धान्य, किती कापड, किती सिनेमा तिकिटें, किती प्रवासाचीं तिकिटें? डॉक्टरचे सल्ल्याबद्दल काय द्यावयाचें? समजा, शेतावरल्या मजुराला मालकानें धान्य दिलें, पण त्यानें मजुराचा प्रश्न सुटत नाहीं. गिरणीवाल्यानें मजुरास कापड १० वार दिलें, तरी त्यानेंहि प्रश्न सुटत नाहीं. डॉक्टरनें कंपौन्डरला पगार म्हणून काय कोयनेल द्यावयाचें? गायकांना, नटांना, मालकांनीं काय फक्त प्रसिद्धीच द्यावयाची? मोटार ड्रायव्हरला काय द्यावयाचें, केवळ गाडी हांकण्याची संधि? दारूगोळा तयार करण्याचे कारखान्यांतील मजुरांना काय द्यावयाचे? त्याच गोळ्या खाऊन मरण्याची संधि? तात्पर्य, श्रमविभागणीवर उभारलेल्या समाजांत वस्तूंची वस्तूंशीं अदलाबदल करून व्यवहार चालणें अशक्य. त्यांचा विनिमय कांहीं तरी सर्वमान्य वस्तूंच्या मध्यस्थीशिवाय सुखकर होणार नाहीं. ही सर्वमान्य वस्तु म्हणजेच पैसा, हा सर्वमान्य दलाल म्हणजे पैसा, पैसा हें विनिमयाचें साधन झालें म्हणजे अदलाबदलीचा सर्व त्रास वांचतो. माझ्या शेताचें धान्य मी विकतो व पैसा घेतों. मला ज्या वस्तूंची गरज आहे, त्या त्या वस्तु हा पैसा दिला असतां मला मिळतात म्हणून मी धान्य देऊन पैसा घेतों. मी जसा धान्य देऊन पैसा घेतला तसाच मी पैसा दिला असतां कापडवाला तो घेईल कापड देईल; गाडीवाला घेईल, मला गाडींत बसवील, वकील घेईल, माझा कज्जा चालवील. तो हा नोटांचा कागद घेत नाहीं असें म्हणणार नाहीं; अगर रुपया घेत नाहीं, असेंहि म्हणणार नाहीं. कारण पैसा—नोटा अगर रुपये अगर जें स्वरूप असेल तें—हा सर्वमान्य मध्यस्थ आहे, हें समाजांतील सर्वांनीं मानलें आहे; व म्हणूनच मी घेतला, माझ्यापासून इतर घेतील ही खात्री आहे. नोटा अगर नाण्यांकरितां, कोणी त्यांची किंमत करीत नाहीं, तर त्या दिल्या असतां वस्तु मिळतात, व त्यांचे मालक वस्तूंच्या व सोयीच्या बदल्यांत, या नोटा

अगर नाणें घेतात ही खात्री; म्हणून त्यांची किंमत म्हणून पैशाची किंमत व महत्त्व. या दृष्टीनें पैसा म्हणजे वस्तूंवर स्वामित्व देणारी शक्ति, वस्तु विकत घेण्याची ऐपत अगर क्रयशक्ति म्हटली तरी चालेल. पैसा हें विनिमयाचें साधन आहे, त्यामुळेंच व्यवहारांत खरेदीविक्री सुरळीत व सुलभ होते. प्रत्यक्ष व्यवहारांत सारखें उपयोगी पडावें म्हणून पैशाचें प्रमाण अवश्य आहे. मग तें रुपया असो, पौंड असो, मार्क असो. एकदां पैसा हें साधन झालें कीं, ताबडतोब वस्तूंच्या किंमती बाजारांत पैशांत होतात, व त्यामुळें व्यवहार झटकन् व सुलभतेनें होतात. गिरणीवाला ताबडतोब चालू भावानें शेतकऱ्यास सरळ पैसा देतो, कापूस विकत घेतो. शेतकरी शिक्षकाला फी देतो, मुलास शाळेंत घालतो. सगळा द्राविडी प्राणायाम व कटकट वांचते. बारीकसारीक व्यवहार, लहान प्रमाणावरचे व्यवहारसुद्धां सुलभ व्हावेत म्हणून पैशाच्या मुख्य प्रमाणाचे सुद्धां लहान लहान भाग पडतात. उदा०, रुपयाचे आणे, पै; पौंडाचे शिलिंग, पेन्स. यामुळें जेवढी वस्तु पाहिजे तेवढीच घेतां येते. मला रुपयाचें धान्य नको तेव्हां जर रुपयापेक्षां कमी नाणें अगर प्रमाण नसेल तर अडचण होईल, ती वरीलप्रमाणें लहान नाणीं ठेवल्यानें नाहींशीं होते.

एकदां कोठलेंहि विनिमयाचें साधन सर्वमान्य झालें म्हणजे प्रत्येक वस्तूची त्याच्याशीं तुलना होते. वस्तूची किंमत त्या साधनांनीं होते, समाजांतील करार त्या साधनांच्या सहाय्यानें होतात. हिशोबहि त्याच साधनांच्या सहाय्यानें ठेवले जातात. रुपयास ८ शेर ज्वारी, याचा अर्थ ज्वारीची ती बाजारांतील किंमत; ८ शेर ज्वारीची किंमत १ रुपया झाली. ज्वारीची अखेर खरी मुख्य किंमत ही बाजारांतील चलनांत, बाजारांतील पैशांत करावयाची झाल्यास रुपयास ८ शेर अशी होईल. ८ शेर ज्वारी दिली असतां ४ वार कापड अदलाबदलीनें मिळालें तर ज्वारीची खरी किंमत कापडाच्या रूपानें मोजावयाची झाल्यास ८ शेराला ४ वार अशी होईल. या रीतीनें प्रत्येक वस्तूचें मूल्य दुसऱ्या वस्तूचे दृष्टीनें निराळें असणार. जर पैसा हें विनिमयाचें साधन नसतें तर, बाजाराची स्थिति वर्णन करावयाची म्हणजे, १ वार कापडांस २ शेर धान्य, १ शेर धान्यास ४ टांक, ३ टिपकागदांस २ बटाटे, याप्रमाणें हजारों वस्तूंचे भाव हजारों वस्तूंच्या दृष्टीनें द्यावे लागतील व अनवस्था प्रसंग होईल. म्हणून एक सर्वमान्य विनिमयाचें साधन असणें सोयीचें आहे, अवश्यक आहे. प्रत्येक वस्तूची बाजारांतील किंमत ताबडतोब त्या विनिमयाचे साधनांत म्हणजे पैशांत करतां येते. सर्व व्यवहार सोपा होतो. दर क्षणाला हजारों व्यवहार होतात व सुलभ रीतीनें होतात, ते याच कारणानें. मी मार्केटांत जातों, रुपया टाकून तूप घेतों. तुपाचा मालक

लागलीच तो रुपया देऊन कापड खरेदी करतो. कापडवाला आपल्या नोकरांना तो देतो. नोकर हा त्याला लागणारें धान्य व अन्य वस्तु घेतो. तात्पर्य, हे हजारों व्यवहार सारखे चालू असतात व झटकन् होतात; ते पैसा हें विनिमयाचें साधन आहे म्हणून. मनुष्याजवळ पैसा असला म्हणजे त्याला काय पाहिजे आहे, त्यांच्या बाजारांतील किंमती काय आहेत हें पाहून, पटकन तो मेळ बसवितो व त्याला लागतील त्या वस्तु जरूर त्या प्रमाणांत घेतो. पैसा नाहीं, व वस्तूच आहेत, तर ही वस्तूंची निवड पसंत करून कोष्टक तयार करणें किती तरी कठीण आहे. वकील, डॉक्टर, वहातुकीचे धंद्यांत काम करणारे, करमणुकीचे धंद्यांत काम करणारे, वर्तमानपत्रवाले वगैरे हे काय उत्पादन करतात, कीं, जें त्यांना उचलून देऊन स्वतःस अवश्य वस्तू घेतां येतील ? वकील किती शब्द बोलला म्हणजे कापड मिळणार ? नटी किती गायली म्हणजे बंगलेवाला भाडें मागणार नाहीं ? मोटारींत किती प्रवास केला म्हणजे शेतकरी मोटारवाल्यास एक शेर गहूं देईल ? हे सर्व ठरविणें कठीण होईल. या दृष्टीनें पैसा हें विनिमयाचें सर्वमान्य साधन असलें म्हणजे, ताबडतोब प्रत्येक वस्तूची किंमत त्यांत होते, व वस्तूंची निवड व पसंती सुलभ होते. त्याचप्रमाणें, उत्पादकांनीं किती उत्पादन करावें हें कळण्यासहि कांहीं तरी साधन पाहिजे. प्रत्येक मनुष्यास कोणत्या वस्तु किती पाहिजेत हें नोंद करून त्याप्रमाणें योजना करून त्याबरहुकूम उत्पादन करणें, हें भांडवलशाहींत साधत नाहीं, किंबहुना रशिया सोडून दिल्यास, जगांत कोठेंहि आढळत नाहीं. मग उत्पादक कोणत्या गोष्टी ध्यानांत आणून उत्पादनाचें प्रमाण ठरवितात, कशावर अंदाज बांधतात ? मागणी वाढेल अगर कमी होईल हें कसें समजतात ? तर वस्तूच्या बाजारांतील किंमतीमुळें; कारण या किंमती सर्वमान्य विनिमयाचे साधनांत वा पैशांत झालेल्या असतात. मागें सांगितल्याप्रमाणें वस्तूंच्या किंमती व भाव यावरून कोणत्या वस्तूंना मागणी आहे अगर ती वाढत आहे, हें ठरवितां येतें. भावरूपी यंत्र ह्या किंमतीचें, हालचालीचें, वस्तूच्या मागणीचें एक प्रतिबिंब आहे. यावरून योजक हा किती उत्पादन करावें, कोठें कारखाना काढावा, कोणत्या प्रमाणावर काढावा, म्हणजे कमाल नफा होईल, हें ठरवीत असतो. प्रत्येक साधनापासून जास्तींत जास्त किंमत येईल या दृष्टीनें त्याचा उपयोग योजक करीत असतात. गहूं लावून जास्त पैसा येणार असेल तर शेतकरी गहूं लावील, कापसाचे लागवडीपासून येणार असेल तर कापूस लावील. पण हें जें शेतकरी करतो याचें कारण गव्हाला भाव चांगला आहे किंवा कापसाला चांगला आहे म्हणून. ज्या वस्तूला चांगला भाव आहे ती तो उत्पन्न करील, पण त्याचा खरा अर्थ, घेणारें गिऱ्हाईक

त्या वस्तूला जास्त किंमत देतें म्हणून तो ती वस्तू उत्पन्न करतो. एका अर्थानें कोणती वस्तु त्यानें उत्पन्न करावी हें गिऱ्हाइकानें बाजारांतील किंमतीच्या मार्फत, भावयंत्रामार्फत, स्पष्ट केलें व आपली पसंती कळविली. जर बाजारांतील किंमती पैशांत सांगतां आल्या नसत्या तर, ही गोष्ट शक्य झाली नसती. शेतकऱ्यास गिऱ्हाइकांस काय पाहिजे, हें न समजल्यानें, त्यानें वाटेल तें उत्पादन केलें असतें; व कदाचित् तें वायाहि गेलें असतें; पण या भावयंत्रामुळें कांहींतरी मार्गदर्शन त्याला होतें. कांहींतरी म्हणावयाचें कारण, बिनचूक होत नाहीं हें एक, व निव्वळ वस्तुवस्तूंचा विनिमय असला तर कांहींच होत नाहीं हें दुसरें. किंमतीमध्यें, भावांमध्यें, चढउतार कसें होतात, याचें पूर्ण विवेचन पूर्वी केलेंच आहे. भाव कमीजास्त होतात, पण इतका धोका योजकांना पत्करावाच लागतो. वस्तुवस्तूंच्या अदलाबदलीच्या पद्धतींत हा धोका हजारपट जास्त. प्रत्येक वस्तूचें, दुसऱ्या प्रत्येक वस्तूशीं, किंमतीचें प्रमाण काय राहील हें समजणें कठीण. त्याचप्रमाणें उत्पादन योजणेंहि कठीण. योजनापूर्ण उत्पादनांत धोका नाहीं, पण भांडवलशाहींत योजनापूर्ण उत्पादन नसल्यामुळें उत्पादनाचें प्रमाण, योजक, वस्तूंच्या बाजारांतील किंमतीचे हालचालींवर, भावयंत्रावर विसंबून ठेवतात. जहाजाचा कप्तान ज्याप्रमाणें हवायंत्राकडे पाहून आपल्या जहाजाच्या हालचाली करतो, त्याचप्रमाणें योजक, व वस्तूंचें उत्पादन करणारे लोक, बाजारांतील किंमतीकडे पाहून उत्पादनाची चाल ठरवीत असतात. ज्या वस्तूला भाव नसेल त्या वस्तूंचें उत्पादन कमी, ज्या वस्तूचा भाव वाढेल तिचें उत्पादन जास्त; हा सरळ मार्ग ते पत्करतात. या सरळ मार्गानेंच भांडवलशाहींत समाजाला दारिद्र्याच्या आडरानांत टाकलें आहे.

विनिमयाचें साधन पैसा आहे म्हणून व्यवहार सुरळीत होतात. वस्तूंची बाजारांतील किंमत पैशांत होते व त्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें उत्पादनाला कांहींतरी मार्गदर्शन होतें. समाजांतील करारमदारहि पैशाच्या रकमेंत ठरविले जातात. दरमहा पगार अमुक पैसा, एक खटला चालविण्यास अमुक पैसा, औषध दिल्यास अमुक पैसा, घराला रंगसफेती दिल्यास अमुक पैसा, अमुक पैसा देऊन बटाटा खरेदी करूं, अमुक पैसा दिल्यास बटाट्याचा त्याप्रमाणें पुरवठा करूं; तात्पर्य, हे सर्व व्यवहार, खरेदीविक्रीचे करार, पैशांत होतात, त्याचप्रमाणें हिशोबहि पैशांत ठरविले जातात. बटाटे काढले त्याला मजुरी अमुक पैसे, वाहतूक अमुक पैसे, दलाली अमुक पैसे, हाहि हिशोब विनिमयाचें एखादें सर्वमान्य साधन असलें म्हणजे त्यांतच ठेवणें भाग पडतें, सोयीचें असतें. कारण वस्तूंच्या किंमती त्यांत केल्या जातात. तात्पर्य, पैसा हा विनिमयाचें

सर्वमान्य साधन, सर्व वस्तूंची किंमत करणारें साधन, माप म्हणून उपयोगी पडतो व त्यायोगें व्यवहारांत सुलभता येते.

व्यवहारांतील करार पैशांत होतात हें वर सांगितलें, कारण पैशाची किंमत बदलणार नाहीं ही खात्री असते. आज शंभर रुपये देऊन एका वर्षानें १०३ रुपये घ्यावयाचे असा करार जेव्हां माणसें करतात, तेव्हां त्यांना विश्वास असतो कीं, रुपयांत म्हणजे पैशांत कांहीं बदल होणारा नाहीं आणि म्हणूनच कर्जाचे सर्व करार पैशांत असतात. इतका पैसा परत द्यावयाचा, अमुक पैशाच्या हप्त्यानें परतफेड करावयाची, हें सर्व पैशांत होतें. जर पैशाची विनिमयाची किंमत, सारखी बदलणारी असेल तर लोक त्यांत करार करणार नाहींत. समजा, आज एक रुपयास ४ शेर तांदूळ, व लागलीच पुढील आठवड्यांत रुपयास ८ शेर, पुनः तिसऱ्या आठवड्यांत ५ शेर, याप्रमाणें बदल होत असेल तर, माणसें पैशांत, रुपयांत, करार करणार नाहींत. ४ शेर तांदूळ दिले ते एक वर्षानें ५ शेर तांदूळच परत करावयाचे. खेडेगांवांतून अजूनहि क्वचित् हा वाढीदिढीचा प्रकार चालतो, त्याप्रमाणें व्यवहार होऊं लागतील. कांहीं वर्षांमागें, जर्मनींतील चलनांत असेच बदल दिवसा दिवसाला होऊं लागले. सर्व चलन अस्थिर झालें, त्यावेळेस पुष्कळ व्यवहार अदलाबदलीच्या स्वरूपाचे झाले व करारहि त्याच स्वरूपाचे होऊं लागले. अमुक सोनें देऊं व अमुक पदार्थ घेऊं; अगर अमुक पदार्थ विकूं व अमुक सोनें घेऊं; असे करार होऊं लागले होते, कारण पैशाचें बूड स्थिर नव्हतें. पुढें जर्मन चलन स्थिर झालें, तेथील पैसा भरंवशाचा वाटूं लागला, त्याबरोबर पूर्वीप्रमाणें व्यवहार, करारमदार वगैरे पैशांत होऊं लागले. पैशाची किंमत कमीजास्त होऊं लागली म्हणजे त्याचे परिणाम काय होतात तें आपण पुढें पाहूं. पण देणेंघेणें पैसा हें विनिमयाचें साधन असलें म्हणजे सोपें जातें; वस्तूवस्तूंची अदलाबदल करावयाची या स्थितींत देण्याघेण्याचे व्यवहार कमी होतील, व कोणत्या वस्तूची किंमत कोणत्या वस्तूच्या मापानें किती होईल हें सांगणें कठीण, व कमीजास्त होण्याचा संभव फार. तांदूळ देऊन तांदूळ परत घ्यावयाचे. समजा, घेण्याचे वेळेस तांदुळाचें खूप पीक झालें असलें तर तांदूळ देतांना ते देऊन जितके दुसरे पदार्थ मिळाले असते तितके आतां मिळणार नाहींत. कारण खूप पुरवठ्यामुळें तांदुळाला भाव कमी, तसें पैशाच्या बाबतींत होत नाहीं. निदान जितक्या रीतींनीं व जितक्या प्रमाणांत वस्तूंचें वस्तू गणिक किंमतीचें मान कमीजास्त होईल, तितकें पैशाचे होणार नाहीं व हा विश्वास असल्यामुळें देण्याघेण्याचे सर्व व्यवहार पैशांत होतात.

पैशामुळें देवघेवीचे, देण्याघेण्याचे व्यवहार सुलभ होत असल्यामुळें साहजिकच

प्रत्येक मनुष्य, व्यापारी असो अगर योजक असो, कांहींना कांहीं तरी पैसा नेहमीं जवळ ठेवणें जरूर समजतो. समजा, एकदम कापूस खरेदी करणें आहे, ताबडतोब पैसे दिल्यास भाव बरा मिळेल अशा वेळीं रोकड जवळ असणें इष्ट आहे. गुदामांतील हजारों वार कापड उपयोगी पडत नाहीं. यंत्र दुरुस्त करणें जरूर झालें तर ताबडतोब पैसे देऊन योजक तें दुरुस्त करून घेईल. समजा, मजुरांनीं पगार सुट्टीमुळें आगाऊ मागितला तर मालक ताबडतोब देईल. कारण दररोज त्याचा माल खपत असतो, त्याचा पैसाहि त्याचेकडे येत असतो; जाणाऱ्या पैशानें त्याची शिल्लक कमी होते, पण येणाऱ्यानें तींत भर पडतें. शिवाय कांहींना कांहीं तरी शिल्लक हाताशीं ठेवणें त्याला जरूर वाटतें. केवळ वस्तू शिल्लक असून उपयोगी नाहीं, ही शिल्लक पैशांत व अगदीं तयार पैशांत, रोकड पैशांत व्यापाऱ्यांना व धंदेवाल्यांना ठेवावी लागते. ही शिल्लक म्हणजे एक ऐपतीची सांठवणूकच. पैसा ही ऐपत-शक्ति आहे. कारण तो दिल्याबरोबर बाजारांत वस्तु मिळूं शकतात. समजा, ८ शेर बाजरी हवी आहे, ती एक रुपयाला मिळेल; मजजवळ एक रुपया असला म्हणजे ही ऐपत, ही क्रयशक्ति मजजवळ आहे. समजा, मला एक वर्षानें भंडारा करून गांवजेवण घालावयाचें आहे त्यावेळीं ८०० शेर बाजरी लागेल, ५० शेर गूळ लागेल, आणखी अनेक पदार्थ लागतील, त्यावेळेस हे सर्व पदार्थ घेतां येतील अशी ऐपत मला पाहिजे आहे. ती मला सांठविली पाहिजे, व हें सांठवणूकींचें काम पैशाच्या योगानें सुलभ होतें. समजा, त्यावेळेस २०० रु. ची ऐपत शक्ति हवी आहे. मी तोंपर्यंत २०० रुपये जमविले म्हणजे झालें. या दृष्टीनें पैसा हा ऐपत सांठविण्यास उपयोगी पडतो. त्यानें हें काम फार सोपें होतें; नाहीं तर वर्षभर मला धान्य, गूळ वगैरे गोष्टी गोळा करीत बसावें लागलें असतें. पुनः कोठें ठेवावें हा प्रश्न. नासेल ही आपत्ति चोरीस जाईल ही भीति! या सर्व अनर्थांपासून, अडचणींपासून, पैसा माझी सुटका करतो. माझी ऐपत, माझी वस्तु घेण्याचीं ताकद, मी त्याच्यामार्फत सांठवितों. कारण पैसा विनिमयाचें सर्वमान्य साधन आहे. तेव्हां तो दिल्याबरोबर मला पाहिजे तो माल मिळेल, याच दृष्टीनें योजक, व्यापारी कोणत्याहि वेळेस जरूर ती वस्तू घेण्यास अगर घेतली असल्यास तिचा मोबदला देण्यास जरूर ती ऐपत शक्ति हातीं असावी म्हणून नेहमीं पैसा शिलकी ठेवतात. अर्थात् ते किती ठेवतात हें त्यांचा अनुभव जसा असेल त्याप्रमाणें व्यवहाराचा ताळमेळ पाहून, कोणत्या मोसमांत खरेदी करावी लागते, कोणत्या मोसमांत भाव बरा असतो, पैसे केव्हां द्यावे लागतील, हें सर्व मागील अनुभवजन्य ज्ञानास अनुसरून पाहिजे असेल तितकी शिल्लक ते ठेवीत असतात. अगदीं संसारी मनुष्यसुद्धां असाच वागतो.

पगार झाल्याबरोबर घरवाला, दूधवाला, वाणी, प्रसंगविशेषीं डॉक्टर वगैरेंचे पैसे देऊन टाकून बाकी पैसा जवळ ठेवतो. जेव्हां वस्तु लागेल तेव्हां पैसा टाकून ती विकत घेतो. जर ही ऐपत त्याला शिल्लक ठेवतां आली नसती, सांठवितां आली नसती तर त्याची अडचण झाली असती. समजा, बागाईतदाराकडे तो कारकून आहे, व त्याला मेहनतान्याबद्दल फळें मिळतात, तीं त्यानें ताबडतोब खपविलीं पाहिजेत व वस्तु घेतल्या पाहिजेत; गिऱ्हाईक न मिळालें अगर जरूर त्या वस्तू घेण्यापुरतीं फळें विकलीं जाऊन फळें शिल्लक राहिलीं तर ही त्याची ऐपत वायां जाणार. तो हीं फळें सांठवूं शकत नाहीं. पैसा हें विनिमयाचें साधन असल्यामुळें तो सर्व फळें कमीजास्त भावानें विकील; व जो पैसा शिल्लक राहील तो त्याला उपयोगी पडेल. त्यानें आपली ऐपत तेवढ्या मानानें सांठविली, व ती केव्हांहि तो उपयोगांत आणूं शकतो. ही ऐपत अगदीं कल्पतरूप्रमाणें ताबडतोब फळ देणारी; कारण पैसा टाकला कीं पदार्थ मिळाला. म्हणून पैसा हा, ऐपत सांठविण्यास उपयोगी पडतो, व त्याचा उपयोग ताबडतोब करतां येतो. म्हणून ताबडतोब उपयोगाकरितां, व्यापारधंद्यांत पैसा हातांत ठेवणें, तयार ठेवणें अत्यंत जरूर असतें.

मोठमोठाल्या व्यापारी पेढ्या, बँका, नेहमीं आपल्याजवळ कांहीं ना कांहीं पैसा शिल्लक ठेवतात; कारण कोणत्यावेळीं काय प्रसंग येईल याचा नेम नसतो; व अशा प्रसंगीं सर्व संकटांतून पार पाडणारा एकच मित्र त्यांना असतो, व तो म्हणजेच शिलकी पैसा. तो प्रसंगीं हातीं असावा म्हणून लोक कांहीं शिल्लक ठेवतात, सर्व गुंतवीत नाहींत; कारण गुंतविलेला पैसा पाहिजे त्या वेळीं मिळेलच अशी खात्री नसते. आपला दिलेला पैसा येत नाहीं, व घेतलेला मात्र देण्याचा तगादा लागतो हा अनुभव सर्वांनाच आहे. म्हणून पुष्कळ व्यापारी पत राखण्याकरितां रकमा मोठ्या प्रमाणावर शिल्लक ठेवतात; कारण वेळीं रक्कम उभी न केल्यास, पत राखण्याकरितां कमी भावानें मिळकत विकून, रोखे विकून, वेळ मारून न्यावी लागते. रोखे, शेअर्स, वगैरेंना ताबडतोब कमी भावानें कां होईना, गिऱ्हाईक तरी मिळतें. पण मोठमोठ्या इस्टेटींना गिऱ्हाईक लवकर मिळत नाहीं; व मिळालें तर किंमत पाडून घेणारें मिळतें. पैशाची जरूरी पत राखण्याकरितां असते; म्हणून मनुष्य वाटेल ती किंमत घेऊन पैसा उभा करीत असतो. व्यापारी मनुष्य ज्याला नेहमीं उलाढाली कराव्या लागतात तो बहुतकरून आपली रक्कम अशा तऱ्हेनें गुंतवितो कीं, ताबडतोब रोकड पैसा उभा रहावा. या दृष्टीनें सोनें, चांदी, रोखे, नामांकित कंपन्यांचे शेअर्स, हे जरी, प्रत्यक्ष पैसा नसले तरी, प्रसंगीं त्यांचा पैसा ताबडतोब तयार होतो, त्यांना ताबडतोब गिऱ्हाईक

मिळतें. तथापि पैशाइतका मात्र त्याचा उपयोग ताबडतोब होत नाहीं. हा ऐपत सांठविण्याचा व ताबडतोब उपयोगीं पडण्याचा पैशाचा उपयोग आधुनिक व्यापारांत अत्यंत महत्त्वाचा समजला जातो.

वर निरनिराळे पैशाचे मुख्य उपयोग सांगितले; पण खुद्द पैशाचें स्वरूप सांगितलें नाहीं. कीर्ति ऐकिली पण मूर्ति वर्णिली नाहीं. अदलाबदल करण्याकरितां, विनिमयाकरितां कांहींतरी साधन पाहिजे ही गोष्ट फार प्राचीन काळापासून समाजानें जाणिली व त्याप्रमाणें निरनिराळ्या काळांत या विनिमयाच्या साधनांच्या पैशाचें स्वरूप निरनिराळें होतें. वेदकालीं गाई हें विनिमयाचें साधन होतें. प्राचीन इजिप्तमध्यें कवड्या, पूर्वी आफ्रिकेमध्यें चाकू व्यवहाराचें साधन समजून त्यांच्यामार्फत व्यवहार चालत असे. साधन म्हणून सुद्धां, उपयुक्त वस्तूच उपयोगांत आणीत व तिचा उपयोग साधन म्हणून होऊं लागला कीं, साहजिक तिला मागणी व किंमत वाढे. गाय उपयुक्त व शिवाय गाय देवघेवीचें साधन म्हणून गाईला महत्त्व व मागणी जास्त; संपत्तीची मोजणी गायींत होऊं लागली. तथापि, विनिमयाचें साधन जी वस्तु असेल तिचा अन्य कांहीं उपयोग असावा, असें आतां राहिलें नाहीं. एक रुपया मी घेतला, त्याचा उपयोग, त्यानें कांहीं पदार्थ विकत मिळतात म्हणूनच. रुपया डोक्यावर ठेवल्यानें ऊन कमी लागत नाहीं, अगर नोटा जोडून सदरा तयार करतां येत नाहीं. आज १०० रुपयांची नोट घेतली तर, तिला तयार करावयास एक आणासुद्धां खर्च आला नसेल. पण आज १०० रुपयांना मिळणारा माल, ती नोट दिली असतां मिळतो. कारण जो माल देऊन ती घेईल त्यालाहि असाच भरंवसा असतो. सर्व समाज त्या नोटेची किंमत शंभर रुपये समजतो, व त्याप्रमाणें व्यवहार होतो. आधुनिक पैशाचें स्वरूप नोटा व नाणें असें आहे. नाणीं सोन्याचीं व चांदीचीं बहुतेक सर्वत्र आहेत. सोनें व चांदी यांचा पैशाकडे उपयोग फार दिवसांपासून होत आहे. खुद्द सोनें व चांदी यांचा मनुष्याला कांहीं उपयोग होत नाहीं. पण सोनें व चांदी या दोन्ही वस्तूंना कांहीं तरी किंमत आहे. अगदीं कागदी नोटांप्रमाणें हे धातु नाहींत. तथापि सोन्याचांदीपासून नाणीं करतात, व विनिमयाच्या साधनाकडे त्यांचा उपयोग होतो; म्हणजे त्यापासून पैसा तयार करतात म्हणून या दोन्हीं वस्तूंना जास्त किंमत आलेली आहे. त्यांचा हा उपयोग नसता तर, दुसऱ्या मूल्यवान् वस्तूप्रमाणें त्यांना समाजानें किंमत दिली असती, पण विनिमयाची सेवा ते करतात, यामुळें त्यांच्या महत्त्वांत भर पडली हें उघड आहे. सोनें, चांदी या वस्तु टिकणाऱ्या आहेत, जड नाहींत व त्यांचे लहान लहान भाग पाडले तरी, प्रत्येक भागाचें स्वरूप कायम राहते.

त्यांचा जगांतील पुरवठा अगदीं थोड्या प्रमाणानें दरसाल वाढत असल्यामुळें, त्यांच्या किंमतीवर एकदम परिणाम होत नाहीं.

पूर्वीं सोनें चांदी विनिमयाचें साधन होतें तरी, त्यांचीं नाणीं पाडीत नसत. त्यामुळें प्रत्येकाला सोनें अगर चांदी पारखून घ्यावी लागे. त्याचें वजन व जात हेंहि कसून तपासून खात्री करून घेणें भाग पडे. पुढें नाणीं निघालीं, नाण्यांवर ज्यानें काढलें त्याचा शिक्का, व त्याचें वजन लिहिलेलें असावयाचें. हल्लीं नाणीं काढण्याचा अधिकार ज्या त्या राष्ट्रांतील सरकारलाच आहे. प्रत्येक नाण्यावर सरकारी शिक्का व त्याची किंमत लिहिलेली असते. रुपया घेतला तर त्यावर राजाचा छाप व किंमत एक रुपया असें लिहिलेलें असतें. युरोप व अमेरिकेंमध्यें कांहीं बँका सोन्याचे चलनांतील नोटा काढतात, म्हणजे ती नोट त्या बँकेंत दिली असतां त्यांत लिहिल्याप्रमाणें सोनें म्हणजे सोन्याचीं नाणीं बँक देतें. आपल्याकडे सरकार नोटा काढतें, व ती सरकारी खजिन्यांत अगर सरकारी काम करणाऱ्या बँकेंत दिली असतां, नोटेंत दर्शविल्याप्रमाणें रुपये मिळतात. पैसा वस्तू स्वरूपाचा असूं शकतो. उदा०, गाय, चाकू. तथापि हल्लीं हें पैशाचें स्वरूप जवळ जवळ नाहींच. हल्लीं पैसा म्हणजे नाणें, सोनें, चांदी अगर अन्य वस्तू व नोटा. पण प्रत्येक नोटेमध्यें लिहिल्याप्रमाणें त्या त्या देशाचें नाणें देण्याचें वचन सरकार अगर नोटा काढणारी बँक देत असते, म्हणून नोटा म्हणजे नाण्याचे प्रतिनिधि म्हणून अर्थशास्त्रांत कागदी नोटांना सामान्यतः प्रतिनिधिस्वरूप पैसा म्हणतात. बारीकसारीक व्यवहार सुलभ व्हावेत म्हणून मुख्य नाण्याचे लहान लहान भाग दर्शविणारीं नाणीं बहुतेक सर्व राष्ट्रांत आहेत. पौंडाचें शिलिंग, पेन्स; रुपयाचे आणेल्या, चवल्या, पावल्या, अधेल्या, वगैरे. असलीं चिल्लर नाणीं त्यांत थोडीशी चांदी घालून बाकी दुसरी धातु घालून सामान्यतः तयार करतात. १ शिलिंगांतील चांदी २ पेन्स किंमतीचीसुद्धां नसते. त्याचप्रमाणें चवल्या, पावल्या, अधेल्यांत असणारी चांदी त्या नाण्याचे किंमतीपेक्षां पुष्कळच कमी असते. हिंदुस्थानांत खुद्द रुपयांत म्हणचे मुख्य नाण्यांत मुख्य चलनांतच रुपया भार चांदी नसते. कागदी नोटा सरकारनें काढल्या म्हणून त्यांना त्यांत लिहिल्याप्रमाणें किंमत. रुपया सरकारनें काढला व त्यावर एक रुपया किंमत लिहिली म्हणून तितकी किंमत. कागदाऐवजीं थोड्या चांदीवर शिक्का मारला येवढाच फरक. पूर्वीं रुपयांत ११ आणे चांदी असे. आतां तर त्याहूनहि कमी, त्यामुळें रुपये काढण्यांतसुद्धां सरकारला फायदा होतोच. रुपयांत चांदी एक रुपयाचेपेक्षां कमी असून सुद्धां लोक घेतात, व त्यांत लिहिलेल्या किंमतीप्रमाणें किंमत मानून व्यवहार करतात.

कारण कायद्यानें, सरकारनें त्याला चलन म्हणून मान्यता दिली आहे, व समाजांत प्रत्येकाला त्या नाण्यांत फेड केली असतां अगर किंमत दिली असतां घेतली पाहिजे. मला 'अ'चे १० रु. द्यावयाचे आहेत; मी त्याला सरकारी दहांचीं नोट दिली, किंवा १० रु. दिले तर, त्यानें घेतलेंच पाहिजेत. सरकारनें मान्य केलेला पैसा हें कायदेशीर चलन असतें व त्यांत फेड अगर किंमत दिली असतां ती कायदेशीर होते, ती घ्यावी लागते, न घेतल्यास त्याला दुसऱ्या कोणत्याहि रीतीनें त्याचें घेणें सरकारमार्फत वसूल करून मिळणार नाहीं. 'अ' नें कोर्टदरबार केला, 'ब' नें कोर्टांत १० ची नोट अगर १० रुपये ठेवले तर, कोर्ट त्याला ते घ्यावयास लावील. त्यानें न घेतल्यास त्याचा दावा कोर्ट बुडवील. रुपयांत, एक रुपया भार चांदी नाहीं अगर नोट म्हणजे नुसता कागद, अशी तक्रार चालणार नाहीं. हें चलन सरकारमान्य असल्यामुळें सरकारलासुद्धां तें घ्यावेंच लागतें. कर भरावयाचा असला तर, मी नोटा अगर नाणीं देतों. सरकारी अधिकारी ती घेतो, कारण कायद्यानेंच व्यवहारांतील फेडीकरितां, किंमतीकरितां देण्याघेण्याकरितां हें चलन मान्य केलेलें असतें. खुषीनें दुसऱ्या देशाचीं नाणीं अगर नोटा कोणी दिल्या अगर घेतल्या तर, कोणाची तक्रार नाहीं. मात्र कायदेशीर चलन दिलें असतां घेतलें पाहिजे हें मुख्य सूत्र आहे. सरकार, लोकांवर पैसा, नोटा अगर नाणीं, कायद्यानें लादतें, पण त्यालाहि कांहीं नैसर्गिक मर्यादा आहेत. त्या मर्यादेपलीकडे सरकार जाऊं शकत नाहीं. त्या मर्यादा पुढील विवेचनांत येणारच आहेत. तात्पर्य पैसा हल्लीचे काळीं, नाणीं व नोटा या स्वरूपांत असतो.

---

# २१. बँका व त्यांचे व्यवहार

पैसा व त्याचे उपयोग यांचा विचार मागील भागांत केला. हल्लींचे काळीं पैशाचा व्यवहार विशेषतः बँकांमार्फत होतो. समाजांत व्यापार वाढला, उदीम वाढला म्हणजे खेळत्या पैशाची जरूरी भासते, व ती पुरी करण्याचें काम पेढ्या, बँका करीत असतात. कांहीं देशांत बँकांना नोटा काढण्याचाहि अधिकार असतो, व ह्या नोटा अगदीं सरकारी नोटांप्रमाणें समजल्या जातात, लोक त्या घेतात व देतात. बँकनोट म्हणजे तींत लिहिल्याप्रमाणें रक्कम ती नोट देणारास मागितल्याबरोबर बँक देते. बँक-नोट म्हणजे ताबडतोब पटणारी वचनचिठ्ठी. बँक ऑफ इंग्लंडची ५ पौंडांची नोट म्हणजे ती त्या बँकेंत दिली असतां सोन्याचे ५ पौंड देण्याचा करार ही बँक करीत असे. हल्लीं सोन्याचे पौंड दिलेच पाहिजेत असें नाहीं, त्याऐवजीं दुसऱ्या नोटा अगर नाणीं दिलीं तरी चालतात. अमेरिकेंतील सरकार, त्यांच्या खजिन्यांत असलेल्या सोन्याचे प्रमाणाबरहुकूम सुवर्ण सर्टिफिकिटें काढतें. जितकीं सर्टिफिकिटें तेवढें सोनें अमेरिकन सरकार खजिन्यांत ठेवतें. तें सर्टिफिकिट व्यवहारांत चलनाप्रमाणें चालतें. बँक नोटा काढतें, तेवढ्या किंमतीचें सोनें अगर चांदी ठेवीत नाहीं. बँकांनीं कोणत्या प्रमाणांत सोनें अगर चांदी ठेवून नोटा काढाव्यात, यासंबंधीं बहुतेक देशांत कायदे केलेले आहेत. सोनें अगर चांदी, अर्थात् नाण्याच्या रूपानें आपल्या खजिन्यांत ठेवून, त्यापेक्षां जास्त किंमतीच्या नोटा बँका काढीत असतात. लोक नोटा घेतात, व बँकेंत दिल्या असतां, त्यांत नमूद केल्याप्रमाणें त्यांना सोनें, चांदी अगर त्यांचीं नाणीं मिळतात. बँकेंत दररोज पैसा येत असतो व जात असतो. कोणत्या वेळीं किती रोकड लागेल याचा अंदाज बँकांना असतो, व तेवढीं नाणीं अगर तेवढें सोनें, चांदी, शिल्लकी ठेवली म्हणजे तिच्या व्यवहाराला अडचण पडत नाहीं. नोट दिल्याबरोबर रोकड मिळते, हा विश्वास व ही पत उत्पन्न झाली असली म्हणजे, त्या बँकेच्या नोटा लोक घेतात व व्यवहारांत त्यांचा उपयोग देवघेवीसाठीं चालू होतो. प्रत्येकजण नोट घेऊन बँकेंत जात नाहीं. ती जणूं कांहीं रोकड आहे, असें समजून वागत असतो.

त्यामुळें जेवढया नोटा बँक काढते व लोक जेवढया आपल्या जवळ ठेवतात, अगर व्यवहारांत वापरतात, तेवढीं रक्कम बँकेला बिनव्याजीं वापरावयास मिळते. बँक रोकड घेऊन नोटा देते एवढेंच नव्हे तर, लोकांना कर्ज पाहिजे असेल तरी नोटा देते. त्याचप्रमाणें सरकारी रोखे अगर शेअर्स खरेदी करण्याकरितांहि नोटांचा उपयोग करते. मला मुंबईस हजार रुपये पाहिजे आहेत, मी पुण्यास नामांकित बँकेंत एक हजार रुपये देतों, व बँकेची नोट हजार रुपयांची घेतों; मी मुंबईस जाऊन त्या बँकेचे शाखेकडे ती नोट देतों, हजार रुपये घेतों. समजा, मला नेहमीं पैशाची देवघेव करणें आहे. मजजवळची सर्व रोकड मी बँकेंत देतों व तेवढया किंमतीच्या नोटा घेतों. ही सर्व रक्कम बँक बिनव्याजीं वापरते. मला जेव्हां रोकडीची जरुरी असते, त्यावेळेस मी नोटा बँकेंत देतों रोकड घेतों. मला कापूस खरेदी करावयाचा आहे, मोठ्या रकमेची जरूर आहे, मी बँकेकडे जातों, बँक मला रोकड न देतां आपल्या नोटा देते. मी त्या घेतों कारण त्या चलनासारख्या घेतल्या जातात. या व्यवहारापासून बँक नफा मिळविते. कारण कर्जावर व्याज आकारते. त्याचप्रमाणें कंपन्यांचे भाग, रोखे, वगैरे बँका आपल्या नोटा देऊन खरेदी करतात, व त्यांवर येणारें व्याज मिळवितात. दिलेल्या नोटा बँकेंत आल्या म्हणजे त्याबद्दल रोकड दिली पाहिजे, याची दक्षता बँक घेत असते. या नोटांमुळें बँक पैसा उत्पन्न करून खेळत्या पैशांत भर टाकीत असते. त्याचप्रमाणें नोटा अगदीं रोकडीच्या स्वरूपाच्या आहेत, हा विश्वास असल्यामुळें प्रत्यक्ष रोकड समाजांत कमी प्रमाणावर हाताळली जाते.

बँक खजिन्यांत असलेल्या सोन्या–चांदीपेक्षां जास्त किंमतीच्या नोटा काढून पत वाढवीत असते, कारण काढलेल्या नोटा व्यवहारांत, देवघेवीसाठीं उपयोगांत आणल्या जातात, व त्या प्रमाणांत त्या पैशाचें काम करीत असतात. पूर्वी युरोपमधील बहुतेक बँकांना याप्रमाणें नोटा काढण्याची परवानगी त्या त्या देशाचें सरकार देत असे. व्यवहार फार होऊं लागले, व्यापारउदीम मोठ्या प्रमाणावर होऊं लागला, तेव्हांपासून बहुतेक राष्ट्रांत ही परवानगी फक्त एकाच मध्यवर्ति बँकेला देण्यांत येत असते. इंग्लंडमध्यें हल्लीं फक्त बँक ऑफ इंग्लंडलाच ही परवानगी आहे. हिंदुस्थानांत सरकारच नोटा काढीत असे. १९३५ पासून सरकारनें हें काम रिझर्व बँक ऑफ इंडियाचे स्वाधीन केलें आहे. पूर्वी नोटा, नाणीं, चलनविषयक सर्व कामें, सरकार करीत असे. तीं आतां सरकारतर्फे सरकारच्या नियंत्रणाखालीं ही बँक करीत असते. या बँकेला ५, १०, १००, १०००, १०००० इत्यादि रुपयांच्या नोटा काढण्याचा अधिकार आहे इतर कोणत्याहि बँकेला हा अधिकार नाहीं. जानेवारी

१९४६ मध्यें १०० पेक्षां जास्त किंमतीच्या नोटा हिंदुस्थान सरकारनें वटहुकूम काढून रद्द केल्या आतां त्या चलन नाहींत. १०० रु. पर्यंतच्याच नोटा आतां चलन म्हणून व्यवहारांत आहेत. या नोटा सरकारी कायद्यानें कायदेशीर चलन म्हणून समजल्या जातात, व त्या फेडींत दिल्या असतां घेतल्या पाहिजेत असा कायदा आहे. सरकारनें नोटा काढण्याचा अधिकार रिझर्व बँकेला दिल्यापासून सरकार स्वतः नोटा काढीत नाहीं. जेवढ्या किंमतीच्या नोटा ही बँक काढील, त्याला तारण म्हणून सोनें, नाणीं अगर लगडी, स्टर्लिंग रोखे, म्हणजे ज्यांची परतफेड ब्रिटिश पौंडानें मिळण्याची हमी ब्रिटिश सरकारनें घेतली आहे असे, चांदीची नाणी, हिंदुस्थान सरकारचे रोखे, याप्रमाणें ऐवज बँकेनें बाजूस काढून ठेविला पाहिजे. रिझर्व बँकेनें नोटांबद्दल ठेवावयाच्या गंगाजळींत काढलेल्या नोटांच्या किंमतीच्या निदान ४० टक्के भाग तरी सोनें, सोन्याचें नाणें व पौंडाचे कर्जरोखे ह्यांचा असावा, व ह्यापैकीं सोनें निदान ४० कोट रुपये किंमतीचें असलें पाहिजे असा नियम आहे. तारणाशिवाय नोटा काढण्याचा हक्क नाहीं. या सोन्याच्या तारणापैकीं निदान $\frac{१७}{२०}$ इतका त्याचा भाग हिंदुस्थानांत असला पाहिजे असें नियंत्रण कायद्यानें घातलेलें आहे. या सर्व नियंत्रणाचा उद्देश नोटांची पत राखणें हा आहे. त्या सरकारी खजिन्यांत अगर सरकारी बँकेकडे आल्या असतां, त्यांत लिहिल्याप्रमाणें रोकड मिळाली पाहिजे. बहुतेक मध्यवर्ती बँकावर ज्यांना ज्यांना नोटा काढण्याचा अधिकार आहे, त्यांवर अशींच नियंत्रणें असतात. परदेशांत व्यवहार होतो, त्याला सोपें पडावें म्हणून, कांहीं ठिकाणीं मध्यवर्ती बँका, मुख्य मुख्य देशांत आपली रोकड ठेवितात. कारण, नोटांचा प्रसार त्या त्या देशांत होतो. परदेशचीं देणीं द्यावयाचीं, त्याला नाण्यांची जरूरी असते. या दृष्टीनें इंग्लंड व अमेरिकेमध्यें पुष्कळ देशांच्या मध्यवर्ती बँकांची शिल्लक सोन्याच्या स्वरूपांत ठेवलेली असते. तात्पर्य, प्रत्येक देशांत सरकार अगर सरकारी नियंत्रणाखालीं काम करणारी मध्यवर्ति बँक, हीच फक्त नोटा काढून पैशाची भर व्यवहारांत टाकीत असते, पत उत्पन्न करीत असते. या नोटांमुळें देवघेव सुलभ होते. या नोटा कायदेशीर चलन समजलें जातें. पण हल्लीं बहुतेक पुढारलेल्या देशांत नोटांनीं देवघेव करणें, फेड करणें, हें जरी चालू असलें तरी चेकचा उपयोग सर्वत्र व मोठ्या प्रमाणावर होत आहे. इंग्लंड, अमेरिका या देशांत तर शेंकडा ९० वर व्यवहारांत चेकचा उपयोग लोक करतात. आपल्याकडे गेल्या २० वर्षांत चेकचा उपयोग वाढत्या प्रमाणावर आहे.

चेक म्हणजे बँकेला चेकमध्यें लिहिलेल्या इसमास अगर तो घेऊन जाणारास,

त्यांत नमूद केलेली रक्कम देण्याची आज्ञा. मी माझ्या बँकेवर चेक देतों म्हणजे माझ्या खातीं शिल्लक असलेल्या रकमेंतून कांहीं रकमेचा चेक देतों. चेकमध्यें लिहिलेली रक्कम, तो घेऊन जाणारास बँकेनें द्यावी असा हुकूम मी देत असतों. बँकेंत चेक काढणाराचे खातीं रक्कम शिल्लक असल्यास बँक त्याप्रमाणें चेक आला असतां, तो घेऊन येणारास रक्कम देते. पुष्कळ वेळां बँका तारणांवर, अगर अन्य-रीतीनें कांहीं मर्यादेपर्यंत खातेदाराची प्रत्यक्ष शिल्लक नसली तरी, त्याचा चेक आल्यास त्याचे पैसे देतात. याला ' Over-draw ' करण्याची सोय असें म्हणतात. एका दृष्टीनें ही रक्कम खातेदाराला कर्जाऊ म्हणून दिलेली असते, मात्र प्रत्यक्ष ती बँक आपले जवळ ठेवते व खातेदाराचा चेक आला म्हणजे त्यांतून देते. शिल्लक नसेल अगर ओव्हरड्राइंगची सोय झाली नसेल तर बँक चेक स्वीकारीत नाहीं. त्या चेकवर ' काढणाराकडे जा, ' अगर ' पुरेशी शिल्लक नाहीं, ' असा शेरा मारते व चेक परत करते. जो चेक घेतो त्याला नेहमींच तो न पटला जाण्याचा धोका पत्करावा लागतो. कारण जर शिल्लक नसेल तर बँक तो पटविणार नाहीं, व तो चेक घेणारास पैसे मिळणार नाहींत. व्यवहारांत लायक असामी असेल तरच, माल देऊन त्याचा चेक घेणें, व तो पटविणें ठीक होतें, नाहींतर चेक पटून त्याचे पैसे हातांत पडेपर्यंत मालाचा ताबा न देणें शहाणपणाचें असतें. पुष्कळ व्यवहार असेंच असतात. चेक पटल्याशिवाय मालाचा ताबा देत नाहींत. पुष्कळवेळां चेक मिळाला तरी, मध्येंच बँक बुडाली तर पैसे बुडतात, हाहि धोका असतो. अर्थात् हा धोका अगदीं अकल्पित नसल्यामुळें लोकांना त्याचा सुगावा वातावरणांत साधारणपणें आधींच लागतो. १९२९ च्या मंदींतील अरिष्टांत अमेरिका व युरोपमध्यें अनेक बँका बुडाल्या, १९१३ चे सुमारास हिंदुस्थानांतहि बऱ्याच बँका बुडाल्या. तथापि मागील अनुभवावरून, शिवाय सरकारनेंहि कांहीं नियत्रणें घातल्यामुळें, अलीकडे बँकांचा व्यवहार पुष्कळच व्यवस्थित झाला आहे. गेल्या वीस वर्षांत हिंदुस्थानांत बँकांची प्रगति बरीच झाली असून, चेकचा उपयोग मोठ्या प्रमाणावर होत आहे.

चेक म्हणजे कायदेशीर चलन नाहीं. कारण प्रत्येकाला चेक घेतलाच पाहिजे अशी सक्ति कायद्यानें नाहीं. नोटा अगर नाणें हें कायदेशीर चलन पैसा असल्या-मुळें तें घ्यावें लागतें. समजा, मी फोनो घेतला व दुकानदारास त्याच्या किंमतीचा ५० रु.चा चेक दिला. दुकानदारानें तो घेतलाच पाहिजे अशी सक्ति मला करतां येत नाहीं. दुकानदाराचा माझ्या पतीवर विश्वास नसेल तर, तो फोनो माझे हवालीं कर-णार नाहीं, प्रथम तो चेक बँकेंत नेईल व पटला तर मला फोनो देईल. उलट, जर

मी ५० रुपये त्याला नोटा अगर नाण्यांत दिले, तर त्याला घेतलेच पाहिजेत, कारण हें सरकारी चलन आहे. कायद्याप्रमाणें मला त्यांत किंमत देण्याचा पूर्ण अधिकार आहे. जें चलन नोटा व नाणीं सर्वजण मान्य करतात व जें कायदेशीर आहे त्याला पैसा, रोकड, म्हणणें योग्य होईल. चेक अगर ठेवचिठ्ठी बँकेंत दिल्याबरोबर रोकड मिळते, हें जरी खरें असलें तरी चेक अगर ठेवचिठ्ठ्या कायदेशीर चलन होत नाहींत. देवघेवीसाठीं मात्र त्यांचा उपयोग अगदीं रोकडीसारखा होत आहे हें खरें.

बँकेकडे लोक आपली रोकड ठेव म्हणून ठेवतात. कांहीं ठेव चालू खातीं ठेवतात, कांहीं मुदतीनें ठेवतात. चालू खातीं ठेव ठेवावयाची व जशी जरूर पडेल त्याप्रमाणें त्यांतून चेक काढून ती घ्यावयाची. चालू खात्यांतील रक्कम खातेदारास वाटेल त्या दिवशीं सूचना न देतां काढतां येते. मुदतीनें ठेव ठेवावयाची म्हणजे ३ महिने, ६ महिने, १ वर्ष अगर जास्त, याप्रमाणें ठेव ठेवली म्हणजे मुदत भरण्यापूर्वी खातेदारांस रक्कम मागण्याचा हक्क नाहीं. शिवाय मुदतीपुढें रक्कम ठेवणें नसल्यास बँकेस कळवावें लागतें. कांहीं ठेवी विशिष्ट मुदतीकरितां ठेवलेल्या नसतात; पण वाटेल त्या दिवशीं त्यांतून खातेदाराला रक्कम काढतां येत नाहीं. आठवड्यांतून एकदां सूचना देऊन रक्कम काढतां येते. चालू खात्यांतील ठेवीवर बँका बहुतेक व्याज देत नाहींत. जेथें कोठें मिळतें, तें सुद्धां अगदीं नाममात्र असतें. मुदतीनें ठेवलेल्या ठेवीवर बँक खातेदाराला व्याज देते. सामान्यतः सर्व बँका जास्त मुदतीचे ठेवीस व्याजाचा दर जास्त देतात. बँकेकडे याप्रमाणें येणाऱ्या मुदतीच्या व चालू खातीं ठेवी, बँक कांहीं स्वतःजवळ सांठवून ठेवीत नाहीं. बँक ही धंदा करणारी योजक आहे. त्या त्या देशांतील कायद्याप्रमाणें मर्यादित जबाबदारीवर निघालेली व सरकारकडे नोंदलेली अशी योजक आहे. तेव्हां नफा मिळविणें हें तर तिचें ध्येय असलेंच पाहिजे. म्हणून आपलेकडे ठेवीनें आलेला पैसा स्वतः खातेदारांना जें व्याज द्यावें लागतें त्यापेक्षां जास्त व्याज घेऊन बँक लायक इसमास, कंपन्यांस, योजकांस कर्जाऊ देत असते. चालू खातीं असलेली लोकांची शिल्लक, व मुदतीच्या खातीं असलेली शिल्लक, यांच्यांतील प्रमाण अत्यंत महत्त्वाचें आहे. चालू खात्यांतील शिल्लक, वाटेल त्यावेळीं खातेदार काढील म्हणून ती व्याजीं लावणें धोक्याचें असतें. त्यामानानें मुदतीच्या ठेवी व्याजीं लावणें कमी धोक्याचें, कारण मुदती कशा भरत जातील व केव्हां किती रक्कम त्या त्या ठेवीदारांची द्यावी लागेल, हें कळत असतें. बाजारांत अस्वस्थता असेल तर, लोक मुदतीनें ठेवी ठेवीत नाहींत. चालू खात्यांत ठेवी जास्त वाढतात, कारण गडबड झाली तर आपला पैसा ताबडतोब मिळावा, मग व्याज बुडालें

तरी चालेल, अशी विचारसरणी त्यांची असते. ताबडतोब चेक काढून तो बँकेंत न्यावयाचा, व पैसा घेऊन यावयाचा इतकें तें सोपें असतें. मुदतीनें ठेव ठेवली असल्यास मुदत भरेपर्यंत थांबावें लागतें.

चेकनें चालू खात्यांतील ठेवलेली रक्कम काढतात. पण पुष्कळ वेळेस बँकेंतील रक्कम अगर रोकड बाहेर जात नाहीं. मी फोनोवाल्यास ५० रु. चा चेक दिला, त्याचेंहि बँकेंत खातें असलें तर, तो आपल्या चालू खात्यांत हा चेक जमा करण्यास सांगतो. माझे खातीं बँक ती रक्कम नांवें टाकते, फोनोवाल्याचे खातीं जमा करते. ५० रु. कोठेंहि हालले नाहींत. माझी जमा ५० रु.नें कमी झाली व फोनोवाल्याची ५० रु.नें जास्त झाली. असें हजारों व्यवहार चालू असतात. देवघेवीमध्यें जरी या प्रकारें चेकचा उपयोग मोठ्या प्रमाणावर होत असला तरी, त्याचा अर्थ, लोक प्रत्यक्ष रोकडच देत असतात व घेत असतात. मात्र हें देण्याघेण्याचें सर्व काम बँक करीत असते. चेक काढणारा बँकेला आपल्या खात्यांतून अमुक रोकड काढून अमुक इसमास द्या असें सांगतो व त्याप्रमाणें बँक करीत असते. एकाची रक्कम कमी करते, एकाची जमा करते. याप्रमाणें हजारों रुपयांचें व्यवहार एक रुपयासुद्धां बँकेचे बाहेर न जातां होतात. चेकचा कागद ही शिल्लक नव्हे तर लोकांची बँकेंत जी रक्कम ठेव म्हणून असेल ती शिल्लक. चेक म्हणजे ती शिल्लक अमक्यास द्यावी हे सांगणारा एक कागद, बोलक्या ढलप्याप्रमाणें रोकड द्या असें सांगणारा हा कागद.

बँकेकडे असलेली रोकड हीच खरी शिल्लक. बँकेकडे खातेदार आपली रोकड ठेवतात. घरीं ठेवण्यापेक्षां बँकेंत ठेवणें सोयीचें, तसेंच सुरक्षितपणाहि त्यांत जास्त. खातेदाराला लोकांना पैसा द्यावयाचा असला तरी, तो चेकनें देणें त्याला सोपें वाटतें. त्याप्रमाणें खातेदार लोकांना चेकनें पैसे देत असतो. म्हणजे आपल्या खात्यावर बँके-कडे तो चेक देतो, व बँक चेक घेऊन पैसे रोकड देते. खातेदाराला लोकांकडून पैसे यावयाचे असतात. तेहि चेकच्या रूपानें येतात. हे चेक तो आपले खातीं जमा करण्यास बँकेस सांगतो व बँकहि त्याप्रमाणें पैसे वसूल करून त्याचे खातीं जमा करते. याप्रमाणें व्यवहार करणें, हें बँकेचें एक प्रमुख काम आहे. हजारों खातेदार असतात, त्यांचे चेक वसूल करणें, त्यांनीं काढलेलें पटविणें हीं कामें सारखीं चालू असतात. समजा, प्रत्येक खातेदाराची शिल्लक, एका पेटींत ठेवली. रक्कम जमा करावयाची म्हणजे त्या पेटींत ती टाकावयाची, चेक आला म्हणजे त्या पेटींतून काढावयाची व ज्याचे खातीं जमा करावयाची त्याचे पेटींत टाकावयाची. असेंच जणूं कांहीं बँक करीत असते. लोक बँकेच्या मार्फत चेकचे सहाय्यानें एकमेकांचीं

देणीघेणीं या रीतीनें वारीत असतात. या पद्धतीमुळें हजारों रुपयांचा व्यवहार, देव-घेव, बँकेचे बाहेर कांहीं रोकड न जातां होते हें उघड आहे. पुष्कळ रोकड या रीतीनें बँकेजवळ राहते, दररोज तिची जरूरी बँकेला लागत नाहीं. बँकेच्या कचेरींत चेक सारखे येत असतात व जात असतात. लोक रोकड ठेवीत असतात, काढून नेत असतात. कांहींच्या खात्यांच्या रकमा वाढत असतात, तर कांहींच्या कमी होतात, तथापि खुद्द बँकेजवळ असलेली रोकड कांहीं मोठ्या प्रमाणांत कमीजास्त होत नाहीं.

बँकेजवळ वर लिहिलेल्या परिस्थितींत शिल्लक राहाणारी रोकड निरुपयोगी ठेवणें बँकेला परवडणार नाहीं म्हणून, एका ठराविक प्रमाणांत रोकड ठेवून बँक बाकीची रोकड व्याजानें कर्जाऊ देते. अनुभवानें किती रोकड ठेवली असतां दर-रोजची रोकडीची मागणी पुरी करतां येईल, हें बँक जाणते; तेवढी ठेवून बाकीची गुंतविते. बँकेकडे ठेव म्हणून ठेवला जाणारा पैसा, रोकड व सरकारी मान्यतेचें चलन असतें. ठेव ठेवणारा परत घेतांना त्याच नोटा अगर तींच नाणीं मागत नाहीं. शिवाय सर्व नाणीं व सर्व नोटा सारख्याच असतात, त्यांत एकसारखेपणा असतो, एक रुपया अगदीं दुसऱ्या रुपयाप्रमाणें वजनांत, आकारांत असतो. तसें नसेल तर रुपया हें चलनच होणार नाहीं. तसेंच १० रुपयांची नोट जशी, तशाच सर्व नोटा १० रुपयाच्या. ठेव ठेवली म्हणजे ती परत मिळण्याचा हक्क ठेव ठेवणाराला आहे. दागिने ठेवले कीं तेच दागिने परत मिळाले पाहिजेत, पण शंभर रुपये ठेवले तर अगदीं तेच रुपये मिळाले पाहिजेत असा हक्क उत्पन्न होत नाहीं. शंभर रुपये मिळाले म्हणजे झालें. चलनांत सारखेपणा असल्याशिवाय बँकांना व्यवहार करणें अशक्य आहे. नाहींतर प्रत्येकाची ठेव वर सांगितल्याप्रमाणें पेटींत ठेवावयाची व बँकेनें नुसते आपले हात काळे करावयाचे. रोकड, चलन वर सांगितल्याप्रमाणें सारख्या स्वरूपाचें असलें म्हणजेच, बँका आपल्याजवळच्या ठेवींतून कर्ज देऊन व्यवहार करूं शकतात. त्याचप्रमाणें बँकेकडे असलेल्या ठेवीपैकीं, अगदीं थोड्या प्रमाणांत लोक बँकेतून परत घेत असतील तर हा व्यवहार बँक करूं शकते. एकंदर अनुभवावरून एकंदर ठेवीपैकीं किती प्रमाणांत रोकड तयार ठेवली असतां भागतें, हें बँक ठरवीत असते. समजा, १० टक्के रोकड ठेवली. बाजारांत बँकेबद्दल गप्प उठली व लागलीच ठेवीदार लोकांची गर्दी बँकेपुढें झाली, व ते पैशाची मागणी करूं लागले तर बँकेनें ती मागणी पुरी केली पाहिजे, न केल्यास बँक संपली. बँकेची एकंदर जिंदगी पुष्कळ असेल, थोडा वेळ मिळाल्यास बँक सर्व रक्कम देण्यास समर्थहि होईल; हें जरी खरें

असलें तरी, मागणी आल्याबरोबर ठेवीदारांचाच पैसा परत न केल्यास बँकेची पत गेली; बँक खलास झाली. नेहमीं १० टक्के रोकड पुरतें म्हणून, तेवढीच ठेवली असें म्हणून भागत नाहीं. एकंदर ठेवीच्या मानानें नेहमीं येणारी मागणी मोठया प्रमाणांत कमी असल्याशिवाय बँक आपली शिल्लक दुसरीकडे गुंतविणार नाहीं.

बँक आपल्याजवळ असलेली रोकड कर्जाऊ देते व त्यावर व्याज आकारते; या व्याजांतून अर्थात् कमी दरानें बँक ठेवीदारांना व्याज देते. बँकेकडे ठेव ठेवणें म्हणजे बँकेला कर्ज देणेंच आहे. बँक त्या कर्जावर व्याज देते व स्वतः जें कर्ज दुसऱ्यास देते त्यावर व्याज घेते. बँकेकडील ठेव पडून रहात नाहीं ती व्याजीं लाविली जाते. बँकेकडून कर्ज जे घेतात, ते तरी लोकांचें देणें देण्याकरितांच. हे लोक पुनः बँकेचें खातेदार असल्यास आपली रोकड बँकेंतच ठेवतात. समजा, एकच बँक आहे. मग बँक कर्ज देईल. कर्ज घेणारा निरनिराळया लोकांना त्याला द्यावयाचे पैसे देईल. हे लोक पुनः बँकेचें खातेदार असल्यास ते आपली रोकड पुनः त्याच बँकेंत, आपल्या खातीं जमा करतील. उदा०, 'अ' नें बँकेंत ठेव ठेवली; बँकेनें त्यांतून 'ब' ला कर्ज दिलें, 'ब' ला 'अ' चें देणें होतें, तें 'ब' नें दिलें; 'अ' नें पुनः तोच पैसा बँकेंत टाकला, असेंच होतें व हें सारखें होऊं लागलें म्हणजे बँकेजवळ प्रत्यक्ष अस्तित्वांत असलेल्या रोकडीपेक्षां ठेवी जास्त होतात. त्यांत कांहीं बिघडत नाहीं, मात्र जेव्हां रोकडीची मागणी ठेव ठेवणारे खातेदार करतील, त्या वेळीं ती पुरविली पाहिजे. ठेवीदारांकडून घेतलेल्या ठेवी हीं बँकेचीं देणीं कारण हें कर्ज ठेवीदारांकडून घेतलें आहे, असें समजलें जातें; बँकेनें लोकांस दिलेलीं कर्जें व हातांत असलेली रोकड, हीं बँकेची घेणीं होत.

बँक जेव्हां कर्ज देते तेव्हां, प्रत्यक्ष रोकड एक रकमेनें क्वचितच देते. ज्याला कर्ज द्यावयाचें त्याच्या खातीं कर्जाची रक्कम जमा करण्यांत येते व त्या रकमेवर तो ऋणको चेक काढीत असतो. त्याला जसजशी रक्कम लागते त्याप्रमाणें तो चेक काढीत असतो. पुष्कळ वेळां ठराविक रकमेपर्यंत स्वतःच्या खातीं रक्कम जमा नसतांना, त्याला चेक काढण्याची परवानगी बँक देते, व प्रत्यक्ष जेवढी रक्कम तो काढील तेवढयावरच बँक व्याज आकारते. याला 'ओव्हर ड्रॉ' करणें असें म्हणतात, हें मागें सांगितलें आहेच. मला १००० रु. कर्ज पाहिजे पण तें तावडतोब नको आहे व एकदांच नको आहे. मला बँक, ही अर्थात् माझी लायकी पाहून अगर तारण घेऊन, १००० रु. पर्यंत खातें 'ओव्हर ड्रॉ' करण्याची परवानगी देते. एक हजार रुपये पर्यंत मी चेक देऊं शकतों. व तो चेक बँक स्वीकारण्याचें व त्याप्रमाणें रक्कम देण्याचें कबूल करते. मला लागेल

तसे मी चेक देईन पण ते एक हजार रुपयाचे आंत, त्यापुढें बँक चेक स्वीकारणार नाहीं. जेवढीं रक्कम मी वापरीन तेवढयावरच मजकडून बँक व्याज घेईल. मी ज्यांना चेक देईन ते कदाचित् त्याच बँकेचे खातेदार असले तर, पुनः ते तेथेंच आपल्या खातीं रकमा जमा करतील, त्यांत कोणाच्याहि खातीं रक्कम कमी झाली नाहीं. उलट ज्यांना मी चेक दिले त्यांच्या खात्यांतील रकमा वाढल्या. अशा रीतीनें बँका कर्ज देऊन स्वतःकडील ठेव वाढवीत असतात. बँका पुष्कळ वेळां सरकारी रोखे अगर कंपन्यांचे रोखे, व भाग (शेअर्स) विकत घेतात, व ते विकणारांस चेक देतात. विकत घेणारे पुनः बँकेचेच खातेदार असल्यास तोच चेक पुनः त्याच बँकेंत जमा होतो. ह्यांत रोखे विकणाराचे खात्यांत जमा वाढली. अशा तऱ्हेनें बँकेच्या ठेवी वाढत असतात.

वर लिहिल्याप्रमाणें गिऱ्हाइकांना कर्ज देऊन स्वतः रोखे खरेदी करून बँका व्याज मिळवितात. पण त्याबरोबर त्यांच्या ठेवी वाढतात. या प्रकारें पत निर्माण करून खूप व्याज मिळविणें, फायदा मिळविणें, बँकांना शक्य आहे. तथापि बँकेच्या धंद्यांत इतर धंद्यांपेक्षां जास्त फायदा, जास्त नफा मिळत नाहीं. बँक चालविणें म्हणजे त्यालाहि खर्च आहेच. वर लिहिल्याप्रमाणें वाटेल तेवढी पत निर्माण करणें बँकांना शक्य नाहीं, त्यालाहि मर्यादा आहेत. ज्या ज्या वेळीं ठेवीदार रोकड मागतील त्या त्या वेळीं ताबड-तोब ती देऊन मागणी पुरी केली पाहिजे. पुरी न केल्यास बँकेची पत संपते, बँक खलास होते. यामुळें, सुरक्षितपणा वाटेल, मागणी आल्यास ती पुरी करण्यास पुरेल इतकी रोकड बँक हातांत ठेवीत असते. अर्थात् त्या रोकडीवर बँकेला व्याज मिळत नाहीं. पण ठेवीदाराला मात्र द्यावें लागतें. सामान्यतः एकंदर ठेवीच्या १० टक्के रोकड कमींत कमी बँका हातांत ठेवीत असतात. जास्त कर्ज दिलें कीं ठेवींत भर पडते, व मग रोकड हातीं शिल्लक असते तिचें प्रमाण कमी होतें. म्हणून जास्त पत वाढवा-वयाची झाल्यास, जास्त कर्ज द्यावयाचें झाल्यास, त्या मानानें बँक रोकडींत भर टाकते. भर न टाकतां पत वाढवावयाचा उद्योग केला, तर प्रसंगविशेषीं घातक होतें. कारण वाढत्या ठेवीच्या मानानें हातांतील रोकडीचें प्रमाण कमी होतें.

समजा, देशांत एकच बँक आहे व तिच्या शाखा देशभर असून सर्व व्यवहार समाजाला या बँकेमार्फतच करणें भाग पडतें. जर रोकड, नाणीं व नोटा, कमीजास्त करणें, तींत भर घालणें, अगर व्यवहारांतून काढून घेणें, ही बाब सरकारचे हातांतील असेल तर, बँकेला आपली रोकड वाटेल तेवढी वाढवितां येणार नाहीं. देशांतील शिल्लक कांहीं लोकांजवळ व कांहीं बँकेजवळ राहणार. लोकांजवळील शिल्लक बँक कांहीं

घेऊं शकत नाहीं. बँक फार तर आपल्या देणेकऱ्यांना तगादा करून तेवढी रोकड जमा करील. फार तर बँकेजवळ असलेले सरकारी व अन्य रोखे विकून आणखी रोकड जमा करील. तथापि ही शिल्लक आपले हातीं ठेवून, बँक त्यावर धंदा वाढवूं म्हणेल —म्हणजे कर्ज वगैरे देऊन पत वाढवूं म्हणेल तर तें जमणार नाहीं. कारण लोकांना जेव्हां वाटेल तेव्हां आपल्या ठेवी परत घेतां येत असल्यामुळें हां हां म्हणतां बँकेची रोकड ठेवीदारांची मागणी पुरी करतां करतां संपून जाईल; आणि जर बँकेकडे असलेल्या ठेवी एकंदर देशांतील रोकडीपेक्षां जास्त असतील तर बँकेची तारांबळ उडेल. कारण रोकडींत भर घालतां येत नाहीं, व जी कांहीं रोकड देशांत आहे, त्यांपैकीं लोकांची मागणी पुष्कळ असल्यामुळें, लोकांच्या हातांत ती राहणार. बाजारांत किंमती वाढत असल्या तर लोक जास्त जास्त रोकड जवळ ठेवूं इच्छितात. जर बँक आणखी व्यवहार वाढवील, कर्जें देईल तर, तिच्या रोकडीचें प्रमाण ठेवीच्या मानानें कमी होत जाईल. कारण रोकडींत भर घालतां येत नाहीं, व लोक तर रोकडीची मागणी कमी करीत नाहींत. रोकडीचें प्रमाण कमी करून धंदा वाढविणें धोक्याचें, म्हणून पत वाढविण्यास धंदा वाढविण्यास ही मर्यादाच उत्पन्न होते. बँक किती ठेवी ठेवूं शकेल, किती प्रमाणापर्यंत तिला ठेवी घेतां येतील, हें सामान्यतः तीन गोष्टींवर अवलंबून आहे. (१) देशांतील रोकड, चलन किती आहे. (२) लोक किती रोकड स्वतःजवळ ठेवूं इच्छितात. (३) कमींत कमी ठेवीच्या किती प्रमाणांत रोकड ठेवणें हें बँकेला सुरक्षित वाटतें. रोकडींत, चलनांत भर घालणें हें सरकारच्या अगर सरकारतर्फे जी संस्था असेल तिच्या हातीं असतें. लोक किती रोकड ठेवूं इच्छितात हें परंपरा, लोकसंख्या, संवयी वगैरे गोष्टींवर अवलंबून आहे. लोकसंख्या कमी झाली तर त्या मानानें रोकडीची जरुरी कमी होईल. पूर्वीं नोटासुद्धां लोक घेण्यास कुरकुर करीत. त्यांना नाणींच लागत. आतां पुष्कळ लोक रोकड बाळगीत नाहींत. चेकनें व्यवहार करतात. वाण्याला चेक दे, घरमालकाला चेक दे, विमा कंपनीला चेक दे, हे व्यवहार नित्याचे झाले आहेत. पूर्वीं एक रकमेनें लाख लाख रुपये शिल्लक ठेवणारे इसम असत. आतां बहुतेकांची म्हणजे श्रीमंतांची शिल्लक बँकेंतच ठेवलेली असते. अगदीं गाठीशीं असेल तरच आपला पैसा, असें आतां मानीत नाहींत. तथापि नेहमीं सुरक्षित वाटणाऱ्या प्रमाणापेक्षां, रोकड कमी ठेवली तर चालेल, अशी परिस्थिति येण्यास लोकांची स्वतःजवळ रोकड ठेवण्याची प्रवृत्ति कमी कमी झाली पाहिजे. नाहींतर बँकेला ठराविक मर्यादेपलीकडे आपली पत वाढवितां येणार नाहीं, अर्थात् सुरक्षितपणाच्या दृष्टीनें वरील विवेचनांत आपण देशांत एकच बँक आहे असें गृहीत धरलें आहे. देशांत

अनेक बँका असल्या तरी हाच सिद्धांत लागू पडेल. वरील तीन गोष्टींवर त्यांनीं किती पत वाढवावी, हें अवलंबून राहील. सुरक्षितपणाची मर्यादा कोणती हें या तीन गोष्टींनींच निश्चित केलें जातें.

देशांत पुष्कळ बँका असल्या तरी व्यवहारांत त्यांचा सारखेपणाच असतो, व त्यामुळें त्यांना एकमेकांशीं जुळवून घेतां येतें. समजा, माझें खातें पुणें जिल्हा सेंट्रल को-ऑ० बँकेंत आहे; मला एकानें इंपीरियल बँकेवर चेक दिला. मी तो माझे बँकेंत जमा करतों. समजा, मी एकाला माझे बँकेवर चेक दिला, पण त्याचें खातें इंपीरियल बँकेंत आहे, तेव्हां तो त्या बँकेंत आपल्या खातीं चेक जमा करतो. याप्रमाणें दिवसभर शेंकडों खातेदार निरनिराळ्या बँकांचे चेक जमा करीत असतात. जमा करून घेणारी बँक, प्रत्येक चेकागणिक मनुष्य धाडून रक्कम दुसरे बँकेकडून आणीत नाहीं तर दिवसअखेर एकमेकांकडे एकमेकांवर किती चेक आले, त्याचा हिशोब करून जी बाकी निघेल, ती 'जमा', 'नांवें' त्या त्या बँकांच्या खातीं करतात. अगर बाकीबद्दल चेक मध्यवर्ती बँकेकडे देतात. अशा मध्यवर्ती बँकेकडे सर्व बँकांचीं खातीं असतात. या पद्धतीला ( Bank clearing ) म्हणजे " चुकती बाकी करणें " असें म्हणतात. या पद्धतीमुळें, कोणत्याहि बँकेची रोकड कमी अगर जास्त ताबडतोब होत नाहीं. या पद्धतीनें १९४३ सालीं हिंदुस्थानांत १६५४०१२० चेक पटून ४३,२८,९२,००००० रु.ची उलाढाल झाली. ठराविक काळानंतर प्रत्येक बँकेला आढावा घेऊन, आपली रोकड वाढत आहे कां कमी होत आहे हें कळतें. रोकड वाढूं लागली तर, त्या मानानें बँक पत वाढवील; जास्त कर्ज देईल व तें प्रमाण सुरक्षित वाटणाऱ्या रोकडीचे प्रमाणांत राहील. १० टक्के रोकड ठेवणें सुरक्षित आहे असें मानलें व रोकडींत वाढ झाली कीं, इतकें कर्ज द्यावयाचें, कीं एकंदर ठेवीशीं वाढलेल्या रोकडीचें १० टक्के प्रमाण पडेल. उलट रोकड कमी होत आहे 'चुकत्या बाकींत' आपल्याकडे इतर बँकांची बाकी फिरत आहे असें बँकेला आढळून आलें तर दिलेलें कर्ज परत मागावयाचें हें धोरण तिला स्वीकारणें भाग पडेल. देशांतील सगळ्या बँका पत वाढवूं लागल्या व त्यांनीं एकमेकांना रोकड द्यावी लागणार नाहीं, अशी जरी व्यवस्था केली तरी त्यांना वर सांगितलेल्या मर्यादेपलीकडे, ती वाढवितां येणार नाहीं. कारण सर्व बँकांची जी शिल्लक असेल, त्याच मानानें एकंदर पतींत वाढ होईल. जी विचारसरणी, एकच बँक देशांत आहे असें समजून लागू पडली, तीच येथें लागू पडेल. शिल्लक निरनिराळ्या ठिकाणीं प्रत्यक्ष आहे येवढ्या फरकानें कांहीं बदल होणार नाहीं. तात्पर्य, जरी शेंकडों व्यवहार चेकनें झाले तरी, चेक म्हणजे

**रोकड नव्हे.** जी रोकड प्रत्यक्ष असेल ती महत्त्वाची म्हणून जर १० टक्के अगर दुसरें कोणतेंहि रोकड ठेवण्याचें प्रमाण सुरक्षित समजलें गेलें तर तें कायम ठेवून बॅकांना आपली पत वाढवावयाची, व्याप वाढवावयाचा असेल तर, लोकांची रोकड स्वतःजवळ ठेवण्याची प्रवृत्ति तरी कमी झाली पाहिजे, नाहींतर देशाचे रोकडींत-चलनांत, भर तरी पडली पाहिजे.

---

# २१. सराफ बाजार व मध्यवर्ती बँका

मागील भागांत सामान्यतः बँका किती उलाढाली करूं शकतील याचें विवेचन केलें. प्रत्येक देशांतील बँकांची एक निश्चित पद्धत असते, व त्या पद्धतीला अनुसरून त्यांचा व्यवहार चालत असतो. राष्ट्रांत पैशाचा पुरवठा करण्याचें काम एका दृष्टीनें बँका करीत असतात. मोठमोठ्या योजकांना, व्यापाऱ्यांना, सरकारलासुद्धां, थोड्या काळाकरितां पैशाची जरूरी लागत असते; ती गरज त्या देशांतील बँकांमार्फत पुरविली जाते. सरकारला तात्पुरती पैशाची गरज असली म्हणजे सरकार तीन महिने अगर कमी मुदतीच्या हुंड्या काढतें (Treasury Bills), त्या हुंड्या बँका घेतात, व सरकारची गरज भागवितात. त्याचप्रमाणें योजकांना, उद्योगधंदे करणारांना, चालू घडी पार पाडण्याकरितां नेहमीं पैशाची जरूरी असते, तीहि गरज बँकाच पुरी करतात. त्याचप्रमाणें पुष्कळ लोक वटणावळीचा धंदा करतात. हुंडया विकत घ्यावयाच्या, विकावयाच्या त्यांनाहि नेहमीं पैशाची गरज लागते. तेव्हां तेहि बँकांकडून योग्य मुदतीनें कर्जें घेतात. बहुतेक देशांत सरकारनियंत्रित मध्यवर्ती बँक ही असतेच व ती साधारणपणें देशांतील बँकांच्या व्यवहारांवर अप्रत्यक्षपणें नियंत्रण करते. मध्यवर्ती बँकेकडे बहुशः देशांतील चलनाचा कारभार सोंपविलेला असतो. त्यामुळें देशांतील रोकडीवर तिचेंच नियंत्रण असतें. थोडया मुदतीनें देण्यांत येणाऱ्या कर्जांवर व त्याचप्रमाणें लांब मुदतीचे कर्जांवर व्याजाचा दर काय राहील हें मध्यवर्ती बँकेचे धोरणावर अवलंबून राहतें; कारण तिच्या नियंत्रणाखालीं देशांतील चलन असल्यामुळें व्यवहारांत रोकड वाढविणें अगर कमी करणें, हें तिच्या धोरणावर अवलंबून असतें. सर्व बँकांना नेहमीं मध्यवर्ती बँकेच्या धोरणाला जुळेल असें वागावें लागतें.

प्रत्येक राष्ट्रांतील बँकाची एक पद्धति असते, व त्याला अनुसरून त्या वागत असतात हें वर सांगितलें आहे. त्या दृष्टीनें कांहीं देशांतील पद्धति समजून घेणें जरूर आहे. इंग्लंडमध्यें बँक ऑफ इंग्लंड ही मध्यवर्ती बँकेचें काम करते, तिलाच फक्त नोटा काढण्याचा अधिकार आहे. १९३१ सालापूर्वी इंग्लंडमध्यें सुवर्णचलन होते,

म्हणजे एक पौंडाची नोट या बँकेंत दिली असतां सोन्याचा पौंड, नाणें, बँक देण्यास कायद्यानें बांधलेली होती, हल्ली तसें नाहीं. पूर्वी बँक ऑफ इंग्लंड सोन्याचा सांठा भरपूर ठेवी. इंग्लंडमध्यें मोठ्या प्रमाणावर चेकचे व्यवहार होतात. तथापि इंग्लंड-मधील सराफ बाजार हा अगदीं अव्वल दर्जाचा असल्यामुळें बँका इतर देशांतील बँकांपेक्षां ठेवीच्या पुष्कळ कमी प्रमाणांत रोकड ठेवतात. लंडन येथें सरकारी हुंड्यांचा व्यापार फार मोठ्या प्रमाणावर होतो. या हुंड्यांना बँका, जवळ जवळ रोकड समज-तात. त्याचप्रमाणें वटणावळीचा धंदा करणारांना दिलेलें तात्पुरतें, थोडया वेळाचें कर्ज हेंहि जवळजवळ रोकड समजतात. त्यामुळें प्रत्यक्ष रोकड इंग्लिश बँकांजवळ ठेवीच्या मानानें पुष्कळ कमी असते. कारण रोकडीची जरूर पडल्यास जवळ असलेल्या सर-कारी हुंड्या कसर देऊन बँका बँक ऑफ इंग्लंडला विकतात, व ताबडतोब रोकड उभी करतात. वटणावळीवाल्यांना तगादा केला कीं, तेहि ताबडतोब रोकड हजर कर-तात. कारण त्यांच्या जवळच्या हुंड्या तेहि बँक ऑफ इंग्लंडकडे कसर देऊन विकून रोकड उभी करतात, अगर तिचेकडून कर्ज घेऊन फेड करतात. बँक ऑफ इंग्लंड-कडून रोकड कर्ज म्हणून इतर बँका घेत नाहींत. इतर देशांत रोकडीची जरूर पडल्या-बरोबर मध्यवर्ती बँकेकडे सामान्य व्यापारी बँका रोकड उसनवार मागतात, व तीं त्यांची गरज भागविते. किंबहुना योग्य परिस्थितींत हें काम करणें तिचें कर्तव्य असतें. इंग्लंडमध्यें मुख्य बँका व त्यांच्या शाखा यांचेकडे बहुतेक ठेवी असतात. उलट अमेरिकेंत बँकांना फार शाखा काढण्यास मनाई आहे. १९१४ सालीं झालेल्या कायद्यानें कांहीं बँका एकत्र येऊन आपली रोकड मध्यवर्ती ठिकाणीं ठेवूं लागल्या आहेत. पण शाखा काढण्यास वाव नसल्यामुळें शेंकडों स्वतंत्र बँका अमेरिकेंत आहेत. शाखा असणें सोयीचें असतें त्यामुळें स्थानिक गरज भागविली जाते. शिवाय जेथें जरूर नसेल तेथील ठेव जेथें फायदेशीर होईल तेथें नेऊन, व्याजीं लावतां येते. अर्थात् शाखांचे कामांवर अखेरची देखरेख मुख्य बँकेची असल्यामुळें पुष्कळ वेळां कामास विलंब लागतो. प्रत्येक ठिकाणीं बँक स्वतंत्र असल्यास कामें झटकन होतात हेंहि खरें. मोठी बँक व जिच्या पुष्कळ शाखा आहेत ती धंद्याचे दृष्टीनें सोयीची व फायदेशीर; पण बुडाली तर त्याचा परिणामहि मोठया प्रमाणावर व मोठया देशविभागावर होतो.

हिंदुस्थानांतील बँका साधारणपणें इंग्लिश बँकांचे धर्तीवर गेल्या आहेत. व्यक्ति-गत सावकारी धंदा करणारे सोडून दिले तर, आधुनिक पद्धतीनें समाईक भांडवलाची पहिली पेढी,–बँक–१७७० सालीं कलकत्ता येथें निघाली. तिचें नांव हिंदुस्थान बँक असें होतें. ती नोटा काढीत असे. ही बँक १८३२ सालीं बुडाली. १८०६ सालीं

बँक ऑफ बेंगाल निघाली. १८४० मध्यें मुंबई बँक व १८४३ मध्यें मद्रास बँक निघाली. १८६८ मध्यें पहिली मुंबई बँक मोडली व दुसरी स्थापन झाली. या तिन्ही बँका नोटा काढीत असत. १८६२ सालीं सरकारनें त्यांचा नोटा काढण्याचा अधिकार काढून घेतला. १८७६ सालीं झालेल्या कायद्यानें यांना इलाखा बँका म्हणून संज्ञा मिळाली व बराचसा सरकारचा शिलकी पैसा यांचेकडे तेव्हांपासून राहूं लागला. १९२१ सालीं नवीन कायदा होऊन या तिन्हीं बँका मिळून इंपीरिअल बँक ऑफ इंडिया झाली. तिची मुख्य कचेरी दिल्लीस असून मुंबई, कलकत्ता, मद्रास येथें त्या त्या इलाख्याची मुख्य कचेरी आहे. आज या बँकेच्या ३५० शाखा असून एक शाखा लंडन येथें आहे. रिझर्व बँक स्थापन होईपर्यंत म्हणजे १९३५ पर्यंत ही बँक सरकारी नियंत्रणाखालीं असल्यामुळें जवळ जवळ सरकारी बँकच समजली जाई. मध्यवर्ती बँकेप्रमाणें साधारणतः तिचा व्यवहार असे. सरकारचे व्यवहार, शिल्लक संभाळणें, कर्जाची व्यवस्था पहाणें हीं सर्व कामें ही बँक करी. अद्यापि जेथें रिझर्व बँकेच्या शाखा नाहींत तेथें ह्या बँकेच्या शाखा रिझर्व बँकेच्या एजंट म्हणून काम करतात. सरकारी कामें करीपर्यंत पुष्कळ नियंत्रणें या बँकेवर होतीं. स्थावरवर कर्ज देणें, सहा महिन्यापेक्षां जास्त मुदतीचें कर्ज देणें इत्यादि गोष्टी करण्याची तिला बंदीं होती. शिवाय हुंड्या वटवण्याचे बाबतींत नियंत्रण होतें. रिझर्व बँक ऑफ इंडिया स्थापन झाल्यापासून हीं नियंत्रणें दूर झालीं. रिझर्व बँक ऑफ इंडिया १९३५ सालीं स्थापन झाली व ती सरकारी काम करणारी बँक झाली. रिझर्व बँक ऑफ इंडिया ही मध्यवर्ती बँक आहे. तिच्याविषयीं विचार मागून करूं. इंपीरियल बँक ऑफ इंडिया· शिवाय समाईक भांडवलांच्या बँका हिंदुस्थानांत आजमितीस ८५५ आहेत. पैकीं कांहीं नाणावलेल्या आहेत. बँक ऑफ इंडिया, सेंट्रल बँक ऑफ इंडिया, बँक ऑफ बरोडा, महाराष्ट्र बँक वगैरे बँका महाराष्ट्रांत परिचित आहेत. या बहुतेक बँका व्यापारी बँका आहेत. जेव्हां बँका उद्योगधंद्यांना लांब मुदतीनें कर्जें देतात, आपली रोकड मुख्यतः अशा योजनेंत गुंतवितात, त्यांना औद्योगिक बँका म्हणतात. ज्या बँका हुंडया घेणें, रोखे घेणें, विकणें, अल्प मुदतीनें कर्जें देणें, योग्य तारण घेऊन पण फार मुदतीनें नव्हे, अशीं कर्जें देणें वगैरे कामें करतात त्यांना व्यापारी बँका म्हणतात. याशिवाय कांहीं बँका मुख्यत्वेंकरून परदेशी हुंड्यांचा व्यवहार करतात म्हणून त्यांना एक्सचेंज बँका म्हणतात. या बँका इतरहि गोष्टी करतात. पण मुख्य धंदा हुंडया परदेशीं धाडणें, विकत घेणें. एक्सचेंज बँका बरीच शिल्लक लंडन येथें अगर जेथें जेथें व्यवहार करतात तेथें तेथें ठेवीत असतात. या बँका नाणेबाजारांत मोठया महत्त्वाच्या समजल्या

जातात. परदेशांशीं होणाऱ्या व्यापाराला जरूर असणारा पैसा पुरवण्याचें तात्पुरतें काम मुख्यत्वेंकरून याच बँका करतात.

सहकारी तत्त्वांवर चाललेल्या शेंकडों पेढया हिंदुस्थानांत आहेत. हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांना हल्लीं कर्ज किती आहे हें सांगणें कठीण; पण १९३० सालीं बँकिंग चौकशी कमिटीनें ९०० कोटी आहे असें धरलें आहे. यापैकीं ४०० कोटी कर्ज कमी मुदतीचें व या ४०० कोटीपैकीं २० कोटी सहकारी पतपेढ्यांनीं व एक कोटी सरकारनें पुरविलें असें सदरहू कमिटीला आढळून आलें. सहकारी पतपेढ्यांचे दोन प्रकार. एक शेतकी व दुसरी बिगर शेतकी. शेतकी पतपेढ्या ह्या अमर्याद जबाबदारीच्या व बिगर शेतकी मर्यादित. या दोन्ही तऱ्हांच्या पेढ्यांना भांडवल मिळावें व त्याप्रमाणें पैशाचा पुरवठा व्हावा म्हणून प्रत्येक जिल्ह्यांत, जिल्हा सहकारी बँक निघाली आहे. कांहीं प्रांतांत प्रांतिक सहकारी बँकाहि निघाल्या आहेत. या प्रांतिक बँका प्रांतांतील सहकारी बँकांना मध्यवर्ती बँका म्हणून उपयोगी पडतात. हिंदुस्थानांत १९३९ सालअखेर ९४४३३ सहकारी शेतकी पतपेढया असून १२१६६ बिगर शेतकी सहकारी-पतपेढया होत्या. ६१५ सेंट्रल को-ऑपरेटीव्ह बँका असून ११ प्रांतिक को-ऑपरेटिव्ह बँका होत्या. पतपेढयांचे सभासद ४५ लाखांवर असून त्यांचें खेळतें भांडवल १०० कोटीवर होतें. भाग, भांडवल, रिझर्व फंड व ठेवी मिळून ४० कोटींवर पैसा त्यांचे जवळ होता. कांहीं सहकारी पेढया, पतपेढया असतात, म्हणजे समाईक जबाबदारीवर कर्ज मिळवून सभासदांची कर्जाची गरज भागविणें हा मुख्य उद्देश असतो. कांहीं उत्पादक स्वरूपाच्या—माल तयार करणाऱ्या, कांहीं माल खरेदी करून विकावयाचा व नफा सभासदांस वांटावयाचा या स्वरूपाच्या असतात. विशेषतः हौसिंग सोसायट्या म्हणजे घरें बांधणाऱ्या मंडळ्या अलीकडे पुष्कळ निघाल्या आहेत. सरकारच्या सहाय्यानें लँड मॉर्गेज बँका निघाल्या आहेत. शेतकऱ्यांच्या तात्पुरत्या गरजा पतपेढया भागवूं शकतात. पण कर्जमुक्त करण्याकरितां लांब मुदतीनें कर्ज व हलके हप्त्यानें फेड करण्याची सवलत, त्यांना जरूर आहे. या दृष्टीनें या लँड मार्गेज बँका उपयोगीं पडतात. हिंदुस्थानांत ह्या बँका कांहीं थोडया ठिकाणीं अलीकडे निघाल्या आहेत. हिंदुस्थानांतील पैशाचा पुरवठा, खेडयांतील सावकार, सहकारी पेढया, शहरांतील सहकारी पेढया, व्यापारी बँका, एक्सचेंज बँका व अन्य बँका यांच्यामार्फत होतो. या हजारों पेढया, बँका व व्यक्ति, देशांतील व्यवहारांत उलाढालीं करीत असतात. तथापि ज्याला नाणेबाजार म्हणतात, त्यांत उलाढाल करणाऱ्या, त्या क्षेत्रांत काम करणाऱ्या बँका म्हणजे व्यापारी बँका होत.

हिंदुस्थानांत समाईक भांडवलावर काढलेल्या व कायद्यानें नोंदलेल्या ८५५ बँका आहेत, त्यांचें भांडवल २३,६५,७१,००० रुपये आहे व ८७७ कोटी रुपयांच्या ठेवी त्यांचेजवळ १९४५ मध्यें होत्या. बँकांची मुख्य मदार त्यांच्या भांडवलावर अगर कायम निधींतील रकमेवर नसते. ज्या ठेवी त्यांचेकडे असतात, त्यांच्यावर त्यांचा धंदा चालतो. शक्य तितका नफा मिळवणें हें त्यांचें ध्येय असतें. तथापि असलेला पैसा ठेवीदारांचा, त्यामुळें शहाजोग ठिकाणींच तो गुंतविणें हें त्यांचें धोरण असतें. धोका असणाऱ्या योजनेंत अगर संशयित पत असलेल्या माणसांस रक्कम देणें, अगर कच्च्या तारणावर देणें, यापासून कदाचित् व्याज जास्त मिळेल पण मुद्दल बुडण्याची भीति असते म्हणून असला व्यवहार बँका सहसा करीत नाहींत. शिवाय मागणी केल्याबरोबर ठेवीदारांना रोकड पैसा मोजण्याची जबाबदारी असल्यामुळें बँका नेहमीं कांहीं प्रमाणांत रोकड हातीं ठेवतात. शिवाय त्यांचेजवळ कांहीं तारण अगदीं रोकडीच्या स्वरूपाचें असतें. सरकारी रोखे, हुंड्या वगैरे ताबडतोब विकून रोकड करतां येते. शिवाय कांहीं गिऱ्हाइकांना मागतील त्या वेळीं तें परत मिळेल या शर्तीवर कर्ज दिलेलें असतें. बँकेचें जर देणेंघेणें, जिंदगी पत्रक पाहिलें तर, नेहमीं त्यांत रोकड, हुंड्या तात्पुरता उसनवार दिलेला पैसा, गुंतविलेल्या रकमा, गिऱ्हाइकांना जातीवर अगर तारणावर दिलेलें कर्ज, या गोष्टींचा समावेश असतो. यांपैकीं हुंड्या, तात्पुरता दिलेला पैसा, ह्यांची रोकड झटकन करतां येते. हुंड्या दररोज कांहीं ना कांहीं तरी पक्क्या होत असतात, म्हणजे त्यांची मुदत भरत असते. अर्थात् रोकडीवर बँकांचें व्याज बुडतें त्याचप्रमाणें ज्या रोकडी स्वरूपीं गोष्टी आहेत, हुंड्या वगैरे त्यांवर व्याज थोडें येतें; सरकारी रोखे अगर अन्य यांवर व्याज जास्त येतें, तारणावर व पतीवर दिलेलें कर्ज यावरहि व्याज जास्त येतें; पण हें कर्ज ताबडतोब परत मिळत नाहीं. रोख्यांचा भाव कमीजास्त होत असतो म्हणून एकदम विकले तर नुकसानहि होतें. तात्पर्य, बँका आपली शिल्लक अशी गुंतवितात कीं, जेव्हां रोकडीची जितकी जरूर पडेल तितकी कांहींहि नुकसान न होतां उभी करतां येईल. बँका योग्य तारणाशिवाय अगर पतीची खात्री असल्याशिवाय पैसा गुंतवीत नाहींत. मंदींत पैसा मुबलक होतो. बँकेकडे ठेवी वाढतात, तेव्हांसुद्धां बँका या कामीं दक्ष असतात. मागणी आल्याबरोबर बँक रोकड देईल ही खात्री व तिच्याबद्दलचा हा विश्वास हेंच तिचें खरें भांडवल आहे व तें कायम ठेवण्याविषयीं प्रत्येक बँक दक्ष असते.

हुंड्यांना जवळ जवळ रोकड समजतात असें वर सांगितलें आहे. हुंड्यांचे

अनेक प्रकार आहेत. धनकोनें आपल्या ऋणकोवर येणें असलेली नक्की रक्कम मागतां-क्षणींच अगर कांहीं मुदतीनंतर आपणा स्वतःला अगर आपण सांगूं त्याला देण्या-विषयीं काढलेला हुकूम अगर पत्र, याला हुंडी म्हणतात. यांत वचनचिठ्ठी, सरकारी हुंडी (Treasury Bill), त्याचप्रमाणें परदेशी हुंड्या (Bills of Exchange), देशी हुंड्या वगैरेंचा समावेश होतो. अमेरिकेंत बँकेचा खातेदार बँकेकडून कर्ज घेतलेली रक्कम व जेवढी मुदत असेल तिचें व्याज याबद्दल वचनचिठ्ठी लिहून देतो. ही वचनचिठ्ठी बँक घेते, व त्याला कर्ज देते. रोकडीची गरज पडली तर बँक ही वचन-चिठ्ठी कसर कापून देऊन फेडरल रिझर्व्ह बँकेला विकते. या पद्धतीनें असल्या वचन-चिठ्ठ्या व्यवहारांत सारख्या येत जात असतात. बँकेनें ती स्वीकारिली म्हणजे बँक ती पटेल याबद्दल जामीन होते. न्यूयार्क बँकेनें ‘ अ ’ ला एक हजार डॉलर्स ३ महिने मुदतीनें कर्ज देण्याचें ठरविलें. ‘अ’ सदरहू बँकेला एक हजार डॉलर्स + ३ महिन्यांचें व्याज समजा, ३ टक्क्यानीं ७½ डॉलर्स होतात, मिळून १००७½ डॉलर्सची वचन-चिठ्ठी (प्रॉमिसरी नोट) लिहून देतो. त्यांत बरोबर तीन महिन्यांनीं १००७½ डॉलर्स, बँक अगर ती सांगेल त्यास देण्याचें वचन देतो. बँक ही नोट घेते व त्यास एक हजार डॉलर्स देते. समजा, न्यूयार्क बँकेला एक महिन्यानें रोकडीची गरज पडली तर, ही नोट ती फेडरल बँकेला कसर कापून देऊन विकते. एक महिन्यानें विकली तर साधारण २½ डॉलर कसर द्यावी लागेल; म्हणजे १००५ डॉलर्स मिळतील. पुनः न्यूयार्क बँकेनें ही हुंडी मान्य केली असल्यामुळें ‘ अ ’ नें पैसे न दिल्यास या बँकेला ते द्यावे लागतील. मग पुढं तिनें ‘ अ ’ जवळून वसूल करावेत. या नोटा ‘ निगोशिएबल ’ असतात; म्हणजे ज्याला दिली असेल त्याला दुसऱ्याला नुसत्या शेऱ्यानें देतां येते, व शेवटीं ज्याला दिली असेल त्याला रक्कम मिळण्याचा अधिकार असतो. इंग्लंडमध्यें कर्ज देतांना, अगर ओव्हर ड्राफ्ट देतांना ऋणकोकडून प्रॉमिसरी नोट करून घेऊन ती पुनः विकावयाची असें फारसें करीत नाहींत. ऋणकोकडून कांहींतरी तारण, रोखे, भाग, मालकी हक्काचे स्थावर मिळकतीचे कागद, असें घ्यावयाचें व कर्ज द्यावयाचें. कर्ज मुदतींत न आल्यास कराराप्रमाणें तारण विकून रक्कम वसूल करावयाची, अशी सर्वसामान्य पद्धत आहे. तारण नसेल तर लायक जामीन घेऊन कर्ज देतात. पण ऋणकोची वचनचिठ्ठी घेऊन ती पुनः विकावयाची असें करीत नाहींत. हिंदुस्थानांतील बँका मागें सांगितल्याप्रमाणें इंग्लिश बँकेचें वळणावर गेलेल्या आहेत. हिंदुस्थानांत पूर्वीपासून हुंड्यांची पद्धत आहे. दर्शनी हुंडी म्हणजे पैसे ताबडतोब मिळाले पाहिजेत. मुदतीची म्हणजे ठरावीक

मुदतीनंतर रक्कम मिळते ती. धनीजोग हुंडी म्हणजे ज्यानें विकत घेतली त्यालाच रुपये मिळावयाचे. नामजोग हुंडी म्हणजे ज्याच्या नांवानें दिली असेल त्यालाच रक्कम मिळेल. शहाजोग हुंडी म्हणजे हुंडी दाखविणाऱ्या कोणत्याहि लायक इसमास रक्कम मिळेल. हे व इतर प्रकारहि देशी हुंडयांत आहेत. हुंडी काढतो तो धनको. तो आपल्या ऋणकोस अमुक दिवसांनीं स्वतःस अगर सांगेल त्या इसमास अमुक रक्कम देण्याविषयीं हुंडी काढून हुकूम करीत असतो. ज्याच्यावर हुंडी काढली असेल त्यानें त्याप्रमाणें रक्कम देण्याचें कबूल केलें म्हणजे 'हुंडी स्वीकारिली' असें म्हणतात. ही हुंडी दुसऱ्यास देतां येते, फक्त त्याप्रमाणें त्या हुंडीवर नोंद केली कीं पुरेसें होतें. मात्र जो जो नोंद करून दुसऱ्यास देईल तो प्रत्येकजण क्रमानें ज्यावर हुंडी काढली आहे त्यानें स्वीकारिली नाहीं तर पुढच्या माणसांस जबाबदार असतो. 'अ' नें 'ब' वर हुंडी काढली. 'ब' नें स्वीकारली. दरम्यान 'अ' नें 'क' ला दिली 'क' नें 'ड' ला व मुदत संपतांच 'ड' नें 'ब' कडे मागणी केली असतां, 'ब' नें रक्कम दिली नाहीं तर 'ड' चे पैसे देण्यास 'क' व नंतर 'अ' हे जबाबदार आहेत. 'क' ला, 'अ' जबाबदार आहे. 'अ' ला अर्थात् त्याचा ऋणको 'ब'. पण प्रथम त्याला 'क' व 'ड' यांचें देणें भागविलें पाहिजे. या हुंडया मुदतीपूर्वी विकण्याचा म्हणजे कसर कापून दुसऱ्यास देण्याचा व्यवहार, ही नित्य होणारी गोष्ट आहे. ३ महिन्यांनीं पक्की होणारी हुंडी आहे व ती एक हजाराची आहे. बँकेचा जर कसरीचा दर ४ टक्के असेल तर ९८८ देऊन ती विकत घेईल. याचा अर्थ बँकेनें आज ९८८ रु. कर्जाऊ दिले त्याबद्दल ३ महिन्यांनीं व्याजमुद्दलासुद्धां एक हजार रु. मिळावयाचे. कसर १२ रु. म्हणजे त्या मुदतीचें व्याजच होय. समजा, दीड महिन्यांनें सदरहू बँकेला ती विकणें आहे, तर ती बँक ९९५ रु. घेऊन ती विकून टाकील. कारण दीड महिन्याचेंच व्याज तिला मिळावयाचें; राहिलेल्या दीड महिन्याचें ज्याला विकली त्याला मिळेल. त्याला रु. एक हजार मिळतील पैकीं ९९५ रु. त्यानें खरेदी-करितां दिले व ५ रु. त्याला ९९५ रु. वर व्याज मिळालें.

कसरीचा दर ठरलेला नसतो. ज्याच्यावर हुंडी काढली असेल त्याच्या लौकिकांवर व पतीवर तो अवलंबून असतो. लौकिकवाल्या, पतवाल्या लोकांच्या अगर पेढीच्या हुंडयांना कसरीचा दर साहजिकच कमी असणार; ज्यांच्याबद्दल विशेष लौकिक नाहीं अशा हुंडयांना कसर जास्त द्यावी लागते. पुष्कळ वेळां हुंडी ज्यावर काढली असेल त्याच्याबरोबर एखाद्या बँकेनें स्वीकारल्याची नोंद केली असेल तर, मग कसरीचा दर जास्त पडत नाहीं. कारण मग सदरहू बँक जबाबदार होते. समजा,

'अ'नें 'ब'वर हुंडी काढली व नंतर 'अ'नें 'क' या नामवंत बँकेला विकली व 'क' बँकेनें त्यावर आपली नोंद करून मग 'ड'ला दिली तर मग कसरीचा दर कमी पडेल. कारण 'ब' जरी माहीत नसला तरी 'क' बँक माहीत असल्यामुळें हें घडून येतें. मुख्यत्वें हुंड्यांचा धंदा करणाऱ्या व्यक्ति व बँका सर्वत्र आहेत. या बँका वर लिहिल्याप्रमाणें हुंड्या घेऊन स्वीकारल्याची नोंद करतात व त्या विकतात. याबद्दल त्यांना कमिशन असतें. हें करण्यांत हुंडी पटेल त्याची जामिनकी ते घेत असतात. याप्रमाणें ठेवी घेणें, हुंड्या स्वीकारणें, विकणें, सरकारी रोखे घेणें, तात्पुरतें कर्ज देणें, एवढेंच नव्हे तर परदेशांतील सरकारी कर्ज खपविणें वगैरे कामें करणाऱ्या पेढ्या जगांतील मुख्य मुख्य शहरांत असतात. लंडन, पॅरिस, न्यूयॉर्क, मुंबई वगैरे ठिकाणीं हा धंदा करणाऱ्या नुसत्या बँकाच नाहींत, तर कांहीं खाजगी पेढ्याहि आहेत. बँकेनें हुंडी नोंदली म्हणजे साहजिकच तिची चालू किंमत वाढते. कारण मग कसरीचा दर कमी होतो. मागील उदाहरणांत 'अ'नें 'ड'ला हुंडी दिली व समजा, ती तीन महिन्यांचे मुदतीची आहे. 'ब' हा कांहीं माहितीचा अगर प्रसिद्ध असामी नाहीं, तेव्हां साहजिकच कसरीचा दर जास्त म्हणजे आज तितकी रक्कम कमी आली, जर कसरीचा दर कमी झाला तर, आज सदरहू हुंडी विकून जास्त रक्कम येईल. ताबड-तोब जास्त रक्कम हवी असते म्हणून बँकेला कमिशन देऊन ती नोंदवून घेतात, बँक हुंडी नोंदवितांना तारण घेते; मालाचे किंमतीसाठीं हुंडी असेल तर माल बोटीवर भरण्याचे दाखले, बीजकें, विमा भरल्याचे दाखले, मालकी हक्काचे कागद वगैरे सर्व कागद बँक ताब्यांत घेऊन मग हुंडी नोंदविते. इंग्लंडला मी माल गिऱ्हाइकाचे ऑर्डरीप्रमाणें—मागणीप्रमाणें भरला, म्हणजे मी त्या गिऱ्हाइकावर हुंडी काढतों. ती हुंडी व मालाबद्दलचे सर्व कागद मी बँकेला देतों. बँक मला कसर कापून पैसे देते. सदरहू बँक सर्व कागद व हुंडी आपल्या लंडनमधील शाखेकडे धाडते. ज्याला माल धाडला असेल त्याला ती शाखा कळविते. तो हुंडीचे पैसे भरतो. मालाचे कागद घेतो, माल ताब्यांत घेतो, हें नेहमीं चालू असतें. बँकेनें कांहींतरी तारण घेऊन हुंडी नोंदवावयाची व अशी नोंदविली म्हणजे बँक मध्यस्थ असल्यामुळें थोड्या कसरीनें ती विकली जाते. पूर्वीं हा धंदा खाजगी पेढ्या करीत असत. गेल्या वीस वर्षांपासून बहुतेक सार्वजनिक बँकाहि हा धंदा करूं लागल्या आहेत.

कर्जापेक्षां हुंडीचा व्यवहार जास्त सोयीचा. कर्ज मुदत भरतांच मिळेल असें नाहीं. ऋणको कदाचित् मुदत मागेल. पुनः त्यानें दिलेलें तारण त्याचीहि किंमत कमीजास्त होण्याचा संभव. कर्जाची मुदत न वाढविली तर नेहमींचें गिऱ्हाईक नाखूष

होण्याचा संभव. या दृष्टीनें व्याज कमी मिळालें तरी रोकड ताबडतोब उभी करण्याचे दृष्टीनें, हुंडयांचा व्यवहार चांगला. पत राखावयाची असल्यामुळें मुदत भरतांच हुंडयांचे पैसे पटतात. अगदीं बिकट परिस्थिति असल्याशिवाय हुंडी पटली नाहीं असें होत नाहीं. म्हणूनच हुंडया जवळ जवळ रोकडीच्या स्वरूपाच्या समजतात. तारणावर अगर गहाणावर दिलेलें कर्ज, हें रोकडीच्या स्वरूपाचें नव्हे. शिवाय तारण अगर गहाण हक्क विकावयाचे तर योग्य किंमत येईल असा भरंवसा नाहीं, म्हणून बँका नेहमीं हुंडयांचा व्यवहार करावयास तयार असतात. बहुतेक राष्ट्रांत तेथील सरकारला नेहमीं तात्पुरती पैशाची गरज असते. सरकारचा करांपासून वसूल वर्षभर येत असतो. पुष्कळ वेळां बजेटांतील खर्चाच्या रकमा आधीं खर्चाव्या लागतात. त्यामुळें सरकार हुंडया ( Treasury Bills ) काढून त्या मध्यवर्ती बँकेमार्फत विकतें व रोकड उभी करून आपली चालू निकड भागवितें. मुदत भरतांच पैसे पटविले जातात. त्या हुंडया बहुश: ३ महिने मुदतीच्या असतात. सरकारी हुंडया असल्यामुळें त्यांना अगदीं रोकडच समजतात. कारण मुदत भरतांच रक्कम मिळेल याबद्दल खात्री असते. म्हणून ह्या हुंडया कोणीहि कसर कापून विकत घेतो. सरकारतर्फे टेन्डरें मागवून त्यांची विक्री होते. बँका सरकारी हुंड्या व नामांकित बँकांनीं नोंदविलेल्या हुंडया यांचा व्यवहार करण्यास नेहमीं तयार असतात. यांवर कसरीचा दर कमी असला तरी सुरक्षितपणा जास्त असतो. मध्यवर्ती बँकेचा जो दर असेल तितका कसरीचा दर घेऊन साधारणपणें बँकेनें नोंदविलेल्या हुंडया घेतल्या जातात. मध्यवर्ती बँका सामान्यपणें फक्त सरकारी हुंडयाच कसर कापून घेतात. इतर हुंड्या घेतल्या तरी एक अगर दोन महिन्यांपेक्षां जास्त मुदतीच्या हुंडयांचा व्यवहार त्या करीत नाहींत.

निव्वळ हुंडयांचा धंदा करणारेहि अनेक असतात. हे हुंडीवाले हुंडया विकत घेतात. हुंडया विकत घेण्याकरितां लागणारा पैसा, त्यांची पत असल्यामुळें, बँकांकडून ते घेतात. बँकेला द्यावें लागणारें जें व्याज त्यापेक्षां जास्त दरानें कसर कापून हुंडया घेतात व नफा मिळवतात. जरूर पडल्यास ते पुन: थोडा नफा घेऊन हुंडया विकतात. पुष्कळवेळां बँकांना विशिष्ट वेळेस पैसा हवा असतो व त्या दृष्टीनें त्या वेळेस मुदत भरणाऱ्या हुंडया बँका घेतात व तेवढ्या वेळांत रोकड गुंतवून व्याज मिळवतात. जेव्हां बँकांना रोकडीची जरूर असते तेव्हां त्या हुंडीवाल्यांना दिलेलें तात्पुरतें व ताबडतोब फेड होणारें कर्ज परत मागण्यांत येतें. हुंडीवाले जवळ असलेल्या हुंडया मध्यवर्ती बँकेला अगर दुसऱ्या बँकांना विकून अगर त्यांचे तारणावर रोकड

उभी करून, घेतलेलें कर्ज परत करतात. बँकेचा व्याजाचा दर जास्त असेल तर, हा धंदा हुंडीवाल्यांना करणें फायद्याचें नाहीं.

बहुतेक देशांतून आतां मध्यवर्ती बँका स्थापन झाल्या आहेत. या मध्यवर्ती बँकेचें मुख्य काम म्हणजे त्या देशांतील नाणेबाजारांवर देखरेख करणें व सरकारी धोरण, राष्ट्राचें धोरण या बाबतींत जें असेल त्याप्रमाणें नाणेबाजाराची, सराफी बाजाराची स्थिति राहील अशी व्यवस्था करणें हें होय. हें करण्याकरितां जरूर ते उपाय करण्याची मध्यवर्ती बँकेला सवलत असते. किंबहुना या बाबतींत कायद्यानें तिला अधिकार दिलेले असतात. सरकारची ठेव, चालू शिल्लकहि या बँकेकडे असते. मध्यवर्ती बँक म्हणजे सरकारची बँक, सरकारचें पैशाच्या व्यवहाराचें काम पहाणारी बँकच. सरकारचें खातें व शिल्लक या बँकेंत असल्यामुळें हिची पत देशांत सर्वांत पहिल्या प्रतीची. अर्थात् हिच्या भागीदारांना नफा चांगला मिळतो. मात्र बहुतेक देशांत नफा किती मिळावा हें मर्यादित केलेलें असतें. इतर बँका फक्त नफ्याच्याच दृष्टीनें काम करीत असतात, तसें या बँकेचें नाहीं. राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनेंच हिचें काम चालतें. नफा ही दुय्यम गोष्ट समजली जाते. पुष्कळ ठिकाणीं सामान्य व्यापारीबँका जो व्यवहार व उलाढाली करतात, तो या बँका करीत नाहींत. त्यामुळें नफा जरी यांना मिळाला नाहीं तरी धोका होईल असा व्यवहारच त्यांच्या बाबतींत नसल्यामुळें नुकसान होणें टळतें. व इतर बँकांना मध्यवर्ती बँक ही डोईजड सवत आहे असें वाटत नाहीं. सरकार व मध्यवर्ती बँक यांचें धोरण एक व संपूर्ण सहकार्यानें असणें हें जरूर असतें, व त्याप्रमाणें तें असतेंहि. सरकार नेहमीं या बँकेचा, पैशाच्या व्यवहाराच्या बाबतींत सल्ला घेत असतें. सरकारी धोरण या बँकेचे सल्ल्यानेंच ठरतें. सरकारच्या धोरणाचा परिणाम बँकेवर होतो. सरकारचें कर्ज किती वाढलें, किती कमी झालें, किती नवें जुनें झालें, यावर सराफबाजारांतील व्याजाचा दर अवलंबून असतो. सरकारनें कोणत्या योजना मान्य केल्या, कोणत्या गोष्टींवर सरकार पैसा खर्च करणार आहे, हें समजल्याबरोबर सर्वत्र बाजारांत हालचाली सुरू होतात. त्याचा परिणाम नाणेबाजारांवर होतो. सरकार कोणते कर बसविणार हें समजल्याबरोबर देशांतील भांडवलावरहि त्याचा परिणाम होतो. या दृष्टीनें सराफबाजारांत काय परिणाम होतील, काय व्हावेत वगैरे अनेक प्रश्न महत्त्वाचे असतात, व या दृष्टीनें मध्यवर्ती बँकेचा सल्ला घेतल्याशिवाय सरकार आपलें धोरण ठरवीत नाहीं. वेळोवेळीं सरकारचे फडणीस व मध्यवर्ती बँकेचे अधिकारी, यांच्या सल्लामसलती होत असतात. तथापि सरकार जें धोरण अखेरीस ठरवील त्याचप्रमाणें मध्यवर्ती बँकेला वागावें लागतें. सरकारला कर्ज काढण्याचें असेल

त्या वेळीं ही बँक व्याजाचा दर सर्वत्र कमी होईल असा प्रयत्न करते. तसेंच सरकारला जास्त कर्ज पाहिजे असेल तर तें मिळेल अशी परिस्थिति उत्पन्न करते.

मध्यवर्ती बँक ही राजकारणांतल्या पक्षबाजींत सांपडली जाऊं नये म्हणून, तिची मालकी सामान्यतः सरकारी नसते. तथापि सरकारी नियंत्रण तिच्यावर असतें. याचा जो परिणाम व्हावयाचा तो होतो. सरकार कांहीं प्रमाणांत या बँकेचे भाग घेतें. तसेंच चालक मंडळांत कांहीं प्रमाणांत सरकारी अधिकारी अगर सरकारतर्फे नेमलेले, चालक म्हणून असतात. सरकारचें धोरण काय हें बँकेला समजणें अवश्य असतें, या दृष्टीनें ही व्यवस्था असते. पैसाविषयक धोरण, जें सरकार स्वीकारील तें, देशांत अंमलांत येणें जरूर असते व तें काम या बँकेला करावयाचें असतें. देशाच्या हिताच्या दृष्टीनें परदेशांतील ग्यावीं लागणारीं देणीं, सोन्यांत देणें, सुवर्णचलनांत देणें योग्य ठरलें तर, मग मध्यवर्ती बँकेचें काम योग्य प्रमाणांत सोन्याचा ठेवा आपलेजवळ राहील असें धोरण आंखावयाचें. त्याचप्रमाणें वस्तूंचे भाव वाढूं नयेत, अगर देशांत निव्वळ पैशाचे दृष्टीनें उत्पन्न वाढूं नये असें धोरण ठरलें तर, त्याप्रमाणें घडवून आणण्याची जबाबदारी तिजवरच असते. देशांत मंदी होत असेल तर उत्पादन वाढविणें जरूर आहे, म्हणून त्या दृष्टीनें तिचें धोरण राहील. तात्पर्य, धोरण ठरण्यापूर्वी जसा या बँकेचा सल्ला घेतला जातो, तसेंच धोरण ठरलें म्हणजेहि त्याप्रमाणें तिला वागावें लागतें. मग ती बँक जरी सरकारच्या मालकीची नसली तरी, ठरलेल्या धोरणाविरुद्ध वागणें तिला अशक्य आहे. मध्यवर्ती बँक व सरकार यांच्यांत सहकार्य व एकमुखी-पणा असणें हें अत्यंत जरूर असतें.

मध्यवर्ती बँका सरकारी धोरण असेल त्याप्रमाणें वागतात, व त्याला अनुसरून नाणेबाजारची स्थिति घडवून आणतात. कांहीं वेळां मध्यवर्ती बँका बाजारचे कलानें घेऊन हें धोरण अंमलांत आणण्याचें काम करतात. थोड्या मुदतीचें कर्जांवरील व्याजाचा दर मध्यवर्ती धोरणाच्या मानानें कमी झाला म्हणजे, त्याला उपाय म्हणून मध्यवर्ती बँक आपल्या व्याजाचा दर वाढविते. कारण त्यामुळें बँकांजवळ पैशाची टंचाई होऊन त्यांसहि आपला दर वाढवावा लागतो. उलट बाजारांत रोकडीला जास्त जास्त ओढ लागली कीं, मध्यवर्ती बँक व्याजाचा दर कमी करते. हा दर कमी झाला म्हणजे साहजिकच कर्ज घेणारे वाढतात व टंचाई कमी होते. अशा तऱ्हेनें मध्यवर्ती बँकेचे दरांबरोबर इतर बँकाहि दर वाढवितात व कमी करतात. कांहीं वेळां मध्यवर्ती बँका ठरलेलें धोरण अंमलांत आणतांना बाजारचे कलानें न घेतां सरळ पैशाचा—रोकडीचा, पुरवठा कमीजास्त करून त्यांना हवें असेल तें घडवून आणतात. चलनांत

नोटा व नाणें यानें भर घातली, व व्यवहारांतहि रोकड जास्त झाली कीं एकंदर पैसा वाढतो. पैसा जास्त झाला कीं त्याचा परिणाम म्हणजे थोड्या मुदतीचे कर्जावरील व्याजाचा दर कमी होतो. त्यामुळें योजक, उद्योगधंदेवाले जास्त कर्ज घेतात. कारण बँकांजवळ पैसा जास्त झालेला असतो, व कमी व्याजानें त्या गिऱ्हाइकांस देण्यास तयार असतात. सरकारनें मोठमोठालीं खर्चाचीं कामें काढलीं म्हणजे त्यांना पैसा लागतो, व त्यासाठींहि मध्यवर्ती बँकेनें वाढविलेला पैसा उपयोगीं पडतो. सरकारनें काढलेल्या कामामुळें, अगर उद्योगधंद्यांतील योजकांनीं कमी दरानें रकमा कर्जाऊ घेतल्यामुळें हा वाढलेला पैसा व्यवहारांत पसरतो. त्याचा परिणाम उत्पादनावर होऊन उत्पादन वाढतें, वस्तूंचे भावहि वाढतात, व त्याबरोबर मजुरी, पगार म्हणजे पैशाचें दृष्टीनें माणसांचें उत्पन्नहि वाढतें. याच्या उलट, बाजारांत व्यवहारांत असलेला पैसा, रोकड, हळुहळू मध्यवर्ती बँकेनें काढून घेतली कीं, लागलीच व्याजाचे दर वाढतात. त्याबरोबर उत्पादनावर परिणाम होतो. वस्तूंचे भाव कमी होऊं लागतात त्याचा परिणाम मजुरीवर होतो, लोकांचें पैशाचे दृष्टीनेंहि उत्पन्न कमी होतें.

व्यवहारांतील रोकड नाणें व नोटा, मध्यवर्ती बँक कमी करते त्यामुळें उत्पादन कमी होईल, बेकारी वाढेल, मंदी येईल, हें तिला माहीत नसतें असें नाहीं. पण जर सरकारी धोरण सुवर्णचलन कायम ठेवण्याचें असेल तर हें करणें जरूर होतें. पैसा व्यवहारांत वाढला तर त्यामानानें सोन्याचा निधि सरकारजवळ म्हणजे मध्यवर्ती बँकेजवळ वाढणें जरूर आहे. कारण चलन हें सोन्याच्या नाण्यावर आधारलेलें असल्यामुळें लोक नोटा देऊन मागतील त्यावेळीं सोन्याचीं नाणीं देणें जरूर पडते. वाटेल तेवढें सोनें कांहीं वाढूं शकत नाहीं. तेव्हां व्यवहारांतला खेळता पैसा कमी करावयाचा हा मार्ग व हें धोरण सरकार पतकरतें, व मध्यवर्ती बँकेमार्फत अंमलांत आणतें. पुष्कळ वेळां पैसा वाढूं लागला व मुबलक झाला म्हणजे वस्तूंच्या किंमती भरमसाट वाढतात व शेवटीं गोंधळ होऊन हाहाःकार होतो. हें अरिष्ट टळावें, लोकांची अस्वस्थता जावी व विश्वास वाढावा म्हणून, हा मार्ग सरकार पतकरतें. मध्यवर्ती बँक हें धोरण, व्यवहारांतला पैसा कमी करून अंमलांत आणते.

बँक-नोटा काढण्याची परवानगी,सरकार फक्त मध्यवर्ति बँकेलाच देत असल्यामुळें, या नोटा कायद्यानें कायदेशीर चलन समजल्या जात असल्यामुळें, राष्ट्रांतील व्यवहारांत ही बँक काढील तेवढ्याच नोटा असणार. पैशाचा पुरवठा जास्त करावयाचा, देशांतील रोकड वाढवावयाची म्हणजे, बँकेनें नोटा जास्त जास्त काढावयाच्या; रोकड कमी करावयाची, म्हणजे व्यवहारांत असलेल्या नोटा परत घेऊन आपलेजवळ ठेवावयाच्या.

बँक जेव्हां नोटा वाढविते तेव्हां मध्यवर्ति बँक रोखे विकत घेते, हुंडया विकत घेते, व त्याच्या किंमतीबद्दल ह्या नव्या काढलेल्या नोटा देते, त्याबरोबर त्या व्यवहारांत पसरतात. नोटा व्यवहारांतून काढावयाच्या असल्या म्हणजे ही बँक जवळच्या हुंडया व रोखे विकते, व त्यांची किंमत म्हणून ज्या नोटा येतात त्या घेऊन आपलेजवळ ठेवते. म्हणजे तितक्या नोटा व्यवहारांतून, बाजारांतून, कमी झाल्या, तेवढी रोकड कमी झाली. तथापि व्यापारीबँकांजवळ पुष्कळ रोकड असते, त्या शिलकेवरहि वरील गोष्टींचा परिणाम होत असतो. व्यापारी बँका नेहमीं ठेवीच्या ठराविक टक्के, साधारणपणें १० टक्के—रोकड हातांत ठेवितात. ही रोकड म्हणजे नोटा, मध्यवर्ति बँकेनें काढलेल्या नोटा. मध्यवर्ति बँक जेव्हां हुंडया, रोखे वगैरे विकून, व्यवहारांत असलेल्या नोटा परत घेते, अगर हुंडया विकत घेऊन खेळतें चलन वाढविते, तेव्हां त्याचा परिणाम जनतेजवळ असलेल्या शिलकेवर ताबडतोब होत नाहीं. रोखे अगर हुंडया ज्यांनीं विकल्या, त्या बहुतेक व्यापारी बँका असतात. त्यामुळें नवीन नोटा साहजिकच या बँकांच्या शिलकेंतच वाढ करणार, खाजगी पेढ्या अगर व्यक्ति, ह्यासुद्धां विक्रीचा पैसा म्हणजे नव्या नोटा, आपल्या बँकांतच जमा करणार. मध्यवर्ती बँकेनें हुंडया अगर रोखे विकलें तरी ते विकत घेणारें म्हणजे व्यापारी बँका, शिलकेंतून किंमतीबद्दल नोटा देतात, व मध्यवर्ती बँक या नोटा आपलेजवळ ठेवून देते. कोणा व्यक्तीनें अगर खाजगी पेढयांनीं जरी विकत घेतल्या तरी, ते आपल्या खात्यांतून व्यापारी बँकांना किंमत देण्यास सांगणार. तरीहि पुनः व्यापारी बँकांचें शिलकींतूनच नोटा कमी होणार. व्यापारी बँकांची शिल्लक एकंदर देशांतील रोकड वाढली कीं वाढते, व कमी झाली कीं कमी होते. व्यापारी बँका शिल्लक वाढली कीं, त्या मानानें कर्ज वगैरे देऊन पत वाढवितात. रोकड कमी झाली कीं व्याप कमी करूं लागतात, दिलेलीं कर्जें परत घेण्याचा उपक्रम सुरू करतात.

बहुतेक व्यापारी बँका आपली कांहींना कांहीं तरी रोकड मध्यवर्ती बँकेकडे ठेवतात. कांहीं ठिकाणीं हें त्यांना कायद्यानें करणें भाग पडतें. मध्यवर्ती बँक जेव्हां नोटा वाढविते तेव्हां त्यांच्या किंमतीचें तारण तिला ठेवावें लागतें व त्यांपैकीं कांहीं तरी तारण कायद्याप्रमाणें प्रत्यक्ष सोन्यांत ठेवावें लागतें. त्यामुळें जसें सोनें हातीं असेल त्या मानानें मध्यवर्ती बँक नोटा वाढवीत असते. तथापि व्यापारी बँका आपली कांहीं रोकड मध्यवर्ती बँकेकडे ठेवीत असल्यामुळें नवीन नोटा न काढतां सुद्धां व्यापारी बँकांच्या रोकडीमध्यें मध्यवर्ती बँक कमीजास्त करूं शकते. मध्यवर्ती बँकेकडे व्यापारी बँकांना आपापसांतील दररोजच्या देवघेवीची बाकी चुकती करण्याचे

दृष्टीनें रोकड ठेवणें सोयीचें असतें. ज्या बँकेस बाकी द्यावयाची असेल ती बँक मध्यवर्ती बँकांवर चेक देते. तो चेक सदरहू बँक मध्यवर्ती बँकेंतील आपल्या खातीं जमा करते. मध्यवर्ती बँक जेव्हां रोखे, हुंडया घेऊन त्याबदली चेक देते, त्याचा परिणाम ज्यांनीं रोखे, हुंडया विकल्या व त्यांच्या किंमतीबद्दल चेक घेतले ते सदरहू चेक आपापल्या बँकांतून भरतात. म्हणजेच त्या बँकांची रोकड वाढली. उलट जेव्हां मध्यवर्ती बँक रोखे व हुंडया विकते तेव्हां खरेदीदार आपापल्या बँकांवर किंमतीबद्दल चेक देतात. म्हणजे तेवढ्या प्रमाणानें बँकांची रोकड कमी होते. प्रत्यक्ष जास्त नोटा न काढतांहि बाजारांतील रोकड अशा रीतीनें मध्यवर्ती बँक कमीजास्त करूं शकते. तात्पर्य मध्यवर्ती बँकेलाच नोटा काढण्याचा हक्क असल्यामुळें एकंदर रोकड कमीजास्त करून जसें धोरण असेल त्याप्रमाणें परिस्थिति घडवून आणतां येते. देशांतील इतर सर्व बँका, अनेक दृष्टीनें मध्यवर्ती बँकेवर अवलंबून असतात. सर्व अडचणींच्या व संकटांच्या प्रसंगीं मध्यवर्ती बँकेचें सहाय्य नसेल तर व्यापारी बँकांचें काम कठीण होईल.

बहुतेक मध्यवर्ती बँका वेळोवेळीं आपला व्याजाचा दर (Bank Rate) काय आहे हें जाहीर करीत असतात. या दरानें अव्वल दर्जाच्या हुंडया, कसर कापून विकत घेण्यास मध्यवर्ती बँक तयार आहे असा त्याचा अर्थ सराफी बाजारांत समजला जातो. या दरांत वाढ झाली कीं, अल्प मुदतीचे कर्जावरील व्याजाचे दरांतहि वाढ होते. व्यापारी बँका कर्जावरील व 'ओव्हर ड्राफ्ट' वरील व्याजाचा दर वाढवितात. व्याजाचे दर या रीतीनें वाढले कीं कर्ज कमी घेतलें जातें; व कर्ज कमी घेतलें गेले कीं बँकांजवळील ठेवी कमी होतात. उलट मध्यवर्ती बँकेचा 'बँकरेट' व्याजाचा दर कमी झाला कीं बाकीचे व्याजाचे दर सामान्यतः कमी होतात; त्याबरोबर कर्ज जास्त घेतलें जातें, व त्यामुळें बँकांकडील ठेवी वाढतात. मध्यवर्ती बँकेचा दर वाढला कीं, व्यापारी बँकाहि व्याजाचा दर वाढवितात, कारण प्रसंगविशेषी त्यांना मध्यवर्ती बँकेकडून कर्ज घ्यावें लागतें, व नफा मिळवावयाचा तर, द्याव्या लागणाऱ्या व्याजाचे दरापेक्षां जास्त दरानें व्याज घेऊनच कर्ज दिलें पाहिजे. मध्यवर्ती बँक सुद्धां आपला व्याजाचा दर ठरवितांना तो साधारणपणें बाजारांतील रोकडीची परिस्थिति पाहूनच ठरविते; व दर ठरविल्यावर त्याप्रमाणें तो परिणामकारक करण्याकरितां वर सांगितल्याप्रमाणें जरूर तर व्यवहारांतील रोकड कमीजास्त करते. तात्पर्य, व्याजाचा दर कमीजास्त करून, हुंडया व रोखे यांच्या खरेदीविक्रीनें रोकड कमीजास्त करून, जरूर पडल्यास नोटांचें चलन वाढवून अगर कमी करून, मध्यवर्ती बँक राष्ट्रांतील सराफबाजारांवर आपलें नियंत्रण चालविते. व्यापारी बँकांना व अन्य बँकांनाहि वेळोवेळीं

सरकारी धोरणाबाबत, एकंदर व्यवहाराबाबत, माहिती देणें हेंहि काम ती करते. पण मध्यवर्ती बँक नफा मिळविणें हें दुय्यम मानते. राष्ट्रांतील चलन व पैशासंबंधींची परिस्थिति कशी चांगली राहील हें पहाणें ती आपलें कर्तव्य समजते. इतर व्यापारी व अन्य बँका नफा मिळविण्याकरितांच धंदा करीत असतात व पुष्कळ वेळां देश-हित बाजूला ठेवून तो मिळवितात; व ही गोष्ट मध्यवर्ती बँक कांहीं बंद करूं शकत नाहीं. जोंपर्यंत भांडवलशाही आहे तोंपर्यंत सराफीबाजारांत संपूर्ण नियंत्रण घालणें सरकार मान्य करणार नाहीं. देशांतील बँका जोंपर्यंत सरकारी मालकीच्या नाहींत व नफा मिळवणें हें त्यांचें ध्येय आहे, तोंपर्यंत मध्यवर्ती बँक विशिष्ट मर्यादेपलीकडे कांहीं करूं शकत नाहीं.

वर मध्यवर्ती बँकेसंबंधीं सामान्य विवेचन केलें आहे. हिंदुस्थानांत मध्यवर्ती बँक म्हणून रिझर्व बँक ऑफ इंडिया समजली जाते. नाण्यांचा पुरवठा करणें, पैशांचा हंगामशीर पुरवठा करणें, बाजारभाव स्थिर राहील या दृष्टीनें दक्षता घेणें, चलनाची व्यवस्था पाहणें वगैरे गोष्टी करण्याकरितां सरकारनें एप्रिल १९३५ मध्यें या बँकेची स्थापना केली. यापूर्वी इंपीरियल बँक ऑफ इंडिया सामान्यपणें हीं कामें पहात असे. रिझर्व बँकेवर कायद्यानें बरींच नियंत्रणें घातलेलीं आहेत. तिचें नफेबाजीचें धोरण असतां कामा नये. तिला ठेवी घेतां येतात, पण बिनव्याजीं; त्यामुळें इतर व्यापारी बँकांशीं चढाओढीचा प्रसंग येत नाहीं. कर्ज घ्यावयाचें तर ठरलेल्या व पसंत केलेल्या बँकांकडून ( Scheduled ) अगर परदेशांतील मध्यवर्ती बँकेकडून. शिवाय कर्जाची मर्यादा भाग भांडवलापेक्षां जास्त नाहीं. नफा झाल्यास ५ टक्कयांपेक्षां भागीदारांना जास्त देतां येत नाहीं. गेल्या ४ वर्षांत ३½ टक्केच नफा—डिव्हिडण्ड तिनें वांटला. ही बँक सरकारी मालकीची नाहीं. समाईक भांडवलाच्या तत्त्वावर शेअर होल्डरांची बनलेली आहे. मात्र कंपनी कायद्याप्रमाणें नोंदविलेली नसून स्वतंत्र कायद्यानें अस्तित्वांत आलेली आहे. दर भाग १०० रु.चा याप्रमाणें हिचें भांडवल पांच कोटी रुपयांचे भागांत आहे, व तें सर्व खपले आहेत. भाग, हिंदी लोक, हिंदुस्थानांत असलेल्या ब्रिटिश नागरिकालाच घेण्याचा हक्क आहे. सहकारी पेढ्या व हिंदी बँका व इतर कांहीं संस्थांनाहि पण भाग घेतां येतात; शिवाय हे भाग प्रांतानिहाय वांटले आहेत. मुंबईचे वांट्यास १ कोटी ४० लाख रुपयांचे भाग आले आहेत. प्रांतानिहाय भाग घेणाऱ्यांचीं रजिस्टरें आहेत. बँकेचे चालक मंडळांत १६ सभासद असतात, त्यांस बोर्ड म्हणतात. गव्हर्नर व दोन दुय्यम गव्हर्नर असें तिघे पगारी अधिकारी व ४ चालक मध्यवर्ती सरकार बोर्डावर नेमतें. निरनिराळ्या प्रांतांतील

भागीदार आठ निवडून देतात. एक मध्यवर्ती सरकारतर्फेचा अधिकारी असतो. प्रांतागणिक स्थानिक बोर्डें असतात. त्यांत ५ ते ८ सभासद असून त्यांपैकीं १ सभासद मध्यवर्तीबोर्ड नेमतें. ५ हजार रुपयांचे भाग असल्याशिवाय कोणास चालक होतां येत नाहीं.

रिझर्व बँकेलाच फक्त नोटा काढण्याचा अधिकार आहे. त्या नोटा ५, १०, ५०, १००,रु. च्या अशा असतात; या नोटा कायदेशीर चलन समजल्या जातील असें सरकारनें जाहीर केलें आहे. हिंदुस्थानचे उत्पन्नावर व हिंदुस्थान सरकारचे पतीवर व हमीवर, हें चलन काढलें आहे म्हणून व्यवहारांत त्यांचा प्रसार आहे; व त्या दिल्या-घेतल्या जात आहेत. सरकार नोटा काढणार नाहीं व या बँकेशिवाय कोणी काढल्यास कायद्यानें तो गुन्हा ठरविला आहे. नोटा काढल्या कीं त्यांच्या किंमतीबद्दल तारण ठेवावें लागतें, तें रोखे, सोनें, नाणें अगर लगडी, स्टर्लिंग रोखे वगैरे पसंत असलेल्या तारणांतच ठेवावें लागतें. त्यापैकीं ४० टक्के सोनें स्टर्लिंगमध्यें पाहिजे. यापैकीं निदान ४० कोट रुपयांचे प्रत्यक्ष सोनें, नाणें अगर लगडी पाहिजेत. सोन्याच्या ठेवीपैकीं १७/२० सोनें हिंदुस्थानांत ठेविलें पाहिजे. तारणाचें स्वरूप कसें आहे म्हणजे किती सोनें, किती रोखे, हें दर्शविणारा तक्ता दर आठवड्यास या बँकेनें प्रसिद्ध केला पाहिजे असा कायदा आहे. त्याचप्रमाणें दर आठवड्यास बँकेनें काय धंदा केला, तिची देणें घेणें या दृष्टीनें काय स्थिति आहे, याचाहि तक्ता दर आठवड्यास प्रसिद्ध करावा लागतो. नोटा, चलनसंबंधी व्यवस्था करण्याचें काम, हें सर्व बँकेची 'इश्यु डिपार्टमेंट' ही शाखा पाहते. इतर काम 'बँकिंग डिपार्टमेंट' पाहतें. नोटांच्यासाठीं ठेवलेल्या तारणा-वर बँकेच्या इतर देण्याघेण्याचा बोजा नाहीं. इश्यु डिपार्टमेंट नोटा काढतें व त्यांच्या किंमतीबद्दल ऐवज, बँकिंग डिपार्टमेंटकडून घेऊन नोटा देतें व मग त्या व्यवहारांत येतात. हा तारण म्हणून ठेवण्यांत आलेला ऐवज नोटांमुळें उत्पन्न होणाऱ्या बोजापेक्षां कमी होतां कामा नये.

हिंदुस्थानांत कायदेशीर चलन, सरकारमान्य चलन, सोन्याचें नाणें नाहीं. कोणी सोन्याचीं नाणीं दिल्यास ठराविक किंमतीस तीं घेतलीं जातात (रुपयास ८·४७५१२ ग्रेन शुद्ध सोनें) सरकारमान्य चलन रुपयाचें आहे, त्याची दर्शनी किंमत रुपया आहे. रुपयाचें वजन १८० ग्रेन ( ट्रायवेट ) असून त्यांत प्रत्यक्ष शुद्ध चांदी १६५ ग्रेन व १५ ग्रेन इतर धातूंची मिसळ आहे. इतर चांदीच्या नाण्यांत याच प्रमाणांत हिस्सेरशीनें चांदी असते. हल्लींचें महायुद्ध सुरू झाल्यापासून नाण्यांतील चांदीचें प्रमाण आणखी कमी केलें आहे. रुपया हें कायदेशीर चलन आहे, त्यांत प्रत्यक्ष

चांदी कमी म्हणून किंमत कमी समजली जात नाहीं. रुपयाची किंमत रुपया. चिल्लर नाणीं एक रुपयापर्यंत दिलीं असतां घेतलीं पाहिजेत. समजा, मला 'अ'चे १० रुपये द्यावयाचे आहेत. मी दहांची नोट अगर दहा रुपये रोख दिले तर कायद्यानें त्यानें ते घेतलेच पाहिजेत. त्याचप्रमाणें जर रुप्याचीं नाणीं दिलीं तरी सुद्धां घेतलीं पाहिजेत. अर्थात्, तीं नाणीं झिजलेलीं नसावींत. पण मी जर दहा रुपयांच्या आणेल्या देऊं लागलों तर कायद्यानें, एक रुपयाच्या आणेल्या अगर चिल्लर नाणें तो घेण्यास बांधलेला आहे. एक रुपयापेक्षां जास्त त्यानें न घेतल्यास मला रुपये अगर नोटा द्याव्या लागतील म्हणजे चिल्लर नाणीं एक रुपयापर्यंत कायदेशीर चलन आहे. नाणें व नोटा यासंबंधीची सर्व देखरेख इश्यू डिपार्टमेंट पहातें.

रिझर्व बँक सरकारी बँक असल्यामुळें तिला रुपयाची परदेशी बाजारांत किंमत समतोल ठेवणें, देशी नाणेबाजारांवर नियंत्रण ठेवणें, हीं कामें करावीं लागतात सरकारी रोकड ठेवणें, सरकारचे एजंट म्हणून सरकारी काम करणें, चलनासंबंधीं धोरण ठरविणें व त्याप्रमाणें व्यवस्था करणें, सरकारची शिल्लक असेल त्याची व्यवस्था करणें, राष्ट्रीय कर्जाची व्यवस्था, त्याचप्रमाणें सरकारला नवीं कर्जें काढावयाचीं, त्याची सर्व व्यवस्था या बँकेलाच करावी लागते. लंडनमधील पौंडाची हुंडणावळ ठराविक मर्यादेपलीकडे कमीजास्त होणार नाहीं अशी व्यवस्था ठेवणें हेंहि तिला करावें लागते. एक रुपयास १ शिलिंग ६ ३/१६ पेन्स यापेक्षां जास्त भाव न देतां पौंड विकत मिळेल, त्याचप्रमाणें १ रुपयास १ शि. ५ ४९/६४ पेन्स यापेक्षां कमी भावानें तो घ्यावा लागणार नाहीं, अशी योजना तिला करावी लागते. नोटांबद्दल रुपये द्यावयाचे, रुपयांबद्दल नोटा पुरवावयाच्या ही व्यवस्था पण तिला करावी लागते. रिझर्व बँकेला ठेवी घेतां येतात पण बिनव्याजीं. कांहीं प्रतीच्या हुंड्या—तीन महिने मुदतीच्या, कसर कापून ती घेऊं शकते. प्रांतिक सरकारचें उत्पन्न आपलेकडे ठेवणें, सांभाळणें हींहि कामें तिला करावीं लागतात. संस्थानांना, प्रांतीय सहकारी बँकांना कायद्यांत सांगितलेल्या शर्तींवर कर्ज देण्याचा तिला अधिकार आहे. सभासद बँकांना योग्य तारणावर कर्ज देणें, चेकच्या चुकते बाकीचें काम, हीहि कामें ती करते. त्याचप्रमाणें शिडयुल्ड् बँकांमार्फत आलेल्या हुंड्या, प्रॉमिसरी नोटा, मालकी कागद, यांवर ती कर्ज देऊं शकते. कोणत्या तरी जोडलेल्या बँकेची जामिनकी असल्याशिवाय मात्र असल्या तारणांवर कर्ज देण्याचा अधिकार तिला नाहीं. शिवाय कर्जें जीं द्यावयाचीं तीं तात्पुरतीं, अल्प मुदतीचीं, ही बँक राष्ट्रीय समजली जात असल्यामुळें नड भागविण्यापुरती ती कर्ज देऊन इतर बँकांना मदत करते. कर्जें देऊन नफा मिळविणें हा तिचा हेतु नाहीं.

व्यापारी चलनावर, व्यापारी पतीवर व एकंदर नाणेबाजारांवर नियंत्रण ठेवणें व तो स्थिर ठेवणें हें रिझर्व्ह बँकेचें प्रमुख कर्तव्य आहे. या दृष्टीनें देशांतील सर्व बँकांशीं संबंध ठेवून, हें घडवून आणावयाचें असतें. चेकच्या चुकती बाकीची सवलत व इतर अन्य सवलती मिळतात म्हणून बहुतेक बँका आपलीं खातीं या बँकेकडे उघडतात व कांहीं रोकड पण किमानपक्षीं ठेवीत असतात. नाणेबाजारांत बँका किती पत वाढवीत आहेत, किती ठेवी वाढवीत आहेत, याचा अंदाज मध्यवर्ती बँकेला असणें जरूर आहे. या दृष्टीनें प्रत्येक बँकेजवळ रोकड किती आहे हें कळणें जरूर असतें. कारण रोकडीच्या मानानें बँका पत वाढवितात. व्यापारी चलन वाढवितात. हिंदुस्थानांतील ज्या बँकेचें वसूल झालेलें भांडवल व गंगाजळी, मिळून पांच लाख रुपये अगर जास्त अशी रक्कम असेल, त्या बँकेला ' शिडयूलड् बँक ' म्हणून रिझर्व्ह बँकेकडे स्वतःला नोंदवावें लागतें. बँक जोडली गेली कीं, तिला दररोज मागेल त्या वेळीं परत करण्याचे बोलीनें ज्या ठेवी असतील त्यांच्या ५ टक्के व मुदतीच्या ठेवीच्या २ टक्के याचप्रमाणें निदान कमींत कमी रोकड रिझर्व्ह बँकेकडे ठेवावी लागते. यामुळें मध्यवर्ती बँकेकडे रोकडीचा मोठा निधि जमतो. दर शुक्रवारीं प्रत्येक जोडलेल्या बँकेला रिझर्व्ह बँकेकडे आपली रोकड शिल्लक किती व मागणीच्या ठेवी व मुदतीच्या ठेवी किती हें दाखविणारा तक्ता पाठवावा लागतो. किमान शिल्लक रिझर्व्ह बँकेकडे ठेवली नाहीं असें आढळलें तर, ३ ते ५ टक्केपर्यंत दंडादाखल व्याज रिझर्व्ह बँकेला द्यावें लागतें. अडचण, संकट उत्पन्न झालें तर त्या वेळीं जोडलेल्या बँका रिझर्व्ह बँकेकडे धांवतात व ती त्यांना मदत करते. बहुतेक बँका रिझर्व्ह बँकेकडे खातीं उघडतात. प्रांतांतील नोंदलेल्या सर्व बँकांना माहितीपत्रकें सरकारी अधिकारी ' रजिस्ट्रार ऑफ कंपनीज् ' यांजकडे धाडावीं लागतात. ती सर्व माहिती रिझर्व्ह बँकेकडे धाडण्यांत येते, यामुळें देशांतील बँकांचीं शिल्लक, ठेवी, व्यापारी चलन वगैरे सर्व गोष्टी तिला समजतात व त्या दृष्टीनें ती आपलें धोरण ठरविते व रिझर्व्ह बँकेचा ' बँकरेट ' जाहीर झाला म्हणजे तें धोरण काय आहे हें सर्वांना समजतें. मध्यवर्ती बँकेचा व्याजाचा दर ' बँकरेट ' हा कमीजास्त झाला म्हणजे काय परिणाम होतात हें मागें आलेंच आहे.

रिझर्व्ह बँकेनें शेतकऱ्यांच्या ' पतीसंबंधांत त्यांना पैशाचा पुरवठा व्हावा ' वगैरे दृष्टीनें, एक नवीन खातें ' ॲग्रिकल्चरल क्रेडिट डिपार्टमेंट ' म्हणून उघडलें आहे. या खात्यामार्फत शेतकऱ्यांच्या प्रश्नासंबंधीं चौकशी, त्याचप्रमाणें निरनिराळ्या सहकारी पेढ्या व सहकारी बँकांच्या कार्यांत एकसूत्रीपणा आणणें वगैरे कामें चालतात. वेळोवेळीं अनेक उपयुक्त प्रश्नांची चौकशी करून माहिती पण प्रसिद्ध करण्यांत येते.

रिझर्व्ह बँकेची मुख्य कचेरी मुंबईस असून कलकत्ता, मद्रास, रंगून, दिल्ली, कानपूर, कराची व लाहोर या ठिकाणीं तिच्या शाखा आहेत. हिंदुस्थानांतील नाणे-बाजाराच्या घटनेला जर देवळाचें स्वरूप आहे असें मानलें तर, ही मध्यवर्ती बँक—रिझर्व्ह बँक, त्या देवळाचें सुवर्णशिखर आहे. हजारों खेडयांतील सावकार, सहकारी पेढ्या, त्यांवर शहरांतील खाजगी सावकारी पेढया, व्यापारी बँका, सहकारी पेढया, त्यांवर ही रिझर्व्ह बँक, याप्रमाणें घटना असून या घटनेमार्फत ४० कोटी लोकांच्या देवघेवीचा खटाटोप चालतो.

वर विस्तारानें रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाची घटना व कार्यक्षेत्र यांचें वर्णन दिलें आहे. त्यावरून मध्यवर्ती बँक जीं कामें करते तीं कामें करण्याकरितां ही योजना उघड आहे. हिंदुस्थानांतल्या लोकांच्या हिताच्या दृष्टीनें तिचें धोरण कितपत राष्ट्रीय असते हा प्रश्न येथें उपस्थित होत नाहीं. समाजांतील विषमता जावी, व जास्त न्यायाची परिस्थिति उत्पन्न व्हावी, या दृष्टीनें ही बँक कांहीं करूं शकणार नाहीं. भांडलवशाहींत उत्पन्न होणाऱ्या अडचणी अनुभवानें कशा दूर करतां आल्या, त्याला अनुसरून इतर भांडवलशाही राष्ट्रांत जशी मध्यवर्ती बँक ही अवश्यक बाब झाली, अगदीं त्याच दृष्टीनें ही हिंदुस्थानांतील योजना आहे. अधिक दुःख म्हणजे तिचें नियंत्रण करणारी सत्ता, जनतेची तर नाहींच, पण राष्ट्रीयसुद्धां नाहीं !! तथापि नुकत्याच स्थापन झालेल्या हंगामी राष्ट्रीय सरकारामुळें परिस्थिति बदलेल अशी आशा आहे.

जगांत लंडन हें श्रेष्ठ प्रतीचें व्यापारी ठिकाण समजलें जातें. तेथील नाणे-बाजाराला आंतरराष्ट्रीय स्वरूप आहे. इंग्लंडमध्यें मध्यवर्ती बँकेचें काम ‘ बँक ऑफ इंग्लंड ’ पहाते. तिलाच नोटा काढण्याचा अधिकार आहे. किती नोटा काढाव्यात, व कोणत्या प्रमाणांत तिनें तारण ठेवावें हेंहि कायद्यानें ठरले आहे. बहुतेक सर्व बँकांचीं खातीं तिजकडे असल्यामुळें नोटा न काढतां सुद्धां तिला मागें सांगितल्या-प्रमाणें बँकांची रोकड कमीजास्त करतां येते. दर आठवडयास चलनाचा व इतर उलाढालीचा तक्ता ही बँक जाहीर करते, त्यांत बँकेजवळ नोटा किती, बाजारांत किती, याची माहिती असते. त्याचप्रमाणें ठेवीबद्दलहि माहिती असते. देशांतील बँकांची परिस्थिति पाहून ही बँक धोरण ठरविते व तें ‘ बँकरेट ’ मार्फत सर्वांस कळतें. देशांतील रोकड कमीजास्त करून ती उत्पादनावर, भावावर , व उत्पन्नावर परिणाम करूं शकते. तात्पर्य, मध्यवर्ती बँकेप्रमाणें देशांतील नाणेबाजाराचीं सूत्रें ती हलवीत असते, व हें तिचें सूत्रधाराचें काम येथेंच न थांबतां राजकारणाचे प्रदेशांत

प्रवेश करून, सत्ता चालविते, ही तक्रार इंग्लंडमधल्या समाजवादी लोकांची आहे. इंग्लंडमधील सरकार या बँकेच्या खऱ्या सूत्रधारांच्या विरुद्ध जाऊं शकत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी ‘ मजूर सरकारनें ’ तो प्रयत्न केला आणि बिचारे ‘ मजूर सरकार ’ खलास झालें. नुकतेंच बँक ऑफ इंग्लंडचे राष्ट्रीयीकरण झालें आहे. तथापि यामुळें भांडवलवाल्यांचे वजन विशेष कमी झालें असें म्हणतां येणार नाहीं. अमेरिका ही इंग्लंडला आर्थिक जगांत प्रतिस्पर्धी सत्ता युद्धोत्तर कालांत झाली आहे व हीच गोष्ट ध्यानांत धरून इंग्लंडनें आपल्या मुख्य व मध्यवर्ति बँकेचे पुनर्घटन केलें आहे व तेवढयाच अर्थानें तिचें राष्ट्रीयीकरण झालें आहे.

---

# २२. पैसा व त्याचें मूल्य

बँकांसंबंधीं विवेचन करतांना पैशाच्या पुरवठ्याचा उल्लेख आला. त्याचप्रमाणें पदार्थांच्या किंमती जसें चलनाबाबत धोरण असेल त्या मानानें कमीजास्त होतात, असाहि उल्लेख आला. एक रुपयास आज जी वस्तु मिळेल ती तशी नेहमींच मिळेल असें नाहीं. आज एक रुपया दिला असतां ८ शेर बाजरी मिळते तर कांहीं महिन्यांनीं ४ शेर मिळेल अगर १६ शेरहि मिळेल. याचा अर्थ एक रुपयाची वस्तु घेण्याची ऐपत कमीजास्त होते. वास्तविक रुपया म्हणजे पैसा हें वस्तूंच्या किंमती मोजण्याचें माप, तें तर स्थिर असावयास पाहिजे. पण येथें तर, तेंच कमीजास्त होतें. कापडाचा गज जर प्रत्येक बाजारचे दिवशीं कमीजास्त होऊं लागला तर मग कठीण काम होईल. तथापि पैशाच्या किंमतींत हा फेरबदल होतो, हीं गोष्ट लोकांना परिचित झालेली आहे. ते म्हणतात महागाई झाली म्हणून रुपयाला बाजरी कमी मिळते, व स्वस्ताई झाली म्हणून जास्त मिळते. या त्यांच्या विचारसरणीमागें फक्त वस्तूंचा भाव हा मागणी-पुरवठ्यावर अवलंबून असतो असें मानलेलें असतें. तथापि पैशाच्या किंमतींत त्याच्या वस्तु विकत घेण्याचे ऐपतींत कमीजास्त कां व्हावें याचा विचार करणें जरूर आहे. पैशाचें मूल्य, खरी किंमत म्हणजे सर्वसामान्यपणें, वस्तूंच्या भावाची पडछाया म्हटली तरी चालेल. समजा, वस्तूंचे भाव दुप्पट झाले कीं त्याच पैशाचे प्रमाणाला, मग तो रुपया असो, पौंड असो, पूर्वीपेक्षां निम्मी वस्तु मिळेल, म्हणजे पैशाची किंमत निम्मी झाली. रुपयास ८ शेर बाजरी होती ती आतां १६ शेर झाली, याचा अर्थ रुपयाची खरी किंमत, मूल्य, त्याची वस्तु घेण्याची ऐपत दुप्पट झाली. ही पैशाची खरी किंमत. ऐपत कशी मोजावयाची, ती किती वाढली, किती कमी झाली, हें कसें ठरवितात हेंहि जाणणें जरूर आहे. त्याचप्रमाणें कांहीं वस्तूंचे भाव वाढतात व कांहींचे स्थिर रहातात हेंहि दृश्य एकाच वेळीं आपण पहातों. पैशाच्या मूल्यांत, ऐपतींत फरक झाल्याबरोबर त्याचे काय परिणाम होतात हेंहि पाहिलें पाहिजे.

वस्तूंचे भाव, मागणी व पुरवठा यांवर अवलंबून असतात. पैशाच्या बाबतींत हा नियम लागू पडतो का ? जर पडत असेल तर पैशाची मागणी व पुरवठा कसा व कोणत्या परिस्थितींत होतो, कोणत्या गोष्टींचा या मागणी व पुरवठ्यावर परिणाम होतो, हें पाहिलें पाहिजे. मागील प्रकरणांत बँकांसंबंधीं विचार करतांना पैशाचा पुरवठा कसा होतो, याचें सामान्य विवेचन आलेंच आहे. पैशाची मागणी, लोक-संख्या, लोकांच्या संवयी, लोक किती रोकड बाळगतील, किती पैसा गुंतवितील, याच गोष्टींवर अवलंबून असते. माणसें आपल्या मिळकतीपैकीं, जिंदगीपैकीं, किती रोकड हाताशीं ठेवतील, किती स्थावरांमध्यें गुंतवितील अगर रोखे, भाग वगैरेंत किती गुंतवितील यासंबंधीचा विचार, व्याजासंबंधीं केलेल्या विवेचनांत येऊन गेला आहे. देशांतील पैशाची मागणी विशेषतः लोक ज्या प्रमाणांत रोकड जवळ ठेवूं इच्छितात, त्यावर अवलंबून असते.

पैशाच्या मागणी पुरवठ्याकडे पाहतांना निरनिराळ्या दृष्टींनीं पाहिलें म्हणजे त्याचें स्वरूप बदलतें असें नव्हे तर, पहाणाराची दृष्टि निरनिराळी असते. पैसा लोक अगदीं पुरून ठेवीत नाहींत. रोकड जवळ न बाळगण्याची प्रवृत्ति जशी जास्त तशी पैशाला मागणी कमी, कारण भीति असली, किंवा वातावरण अस्वस्थ असलें म्हणजे लोक रोकड अगदीं हातांत ठेवूं इच्छितात व त्यामुळें रोकडीच्या पैशाला मागणी जास्त, उलट लोक रोकड हातीं कमी ठेवूं लागले तर, पैशाला मागणी कमी. त्याचप्रमाणें लोकांच्या हातांतील पैसा सारखा फिरत राहिला व या त्याच्या फिरण्याचें प्रमाण जेवढें जास्त तेवढ्या प्रमाणांत लोक, रोकड अगर पैसा जवळ कमी ठेवूं इच्छितात व जास्त जास्त प्रमाणांत तो खर्चूं इच्छितात अगर गुंतवूं इच्छितात. पैसा लोकांच्या हातांत स्वस्थ न राहतां, सारखा खेळूं लागला म्हणजे त्याचा अर्थ पैशाला रोकड शिल्लक ह्या नात्यानें मागणी कमी आहे, कारण लोक पैसा हातांत ठेवूं इच्छीत नाहींत. तात्पर्य, पैशाची मागणी कमी आहे, हें दोन दृष्टींनीं पाहतां येतें. एक, लोक प्रत्यक्ष किती पैसा–रोकड हातांत ठेवतात व दुसरें समाजांत पैसा किती वेगानें व किती जलद माणसांमाणसांतील व्यवहारांत फिरतो. या दोन्हीवरून पैशाची मागणी कशी आहे हें समजतें. दोन्ही दृष्टींनीं जरी पाहिलें तरी, मागणीचें स्वरूप बदलत नाहीं. तसेंच पैशाच्या पुरवठ्याकडेहि अनेक दृष्टींनीं पाहतां येतें. प्रत्यक्ष नोटा वाढल्या म्हणजे पैसा वाढला हें अगदीं सरळ झालें, पण बँकेनें पत वाढविली, कर्ज दिलें, ओव्हर ड्राफ्ट दिला तरी तोच परिणाम होतो. कारण या गोष्टी करतांना बँक काय करते हें आपण मागें पाहिलें. प्रत्यक्ष रोकड देत नाहीं,

ऋणकोच्या खातीं दिलेलें कर्ज ठेव म्हणून जमा करते अगर त्याचा चेक आला म्हणजे तो पटविते. पण पैसा प्रत्यक्ष वाढवून जो परिणाम होतो तोच यामुळें होतो. कारण बँकेकडे असलेली ठेव ही व्यवहाराचे दृष्टीनें अगदीं रोकडीसारखी असते. ताबडतोब मिळतो म्हणून व्यवहारांत पैसा नोटांनीं वाढो अगर बँकेतल्या ठेवीनें वाढो, त्याचा परिणाम मुबलक पैसा झाल्यामुळें पैशाची खरी किंमत, ऐपत कमी होण्यांत होतो.

पैशाची किंमत म्हणजे त्यानें किती व काय प्रमाणांत वस्तु मिळतील ही; परंतु पैशाची ही ऐपत अगर किंमत म्हणजे फक्त चालू उपयोगाच्या वस्तु घेण्याची ऐपत, असा मर्यादित अर्थ नाहीं. पैशानें ज्या ज्या गोष्टी मिळतात त्या सर्वांच्या बाबतींतील विकत घेण्याची ऐपत, असा व्यापक अर्थ आपण घेतला पाहिजे. प्रत्यक्ष गरज भागविण्याकडे अगर अवश्यक वस्तूंवरच समाजांतील सर्व पैसा खर्च होत नाहीं. पैसा मुबलक झाला अगर कमी झाला तरी कांहीं गोष्टींच्या किंमतींत फरक पडत नाहीं. कारण त्यांची मागणी जवळ जवळ नेहमींची ठरलेली असते; व किंमत वाढविल्यास ती मागणी अजीबात जाईल म्हणून किंमत वाढविली जात नाहीं.

समाजांत जेवढा पैसा असेल त्यावर पैशाची किंमत त्याची ऐपत अवलंबून आहे असें सांगण्यांत येतें. राष्ट्रांत किती रोकड, किती पैसा आहे, यावर पैशाची किंमत अवलंबून आहे असें म्हणतांना व्यवहारापासून अलग असलेला पैसा, यांत धरणें बरोबर नाहीं. समजा, हजारों रुपये अगर नोटा पुरून ठेवलेल्या आहेत, प्रत्यक्ष व्यवहारांत, देवघेवींत चलन म्हणून त्यांचा प्रवेश नाहीं, तेव्हां या पैशाचा विचार करण्याचें कारण नाहीं. पैशाची चालू किंमत काय हें आज प्रत्यक्ष व्यवहारांत किती पैसा खेळता आहे अगर ताबडतोब खेळतां होईल यावर अवलंबून आहे. समजा, मध्यवर्ती बँकेनें नोटा छापल्या व आपल्या सेफमध्यें ठेवल्या, त्यानें पैसा वाढला तरी चलन वाढलें, अगर प्रत्यक्ष व्यवहारांत खेळणारा पैसा वाढला, असें होत नाहीं. म्हणून एकंदर समाजांत किती पैसा आहे हें काढून त्यांतून व्यवहारांत न येणारा, चलनाचे उपयोगांत न येणारा, डांबून ठेवलेला पैसा कमी करून जो शिल्लक राहील तेवढाच, पैशाची चालू किंमत काढतांना लक्षांत घेतला पाहिजे. वरील मर्यादित अर्थ लक्षांत घेऊन पैशामध्यें ज्या मानानें भर पडेल अगर ज्या मानानें तो कमी होईल त्या मानानें तंतोतंत वस्तूंचे भाव जास्त अगर कमी होतील असें कांहींचें मत आहे. पैसा म्हणजे विनिमयाचें साधन. आगगाडींत बसण्यास तिकिट लागतें, नाटकगृहांत, सिनेमांत जाण्यास तिकिट लागतें, तसें वस्तु घेण्याकरितां कांहींतरी सर्वमान्य साधन पाहिजे, कांहींतरी तिकिट पाहिजे, तें दाखविल्याशिवाय वस्तु मिळणार नाहींत; ते

तिकिट म्हणजे पैसा. नाटकवाले यांनीं कितीहि तिकिटें काढलीं तरी तिकिटांची किंमत कमीजास्त होत नाहीं, ती ठरलेली असते. तिकिटें पुरेशीं असलीं म्हणजे झालें. त्याच न्यायानें व्यवहारांतील देवघेवीकरितां पैसा पुरेसा असला म्हणजे झालें. तो किती आहे हा प्रश्न महत्त्वाचा नाहीं. आज आहे त्यापेक्षां दुप्पट झाला तर, सर्व पदार्थांच्या किंमती दुप्पट होतील. जर निम्मा झाला तर पदार्थांच्या किंमती निम्या होतील, पण एकंदर वट पैशाची किंमत अगर ऐवज कायमच राहील, त्यांत बदल होणार नाहीं. समजा, समाजांत एकंदर रोकड, पैसा, अर्थात् प्रत्यक्ष चलनांत असलेला, १०० रु. आहे, व वस्तूंचे भाव १ रुपयास ८ शेर. समजा, पैसा दुप्पट झाला तर भाव १ रुपयास ४ शेर होईल. उलट, पैसा निम्मा झाला तर १ रुपयास १६ शेर होईल. उदा०, १०० रु. असतांना ते देऊन ८०० शेर वस्तु मिळत होती. २०० रु. झाले तरी, ४ शेर भावामुळें ८०० शेरच वस्तु २०० रु.ला मिळाली. पुनः ८०० शेरच वस्तु ५० रु. झाले तेव्हां मिळाली, कारण भाव १६ शेर झाला. म्हणजे समाजांतील एकंदर पैशाची वट किंमत बदलली नाहीं, तर ती कायम राहिली. पैसा जसा कमीजास्त झाला त्या प्रमाणांत भाव कमीजास्त झाले. पण एकंदर समाजांतील चालू पैशाची वट किंमत बदलली नाहीं. वरील विचारसरणींत मानल्याप्रमाणें पैसा वाढला तरच भाव वाढतात; पण असाच केवळ अनुभव नाहीं. पैशाची मागणी नेहमीं कमीजास्त होते व त्यामुळें किंमतींत फरक होतात व असले फरक एकंदर पैसा पूर्वींइतकाच असतांनासुद्धां होतात व एकंदर पैसा कायम, पण पैशाच्या मागणीमुळें किंमती कमीजास्त झाल्या तर, जसा व जितका पैसा वाढेल अगदीं तितक्याच प्रमाणांत भाव वाढतील, हा नियम मग कायम राहत नाहीं. त्याचप्रमाणें पैशाच्या पुरवठ्यांत जर कमीजास्त झालें तर, त्याचा परिणाम पैशाच्या मागणीवर होईल व त्यामुळें एकंदर पैशाच्या वट किंमतींत पण बदल होईल व तसें झालें म्हणजे पैशाच्या प्रमाणांतच अगदीं तंतोतंत भाव बदलतात, हा नियम कायम राहणार नाहीं. गेल्या महायुद्धानंतर जर्मनींत पैशाचा पुरवठा मुबलक होत होता, व सारखा वाढत होता आणि त्याबरोबर वस्तूंच्या किंमतीहि वाढत होत्या. मुबलक पैसा समाजांत झाल्यामुळें लोक रोकड जवळ ठेवीनासे झाले, यामुळें अर्थात् पैशाची मागणी कमी झाली. उलट वस्तूंच्या किंमती वाढत असल्यामुळें लोक पदार्थांचा संग्रह करूं लागले. आपला पैसा परदेशीं विनिमयांत अगर शेअर्समध्यें गुंतवूं लागले. पैशाचा संग्रह न होतां तो सारखा फिरत राहिला, व किंमती वाढूं लागल्या, कारण पैशाची मागणी कमी झाली.

पैसा जसा वाढतो तशी पैशाची मागणी वाढत नाहीं, म्हणून पैशाच्या प्रमाणांतच, अगदीं तंतोतंत भाव बदलत नाहींत.

साधारणपणें मंदींत सुद्धां हाच अनुभव येतो. व्यवहारांतील पैसा कायम राहिला अगर वाढला तरीसुद्धां पदार्थांच्या किंमती मंदींत सारख्या पडत असतात व त्याचें कारण पैशाला मागणी वाढली हें आहे. मंदीमुळें लोक रोकड जवळ ठेवूं लागतात, व्यापारांत, उद्योगांत गुंतवीनासे होतात. आपली रोकड स्वतःजवळ अगर बँकेंत ठेवतात, त्याचा अर्थ पैसा फिरता राहत नाहीं व पैशाची मागणी वाढली, पैसा पुरेनासा झाला कीं त्याची टंचाई भासते व पदार्थांच्या किंमती आणखी कमी होऊं लागतात. तात्पर्य, पैसा जसा वाढेल अगर कमी होईल, त्या प्रमाणांत तंतोतंत वस्तूंचे भाव वाढतील अगर कमी होतील, हा सिद्धांत अगदीं अक्षरशः बरोबर नाहीं.

समाजांतील सर्व पैसा सारखा वापरांत येतो असें नाहीं. कांहीं पडून राहतो, कांहीं सारखा व्यवहारांत फिरता असतो. शहरांतील पैसा दररोज या माणसाकडून त्या माणसाकडे, गिऱ्हाइकांकडून दुकानदाराकडे, बँकेकडून ठेवीदाराकडे व त्याच्याकडून बँकेकडे ये जा करीत असतो. व्यापारी शहरांत पैशाची ही गति जास्त, खेडेगांवांत ती कमी, तेथें बाजाराचे दिवशीं जी काय उलाढाल होईल तीच महत्त्वाची. पैसा किती खेळता आहे, किती गतीनें तो फिरतो, या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. कारण त्यावर पैसा किती लागेल, पैशाची मागणी किती आहे हें अवलंबून आहे. समजा, हजार माणसांना चहापान करावयाचें आहे. प्रत्येकास कांहीं निराळी कपबशी द्यावयालाच पाहिजे असें नाहीं. पण वीसपंचवीस माणसें एका वेळीं चहा घेतील व लागलीच कप रिकामे करतील, या अंदाजावर साधारणपणें ५० कपबशा लागतील असें समजून, हॉटेलवाला वागला तर तें अयोग्य नाहीं. पण हीं माणसें चहा पितांना किती गप्पा मारतील, किती लवकर कपबशी रिकामी करतील, किती लवकर कपबशी एका गिऱ्हाइकाकडून दुसऱ्या गिऱ्हाइकाकडे देतां येईल यावर एकंदर कपबशांचा पुरवठा हॉटेलवाल्याला करावा लागेल. त्याचप्रमाणें माणसें, रोकड सांचवितील कां खर्चतील, पैसा पडून राहील कां फिरता राहील, यावर बऱ्याच गोष्टी अवलंबून असतात. लक्ष्मी चंचल, पण तिचा हा चंचलपणाचा वेग अर्थशास्त्रांत, व्यवहारशास्त्रांत, महत्त्वाची बाब आहे. व ही चंचलता, जितकी जास्त तितकी पैशाची मागणी कमी!! लक्ष्मीच्या चंचलपणावर नीतिमान् लोकांचा राग, तर तिचा चंचलपणा वरील अर्थानें व्यवहारांत जितका जास्त तितका चांगला असें व्यवहारशास्त्र म्हणणार!!

राष्ट्रांतील सरकारचें धोरण व राष्ट्रांतील बँकांची जी परंपरा असेल, त्याप्रमाणें राष्ट्रांतील देवघेवीसाठीं जरूर लागणारा पैसा अगर पत यांचें स्वरूप व पुरवठा असतो. जर राष्ट्रांतील चलन सोन्यावर आधारलेलें असेल म्हणजे नोटा दिल्या असतां सरकार अगर मध्यवर्ती बँक त्याबद्दल कायद्यानें सोन्याचीं नाणीं देण्यास बांधलेली असेल तर, त्या राष्ट्रानें आपले भाव साधारणपणें, ज्या देशांत सुवर्णचलन आहे त्या देशांतील भावांच्या मेळांत ठेवले पाहिजेत. समजा कीं, देशाचा इतर देशांशीं व्यापार नाहीं व देशांतील चलन म्हणजे फक्त सोन्याचीं नाणीं. सोनें हें कांहीं मोठ्या प्रमाणावर दरसाल उत्पन्न होत नाहीं म्हणून, जें आज समाजांत आहे, तें वार्षिक उत्पन्न होणाऱ्या सोन्यापेक्षां खास जास्त आहे. कांहीं सोनें औषधां· साठीं अगर दागदागिन्यांसारख्या अन्य कारणांसाठीं खर्च होतें, तें कमी केलें म्हणजे जें राहील तें सोनें, नाण्यांकरितां उपयोगी पडणार. किंबहुना सोनें हें नाणें आहे म्हणूनच त्याला किंमत आहे. सोन्याची किंमत सरकार ठरवील, मध्यवर्ती बँक नोटा काढील व तेवढें सोनें आपल्या संग्रहीं ठेवील. प्रत्यक्ष सोन्याच्या नाण्याऐवजीं नोटा समाजांत प्रसार पावतील; पण जर प्रत्यक्ष सोनें आहे त्यापेक्षां जास्त नोटा काढल्या तर काय होईल तें पाहूं. नवीन नोटांमुळें पैसा तर वाढेलच पण, त्याबरोबर जें दरसाल निघणारें सोनें बँक घेत असे, तें सर्व मध्यवर्ती बँक घेणार नाहीं. कारण सर्व नोटांचे किंमतीबद्दल, ती आतां सोनें ठेवीत नाहीं. पण हें सोनें कांहीं पडून राहाणार नाहीं. नाण्याशिवाय इतर गोष्टींसाठीं त्याचा होणारा उपयोगहि कांहीं विशेष वाढणार नाहीं. अशा स्थितींत हें सोनें विकलें जाईल, त्याबद्दल अर्थात् मालकांनां नोटा मिळतील, व त्या पुनः व्यवहारांत पसरतील. नोटा दिल्या असतां सोनें मिळेल असें जरी असलें तरी, या परिस्थितींत मध्यवर्ती बँकेजवळ असलेल्या सोन्यापेक्षां जास्त नोटा चलन म्हणून व्यवहारांत होतील. कारण एक खुद्द मध्यवर्ती बँकेनें सोन्यापेक्षां जास्त नोटा काढल्या, व तिनें घेतलेलें सोनें विकलें गेलें, त्यानेंहि नोटा जास्त प्रसार पावल्या. नोटांच्या किंमतीइतकें सोनें तिजजवळ असणार नाहीं हें उघड आहे. अशा परिस्थितींत व्यवहारांत किती नोटा ठेवाव्यात हें सर्वस्वीं मध्यवर्ती बँकेवर अवलंबून राहील. वास्तविक सोन्याचा पुरवठा वाढत आहे, अशा परिस्थितींत जर मध्यवर्ती बँकेला पैशाचा पुरवठा वाढूं नये असें वाटत असेल तर, सोनें खरेदी करण्यांत जेवढ्या नोटा गेल्या तेवढ्या किंमतीचे रोखे विकून येणाऱ्या नोटा चलनांतून काढून घेऊन, बाजूस ठेवावयाच्या म्हणजे झालें. उलट सोन्याचा पुरवठा कायम असतांना सुद्धां, जवळ असलेल्या सोन्यापेक्षां जास्त नोटा काढून मध्यवर्ती बँक पैसा वाढवूं शकते

मात्र लोक प्रत्येक नोट घेऊन सोनें मागण्यास धांवणार नाहींत अशी परिस्थिति असली पाहिजे. याप्रमाणें जर कायद्यानें मर्यादा घातली नाहीं तर, मध्यवर्ती बँक वाटेल तेवढा पैसा वाढवूं शकेल, पण नोटा काढल्या कीं तारण ठेवावें लागतें व त्या तारणपैकीं कांहीं टक्के तारण, किमानपक्षीं सोनें, नाणें, अगर लगड या रूपांत ठेवावें लागतें असा कायदा सर्वत्र आहे.

मध्यवर्ती बँक, वरीलप्रमाणें पैसा वाढवूं शकेल, पण देशांतील इतर बँका ठेवी घेतात व त्यांवर ठेवीदार चेक काढीत असतात. बँकेंतील ठेवी म्हणजे व्यवहारांत रोकडच समजली जाते. कारण तिजवर चेक दिला कीं तो पटतो. म्हणून बँकेंतील ठेवी या व्यवहारांतील पैसा, रोकड, समजणें योग्य समजलें जातें. बँका प्रत्यक्ष थोडी रोकड स्वतःजवळ ठेवतात व थोडी मध्यवर्ती बँकेजवळ ठेवतात. एकंदर रोकडीच्या मानानें कर्ज देऊन पत वाढवून व्यापारी चलन वाढवीत असतात. कर्ज दिलें म्हणजे तेवढ्या प्रमाणांत बँकेच्या ठेवींत भर पडते. कर्ज परत मिळालें कीं त्यामानानें ठेवींत तेवढी रक्कम कमी होते. सामान्यतः बँका सुरक्षितपणा असावा म्हणून एकंदर ठेवीच्या कांहीं टक्के रोकडींत ठेवतात. पण व्यापार तेजींत असेल तर पुष्कळ बँका नेहमींपेक्षां रोकडीचें प्रमाण कमी झालें तरी योजकांना, व्यापाऱ्यांना कर्ज देतात. मंदीची भीति वाटली कीं कर्जें परत घेण्यास सुरुवात करतात. या रीतीनें इतर बँकाहि व्यवहारांतील पैसा वाढवीत असतात, कमी करीत असतात. शिवाय मध्यवर्ती बँकहि तिनें मनांत आणल्यास या बँकांची शिल्लक कमीजास्त करूं शकते हें मागें पाहिलेंच आहे. शिल्लक कमीजास्त झाल्याबरोबर बँकांचें कर्ज देऊन पत वाढविण्याचें, ठेवी वाढविण्याचें व त्यायोगानें व्यवहारांतील व्यापारी चलन वाढविण्याचे प्रयत्न कमी-जास्त होतात. कारण जशी शिल्लक, रोकड, बँकेजवळ असेल, त्यामानानें बँक आपल्या गिऱ्हाइकांना कर्ज देत असतें व व्यापारांत उपयोगी पडेल अशी पत, असें चलन वाढवीत असते. प्रत्यक्ष रोकड न वाढतां हें चलन वाढतें. कारण व्यापाऱ्याला बँक कर्ज देते किंवा ओव्हर ड्राफ्ट देते म्हणजे तो जे चेक काढील ते कर्जाच्या मर्यादेपर्यंत पटविते. म्हणजे प्रत्यक्ष नाणें अगर नोटा न वाढवितां पतीनें चलन वाढविलें जातें. यालाच व्यापारीचलन असें म्हणतात. व्यवहारांत लोक ज्यानें नाणें, नोटा अगर रोकड मागितली कीं मिळेल अशी कोणतीहि गोष्ट असली म्हणजे देवघेव करतात हें मागें स्पष्ट केलेंच आहे.

वर सांगितल्याप्रमाणें देशांतील बँका पैशाचा पुरवठा वाढवूं शकतात; रोखे विकून टाकलें कीं ताबडतोब बँकांकडील ठेवी वाढतात. कारण जे रोखे विकतात ते

आपली रोकड बँकांकडेच ठेवणार. त्यांची जमा वाढली म्हणजे बँकांकडील ठेवी वाढल्या. बँका ठेवी कांहीं सांचवून ठेवीत नाहींत त्या व्याजीं लावतात. योजक उद्योगधंदेवाले कर्ज घेतात व धंदा वाढवितात. नफ्याचा दर, जर व्याजाचे दरापेक्षां जास्त पडण्याची आशा असेल तर बँकांना कर्ज घेणारें गिऱ्हाईक लवकर मिळतें. तसें नसेल तर बँका, व्याजाचा दर कमी करतील, कारण नुसत्या ठेवी ठेवणें म्हणजे नुकसान, कारण ठेवीदारांना कांहींतरी व्याज द्यावें लागतें. जर धंद्यांत कांहींच त्राण नसेल तर, व्याजाचा दर कमी करूनसुद्धां कर्ज घेणारे मिळणार नाहींत. बँकांनीं किती जरी चलन, पैसा वाढविला तरी, या स्थितींत कांहीं होणार नाहीं. उत्पादन, व्यापार तेजींत नाहीं या स्थितींत बँकांनीं व्यवहारांतला पैसा वाढविला तरी, लोकांची पैशाची मागणी जास्त होते. कारण मंदींत लोक पैसा हातीं ठेवूं इच्छितात. रोकड जवळ ठेवण्याची प्रवृत्ति वाढते. पैसा वाढवूनहि वस्तूंच्या किंमती वाढत नाहींत, कारण मंदीमुळें सर्वच उत्पादन आंकसलें जातें. सरकारनें बेकारी कमी करण्याकरितां मोठमोठालीं कामें काढलीं व त्याला अवश्य लागणारा पैसा उभा करून तो व्यवहारांत पसरविला तरी वस्तूंच्या किंमती वाढतीलच असा भरंवसा नाहीं. कारण पैशाची मागणी त्याबरोबर जास्त झाली कीं भाव वाढणार नाहींत, लोक रोकड जास्त जास्त जवळ बाळगूं लागले तर, वाढलेल्या पैशाचा परिणाम भाव वाढविण्यांत होणार नाहीं.

पैशाचा पुरवठा व्यवहारांत कोणत्या परिस्थितींत होतो याचा विचार केल्यानंतर पैशाच्या मागणीसंबंधी अधिक विचार करणें जरूर आहे. राष्ट्रांत जो पैसा असेल तो व्यक्तींच्या जवळ, बँकांत, सरकारी खजिन्यांत वगैरे ठिकाणींच तो असणार. एका अर्थानें या सर्व पैशाला मागणी आहे म्हणूनच ज्यांच्या जवळ आहे, तिथें तो आहे. तथापि हा सर्व पैसा कांहीं वस्तूंच्या देवघेवीसाठीं उपयोगांत आणला जात नाहीं. जो प्रत्यक्ष उपयोगांत आणला जातो व ज्याच्या सहाय्यानें व्यवहारांतील वस्तु विकत घेतल्या जातात, तेवढयाच पैशाला मागणी आहे असें म्हटलें तर योग्य होईल. बँकेतून सारखा पैसा दररोज येतो, जातो; दुकानांतून त्याचप्रमाणें येतो, जातो; त्याचप्रमाणें हजारों व्यवहार दररोज होत असतात. माणसाजवळ सदासर्वकाळ सारखाच पैसा नसतो, कधीं जास्त असतो तर कधीं कमी. महिन्याचे पहिल्या आठवड्यांत पगार होतो तेव्हां बहुतेक कामगारांजवळ, कारकुनांजवळ जेवढा पैसा असतो तेवढा महिन्याचे शेवटीं नसतो. तथापि प्रत्येक बँकेजवळ, प्रत्येक दुकानदाराजवळ, व्यक्तीजवळ सरासरी नेहमीं कांहीं ना कांहींतरी पैसा असतो व तो किती असावा हें तीं व्यक्ति, दुकानदार, बँक वगैरे ठरविते.

मनुष्य पैसा जवळ बाळगीत नसला तर तो खर्च तरी करीत असला पाहिजे नाहीं तर तो कोठें तरी गुंतवीत असला पाहिजे. पैसा हा ऐपत सांठवूं शकतो हा त्याचा मोठा उपयोग आहे, हें आपण मागें पाहिलें. पदार्थ अगर वस्तु नाशिवंत असतात म्हणून त्यांचा संग्रह न करतां मनुष्य पैशाचा संग्रह करतो, कारण पैशानें वाटेल तेव्हां जरूर ती वस्तु मिळते. मला उंसाचा रस पाहिजे म्हणून मी कांहीं महिनाभर पुरेल इतका तो सांचवून ठेवीत नाहीं, तर मी पैसा मजजवळ ठेवतों व दररोज एक आणा टाकून एक शेर ताजा रस घेतों. किरकोळ रकमा कोणी गुंतवीत नाहींत. कोणत्या वेळीं काय प्रसंग येईल याचा भरंवसा नाहीं. म्हणून पुष्कळ लोक रोकड स्वतःजवळच ठेवतात अगर बँकेंत ठेवतात. मोठमोठ्या पेढ्या, दुकानदार-सुद्धां याच दृष्टीनें कांहीं ना कांहींतरी रोकड, पैसा स्वतःजवळ अगर बँकेंत ठेवतात. खुद्द बँकासुद्धां कांहीं रोकड नेहमीं हाताशीं ठेवतात. व्यवहारांत पुष्कळ वेळां वजा-वाटीनें देणींघेणीं फेडली जातात. पुष्कळ व्यवहारांत जमाखर्च केला जातो व प्रत्यक्ष रोकड देण्याचे प्रसंग शक्य तितके कमी करण्यांत येतात. मला 'अ'कडून १०० रु. यावयाचे आहेत, पण त्याचबरोबर मी 'अ'कडून सामान नेलें, त्याबद्दल त्याला १०० रु. द्यावयाचे आहेत; या ठिकाणीं मी 'अ'ला पैसे देत नाहीं व 'अ' मला देत नाहीं; आम्ही जमाखर्च करतों. मी माझे जमाखर्चांत 'अ'चे खातीं जमा करून लागलीच त्याचे नांवें टाकतों. 'अ'हि आपले जमाखर्चांत त्याचप्रमाणें करतो. असें जर न केलें तर, १०० रु. रोकडीची जरुरी पडेल. पण व्यवहारांत लाखों व्यवहार असे वजावाटीनें होत असतात; व त्यामुळें प्रत्यक्ष रोकडीची जरुरी कमी होते. समजा, गिरणीमालकानें मजुरांना रोकड देण्याऐवजीं प्रत्येकाला पगाराबद्दल त्या त्या रकमेचे चेक दिले व प्रत्येक मजुराचें बँकेंत खातें असलें तर, प्रत्येक मजूर बँकेंत कांहींतरी रोकड जमा करील; व जेव्हां लागेल तेव्हां काढून घेईल. पण या पद्धतीनें बँकेंत ठेवी वाढल्या, लोक जवळ रोकड थोडी ठेवूं लागले असें होईल. बँका पुनः त्यांचेकडे रोकड वाढल्यामुळें व्यापारी पत वाढवितील, लोकांना कर्जें देतील. तात्पर्य, व्यवहारांत खेळता पैसा, चलन वाढेल पण त्याचबरोबर पैशाची मागणी वाढणार नाहीं.

व्यापारांत, उद्योगधंद्यांत तेजी आहे, खूप नफा होण्याचा संभव आहे, असें वातावरण असेल तर जास्त जास्त पैसा उद्योगधंद्यांत, व्यापारांत गुंतविला जाईल व लोक स्वतःजवळ रोकड कमी कमी ठेवूं लागतील. रोकड नुसती जवळ ठेवणें म्हणजे त्यांत नुकसान, गुंतवली तर कांहीं तरी व्याज येईल, नफा मिळेल; शिवाय एकंदर वातावरण स्वस्थतेचें असल्यामुळें रोकड ठेवण्याची जरूरी व प्रवृत्ति कमी होते.

योजक व व्यापारी मंडळी जास्त जास्त पैसा व्यापारांत व उत्पादनांत गुंतवूं लागतात. हें नवीन भांडवल अर्थात् योजक व धंदेवाले, उत्पादनसामग्री, कच्चा माल वगैरे घेण्याचे कामीं खर्च करतात. त्याबरोबर वस्तूंची मागणी वाढते व भाव वाढूं लागतात. व्यवहारांतील पैसा अगर चलन कमी न होतां त्याची ऐपत—मूल्य, भाव वाढल्यामुळें अर्थात् कमी होऊं लागेल; लोकांचे जवळ प्रत्यक्ष रोकड कमी, पैशाची ऐपत, वस्तु घेण्याची ताकद कमी झाली, अशा स्थितींत जितका पैसा हातांत कमी तितका लोक पसंत करणार. कारण पूर्वींइतकी किंमत पैशाची राहिली नाहीं. त्याचप्रमाणें लोकांना जर असें वाटूं लागलें कीं, वस्तूंचे भाव वाढत जाणार, तर लोक वस्तु जास्त खरेदी करूं लागतात; व त्यामुळें आणखी भाव वाढतात; पैशाची ऐपत—मूल्य आणखी कमी होतें. तात्पर्य, ज्या वेळेस लोकांना पैसा गुंतविला असतां, नफा जास्त मिळेल असें वाटतें, त्याचप्रमाणें ज्या वेळेस वस्तूंचे भाव सारखे वाढत जातील असें वाटतें त्या वेळेस लोक रोकड, पैसा कमी प्रमाणांत जवळ ठेवूं इच्छितात. आपल्या जिंदगीपैकीं थोडा भाग रोकडींत ठेवूं इच्छितात. याचा अर्थ लोकांची पैशाची मागणी या परिस्थितींत कमी असते. उलट ज्या वेळीं पैसा गुंतविणें धोक्याचें आहे, नफा मिळणार नाहीं, भाव कमी होत आहेत, अशा वेळीं लोक जास्त जास्त रोकड जवळ ठेवूं इच्छितात. म्हणजे लोकांची पैशाची मागणी जास्त वाढली असा अर्थ होतो. अर्थात् ही मागणी किती राहील, हें त्या देशांतील लोक प्रत्येक देवघेवीसाठीं रोकडच वापरतात, कां मागें सांगितल्याप्रमाणें वजावटीनें, जमाखर्चानें व्यवहार पुरे करतात, चेकांचा उपयोग किती करतात वगैरे गोष्टींवर अवलंबून राहील. वर पैशाची मागणी कोणत्या परिस्थितींत कमीजास्त होते हें सांगितलें. पैशाची मागणी व त्याचा होणारा पुरवठा यांवर पैशाची ऐपत, मूल्य अवलंबून आहे. म्हणजे सामान्यतः वस्तूंचे भाव पैशाच्या मागणीपुरवठ्यावर अवलंबून आहेत. एक रुपयास किती शेर वस्तु मिळेल, हें व्यवहारांत एकंदर रुपयाची, चलनाची जी स्थिति असेल त्यावर अवलंबून आहे. रुपयाची ऐपत—वस्तु विकत घेण्याची शक्ति एकंदर चलन व्यवहारांत किती आहे, यावर अवलंबून आहे, म्हणजे व्यवहारांत वस्तूंचे भाव, किंमती कशा राहतील हें एकंदर व्यवहारांत चलन किती आहे यावर अवलंबून राहील. अर्थात् हे परिणाम ताबडतोब दिसत नाहींत. व्यवहारांत जेव्हां गडबडीनें गोष्टी होतात तेव्हां या नियमाचे उलट स्थितिहि दिसते. तथापि एकंदरीनें, व्यापक दृष्टीनें, दूर पल्ल्यानें पाहतां व्यवहारांत वरील सिद्धांताप्रमाणें घडत असतें.

व्यवहारांत भाव कमीजास्त झाल्याबरोबर पैशाची वस्तु घेण्याची ऐपत कमीजास्त होते. पैशाचें मूल्य, किंमत कमीजास्त होते हें ताबडतोब समजतें. पण ही ऐपत, हें मूल्य किती कमीजास्त झालें हें बिनचूक सांगणें सोपें नाहीं. भाव खूप वाढले अगर खूप कमी झाले, म्हणजे महागाई झाली, स्वस्ताई झाली, येवढें लोक सहज जाणतात. पण तिचें प्रमाण मोजण्याकडे अगर कारण शोधण्याकडे कोणी लक्ष देत नाहीं. मागील महायुद्धानंतर सर्वत्र भाव वाढले. १९३० सालीं मंदी आली, जगभर भाव खूप पडले, तथापि निरनिराळ्या देशांत सारख्या प्रमाणांत भाव पडले नाहींत. ज्या राष्ट्रांतील चलन सोन्यावर आधारलेलें होतें, त्या राष्ट्रांनीं आपलें चलन सोन्यांतून काढून घेऊन, भाव सांवरण्याचा प्रयत्न केला. तथापि १९२९ ते ३२ या सालांत सर्वसामान्यपणें जगभर भाव ५० टक्क्यांनीं पडले असें दिसून आलें. येवढ्या मोठ्या प्रमाणांत भावांत बदल होणें म्हणजे अगदीं दुर्लक्ष करण्यासारखी गोष्ट नाहीं. याचे परिणाम दूरवर होतात व झालेहि. सन १९३९ मध्यें एकंदर चलन २४२ कोटी रु. व्यवहारांत येथें चालूं होते. गेल्या ७ वर्षांत त्यांत वाढ होऊन आज या देशांत चालूं चलन १३०० कोटी रु.पर्यंत गेले आहे. याचा परिणाम म्हणून वस्तूंचे भाव भरमसाट वाढले आहेत. खाद्य पदार्थ, तयार माल, तसेंच अन्य वस्तु या सर्वांच्या भावांत अनेकपटीनें वाढ झाली असून तिचे मुख्य कारण चलन वाढ आहे ही गोष्ट सर्वांनीं मान्य केली आहे.

भाव वाढूं लागले, पैशाची क्रयशक्ति–ऐपत कमी होऊं लागली म्हणजे सर्वच वस्तूंचे भाव सारख्या प्रमाणांत वाढत नाहींत. कांहीं वस्तूंचे भाव जास्त वाढतात. कांहींचे कमी प्रमाणांत वाढतात. पदार्थांचे भाव ज्या प्रमाणांत वाढतात, त्या प्रमाणांत मजुरी अगर वेतन वाढत नाहीं. त्यामुळें मजुरांपासून जें उत्पादन होतें, त्याचा किफायतशीरपणा वाढतो, जास्त मजूर लावून जी मजुरी जास्त द्यावी लागेल त्यापेक्षां, जें जास्त उत्पादन होतें, त्याचें उत्पन्न–भाव वाढल्यामुळें जास्त येतें म्हणून योजक उत्पादन वाढवितील; त्यामुळें पुष्कळ लोकांना काम मिळेल; कांहीं लोकांचें काम वाढेल, ते जास्त काम करूं लागतील; एकंदर उत्पादन, भाव वाढल्यामुळें वाढूं लागलेलें असल्यामुळें योजकांचा नफाहि वाढेल. सामान्य शेअर्स–भाग, यांवर नफा जास्त मिळूं लागला म्हणून त्यांच्या किंमती वाढतील. ज्यांनीं ठराविक व्याजानें भांडवल घेतलें असेल, ते व्यापारी माल खरेदी करून वाढलेल्या भावानें विकून फायदा मिळवितील. भाव वाढत असतात व त्यांना लागणारें भांडवल ठराविक दरानें मिळालेलें असतें अगर मिळत असतें त्यामुळें त्यांना हा फायदा होतो. बँका

पुष्कळ वेळां ठराविक दरानें ओव्हर ड्राफ्ट देत असतात; म्हणजे भांडवल पुरवीत असतात. पुष्कळ योजक ज्या उत्पादक वस्तूंचा, साधनसामग्रीचा भाव वाढला नाहीं त्यांच्या सहाय्यानें ज्यांच्या किंमती वाढल्या आहेत अगर वाढत आहेत, अशा वस्तूंचे उत्पादन करून फायदा मिळवतील. ज्यांनीं ठराविक व्याज घेण्याचें कबूल करून रकमा दिल्या असतील, त्यांना वाढत्या भावांचा फायदा घेतां येणार नाहीं. कारण त्यांची रक्कम परत मिळाली म्हणजे भाव वाढल्यामुळें, त्या रकमेची ऐपत कमी झालेली असणार, म्हणून त्यांचें नुकसान होणार. समजा, एक रु. ला आठ शेर ज्वारी असतांना मी शंभर रु. कर्जाऊ दिले व मी त्यांवर सहा टक्के व्याज घेण्याचें कबूल केलें. भाव कमीजास्त झाले तरी व्याजाचा दर बदलण्याचें ठरलेलें नव्हतें, तो कायम आहे. समजा, कांहीं दिवसांनीं भाव एक रुपयास चार शेर ज्वारी असा झाला व माझ्या कुळानें मला माझे शंभर रु. परत दिले. मी जेव्हां रक्कम कर्जाऊ दिली तेव्हां मला एक रुपयास आठ शेर ज्वारी मिळाली असती. आज मला शंभर रु. मिळाले, पण बाजारांत ते देऊन चारशे शेर ज्वारी मिळेल. माझें पन्नास टक्के नुकसान झालें; कारण पैशाची ऐपत—किंमत कमी झाली. भाव वाढूं लागले म्हणजे, सावकारास—धनकोस नुकसान येतें. साधारण शेअर्सचे भाग, नफा जास्त मिळतो म्हणून जास्त किंमतीस जाऊं लागतात, तर ठराविक दरानें व्याज मिळणारे रोखे यांची किंमत कमी होते. उद्योगधंद्यांत योजकांना, ज्या ठराविक खर्चाच्या बाबी असतील, त्यांवर प्रत्यक्ष पैसा जरी पूर्वींइतकाच द्यावा लागत असला तरी उत्पन्न वाढत असल्यामुळें तो बोजा कमी होतो. भाडें, विमा वगैरे कायम खर्चाच्या व ठराविक खर्चाच्या बाबींतील बोजा कमी होतो. तीच रक्कम देण्याकरितां त्यांना पूर्वींइतका माल विकावा लागत नाहीं, कारण भाव वाढलेले असतात. ज्यांचें उत्पन्न रकमेंत अगर पैशांत ठरलेलें असतें त्यांचें नुकसान होतें. जमिनदार जर कुळांकडून खंडाचे नक्त रुपये घेत असेल तर कुळाचा फायदा वाढत्या भावानें होईल, मालकाचें नुकसान होईल, कारण तेवढया रकमेंत त्याला पूर्वींइतक्या वस्तु मिळणार नाहींत. त्याचप्रमाणें घर-मालकांचेंहि नुकसान होईल. कारण त्यांना मिळणारें भाडें ठरलेलें असतें. तात्पर्य, या परिस्थितींत ज्यांचें उत्पन्न पैशांत ठरलेलें असतें, त्या सर्वांचें नुकसान होतें.

वाढत्या भावाचा परिणाम उत्पादनाच्या संघटनेचे स्वरूपावरहि होतो. पैशाचा पुरवठा वाढला म्हणजे योजक जास्त जास्त भांडवल साधनसामग्री निर्माण करणाऱ्या धंद्यांत घालतात, कारण उत्पादन वाढविण्याकरितां उत्पादनसामग्री व साधनें वाढविणें जरूर असतें. यंत्राचे कारखाने, इमारती वगैरेंत जास्त भांडवल होतें. चालू वस्तूंचे

उत्पादनापेक्षां या गोष्टींच्या उत्पादनावर पुढील आशेमुळें योजक जास्त खर्च करतात व त्याचा परिणाम उत्पादन जास्त जास्त भांडवलशाही स्वरूपाचें होतें; कारण जास्त प्रमाणांत भांडवल स्वरूपाच्या वस्तु त्यांत येत जातात. जास्त जास्त यंत्रें, तशाच इमारती व अन्य साधनसामग्री वाढत जाते. वाढत्या भावानें समाजांतील संघटनेवरहि परिणाम होतो. ज्यांचें उत्पन्न ठराविक आहे असे वर्ग वाईट स्थितींत येतात. त्यामुळें मजूर वर्गांत भर पडते. मागें सांगितल्याप्रमाणें समाजांतील विषमता वाढते, संपत्ती थोड्या लोकांचे हातांत जमूं लागते; व त्यापासून होणाऱ्या आपत्तींना समाजाला तोंड द्यावें लागतें. भयंकर प्रमाणांत भाव वाढले म्हणजे काय होतें याचें जर्मनी हें एक धडकी उत्पन्न करणारें उदाहरण आहे. युद्धोत्तर जर्मनींत वस्तूंचे भाव भयंकर वाढले. मध्यम वर्ग सर्व नाहींसा झाला. देश बेभान, ध्येयशून्य झाला; सर्व परंपरा ढांसळली, सर्वत्र निराशा पसरली व त्यांतूनच नाझी तत्त्वज्ञानाचा, राष्ट्रीय साम्यवादाचा उदय झाला.

वर पैशाची ऐपत कमी झाली, भाव वाढले म्हणजे काय परिणाम होतात हें पाहिलें; त्याच्या उलट परिस्थिति पैशाची ऐपत वाढली, भाव कमी झाले म्हणजे होते. उत्पादन कमी होतें, लोक रोकड स्वतःजवळ ठेवूं लागतात. बेकारी वाढते, मजुरी कमी होते, मजुरांना द्यावी लागणारी मजुरी त्यांच्या उत्पादनाच्या किंमतीपेक्षां जास्त होते. मालक उत्पादन कमी करूं लागतो. शेअर्सच्या किंमती कमी होतात, कारण नफा कमी होतो, नाहींसा होतो. उलट नक्की व्याज मिळतें म्हणून रोख्यांच्या किंमती वाढतात, ऋणकोचें नुकसान होतें. सावकार व धनको यांचा फायदा होतो. कारण पैशाची ऐपत वाढली म्हणून पैशांत ज्यांचा खंड अगर उत्पन्न येतें त्यांचा फायदा पण कुळाचें नुकसान, कारण रोकड उभी करण्यास त्याला जास्त माल विकावा लागतो, कारण भाव पडलेले असतात. कायम उत्पन्नवाले यांचा फायदा होतो. शेतकरी, मजूर, योजक या सर्वांचे नुकसान होतें आणि भाव मोठ्या प्रमाणांत पडले तर तें नुकसान पण मोठ्या प्रमाणांतच होणार हेंहि खरें. तात्पर्य, भाव मर्यादेंत कमीजास्त झाले तर ठीक, पण एकदम मोठ्या प्रमाणांत झाले तर त्याचे परिणाम अनेक दृष्टींनीं घातुक होतात. समाजांत अस्थिरता उत्पन्न होते. भावांची अशी चढउतार होऊं नये याकरितां जे उपाय योजिले गेले त्यांनीं अद्याप कांहीं हा रोग दूर झाला नाहीं. विनिमयाच्या व व्यवहाराच्या सोयीसाठीं समाजानें अस्तित्वांत आणलेला पैसा, हाच समाजांत युगानुयुग टिकणारीं दुःखें उत्पन्न करीत असतो. क्षणाक्षणाला गैरसोय होऊं नये म्हणून उपयोगांत आणलेला पैसा मधूनमधून नुसती

गैरसोयच उत्पन्न करतो असें नव्हे तर समाजाचें सर्व जीवन अस्थिर—बिनभरंवशाचें करतो. आधुनिक युगांत वस्तुवस्तूंची अदलाबदल कष्टाची, त्रासाची, अशक्य म्हणून विनिमयाचें साधन म्हणून पैसा जन्मास आला व सर्व उत्पादनाचें, सर्व मनुष्यांचें साध्य होऊन बसला; आपला हुकूम त्यानें आज सर्व जगावर बसविला. पैसा जेव्हां साध्य नाहीं असें होऊन साधन होईल अगदीं यथार्थपणें साधन होईल, त्या वेळेस आजचे अनेक न सुटणारे व्यवहारांतले प्रश्न सुटतील, व समाज, सर्व मानवसमाज, जास्त सुखी होईल.

पैशाच्या ऐपतींत—किंमतींत बदल झाला आणि मोठ्या प्रमाणावर झाला म्हणजे काय परिणाम होतात हें वर वर्णिलें आहे. आतां हे होणारे फरक कसे मोजतात हें पाहिलें पाहिजे. दोन आणे शेर ज्वारी आहे. म्हणजे १ रुपयास ८ शेर ज्वारी मिळते, याचा अर्थ एक रुपयाची किंमत ज्वारींत ८ शेर आहे. समजा ज्वारी चार आणे शेर झाली तर एक रुपयाची किंमत ज्वारींत ४ शेर होईल. याचें वर्णन दोन प्रकारांनीं करतां येईल. ज्वारीचा भाव दुप्पट झाला, १०० टक्के वाढला अगर रुपयाची किंमत ज्वारींत निम्मी झाली, ५० टक्के कमी झाली असें म्हणतां येईल. परंतु पैसा हें सर्व वस्तूंच्या किंमतीचें माप म्हणून, विनिमयाचें साधन म्हणून, समाजानें मान्य केलें आहे; म्हणून वस्तूंचे भाव पैशांत कमीजास्त झाले असें आपण म्हणतों; रुपयाची अगर पैशाची किंमत, बाजरींत, ज्वारींत अगर अन्य वस्तूंत कमीजास्त झाली असें म्हणत नाहीं. वस्तूंचे भाव, जे कमीजास्त होतील त्याप्रमाणें पैशाची किंमत कमी-जास्त होणार हें उघड आहे. मग वस्तूंचे भाव कमीजास्त किती झाले हें मोजावयाचे कसें हें पाहिलें पाहिजे.

व्यवहारांत हजारों वस्तूंची खरेदीविक्री होते. सर्व वस्तूंचे भाव कमीजास्त होत असतात; पण पैशाची ऐपत कशी बदलते हें मोजण्याकरितां प्रत्येक वस्तु निर-निराळी घेऊन चालणार नाहीं. सामान्यतः वस्तूंचें वर्गीकरण करून मोजणें, हें जास्त सयुक्तिक. खाण्याच्या वस्तु, चैनीच्या वस्तु वगैरे. खाण्याच्या वस्तूंचे भाव वाढले कां कमी झाले, हें काढावयाचें तर, या वर्गांतील प्रत्येक वस्तु घ्यावयाची व तिच्या भावांत अमुक वेळेपासून अमुक वेळेपर्यंत इतके टक्के फरक झाला हे काढावयाचे. उदा०, १९३५ चे जानेवारींत ज्वारी, बाजरी, गहूं, डाळी वगैरे यांचे भाव १ रुपयास काय होते ते काढावयाचे व नंतर १९४१ चे जानेवारींत या सर्व वस्तूंचे भाव काय होते ते पहावयाचे. प्रत्येक वस्तूंत कांहीं तरी वाढ अगर घट झाली असेल; त्या सर्वांची बेरीज करून त्या बेरजेस वस्तूंच्या संख्येनें भागावयाचें म्हणजे जो भागाकार येईल

त्याप्रमाणें या खाद्यवस्तूंत कांहीं तरी वाढ अगर घट झालेली असेल हें कळेल. समजा, १९३५ सालीं ज्वारी ८ शेर, बाजरी ६ शेर, गहूं ५ शेर, डाळी ७ शेर याप्रमाणें भाव होता. १९४१ चे जानेवारींत हा भाव ६ शेर, ५ शेर, ४ शेर, ५ शेर याप्रमाणें झाला. याचा अर्थ ३३$\frac{१}{३}$ टक्के वाढ ज्वारीचे भावांत, २० टक्के बाजरीचे भावांत, २५ टक्के गव्हाचे भावांत, ४७ टक्के डाळीचे भावांत, याप्रमाणें वाढ झाली. या सर्व वाढलेल्या भावांची बेरीज केली म्हणजे ९८$\frac{१}{३}$ टक्के होते. याला वस्तूंच्या संख्येनें म्हणजे ४ नें भागिलें म्हणजे २४$\frac{७}{१२}$ भागाकार येतो. म्हणजे खाण्याचें पदार्थांत २४$\frac{७}{१२}$ टक्के वाढ झाली. १९३५ चे भावांत या जिनसांचे बाबतींत सरासरीनें इतकी वाढ झाली असें म्हणतां येईल पण या पद्धतींत प्रत्येक वस्तु सारख्या महत्त्वाची धरली आहे. सर्व वस्तु सारख्या महत्त्वाच्या नसतात म्हणून त्या वर्गांतील प्रत्येक वस्तु सामान्यपणें कोणत्या प्रमाणांत घेतली जाते हें काढावयाचें व त्यांची किंमत अमुक वेळेची काढून पुनः त्याच प्रमाणाची दुसऱ्या वेळेची किंमत काढावयाची व त्यांतील होणाऱ्या फरकानें किती भाव कमीजास्त झाले हें काढावयाचें. समजा, मनुष्य १ शेर ज्वारी जेव्हां घेतो, तेव्हां १ शेर बाजरी, $\frac{१}{४}$ शेर गहूं, $\frac{१}{२}$ शेर डाळ घेतो असें मानलें तर, या प्रमाणांत या वस्तूंची किंमत १९३५ चे भावानें व १९४१ चे भावानें काढावयाची म्हणजे खाद्य पदार्थांचे भाव किती टक्के वाढलें हे समजेल. वस्तुवस्तूंत असणाऱ्या प्रमाणांत जें महत्त्व असेल त्या मानानें निरनिराळे परिणाम दिसून येतील. १ शेर ज्वारी घेणारा, गहूं घेतच नसला अगर डाळ आणखी कमी अगर जास्त घेत असला तर, त्याप्रमाणें फरक होतील. मुख्य गोष्ट सर्व वस्तु सारख्या महत्वाच्या नसतात म्हणून, त्यांना सारखें लेखणें बरोबर नाहीं. कोणाला किती महत्त्व द्यावयाचें हा अलाहिदा प्रश्न आहे. रहाणीच्या खर्चांत वाढ झाली अगर तो कमी झाला हें काढतांना कोणत्या वस्तु धरून रहाणीचा मेळ बसवावयाचा, व कोणत्या प्रमाणांत त्यांना महत्त्व द्यावयाचें हें ठरविणें फार महत्त्वाचें असतें. त्यावर पुढील सर्व गणित अवलंबून असतें.

भाव वाढले अगर कमी झालें हें कळण्याकरितां कांहींतरी एक प्रमाण कायम धरलें पाहिजे. १९३५ चे जानेवारीपेक्षां १९४१ चे जानेवारींत भाव वाढले. १९३३ चे जानेवारींत कदाचित् ते १९३५ चे जानेवारीपेक्षां कमी झालेले असतील; म्हणून कोणत्या तरी एका वेळेचे भाव हे तुलनेकरितां धरिले पाहिजेत. व त्यांना सूचक अंक (Index) म्हणून १०० असें कल्पिलें पाहिजे. ज्या वेळेस बाजारांत तेजी नाहीं, मंदी नाहीं, साधारणपणें भाव ठीक आहेत, असें वर्ष अगर महिना काढावयाचा व

त्या वेळेस जे पदार्थांचे भाव असतील ते १०० असें समजावयाचें, व त्या भावापेक्षां जास्त वाढले कीं तेवढे टक्के वाढला व कमी झाले कीं तेवढे टक्के भाव कमी झाला असें समजतात. समजा, १९३५ सालचे जानेवारींत जे भाव असतील, ते तुलनेकरितां घ्यावयाचे म्हणजे १९३५ चे जानेवारींत खाद्य पदार्थांचें भाव १०० असे धरलें पाहिजे.

| | भावाचा सूचक अंक |
|---|---|
| जानेवारी १९३५ | १०० |
| जानेवारी १९३६ | ११२ |
| जानेवारी १९३७ | १२१ |
| जानेवारी १९४१ | १२४ ७/१२ |

वरील सूचक अंक देतांना प्रत्येक वस्तूची वाढ घेऊन ती एकत्र करून तिला वस्तूंच्या संख्येनें भागिलें आहे. जर सर्व वस्तु सारख्या महत्वाच्या नसत्या तर, वस्तुवस्तूंचें प्रमाण ठरवून, त्यांचे मेळाची किंमत काढून, त्याचप्रमाणें भाव काढून, सूचक अंक काढतां येतील. मनुष्य बाजरी, ज्वारी, गहूं, डाळ कोणत्या प्रमाणांत घेतो, हें ठरवावयाचें व त्या मेळाची किंमत १९३५ सालची काढावयाची, तिला १०० सूचक अंक समजावयाचा, व पुढें दरसाल त्याच मेळाची किंमत काढून जी वाढ होईल अगर घट येईल ते सूचक अंक समजावयाचे. येथें लोक, कोणत्या प्रमाणांत एका वर्गांतील वस्तु उदा०, खाद्य पदार्थ उपयोगांत आणतात, यावरून महत्त्व ठरवून सूचक अंक निश्चित केले. कांहीं ठिकाणीं वस्तूंच्या उत्पादनाचें महत्त्व लक्षांत घेऊन मग भाव कमीजास्त झाले कीं नाहीं हें पाहतात.

| | ११ मार्च १९३६ किंमत | १० फेब्रुवारी १९३७ किंमत | १० मार्च १९३७ किंमत |
|---|---|---|---|
| पोलाद (सळ्या) | १० पौंड | १०·५ पौंड | १२ पौंड |
| तांबे | ४० ,, | ६१ ,, | ७७ ,, |
| शिसें | १९ ,, | २९ ,, | ३७·५ ,, |
| स्पेलटर | १६ ,, | २३ ,, | ३६ ,, |
| जस्त ( गोळे ) | २१५ ,, | २३७ ,, | ३०१ ,, |

वरील भाव प्रत्येक टनामागें त्या त्या तारखेस इंग्लंडमध्यें किती होते ते दिले आहेत. १०।२।३७ रोजीं यांतील प्रत्येक वस्तूंचे भाव ११।३।३६ पेक्षां किती वाढले यांची बेरीज करून त्याला ५ नें ( कारण ५ वस्तु आहेत ) भागिलें. तेव्हां ३३ टक्के

वाढ झाली असें दिसून येईल. त्याच रीतीनें १० मार्च १९३७ रोजीं ७५टक्के वाढ झालेली दिसून येईल. आपल्याला खालीलप्रमाणें सूचक अंक मांडतां येतील.

पोलाद, तांबें वगैरे धातूंच्या किंमतींचे सूचक अंक

| | अंक |
|---|---|
| ११।३।३६ | १०० |
| १०।२।३७ | १३३ |
| १०।३।३७ | १७५ |

परंतु हे सर्व ५ धातु सारख्या महत्त्वाचें नाहींत. त्यांचें उत्पादन लक्षांत घेतां सारख्या कष्टानें अगर सारख्या प्रमाणांत ते उत्पन्न होत नाहींत. १९३५ सालीं जगांत १४५००० टन जस्त तयार झालें. जस्ताच्या ७०० पट पोलाद तयार झालें, व जस्ताचे दसपट इतर ३ धातूंचें उत्पादनप्रमाण होतें. या दृष्टीनें वरील तिन्ही वेळीं १ टन जस्त, १० टन स्पेलटर, तांबें व शिसें व ७०० टन पोलाद, हा एक मेळ समजून त्याची किंमत काढून, त्यांच्यांत काय फरक होतात तें पाहिलें पाहिजे. ११ मार्च १९३६ मध्यें ७९६९ पौंड किंमत झाली. १० फेब्रुवारी १९३७ ला ८७१७ पौंड झाली. ९ टक्के वाढ झाली. १०।३।३७ ला १०२०६ पौंड झाली म्हणजे २८ टक्क्यानें वाढ झाली.

उत्पादनाचें महत्व लक्षांत घेऊन खालीलप्रमाणें भावांचे सूचक अंक मांडतां येतील.

| | |
|---|---|
| ११।३।३६ | १०० |
| १०।२।३७ | १०९ |
| १०।३।३७ | १२८ |

वस्तूंच्या उपयोगाला महत्त्व देऊन अगर त्यांच्या उत्पादनाला महत्त्व देऊन भावांचे सूचक अंक काढतात व त्यावरून भाव कमीजास्त झाले कीं कसें हें कळतें. पुष्कळ वेळां उत्पादनाचें साल निराळें धरून अगर निरनिराळ्या देशांतील लोकांच्या वस्तूंचे उपभोगाचें प्रमाण घेऊन निरनिराळ्या तऱ्हेनें हे सूचक अंक काढण्यांत येतात. सामान्यतः वस्तूंचें वर्गीकरण करून भावांचे सूचक अंक काढणें हें सर्वमान्य झालेलें आहे. कच्चा माल, सर्व प्रकारच्या धातु, खाण्याचे पदार्थ, यंत्रनिर्मित वस्तु, परदेशांत धाडले जाणारे पदार्थ, वस्तूंचे घाऊक भाव, किरकोळ विक्रीचे भाव, वगैरे अनेक प्रकारें वर्गीकरण करून भाव मोजण्यांत येतात. नुसत्या वस्तूंच्या किंमतींतील फरक मोजण्याकरितांच या सूचक पद्धतीचा उपयोग करतात असें नाहीं तर, ज्या

ज्या गोष्टी पैशानें विकत घेतां येतात, अगर ज्या ज्या गोष्टींच्या विनिमयाकरितां पैसा उपयोगांत आणला जातो, त्या सर्वांच्या बाबतींत भावांचे फेरबदल मोजण्याकरितां-सुद्धां, या पद्धतीचा उपयोग करतात. रोखे, शेअर्स, घरभाडें, मजुरी, वेतन या सर्व गोष्टींत होणारे भावांचे फरक पण या सर्व पद्धतींनीं मोजतां येतात. निरनिराळ्या प्रकारच्या मजुरांचे मजुरीचे दर एकत्र करून त्यावरून सर्वसामान्य मजुरीचे दर वाढले कीं काय, हें काढावयाचें त्याचप्रमाणें घरभाडें निरनिराळ्या वेळेचे व निरनिराळ्या व्यक्तींचें घेऊन त्यांचा वर्ग करून त्याप्रमाणें सूचक अंकाच्या पद्धतीनें घरभाडीं वाढलीं कीं काय हें काढावयाचें. संकेत म्हणून एक वर्ष अगर कोणता तरी काळ घ्यावयाचा, व त्या वेळेचे जे भाव अगर खर्च असतील त्यांना १०० सूचक अंक द्याव-याचा व या संकेत प्रमाणाच्या तुलनेनें निरनिराळ्या वेळचे भाव अगर खर्च वाढले कां कमी झाले हें पहावयाचें. एक एकर जमिनींत धान्य पिकविण्यास एका ठरलेल्या वेळीं किती खर्च लागतो तो काढावयाचा व त्यास मूळ प्रमाण म्हणावयाचें व नंतर त्याच्याशीं तुलना करून दरवेळीं एकरीं खर्च वाढला कां कमी झाला हें काढावयाचें; याच पद्धतीनें निरनिराळ्या ठिकाणच्या वस्तूंचे भाव एकमेकांशीं तुलना करून ठिक-ठिकाणची पैशाची किंमत अगर ऐपत मोजतां येते.

सर्व वस्तूंचे भाव कांहीं सारख्या प्रमाणांत वाढत नाहींत. वर्ग करून जरी भाव तपासले तरीसुद्धां निरनिराळ्या वर्गांत निरनिराळ्या प्रमाणांत भाव कमी—जास्त झालेले असतात. राहणीचा खर्च काढतांना अवश्य वस्तु कोणत्या, त्यांच्या किंमती धरून काढावयाचा. या राहणीचे खर्चाची वाढ सर्वसामान्य वस्तूंच्या भावांबरोबर कमीजास्त होईल. परदेशीं धाडण्यांत येणाऱ्या मालांचा भाव देशांत येणाऱ्या मालाच्या भावाबरोबर कमीजास्त होईल, कारण देशांत येणाऱ्या मालाच्या बदल्यांत सामान्यपणें परदेशांत माल धाडावयाचा असतो. म्हणून त्यांचे भाव एकमेकांशीं सामान्यत: प्रमाणांत रहाणें अगदीं सहज आहे. समाजांतील सर्व वस्तु, सर्व सोयी यांचा एकत्रित विचार करून भाव वाढले कां कमी झाले हें काढल्यानें पैशाची किंमत वा ऐपत किती कमी जास्त झाली, हें निरपेक्ष रीतीनें कळेल हें खरें. पण त्यापासून कांहीं उपयोग नाहीं; कारण प्रत्यक्ष व्यवहारांत निरनिराळ्या वस्तूंचे वर्ग पडत असतात, व त्यांच्यांतील भावांच्या फरकांचें महत्त्व विशेष आहे; कारण तें समजल्यापासून बाजाराला स्थिरता आणण्याचे दृष्टीनें प्रयत्न करणें सोपें जातें; निदान प्रयत्नाची दिशा निश्चित कळते. यंदा पुष्कळ पाऊस पडला, पण तेवढ्यानें एवढाच बोध होईल कीं, गेल्या वर्षीपेक्षां एकंदर जास्त पडला. पण कोठें पडला, किती पडला, केव्हां पडला, हें कळलें तर

कोठें पीक येईल, किती येईल हें समजून येईल. म्हणून निरनिराळ्या वस्तूंच्या वर्गांचे भाव सूचक अंक पद्धतीनें मोजणें हें जास्त फायद्याचें आहे.

हल्लींच्या काळांत सर्व गोष्टींच्या आंकड्यांचें महत्त्व विशेष आहे. पूर्वी गांवांची सुद्धां शिरगणती होत नसे, आतां सर्व जगांतील लोकांची होऊं लागली आहे. देशांत जमीन किती, भिजणारी किती, कोरडवाहू किती, नापिक किती यांचे आंकडे असणें अवश्य आहे. लोकसंख्या किती त्यांत स्त्रिया किती, पुरुष किती, लग्न झालेलें किती, मुलें किती, आयुर्मान काय? मृत्यूचें व जननाचें प्रमाण, निरनिराळ्या वयाचीं माणसें किती? ही सर्व माहिती गोळा करणें अवश्य आहे. देशांतील उत्पादन कोणत्या वस्तूंचें किती, हें समजलें पाहिजे. लोक कोणत्या वस्तु घेतात, वर्षभर वस्तूंचें भाव कसे राहातात, कोणत्या मोसमांत शेतकऱ्यांना पैसा लागतो, व्यापारी कोणत्या मोसमांत रकमा उचलतात, याहि गोष्टी कमी महत्त्वाच्या नाहींत. त्याचबरोबर बाजारांतील खरेदी-विक्रीचे आंकडे व भाव गोळा करणें हेंहि जरूर आहे. बहुतेक राष्ट्रांतून सर्व तऱ्हेची माहिती व आंकडे गोळा करून त्यांचें वर्गीकरण करून सूचक अंकपद्धतीनें झालेले फरक दाखविणारे तक्ते प्रसिद्ध करणें वगैरे कामें सरकार करीत असतें. सरकार कांहीं प्रत्येक वस्तूचे भाव गोळा करीत नाहीं. हिंदुस्थानांत तर मामलेदारानें वर्षांचे ठरलेल्या वेळीं चार व्यापाऱ्यांना बोलवावयाचें व त्याचें जवळून भाव घेऊन, भाव रजिस्टरें तयार करावयाची असा प्रकार आहे. वास्तविक हें काम अत्यंत महत्वाचें व जोखमीचें आहे. जहाजाचे मुख्याजवळ जसा नकाशा असणें जरूर आहे तसें राष्ट्रांतील सूत्रधारांजवळ उत्पादनविषयक सर्व माहिती असणें जरूर आहे. ही माहिती जेथें बाजार संघटित आहेत, तेथेंसुद्धां गोळा करणें सोपें नाहीं. मग जेथें हिंदुस्थाना-सारखी परिस्थिति आहे तेथें तर आणखी अवघड; तथापि ती गोळा करणें इष्ट व जरूर आहे.

माहिती मिळाली म्हणजे संपलें असें नाहीं. समजा, राहणीचा खर्च सर्व-सामान्यपणें काढावयाचा म्हणजे कोणत्या वस्तु घेतल्या पाहिजेत हें ठरविणें मोठें अवघड. ही राहणी कोणत्या मनुष्याची. मजुराची, कारकुनाची कां प्रतिष्ठित माणसाची हें ठरविलें पाहिजे. शिवाय मनुष्यांचे रहाणींत फरक पडतो. ३० वर्षांपूर्वी चहा ही कांहीं अवश्यक बाब नव्हती. आज मध्यमवर्ग व मजूर यांतसुद्धां चहा हीं अवश्यक वस्तु झालेली आहे. समाजाची अभिरुचि बदलत असते, त्याचाहि परिणाम राहणी-वर होतो. १९१४ सालची पुण्यांतील मध्यम वर्गाची राहणी व १९४२ मधील राहणी यांत किती तरी फरक पडला आहे. पोषाख, खाद्यपेय, शिक्षण, करमणुकी

या सर्व बाबतींत फरक झाला आहे. म्हणून १९१४ ची राहणी व १९४२ ची राहणी यांत तुलना करणें बरोबर नाहीं. समाजांत बदल होत असतात. एक बदल झाला म्हणजे दुसरा होईपर्यंत जो काळ जातो तेवढ्यापुरतें एक प्रमाण ठेवून तेवढ्या काळांतील फरक काढणें ज़ास्त सयुक्तिक ठरतें. साधारणपणें युद्धानंतर ४।५ वर्षांनीं एकंदर राहणींत फरक झाला तर त्या वेळची राहणी प्रमाण धरून मग पुढें होणाऱ्या फरकांची तुलना करणें योग्य होईल. त्याचप्रमाणें नवीन नवीन वस्तु समाजांत येत असतात, त्यांचा राहणीवर परिणाम होतो. स्वस्त दराचीं तिकिटें निघाल्यामुळें पुष्कळ लोक जास्त प्रवास करूं लागले. सिनेमागृहें निघालीं, फार लोक या करमणुकीचा उपयोग करूं लागले. बहुतेक मोठया शहरांजवळ नवीन नवीन उपनगरें झाली, चांगलीं घरें झालीं. तिकडे जास्त लोक राहूं लागले. मग राहणीचा विचार करतांना जुन्या शहरांतील घरभाडें धरून चालणार नाहीं. तात्पर्य, माहिती मिळाल्यानंतरसुद्धां सूचक अंक तयार करणें सोपें नाहीं. समाजांतील प्रत्येक बदल वस्तूंचे भावांचा सर्वसामान्य व सापेक्ष अभिरुचीचा, एकंदर जीवनाकडे पाहण्याचा वगैरे हे सर्व लक्षांत घेऊन राहणीच्या खर्चाचा तक्ता तयार करावा लागतो.

निरनिराळ्या बाबींतील सूचक अंक, फरक दाखविणारे अंक, तयार करणें हें काम अवघड आहे हें खरें; तथापि तें अत्यंत अवश्य आहे. तें केल्यानें नुसती पैशाची ऐपत, मूल्य यांत काय बदल झाला एवढेंच कळतें असें नव्हे तर कोणतें उत्पादन कोठें चाललें आहे, कोणत्या मार्गानें चाललें आहे याचा बोध होतो. हें ज्ञान ही समाजाची शक्ति आहे व या ज्ञानाच्या सहाय्यानेंच समाजाची प्रगति होते.

---

# २४. राष्ट्राराष्ट्रांतील व्यापार

आतांपर्यंत विचार करतांना एका राष्ट्रांतील व्यवहाराचा, उत्पादनाचा, चलनाचा विचार केला. सुरुवातीस सांगितल्याप्रमाणें आधुनिक जग हें अगदीं एका अर्थानें संकुचित आहे. देश एकमेकांपासून दूर दिसत असले तरी वाहतुकीच्या साधनांच्या प्रगतीमुळें तारा, बिनतारीसंदेश, नभोवाणी वगैरेंच्या शोधांमुळें ते सर्व अगदीं एका संघटनेंत आलेले आहेत. एका देशांतील घडामोडींचा परिणाम जगभर ताबडतोब कळतो व इतर देशांवरहि त्या घडामोडींचा परिणाम कांहीं ना कांहीं तरी होतोच. देशादेशांतील अंतर याचें महत्त्व कमी झालें आहे. थोड्या वेळांत या देशांतून त्या देशांत भांडवल नेतां येतें, अशी संघटना बँकांची झालेली आहे. शास्त्रीय शोध कोठेंहि लागोत, थोड्याच अवधींत ते जगाच्या मालकीचे होत जातात. नवीन कल्पना—नवीन प्रयोग कोठेंहि झाले तरी त्यांच्याकडे जगाचें लक्ष जातें. एका देशाचा अनुभव दुसऱ्याला मार्गदर्शक होतो. देशादेशांत नुसत्या वस्तूंचीच देवघेव होते असें नाहीं, तर ज्ञानाची, अनुभवाची देवघेव चालूच असते. एकवेळ वस्तूंचा व्यापार सरकार बंद करूं शकेल, अगर आयातनिर्यात कर बसवून त्याला आळा घालूं शकेल; पण ज्ञान व नवीन कल्पना यांना सरकार बंदी करूं शकत नाहीं. हवेप्रमाणें त्यांचा स्वैर-संचार असतो. बंदी केल्यास अगर आळा घालण्याचा प्रयत्न केल्यास, उलट परिणाम होऊन त्यांची गति वाढतेच. देशादेशांतील व्यापार कोणत्या पद्धतीनें होतात, त्यांत विनिमयाचें साधन कोणतें, कोणत्या कल्पनांना प्रमुख समजलें जातें वगैरे गोष्टी समजून घेणें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे.

चालू जगांत देशादेशांत व्यापार तर चालतोच, पण मजूरसुद्धां या देशांतून त्या देशांत जातात. त्याचप्रमाणें भांडवल हेंहि जेथें जास्त प्राप्ति होण्याचा संभव असेल, अगर जास्त सुरक्षितपणा असेल, त्या देशांत जातें. जगांत कमी अगर जास्त संपन्न देश असले तरी भांडवलशाही उत्पादनपद्धति जेथें जेथें आहे त्या त्या ठिकाणीं जे सर्व-सामान्य सिद्धांत आतांपर्यंत आपण पाहिले, ते लागू पडणारच. ठराविक मर्यादेपर्यंत

श्रमविभागणी करून उत्पादन वाढवितां येतें; ठराविक मर्यादेनंतर उत्पादन कमी होत जातें. मागणी व पुरवठा यांच्यांत भावानें मेळ बसतो. योजक कमाल नफा मिळविण्या-करितां प्रयत्न करतो. चढाओढीचें वातावरण असलें म्हणजे उत्पादनाचे प्रमाणाची किंमत त्याच्या परवडणाऱ्या खर्चाबरोबर होत जाते वगैरे सिद्धांत सर्व ठिकाणच्या भांडवलशाहींतील व्यवहाराला लागू पडणारे आहेत. हे सिद्धांत सर्वत्र लागू पडणारे असले तरी, सर्व जग अगदीं एक राष्ट्र नाहीं. जगांतील सर्व उत्पादन संपूर्णपणें एका संघटनेंत नाहीं. जगांतील सर्व भांडवलवाल्यांची प्रवृत्ति सारखी असली तरी त्या सर्वांचा अगदीं एकजीव होऊन त्यांची संपूर्ण संघटना झालेली नाहीं. राजकारणांतले हितविरोध, राष्ट्रीयवाद, इतिहासामुळें दृढ झालेले पूर्वग्रह, जातीजातींतील द्वेष वगैरे अनेक कारणांमुळें जगांतील उत्पादनाची एकमेव संघटना होऊं शकत नाहीं. मजूर, या देशांतून त्या देशांत जातात पण थोड्या प्रमाणावर. भाषाभेद, संस्कृतींतील फरक व शिवाय राजकीय अडचणी यामुळें मूळ देश सोडून दुसरीकडे मोठ्या प्रमाणावर जाणें शक्य होत नाहीं. बहुतेक देशांतील सरकारांनीं परदेशी लोकांना आपल्या देशांत कायम राहण्याची बंदी केलेली आहे. बहुतेक देशांतून भांडवल बाहेर जाऊं नये म्हणून कायदे केलेले आहेत. देशांतले देशांतसुद्धां मजुरीकरितां स्थानत्याग करण्यास सामान्यतः लोक नाखूष असतात. मग देशत्याग करण्यास किती तरी पटीनें नाखूष असणें, अगदीं स्वाभाविक आहे. लोकांप्रमाणें देशांतील सरकारसुद्धां आपले देशांतील भांडवल पर-देशांत जाऊं नये म्हणून दक्ष असतें. देशांतील माल बाहेर जाणें झाल्यास, किती जावा, परदेशांतील माल यावयाचा झाल्यास किती येऊं द्यावा, याहि बाबतींत सरकार दक्षता घेतें. जसें राष्ट्राचें धोरण असेल त्याप्रमाणें आयात–निर्यात मालावर बंदी अगर कर बसवून सरकार ठरलेलें धोरण अमलांत आणीत असतें. प्रत्येक देशांतील चलन निराळें, बँकांची परंपरा व व्यवहारांतील घडण निराळी; या परिस्थितींत एकंदर देशादेशांतील व्यापार कोणत्या तत्त्वावर चालतो हें पहाणें व समजून घेणें अत्यंत महत्त्वाचें आहे.

निरनिराळ्या सरकारांच्या अंमलाखालीं प्रदेश असले म्हणजे ते निरनिराळे देश असें समजणें सोईचें होईल. हिंदुस्थानांत ११ प्रांत आहेत, त्यांच्यांत व्यापारव्यवहार चालू आहेत; पण तो आंतरराष्ट्रीय व्यापार नव्हे. कारण हे सर्व प्रांत एका सरकारच्या अंमलाखालीं आहेत; एक धोरण सर्वांना लागू पडतें. १९०१ सालापूर्वीं आस्ट्रेलियांतील प्रांत स्वतंत्र होते. प्रत्येकाचें सरकार निराळें, व्यापारी धोरण निराळें! पण १९०१ सालीं आस्ट्रेलियांत संयुक्तघटना झाली, व सर्वांचें एक मध्यवर्ति सरकार झालें; सर्व प्रांत व्यापार व उद्यम यांत एका धोरणाखालीं आले, म्हणून आतां या

प्रांताप्रांतांतील व्यापार आंतरराष्ट्रीय व्यापार नव्हे. त्याचप्रमाणें अमेरिकेंतील निरनिराळ्या संस्थानांतील व्यापार आंतरराष्ट्रीय नव्हे. एका संस्थानांतून दुसऱ्या संस्थानांत माल नेला तर त्यावर कर बसविण्याचा अधिकार त्या संस्थानाला नाहीं. व्यापार व उदीम यांस सर्व संस्थानांत लागू होणारें एकच धोरण असतें; तें मध्यवर्ति अमेरिकन सरकार ठरवितें व अंमलांत आणतें. एकाच राष्ट्रांत या प्रांतांतून त्या प्रांतांत माल नेण्याआणण्यास बंदी नसते, कारण ते एका देशाचे भाग असतात. राष्ट्रांत ज्या प्रदेशांत जें उत्पादन कमी खर्चांत चांगल्या रीतीनें होऊं शकतें तेथें तें करण्याचा योजक प्रयत्न करीत असतात. निसर्गाच्या सोयी, वहातुकीच्या सोयी, कच्च्या मालाचा पुरवठा, स्वस्त दरानें मजुरांचा पुरवठा व मालाला मुबलक मागणी असणाऱ्या बाजाराचें सान्निध्य वगैरे गोष्टीमुळें कोठें काय उत्पादन होईल, कोठें कोणता धंदा काढावा, हें योजक—धंदेवाले—ठरवितात. देशांतील सर्वच प्रदेश सर्व तऱ्हेच्या उत्पादनाला सारख्या सोयीचे नसतात व त्यामुळें देशांतील निरनिराळ्या उद्योगधंद्यांची निरनिराळ्या ठिकाणीं स्थापना होते व वाढ होते. पुष्कळ पाऊस असेल तेथेंच भातशेती होईल, जेथें साधारण पाऊस असेल त्या ठिकाणीं इतर कांहीं धान्यें होतील. जमिनीच्या स्वरूपावरहि कोणतें धान्य पिकेल हें अवलंबून असतें. जमिनीच्या पाटांत सर्वच ठिकाणीं कोळसा अगर अशुद्ध लोखंड अगर इतर धातु निघतील असें नाहीं. तात्पर्य, हवापाणी, जमिनीचें स्वरूप वगैरे निसर्गाच्या सोयी अगर देणग्या, एका राष्ट्रांत, एका देशांतसुद्धां सर्वत्र सारख्या नसतात, मग जगांत तरी सर्वत्र सारख्या कशा असणार ?

निसर्गाच्या सोयी ज्याप्रमाणें सर्वत्र सारख्या नसतात, त्याप्रमाणें देशांतील सर्वच माणसें सारखीं कुशल नसतात. देशांतील कारागिरांमध्यें सुद्धां प्रती असतात. देशांतील लोकसंख्येवर कारागिरांचें प्रमाण अवलंबून असतें. जगांतील सर्व देशांची लोकसंख्या सारखी नाहीं. देशांतील लागवडीस लायक असणारी जमीन, प्रत्येक देशांत सारखी नाहीं किंवा तिचें प्रमाण लोकसंख्येशीं सारखें नाहीं; यामुळें कांहीं देशांत शेती जास्त तर कांहीं देशांत उद्योगधंदे जास्त. जसे कारागीर असतील, ज्या प्रमाणांत कारागीर असतील, त्याला अनुसरून आणि त्या प्रमाणावर देशांतील उद्योगधंदे स्थापिले जातात. जपानमध्यें जमीन थोडी पण त्यामानानें लोकसंख्या जास्त, त्याचा परिणाम, बाहेरून कापूस आणून कापड काढण्याचा धंदा वाढला; उलट आस्ट्रेलियांत लोंकरीचा धंदा वाढला, कारण लोंकरीकरितां मेंढ्या पाळण्याला मुबलक प्रदेश लागतो, तो तेथें पुष्कळ म्हणून तेथें साहजिकच लोंकरीचा धंदा वाढला.

जेथें एखादी उत्पादनसामग्री जास्त तयार होते अगर उत्पन्न होते, तेथें ती साहजिकच स्वस्त मिळते; व त्यामुळें ज्या वस्तु तयार करण्यास या सामग्रीचा बराच उपयोग होतो त्या वस्तु तेथेंच अगर जवळपास उत्पन्न करणें परवडतें, कमी खर्चाचें होतें. साखरेचा कारखाना उंसाचे शेतीजवळच काढणें योग्य ठरतें. त्याचप्रमाणें जेथे कोळसा मुबलक निघतो त्या ठिकाणच्या जवळपास लोखंडाचे कारखाने काढणें कमी खर्चाचें होतें. हीच दृष्टि प्रत्येक देशांतील उद्योग सूत्रधारांची असते.

देशभर अगर जगभर सर्व प्रदेश, सर्व जमीन सारखी नाहीं, अगर निसर्गाच्या अन्य सोयी सारख्या नाहींत ही गोष्ट मान्य करूनच धंद्यांची मांडणी राष्ट्रांत होत असते. किंबहुना लोकवस्तीसुद्धां याच नियमानें वसलेली असते. सोयीच्या व संरक्षणाच्या दृष्टीनें प्राचीन काळापासून लोक वस्ती करून राहूं लागले. नदीकांठीं पाण्याच्या सोयीनें शहरें व गांवें वसलेलीं आहेत. धंद्याच्या, व्यापाराच्या सोईनें कांहीं शहरें व गांवें वसलेलीं आहेत. एकदां वस्ती झाली, व्यापार सुरू झाला म्हणजे परंपरा उत्पन्न होते. त्या त्या शहरांत तो तो धंदा प्रमुख होऊं लागतो. त्या त्या धंद्याचें तें केंद्र होत जातें. येवल्याला पीतांबर होऊं लागले, नाशिकला भांडीं होऊं लागलीं, पुण्यास जरतारी माल होऊं लागला, याप्रमाणें अनेक उदाहरणें देतां येतील. एकदां वळण पडलें, पेठ तयार झाली कीं ती वाढत जाते, व त्या ठिकाणीं तोच माल उत्पादन करणें स्वस्त पडतें. कारागीर मुबलक, परंपरा हाताशीं व बाजारपेठ तयार, याप्रमाणें फायदे तसें करण्यांत असतात; अशाच कारणांनीं कारखाने विशिष्ट ठिकाणीं काढणें परवडतें. एकदां, एखादा धंदा एके ठिकाणीं सुरू झाला कीं त्याला अनुषंगिक असणाऱ्या गोष्टीहि तेथें जुळूं लागतात, कालांतरानें ती जागा त्या धंद्याचें प्रमुख केंद्रच होते. मुंबईस कापड काढण्याचा धंदा सुरू झाला त्या वेळेस कापसाचा पुरवठा होण्याला वाहतुकीच्या दृष्टीनें सोयीचें ठिकाण त्याचप्रमाणें तयार सूत व कापड हिंदुस्थानांत इतरत्र धाडण्याचे दृष्टीनें सोईचें ठिकाण, म्हणून सुरू झाला. मुंबईपेक्षां जास्त सोयीचीं ठिकाणें नव्हतीं असें नाहीं. पण गेल्या ७० वर्षांत कापडधंद्याचे दृष्टीनें मुंबई हें प्रमुख केंद्र झालें आहे. त्या धंद्यांत काम करणारे मजूर जरूर तर तेथें बेकार राहतील पण दुसरीकडे मजुरीकरितां जाण्यास खुषी नसतात. कपाशीचीं निपज होणाऱ्या क्षेत्रांचें व विक्रीच्या पेठांचें सान्निध्य, आणि मुबलक मजूरबळ ह्यामुळें अलीकडे इतर कांहीं शहरांचें कापडाच्या गिरण्यांचें क्षेत्र म्हणून असलेलें महत्त्व वाढत असतांहि मुंबई शहराचें गिरण्यांच्या बाबतींतील प्रामुख्य नष्ट झालेलें नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. त्याच दृष्टीनें इंग्लंडमध्यें कापूस

पिकत नसतांना सुद्धां कापडाचा धंदा जो एकदां सुरू झाला तो टिकून आहे. तेथील मजूर जास्त निष्णात व जास्त काम करतात आणि हाहि परंपरेचाच परिणाम होय. देशामध्यें निरनिराळ्या प्रदेशांत ज्या कारणांसाठीं निरनिराळे धंदे स्थापिले गेले, त्यांची मांडणी झाली, त्याच न्यायानें जगाच्या दृष्टीनें, कांहीं देशांत निसर्गाच्या सोयीमुळें विशिष्ट धंदे स्थापन झाले. कांहीं देशांत शेतीचें उत्पादन जास्त होत गेलें हें तरी सामान्यतः त्याच न्यायानें.

निसर्गाच्या सोयीप्रमाणें आणखीहि कांहीं गोष्टी विशिष्ट ठिकाणीं एखादा धंदा निघण्याला कारणीभूत होतात. लोकांची स्थिति जर खालावलेली असेल, तर ज्या उत्पादनाला खर्च फार येतो असें उत्पादन तेथें होणार नाहीं. जें उत्पादन केलें असतां लोकांच्यांत तें विकत घेण्याचें सामर्थ्य असेल तें तेथें करणें योग्य ठरेल. नाहींतर वस्तु स्वस्त तयार होते म्हणून तयार करावी पण तेथें गिऱ्हाईक नसावें व जेथें गिऱ्हाईक आहे तेथें नेऊन परवडणार नाहीं, इतका खर्च वाहतुकीचा यावयाचा. समजा, शहरापासून दूरच्या खेडेगांवीं दूध स्वस्त, सरपण स्वस्त, म्हणून मिठाई मोठ्या प्रमाणावर करणें सुरू केलें, तर तेथें अगर जवळपास कोण घेणार? बरें शहरांत आणावयाची तर तिचा जर वाहतुकीचा खर्च जास्त असेल तर कांहीं फायदा रहाणार नाहीं. म्हणून उत्पादन मागणीचे बाजाराजवळ, अगर जेथून वाहतुकीचा खर्च कमी पडेल अशा ठिकाणीं होणें योग्य असतें. याच दृष्टीनें बहुतेक राष्ट्रांत, विशेषतः बंदरानजीक उद्योगधंद्यांची वाढ झालेली दिसते. खुष्कीपेक्षां जलमार्गानें वाहतुकीचा खर्च कमी पडतो. ज्या धंद्यांतील निरनिराळा कच्चा माल निरनिराळ्या ठिकाणांहून आणावा लागतो तो धंदा वाहतुकीच्या दृष्टीनें मध्यवर्ति ठिकाणीं काढणें इष्ट असतें. उत्पादनसामग्री जी जास्त लागते ती जेथें मुबलक असेल तेथें त्या सामग्रीपासून होणारें उत्पादन काढणें फायद्याचें होतें. एक टन शुद्ध लोखंड तयार करण्याकरितां जर तीन टन अशुद्ध लोखंड व दीड टन कोळसा लागतो तर हा शुद्ध करण्याचा कारखाना जेथें अशुद्ध लोखंड सांपडतें त्याचे जवळपास काढणें ठीक आहे. याच दृष्टीनें इंग्लंड व फ्रान्समधील कारखाने निघालेले आहेत. हिंदुस्थानांत अशुद्ध लोखंड निरनिराळ्या प्रदेशांत सांपडतें. पण जेथें कोळसा मुबलक आहे अशाच ठिकाणीं हे कारखाने निघालेले आहेत; त्यामुळें कोळशाच्या वाहतुकीचा खर्च कमी होतो. कांहीं वेळां इतर गैरसोयी असल्या तरी देखरेख, एकहातीं कारभार वगैरे दृष्टींनीं एकाच ठिकाणीं तत्सम धंदे, सारखे धंदे अगर पूरक धंदे संकलित होतात. एकाच ठिकाणीं जिनिंग फॅक्टरी, नंतर सुताची गिरणी,

लागलीच तेथें कापड तयार करण्याची गिरणी काढणें फायदेशीर पडतें. कांहीं उत्पादनसंच अखंड असतात; म्हणजे कमी उत्पादन काढलें तरी ते कमी करतां येत नाहींत. एकच एंजिन एक डबा, तसेंच १० डबे ओढूं शकतें. एक डबा ओढणें झाल्यास १/१० एंजिन कांहीं उपयोगांत आणतां येत नाहीं, सर्व एंजिनच लावावें लागतें. याच न्यायानें कांहीं उत्पादनसंच अखंड असतात. विशेषतः मोठमोठीं यंत्रें तयार करण्याच्या कारखान्यांतील संच मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणारे उत्पादनसंच, हे जेथें असतील तेथेंच तें विशिष्ट उत्पादन करणें योग्य ठरेल; व उत्पादनखर्चहि कमी येईल. जेथें तसल्या उत्पादनसंचाला संपूर्ण काम देणें शक्य नाहीं तेथें ते बसविणें व कांहींतरी काम घेणें खर्चाचें होतें. या दृष्टीनें यंत्रें तयार करण्याचे कारखाने युरोपमध्यें कांहीं देशांत, व अमेरिकेंत विशेष फायद्याचे झालेले आहेत; कारण त्या त्या देशांत व जवळपास मागणी असल्यामुळें सामान्यतः त्यांना भरपूर काम मिळतें. एकदां एखादे ठिकाणीं धंदा सुरू झाला म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें परंपरा सुरू होते. अनुषंगिक गोष्टी तेथें जमूं लागतात व त्यामुळें तेथेंच तो धंदा वाढविणें जास्त फायद्याचें होतें. मुंबई—अहमदाबाद हीं उदाहरणें डोळ्यांसमोर ताबडतोब येतात. कापड गिरण्या निघाल्याबरोबर कापूस बाजार, शेअरबाजारहि आले. बँका आल्या, अवश्यक सर्व मेळ तयार झाला. कारागीर, मजूर, सर्व कांहीं तेथें केंद्रित झालें. क्षेत्र झालें कीं स्नानाला कुंड, संकल्पाला भटजी, पूजेला फुलें व दानासाठीं भिकारी हें अगदीं ठरलेलें दृश्य. त्याचप्रमाणें एखादे ठिकाणीं धंदा केंद्रित झाला म्हणजे अवश्यक कारागीर, कच्चा माल, भांडवल पुरविणारे, सर्व कांहीं तयार असतात व असल्या सोयीमुळें त्याच ठिकाणीं तो धंदा वाढतो.

जेथें जें उत्पादन योग्य व परवडेल, तेथें तें उभारण्याची व उत्पादनाची मांडणी झाली तर, खरोखर सर्वांचेंच हित आहे. एका देशांत सुद्धां सर्वांचें हित एक नसतें. मग जगांत सर्व मानव समाजांचें हित हें एक समजून, जगांतील सर्व उत्पादन त्याप्रमाणें आंखलें जाणें किती दुरापास्त आहे हें आज महायुद्ध चालू असतांना सांगण्याची अवश्यकता नाहीं. देशांतले देशांत चढाओढीमुळें—स्पर्धेमुळें जेथें उत्पादनाचा व माल पाठविण्याचा खर्च किमान येतो, तेथें तें उत्पादन केलें जातें. स्पर्धेमुळें किंमती वाढविणें शक्य नाहीं, म्हणून उत्पादनाचा खर्च जास्तींत जास्त कमी करण्याकडे प्रयत्न केले जातात व त्यामुळें गिऱ्हाइकांचा फायदा होतो. जगांत अनेक देश आहेत व त्याप्रमाणें त्यांवर सत्ता चालविणारीं निरनिराळीं सरकारें आहेत. प्रत्येक देशाचें चलन निराळें आहे. तथापि ज्या देशांत एखादी वस्तु उत्पादन करणें सर्वांत कमी खर्चाचें

असेल ती वस्तु ज्या देशांत ती उत्पादन करणें जास्त खर्चाचें आहे, त्यानें मागविणें केव्हांहि फायद्याचें आहे. समजा, 'अ' व 'ब' हे दोन देश आहेत. या देशांत दोन वस्तूंचा व्यापार होतो, पण मजूर अगर अन्य उत्पादनसामग्री एकीकडून दुसरीकडे जात नाहीं. 'अ' देशांत चहा तयार होतो पण रेशमी कापड होत नाहीं, 'ब' देशांत चहा तयार होत नाहीं. पण रेशमी कापड तयार होतें. दोन्ही देशांत चहा व रेशीम यांना गिऱ्हाईक आहे, मागणी आहे. या स्थितींत एकानें कांहीं चहा दुसऱ्यास देऊन दुसऱ्यानें त्या चहाबद्दल रेशीम दिल्यास दोघांचाहि फायदा आहे. हट्टानें 'अ' देश रेशीम करूं लागला तर त्याला खर्च भयंकर येईल. अगर 'ब' देश चहाची लागवड करूं म्हणेल तर त्याला तें अशक्य होईल अगर भयंकर महागाईचें होईल. अशा वेळीं चहा व रेशीम यांची देवघेव करणेंच योग्य. ज्या देशांत जी वस्तु तयार होतच नसेल ती दुसऱ्या देशांतून मागविणें हें तर जरूर आहे, पण ज्यावेळेस ती देशांत तयार करणें परदेशांहून आणण्याच्या खर्चाहून जास्त खर्चाचें असेल तेव्हांसुद्धां ती परदेशाहून मागविणें फायद्याचें आहे. हवा, पाऊस, पाणी, अन्य साधनांची विपुलता, यामुळें एका देशांत एखादी वस्तु थोड्या खर्चांत तयार होते, तर कांहीं वस्तु त्याच कारणांकरितां इतर देशांचे मानानें जास्त खर्चाच्या होतात. देशांत लागणारी प्रत्येक वस्तु संपूर्ण प्रमाणांत, वाटेल तितका खर्च झाला तरी तयार करावयाची ही दृष्टि नसेल तर, ज्या वस्तु स्वदेशांत कमी खर्चांत होतात त्या जास्त तयार करून परदेशीं धाडावयाच्या, व ज्या करण्यासाठीं देशांत जास्त खर्च येत असेल त्या परदेशांतून मागवावयाच्या हें धोरण स्वीकारणें हिताचें ठरतें. या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय व्यापार हीं फायद्याची बाब आहे. जें तत्त्व देशांत उत्पादनाची निरनिराळ्या ठिकाणीं वांटणी करण्यांत अनुसरलें जातें, त्याचाच अवलंब मोठ्या प्रमाणावर आंतरराष्ट्रीय, देशांतील व्यापारांत होतो.

देशादेशांतील व्यापार सर्व वस्तूंत होत नाहीं. कांहीं वस्तूंच्या उत्पादनाचा खर्च सामान्यतः सर्व देशांत सारखाच असतो. पण वाहतुकीचा खर्च कमीजास्त झाला तर त्याप्रमाणें व्यापाराला वळण लागतें. इंग्लंडचा कोळसा जर्मनींत, हॅम्बर्गला जातो व खुद्द सदर प्रांतांत कोळसा निघत असतांना वाहतुकीच्या खर्चामुळें तो हॅम्बर्गला घेणें परवडत नाहीं. कांहीं वस्तु सर्व देशांत खपल्या जातात व त्यांचा व्यापार सर्व देश-भर चालतो, त्यांच्या किंमतीहि, वाहतुकीचे खर्चांतील फरक सोडल्यास, सर्वत्र सारख्याच असतात. युरोप व अमेरिकेंतील देशांत गव्हाची किंमत सामान्यतः सारखीच राहते. चहा, कॉफी यांच्या किंमती त्याचप्रमाणें आढळून येतात. खुद्द

सीलोनमध्यें असणारा चहाचा भाव व अमेरिकेंत असणारा चहाचा भाव, यांत वाहतुकीचे खर्चापुरताच फरक असतो. वस्तु ज्या देशांतून परदेशीं धाडली जाते, त्या देशांत निदान वाहतुकीच्या खर्चापुरती तरी तिची किंमत कमी असल्याशिवाय ती परदेशीं जात नाहीं. देशांत किंमत कमी येते म्हणून परदेशीं विकावयाची हें उघड आहे. याचा अर्थ ती उत्पादन करण्यांत पैशाच्या दृष्टीनें खर्च कमी येतो असा नव्हे. त्याचप्रमाणें माल निर्यात करणाऱ्या देशांत, मजुरीचे दर कमी आहेत म्हणून उत्पादनखर्च कमी असाहि त्याचा अर्थ नाहीं. शेती मजुरांचा दर, अमेरिकेंत जास्त असून अमेरिकेचा गहूं इंग्लंडमध्यें जातो. खुद्द इंग्लंडमध्यें मजुरांचें वेतन जास्त असून तेथील तयार माल हिंदुस्थान व पूर्वेकडील राष्ट्रांत जेथें मजुरीचे दर पुष्कळ कमी आहेत तेथें जातो. मजुरीचे दर कमी असलेलीं राष्ट्रें, परदेशीं माल जास्त धाडतात असेंच केवळ होतें असा अनुभव नाहीं.

पैशाच्या दृष्टीनें तर, राष्ट्राराष्ट्रांत एकमेकांच्या देण्याघेण्याची बहुतेक वजावट होते. प्रत्यक्ष माल जरी कमीजास्त प्रमाणानें असला तरी किंमतींत, पैशांत, त्याचा फरक भरून निघतो व शेवटीं वजावट होते. हिंदुस्थानांतून कच्चा माल जातो व त्याच्या मोबदल्यांत पक्का माल—तयार माल, येतो. प्रमाणानें यांत फरक आहे, पण पक्क्या मालाची किंमत जास्त म्हणून पैशाच्या व्यवहारांत तोंडमिळवणी होते. शेतकऱ्यानें आठ शेर ज्वारी दिली व चार हातीं पंचा घेतला. प्रमाणांत पाहिलें तर ज्वारीची केवढी रास दिसेल; पण पैशांत दोहोंची किंमत एक रु. म्हणून तोंडमिळवणी झाली. राष्ट्राराष्ट्रांच्या व्यवहारांत हिशोब प्रमाणांत होत नाहींत, किंमतींत, पैशांत होतात; व त्यामुळें सालअखेर वजावट होते, तोंडमिळवणी होते. जास्त मजुरीचा दर असणारीं राष्ट्रें व कमी मजुरीचा दर असणारीं राष्ट्रें दोन्हीहि आपापला माल निर्यात करीत असतात. ज्या वस्तूची किंमत देशांत कमी येते ती वस्तु परदेशीं निर्यात होते. वस्तूची किंमत कमी येते याचा अर्थ ती त्या देशांत तयार करणें जास्त फायद्याचें असतें, जास्त सोयीचें असतें. तुलनेनें कमी श्रमांत, कमी साधनसामग्रीचा उपयोग करून ती तयार होते. ज्या वस्तु परदेशांतून मागविल्या जातात, त्या वस्तु देशांत तयार करणें तुलनेनें जास्त श्रमाचें, कमी सोयीचें, व जास्त साधनसामग्रीचा उपयोग केल्याशिवाय अशक्य, म्हणून मागविल्या जातात. कारण देशांत तयार केल्यास वर दर्शविलेल्या कारणांकरितां त्या जास्त किंमतीस पडतील. कमी किंमतीस पदार्थ विकला जातो याचा अर्थ उत्पादनाचें कामीं मजुरांचे श्रम जास्तींत जास्त कामास येतात, व जास्त किंमतीस विकला जातो याचा अर्थ, जास्तींत जास्त उत्पादन

मजुरांकडून परिणामकारक होईल अशा रीतीनें होत नाहीं. स्वस्त किंमतीस परवडणें म्हणजेच त्या वस्तूंचें उत्पादन तेथें सर्व दृष्टींनीं विशेष सोयीचें होणें.

जास्त मजुरीचे दरामुळेंच पदार्थांच्या किंमती वाढतात हें बरोबर नाहीं; अगर मजुरीचे दर कमी असल्यामुळें किंमती कमी होतात हेंहि बरोबर नाहीं. जेथें मजुरांच्या श्रमांचा, अन्य साधनसामग्रीच्या सहाय्यानें जास्तींत जास्त उत्पादनाचे कामीं उपयोग होतो तेथें भाव कमी असतात. मजुरी जास्त देऊन इंग्लंडमधील तयार माल हिंदुस्थानांत धाडला जातोच कीं नाहीं? मजुरीचा दर कमीजास्त या गोष्टीपेक्षां मजुरांच्या श्रमांचा परिणाम उत्पादनावर जो होतो त्यावर किंमत अवलंबून असते. जास्त मजुरी देऊन जर उत्पादन जास्त होत नसेल तर योजकाला किंमत वाढवावी लागते; कारण त्याशिवाय खर्च भागणार नाहीं. उलट, जास्त मजुरी देऊन खूप उत्पादन होत असेल तर योजक भाव कमी लावतील व तो माल परदेशीं निर्यात करतील; कारण या उत्पादनांत त्यांना जास्त सोय असते. उलट, ज्या धंद्यांत जास्त मजुरी देऊन त्या मानानें उत्पादन होत नाहीं, तेथें योजकाला तें जास्त किंमतीस विकावें लागतें. त्यामुळें ज्या देशांत हे विशिष्ट धंद्यांतील उत्पादन जास्त सोयीचें होत असेल तेथून तो माल येथें येईल व देशी मालाशीं चढाओढ करील व त्यामुळें देशी मालाच्या उत्पादनाला धक्का बसेल.

चीन, हिंदुस्थान व सामान्यतः पूर्वेकडील राष्ट्रें यांत मजुरीचें दर युरोप अमेरिकेंतील राष्ट्रांपेक्षां कितीतरी कमी आहेत. पण या राष्ट्रांतील मजुरांपासून जास्तींत जास्त उत्पादन, जितकें व्हावयास पाहिजे तितकें होत नाहीं, व त्यामुळें पुष्कळ तयार माल इतर राष्ट्रांतून येथें येतो. कारण त्या त्या राष्ट्रांत तो उत्पादन करणें मजुरीचे दर जास्त असतांनासुद्धां अधिक सोईचें असतें. कारण मजूर परिणामकारक रीतीनें उत्पादन करतात, त्यामुळें उत्पादन एकंदरीनें कमी खर्चाचें व जास्त सोयीचें होतें. हिंदुस्थानांतून पुष्कळ माल परदेशीं जातो. हा माल तयार करण्यांत मजूर जास्त निष्णात झाले असें नव्हे तर त्यांतले त्यांत हा माल हवापाणी व इतर साधनसामग्रीच्या दृष्टीनें तयार करणें जास्त सोयीचें पडतें. तुलनेनें इतर देशांपेक्षां, निदान ज्या देशांत हा माल जातो त्या देशांपेक्षां येथें तो उत्पादन करणें जास्त सोयीचें, व कमी खर्चाचें पडतें, इतकेंच विधान केल्यास योग्य होईल. तात्पर्य, जो माल तयार करणें जास्त सोयीचें व कमी खर्चाचें, तो माल सामान्यतः परदेशीं जातो व जो माल तयार करण्यांत तुलनेनें खर्च जास्त व सोय कमी तो माल परदेशांतून येतो.

एखाद्या देशांत विशिष्ट सोयी कां होतात याला अनेक कारणें असूं शकतील.

हवापाणी, निसर्गाच्या देणग्या, कारागिरांची परंपरा वगैरे कारणांचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. कांहीं देशांत, यांत्रिक सुधारणा लवकर झाल्या; इंग्लंडनें उद्योगधंद्यांचे वाढींत सर्वांत पुढें पाऊल टाकलें, व जी आघाडी मारली आहे त्याचा फायदा इंग्लंड अजून घेत आहे. कांहीं राष्ट्रांत शेतीची सुधारणा झपाट्यानें झाली. जमीन मुबलक, यंत्रांच्या सहाय्यानें शेती करण्यास वाव, वाहतुकीचीं साधनें स्वस्त व सोयीचीं, यामुळें त्या राष्ट्रांत शेतीचें उत्पादन करणें हें जास्त सोईचें होत गेलें. राजकीय संस्था, सामाजिक संस्था, जमीनधाऱ्याच्या पद्धति, या सर्व गोष्टींचा परिणाम, सोयी वाढविण्यांत अगर कमी करण्यांत होतो. अमेरिकेंत गहूं मोठ्या प्रमाणावर होतो, तो सर्वत्र जातो, व अमेरिकन जहाजें स्वस्त दरानें तो दूरदेशी नेतात. इंग्लंडमध्यें वर सांगितल्याप्रमाणें यंत्रयुग लवकर सुरू झालें. कारागिरांची परंपरा निर्माण झाली. आज इंग्लंडमध्यें कच्चा माल परदेशांतून आणून, पक्का माल तयार करून, परदेशी धाडणें हें चालू आहे, कारण यांत जास्त सोय आहे. सर्व तऱ्हेची यंत्रसामग्री व हुशार कारागीर यामुळें हें शक्य होतें. हें उत्पादन करणें तुलनेनें कमी खर्चाचें व जास्त सोयीचें, म्हणूनच तें होतें व त्यामुळें तें परदेशीं जातें. हजारों वर्षे चीनमध्यें चहाची लागवड सुरू आहे त्यामुळें चीन कितीतरी वर्षे चहाचे उत्पादनाचे बाबतींत मक्तेदार देश होता; आतां सीलोन, हिंदुस्थान याहि देशांत चहाचें उत्पादन करणें सोयीचें होऊं लागलें; त्याबरोबर चिनी चहाची मागणी कमी झाली. सीलोन, हिंदुस्थान या देशांत हवापाण्यामुळें व लागवडीस सोयीची जमीन असल्यामुळें, चहाची लागवड सुरू झाली, व आज हिंदुस्थानांतून हजारों टन चहा परदेशीं जातो.

जो माल कमी खर्चांत होतो व कमी किंमतीस विकला जातो तो माल सामान्यतः परदेशीं जातो. उत्पादनाचा खर्च कमी होत गेला कीं तो माल परदेशीं जास्त जास्त जाण्याचा संभव वाढतो. जरी मजुरीचे दरावरच वस्तूंची किंमत सर्वस्वीं अवलंबून नसली तरी जर एखाद्या उत्पादनाच्या कामीं विशिष्ट मजुरांचे दर प्रमाणाबाहेर कमी असले तर, साहजिक त्याचा परिणाम उत्पादनाचे खर्चावर होईल. व त्यामुळें कांहीं वेळां किंमतीहि कमी होतील. योजकाला, उत्पादनखर्च कमी झाला तर किंमत कमी घेणें परवडेल; व यामुळें हा माल परदेशीं धाडणें फायद्याचें होईल. अमेरिकेंत कांहीं भागांत निग्रोंना मजुरी कमी मिळते, व त्यामुळें अमेरिकेंतील कापूस परदेशीं धाडणें परवडतें. हिंदुस्थान, ईजिप्त याहि देशांत शेती मजुरीचे दर कमी त्यामुळें याहि देशांतील कापूस परदेशांत जातो; चहाचे मळ्यांतील मजुरीचे दरहि असेच कमी असल्यामुळें त्याचाहि परिणाम, उत्पादनखर्च कमी होण्यांत

होती, व मालकांना तो माल परदेशीं धाडणें जास्त फायद्याचें होतें. जपानमध्यें मजुरीचे दर पुष्कळच कमी आहेत. कांहीं धंद्यांत तर फारच कमी! खेळणीं व अन्य बारिक वस्तु, पायमोजे, वगैरे धंद्यांत फारच कमी. लोक कमी मजुरी घेऊन काम करतात, त्यांचा इलाज नाहीं, पण या सर्व वस्तु परदेशांत जातात. कारण परदेशांत विकणें हेंच त्या योजकांना, त्या धंदेवाल्यांना परवडतें. सहा आण्यांत रबरी बूट म्हणजे यांत मालाची किंमत किती व मजुरी किती हें एकटा शिंटोच जाणे!! तात्पर्य, जास्त मजुरी पण कार्यक्षम मजूर, जास्त उत्पादन करणारे मजूर, जें उत्पादन करतात तें तुलनेनें कमी खर्चाचें व जास्त सोयीचें, म्हणून परदेशीं जातें व नाममात्र मजुरीनें झालेलें उत्पादन अत्यंत कमी खर्चाचें म्हणूनहि मालकांना परदेशीं धाडणें परवडतें. तथापि, कमी मजुरीचे धंदे मर्यादित असले तर तें उत्पादन परदेशीं जाईल. देशभर मजुरीचे दर सारखेच कमी असतील तर त्याचा परिणाम देशांत येणाऱ्या व जाणाऱ्या मालावर होणार नाहीं. मजुरीचे दर कमी असले तर, तो देश स्वस्तांत माल तयार करून जगभर प्रलय करील अशी शंका कांहीं पुढारलेल्या देशांतील स्वार्थी लोक घेत असतात. उद्देश हा कीं, हिंदुस्थानसारख्या देशांत उद्योगधंदे वाढूं नयेत, कारण मग त्यांच्या मालाला पेठ राहणार नाहीं. कायद्यानें मजुरीचे दर वाढविण्यामागें मजुरांच्या हिताच्या काळजीपेक्षां स्वतःचें प्रस्तान व पकड मागसलेल्या, अर्थात् उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें, देशावर कशी राहील ही काळजी असते. मजुरांना न्याय मिळालाच पाहिजे, तथापि जितके उद्योगधंदे वाढतील त्यावरच हें अवलंबून आहे. तथापि येथें राजकीय अगर राष्ट्रीय दृष्टि न ठेवतां निव्वळ अर्थशास्त्राचे शास्त्रीय दृष्टीनें पाहिलें तरी, निव्वळ मजुरीचेच दर कमी असल्यामुळें माल परदेशीं जातो हें बरोबर नाहीं. देशादेशांतील व्यापार मजुरीच्या दरांबरहुकूमच कमीजास्त होतो हें खरें नाहीं.

समजा, जपान व अमेरिका यांच्यांत पूर्वी व्यापार नव्हता, तो एकदम सुरू झाला. जपानमध्यें मजुरी कमी म्हणून सर्व उत्पादन स्वस्त किंमतीचें; म्हणजे जपानमध्यें पैशाची किंमत, ऐपत जास्त; कारण भाव खूप स्वस्त. याचा परिणाम जपानमधून अमेरिकेंत माल जाईल व त्याबद्दल सोनें अगर अन्य धातूचा पैसा जपानला मिळेल. अमेरिकेचा माल जपानमध्यें या स्थितींत जाणें परवडणार नाहीं. जपानमध्यें या रीतीनें पैसा मुबलक झाला कीं त्याबरोबर जपानमध्यें पदार्थांच्या किंमती वाढतील व अमेरिकेंत कमी होतील, कारण तेथें रोकड कमी होऊं लागेल. कांहीं वेळानें जपानचा माल अमेरिकेंत वाढत्या किंमतीमुळें येणें परवडणार नाहीं. व त्यामुळें

अमेरिकेंतून पैसा जाणार नाहीं. पण या वेळेस दोन्ही देशांतील भाव सर्व सारखे असतील असें मात्र नाहीं; किंवा दोन्ही देशांतील मजुरीचे दर सारखे असतील असेंहि नाहीं. जपानमध्यें किंमती वाढूं लागतील त्या सर्वच वस्तूंच्या वाढतील असें नाहीं. कांहीं वस्तूंच्या किंमती, अमेरिकेंतल्या वस्तूंपेक्षां कमी असणें संभवनीय आहे. ज्या वस्तूंचें उत्पादन जपानमध्यें जास्त सोयीचें व कमी खर्चाचें, त्यांत मजूर जास्त उत्पादन करतात त्यामुळें कमी किंमत ठेवणें परवडतें. या धंद्यांत जपानी मजुरांना कमी मजुरी मिळत राहील व या कारणामुळें ह्या वस्तु परदेशीं धाडणें फायद्याचें होईल. एकंदरींत मजुरी व पदार्थांचे भाव वाढले तरी कांहीं वस्तूंचें उत्पादन हें जपानला जास्त सोयीचें व तुलनेनें कमी खर्चाचें पडेल व त्याच वस्तु परदेशीं विकणें परवडेल. उलट, अमेरिकेंत कांहीं वस्तूंच्या किंमती बदललेल्या परिस्थितींत जपानांतील वस्तूंच्या किंमतीपेक्षां कमी होतील, व याच कारणामुळें त्या वस्तु जपानमध्यें पाठविणें परवडेल. तात्पर्य, सर्वच वस्तूंच्या किंमती कोणत्याहि देशांत निरपेक्ष कमी होत नाहींत व मजुरीचे दर जरी कमी असले तरी, जास्त मजुरीचे दर असलेल्या देशांशीं व्यापार केल्यानें सर्वच वस्तु त्या देशांत पाठविणें परवडणार नाहीं. कारण व्यापारामुळें दोन्ही देशांतील पैशाची किंमत—ऐपत, अगर सर्वसामान्यपणें वस्तूंचे भाव सारखे होणें शक्य असतें. ज्या देशांत जी वस्तु उत्पादन करणें तुलनेनें कमी खर्चाचें व जास्त सोयीचें, ती वस्तु परदेशीं निर्यात होते; व जिचें उत्पादन जास्त खर्चाचें व कमी सोईचें ती वस्तु परदेशांतून आणली जाते.

वर सांगितल्याप्रमाणें जगांतील व्यवहार इतके साधे नाहींत. देशांदेशांतील व्यापार एकदम सुरू होत नाहीं; व्यापारीसंबंध गुंतागुंतीचे असतात, किंमतीचें मान जगभर सारखें असत नाहीं, देशांदेशांतील मजुरीचे दर सारखे नसतात, वस्तूंचे भावहि सारखे नसतात; तथापि, एका देशांत मजुरीचे दर कमी असले म्हणजे तो देश आपला सर्व माल परदेशीं धाडून प्रलय करील हेंहि शक्य नाहीं. वरील साध्या उदाहरणांत सुद्धां तें अशक्यप्राय दिसून आलें तर, प्रत्यक्ष व्यवहारांत तर जास्तच अशक्य आहे. तात्पर्य, तुलनेनें कमी खर्च व जास्त सोय ज्या वस्तूंच्या उत्पादनांत आहे त्या वस्तु सामान्यतः परदेशांत धाडल्या जातात.

वर सामान्यतः म्हटलें याचें कारण परदेशांत जाणारा सर्वच माल या नियमाला जुळेल असें नाहीं; पुष्कळ वेळां देशांत सोयीनें व कमी खर्चानें उत्पन्न होणारा माल परदेशांतून येतो व त्याचें कारण त्या देशांत सदरहू माल तयार करणें आधीपासून सुरू झालेलें असतें, त्यामुळें त्याच्या उत्पादनाची गति जास्त असते. निव्वळ सोयीचें

व कमी खर्चाचें उत्पादन जरी असलें तरी उत्पादनाच्या तयार होण्याचें प्रमाण हेंहि एक महत्त्वाचें कारण आहे. म्हणून ज्या उत्पादनांत नुसती सोय अगर कमी खर्च येतो येवढेंच नव्हे तर, ज्यांत उत्पादनाचें प्रमाणहि मोठें राहील, असें उत्पादन करणें देशाच्या दृष्टीनें जास्त फायदेशीर. ज्या श्रमांपासून जास्तींत जास्त फायदा मिळेल अशा रीतीनें श्रमांची योजना केली पाहिजे. मनुष्यसुद्धां याच नियमानें वागतो. मी सूत काढून मला लागणारें कापड काढतां येईल, माझें घर बांधतांना मला देखरेख करतां येईल, सकाळीं उठून घराची सफाई करतां येईल; पण या सर्व गोष्टींत जे श्रम व जो वेळ खर्च होईल त्यांपासून होणारी प्राप्ति, मी जर माझा धंदा केला तर, त्यांत जी प्राप्ति होईल त्यापेक्षां किती तरी कमी असणार!! या गोष्टी करणें मला सोयीचें आहे, खर्चाचें नाहीं, पण ज्यांना तें करणें अत्यंत सोयीचें व जे त्यांत तज्ज्ञ त्यांनीं तें करणें जास्त श्रेयस्कर. गवंडी जर विटा भिजवूं लागला व स्वतः जमिनीवरून वर पहाडावर नेऊन रचूं लागला, तर त्याच्या श्रमांपासून जास्तींत जास्त फायदा त्याला मिळणार नाहीं. उलट मजुरानें विटा आणल्या व गवंड्यानें रचना केली तर काम जास्त व श्रमाचें उत्पन्नहि जास्त. तो स्वावलंबन करीत नसेल; पण श्रमांची किंमत जास्त मिळवितो हें खरें!! याच न्यायानें देशाचे दृष्टीनें ज्या उत्पादनापासून जास्त प्राप्ति ते करणें योग्य ठरतें; किंबहुना देशाला तें करावें लागतें.

श्रमविभागणीचे तत्त्वावरच देशांदेशांतील व्यापार चालतो असें अनुमान वरील विवेचनावरून काढणें बरोबर नाहीं. पुष्कळ वेळां हवापाणी, देशाची रचना वगैरे कारणांमुळें कांहीं सोयी एखाद्या देशांतच असतात व त्यामुळें कांहीं वस्तु तेथेंच उत्पन्न होतील तर त्याच कारणामुळें कांहीं उत्पन्न होणार नाहींत. गोणपाटाचा ताग हिंदुस्थानांतच मुख्यत्वें उत्पन्न होतो. चहा, हिंदुस्थान, सीलोन, चीनमध्यें उत्पन्न होतो. जगांतील बहुतेक कॉफी ब्राझिलमध्यें तयार होते. ज्या वस्तूंचें उत्पादन याप्रमाणें न बदलतां येणाऱ्या व त्या देशाला विशिष्ट असणाऱ्या सोयींमुळें शक्य होतें, त्या वस्तूंच्या आंतरराष्ट्रीय व्यापारापासून सर्व राष्ट्रांना फायदा होतो. कारण जेथें एखादी वस्तु उत्पन्न होणें शक्य नाहीं पण तिची जरूर आहे ती परदेशांतून आणली पाहिजे. म्हणून परदेशांशीं व्यापार ही जरूरीची गोष्ट होते. तिच्या मोबदल्यांत कांहींतरी द्यावें लागतें व यामुळें दोन्ही देशांना जें हवें असेल तें मिळतें, दोघांनाही फायदा होतो. ज्या वस्तूंचें उत्पादन तुलनेनें कमी खर्चाचें व सोयीचें, त्यांचा व्यापार जोंपर्यंत तें उत्पादन जास्त सोयीचें असेल तोंपर्यंतच फायदेशीर होईल आणि या जास्त सोयीचें मुख्य कारण म्हणजे त्या देशांतील मजूर त्या वस्तूंचें जास्त परिणामकारक

रीतीनें उत्पादन करतात हें होय. या देशांतून मजूर त्या देशांत जात नाहींत तोंपर्यंत हा फायदा असणार हें उघड आहे. उद्यां हिंदुस्थानांत अमेरिकेचे अगर अन्य देशांचे यंत्र जाणणारे निष्णात कारागीर मोठ्या प्रमाणावर आले तर आज जो एवढा तयार माल परदेशांतून येतो तो येणार नाहीं. तसेंच मोठ्या प्रमाणावर निष्णात कारागिरांची संख्या येथें झाली व अवश्यक यंत्रें उपलब्ध झालीं तरी तोच परिणाम होईल; कारण मग सदरहू उत्पादन येथें जास्त सोयीचें होईल.

देशांत न होणाऱ्या वस्तु परदेशांतून येतात हें सरळ आहे; पण पुष्कळ वस्तु देशांत होतात व परदेशांतूनहि मागविल्या जातात. कारण कांहीं वस्तु देशांत करणें कमी खर्चाचें व सोयीचें असतें हें खरें, पण खर्चाची व सोयीची मर्यादा वाढवितां येत नाहीं. त्यामुळें विशिष्ट मर्यादेपलीकडे उत्पादन गेलें तर, उत्पादनखर्च प्रमाणामागें वाढतो; व कांहीं वेळां जास्त खर्च करूनसुद्धां उत्पादन पूर्वीइतकें प्रमाणामागें न येतां उतरत जातें. या परिस्थितींत ज्या देशांत ती वस्तु स्वस्त तयार होत असेल तेथून ती येते व ती घेणें अवश्य होतें. इंग्लंड, जर्मनी वगैरे राष्ट्रांना अमेरिकेचा गहूं मागविणें भाग पडतें. त्यांच्या देशांत मर्यादेपलीकडे गहूं पिकणें अगर योग्य खर्चांत पिकविणें शक्य होत नाहीं. देशांत जेवढें उत्पादन करणें खर्चाचे मानानें शक्य आहे तेवढें करावयाचें; किंबहुना तें करणें राष्ट्रीयदृष्ट्या अवश्य समजून त्या बाबतींत अवश्य तें संरक्षणसुद्धां द्यावयाचें व जरूर पडेल तेवढें परदेशांतून येऊं द्यावयाचें हें सर्व-सामान्य धोरण बहुतेक राष्ट्रांचें आहे. यंत्रानें तयार होणाऱ्या मालाचे बाबतींतहि तसेंच होतें. मर्यादेपलीकडे उत्पादन केलें तर फायदेशीर होत नाहीं व पुष्कळ वेळां शक्य नसतें. म्हणून जेवढें शक्य तेवढें राष्ट्रांत तयार करावयाचें, संरक्षण द्यावयाचें व बाकी परदेशांतून मागवावयाचें. हिंदुस्थानांत देशाला लागेल तेवढें कापड निघत नाहीं, त्यामुळें परदेशांतून येतें. परदेशांतून येणारे कापड आयात कर नसता तर येथें स्वस्त विकलें असतें. पण तो कर आहे म्हणून देशी मालालाहि किंमत मिळते. राष्ट्रां-तील उत्पादन संरक्षित होतें. गिऱ्हाईकांना कापड महाग होतें हें खरें, पण राष्ट्रांतील हा धंदा त्यानें सांवरून धरला, हें कांहीं खोटें नाहीं.

आंतरराष्ट्रीय व्यापार सर्वसामान्यतः कोणत्या दृष्टीनें चालतो व त्यापासून कसे फायदे होतात हें वर ठोकळ मानानें पाहिलें. होणाऱ्या फायद्याचें स्वरूप कसें असतें व हा फायदा राष्ट्राराष्ट्रांत कसा वांटला जातो हेहि प्रश्न महत्त्वाचे आहेत. एकाच देशांत निरनिराळ्या प्रदेशांत हवामान निरनिराळें असतें व त्यामुळें त्या त्या ठिकाणीं विशिष्ट तऱ्हेचें उत्पादन होतें. आसाममध्यें चहाची लागवड, कोंकणपट्टींत तांदूळ,

पंजाबमध्यें विशेषेंकरून गहूं. तथापि देश एक असल्यामुळें देशांत उत्पन्न होणारें सर्व पदार्थ देशांतले देशांत वाटेल तिकडे जाण्यास व त्यांची खरेदीविक्री होण्यास अडचण पडत नाहीं. अगर या प्रांतांतून त्या प्रांतांत गेल्यास त्यावर कर वगैरे बसत नाहींत. त्याचप्रमाणें एकाच देशांतील मजूर एकीकडून दुसरीकडे गेले तरी त्यांवर निर्बंध नाहीं; व सामान्यत: एकाच धंद्यांतील सारखें काम करणाऱ्या मजुरांची मजुरी त्या देशांत सर्वसामान्यतः सारखीच असते. देशांत कोठेंहि वस्तु तयार होत असली तरी तिची किंमत देशांत सामान्यतः सारखीच असते. देशांतील बाजार हा एका दृष्टीनें एकच व संघटित असतो म्हणून एखादे ठिकाणीं विशिष्ट सोयीमुळें एखादी वस्तु स्वस्त रीतीनें तयार झाली तरी त्याचा फायदा देशभर सर्वांना होतो. कोंकणांतील तांदूळ अगर पंजाबमधील गहूं त्या ठिकाणीं जास्त स्वस्त व अन्यत्र खूप महाग असें होत नाहीं. हा फायदा त्या देशांतील लोकांना होतो. पण जेथें अनेक देश आहेत तेथें निराळी परिस्थिति उत्पन्न होते. कांहीं देशांतील हवापाणी थंड तर कांहीं देशांतील उष्ण तर कांहीं देशांत समशीतोष्ण असे फरक आहेत. कांहीं देश उद्योगधंद्याचे दृष्टीनें पुढारलेले तर कांहीं मागसलेले आहेत, यामुळें सर्व देशांतून लोकांचें उत्पन्न सारखें नाहीं. चीन, हिंदुस्थान, जपान वगैरे देशांतील मजुरीचे दर युरोप व उत्तर अमेरिकेंतील राष्ट्रांतील दरांपेक्षां पुष्कळ कमी आहेत. युरोपमधील राष्ट्राराष्ट्रांतील मजुरीचे दरांतसुद्धां फरक आहे. यामुळें आंतरराष्ट्रीय व्यापाराचा फायदा सर्वांना सारखा मिळत नाहीं. विकल्या जाणाऱ्या वस्तु वाहतुकीचा खर्च सोडून दिल्यास जरी सामान्यतः सर्वत्र सारख्याच भावांत विकल्या गेल्या तरी, ज्या राष्ट्रांत लोकांचें उत्पन्न जास्त, मजुरीचे दर जास्त, त्यांना फायदा जास्त मिळतो. वस्तु स्वस्त व लोकांचें उत्पन्न जास्त, पैसा जास्त त्यामुळें त्या राष्ट्रांतील लोकांना फायदा साहजिक जास्त. समजा, इंग्लंड इटलींत कोळसा धाडतें व इटली त्याबद्दल फळें धाडतें. ज्या मानानें कोळशास मागणी असेल त्यावर, इंग्लंड किती कोळसा इटलींत धाडील हें अवलंबून राहील. इटलीमध्यें कोळशाचा भाव जो इंग्लंडमध्यें असेल त्यांत वाहतुकीचा खर्च मिळवून जो होईल तो राहील व त्या भावानें कांहीं तरी कोळसा इटलींत खपेल. त्याचप्रमाणें इंग्लंडमध्यें फळांचा भाव, जो इटलींत असेल त्यांत वाहतुकीचा खर्च मिळून जो होईल तो राहील; या भावांत कांहीं तरी फळें इंग्लंडमध्यें खपतील. कांहीं काळ याप्रमाणें चाललें तर या मालांच्या अदलाबदलीची तोंडामिळवणी पैशाचे दृष्टीनें होईल. कोळशाची किंमत जितकी येईल तितक्याच किंमतीचीं फळें इंग्लंडमध्यें येतील. पण ही गोष्ट प्रथमच या देशांत व्यापार सुरू झाला तर होईल. पण प्रत्यक्ष व्यवहार इतका साधा नसतो. अनेक वर्षें व्यापारी

संबंध चालत आलेले आहेत. त्यामुळें कांहीं वेळां या देशाचा माल जास्त जातो तर कांहीं वेळां त्या देशाचा माल जास्त जातो व पडलेला फरक रोकडीनें भरावा लागतो. समजा, इटली जास्त फळें धाडतें, त्यामुळें इंग्लंडला इटलींत कांहीं तरी रोकड धाडावी लागेल; याप्रमाणें सारखें होत गेलें तर त्याचा परिणाम, इटलींत पैसा जास्त होईल व किंमती वाढतील, लोकांजवळ पैसा जास्त होईल. याच्या उलट इंग्लंडमध्यें परिस्थिति होईल. त्यामुळें इंग्लंडमध्यें फळांना मागणी कमी होईल. पण इटलींत कोळशाची मागणी वाढेल; कारण कमी मजुरीमुळें इंग्लंड कमी किंमतींत कोळसा देऊं लागेल व कमी किंमतीमुळें इटलींत कोळशाला मागणी वाढेल, पण पुनः उलटा क्रम सुरू होईल, व शेवटीं दोन्हीं मालांची तोंडमिळवणी त्यांच्या किंमतींत होईल. म्हणजे जेवढी कोळशाची किंमत तेवढ्याच किंमतीचीं फळें धाडण्यांत येतील.

वर सांगितलेला मेळ केव्हां बसेल हे त्या त्या वस्तूंची मागणी कोणत्या स्वरूपाची आहे यावर अवलंबून राहील. जर मागणी लवचीक, किंमती बदलल्याबरोबर कमीजास्त होणारी असेल तर, हा मेळ लवकर बसेल. कारण किंमती जास्त झाल्या कीं मागणी आंकसली, कमी झाल्या तर वाढली असें होतें. उलट, जर मागणी सक्त असली, कांहीं भाव झाले तरी लोक ती वस्तु घेतील, त्यांना घेणें अवश्य आहे, असें असेल तर हा मेळ लवकर बसणार नाहीं. ज्या देशांत परदेशांतून येणाऱ्या वस्तूंची मागणी जास्त त्या देशांत किंमती कमी राहतील व लोकांचे उत्पन्न पैशांत कमी राहील. उलट, ज्या देशांतील वस्तूंना परदेशांत जास्त मागणी त्या देशांतील मजुरीचे दर त्या मानानें जास्त व लोकांचें पैशांत उत्पन्नहि जास्त. कारण परदेशीं जाणारा माल जास्त; व त्या बदल्यांत येणारा माल जाऊन फरकाबद्दल साहजिक रोकड येणार व त्यामुळें हा परिणाम घडून येतो. म्हणून जो देश परदेशांत जास्त माल धाडतो, ज्याच्या मालाला परदेशांत जास्त मागणी, पण परदेशांतून येणाऱ्या वस्तूंबद्दल, ज्यांत फारशी मागणी नाहीं त्या देशाला आंतरराष्ट्रीय व्यापारापासून जास्त फायदा होतो. उलट, ज्या देशांतील मालाला परदेशीं मागणी नाहीं, पण परदेशी मालाला जेथें जास्त मागणी आहे तो देश असल्या व्यापारांपासून फारसा फायदा मिळवूं शकत नाहीं.

ही जी गोष्ट घडून येते त्याला कारण अर्थात् जगांतल्या व्यापाराची जी एक निश्चित घडण अगर संघटना झाली आहे तेंच आहे. प्रत्येक देश आणलेल्या मालाबद्दल माल देऊन अगर रोकड देऊन बाकी चुकती करीत असतो. चुकती बाकी करावयाची म्हणजे रोकड पैसा पाहिजे. प्रत्येक देशाचें चलन निराळें व त्यामुळें ही चुकती बाकी करण्यांत आणखी अडचणी उत्पन्न होतात. प्रत्यक्ष रोकड अर्थात् नोटा

परदेशांत कोणी धाडीत नसल्यामुळें व प्रत्येक देश सोने परदेशीं धाडण्यास नाखूष असतो म्हणून वस्तूंची मागणी कमीजास्त करून आयात–निर्यात, आलेल्या व धाडलेल्या मालाच्या किंमतींत तोंड मिळवणी करावयाची असे प्रयत्न चालू असतात.

एखादे वेळीं मागणी वाढली कीं, कांहीं वेळ वर सांगितल्याप्रमाणें तोंडमिळवणी करणें कठीण होतें, मग रोकड देऊन ती करावी लागते. पण त्याचा परिणाम ज्या देशाला ती मिळते तेथें भाव वाढतात व जेथून जाते तेथें कमी होतात; व शेवटीं मागें सांगितल्याप्रमाणें आयात माल व निर्यात माल यांची किंमत सारखी होऊन मेळ बसतो. पण तो बसेपर्यंत ज्या राष्ट्रांत परदेशचा माल जास्त येतो त्याचा फायदा कमी व ज्या देशांतून माल जास्त जातो त्याचा फायदा जास्त. तसेंच एखादी वस्तु नवीनच निघाली व तिला मागणी वाढली कीं कांहीं काळ हाच परिणाम होतो व शेवटीं एकंदर आयात–निर्यात मालांचे मागणींत कमीजास्त होऊन त्यांच्यांत किंमतीचे दृष्टीनें मेळ बसतो. केरोसिन निघालें, मोटारी निघाल्या, तेव्हां ज्या देशांतून त्या परदेशांत गेल्या त्यांचा फायदा कांहीं दिवस वाढता होता. त्या देशांत पैसा वाढला, मजुरी वाढली, तथापि कांहीं काळानें आंतरराष्ट्रीय व्यापारांत जो मेळ बसावयाचा तो बसला.

येथपर्यंत देशादेशांत वस्तूंच्या व्यापाराबद्दल एकमेकांस द्यावें घ्यावें लागतें व तें होतांना कोणाचा फायदा होतो तें पाहिलें; पण कांहीं वेळां एका देशांतून दुसऱ्या देशांत मालाबद्दल नव्हे तर अन्य कारणाकरितां भरणा करावा लागतो. कर्ज घेतलें असल्यास त्याची फेड, राजकीय परिस्थितीमुळें द्यावे लागणारे खर्च, वाहतुकीचा खर्च वगैरे, हे ज्यांना द्यावे लागतात त्या राष्ट्रांची स्थिति वाईट असते. त्यांना आंतरराष्ट्रीय व्यापारापासून मग फारसा फायदा मिळत नाहीं. आयात–निर्यात व्यापारांतील हिशोब होऊन त्यांना हा भरणा करावा लागतो; व त्यामुळें त्यांना तो रोकडींत करावा लागतो. पैसा बाहेरदेशीं गेला म्हणजे देशांत भाव उतरतात, त्यामुळें परदेशीं आणखी माल जाऊं लागतो, पण त्याचा परिणाम आणखी भाव उतरण्यांत, मजुरी कमी होण्यांत, लोकांचें उत्पन्न कमी होण्यांत होतो; व त्यामुळें या व्यापारापासून कांहीं फायदा होत नाहीं. भरणा करणें अवश्य असल्यामुळें घेणारे आपल्या सोयीनें व आपल्या अटी घालून माल घेतात; व त्याचा परिणाम देशांत येणारा मालहि जास्त किंमतीस पडतो व देशांतील गिऱ्हाइकांची स्थिति वाईट होते. हिंदुस्थानाला १९३९ पूर्वी म्हणजे महायुद्धापूर्वी दरसाल सुमारें ४० कोटी रु. भरणा इंग्लंडकडे करावा लागे. याचा परिणाम या देशाचे व्यापारावर, उद्योगधंद्यांवर कसा

झाला हे विदित आहे. इंग्लंडच्या सावकारी पाशामुळें या देशाची उन्नति झपाट्यानें होऊं शकली नाहीं. आज इंग्लंड या देशाचे ऋणको झाले आहे व याहि स्थितींत या देशाचे औद्योगिक प्रगतीस इंग्लंडचा अडथळा कायम आहेच. याचे कारणहि उघड आहे.

आंतरराष्ट्रीय व्यापारांत मागणी वाढूं लागली म्हणजे तिचा परिणाम ताबडतोब होतो असें नाहीं. व्यवहार आणि व्यापार हे आधुनिक जगांत इतके विविध व गुंतागुंतीचे झाले आहेत कीं अमुक गोष्टीचा अमुक परिणाम निश्चित व त्याचें प्रमाण निश्चित झालें हें सांगणें कठीण असतें. तथापि दीर्घपल्ल्याच्या दृष्टीनें, व्यापक दृष्टीनें पाहिलें म्हणजे कोणत्या गोष्टीचे परिणाम काय होतात हें कळतें. क्षणैक किंवा तात्कालिक दृष्टि न ठेवतां दूर दृष्टीनें—कालखंडाच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे या गुंतागुंतींत कांहीं गोष्टी नियमानुसार होत असतात हें लक्षांत येते. मागणी वाढली म्हणजे जास्त आलेल्या मालाचे बदल्यांत जाणारा पैसा हळुहळू जात असतो व त्याचप्रमाणें किंमतीवर त्याचा परिणाम होत असतो. प्रयोगशाळेप्रमाणें व्यवहारांत प्रयोग करून पाहतां येत नाहींत. निरनिराळीं कारणें वेगळीं करतां घेत नाहींत. सारखे सारखे दिसणारे प्रयोग घ्यावयाचे त्या सर्वांत सामान्य असणारी परिस्थिति घ्यावयाची व त्यापासून एखादें अनुमान काढावयाचे व तें पुनः दुसरा प्रसंग आला तर ताडून पहावयाचें. या रीतीनें व्यवहारांतील—अर्थशास्त्रांतील सिद्धांत ठरविले जातात. पैसा परदेशीं जाऊं लागला म्हणजे ज्या देशांत तो जातो तेथें भाव वाढतात असे प्रसंग पुष्कळ दिसले कीं, अनुमान काढावयाचें व तें पुनः पडताळून पाहून जमलें तर तें अनुमान बरोबर. पैसा मुबलक झाला कीं भाव वाढतात. बँकांची पद्धत, पत, त्यांची शिल्लक या सर्वांचा विचार करून हा सिद्धांत ठरविला व लागलीच ज्या वेळीं कांहीं देशांत नोटांचा पुरवठा मुबलक झाला त्याबरोबर हा नियम योग्य आहे असें आपोआपच प्रत्ययास आलें. म्हणून परदेशीं रोकड गेली कीं तेथें भाव वाढतात म्हणून आयात—निर्यात मालाची तोंडमिळवणी त्यांचे किंमतींत करण्याचा प्रयत्न प्रत्येक राष्ट्र करीत असतें; व शक्य तितकी थोडी रोकड धाडण्यांत येते. यामुळें निरनिराळ्या देशांत निरनिराळे भाव असतात, व लोकांचें उत्पन्नहि सारखें नसतें. कारण भाव सारखे असलें तर रोकडींत मालाचे किंमतीचीं बाकी द्यावी लागेल म्हणून आयात—निर्यात मालाचे भावांत फरक राहतो, व त्यामुळें त्यांची किंमत सारखी करून वजावट करण्याचा प्रयत्न होतो. जेवढा माल आणला, त्याची जी किंमत होईल तितकी किंमत धाडलेल्या मालाची करावयाची म्हणजे रोकड धाडण्याचें कारण पडत नाहीं. हें करावयाचें

म्हणजे दोन्ही देशांत सारखे भाव व लोकांचें उत्पन्नहि सारखें राहत नाहीं. म्हणून ज्या देशांतून परदेशीं माल जास्त जातो व ज्यांत परदेशांतून माल कमी येतो त्या देशाला या व्यापारापासून जास्त फायदा होतो हें वर सांगितलें तें पुनः प्रत्ययास आलें.

आंतरराष्ट्रीय व्यापाराचा परिणाम सर्वसामान्यपणें वस्तूंच्या भावांवर व लोकांच्या पैशांतील उत्पन्नावर कसा होतो हें वर आलेंच आहे. देशांतून धाडलेल्या जास्त मालाबद्दल रोकड येऊं लागली म्हणजे त्यामुळें देशांतील वस्तूंचे भाव वाढतात, मजुरी वाढते, लोकांची प्राप्ति पैशांत वाढते, यामुळें एकंदर देशांतील उत्पादनावरहि परिणाम होतो. पण उत्पन्नाबरोबर किंमतीहि वाढल्या म्हणजे वस्तुतः कांहींच फरक होत नाहीं. पण परदेशांतून येणाऱ्या वस्तूंच्या किंमती वाढत नाहींत उलट कमी होतात. लोकांना जास्त पैसा मिळूं लागला म्हणजे ते परदेशांतून येणाऱ्या वस्तु जास्त घेऊं लागतात. उलट देशांतील वस्तूंचे भाव कमी होऊं लागले कीं, लोकांचें पैशाच्या दृष्टीनें उत्पन्न कमी होतें व परदेशांतून येणाऱ्या वस्तूंच्या किंमती कमी होत नाहींत, त्या वाढतात. गिऱ्हाइकांना त्या पूर्वींपेक्षां महाग पडूं लागतात. एखाद्या देशांत परदेशीं धाडलेल्या मालाबद्दल पुष्कळ पैसा येऊं लागला म्हणजे त्या देशांतील वट पैशाचा पुरवठा इतर देशांच्या मानानें वाढतो व त्यामुळें कमी पैसा असणाऱ्या देशाला परदेशीं माल धाडणें जास्त सोइस्कर पडतें. सर्व देशांत पैशाचा पुरवठा सारखाच होत गेला तर कोणालाच त्यापासून फायदा होणार नाहीं; पण जेव्हां एका देशांत दुसऱ्या देशापेक्षां पैसा जास्त होतो तेव्हां, त्याला कमी पैसा असणाऱ्या देशाशीं वागतांना जास्त ओढून धरतां येतें. आपला माल धाडतांना तो जास्त फायदेशीर रीतीनें पाठवूं शकतो. आपल्या मालाचे मोबदल्यांत तो कमी पैसा असणाऱ्या देशांतून जास्त माल घेऊं शकतो. कारण पैसा कमी असल्यामुळें तो देश आणलेल्या मालाची फेड करण्यासाठीं नाइलाजानें जास्त प्रमाणांत आपला माल घेऊन तसें करण्यास तयार होतो.

परदेशी व्यापारापासून फायदा व्हावयाचा म्हणजे परदेशांतून येणाऱ्या वस्तु स्वस्त मिळत असतील तर. जर त्यांवर आयात कर नसेल तर देशांतील लोकांना पैसा असल्यामुळें याचा फायदा घेतां येईल. आयात कर बसविला नसतांनासुद्धां जर ती वस्तु देशांत होऊं शकत नाहीं अशी स्थिति असेल तर परदेशी व्यापारापासून कांहींच फायदा नाहीं हें उघड आहे. कारण परदेशाशीं व्यापार होतो, देशादेशांत व्यापार होतो याचें मुख्य कारण जी वस्तु देशांत उत्पन्न केली असतां जास्त खर्च लागतो ती परदेशांतून मागविणें श्रेयस्कर; जर परदेशांतून येणारी वस्तु आयात कर बसवून

जास्त किंमतीची झाली तर परदेशी व्यापारांतील पायाच नाहींसा झाला असें होतें. पण परदेशी मालावर हें माहित असून कर कां बसविला जातो याचीं महत्त्वाचीं कारणें आहेत त्यांचा विचार पुढें करूं.

आंतरराष्ट्रीय व्यापारापासून होणारा फायदा दोन गोष्टींवर अवलंबून असतो. एक किती आयात मालाबरोबर किती निर्यात माल धाडला असतां किंमत सारखी राहील म्हणजे वस्तूंच्या विनिमयाच्या शर्ती व दुसरी कोणता माल तुलनेनें कमी खर्चांत व सोयीनें उत्पन्न करून परदेशीं धाडतां येईल ही. रशिया व अमेरिका या दोन्ही देशांत गहूं होतो दोन्ही देशांतील गव्हाला जगांत मागणी सारखीच आहे. तथापि अमेरिकेंतील गहूं कमी श्रमानें जास्त उत्पन्न होतो. त्या मानानें तुलनेनें रशियांत गव्हाचें उत्पादन करण्याकरितां जास्त श्रम करावे लागतात. पण अमेरिकेंत मजुरीचे दर जास्त व रशियांत कमी आहेत. रशियांतील मजुरीचे दर कमी असल्यामुळें तेथें परदेशांतून येणारा माल घ्यावयाचा तो महाग पडतो. एकच वस्तु अनेक देश जगाचे बाजारांत विकत असतील तर ज्या देशांत ती वस्तु तुलनेनें कमी श्रमानें तयार होते त्या देशाला या व्यापारापासून जास्त फायदा मिळतो. देशांतून जो माल परदेशीं धाडला जातो त्या धंद्यांतील परिस्थितीचा परिणाम देशांतील मजुरीवर व लोकांचे पैशाचे उत्पन्नावर होतो. ज्या धंद्यांतील उत्पादन सारखें बाहेर जात असतें, त्यामुळें त्या धंद्यांतील मजुरीचे दर कमीजास्त झाले कीं, चढाओढीमुळें सर्व धंद्यांतील मजुरीवर त्याचा परिणाम होतो. देशांतले देशांत ज्या वस्तु खपतात त्यांचा भाव, मजुरीचे दर, लोकांचें उत्पन्न जसें कमीजास्त होईल त्याप्रमाणें त्याची स्थिति राहील. ज्या वस्तु परदेशीं जातात त्यांच्या किंमतीहि मजुरीचे दर कमीजास्त झाल्यामुळें कमीजास्त होतात. पण ही सर्व मजुरी जगाच्या पेठेंतील त्या वस्तूंच्या किंमतींतून निघून येते. ज्या वस्तु परदेशांतून देशांत येतात त्यांच्या किंमती कांहीं देशांतील मजुरीचे दरावर अगर लोकांचे पैशाच्या उत्पन्नावर अगर पैशाच्या ऐपतीवर अवलंबून नसतात. त्यांच्या किंमती ज्या देशांत त्या उत्पन्न होतात, तेथील उत्पादनाच्या परिस्थितीवर अवलंबून असतात, म्हणून देशांतील वस्तूंचा भाव जास्त असतांनासुद्धां परदेशांतून येणाऱ्या वस्तु कमी किंमतीस मिळतात हा खरा फायदा असतो.

ज्या देशाची परिस्थिति आंतरराष्ट्रीय व्यापारांत सरस असते म्हणजे जो देश आपल्या वस्तु परदेशांत जास्त धाडतो व परदेशाच्या किती घ्यावयाचें हें त्याच्यावर अवलंबून असतें, त्या देशांत सर्व वस्तूंचे भाव त्या कारणानें वाढलेले असतातच असें नाहीं. देशांत तयार होणाऱ्या कांहीं वस्तु परदेशांत धाडल्या जातात कांहीं वस्तु

देशांतच खपतात. ज्या वस्तु परदेशांत जातात व तेथें खपतात, त्यांच्या किंमती जर आयात कर वगैरे नसेल, व विनिमयांत कांहीं अडचणी नसतील तर वाहतुकीचा वगैरे खर्च सोडून दिल्यास जगभर सर्व राष्ट्रांत सारख्याच होत जातात. पण ज्या वस्तु परदेशांत जात नाहींत व देशांतच खपतात त्या वस्तूंच्या किंमती देशागणिक निरनिराळ्या असूं शकतील. कारण स्पर्धा नाहीं त्यामुळें सर्वत्र सारख्या होण्याचें कारणच नाहीं. जगांतील वाहतुकीचीं साधनें पुष्कळ वाढलीं आहेत व दरहि कमी झालें आहेत तरीसुद्धां प्रत्येक देशांत उत्पन्न होऊन तेथेंच खपणाऱ्या वस्तूंची यादी कांहीं लहान नाहीं. कांहीं वस्तु इकडून तिकडे नेणें अवघड असल्यानें फायद्याचें नसतें. इमारतीचे दगड, विटा या कांहीं परदेशांतून मागवीत नाहींत. कांहीं गोष्टी संवयी व परंपरेमुळें देशांतीलच घेतल्या जातात. कांहीं आपणांस पाहिजे त्या स्वरूपाच्या देशांतच किंबहुना गांवांत करून घेणें सोयीचें. कांहीं वस्तूंची गरज तावडतोबीची असते, तेव्हां ती वस्तु तेथील असणेंच क्रमप्राप्त होतें. डॉक्टर, वकील वगैरे कोणीं परदेशांतून मागवीत नाहीं. तथापि कोणकोणत्या वस्तु बाहेर देशांतून येऊं लागतील हें त्या त्या वस्तु उत्पादन करून परदेशांत पाठवणें परवडतें कीं नाहीं, यावर अवलंबून राहील. परदेशांतून हिंदुस्थानांत टेबल, खुर्च्या सुद्धां येऊं लागल्या ! अनेक गोष्टी ज्या हिंदुस्थानांत होत होत्या त्या येऊं लागल्या याचें कारण, त्या वस्तु माल धाडणाऱ्या देशांत कमी श्रमानें तयार होऊं लागल्या व येथें हिंदुस्थानांत त्या मानानें त्या तयार करण्यास जास्त श्रम पडूं लागले, जास्त खर्च पडूं लागला. म्हणून जी वस्तु देशांतले देशांत खपते ती करण्यांत देशाबाहेर जाणाऱ्या वस्तूपेक्षां जर जास्त श्रम पडूं लागले तर तिची किंमत वाढेल; जर तितकेच श्रम करावे लागत असतील म्हणजे तुलनेनें तितकाच खर्च येत असेल तर तिची किंमत कमी राहील.

आतांपर्यंत आंतरराष्ट्रीय व्यापारासंबंधीं विवेचन केलें; त्यांत उत्पादन साधनसामग्री या देशांतून त्या देशांत जात नाहीं असें गृहीत धरूनच केले आहे. आधुनिक जगांत भांडवल व मजूर कांहीं ना कांहीं प्रमाणांत देशांतर करीत असतात. जगांत जर राजकीय प्रतिबंध, चलनाच्या अडचणी नसत्या तर जेथें जास्त मजुरी मिळेल तेथें मजूर गेले असते व अखेरीस सर्वत्र मजुरीचे दर सारखे झाले असते. याचा अर्थ सर्व मजुरांना सारखें वेतन मिळालें असतें असें नव्हे तर, सारख्या हुशार कारागिरांना सारखा पगार मिळाला असता. वेतन अमुक देशांत जास्त असें न होतां अमुक लायकीमुळें, अमुक गुणांमुळें जास्त असें झालें असतें. तसेंच जर भांडवलाला इकडून तिकडे जाण्यास, देशांतर करण्यास कोठलीहि अडचण नसती तर सर्वत्र व्याजाचा

दर सारखाच राहिला असता. जर फरक असेल तर तो देशामुळें नव्हे तर कर्ज देण्यांत धोका असेल त्या मानानें. त्याचप्रमाणें भांडवल सर्वत्र मुक्तपणें गेलें तर मजुरीचे दर जे आज निरनिराळ्या देशांत विषम दिसतात तें कमी विषम होतील व पुष्कळच सारखे होऊं लागतील. जेथें मजुरीचे दर कमी तेथें भांडवल जास्त जाईल व शेवटीं तेथील दरहि वाढतील व जेथून भांडवल जाईल तेथें दर कमी होतील ! पण जोंपर्यंत मजूर व भांडवल मुक्तपणें संचार करूं शकत नाहीं तोंपर्यंत नको तेथें भांडवल व मजूर जास्त व जेथें पाहिजे तेथें कमी याप्रमाणें होणार हें उघड आहे.

जमीन, हवापाणी वगैरे गोष्टी इकडून तिकडे तिकडे नेतां येत नाहींत; व मजूर व भांडवल ज्या नेतां येण्यासारख्या आहेत त्यांवर अनेक निर्बंध आहेत. म्हणूनच आंतरराष्ट्रीय व्यापारांत फायदा आहे. जर वरील सर्व गोष्टी, वाटेल तिकडे नेतां येत असत्या तर जेथें जें पाहिजे तें उत्पादन करतां येईल व मग आंतरराष्ट्रीय व्यापार राहणारच नाहीं. निसर्गाच्या सोयी कांहीं बदलतां येत नाहींत, हालवितां येत नाहींत म्हणून जरी मजूर व भांडवल हे मोकळेपणानें इकडून तिकडे संचार करूं लागले तरी कांहीं आंतरराष्ट्रीय व्यापार राहणारच. जेथें खाणी आहेत ते देश खनिज पदार्थ, कोळसा, अशुद्ध लोखंड वगैरे माल परदेशीं धाडतील. ज्या देशांत हवापाण्यामुळें विशिष्ट धान्यें होतात ते तीं परदेशीं धाडतील. हे फायदे कांहीं वाटेल तितके मजूर व भांडवल वाटेल तेथें गेलें तरी नाहींसे होणार नाहींत.

जगांत प्रत्यक्ष अनुभव असा आहे कीं एका वर्षांत हजारांत एक मजूरसुद्धां एक देश सोडून दुसरीकडे जात नाहीं. भाडें खर्च, राजकीय बंधनें, देशत्याग करण्याची इच्छा नसणें वगैरे कारणांमुळें मजूर या देशांतून त्या देशांत म्हणण्यासारखे जातच नाहींत. पूर्वेकडील देशांत लोकसंख्या उत्पादनाच्या साधनसामग्रीच्या मानानें आधींच जास्त आहे. तेव्हां या देशांत दुसरीकडून मजूर येतच नाहींत. अमेरिकेंत १९२० सालपर्यंत यूरोपमधून मजूर जात होते; पण तेथेंहि आतां परदेशी मजुरांवर अनेक तऱ्हेचे निर्बंध घातले आहेत. वास्तविक अमेरिकेंतील प्रदेश तसेंच आस्ट्रेलियांतील प्रदेश यांचा व्याप, विस्तार व उत्पादनशक्ति लक्षांत घेतां या राष्ट्रांतून लोकसंख्या त्यामानानें कमी आहे. पण परदेशांतून मजूर आले तर, सर्वत्र मजुरीचे दर कमी होतील या दुसऱ्या कारणासाठीं या देशांत परदेशांतून रहाण्यासाठीं येणाऱ्यांना आतां जवळ जवळ मज्जाव आहे. मजूर जेथें जास्त मजुरी मिळते त्या देशांत जाऊं लागले तर दोन्हीं देशांतील मजुरीचे दर सारखे होण्याकडे त्याचा परिणाम होईल हें उघड आहे. मागील १५० वर्षांत निरनिराळ्या वसाहतींत मजूर यूरोप व अन्य देशांतून गेले

त्याबरोबर भांडवलहि गेलें; त्यामुळें या नवीन वसाहतींत उत्पादन जास्त होऊं लागलें व कच्चा माल तयार करण्याची पेठच येथें उत्पन्न झाली. हा कच्चा माल यूरोपमध्यें जाऊं लागला व त्यामुळें तेथील तयार मालाचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर वाढलें, व यामुळें तयार माल करणाऱ्या राष्ट्रांना या व्यापारापासून सारखा फायदा होत गेला. आंतरराष्ट्रीय व्यापारांत ते सरस राहिले, वसाहतींना मात्र आर्थिक गुलामगिरी आली, त्यांची पिळवणूक सुरू झाली. पूर्वी जितकें भांडवल परदेशांत जात असे, तितकें आतां जात नाहीं. कित्येक देश परदेशांतून भांडवल घेऊन आपले उद्योगधंदे वाढवीत असतात. मागसलेलेच देश परदेशांतून भांडवल घेतात असें नव्हे तर राजकीय व अन्य परिस्थितींमुळें पुढारलेले देशसुद्धां परकीय भांडवल घेऊन आपल्या उद्योग-धंद्यांची पुनर्रचना करतात. नवे देश वसाहतीमध्यें भांडवल द्यावयाचें म्हणजे भांडवल देणाऱ्या देशांतील परदेशीं जाणाऱ्या मालाला उत्तेजन मिळतें; कारण भांडवल म्हणजे साधनसामग्री रूपानेंच जात असतें व त्यामुळें त्या देशाचा निर्यात व्यापार जास्त जास्त वाढतो. अमेरिका व इंग्लंडनें जर्मनीला कर्ज दिलें, भांडवल दिलें, त्यामुळें जर्मनीनें आपले उद्योगधंदे सांवरून घेतले. तथापि जगांत निरनिराळे देश असल्यामुळें भांडवल वाटेल तेथें मुक्तपणे जाऊं शकत नाहीं. निरनिराळ्या देशांतील राजकीय परिस्थितीमुळें पूर्वीइतकें भांडवल देशांतर करीत नाहीं. त्याचप्रमाणें पुष्कळ राष्ट्रांतून, भांडवलाला परदेशीं नेण्यास बंदी आहे. परदेशी भांडवल घेऊन व्यापार व उद्योग-धंदे वाढवावयाचे अगर परकी भांडवलदारांना देशांत सवलती देऊन देशाचें औद्योगी-करण करून घ्यावयाचें हेंहि यापुढें फारसें शक्य नाहीं. या धोरणाचे परिणाम राज-कीय गुलामगिरींत कसे होतात याचें चित्र जगापुढें असल्यामुळें परकीय भांडवल न घेण्याकडे राष्ट्रांची प्रवृत्ति वाढू लागली आहे. परदेशी भांडवल घ्यावयाचें म्हणजे नुसतें कर्ज घ्यावयाचें इतकें सोपें नसतें. भांडवलदार तारण अगर नियंत्रण मागत असतात, राजकारणांत स्थान मागत असतात व तें दिलें म्हणजे त्याचा दुरुपयोग होत असतो. तत्त्वतः परकीय भांडवल घेण्यास कांहीं हरकत नाहीं. देशांत कर्ज काढून उद्योग उभारतात तेंच कर्ज परदेशांत काढावयाचें व योग्य व्याजाच्या दरानें मिळत असेल तर तें घ्यावयाचें. पण कर्जाबरोबर उद्योगधंद्यावर नियंत्रण, अगर अन्य सवलती देऊन तें काढणें अखेरीस हितावह ठरत नाहीं, हा अनुभव विसरून चालणार नाहीं. हिंदुस्थानांत इंग्रजांचें १२०० कोटी रुपयावर भांडवल गुंतलें आहे व राजकीय वर्चस्वाचा फायदा घेऊन नवीन धंदे इंग्रज भांडवलवाले येथें सुरू करूं लागले आहेत. त्याचा परिणाम त्यांचा राजकीय अंमल दृढ करण्याकडे होत आहे. परकीय भांडवलानें

सर्व देश अजगरानें जसें एखाद्या सावजाला वेढून टाकावें त्याप्रमाणें गुंडाळला आहे; एवढी किंमत देऊन हिंदुस्थानांतील उद्योगधंदे वाढावेत असें कोणी म्हणणार नाहीं. परकी भांडवल अमृताप्रमाणें विषहि होतें याचें हा देश हें एक उदाहरण आहे. तथापि जगाचे दृष्टीनें विचार केला असतां पूर्वीइतकें भांडवल या देशांतून त्या देशांत जात नाहीं, व जेव्हां जातें तेव्हां धाडणाऱ्या देशाचा निर्यात व्यापार वाढतो व घेणारा देश जर स्वतंत्र असेल व योग्य रीतीनें त्याचा उपयोग करीत असेल तर त्या देशांतील उद्योगधंद्याला चालना मिळून अखेरीस आंतरराष्ट्रीय व्यापारांतहि वाढ होते.

---

# २५. परराष्ट्रीय हुंडणावळ

राष्ट्राराष्ट्रांतील व्यापारासंबंधीं सर्वसामान्य विवेचन मागील भागांत केलें. देशांतील व्यापाराची जशी सर्वसामान्य संघटना असते, तसेंच स्वरूप आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या संघटनेचें असतें. देशांतील व्यापाराला जशी पेढ्या, बँका व पैशाच्या व्यवहाराची मदत लागते, त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय व्यापारांतहि पैसा, बँका, पत वगैरे सर्वांचें महत्त्व आहे; किंबहुना त्यांच्याच सहाय्यानें तें सुलभ होतें असें म्हटलें तरी चालेल. देशांत वस्तु ज्याप्रमाणें विकण्याकरितां तयार होतात, आणि (तेवढ्याच वस्तूंचा विचार आपणास करावयाचा आहे) त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय व्यापारांत वस्तु या विक्रीकरितांच आहेत, व ही विक्री पण पैशाच्याच सहाय्यानें होते. देशांतलेदेशांत वस्तुवस्तूंमध्यें वास्तविक विनिमय होत असतो, पण पैसा या साधनाच्याद्वारें. त्याचप्रमाणें देशादेशांतील व्यापारांत वस्तुतः घडतें. येथेंहि पैसा हें विनिमयाचें साधन आहे. पण खरी अदलाबदल वस्तुवस्तूंत, मालामालांत, अगर ज्या गोष्टी पैशानें विकत घेतां येतात त्यांच्यामध्यें होते.

पैशाच्या साधनानें आंतरराष्ट्रीय व्यापारांत विनिमय होतो; म्हणून या पैशाचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. एका राष्ट्रांत एकच नोटा अगर नाणीं व तीं सर्वसामान्य असल्यामुळें राष्ट्रांत सर्वत्र चालतात, त्यामुळें पदार्थ घेतां येतात. पदार्थ देऊन तें चलन मिळतें. पण जगांत अनेक देश, देशागणिक निराळें चलन व सर्व जगांतील राष्ट्रांत मान्य होईल असें एकस्वरूपी चलन नाहीं. प्रत्येकाचें चलन निराळें, आणि म्हणून आंतरराष्ट्रीय व्यापार या दृष्टीनें अधिक गुंतागुंतीचा. तथापि कांहीं वर्षांपूर्वी, कांहीं राष्ट्रांचें चलन सोन्यावर आधारलेलें होतें. म्हणजे मुख्य नाणीं सोन्याची व नोटा सरकारकडे दिल्या असतां त्या किंमतीचीं सोन्याचीं नाणीं मिळण्याचा हक्क असे. हल्लीं बहुतेक राष्ट्रांतील चलन संकीर्ण स्वरूपाचें आहे. तथापि चलनाच्या स्वरूपावर आंतरराष्ट्रीय व्यापाराचें स्वरूप अवलंबून नाहीं; त्याचे प्रमाणावर मात्र, कांहीं वेळां परिणाम होतो. देशांतसुद्धां नाणें, सोन्याचें असो, चांदीचें असो अगर

सर्व चलन कागदी नोटांचें असो, त्यानें विक्रीसाठीं बाजारांत आलेल्या वस्तूंचें स्वरूप बदलत नाहीं. चलनाचा पुरवठा कमीजास्त झाल्यास भाव बदलतो. मध्यस्थाच्या कुशलतेनें हुंडा कमीजास्त होईल, वधूवरांच्या स्वरूपांत अगर लायकींत फरक होणार नाहीं. म्हणून मुळांत काय घडून येतें हें प्रथम पाहणें सोयीचें होईल.

व्यापारी जेव्हां आपल्याच देशांत वस्तु विकतो त्या वेळेस त्याला त्या देशांतील चलन असलेला पैसा मिळतो. पण तो जेव्हां वस्तु परदेशांत विकतो तेव्हां त्याला त्या देशांतील चलन असलेला पैसा मिळतो. अमेरिकेंत विकला तर डॉलर्स मिळतील; इंग्लंडमध्यें विकला तर पौंड मिळतील. समजा, हिंदी व्यापाऱ्यानें आपला माल इंग्लंडमध्यें विकला तर त्याला पौंड मिळाले; पण त्या पौंडाचे त्यानें रुपये केले पाहिजेत तर त्याला त्यांचा हिंदुस्थानांत उपयोग. म्हणून तो व्यापारी इंग्लंडचे व्यापाऱ्यास माल विकतांना हिंदुस्थानांतील चलनांत पैसा देण्यास भाग पाडतो. मालाची खरेदी ज्या देशापासून झाली त्या देशाचे चलनांत त्याची किंमत विकत घेणाऱ्यांस पटवावी लागते; व हें एक चलन देऊन दुसरें चलन घेणें, एका देशांतील पैसा देऊन दुसऱ्या देशांतील पैसा घेणें, ही गोष्ट आंतरराष्ट्रीय व्यापारांत हरघडी होत असते. या पैशा—पैशाच्या, चलना—चलनांच्या अदलाबदलीला, या विनिमयाला, हुंडणावळ—परदेशी हुंडणावळ—म्हणतात, व ही हुंड्यांमार्फत घडून येते. मागें आपण हुंडी म्हणजे धनकोनें ऋणकोस, धनकोस अगर तो सांगेल त्यास ठराविक मुदतीनंतर निश्चित रक्कम देण्यास काढलेला हुकूम असें पाहिलें आहे. ऋणको, धनको, एकाच देशांतील असले तर त्या हुंडीस "स्थानिक हुंडी" अगर "देशी हुंडी" असें म्हणतात; पण ते निरनिराळ्या देशांतील असले तर ती "परदेशी हुंडी" असें म्हणतात. हुंडी काढणारा, हुंडी स्वीकारणारा व हुंडीचे पैसे ज्यास मिळावयाचे तो, असे तिघेजण यांत असतात, हुंडी स्वीकारणाऱ्यानें मुदत भरतांच पैसे न दिल्यास हुंडी काढणारास ते द्यावे लागतात. चेक हा सुद्धां पैसे देण्याबद्दल बँकेला हुकूम आहे; व खात्यांत पुरेशीं जमा असल्यास चेकचे पैसे बँक देते. पण चेक झाले तरी देशांतले देशांतच त्यांचा प्रसार असतो. परदेशाचे व्यवहार, परदेशी हुंड्यांमार्फत चालतात व या सर्व पद्धतीला 'परदेशी हुंडणावळ' म्हणतात. मालाच्या खरेदी विक्रीचे कामीं हुंड्यांचा उपयोग होतो, इतकेंच नव्हे तर ज्या ज्या व्यवहारांत या देशांतून त्या देशांत पैसा धाडावयाचा असतो, अशा सर्व व्यवहारांचे कामीं 'परदेशी हुंड्यांचा' उपयोग करण्यांत येतो.

क्षणभर असें समजूं या कीं व्यापार करणाऱ्या देशांत सुवर्णचलन आहे. त्या

देशांतील चलन सोन्यावर आधारलेलें आहे व त्यामुळें या देशांतून त्या देशांत तें सहज जाऊं शकतें. जेथें सुवर्णचलन नाहीं, त्याचा विचार पुढें करूं. तथापि आजच्या घटकेला बहुतेक देशांतून सुवर्णचलन नाहींसें झालें आहे, तरीसुद्धां राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहारांची बाकी चुकती करण्याकरितां, सोन्याशिवाय दुसऱ्या धातूचा, दुसऱ्या चलनाचा, उपयोग केला जात नाहीं, व त्यामुळें पूर्वींप्रमाणेंच तें या देशांहून त्या देशांत प्रसंगाप्रमाणें जात असतें. समजा, मुंबईला एका व्यापाऱ्यानें लंडनच्या एका व्यापाऱ्यास माल विकला, त्याला त्याचे पैसे मिळावयाचे आहेत, तेव्हां तो स्वतः हुंडी लंडनच्या व्यापाऱ्यावर काढील किंवा पैसे घेण्याचा हा हक्क तो दुसऱ्याला विकील. जो माल परदेशीं धाडतो त्यास हुंडी काढावी लागते. उलट मुंबईच्या व्यापाऱ्यानें लंडनच्या व्यापाऱ्याकडून माल घेतल्यास त्याला लंडनला पैसे धाडावयाचे असतात, म्हणजे पैसे धाडण्याकरितां त्यास लंडनवरील हुंडी विकत घ्यावी लागते. माल घेणारांस, माल परदेशांतून मागविणारांस, हुंडी विकत घ्यावी लागते. उदा०, मुंबईस दोन व्यापारी असे आहेत कीं एकानें लंडनला माल धाडला आहे, व दुसऱ्यानें लंडनहून मागविला आहे. एक लंडनवर हुंडी काढतो व विकतो. दुसरा ती विकत घेतो. समजा, एकास १००० पौंड धाडावयाचे असतात, दुसऱ्यास ते मिळावयाचे असतात, म्हणून मुंबईचा व्यापारी ज्यानें माल मागविला असेल तो रुपये देऊन, ज्यानें माल धाडला असेल त्याची हुंडी विकत घेतो व ती लंडनला ज्या व्यापाऱ्याकडून माल घेतला त्याला धाडतो; तो लंडनचा व्यापारी ती हुंडी घेऊन, ज्या लंडनच्या व्यापाऱ्यानें मुंबईच्या व्यापाऱ्याकडून माल मागविलेला असतो व ज्यावर ती हुंडी काढलेली असते, त्याकडे जातो, व हुंडीची रक्कम घेतो; या रीतीनें मुंबईत हुंडी घेणाऱ्यानें रक्कम दिली व लंडनमध्यें ज्यावर हुंडी काढली त्यानें रक्कम दिली, व्यवहार पुरा झाला. या देशांतून त्या देशांत सोनें धाडण्याचा प्रसंग आला नाहीं.

मुंबईस हुंडी विकत घेणाऱ्यानें रुपये दिले, पण लंडनमधील व्यवहार पौंडांत झाला तेव्हां मुंबईच्या व्यापाऱ्यानें हुंडी घेतांना किती रुपये दिले असले पाहिजेत ? हुंडी जी काढली ती १००० पौंडांची, लंडनमध्यें १००० पौंडांचा माल घेतला तर तेथें एक हजार पौंड दिले पाहिजेत; हिंदुस्थानांतील चलन निराळें, इंग्लंडमधील चलन निराळें, म्हणून हुंडणावळीचा दर जो या दोन देशांत असेल त्याप्रमाणें मुंबईच्या व्यापाऱ्यानें रुपये देऊन एक, एक हजार पौंडांची हुंडी लंडनवरील घेतली असली पाहिजे. हुंडणावळीचा दर, म्हणजे किती रुपये हिंदुस्थानांत दिले म्हणजे लंडनमध्यें एक पौंड मिळेल, अगर किती शिलिंग लंडनमध्यें दिले म्हणजे हिंदुस्थानांत

एक रुपया मिळेल ? एका अर्थानें रुपयाचा पौंडांत भाव व पौंडाचा रुपयांत भाव जसा असेल तो हुंडणावळीचा दर. लंडन व अमेरिका यांतील हुंडणावळ 'पौंड–डॉलरचे' भावांत असते, फ्रान्स–अमेरिका 'फ्रँक–डॉलर्सचे' भावांत. याप्रमाणें प्रत्येक देशाचें चलन दुसऱ्या देशाचे चलनांत ज्या कोणत्या दरानें वटवलें जातें त्यास हुंडणावळ म्हणतता.

हा हुंडणावळीचा दर कसा ठरतो व कसा बदलतो हें पाहणें जरूर आहे. देशादेशांत माल सारखा जातयेत असतो. निर्यात व्यापारी म्हणजे परदेशांत माल धाडणारे व्यापारी हुंड्या काढीत असतात. व आयात व्यापारी म्हणजे परदेशांतून माल देशांत आणणारे व्यापारी त्या विकत घेत असतात. आयात माल व निर्यात माल यांची किंमत पैशांत सारखी असली म्हणजे देशांतून जितक्या किंमतीचा माल जातो तितक्या किंमतीचा माल परदेशांतून येतो, असें असलें तर देण्याघेण्याची वजावट होते, तोंडमिळवणी होते; या देशांतून त्या देशांत बाकी निघत नसल्या कारणानें ती फेडण्याकरितां सोनें अगर पैसा जाणार नाहीं, व त्यामुळें दोन्ही देशांतील चलन टांकसाळी–प्रमाणांत राहील. उदा०, इंग्लिश पौंडांत११३·३ ग्रेन सोनें असतें व समजा, फ्रान्स व इंग्लंडमधील व्यवहाराचा आपण विचार करीत असूं तर फ्रान्स मध्यें जें नाणें असेल त्याच्यांतील सोन्याचाहि विचार करावयास पाहिजे. फ्रँक हें सोन्याचें नाणें ४·५ ग्रेन वजनाचें असून त्यांत १८ कॅरेट शुद्ध सोनें असतें. (इंग्लिश पौंडांत $\frac{११}{१२}$ शुद्ध सोनें म्हणजे २२ कॅरेट, कारण २४ कॅरेट वजनाचा पौंड असतो). पौंडाला किती फ्रँक याचा विचार करतांना पौंडांतील सोनें किती फ्रँकला विकत मिळेल तितके फ्रँक म्हणजे एक पौंड. समजा, ११३·३ ग्रेन सोनें २५ फ्रँकला मिळतें; म्हणजे एक पौंडाची किंमत २५ फ्रँक झाली. याला टांकसाळी–प्रमाण म्हणतात. पण व्यवहारांत या प्रमाणांत देवघेव होत नाहीं. तेवढें सोनें या देशांतून त्या देशांत धाडण्याचा जो खर्च होतो, तो मिसळवून मग व्यवहारांत हुंडणावळीचा दर ठरतो. समजा, सोन्याची किंमत २५ फ्रँक झाली, त्यांत हा खाजगी वाहतूक खर्च मिळवला, म्हणजे २५ फ्रँक २२ सेंट हा हुंडणावळीचा दर निघतो व त्यास 'स्पेसी पाइंट' म्हणजे प्रत्यक्ष सोनें रवाना करावयाचें असल्यास जास्तींत जास्त येणारा खर्च कमाल सुवर्णमर्यादा म्हणतात. त्याचप्रमाणें टांकसाळी प्रमाणांतून रवानगी खर्च कमी केला म्हणजे त्यास किमान स्पेसी पाइंट म्हणतात. या दोन मर्यादा आहेत. यांच्या दरम्यान हुंडणावळीचा दर राहतो. ज्या वेळेस दोन देशांतील आयात–निर्यात

मालाची एकमेकांबरोबर किंमत असते, त्यांची किंमतींत तोंडमिळवणी होते, त्या वेळेस त्यांच्या चलनांतील हुंडणावळीचा दर टांकसाळी–प्रमाणांत राहील.

पण प्रत्यक्ष व्यवहारांत अशी परिस्थिति क्वचितच येते. एका देशांतून दुसऱ्या देशांत माल अधिक जातो; ज्या देशाचा निर्यात व्यापार अधिक, बाहेर जाणारा माल अधिक किंमतीचा, तेथें बाहेर देशांत जाणाऱ्या परदेशी हुंडया जास्त निघतात; कारण माल परदेशीं जास्त विकलेला असतो; व त्याची किंमत वसूल करावयाची असते. पण आयात माल कमी असल्यामुळें काढलेल्या सर्व हुंडया खपत नाहींत. सर्व हुंडयांना गिऱ्हाईक नाहीं; मग राहिलेल्या हुंडयांचे पैसे म्हणजे सोनें, परदेशांतून माल धाडलेल्या देशांत आणणें प्राप्त होतें. सोनें आणणें ही खर्चाची बाब आहे. सोन्याची जात तपासली पाहिजे, त्याचा विमा उतरला पाहिजे आणि नंतर जहाजांतून अगर खुष्कीच्या मार्गानें तें आणिलें पाहिजे. पुनः देशांत आणल्या नंतर नुसत्या सोन्याच्या लगडी कांहीं नाणें म्हणून खपत नाहींत, तर तें सोनें टांकसाळींत नेऊन त्याचीं नाणीं करावयाचीं, यांत झीज, खर्च व या मुदतींतील रकमेवरील व्याज बुडालें तें शिवाय; इत्यादि आपत्ति असतात, म्हणून त्या टाळण्याकरितां टांकसाळीप्रमाणापेक्षां कांहीं तरी कमी घेण्यास व्यापारी तयार होतो; व किती कमी घेईल हें वर जो रवानगीखर्च होईल त्या प्रमाणावर अवलंबून राहील; अर्थात् हा खर्च फारसा नसतो. यापेक्षां जास्त कमी दरानें तो हुंडणावळ स्वीकारणार नाहीं; कारण मग, प्रत्यक्ष सोनेंच आणणें पतकरील. ही कमाल सुवर्णमर्यादा झाली, यापेक्षां हुंडणावळीचा दर वर गेल्यास ती हुंडी विकण्यापेक्षां सोनें आणविणें फायद्याचें पडेल. ज्या वेळेस परदेशी हुंडया जास्त आहेत म्हणजे निर्यात व्यापार आयात व्यापारापेक्षां सारखा जास्त आहे, त्या वेळीं या परदेशी हुंडयांच्या हुंडणावळीचा दर टांकसाळीप्रमाणापेक्षां कमी राहील, विकणारे पुष्कळ, गिऱ्हाईक कमी, म्हणून ही स्थिति उत्पन्न होते. सोनें आणण्याची कटकट नको, व्याज बुडावयास नको, म्हणून जास्त दरानें कसर कापून देण्यास प्रत्येक हुंडीवाला तयार, व त्यामुळें हुंडणावळीचा दर कमाल सुवर्णमर्यादेच्या जवळपास राहील, उलट ज्यावेळीं देशांत येणारा माल, आयात माल, निर्यात मालपेक्षां जास्त किंमतीचा असेल तेव्हां परदेशी हुंडया विकत घेणारे जास्त व हुंडया विक्रीस येणाऱ्या कमी. मग परदेशांतील व्यापाऱ्यांना त्यांच्या मालाची किंमत चुकती करण्याकरितां सोनें धाडणें भाग पडतें. सोनें धाडावयाचें म्हणजे मागें सांगितलेल्या सर्व आपत्ति आल्या. त्या टाळण्याकरिता टांकसाळीप्रमाणापेक्षां अधिक देण्यास व्यापारी तयार होतो, ही अधिक रक्कम रवानगी खर्चाचे मानावर अवलंबून

असते. म्हणून त्या मर्यादेपर्यंत म्हणजे किमान सुवर्णमर्यादेपर्यंत तो देण्यास तयार होईल, त्यापेक्षां जास्त खर्च आल्यास प्रत्यक्ष सोनेंच धाडणें फायद्याचें होईल म्हणून आयात व्यापार निर्यात व्यापारापेक्षां सारखा जास्त आहे, अशा स्थितींत हुंडणावळीचा दर किमान सुवर्णमर्यादेच्या जवळपास राहील. परदेशी हुंड्यांना तेजी राहील, प्रीमियम देऊन, अधिक किंमत देऊन घेणारे घेतील.

वर लिहिल्याप्रमाणें या हुंडणावळीचें स्वरूप आहे. प्रत्यक्ष मालाचे व्यापारी हुंड्या घेऊन गिऱ्हाइकें शोधीत नाहींत, किंवा सोनें आणण्याचा अगर धाडण्याचा खर्च काय याचाहि त्यांना पत्ता नसतो. हा हुंडणावळीचा धंदा करणारे व्यापारी व बँका असतात. कांहीं बँकांचा, कांही पेढ्यांचा मुख्य धंदा हाच असतो. हा धंदा करणाऱ्यांचे अडते सर्व देशांत असतात, व त्यांचीं हुंड्या घेणें व विकणें हीं कामें सारखीं चालू असतात. आपआपल्या अडत्यावर ते हुंड्या काढीत असतात व त्यांनीं काढलेल्या ते पटवीत असतात. जेव्हां निर्यात व्यापारी जास्त हुंड्या विक्रीकरितां त्यांचेकडे नेतात, तेव्हां ते कसर कापून घेतात व त्यांना पैसे देतात. ज्या वेळेस आयात व्यापारी हुंड्या विकत घेण्याकरितां जास्त मागणी करतात, त्या वेळेस हे अधिक किंमत घेऊन त्या त्यांना विकतात. प्रसंगविशेषीं सर्व वजावटी होऊन सोनें धाडणें अगर आणणें जरूर पडल्यास ते त्याप्रमाणें करतात, कमी खर्चांत करतात; त्यांचा तो धंदाच असल्यामुळें त्यांना सर्व सोईवार करतां येतें. रेल्वेनें माल आला म्हणजे आपल्याला रिसीट येते. कोण स्टेशनवर जातो, कोण त्रास घेतो; त्यापेक्षां आपण हुंडेकऱ्याला त्याचा मेहनताना देतों व माल घरीं येतो; हमाल, जकात, गाडी वगैरे सर्व कांहीं गोष्टी, तो नेहमींचा धंदेवाला असल्यामुळें त्याला सोईनें जमतात. त्याचप्रमाणें याहि मोठ्या व्यवहारांत असतें. हे परदेशी हुंडणावळीचा धंदा करणारे सर्व देशांत आहेत. त्यांत त्यांना फायदाहि मिळतो. अर्थात् धंदा म्हटला म्हणजे त्यांत चढाओढी, सट्टा वगैरे सर्व गोष्टी आल्या. व्याजाचा दर, नाणेबाजारांतील परिस्थिति, हुंडणावळीचा धंदा करणाऱ्यांची आपापसांतील चुरस वगैरेंचा परिणाम म्हणजे हुंडणावळीचा दर, कमाल सुवर्णमर्यादा व किमान सुवर्णमर्यादा या दोहोंमध्यें कमीजास्त होत असतो. जर एखाद्या देशाचा बाहेर जाणारा माल सारखाच जास्त होऊं लागला तर मग त्या देशांत सोनें येणें अपरिहार्य होतें. पण शक्य तेवढें वर लिहिल्याप्रमाणें, परदेशीं हुंडणावळीची संघटना असल्यामुळें सोनें धाडण्याचें टाळलें जातें. दोन्ही देशांतील धंदा करणारे लोक जागृत राहून तोंडमिळवणी करण्याचा प्रयत्न करीत असतात व यांतहि सट्टेबाजी व नफेबाजी चालते.

परदेशी हुंडया व्यापारी काढतात. त्याप्रमाणें बँकाहि काढतात. बँकांच्या हुंडया जास्त किंमत देऊन घेतल्या जातात, कारण बँकांची पत व लौकिक. मुदतीच्या हुंडी-पेक्षां दर्शनी हुंडीला किंमत जास्त पण परदेशी हुंडया बहुतेक मुदतीच्या असतात. माल विकला जातो व त्याची किंमत महिना दोन महिने याप्रमाणें वायद्यानें मिळा-वयाची असते. तेव्हां या हुंडया मुदतीच्या असतात. हुंडी काढणारा बँकेकडे जातो. बँक कसर कापून हुंडीची रक्कम देते. बँक स्वतः हुंडणावळीचा धंदा करीत असेल तर ती हुंडी त्या देशांतील आपल्या शाखेकडे अगर एजंटाकडे धाडते. बँक किती कसर कापील हें बाजारांतील व्याजाचे दरावर व हुंडीची मुदत भरेल त्या वेळीं हुंड-णावळीचा दर काय राहील यावर अवलंबून राहील. हुंडणावळीचा दर प्रत्येक राष्ट्राचा ज्या ज्या राष्ट्राशीं व्यापार असतो त्या त्या प्रत्येक राष्ट्रागणिक जो व्यापार असतो त्यावर अवलंबून नाहीं, तर तो देश व ज्या देशांशीं त्याचा व्यापार असेल त्या सर्व देशांशीं झालेल्या व्यवहारावर अवलंबून असतो. हिंदुस्थानचा व्यापार अमेरिका, फ्रान्स, इंग्लंड, जपान वगैरे देशांशीं आहे. हुंडणावळीचा दर हिंदुस्थानाच्या आयात व निर्यात व्यापाराचे आढाव्यावर अवलंबून आहे. आयात व्यापार म्हणजे सर्व आयात व्यापार, मग तो माल कोणत्याहि देशांतून येवो. त्याचप्रमाणें निर्यात व्यापार, मग माल कोणत्याहि देशांत जावो. जपान व हिंदुस्थान या दोन देशांतील व्यापार घेतल्यास कदाचित् हिंदुस्थान जास्त माल मागवीत असेल. उलट, हिंदु-स्थानांत इंग्लंडचा येत असल्यास हिंदुस्थान जास्त माल धाडीत असेल; पण अशा जोडी जोडीवरच्या व्यापारावर हुंडणावळीचा दर अवलंबून नाहीं. हिंदुस्थानांतून बाहेरदेशीं एकंदर किती माल जातो व बाहेर देशांतून एकंदर किती माल येतो यावर हुंडणावळीचा दर अवलंबून आहे. कारण व्यापार कांहीं दोन देशांत राहत नाहीं. सर्व देश इतर सर्व देशांशीं कमीजास्त प्रमाणांत व्यापार करीत असतात व प्रत्येक देश वजावट करण्याचा प्रयत्न करीत असतो. ज्याप्रमाणें बँका दररोज संध्या-काळीं एकमेकांत झालेल्या व्यवहारांचा हिशोब करून चुकती बाकी काढीत असतात, त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय व्यापारांत होतें. जपानचा माल हिंदुस्थानांत जास्त आला म्हणून जपानला बाकी देणें, इंग्लंडचा कमी आला म्हणून इंग्लंडाकडून बाकी घेणें, पण जपान, इंग्लंडमध्यें जपानला जर इंग्लंडची बाकी द्यावयाची असेल, तर या तिघांच्या व्यवहाराची रुजुवात होऊन सर्व व्यवहार चुकता होईल. हिंदुस्थान जपानला कांहीं धाडणार नाहीं, तर जपान इंग्लंडला कांहीं धाडणार नाहीं व इंग्लंड हिंदुस्थानाला कांहीं रोकड धाडणार नाहीं. याप्रमाणें जमाखर्च होऊन निकाल लागेल.

अर्थात् हें सर्व हुंडणावळीचे संघटनेमार्फत होतें, सर्व व्यापार लक्षांत घेऊन होतें. त्यामुळें हुंडणावळीचा दर एकंदर देशांतील आयातनिर्यात व्यापारावर अवलंबून असतो म्हणजे शेवटीं या व्यापाराचा जसा आढावा असेल त्यावर अवलंबून असतो. निर्यात व्यापार आयात व्यापारापेक्षां जास्त असेल, म्हणजे आढावा अनुकूल असेल तर हुंडणावळीचा दर कमाल सुवर्णमर्यादेचें जवळपास असेल. जर आढावा प्रतिकूल म्हणजे आयात व्यापार जास्त व निर्यात कमी, तर हुंडणावळीचा दर किमान सुवर्ण-मर्यादेच्या जवळपास राहील.

वर एकंदर आयातनिर्यात व्यापार जो असेल त्यावर हुंडणावळीचा दर अव-लंबून आहे हें पाहिलें. आंतरराष्ट्रीय व्यापारांतील देवघेव हुंड्यांमार्फत होते व प्रत्येक राष्ट्र एकंदरीनें आयातनिर्यात मालाची तोंडमिळवणी करून, सोनें अगर रोकड पर-देशीं धाडण्याचें टाळीत असतें. एखाद्या यंत्राप्रमाणें या हुंडणावळीचें स्वरूप गुंता-गुंतीचें पण त्याचबरोबर सोईचें व व्यवहार सुलभ करणारें असतें. तथापि जर एखाद्या देशाचा आयात व्यापार सारखा वाढता असेल व त्याची किंमत निर्यात व्यापारानें भागत नाहीं, असाच असेल, तर त्या देशाला सोनें अगर जें अन्य चलन आधारभूत असल (चांदी) तें परदेशीं धाडणें भाग पडतें. पण एकदां सोनें देशा-बाहेर जाण्याचा हा प्रवाह सुरू झाला म्हणजे केव्हां थांबतो, कसा थांबतो हें पाहिलें पाहिजे. ज्याप्रमाणें जन्मलेल्या माणसाला मृत्यु हा ठेवलेला किंबहूना जीवनांत मनुष्य मृत्यूचीच तयारी करीत असतो, त्याप्रमाणें नाणें बाहेर देशीं जाण्यास सुरुवात झाली कीं तें बंद होणाऱ्या, त्या प्रवाहाला बंदी करणाऱ्या गोष्टी तात्बडतोब उत्पन्न होतात. नाणें, रोकड बाहेर जाऊं लागली कीं पैशाचा पुरवठा त्या देशांत कमी होतो, त्या-बरोबर भाव उतरतात. देशांत भाव उतरले म्हणजे त्या देशांतील वस्तु विकत घेणें फायद्याच म्हणून त्यांना परदेशची मागणी वाढते. निर्यात व्यापार वाढूं लागतो, व तो वाढूं लागला म्हणजे आपोआप नाणें बाहेर जाणें कमी होऊं लागतें. निर्यात व्यापार, आयात व्यापाराबरोबर झाला म्हणजे नाणें बाहेर जाणें बंद होते. निर्यात व्यापार कमी म्हणून नाण्याचा प्रवाह बाहेर जाण्याला सुरुवात झाली, पण त्याबरोबरच निर्यात व्यापाराला चालना मिळाली. त्याचप्रमाणें ज्या देशांत नाणें येऊं लागतें, त्या देशांत पैशाचा पुरवठा वाढतो म्हणून पदार्थांचे भाव वाढतात, त्यामुळें त्या देशांत वस्तु विकणें हें परदेशी व्यापाऱ्यांना फायद्याचें होतें. आयात व्यापार वाढूं लागतो त्या-बरोबर नाणें येणें कमी होतें. आयात व्यापार निर्यात व्यापाराबरोबर झाला कीं नाणें येणें बंद होतें. आयात व्यापार जास्त होता म्हणून नाणें—सोनें, येत होतें. येणाऱ्या

प्रवाहाबरोबरच आयात व्यापार कमी करण्याची कारणेंहि आलीं. तात्पर्य, सतत व मोठ्या प्रमाणांत नाणें या देशांतून त्या देशांत जात नाहीं, आयात व निर्यात माल यांची किंमतींत तोंडमिळवणी करण्याकडे प्रवृत्ति असते व त्याप्रमाणें होतें. अर्थात् ऐनजिनसी या व्यवहाराचें स्वरूप कसें असतें हें वर सांगितलें. प्रत्यक्ष व्यवहारांत कांहीं कमीजास्त फरक होतात; कारण व्यवहार हा अगदीं गणिताप्रमाणें २+२ बरोबर ४ इतक्या निश्चित व बिलकूल न बदलणाऱ्या नियमाप्रमाणें चालत नाहीं. व्यवहारांत माणसें आहेत व त्यांना अनंत कल्पना, भावना, पूर्वग्रह वगैरे आहेत; पसंती, नापसंती, आवडनिवड अनेक मनोधर्म आहेत, त्यांचा परिणाम व्यवहारावर होत असतो. तथापि ठोकळ मानानें वर सांगितलें तें बरोबर आहे. राष्ट्रांतून सोनें जाऊं नये म्हणून प्रत्येक राष्ट्र प्रयत्न करीत असतें. मात्र या भावनेंत देशभक्तीला वाव नाहीं असें नाहीं. १९३१ सालीं पौंडाचा सोन्यांतील भाव कायम ठेवूं अशी घोषणा करून इंग्लंडमध्यें मजूरपक्षास हुजूरपक्षानें निवडणुकींत नेस्तनाबूत केलें. नाणें कोणीं खात नव्हतें, कोणीं पांघरत नव्हतें, पण देशाच्या भावनांचा उपयोग करून निवडणूक जिंकली व एका आठवड्याचे आंतबाहेर, हुजूरपक्षानें अधिकार हातीं येतांच पौंडाचा सोन्याशीं असलेला संबंध तोडला.

बँका, सरकार, जनता सर्वजण राष्ट्रांतून सोनें बाहेर जाऊं नये म्हणून जागृत असतात व त्याकरितां नाना उपाय अमलांत आणण्यांत येतात. वटणावळीच्या दरावर नियंत्रण ठेवून हें घडवून आणण्याचें धोरण नेहमीं स्वीकारलें जातें. सोनें हें अशा स्वरूपाचें आहे कीं, सर्व देशांत तें चालतें, त्यापासून भांडवल तयार होतें म्हणजे तें विकून उत्पादनसामग्री व साधनें घेतां येतात. सोनें परदेशीं जाऊं लागलें म्हणजे तें बँकांच्या कोठ्यांतूनच जातें व देशांत येतें तेंहि प्रथम बँकांच्याच कोठ्यांत जातें. सोनें भांडवलासारखें असल्यामुळें जेथें व्याज जास्त मिळण्याचा संभव तिकडे जाणें साहजिक असतें. देशाबाहेर सोनें जाऊं लागलें म्हणजे प्रथम ही गोष्ट बँकांच्या लक्षांत येते, कारण त्यांचा सोन्याचा संचय कमी होऊं लागतो; त्याबरोबर त्या वटणावळीचा दर वाढवूं लागतात. त्यांचेजवळ जास्त सोनें झालें म्हणजे वटणावळीचा दर कमी करतात. बहुतेक देशांतील मध्यवर्ती बँका ज्या वेळीं त्या देशांतील चलन सोन्यावर आधारलेलें होतें त्या वेळीं, वरीलप्रमाणें वटणावळींत फरक करून सोनें परदेशीं जाणें बंद करीत असत. सुवर्णचलन जरी सर्वत्र संपलें असलें तरी, या धोरणांत कांहीं फरक पडला नाहीं. कारण देशादेशांतील बाकी चुकविण्याचें मुख्य साधन अद्यापि सोनेंच आहे. शिवाय भावनेमुळें सोनें सांचविणें हें राष्ट्रीयदृष्ट्या बँकांचें एक कर्तव्य झालें आहे.

परदेशीं सोनें जाणें म्हणजे राष्ट्राला कमीपणा आणणारें आहे म्हणून हरतऱ्हेनें तें बाहेर-देशीं जाऊं नये म्हणून प्रयत्न केले जातात. याचा देशाच्या कल्याणावर किती परिणाम होतो, याचा विचार प्रामुख्यानें न करतां पुष्कळ प्रसंगीं केवळ भावनेनें हें धोरण अमलांत येतें.

वटणावळीचा दर वाढविला म्हणजे सोनें बाहेर जाण्यास आळा बसतो. कारण हा दर वाढला याचा अर्थ व्याजाचा दर वाढला. मागें सांगितल्याप्रमाणें आंतरराष्ट्रीय व्यापारांतील हुंड्या, मुदतीच्या असतात. व्याजाचा दर वाढलेला असल्यामुळें बँका घेतलेल्या हुंड्या ताबडतोब परदेशीं धाडीत नाहींत. पैसा देशांत ठेवणें जास्त फायदेशीर, कारण व्याज मिळतें. शिवाय मुदत भरेपर्यंत थांबल्यास व्यापारांत कमीजास्त होण्याचा संभव असतो; त्यामुळें पुनः वजावट करून प्रत्यक्ष सोनें धाडण्याचा प्रसंग टाळतां येणें संभवनीय असतें. त्याचप्रमाणें ज्या देशांत नाणें धाडावयाचें त्या देशाचे इतर देशांतील हुंडणावळीचे भाव पाहून तेथून सोनें घेऊन परस्पर धाडणें स्वस्त पडत असेल तर ही गोष्ट करून पाहतां येते. तात्पर्य, हुंडणावळ ही अगदीं यंत्रासारखी गुंतागुंतीची आहे व अनेक प्रकारें हिशोब करून, वजावटी करून बँका हुंडणावळीच्या साधनानें आपल्या देशांतील सोनें बाहेर न जाण्याबद्दल खटपट करीत असतात. सोन्याऐवजीं रोखे धाडून बाकी चुकती करणें हाहि एक प्रकार असतो. निरनिराळ्या राष्ट्रांचे सरकारी रोखे बँकांकडे असतात, शिवाय परदेशीं कर्ज काढणें हीहि गोष्ट पुष्कळ देशांतील सरकारें करीत असतात. त्यामुळें त्यांचे रोखे सोन्याऐवजीं भरणा करण्याकरितां उपयोगीं पडतात. रोख्यांचा खरेदीविक्रीचा व्यवहार करणाऱ्या पेढ्या व दलाल हे नेहमीं दक्ष असतात; ते निरनिराळ्या देशांत रोखे खरेदी करतात व विकतात. हें करतांना त्यांना हुंडणावळीवर अवलंबून रहावें लागतें. त्याचबरोबर याहि व्यवहाराचा हुडणावळीवर परिणाम होतो.

तथापि इतकें सर्व करून जास्तींत जास्त सोनें या देशांतून त्या देशांत जाणें झपाट्यानें बंद होतें. एकदम गोंधळ होऊन बाजारांत अस्वस्थता निर्माण होणें टळतें. पण जर आयात मालाचा व्यापारच सारखा वाढत असेल तर सोनें बाहेर जाणें अपरिहार्य आहे. तें थांबविणें याला एकच उपाय आणि तो म्हणजे निर्यात व्यापार वाढवून आयात व्यापाराशीं त्याची तोंडमिळवणी करणें हा होय. वस्तूंच्या भावांत कमीजास्त होऊन ही तोंडमिळवणी होईपर्यंत जाणाऱ्या काळांत सोनें देशांतर करीत असतें. शक्य तितकें तें कमी प्रमाणांत व्हावें म्हणून वर सांगितल्याप्रमाणें प्रयत्न होत असतात. त्यामुळें सोनें या देशांतून त्या देशांत जातें, पण फार मोठ्या प्रमाणांवर

जात नाहीं. सर्व देशांतील व्यापार व पदार्थांच्या किंमती यांचे रीतिरिवाज ठरून गेले आहेत; तोंडमिळवणी बहुतेक सर्वत्र होत असते. कांहींतरी अरिष्ट उत्पन्न झाल्याशिवाय हुंडणावळींत गोंधळ उत्पन्न होत नाहीं व त्यामुळें बहुतेक आंतरराष्ट्रीय व्यापार सुरळीत चालत असतो. पण वरीलप्रमाणें प्रसंग आला कीं एकदम सोन्याचा प्रवाह इकडून तिकडे होऊन, किंमती वाढून, देशाच्या व्यापाराची घडण बदलून जाते. जोंपर्यंत भांडवलशाही जगांत पैशाची भूमिका नुसती साधन, विनिमयाचें साधन म्हणूनच नाहीं तर, त्यापेक्षां जास्त आहे, तोंपर्यंत, सोन्याचें प्रमाण व त्याची हालचाल यावर भांडवलशाहीचा व्यवहार अवलंबून राहणें क्रमप्राप्त आहे व त्याचबरोबर इतर दुःखेंहि सोसणें जगाला क्रमप्राप्त आहे.

येथपर्यंत सर्वसामान्यपणें हुंडणावळीबद्दल विवेचन केलें. हिंदुस्थानांतील हुंडणावळीबद्दल थोडसें लिहिणें जरूर आहे. १९२५ चे सुरवातीपर्यंत चलनासंबंधीं सर्व व्यवस्था सरकारनें आपले हातांत ठेवली होती. परकीय सरकार हुंडणावळींत फेरफार करून देशाचें किती व कसें नुकसान करूं शकतें त्याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे गेल्या ५० वर्षांचा हिंदुस्थानांतील चलनाचा इतिहास आहे. १८९३ पर्यंत हिंदुस्थानांत रौप्यचलन चालू होतें. त्यानंतर टांकसाळींत नाणें पाडून घेण्याची नागरिकांना बंदी झाली. हिंदुस्थानाचा इंग्लंडशीं मोठा व्यापार असल्यामुळें व इंग्रज राज्यकर्ते असल्यामुळें इंग्रजांचे हिताचे दृष्टीनें प्रत्येक गोष्ट होऊं लागली. इंग्लंड—हिंदुस्थानमधील हुंडणावळीचा दर १८९३ सालीं जरी सरकारनें एका रुपयास १६ पेन्स जाहीर केला तरी तो टिकला नाहीं. १४·५ पेन्सचे आंत बाहेर त्या सालीं होता. १८९४ ते १८९८ पर्यंत दरसाल १३·१ पेन्स, १३·६ पेन्स, १४·४ पेन्स व १८९८ सालीं १५·९ पेन्स याप्रमाणें सरासरी राहिला; म्हणजे सरकारी दराप्रमाणें हुंडणावळ राहिली नाहीं. सोन्याचे चलन असावें असें हिंदी मत होतें तें सरकारनें ऐकलें नाहीं कारण हिंदुस्थानांतून परदेशीं माल फार जातो, त्यामुळें हिंदुस्थानांत सोनें पुष्कळ होईल अशीं भीति इंग्लंडमध्यें उत्पन्न झाली. १८९८ सालीं फॉउलर कमिटीनें सोन्याचीं नाणीं सुरूं करावींत व रुपयास १६ पेन्स हा हुंडणावळीचा दर असावा असें सुचविलें. सरकारनें त्या सूचना मान्य केल्याचा देखावा केला; व शेवटीं पुनः धरसोड सुरू केली. सुवर्णसंचय कमी केला, किमान सुवर्णमर्यादेपेक्षां कमी घेऊन हुंड्या विकल्या व एकंदर हुंडणावळींत अशी फिरवाफिरव केली कीं, प्रत्यक्ष सोनें व्यवहारांत येऊं नये. जरूर पडली तर परदेशी व्यवहारांत तेवढा त्याचा उपयोग करावा. या धोरणाचा अर्थ असा कीं, हिंदुस्थानांत सोन्याचीं नाणीं चलनांतून कमी

होत गेली व परदेशांतील व्यवहार चुकता करण्याकरितां सोनें अगर सोन्याच्या हुंड्या सरकार देऊं लागलें. १५ रुपयांस पौंड हा भाव कायम ठेवण्यासाठीं सरकारचे प्रयत्न सुरू झाले, व ते कायम ठेवण्याकरितां हिंदुस्थान सरकार, लंडनवर—हिंदुस्थानचे सेक्रेटरी, यांवर हुंड्या काढी व तो हिंदुस्थानवर काढी. हें धोरण कांहीं वर्षें चाललें. याला सुवर्णपरिवर्तनपद्धति म्हणतात. म्हणजे परराष्ट्रीय देवघेवीकरितां ठराविक भावांत सोनें देणें, जरूर तर सोन्याचीं नाणीं देण्याची हमी घेणें. मात्र सोन्याचें चलन देशांतील व्यवहारांत असणार नाहीं हाहि अर्थ त्यांत आहे. देशांत एक चलन व परदेशी व्यवहाराकरितां सोनें व त्याचा भाव निश्चित ठरलेला, असें स्वरूप या पद्धतीचें आहे.

१९१३ सालीं सरकारनें चेंबरलेन कमिशन नेमलें; त्यानें जें चालू होतें त्याला मान्यता दिली. सरकारनें राजकीय सत्तेच्या जोरावर हुंडणावळ कृत्रिमपणें निश्चित करून त्याप्रमाणें सरकार वागूं लागलें. वास्तविक दरसाल ४० कोटी रुपयांचें आंत बाहेर निर्यात व्यापार हिंदुस्थानच्या आयात व्यापारापेक्षां जास्त असतो तेव्हां त्याबद्दल देशांत सोनें येणें जरूर होतें, पण सरकार परकीय, त्याची दृष्टि इंग्लंडचा फायदा कसा होईल याकडे व त्यामुळें सरळ, न्याय्य अशी हुंडणावळीची योजना सरकारनें कधींच मान्य केली नाहीं. हिंदुस्थानांत सोन्याचीं नाणीं चलनांत ठेवावयाची नाहींत हा हट्ट कायम टिकविला. १९१५ सालपर्यंत सरकार हुंडणावळीचा भाव सरासरी १६ पेन्स या दराप्रमाणें टिकवूं शकलें. पण महायुद्धामुळें सर्वच गोष्टी बदलल्या. हुंडणावळीचा भाव १६ पासून ३६ पेन्सवर गेला. चांदीचा भाव वाढला व सर्व परिस्थितीमध्यें गोंधळ उत्पन्न झाला. १९१९ सालीं सरकारनें बॅबिंग्टन कमिटी नेमली. या कमिटीनें हुंडणावळ एक रुपयास २४ पेन्स असावी असें सुचविलें सरकारनें ही सूचना मान्य करून देशांत येणारें सोनें एक रुपयाला ११·३ ग्रेन म्हणजे साव्हरिन नाण्याचा १/१० भाग या दरानें घेण्याचें ठरविलें व सोन्याचें जुनें नाणें १५ रुपयाला घेण्यांत येईल असें जाहीर केलें. नंतर चलन म्हणून सुवर्णनाणी कायदेशीर नाहींत असें जाहीर केलें. सोन्याचा भाव कमी रहावा, वर लिहिल्याप्रमाणें रहावा म्हणून १९२० सालांत सव्वा कोटी तोळे सोनें लोकांस विकलें पण ती विक्री बंद होतांच सोने पुनः तोळ्यांस ३० रु. प्रमाणें झालें. बाजारांत हुंडणावळीचा दर २ शि. ८ पे. असतां सरकार तो २४ पेन्स ठेवण्याची जबाबदारी घेणार हें जाहीर झाल्यापासून सट्टेबाजी सुरू होऊन लोकांनीं चढत्या भावांत पैसा इंग्लंडला धाडला. हिंदुस्थानांत एक रुपया देऊन लंडनला २ शि. ८ पेन्स घेतले व लागलीच २४ पेन्स दर सरकारनें सुरू केल्याबरोबर तोच पैसा पुनः नवीन दरानें हिंदुस्थानांत आणला. चोवीस

पेन्सला एक रुपया हिंदुस्थानांत मिळूं लागला म्हणजे २ शि. ८ पे. चे पुनः १ रु. ५ आ. ३ पै. मिळूं लागले. २–४ महिन्यांत व्हिनकष्टानें हजारों रुपये लोकांनीं मिळविले यांत हिंदुस्थानांतील जनतेचें कोट्यावधि रुपये–३५ कोटी रुपये–नुकसानींत गेले. शेवटीं हुंडणावळीचें नियंत्रण करण्याचें सरकारनें सोडलें. वरील धोरणानें हिंदुस्थानचा निर्यात व्यापार किंमतींत कमी झाला व शेवटीं १६ पेन्सवर हुंडणावळीचा दर आला, ही स्थिति १९२६–२७ पर्यंत होती.

सरकारनें १९२५ सालीं हिल्टनयंग कमिशन नेमलें. या कमिशननें एकंदर चलन, त्यावरील नियंत्रण, हुंडणावळ वगैरे सर्व बाबतींत चौकशी करून शिफारशी केल्या; पण त्यापूर्वींच सरकारनें १८ पेन्स दर ठरवून त्याप्रमाणें हुंड्या विकण्याचा क्रम सुरू केला होता. त्याच दराची शिफारस या कमिशननें केली. चलन सोन्यावर आधारलेलें असावें पण प्रत्यक्ष सोन्याचीं नाणीं व्यवहारांत नसावीं व सर्व चलनावर मध्यवर्ती बँकेचें नियंत्रण असावें या दोन सूचना केल्या. सरकारनें १८ पेन्सची शिफारस मान्य केली. हा दर कायम ठेवण्याकरितां मध्यवर्ती बँक असावी, तिजकडे सर्व व्यवस्था असावी, ही गोष्ट १९३४ सालपर्यंत अंमलांत आली नाहीं. १९३५ सालापासून रिझर्व बँक ऑफ इंडियाकडे एकंदर चलन व हुंडणावळ, नाणें बाजारावर नियंत्रण ठेवणें वगैरे कामें सोपविण्यांत आलेलीं आहेत. हुंडणावळीचा दर १ पौंडास १३ रु. १० आणे आहे व त्या मानानें तो ठेवण्याची जबाबदारी रिझर्व बँकेवर आहे. रुपयांस १ शि. ६$\frac{३}{१६}$ पे. यापेक्षां दर जास्त होतां कामा नये व रुपयांस १ शि. ५$\frac{४९}{६४}$ पेन्स पेक्षां कमी होतां कामा नये, याप्रमाणें हुंडणावळीची स्थिति ठेवण्याची जबाबदारी या बँकेवर आहे. मध्यवर्ती बँक हुंडणावळीचा दर कसा नियंत्रित करते हें मागें आलें आहे. तात्पर्य, हिंदुस्थानांतील हुंडणावळीचा दर पूर्वीइतका हेलकावे खाणारा राहिला नाहीं. तथापि सरकारनें ५० वर्षांत जें धोरण ठेवलें त्यानें हिंदुस्थानचें कोट्यवधि रुपयांचें नुकसान झालें तें मात्र भरून निघणें शक्य नाहीं.

---

# २६. आंतरराष्ट्रीय व्यापारांतील भरणा.

मागील प्रकरणांत हुंडणावळीबद्दल विचार केला व तिचा दर आयातनिर्यात मालाच्या आढाव्यावर कसा अवलंबून असतो तें दिसून आलें. पण प्रत्यक्ष व्यवहारांत नुसता माल जातो व येतो, एवढाच व्यवहार राष्ट्राराष्ट्रांत होत नाहीं. हे व्यवहार जास्त व्यापक व जास्त गुंतागुंतीचे झालेले आहेत. प्रत्यक्ष मालाशिवाय अनेक व्यवहार, ज्यांत पैशाचा संबंध येतो असे होतात. देशांदेशांत सावकारी चालते व त्यामुळें पैशाची देवघेव मोठया प्रमाणावर होत असते. याचाहि समावेश आयात-निर्यात व्यापारांतच केला पाहिजे.

देशादेशांतील सावकारी व्यवहार म्हणजे त्यांतील माणसांचाच व्यवहार ! माणसें कर्जरोखे घेतात व तेच व्याज मुद्दल परत घेतात. समजा, हिंदुस्थानांतील कांहीं माण-सांना अगर कांहीं योजकांना कर्ज पाहिजे आहे, तें कर्ज ते अमेरिका, इंग्लंड कोठेंहि घेऊं शकतील. त्याप्रमाणें देशांत पुष्कळ लोक असे असतात कीं, जे आपली रक्कम परदेशांत व्याजीं लावूं इच्छितात. कर्ज देणारे व कर्ज घेणारे हे बँकांमार्फतच हा व्यवहार करीत असतात. इंग्लंडमध्यें ज्यांनीं कर्ज काढलें, ते हिंदुस्थानांतील व्यापारी ज्यांनीं कर्ज द्यावयाचें कबूल केलें, त्यांवर कर्जाच्या रकमेइतक्या हुंड्या काढतील; व या रीतीनें त्यांना रक्कम मिळेल. उलट, कर्जाची फेड करावयाची झाली तर, इंग्लंडमधील धनको हिंदुस्थानांतील कुळांवर हुंड्या काढतील. याचा अर्थ प्रत्यक्ष मालाच्या आयातनिर्या-तीचे कामीं ज्या हुंड्या बाजारांत असतील त्यांत यामुळें आणखी भर पडेल. समजा, मालाच्या व्यापारांत तोंडमिळवणी झाली; पण हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांनीं जें कर्ज काढलें त्यांच्या लंडनवरील हुंड्या अद्याप बाजारांत आहेत; त्यांना मागणी नाहीं. कारण आतां लंडनला कोणाला पैसे धाडावयाचे नाहींत; याचा परिणाम हुंडणावळीचा दर वाढेल व नाणें हिंदुस्थानांत येऊं लागेल. जर कर्ज काढणाऱ्या व्यापाऱ्यांना इंग्लंड-मधूनच माल खरेदी करावयाचा असेल—यंत्रें वगैरे—तर मग, लंडनमध्येंच कर्जाचे रकमेनें त्यांची किंमत दिली जाईल व तेवढा भरणा पुरा होईल. बहुतेक वेळां परदेशी

कर्ज हें साधनसामग्रीचे खरेदीकरितांच जरूर असतें. मग ती साधनसामग्री कर्ज देणाऱ्या देशांत अगर अन्य देशांत घ्यावयाची असो. तथापि कर्ज काढलें कीं, त्याचा प्रथम परिणाम कर्ज काढणाऱ्या देशाचे हुंडणावळीवर होतो; व त्या देशांत नाणें येऊं लागतें. निर्यात व्यापार जास्त असला म्हणजे जे परिणाम होतात तेंच होऊं लागतात. पदार्थांच्या किंमतीवर परिणाम होतात व शेवटीं तोंडमिळवणी होते. नाण्याचा प्रवाह सारखा न राहतां कर्ज देणारें राष्ट्र, निर्यात व्यापार वाढवून, तोंडमिळवणी करतें व प्रत्यक्ष नाणें, कर्ज घेणाऱ्या राष्ट्रांत न धाडतां माल धाडतें. त्या मालानें, कबूल केलेल्या कर्जाची रक्कम आदा करतें. कर्ज घेणारांनाहि माल घेण्यासाठींच कर्ज हवें असतें. इतर देशांत सामग्री घेतली तरी शेवटीं वजावट होऊन प्रत्यक्ष नाणें धाडावें लागणार नाहीं, अशी परिस्थिति लवकरच उत्पन्न होते.

जगांत वरीलप्रमाणें व्यवहार सारखे चालू असतात व त्याचा परिणाम अखेरीस आयातनिर्यात मालाची तोंडमिळवणी करण्यांत होतो. कारण कर्ज म्हणजे प्रत्यक्ष पैसा जरी असला तरी त्यामुळें मिळणारी ऐपत—क्रयशक्ति—पदार्थ विकत घेण्याची शक्ति—हेंच त्याचें स्वरूप असतें. मोठमोठ्या राष्ट्रांनीं कर्ज द्यावयाचें म्हणजे आपल्या देशांतून माल धाडावयाचा; प्रत्यक्ष सोनेंनाणें धाडावयाचें असें फार अल्प प्रमाणा-वर होतें. तथापि जें कांहीं नाणें कर्ज घेणाऱ्या देशांत येतें, त्याचा परिणाम किंमतीं-वर होतो; त्या वाढतात व शेवटीं किंमती वाढल्यामुळें परदेशी माल जास्त येतो, व नाणें येण्याचा प्रवाह बंद होत जातो. उलट, ज्या वेळेला कर्जाची फेड होते, त्याहि वेळेला ती फेड माल धाडूनच होते, व थोडया प्रमाणांवर नाणें धाडलें जातें. मग फेडींत दिलेला माल कच्चा असो अगर तयार असो; पण ज्या वेळेला फेडीकरितां माल देशांतून धाडला जातो, त्या वेळीं त्या राष्ट्राचा निर्यात व्यापार वाढतो व आयात कमी होत जातो. कारण फेड करावयाची म्हणून माल बाहेर जास्त जातो. कर्ज घेतलें तेव्हां माल आंत आला, आयात व्यापार वाढला, कर्ज फेडलें तेव्हां माल बाहेर गेला, निर्यात व्यापार वाढला. पण हें सर्व सुखासुखी होत नाहीं, बिनधांदलीनें होत नाहीं. पुष्कळ वेळां व्यापारांतील हें प्रमाण बदलतांना बाजारांत अस्वस्थता व गोंधळ उत्पन्न होतो.

कर्जें जीं परदेशांत घेतलीं जातात तीं मोठ्या प्रमाणावर सरकारमार्फतच; सर-कार रोखे देशीं, परदेशीं सर्वत्र विकतें व हवें असणारें कर्ज मिळवितें. कांहीं कंपन्यांचे सुद्धां भाग, रोखे, परदेशीं खपतात. रोख्यांची खरेदीविक्री ही फार वर्षांपासून चालत आलेली गोष्ट असल्यामुळें कांहीं रोखे सर्व जगभर खपतात व त्यामुळें देण्याघेण्याच्या

कामीं भरणा करण्याकरितां त्यांचा उपयोग होतो व त्यामुळें प्रत्यक्ष नाणें धाडणें त्या मानानें कमी होतें, अगर जरूर होत नाहीं. उलट, या रोख्यांच्या किंमती एकदम कमी झाल्यास बाजारांत गोंधळ उत्पन्न होतो, रोखे त्या त्या देशांत विक्रीकरितां धाडले जातात. परदेशांतून ते परत देशांत आले म्हणजे त्यांची किंमत आणखी उतरतें. त्या देशाला जास्त नाणें बाहेर धाडण्याचा प्रसंग येतो. तथापि, परदेशांत भरणा करण्याकरितां रोखे उपयोगीं पडतात व या दृष्टीनें त्यांचा उपयोग मोठ्या प्रमाणावर होतो.

परदेशांत जाणारे प्रवाशी, विद्यार्थी, तेथें राहणारे स्वदेशांतील नागरिक यांनाहि पैसा धाडावा लागतो, तोहि हुंड्यामार्फतच. माल, कर्ज, प्रवाशी वगैरेंना धाडावी लागणारी रक्कम, या सर्व गोष्टींचा भरणा हुंडणावळीचेच सहाय्यानें होत असतो. हिंदुस्थानांतून ४० कोटींवर रुपये इंग्लंडमध्यें दरसाल जातात, कीं, ज्याबद्दल हिंदुस्थानाला मोबदला म्हणून कांहीं मिळत नाहीं. आतां ही स्थिति उरली नाहीं. हे रुपये प्रत्यक्ष जात नाहींत; तर तितक्या किंमतीचा मालच हिंदुस्थानांतून निर्यात होतो. तरुणपणीं येथें चैन करून, सुलतानशाही गाजवून, म्हातारपणीं पुनः इंग्लंडमध्यें पेन्शन, हिंदुस्थानापासून घेणारे शेंकडों इंग्रज आहेत व त्याचा मोबदला हिंदुस्थानच्या आकांक्षांना विरोध करूनच ते देत असतात. तात्पर्य, जो पैसा मालाव्यतिरिक्त गोष्टींबद्दल परदेशांत धाडावा लागतो तो सुद्धां मालाच्याच रूपानें. प्रत्यक्ष नाणें फार थोड्या प्रमाणांत धाडलें जातें.

तात्पर्य, जर एखाद्या देशाच्या आयातनिर्यात व्यापाराचा आढावा घ्यावयाचा असेल, तर तो व्यापकपणें घेतला पाहिजे. देशांतून जाणारी प्रत्येक वस्तु अगर गोष्ट, कीं जिच्याबद्दल पैसे मिळतात, व त्याचप्रमाणें देशांत येणारी प्रत्येक गोष्ट, कीं जिच्याबद्दल पैसे द्यावे लागतात; त्याचप्रमाणें हुंडणावळीमार्फत होणारा सर्व व्यवहार अशा सर्व गोष्टींचा समावेश या आढाव्यांत व्हावयास पाहिजे. नुसता मालाचा आढावा काढून भागत नाहीं. अशा प्रकारें आढावा काढल्यानंतर जर निर्यात बाजू जास्त असेल तर अनुकूल आढावा व आयात बाजू जास्त असेल तर प्रतिकूल आढावा, असें समजलें जातें. प्रत्यक्ष सोनें बाहेर गेलें म्हणजे वाईट स्थिति व आंत आलें म्हणजे चांगली स्थिति ही पूर्वापार कल्पना अद्याप कायम आहे. मालाबद्दल सोनें देशांत आलें म्हणजे देश श्रीमंत होत चालला हें अद्याप समजलें जातें. सोनें हें एक विनिमयाचें साधन आहे, ऐपतशक्ति आहे हें न समजल्यामुळें तेंच साध्य आहे, ही समजूत कमी झालेली नाहीं; व त्यामुळें होणारे अनर्थहि कमी झालेले नाहींत. मुबलक संचय, कसरीचा दर कमी, कर्ज मिळणें सहज साध्य अशी परिस्थिति असली म्हणजे धंदेवाले खूष असतात; व ही स्थिति मुबलक

सोनें असलें म्हणजे होते. म्हणून जास्त सोनें येणें म्हणजे राष्ट्राचा अभ्युदय व कमी येणें अगर जाणें म्हणजे अवनति हा समज कायम झाला आहे; व जोंपर्यंत वस्तूंचा विनिमय पैशाच्या साधनानें होत आहे व उत्पादन भांडवलशाही पद्धतीचें आहे, तोंपर्यंत अभ्युदय व संपत्ति मोजण्याचें माप हेच राहणार, किंबहुना हें रहाणें अपरिहार्य आहे. वास्तविक संपत्ती, पैसा, हुंडणावळ, या सर्व गोष्टींचें मूळ स्वरूप अद्यापि कळलें नाहीं असें नाहीं. तथापि भांडवलशाही राष्ट्रांतील सर्व प्रयत्न देशांत सुवर्ण आणणें व देशाबाहेर जाऊं न देणें या दिशेनें होत असतात. व्यक्तीसुद्धां आपलें उत्पन्न पैशानें मोजतात. व्यापारीसुद्धां खर्चापेक्षां विक्रीचे पैसे जास्त आले म्हणजे तो नफा समजतात. पैसा हीच संपत्ती ही समजूत अद्यापि कायम आहे. पैसा ही ऐपत शक्ति आहे, विनिमयाचें केवळ साधन आहे. वरील विचारसरणीचे एक स्वरूप म्हणजे शक्य तेवढें सोनें देशांत आणणें हें आहे. वर सांगितलेल्या परिस्थितींत देशाच्या व्यवहारांतील, परराष्ट्रीय व्यवहाराचा आढावा काढावयाचा म्हणजे सर्व गोष्टींचा, येणाऱ्याजाणाऱ्या नाण्यांचासुद्धां समावेश, करून काढला पाहिजे. हा आढावा सर्वत्र वर्षाचे मुदतीचा काढण्याची पद्धत आहे व तो प्रत्येक देशागणिक काढणें ठीक पडतें; कारण प्रत्येक देशाचें चलन निराळें व त्या त्या चलनांत मालाच्या बाकीबद्दल अगर एकंदर फिरणाऱ्या बाकीबद्दल भरणा करावा लागतो. जेथें हुंडणावळीवर नियंत्रण नाहीं अगर तिचा दर निश्चित नसेल तेथें कोणत्या वेळीं काय दर राहील तें त्या वेळच्या हुंड्यांची मागणी व पुरवठा यावर अवलंबून राहील. दर निश्चित असेल तर, मोठ्या रकमेनें नाणें देशांत असेल तर, त्याचा परिणाम पैशाच्या उत्पन्नावर व अन्य गोष्टींवरहि होतो. एकंदर देशांतील जाणाऱ्यायेणाऱ्या सर्व बाबींचा ताळेबंद करणें कठीण आहे.

हिंदुस्थानचेंच उदाहरण घेतलें तर हिंदुस्थानांतून परदेशीं माल जास्त जातो. पण या तफावतीबद्दल हिंदुस्थानांत कांहीं येत नाहीं; कारण येथील सरकारचें विलायतेंतील देणें, पेन्शनी, इंग्रजी व्यापारी लोकांच्या येथील नफ्यांचा भरणा वगैरे गोष्टींत ही सर्व तफावत जिरवून टाकलेली दिसते. खालीलप्रमाणें ताळेबंद केल्यास तो अयोग्य होणार नाहीं.

| परराष्ट्रांकडून हिंदुस्थानचें येणें. | परराष्ट्रांस हिंदुस्थानानें द्यावयाचें देणें. |
|---|---|
| (१) माल धाडला त्याची किंमत. | (१) माल आणला त्याची किंमत. |
| (२) परराष्ट्रांत काढलेलें कर्ज. | (२) सोन्याचांदीची आयात. |
| (३) परराष्ट्रांतील हिंदी लोकांनीं स्वदेशांत धाडलेला पैसा. | (३) कर्जरोख्यांची आयात. |

(४) हिंदुस्थानांत राहिलेल्या परकीय लोकांना त्यांच्या देशांतून आलेला पैसा.

(४) परराष्ट्रांतील हिंदी लोकांस, व परराष्ट्रांतील येथें असलेले लोक, त्यांच्या कुटुंबांस परराष्ट्रांत धाडतात तो पैसा.

(५) हिंदुस्थानांतील परकीय व्यापारी यांस येथें झालेला नफा धाडणें असतो तो.

(६) परदेशी पेढ्या, विमा कंपन्या, आगबोटी वगैरें धंदेवाल्यांचें वेतन व परराष्ट्रांत काढलेल्या कर्जावरील व्याज.

(७) हिंदुस्थान सरकारचा विलायतें-तील खर्च, पगार, भत्ता, पेन्शन, त्याच-प्रमाणें सोन्याच्या व सरकारी मालाच्या आयातीबद्दल द्यावें लागणारें देणें.

देण्याघेण्याच्या सर्व बाबींचा बिनचूक आढावा काढणें कठीण आहे. प्रो. काळे यांनीं महायुद्धापूर्वी हिंदुस्थानचें सरासरी दरवर्षी ७८·२ कोटी रुपये येणें निघे असें कोष्टक तयार करून काढलें आहे. महायुद्धानंतरच्या पांच वर्षांत सरासरी दरसाल ५२·४ कोटी रुपये निघे. अगदीं अलीकडच्या काळांतील आंकडे पाहिले तर असें दिसून येतें कीं, १९२८–२९ मध्यें संपलेल्या पांच वर्षांमध्यें येण्याचें प्रमाण सरासरी ११३ कोटी होतें; परंतु १९३३–३४ मध्यें संपणाऱ्या पांच वर्षांमध्यें हें सरासरी प्रमाण ४३ कोटीवर आलें. १९३३–३४ सालीं हिंदुस्थानला परदेशाकडून ३५ कोटी येणें होतें तर १९३४–३५ मध्यें २३१/२ कोटी, १९३५–३६ मध्यें ३०१/२ कोटी आणि १९३६–३७ मध्यें ७७३/४ कोटी येणें होतें.

कोणत्याहि देशाला परदेशीं देणीं देऊन जर घेणें शिल्लक राहत असेल तर ती बाकी कशी चुकविली जाते हा मुख्य प्रश्न आहे. अर्थात् ही बाकी कांहीं सालअखेर एका दिवशीं चुकती होत नाहीं. दररोज व्यवहार चालू असतो, जी बाकी द्यावयाची ती त्या देशांतील चलनांत द्यावयाची असते. ती बाकी त्या देशांतील चलनांत देण्या-करितां प्रत्येक देशांतील बँका प्रमुख प्रमुख देशांत आपली शिल्लक ठेवतात; त्यांतून देण्याचा एक मार्ग आहे.

उदा०,—हिंदुस्थान सरकारला लंडनमध्यें भरणा करावयाचा असला तर हिंदुस्थान सरकार येथील रिझर्व बँकेकडे तो भरणा करतें. तिची लंडनची शाखा

तेथें ज्यास ती रक्कम द्यावयाची त्यास देते. उलट, हिंदुस्थानांत भरणा करावयाचा असल्यास लंडनमधील रिझर्व बँकेच्या शाखेकडे भरणा केला कीं हिंदुस्थानांत ती रक्कम मिळते. पण जर एखाद्या देशाला परदेशचे देणें सारखें भाग पडलें तर, वर लिहिल्याप्रमाणें नुसत्या कागदावरच्या हिशोबानें भागणार नाहीं. प्रत्यक्ष सोनें नाणें धाडावें लागेल व त्याचा देशाबाहेर जाण्याचा प्रवाह सुरू होईल. तो बंद व्हावा, त्याला आळा बसावा म्हणून हुंडणावळीचा दर कमी करणें हा नेहमींचा मार्ग आहे. तो दर उतरविला म्हणजे देशांत आयात माल कमी येतो व त्यामुळें नाणें बाहेर धाडण्याची जरूरी कमी होत जाते. त्याचबरोबर निर्यात मालाला मागणी वाढते. हुंडणावळीचा दर उतरला म्हणजे परदेशांतील चलन विकत घेण्याकरितां देशांतील चलन जास्त द्यावें लागतें, म्हणून व्यापारी परदेशांतून माल कमी मागवूं लागतात; उलट परदेशी माल धाडणारांना या देशांतील चलन, हुंडणावळीचा दर उतरला म्हणून पूर्वीपेक्षां जास्त मिळतें, म्हणून ते जास्त माल परदेशीं धाडूं लागतात व अशा रीतीनें तोंडमिळवणी होते. हुंडणावळीचा दर उतरला कीं त्याचा परिणाम बाहेर जाणाऱ्या सर्व गोष्टींवर होतो. उदा०,—भांडवल, प्रवाशी, वगैरे. कारण पूर्वीपेक्षां देशी चलन जास्त देऊन परदेशी चलन घ्यावें लाग .

वरील विवेचनांत हुंडणावळीवर नियंत्रण नाहीं, तिचा दर बाजाराचे स्थितीवर अवलंबून आहे असें मानलें आहे. समजा, देशांत मध्यवर्ती बँक आहे, तिचें नियंत्रण हुंडणावळीवर आहे व ती हुंडणावळीचा जो दर निश्चित असेल तो कायम ठेवूं लागली, तर काय होईल तें पाहिलें पाहिजे. कारण बहुतेक देशांतून मध्यवर्ती बँका असून त्यांचें नियंत्रण हुंडणावळीवर असतें. परदेशची बाकी चुकविण्याकरितां या मध्यवर्ती बँकेला नाणें पुरवावें लागेल व तें ठरलेल्या दरानें! पण हा पुरवठा मध्यवर्ती बँक कांहीं सारखा करूं शकत नाहीं. मग देशांतील पैशाचे स्वरूपांतील वट उत्पन्न कमी करून, देशांतील पैशाची मागणी कमी करावयाची. पैशाची मागणी मध्यवर्ती बँक कशी कमी करते हें मागें आलें आहे. आपला व्याजाचा दर ती वाढविते, व्यवहारांतील रोकड कमी करते, त्यामुळें इतर बँका कर्ज देणें कमी करतात. व्यवहारांतील रोकड कमी झाली म्हणजे बाहेर देशांचा मालहि मागविणें कमी होतें; व त्याबरोबर नाणें बाहेर जाण्याचें कमी होत जातें. देशाचें पैशांतील उत्पन्न या रीतीनें कमी करणाऱ्या या पद्धतीला आंखडत्या व्यवहाराचें धोरण, (Deflation) चलनाच्या संकोचनाचें धोरण म्हणतात.

वरील पद्धतीनें आयातनिर्यात व्यवहाराची तोंडमिळवणी करणें, सोईचें पडतें. व्यवहाराची तोंडमिळवणी करतांना अंमलांत येणाऱ्या आयात निर्यात दोन पद्धती सांगितल्या. एक हुंडणावळीचा दर उतरवून, ज्याला इंग्रजींत (Exchange depreciation) म्हणतात, व दुसरी आंखडत्या व्यवहाराची संकोचनाची, ज्याला इंग्रजींत (Deflation) म्हणतात. आणखीहि कांहीं गोष्टींचा अवलंब करण्यांत येतो, त्यांचा विचार पुढें करतां येईल.

---

# २७. विविध हुंडणावळ

आंतरराष्ट्रीय व्यवहारांत होणारा भरणा यासंबंधीं विचार मागील प्रकरणांत केला. तो करतांना अमलांत येत असलेल्या दोन पद्धतींचें प्रामुख्यानें विवेचन पण येऊन गेलें आहे. हुंडणावळ स्थिर रहावी, नाणें परदेशीं जाऊं नये म्हणून कसे प्रयत्न होतात, याचें थोडेसें दिग्दर्शन पण केलें. नाण्याच्या आयातनिर्यातीमुळें मालाच्या आयातनिर्यातीवर कसे परिणाम होतात, व शेवटीं सर्व तऱ्हेच्या आयातनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी कशी होते हेंहि पाहिलें. वस्तूंचे भाव कमीजास्त होऊन आयातनिर्यात मालाच्या किंमतींत कशी तोंडमिळवणी होत आहे हेंहि पाहिलें. पण या सर्व विवेचनांत नाणें ह्या देशांतून त्या देशांत प्रसंग आला असतां मुक्तपणें जातें येतें व त्याचा परिणाम पदार्थांच्या भावांवर होऊन एकंदर व्यवहाराचा मेळ बसतो, असें मानिलें आहे. त्याचप्रमाणें सर्व देशांतील चलन एकाच धातूवर, सोनें यावर आधारलेलें आहे असें मानिलें आहे, व त्यामुळें ही धातु, हें सोनें, व्यवहारांतील तफावती भरणा करण्याकरितां येतें जातें. त्याची आयात निर्यात मुक्तपणें होते. तथापि, जगांतील सर्व राष्ट्रांतील चलनें सोन्यावर आधारलेलीं नाहींत; कांही रुप्यावर, कांहींचा आधार नुसत्याच कागदी नोटा असें असल्यामुळें यासंबंधीं थोडा विचार होणें अवश्य आहे.

ज्या वेळेस व्यापार करणाऱ्या निरनिराळया राष्ट्रांतील चलनें एकाच धातूवर, समान धातूवर आधारलेलीं नसतात तेव्हां हुंडणावळींत मोठ्या प्रमाणांत हेलकावे होतात बहुतेक राष्ट्रांत प्रत्यक्ष सोनें चलन म्हणून नसलें तरी त्यावर चलन आधारलेलें आहे. त्यामुळें या राष्ट्रांराष्ट्रांतील हुंडणावळींत फेरफार थोडया प्रमाणांत होतात. उलट, दोन देशांतील चलन निरनिराळया धातूवर आधारलेलें असेल तर एकमेकांची किंमत कोणत्या प्रमाणांत राहील हें सांगणें कठीण आहे. परदेशी व्यापार हुंडयांमार्फत चालतो, पण हुंडया या मालाच्या किंमतीचें निदर्शन असल्यामुळें त्यांच्या भावांत फरक झाल्याबरोबर प्रत्यक्ष मालाच्या किंमतींतहि फरक होतो. ज्या राष्ट्रांतील चलनें

एकाच धातूंवर आधारलेलीं आहेत तेथें हुंडणावळीचे दराच्या फेरफारानें होणारे वस्तूंच्या भावांतील फेरफार मोठ्या प्रमाणांत होत नाहींत. भिन्नप्रमाणी चलनांच्या देशांत हुंडणावळीचे दराचे फेरफारानें होणारे भावांवरील परिणाम मोठ्या प्रमाणांत होतात. भिन्नप्रमाणी चलनें असणाऱ्या देशांतील व्यापार नुसता मालाचाच असेल, आयातनिर्यात व्यवहार नुसता मालापुरताच मर्यादित असेल, तर फारशी अडचण भासणार नाहीं. पण राष्ट्रांराष्ट्रांतील व्यवहारांत मालाप्रमाणें अन्य व्यवहार, कर्जें वगैरे येत असल्यामुळें, गुंतागुंत उत्पन्न होते. नुसत्या मालाची आयातनिर्यात असती तर, त्या देशांच्या चलनांचें परस्परांतील प्रमाण त्यांच्या किंमतीच्या मानानें जुळणें कठीण पडलें नसतें. या देशांतील चलनाचे एका प्रमाणांत किती माल मिळतो, व तोच माल, तितकाच माल, त्या देशांत घेण्यास त्या देशांतील चलन किती द्यावें लागतें, हें ठरलें म्हणजे या देशांतील चलनाचे एका प्रमाणाला, त्या देशांतील किती चलन मिळेल हें निश्चित होतें. समजा, अमेरिकेंतील चलन डॉलर, हें कागदी आहे; व जर्मनींतील चलन मार्क, हें त्याचप्रमाणें आहे; जर एखाद्या वस्तूची किंमत जर्मनींत १० मार्क असेल व त्याच वस्तूची किंमत अमेरिकेंत १ डॉलर असेल तर १० मार्कांला १ डॉलर अशी हुंडणावळ राहील. दोन्ही देशांतील पदार्थांच्या किंमती त्या त्या देशांतील चलनाचा पुरवठा, बँकांकडील शिल्लक, उत्पादनाचें प्रमाण वगैरे गोष्टींवर अवलंबून राहील व दोन्ही देशांत फक्त मालाचीच देवघेव आहे, अन्य व्यवहार नाहींत व दोन्ही देशांतील पदार्थांच्या किंमती स्थिर आहेत, तोंपर्यंत त्यांच्यांतील हुंडणावळींतहि स्थिरता राहील. पण देशांदेशांत नुसती मालाचीच देव-घेव होत नाहीं त्यामुळें अनेक तऱ्हेनें गुंतागुंत होते. भांडवल कर्जरूपानें या देशांतून त्या देशांत जातें. व्यापारी, योजक, परदेशांत धंदे करून नफा स्वदेशीं धाडूं पाहतात; प्रवाशी जातात येतात वगैरे अनेक व्यवहार देशादेशांत होत असतात, त्यामुळें देशा-देशांतील आयातनिर्यात व्यवहार वाढतात, व त्यांची तोंडमिळवणी होत नाहीं. फिरणाऱ्या तफावतीबद्दल, बाकीबद्दल, भरणा करण्याचा प्रश्न जास्त प्रमाणांत उत्पन्न होतो; व त्याचा पहिला परिणाम हुंडणावळीचे दरांवर, नंतर पदार्थांचे किंमतीवर होतो, व अखेरीस मागें सांगितल्याप्रमाणें तोंडमिळवणी आयातनिर्यात मालाच्या किंमतींत होत असते.

समजा, एकदम पुष्कळ अमेरिकन नागरिक जर्मनीमध्यें प्रवासासाठीं जाऊं लागले. त्यांच्या खर्चाकरितां ते जर्मनींत अमेरिकेवर हुंड्या विकतील व तेथें खर्चाकरितां मार्कस् जर्मन चलन विकत घेतील. याचा अर्थ, अमेरिकेंत मार्क्सच्या

हुंडयांना मागणी जास्त, कारण प्रवाश्यांना त्या हुंडया करण्याकरितां मार्क्स पाहिजेत म्हणून या हुंडयांना मागणी जास्त. याचा पहिला परिणाम हुंडणावळीवर होईल; कारण जर्मनींत अमेरिकेवर काढलेल्या हुंडया जास्त; त्यांना गिऱ्हाईक कमी यामुळें पूर्वीपेक्षां मार्कस्‌ची किंमत डॉलरमध्यें जास्त होईल. १० डॉलरला १०० मार्कस् न राहतां कांहीं जास्त डॉलर्स १०० मार्क्सला मिळतील. समजा, १२ मिळतील. पण या फरकाचा पदार्थांच्या दोन्ही देशांतील किंमतीशीं तूर्त संबंध नाहीं, पण लवकरच याचे परिणाम इतर मालांचे व्यवहारांवर होऊं लागतात. समजा, न्यूयॉर्कमधील व्यापाऱ्यानें जर्मनीस माल विकला आहे अगर विकावयाचा आहे, त्याला ही परिस्थिति फायद्याची झाली; कारण जर्मनीवर धाडलेल्या हुंडीची किंमत डॉलर्समध्यें वाढली. समजा, त्याला १० हजार मार्कस् मिळावयाचे होते, त्याबद्दल पूर्वी एक हजार डॉलर्स मिळाले असते; त्याऐवजीं आतां बाराशें डॉलर्स मिळतील. त्याला जर्मनींत धाडलेल्या मालावर एकदम फायदा होईल. निर्यात व्यापार वाढेल, त्याला एक प्रकारें मदत ( Bounty ) मिळाल्यासारखेंच होईल. निर्यात मालावर याप्रमाणें परिणाम किती होईल हें त्या मालाच्या मागणीचें स्वरूप आयात करणाऱ्या देशांत कसें आहे, यावरहि अवलंबून आहे. त्या देशांतील मागणी लवचिक असेल, कमी-जास्त होणारी असेल तर, तिचा व्याप ज्या प्रमाणांत वाढेल त्याप्रमाणें निर्यात माल कमीजास्त होईल. समजा, अमेरिकेचा कापूस वर लिहिल्याप्रमाणें हुंडणावळ वाढली असतां जर्मनींत जास्त जाईल. पण तेथें जर मागणी वाढणारी नसेल तर कापसाच्या किंमती तेथें कमी होतील. त्याचबरोबर अमेरिकेंत हुंडणावळीचा दर उतरल्यामुळें किंमती वाढल्या, त्याचा परिणाम जर तेथेंच कापसाची मागणी कमी होण्यांत झाला तर जर्मनींत अमेरिकेहून आणखी कापूस जाईल, व तेथें त्याची किंमत कमीजास्त होईल. याचा परिणाम जर्मनींत कापूस स्वस्त होईल; व जी मदत ( Bounty ) मिळाल्यासारखें वाटलें ती नाहींशी होईल. पण प्रत्यक्ष परिस्थिति या दोन्ही टोंकाच्या दरम्यान राहते. निर्यात करणाऱ्या देशांतील निर्यात मालाचे भाव वाढतात, व आयात होणाऱ्या देशांत, त्या मालाचे भाव कांहीं कमी होतात. या उदाहरणांत दोन देशांतील आयातनिर्यात व्यवहारांत मालाच्या व्यवहाराशिवाय इतरांची भर पडली म्हणजे हुंडणावळींत काय परिणाम होतात, व त्यांचे इतर व्यवहारांवर काय परिणाम होतात हें पाहिलें; तोच न्याय एका देशाच्या इतर सर्व देशांशीं असलेल्या सर्व आयात-निर्यात व्यवहारांच्या आढाव्यामुळें हुंडणावळीवर परिणाम झाला म्हणजे लागू पडेल.

निर्यात मालाच्या किंमती निर्यात करणाऱ्या देशांत वाढतील, व तो माल आयात करणाऱ्या देशांत कांहीं कमी होतील.

सर्वसामान्य धातूंवर म्हणजे सोन्यावर आधारलेलें चलन ज्या देशांत आहे त्या देशांतील व्यवहारांत हेंच होतें. हुंडणावळीवर वरीलप्रमाणेंच फरक होतो. दर उतरला कीं निर्यात व्यापाराला उत्तेजन मिळतें. मग भिन्न प्रमाणीं चलन असलेल्या देशांतील हुंडणावळींत होणाऱ्या फरकांचे परिणामांत आणि सोन्यावर आधारलेल्या चलनांच्या देशांतील असल्या बाबतींत होणाऱ्या परिणामांत फरक कोणता असा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. फरक असा आहे कीं, समान चलनाच्या देशांत हुंडणावळीचे फेरफार अल्प असतात; व त्यांचें प्रमाणहि अल्प असतें. उलट, भिन्नप्रमाणीं चलनांच्या देशांत हुंडणावळींत मोठ्या प्रमाणांवर फेरफार होतात, व त्यांचा परिणाम सर्वत्र बाजारांतील भावांत गडबड उडून धांदलीची परिस्थिति उत्पन्न होते. त्याचप्रमाणें हे फेरफार भराभर होतात असाहि अनुभव आहे. हिंदुस्थानांतील चलनाचा इतिहास या नियमाचा उत्तम पुरावा आहे. एक रुपयाला ३४ पेन्सपासून १४ पेन्सपर्यंत येथील हुंडणावळीचे हेलकावे होत होते. त्यामुळें हिंदुस्थानचें तात्बडतोब व कायमचें किती नुकसान झालें हें प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानचें चलन सोन्यावर आधारलेलें असावें म्हणून लोकांची जी मागणी होती, त्यांत सोन्याची अभिलाषा जास्त होती असें नव्हे तर, त्यायोगानें आंतरराष्ट्रीय व्यापारांत हिंदुस्थानाला योग्य तो फायदा मिळाला असता व त्यांतील हिंदुस्थानच्या वांट्याला आलेली अस्वस्थता, अस्थिरता, नाहींशी झाली असती. भिन्नप्रमाणी चलनामुळें केवढें नुकसान झालें, अगर आंतरराष्ट्रीय व्यापारांत होतें, याचें हिंदुस्थान हे एकच उदाहरण पुरे आहे. १९३५ सालीं रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया स्थापन झाली व तिनें हुंडणावळीचें नियंत्रण करणें अंगावर घेतलें, त्यामुळें अर्थात् हिंदी हुंडणावळीला स्थिरता आली, पण तोंपर्यंत मोठ्या प्रमाणांत या देशाचें नुकसान झालें हें जगजाहीर आहे.

आयात व निर्यात मालाच्या किंमती या वर विवेचन केल्याप्रमाणें हुंडणावळीचे दरांवर अवलंबून असतात. सर्वसामान्यतः वस्तूंच्या किंमती कोणत्या गोष्टींवर अवलंबून असतात, याचें विस्तरशः विवेचन मागें आलेंच आहे. परदेशांत जाणाऱ्या व व परदेशांतून येणाऱ्या वस्तु इतर वस्तूंप्रमाणें मागणीपुरवठा, उत्पादनसंघटना, साधनसामग्रीचें स्वरूप वगैरे गोष्टींवर किंमतीच्या बाबतींत अवलंबून असतातच, पण कांहीं विद्वानांच्या मतानें आंतरराष्ट्रीय व्यापाराची परिस्थिति व हुंडणावळीची परिस्थिति यांवरहि त्यांच्या किंमती वर लिहिल्याप्रमाणें अवलंबून असतात. या विचार-

सरणीप्रमाणें निर्यात मालाच्या किंमती वाढल्या तरी देशांतील इतर वस्तूंचे भाव वाढणार नाहींत, त्याचप्रमाणें आयात मालाच्या किंमती वाढल्या तरी इतर मालांच्या किंमती वाढणार नाहींत. ज्या वस्तु ज्या देशांत तयार होतात व खपतात, त्यांच्या किंमतींत फरक होणार नाहीं; व त्याचप्रमाणें मजुरीचे दरहि बदलणार नाहींत. पण असा फरक जरी कांहीं काळ होत असला तरी, तो फार वेळ राहणार नाहीं हें उघड आहे, कारण निर्यात मालाला मागणी वाढली कीं, त्याचा पुरवठा वाढूं लागेल, लोक त्या धंद्यांत जास्त जातील, व शेवटीं नफ्याचा दर सर्वत्र, सर्व धंद्यांत सारखा होऊन पूर्वींइतके भाव पुन: होतील. हा मेळ एकदम बसणार नाहीं. दरम्यान थोडा काळ जाईल. पण दरम्यानचे काळांत हा फरक राहतो; व त्याचे परिणाम अनेक प्रकारें होतात. भिन्न चलनांतील हुंडणावळ असो अगर समान चलनांतील सोन्यावर आधारलेल्या चलनांतील हुंडणावळ असो, त्यांत होणाऱ्या फरकाचे परिणाम अखेरीस जरी सारखे असले तरी, तात्कालिक व ताबडतोब होणारे परिणाम मात्र भिन्न स्वरूपाचे असतात. भिन्न चलनांतील हुंडणावळींत होणारा फरक भांडवलाच्या अगर कर्जाच्या, अगर अन्य तऱ्हेच्या आयातनिर्यात व्यवहारानें कां होईना, त्याचे तात्कालिक परिणाम देशाच्या व्यापारावर व उत्पादनांवर तीव्रतेनें होतात.

हुंडणावळीचे दर कमीजास्त करून आयातनिर्यात व्यापाराची तोंडमिळवणी करणें व प्रत्यक्ष नाणें देशाबाहेर न जाऊं देणें याबद्दल सारखे प्रयत्न चालू असतात. मागें हुंडणावळ कशी घसरवून (Depreciate), त्याचप्रमाणें देशांत पैशाची मागणी कमी करून ( Deflate ), तोंडमिळवणी करण्याचे प्रयत्न कसे होतात याचें वर्णन केलें आहे. हुंडणावळींत फेरफार करण्याचा आणखी एक प्रकार आहे. त्याला नाणें निर्मूल्य (Devaluation) करण्याची पद्धत म्हणतात. समजा, चलन सोन्यावर आधारलेलें आहे तर सोन्याच्या नाण्यांत जें सोन्याचें प्रमाण असेल, तें कमी करावयाचें. सुवर्णचलन खरें, मात्र नाण्यांत सोनें कमी. त्याचप्रमाणें सोन्याचें चलन कायदेशीर ठेवावयाचें, नाण्याऐवजीं नोटा द्यावयाच्या, पण नोटा दिल्या असतां सोनें देण्याची जबाबदारी नाहीं, याचा अर्थ नाणें एक प्रकारें निर्मूल्य करावयाचें. या दोन्हींचा परिणाम हुंडणावळीवर काय होतो, हें पाहणें जरूर आहे. अमेरिकेचेंच उदाहरण घेतलें तर असें दिसतें कीं, १९३३ सालीं अमेरिकन सरकारनें टांकसाळींत खाजगी सोनें घेऊन नाणें पाडून देण्याचें बंद केलें व नोटा घेऊन सोनें देण्याची जबाबदारी नाहींशी केली. सोन्याचें नाणें व्यवहारांत चलन म्हणून बंद केलें. फक्त नोटा राहिल्या व त्याबद्दल सोनें देण्याची जबाबदारी सरकारनें नाहींशी केली व नंतर ठरलेल्या भावानें सरकार सोनें खरेदी

करील असें जाहीर केलें. भाव ठरविण्याचा अधिकार व बदलण्याचा अधिकार राखून ठेवला. १९३५ पर्यंत अनेक बदल सरकारनें केले व शेवटीं एक भाव कायम केला. या करण्याचा उद्देश, पदार्थांचे भाव वाढवावेत हाहि एक होता. पण पदार्थांचे भाव तितके वाढले नाहींत, मात्र हुंडणावळीवर या गोष्टीचा तीव्र परिणाम झाला. आयात-निर्यात मालाच्या किंमतीवर ताबडतोब परिणाम होऊन जी तोंडमिळवणी सरकारास करावयाची होती, तशा प्रकारची परिस्थिति मात्र होत गेली. सुरवातीस निर्यात होणाऱ्या वस्तूंचे भाव वाढले, देशांतच तयार होऊन देशांत खपणाऱ्या वस्तूंचे भावांवर फारसा परिणाम झाला नाहीं. ज्या वस्तु मोठया प्रमाणांत अमेरिका बाहेर धाडीत असे, त्यांवर परिणाम झाला. अखेरीस मागें सांगितल्याप्रमाणें, आयातनिर्यात व्यवहारांत मेळ बसला. नाण्यांतील सोनें कमी केल्यानें काय होतें हें थोडक्यांत वर सांगितलें. त्याचप्रमाणें परिणाम, नोटा काढून, त्याबद्दली सोनें द्यावयाचें नाहीं, ही पद्धति स्वीकारली म्हणजे हुंडणावळीवर होतात. सरकारनें सुवर्णचलन बंद केलें, नोटां-बद्दल सोनें द्यावयाचें नाहीं, येवढें जाहीर केल्याबरोबर बँका, दलाल यांच्या व्यव-हारांवर परिणाम होतो; व त्यामुळें हुंडणावळीवर परिणाम होतो. सोनें देणें तहकूब झालें म्हणजे ते कायमचें तहकूबच होणार, असलेली बंदी कायमची होणार असें सर्वत्र वाटू लागतें. त्याबरोबर हुंडणावळीचा धंदा करणारे दलाल व बँका, त्याच-प्रमाणें आयातनिर्यात व्यापार करणारे व्यापारी अस्वस्थ होतात. ज्या देशांतील चलन, सुवर्णचलन असेल, त्या देशांवर काढलेल्या हुंड्यांची किंमत वाढते. जर देशांत कागदी चलन आणखी वाढूं लागलें तर, असल्या हुंड्यांची किंमत आणखी वाढते व त्याचा तात्कालिक परिणाम आयात व निर्यात वस्तूंचे भावांवर होतो. मागें सांगि-तल्याप्रमाणें निर्यात मालाला एक प्रकारें मदत ( Bounty ) मिळाल्यासारखी होते; व कांहीं काळानें आयातनिर्यात व्यापाराची तोंडमिळवणी होऊन भाव स्थिर होतात. पण जोंपर्यंत कागदीच चलन आहे व हुंडणावळीवर नियंत्रण नाहीं, तोंपर्यंत वस्तूंचे भावांत म्हणण्याइतकी स्थिरता येत नाहीं; कारण हुंडणावळीवर नियंत्रण नसल्यामुळें हुंडणावळ आणखी घसरेल ही भीति असते. त्यामुळें, अनिश्चितपणा व त्यावरच जगणारी सट्टेबाजी याला वाव मिळतो.

आयातनिर्यात व्यवहारांत मेळ बसविण्याकरितां व निर्यात व्यापार वाढवून एकं-दर आयातनिर्यात व्यवहाराचा आढावा अनुकूल करून घेण्याकरितां वर सांगितलेल्या दोन्ही प्रकारांचा उपयोग, अनेक राष्ट्रांनीं करून आपाआपलीं चलनें निर्मूल्य केलेलीं आहेत. सुवर्णचलन अजिबात सोडून देऊन व नोटांचें चलन वाढवून अगर सोन्याचें

प्रमाण चलनांत नाममात्र ठेवून निर्यात व्यापार वाढविला हें दृश्य १९२९चे मंदीपासून दिसूं लागलें; व शेवटीं बहुतेक राष्ट्रांनीं हाच उपाय स्वीकारल्यामुळें प्रत्यक्ष आयातनिर्यात मालाचा व्यापार सर्वत्र कमी झाला. राष्ट्रांराष्ट्रांत अविश्वास उत्पन्न झाला, व त्यापासून परदेशांतून येणाऱ्या मालाला शक्य तितकी बंदी करावयाची या धोरणाचा स्वीकार सर्वत्र होऊं लागला. युद्धोत्तर जगांत व्यापारांत स्वातंत्र्य व स्थिरता असावी या दृष्टीनें तूर्त अनेक योजना पुढें आल्या आहेत. त्यांचाहि विचार आपण केला पाहिजे.

तात्पर्य, सोन्यावर आधारलेलें चलन ज्या ज्या राष्ट्रांत आहे, त्यांच्या हुंडणावळींत फेरफार झाल्यास ते फार होत नाहींत, व त्याचे परिणामहि मोठ्या प्रमाणांवर होत नाहींत. भिन्न चलन असणाऱ्या देशांतील हुंडणावळींत फेरफार जर हुंडणावळीवर नियंत्रण नसेल तर फार होतात, व त्याचें प्रमाणहि मोठें असतें. या फेरफारांचे परिणाम आयातनिर्यात मालांच्या किंमतीवर तात्काल होतात. पण अखेरीस आयातनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी होत जाते, व अशी तोंडमिळवणी करण्याकरितां, निर्यात व्यापार वाढविण्याकरितां, नाणें निर्मूल्य करणें, सुवर्णपरिमाण रद्द करणें, या गोष्टींचाहि अवलंब राष्ट्रें करूं लागलीं आहेत. हुंडणावळीवर नियंत्रण नसलें म्हणजे तिचा दर, मागणी व पुरवठ्यावर अवलंबून राहील; व ही मागणी व पुरवठा, देशांतील चलनासंबधींचें धोरण, भांडवलाची ये जा, व सर्वसाधारणपणें आयातनिर्यात व्यवहारांचा आढावा यांवर अवलंबून राहील. कांहीं राष्ट्रांत हुंडणावळ स्थिर रहावी या दृष्टीनें मध्यवर्ती बँका तिजवर नियंत्रण ठेवीत असतात. रिझर्व बँक ऑफ इंडिया इजवर हुंडणावळ १ शि. ५$\frac{४९}{६४}$ पे. व १ शि. ६$\frac{३}{१६}$ पे. या दरम्यान ठेवण्याची जबाबदारी कायद्यानें टाकली आहे. कांहीं ठिकाणीं हुंडणावळीचा दर स्थिर ठेवण्याकरितां मध्यवर्ती बँक, एक निधि बाजूला काढून ठेवते, व त्याचा उपयोग हुंडणावळीचा दर स्थिर करण्याकडे करण्यांत येतो. इंग्लंडमध्यें, बँक ऑफ इंग्लंडनें, असला मोठा निधि १९३२ सालापासून ठेविला असून त्यामुळें हुंडणावळ स्थिर करण्यास फार मदत झाली, फ्रान्स व अमेरिकेनेंहि हीच योजना अमलांत आणली आहे. तथापि, कांहीं राष्ट्रांनीं हुंडणावळ, अर्थात् परदेशी हुंडणावळ, संपूर्णपणें नियंत्रित केली आहे त्याचा विचार पुढील प्रकरणांत करावयाचा आहे.

---

# २८. नियंत्रणाखालील हुंडणावळ

१९२९ सालीं व नंतर जगभर जी मंदी झाली त्याचा परिणाम बहुतेक राष्ट्रां-तील हुंडणावळींवर झाला व तेव्हांपासून हुंडणावळीचें नियंत्रण करण्याकडे प्रवृत्ति वाढली. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका या देशांत मध्यवर्ती बँकांनीं हुंडणावळ स्थिर ठेवण्याकरितां खास निधि काढले व हुंडणावळ स्थिर ठेवण्याचा प्रयत्न केला. तथापि कांहीं राष्ट्रांनीं याहीपेक्षां जास्त व्यापक व कडक नियंत्रण हुंडणावळीवर त्या वेळीं घातलें व बहुतेक राष्ट्रांतून तें कायम आहे. विशेषतः जर्मनीमध्यें ही गोष्ट पद्धतशीर रीतीनें करण्यांत आली. परदेशी हुंडणावळीवर नियंत्रण घालावयाचें म्हणजे मध्यवर्ती बँकेमार्फतच हें काम होऊं शकतें. पूर्ण नियंत्रण म्हणजे देशांतील कोणत्याहि व्यापा-ऱ्याला अगर इतरालाहि परवानगीशिवाय परदेशांतून माल आणतां येणार नाहीं. परवानगी कोणास द्यावयाची, कोणता माल व किती प्रमाणांत आयात करण्याची परवानगी द्यावयाची, त्याचप्रमाणें कोणत्या देशांतून माल आणावयास व किती आण-ण्यास परवानगी द्यावयाची, हें सर्व मध्यवर्ती बँक व मुख्य सरकार यांना ठरवावें लागतें. त्याचप्रमाणें कोणता माल किती प्रमाणांत कोणत्या देशांत निर्यात करावयाचा हेंहि सरकारला ठरवावें लागतें. या गोष्टी करण्याला अवश्य असलेल्या वाहतुकीच्या दरांचेंहि नियंत्रण करावें लागतें, त्याचबरोबर आयातनिर्यात मालांवर कर किती व कसा बसवावयाचा हेंहि ठरवावें लागतें. तात्पर्य, देशांतील उत्पादनयोजना पूर्ण आंखून त्याला जुळणारा असाच आयातनिर्यात व्यापार योजावा लागतो; व हें सर्व घडवून आणण्यासाठीं हुंडणावळीवर संपूर्ण नियंत्रण ठेवणें क्रमप्राप्त होतें. योजनापूर्ण उत्पा-दनाचें एक स्वरूप, एक भाग म्हणून हुंडणावळीवर नियंत्रण घालण्यांत येत असतें.

जर्मनीचें उदाहरण घेतलें तर, १९३१ सालीं प्रथम तांतडीचा उपाय म्हणून हें नियंत्रण सुरू झालें. जर्मन मध्यवर्ती बँक जिला "राईश बँक" म्हणतात, तिची धांदलीची परिस्थिति झाली. जवळ असलेला सोन्याचा संचय मोठ्या प्रमाणांत कमी झाला. लोक आपापले पैसे बँकेंतून काढूं लागले. लोक, जर्मनसरकारचे रोखे व इतर

मिळकती विकून भांडवल परदेशीं नेऊं लागले. परदेशावर हुंड्यांना मागणी भयंकर वाढली. हट्टानें या बँकेला पैशाची मागणी कमी करून (Deflation) नाण्याच्या टंचाईचें धोरण स्वीकारून परदेशीं जाणाऱ्या भांडवलाला आळा घालतां आला असता; पण हें होण्यास वेळ लागला असता व दरम्यानची बिकट परिस्थिति सुधारली नसती. उलट सुवर्णचलन तहकूब करून हुंडणावळ मोकळी सोडली असती तर, व्यवहारांत बँकेला पैसा जास्त जास्त वाढवावा लागला असता आणि हा पैसा कागदी पैसाच असणार. शेवटीं मुबलक पैसा झाला म्हणजे काय संकटें येतात याचा अनुभव जर्मन जनतेला १९२४–२५ सालांचा होता; म्हणून ह्या दोन्ही गोष्टींचा अवलंब न करतां तिनें हुंडणावळीचें संपूर्ण नियंत्रण करण्याचें ठरविलें. त्याबरोबर ज्या राष्ट्रांना जर्मनीकडून बाकी मिळावयाची होती, व ती मालामध्यें घेऊन घसरत चाललेल्या हुंडणावळीचा फायदा ज्यांना घ्यावयाचा होता, तो त्यांना मिळाला नाहीं. देण्याला हुंडणावळ शिल्लक नाहीं असें करून टाकलें व निर्यात माल जर्मनीनें ज्या देशांना कांहींहि बाकी द्यावयाची नव्हती, त्या देशांकडे धाडून व्यापाराला मात्र खोट येऊं दिली नाहीं. सुरवातीस तांतडीचे इलाज म्हणून सुरू केलेलें नियंत्रण कायम झालें; योजनापूर्ण उत्पादनाचा हा एक भाग झाला.

हुंडणावळीचे नियंत्रणाचा मुख्य उद्देश देशांतील भांडवल व सोनें परदेशी जाऊं नये, उलट जमल्यास परदेशांतील सोनें देशांत यावें हा असतो व हें साध्य करतांना देशांतील पैशाची मागणी कमी न करतां आकसनाचें (Deflation) धोरण अमलांत न आणतां परदेशीं हुंडणावळीचा दर कायम राखावयाचा. तो कायम राखावयाचा म्हणजे हुंडणावळीला असलेली जास्त मागणी कमी करावयाची व पुरवठा जास्त वाढवावयाचा. हें पद्धतशीर रीतीनें करण्याकरितां सर्व हुंडणावळीचे व्यवहार एकसूत्री झाले पाहिजेत. म्हणून सर्व हुंडणावळीचे व्यवहार एखाद्या मध्यवर्ती संस्थेमार्फतच होणें जरूर असतें; व या संस्थेला, अगर कचेरीला देशांतील मध्यवर्ती बँकेच्या नियंत्रणाखालीं असावें लागतें. या कचेरींत, परदेशी हुंड्या देऊन देशांतील चलन वाटेल तितकें मिळूं शकतें व तेंहि हुंडणावळीचा सरकारी दर जो असेल, त्या दरानें; पण देशांतील चलन देऊन परदेशी हुंड्या पाहिजे असल्यास खास सरकारी परवानगी पाहिजे व जर्मनींत असेंच आहे. कोणाला परदेशी हुंड्या व कोणत्या देशाच्या द्यावयाचें हें कोणता माल आयात करणें आहे, कोणत्या देशांतून करणें आहे, याचा विचार करूनच देण्यांत येतात. जर्मनींत व्यापारी संस्थांचें संघटन आहे; त्यांचा सल्ला घेऊन योजनेप्रमाणें सरकार परवानगी देते, व मग हुंडणावळ

मिळते. प्रवासी नेहमीं बाहेर जातात त्यांना अवश्य तेवढी हुंडणावळ देण्यांत येते. बाकीची हुंडणावळ योजनेप्रमाणें व्यापाराच्या दृष्टीनें वांटली जाते. खुद्द जर्मनींत नियंत्रण कसें काम देत गेलें हें पाहणें माहितीच्या दृष्टीनें अवश्य आहे. भांडवल परदेशीं जाऊं नये म्हणून नियंत्रण घालण्याचें सुरू झाल्याबरोबर, लबाडी होऊं लागली व नियंत्रण चुकवून कांहीं गोष्टी घडून आल्या. परदेशी व्यापारी, ज्यांना जर्मन मालाचा पैसा द्यावयाचा होता अगर ज्यांना जर्मन माल खरेदी करावयाचा होता, त्यांना जर १ पौंडाला पूर्वीपेक्षां जास्त मार्कस्–जर्मन नाणें, मिळालें तर हवेंच होतें. उलट जर्मन व्यापारी ज्यांना परदेशांतून माल आणावयाचा होता त्यांना या वाढलेल्या दरानें जरी हुंडणावळ मिळत असती तरी हवी होती. त्याचप्रमाणें परदेशी लोक ज्यांची मिळकत जर्मनींत होतीं, पण ती विकून तिचे पैसे ज्यांना नियंत्रणामुळें आपले देशांत नेणें कठीण झालें होतें, त्यांना वाटेल त्या भावानें हुंडणावळ घेऊन आपली जिंदगी स्वदेशीं न्यावयाची होती. या परिस्थितीमुळें पुष्कळ लबाडया झाल्या. गरजू लोक, हुंडणावळ न घेतां परस्पर व्यवहार करूं लागले. त्याबरोबर सरकारनें अशा प्रकारचे व्यवहार करणें बेकायदेशीर ठरविलें. जर्मन माणसानें परदेशी रोखे घेणें बेकायदेशीर ठरविलें. जर्मन नोटा परदेशी धाडणें बंद व बेकायदेशीर केलें. कांहीं देशांत असल्या नोटा म्हणजे देशांतील बाहेर गेलेल्या नोटा परत आणणेंसुद्धां बेकायदेशीर आहे. त्याचप्रमाणें जर्मन व्यापाऱ्यानें मागविलेला माल, अर्थात् परवानगीनें, योग्य किंमतीस मागविला कीं नाहीं हेंसुद्धां तपासणें सुरू केलें. कारण एकाला परवानगी मिळाली कीं, माल तितकाच मागवावयाचा पण किंमत जास्त लावण्यास परदेशीं व्यापाऱ्यांस सांगावयाचें व त्यांस तेवढी किंमत द्यावयाची; पण जो फरक असेल तो परदेशी व्यापाऱ्यानें, जर्मन व्यापाऱ्याची ठेव म्हणून जमा करावयाची. अशीं उदाहरणें घडूं लागलीं, म्हणून किंमती तपासणें सुरू केलें. तात्पर्य, जर नियंत्रण पूर्ण व यशस्वी व्हावयाचें असेल तर, त्या कामीं पूर्ण दक्षताहि अवश्य आहे. परदेशांत जें अल्प मुदतीचें कर्ज जर्मनीला होतें त्या बाबतींत तें अगदीं हलक्या हप्त्यानें घेण्याचा करार करण्यांत आला, व त्याचबरोबर तेच हप्ते पुनः नवीन कर्ज म्हणून समजावयाचे असें ठरलें, हें कर्ज हुंडणावळीचा दर कमी होत गेल्यानें आपोआपच कमी होत गेलें. अशा रीतीनें जर्मनीनें हुंडणावळीला असलेली मागणी नियंत्रित केली. त्याचबरोबर देशांत ज्या कोणाजवळ परदेशी चलन, अगर परदेशी हुंड्या असतील त्या सर्व, सरकारला सरकारी भावांत विकल्या पाहिजेत असा कायदा केला. त्याचप्रमाणें जर्मनींतून परदेशांत जाणारा जो माल अगर ज्याबद्दल परदेशांतून किंमत

मिळणार होती त्या सर्वांची किंमत, म्हणजे परदेशी हुंडया, या सर्व सरकारला ठरलेल्या सरकारी दरांत विकल्याच पाहिजेत असा कायदा केला. जर्मन व्यापाऱ्यानें लंडनला माल धाडला, हुंडी काढली कीं ती त्यानें सरकारी दरानें मध्यवर्ती कचेरीस विकलीच पाहिजे, परस्पर त्याला कांहीं व्यवहार करतां येत नाहीं. याप्रमाणें जर्मनीनें हुंडणावळीचा पुरवठा वाढविला. माल परदेशीं धाडतांना किंमत कमी लावावयाची, व प्रत्यक्ष किंमत परदेशांत घेऊन फरक असेल तो, तेथील व्यापाऱ्याकडे जमा ठेवावयाचा हेहि प्रकार झाले. त्याबरोबर परदेशीं जाणाऱ्या मालांच्या किंमती तपासण्याचें काम सरकारनें हातीं घेतलें व सरकारनें किंमती मान्य केल्याशिवाय आयात व निर्यात मालाचा व्यवहार करणें बंद झालें.

नियंत्रणाला सुरुवात केल्याबरोबर कित्येक व्यापाऱ्यांचीं खातीं बंद झालीं. जे परदेशीं व्यापारी जर्मनींत व्यवहार करीत होते, व ज्यांच्या शिल्लका "राईश बँकेंत" होत्या, त्या बँकेनें खातेंबंद करून ठेवल्या, म्हणजे त्या व्यापाऱ्याचें नांवें जमा, पण ती त्याला सरकारी परवानगी घेतल्याशिवाय मिळावयाची नाहीं. खुद्द जर्मनींत मामुली खर्चाकरितां, जेवढी रक्कम लागेल तेवढीच, उचल करण्याची परवानगी मिळे. यामुळें या परदेशीं व्यापाऱ्यांना आपली शिल्लक जर्मनींतून स्वदेशीं नेतां येईना. जर्मन आयात व्यापारी या परदेशीं व्यापाऱ्यांना रोख जर्मन चलन मार्कस् देत व ते त्या व्यापाऱ्यांच्या खातीं जमा होत, पण खातेंबंदी व्यवहार झाल्यामुळें अर्थात् सर्व रकमा जर्मनींत राहत. त्याचप्रमाणें फक्त सरकारी कर्ज जें जर्मनीला युद्धाचे नुकसानीबद्दल द्यावयाचें होतें, त्याशिवाय इतर कर्जफेडीसाठीं पैसा परदेशीं जाऊं दिला जाणार नाहीं असें १९३३ चे जूनमध्यें जर्मन सरकारनें जाहीर केलें; त्याबरोबर जर्मनींतील ऋणकोनीं, आपल्या परदेशी सावकारांच्या खातीं जर्मनींत कर्जफेडीच्या रकमा जमा केल्या; त्या पुन्हां खातेबंद व्यवहारांत पडल्या. ज्यांना ज्यांना जर्मनींतून रकमा स्वदेशीं न्यावयाच्या होत्या, त्यांना त्यांना त्या नेतां आल्या नाहींत. या खातेबंदी पद्धतीनें, त्यांच्या नांवें त्या जर्मन मध्यवर्ती बँकेंत जमा राहिल्या. या रीतीनें "राईश बँकेकडे" पुष्कळ रक्कम जमा झाली. त्याचा परिणाम परदेशी व्यापारी नाइलाजानें कमी घेऊन तडजोड करूं लागले म्हणजे १०० चे ४० घेतले म्हणजे तेवढी हुंडणावळ राईश बँक त्यांना देई; व तेवढीच रक्कम त्यांना स्वदेशीं नेण्यास मिळे. असल्या तडजोडी पुष्कळ झाल्या. त्यांतून झालेल्या फायद्याचा एक निधि करून त्यांतून "राईश बँक" कांहीं वस्तूंच्या निर्यात मालाला उत्तेजन मिळावें, त्यांचें उत्पादन जर्मनींत व्हावें, म्हणून मदत देत असे. या प्रकारामुळें परदेशी व्यापारी त्यांच्या

देशांतील चलनांत किंमत मिळेल अशी हमी घेतल्याशिवाय जर्मनीशीं व्यापार करण्यास तयार होईनासे झाले. पण जर्मनीनें सर्व जर्मन उद्योगधंद्यांवर कर बसवून त्यांतून निर्यात मालाच्या व्यापारास मदत केली.

हुंडणावळीच्या कडक नियंत्रणामुळें परदेशांशीं व्यापार करतांना फिरणारी बाकी कशी द्यावयाची याचे करार प्रथम करावयाचे व मग माल धाडावयाचा असे होऊं लागलें. माल धाडणारें राष्ट्र आपल्या नागरिकांचें नुकसान होऊं नये म्हणून जर्मनी-कडून आपल्या चलनांत मालाची किंमत मिळेल असे करार करून घेऊं लागलें. या करारांचें साधारण स्वरूप म्हणजे ज्या देशांत जर्मनीचा माल जाईल, त्याची किंमत त्याच देशांतील मध्यवर्ती बँकेंत, एक निधि काढून जमा करावयाची, व या रकमेतून या देशांतील ज्या व्यापाऱ्यांनीं जर्मनींत माल धाडला असेल त्याची किंमत त्यांना आदा करावयाची; जर शिल्लक राहिली तर तिचा कांहीं भाग "राईश बँकेला" व कांहीं भाग जर्मन सरकारचे त्या देशांतील सावकार असल्यास त्यांस त्यांचे कर्जफेडीपोटीं द्याव-याची. असेच करार ज्या ज्या राष्ट्रांत हुंडणावळ सर्वस्वीं सरकारी नियंत्रणाखालीं झालेली आहे त्यांच्याशीं व्यापाराबाबत होऊं लागले. असल्या करारांमुळें ज्या देशांत नियंत्रण आहे, त्या देशांत आयात मालाचा व्यापार वाढूं लागतो व त्याबरोबर निर्यात व्यापारहि वाढणें क्रमप्राप्त होतें. १९३५ सालीं जर्मनी, व युगोस्लाव्हीया या देशांत असाच करार झाला. जर्मनींत युगोस्लॉव्ह माल खूप आला पण शेवटीं युगोस्लॉव्ह व्यापाऱ्यांना जर्मन माल घेऊन, येणें असलेल्या रकमेची फेड करून घ्यावी लागली. कांहीं वेळां भरणा करण्याचें करारांचें स्वरूप थोडें निराळें असतें. वरील करारांत निधींतून रक्कम मिळेपर्यंत व्यापाऱ्यांना थांबावें लागतें. कारण प्रथम त्या देशांतून माल आला पाहिजे, त्याची रक्कम निधींत जमा झाली पाहिजे, व मग तींतून पाळीनें माल निर्यात करणाऱ्या व्यापाऱ्यांना रक्कम मिळणार! यांत कालहरण, व्याजाचें नुकसान होतें म्हणून रोख किंमत देण्याचे करार होऊं लागले. त्याचा नमुना म्हणून १९३४ सालीं इंग्लंड व जर्मनींत जो करार झाला तो पाहण्यासारखा आहे. कराराप्रमाणें जर्मनीनें, दोन महिन्यांपूर्वीच्या महिन्यांत जितक्या किंमतीचा माल इंग्लंडला धाडला असेल त्याच्या ५५ टक्के किंमतीचा माल इंग्लडांतून जर्मनींत आयात करावा. राहिलेल्या ४५ टक्क्यांतून व्याज व अन्य खर्च वजा जातां जी शिल्लक राहील ती, "राईश बँकेनें" वाटेल तशी वापरावी. यामुळें व्यापारांत बरीच सुधारणा झाली. इंग्लिश व्यापाऱ्यांना दोन महिन्यांत मालाची किंमत मिळेल अशी खात्री मिळाली. त्याचप्रमाणें जर्मन व्यापाऱ्यांना, ज्याला परवानगी मिळाली त्यांना माल मागविल्या-

नंतर दोन महिन्यांत हुंडणावळ मिळेल अशी खात्री वाटूं लागली. तथापि हुंडणावळीचें नियंत्रणामुळें पुष्कळ वेळां जर्मनीला जेथें स्वस्त मिळेल तेथें न घेतां, जेथें हुंडणावळीमुळें सोयीचें पडेल तेथें माल विकत घ्यावा लागला; पण त्याचबरोबर जर्मनीशीं व्यापार करणाऱ्या राष्ट्रांना अजिबात बुडण्यापेक्षां मागील घेण्यापोटीं जर्मनी जो देईल तो माल घ्यावा लागला; हें जर्मनींतच झालें असें नाहीं, तर हुंडणावळीवर नियंत्रण होऊं लागल्यामुळें जगांतील आंतरराष्ट्रीय व्यापारावर परिणाम झाला आहे. तो कमी झाला असून त्याचें स्वरूप पण बदललें आहे; किंबहुना आंतरराष्ट्रीय व्यापाराची सर्वच घडण या नियंत्रणाच्या धोरणानें बदलून गेली आहे.

---

# २९. सुवर्ण परिमाण

हुंडणावळीसंबंधीं विचार करतांना ज्या देशांतील चलनांत एकच परिमाण आहे, त्या देशांतील हुंडणावळींत मोठया प्रमाणांत फेरफार होत नाहींत असें दिसून आलें. जगांतील निरनिराळया राष्ट्रांतील चलनें, पूर्वी सोनें अगर चांदी यावरच आधारलेलीं असत. अद्याप कांहीं राष्ट्रांतील चलनें चांदीवरच आधारलेलीं आहेत. पण जगांतील देशादेशांतील व्यापार इतका वाढत गेला आहे व आंतरराष्ट्रीय व्यवहार इतके मोठया प्रमाणांवर होत आहेत कीं, जगांतील हे व्यवहार चुकते करण्याकरितां प्रत्येक राष्ट्राला सारखे प्रयत्न करावे लागतात. सर्व देशांतील चलनें जर एकाच धातूचीं असतीं तर सर्वांचीच सोय झाली असती. आज हुंडणावळीमुळें जे अनंत घोंटाळे उत्पन्न होतात, व्यापारावर अनिष्ट परिणाम होतात, ते बरेंच टळलें असतें. आजहि जगांतील व्यवहारांत, आंतरराष्ट्रीय व्यवहारांत, अखेर बाकी चुकवावयाची म्हणजे सोनेंच धाडून ती चुकवावी लागते. परदेशीं सोनें धाडण्याचें टळावें म्हणून नाना तऱ्हेचे उपाय करून, हुंडणावळीचे दर कमीजास्त करून आयातनिर्यात व्यवहाराची तोंडमिळवणी करण्याचें सत्र सारखें सुरू असतें. वास्तविक पैसा म्हणजे वस्तूंच्या किंमतींचें माप. त्याचप्रमाणें हुंडणावळ म्हणजे आयातनिर्यात व्यवहारांची किंमत मापणारी एक गोष्ट. पण व्यवहारांत मापानें धान्य मोजलें व त्यानें भाक्षिलें असें होत नाहीं. पोत्यांतून बाहेर अगर राशींतून पोत्यांत टाकतांना माप कांहीं धान्यावर परिणाम करूं शकत नाहीं, त्याची किंमत बदलूं शकत नाहीं. पैसा व हुंडणावळ हीं मात्र विलक्षण प्रवृत्तीचीं मापें आहेत. दोन्हीहि योजलेल्या व्यवहारांत भयंकर परिणाम करतात, व आपत्ति ओढवून आणतात. या आपत्तीचें स्वरूप आतांपर्यंत आपण पाहिलें आहे. त्यांत आणखी निरनिराळया देशांतील चलनें निरनिराळया परिमाणाचीं असतील तर आपत्तींत आणखी भर पडते हेंहि पाहिलें. निदान जगांत सर्व देशांतील चलनें जर एकच परिमाण, एकाच धातूवर म्हणजे सोन्यावर आधारलेली असतील तर, कांहीं आपत्ति कमी होतील व व्यवहारांत जास्त सोय व सुलभपणा येईल.

देशांदेशांतील व्यापार, सर्व देशांत सोन्याचें चलन असल्यास सुलभ होईल हें उघड आहे. सर्व देशांना मान्य असणारें एकच आंतरराष्ट्रीय चलन असावें व तें फक्त आयात निर्यात व्यवहारांत कामीं आणावें, असें कित्येक म्हणतात. आजच्या राजकीय परिस्थितींत तें शक्य नाहीं. पण 'सुवर्णचलन' जर सर्व देशांत असतें तर तितकीच सोय झाली असती. आंतरराष्ट्रीय व्यवहारांत तितकीच सुलभता येती. प्रत्यक्ष देशांतील व्यवहारांत कोणतें कां चलन असे ना; पौंड असो, रुपया असो, डॉलर असो, पण जोंपर्यंत हें चलन सोन्यावर आधारलेलें आहे, तोंपर्यंत त्या देशाला आपलें चलनविषयक धोरण वाटेल तसें आंखतां येत नाहीं. हुंडणावळीचा दर स्थिर राखावा लागतो. तसें न केल्यास आंतरराष्ट्रीय व्यापारापासून होणाऱ्या फायद्यास मुकावें लागतें. सर्वच देशांत चलन सोन्यावर आधारलेलें असल्यामुळें, हीं सर्व चलनें एका दृष्टीनें एकमेकांस बांधलीं गेलीं असतात. कारण प्रत्येक चलनाचें प्रमाण सोन्याशीं ठरलेलें असतें. सोन्याची किंमत जी असेल त्याप्रमाणें या प्रत्येक चलनाची किंमत राहील व सोन्याची किंमत, जगांत सोन्याला जी मागणी असेल व जो पुरवठा होईल. त्यावर अवलंबून राहील. एका गाडीला एकच घोडा असला म्हणजे घोडयाची गति जशी असेल त्याप्रमाणें गाडीची गति, जर एकाच गाडीला अनेक घोडे व तेहि कांहीं उंच, कांहीं ठेंगू, कांहीं चपळ, कांहीं लद्द, असे असले, तर प्रत्येकाची गति निराळी, व गाडीची गति अमक्याच घोडयाचे गतीवर अवलंबून आहे, हें सांगणें कठीण. त्याचप्रमाणें व्यवहारांत अनेक चलनें असलीं व तीं भिन्न गोष्टींवर अवलंबून असलीं, म्हणजे कोणाचा काय परिणाम होईल अगर परस्परांशीं काय नातें राहील हें सांगणें कठीण. पण एकच परिमाण असले म्हणजे सोनें हेंच सर्व चलनांचा आधार असेल तर, सोन्याच्या किंमतीवर प्रत्येक देशांतील चलनांची किंमत, त्याची क्रयशक्ति, वस्तु खरेदी करण्याची ताकद अवलंबून राहील. सर्व देशांत भावांतील चढउतार सारख्या प्रमाणांत राहतील; म्हणून प्रत्यक्ष सर्वमान्य आंतरराष्ट्रीय उपयोगाकरितां खास चलन काढलें काय अगर सर्व देशांतील चलनें सोन्यावर आधारलेलीं असलीं काय, दोहोंचा परिणाम सारखाच होईल.

सर्व देशांत सुवर्ण परिमाण असावें अगर चलनें सोन्यावर आधारलेलीं असावीं याचा अर्थ देशांतील चलनांचें जें प्रमाण असेल, जे मुख्य नाणें असेल, त्याची किंमत सोन्याच्या निश्चित प्रमाणाचे किंमतीइतकी असावी; म्हणजे तें सोनें विकून जेवढ्या वस्तु मिळतील, तितक्याच वस्तु, तें चलन, तें नाणें विकून मिळाल्या पाहिजेत. मग तें चलन कोणत्या कां स्वरूपाचें असे ना, त्याची बैठक वर लिहिल्याप्रमाणें सोन्यावर

आधारलेली असली पाहिजे. ही गोष्ट तीन प्रकारांनीं करतां येण्यासारखी आहे. (१) संपूर्ण सुवर्ण परिमाण (२) सामान्य सुवर्ण परिमाण (३) सुवर्ण विनिमय परिमाण. (१) संपूर्ण सुवर्ण परिमाण म्हणजे त्या देशांतील चलन सोन्याचें नाणें असून त्या नाण्यांत पूर्णपणें सोनें असावयाचें, कोणीहि नाणीं टांकसाळींत न्यावींत, व त्याचें सोनें करून लगडी घ्याव्यात अगर लगडी नेऊन तितक्या वजनाचीं नाणीं टांकसाळींतून घ्यावींत. नाणीं गाळण्याला, अगर परदेशीं धाडण्याला बंदी नाहीं, त्याच-प्रमाणें टांकसाळींत नाणीं पाडण्यास सोनें दिलें असतां, तीं फुकट पाडून मिळतील, त्याचप्रमाणें नाणीं दिलीं असतां तीं फुकट गाळून लगडी देण्यांत येतील. या पद्धतीस संपूर्ण सुवर्ण परिमाण म्हटलें जातें. इंग्लंडमध्यें १९१४ सालचे महायुद्धा-पूर्वीं याप्रमाणें चलन होते. सॉव्हिरिन नाणें ११३ [illegible] ग्रन वजनाचें असून त्यांत $\frac{११}{१२}$ शुद्ध सोनें होतें, व $\frac{१}{१२}$ इतर मिश्र धातु, नाणें टिकविण्याकरितां घालण्यांत येत असत. त्याची किंमत ११३ ग्रन सोन्याचे किंमतीपेक्षां फारशी कमी नसे. नाणें गाळण्यास प्रतिबंध नव्हता. तीं परदेशीं धाडण्यासहि प्रतिबंध नसे. त्याचप्रमाणें सोनें टांकसाळींत दिलें असता फुकट नाणीं पाडून मिळण्यांत येत. मुख्य मुद्दा म्हणजे नाण्याची किंमत व त्यांतील सोन्याची किंमत सारखी असे. एक औंस सोनें विकून जेवढे पदार्थ बाजारांत मिळतील तेवढेच ४ पौंड ५ शि. देऊन मिळत असत. कारण ४ पौंड ५ शिलिंगांतील सोनें वरील हिशेबानें १ औंस असे. ( २ ) सामान्य सुवर्ण परिमाण म्हणजे देशांतील मध्यवर्ती बँक अगर सरकार ठरलेल्या भावांत सोनें विकत घेतें अगर विकतें. सोन्याचे आयातनिर्यातीवर बंदी नाहीं. पण प्रत्यक्ष व्यवहारांत सोन्याचें नाणें नाहीं; त्याऐवजीं कागदी नोटा. यामुळें प्रत्यक्ष नाणें म्हणून सोन्याचा उपयोग नाहीं. पण चलनाची किंमत सोन्यांत कायम राखण्या-करितां मध्यवर्ती बँक अगर सरकार, ठरलेल्या दरानें सोनें घेण्यास व विकण्यास तयार. लोकांना ठरलेल्या भावांत सोनें मिळतें म्हणून सोन्याचीं नाणींच पाहिजेत असें वाटेनासें होतें. त्यामुळें देशांत थोडें सोनें असूनसुद्धां भागतें. इंग्लंडमध्यें याप्रमाणें चलनाची स्थिति १९२५ ते १९३१ चे सप्टेंबरपर्यंत होती; त्यानंतर इंग्लंडनें हें धोरण सोडलें. ( ३ ) सुवर्ण विनिमय परिमाण याचा अर्थ देशांतील चलन सोन्याचें नाहीं, अगर ठराविक दरानें सरकार सोनें देत घेत नाहीं, पण देशांतील चलनाची किंमत हुंडणावळीपुरती सोन्याचे किंमतींत ठरवावयाची व त्या दरानें हुंडणावळ कायम ठेवावयाची. हिंदुस्थानांतील चलन रुपया, पण रुपयाची किंमत हुंडणावळी-साठीं सोन्यांत १८ पेन्स ठरविलेली आहे, व तो दर स्थिर ठेवण्याची जबाबदारी

रिझर्व बँकेवर आहे. रुपयाची किंमत परदेशीं कायम ठेवण्याची जबाबदारी त्याच कारणानें रिझर्व बँकेवर कायद्यानें आहे. रिझर्व बँक सोनें ठराविक दरानें देत नाहीं. मात्र १ रुपयास ८·४७५१२ ग्रेन सोनें, या दरानें भाव ठरविलेला आहे. किती देशी चलनाला किती सोनें मिळावयाचें हें ठरविलें जातें. अर्थात् तें परदेशी व्यवहाराकरितांच मिळावयाचें. हें प्रमाण बदलण्याचा हक्क अर्थात् त्या त्या देशाला आहे. या पद्धतीमुळें, परदेशी व्यवहार चुकता करण्याकरितां सोनें उपयोगीं पडतें. मात्र देशांत चलन म्हणून सोन्याचें नाणें नाहीं. पण देशांतील चलन सोन्याशीं निगडित असल्यामुळें व तें प्रमाण ती हुंडणावळ, स्थिर ठेवण्यासाठीं सरकार अगर मध्यवर्ती बँकेला, परदेशी विशेषतः ज्या देशांशीं जास्त व्यापार असेल त्या देशांत सोनें सांठवून ठेवावें लागतें. याच कारणाकरितां हिंदुस्थानांतील रिझर्व बँकेचें पुष्कळ सोनें लंडनमध्यें शिल्लक असतें. हुंडणावळीचा दर व रुपयाची परदेशांतील किंमत कायम ठेवण्याकरितां या शिल्लकेचा उपयोग ती करीत असते. अर्थात् ही सर्वच शिल्लक सोन्यांत नसते. कांहीं सुवर्ण रोख्यांत असते त्यामुळें व्याजहि मिळतें. पण त्याबरोबरच या रोख्यांची किंमत कमी झाल्यास नुकसानहि पोंहोचण्याचा संभव असतो. या पद्धतींत प्रत्यक्ष सोनें देशाबाहेर राहतें व त्याचा उपयोग आयातनिर्यात व्यवहार चुकता करण्याकडे होतो. बहुतेक राष्ट्रें जीं पूर्वी सुवर्णचलनवालीं होतीं तीं आतां या पद्धतीचा स्वीकार करूं लागलीं आहेत. या तीन पद्धतींपैकीं, कोणतीहि पद्धत जरी देशानें अमलांत आणली असली तरी तो देश, सुवर्णपरिमाणाशीं बांधलेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें सुवर्णपरिमाणाशीं ज्यांचें चलन बांधलें गेलें आहे त्या त्या देशांतील हुंडणावळीचे दर परस्परांशीं निश्चित असतात. कारण प्रत्येक देशाच्या चलनाचें प्रमाण सोन्याशीं ठरलेलें असते, व तें देऊन सोनें अगर सोन्याचें चलन आंतरराष्ट्रीय व्यवहाराकरितां मिळत असतें; मग प्रत्येक चलनाचें प्रमाण सोन्याशीं ठरलेलें, तर परस्परांशीं पण त्यांचें प्रमाण निश्चित असणार हें उघड आहे. रुपयाची सोन्यांत किंमत ठरलली व पौंडाची पण सोन्यांत ठरलेली, मग रुपयाची पौंडांत पण किंमत ठरलेलीच असणार हें उघड आहे. व ही हुंडणावळ जी सोन्याच्या प्रमाणानें ठरलेली असते तींत फेरफार फारच थोड्या प्रमाणांवर होतात, व ते फेरफार होऊं नयेत, म्हणून व हुंडणावळ ठरलेल्या भावांत रहावी म्हणून, सरकार व मध्यवर्ती बँका प्रयत्न करीत असतात, व जे फेरफार होतात ते रवानगी खर्चाच्या प्रमाणानें, हें मागें पाहिलें आहे. सुवर्ण परिमाणाशीं बांधलेल्या देशांना आपल्या देशांतील चलनांत कमीजास्त करून वस्तूंच्या किंमती वाटेल

त्याप्रमाणें कमीजास्त करतां येणार नाहींत. आयात मालावर निर्बंध घालून अगर कर बसवून देशाला वस्तूंच्या किंमती वाढवितां येतील अगर कमी करतां येतील. पण चलनांत ढवळाढवळ करून तें साधणार नाहीं. कारण चलन सोन्याशीं जोडलें गेलें आहे. त्यामुळें वस्तूंचें भाव या सर्व देशांत प्रमाणानें वाढतील अगर कमी होतील. कारण त्या त्या देशांतील चलनाची किंमत सोन्याच्या प्रमाणाच्या किंमतीशीं निश्चित केलेली असते; व सोन्याची किंमत जशी बदलेल, जशी कमीजास्त होईल, त्या प्रमाणांत या देशांतील भावांत बदल होईल. जेथें हुंडणावळीचे दर ठरलेले नाहींत अगर हुंडणावळीचे दर कायम ठेवण्यासाठीं कांहीं संघटना नाहीं, नियंत्रण नाहीं तेथें त्या देशांत चलन वाढवून वस्तूंच्या किंमती वाटेल तेवढ्या वाढवितां येतील कायम ठेवतां येतील, अगर कमी करतां येतील; व हें करतांना अन्य देशांत काय चाललें आहे हेंहि पाहण्याचें कारण नाहीं. कारण देशांतील चलन सोन्याशीं जोडलेलें नाहीं. हुंडणावळ निश्चित नाहीं म्हणून सोन्याच्या किंमतीवर चलनाची किंमत अवलंबून नाहीं. त्यामुळें चलनांत कांहीं ढवळाढवळ केली तरी चालू शकते. हुंडणावळीचे दर, जे राहतील त्याप्रमाणानें दोन्ही चलनांतील किंमतीचें प्रमाण राहील. म्हणजे अमुक वस्तु इतकें चलन दिलें म्हणजे या देशांत मिळते, तीच वस्तु त्याच प्रमाणांत, त्या देशांत घेण्यांत तेथील चलन किती द्यावे लागेल हें काढलें म्हणजे, जें प्रमाण दोन्ही चलनांत निघेल त्या प्रमाणांत हुडणावळीचे दर राहतील. हुंडणावळीचा दर हा चलनाचलनाच्या किंमतीच्या प्रमाणाचा निदर्शकच असतो. दोन्ही चलनांना समान असा सोन्याचा आधार नसल्यामुळें हुंडणावळींत फार फेरफार होतात; व त्याचे तात्कालिक परिणाम तीव्र होतात व अखेरीस तो दर, चलनाच्या किंमतीचा निदर्शक कसा होतो याचें पूर्ण विवेचन मागें आलेंच आहे. सुवर्ण परिमाणाशीं जोडलेल्या देशांना परस्परांच्या हुंडणावळीचे दर निश्चित ठेवावे लागतात; त्यांना चलनांत ढवळाढवळ करून पदार्थांचे भाव कमीजास्त करतां येत नाहींत. समजा, सुवर्ण परिमाणाशीं जोडलेल्या देशाचा आयातनिर्यात व्यापाराचा आढावा प्रतिकूल आहे. त्याला देशांत जर सुवर्णाचीं नाणीं चलन म्हणून असतील तर तीं परदेशीं धाडावीं लागतील. त्यामुळें देशांतील चलन कमी होईल, त्याबरोबर देशांतील उत्पन्न पैशाचे दृष्टीनें कमी होईल. देशांत तयार केलेल्या व देशांतच खपणाऱ्या वस्तूंचे भाव कमी होतील. पण परदेशांत खपणाऱ्या वस्तूंचे भाव परदेशांतील तत्सम वस्तूंचे भावांचे मानानें कमी होणार नाहींत. देशांत पैशाचे दृष्टीनें उत्पन्न कमी झालें म्हणजे खर्चहि कमी होईल. त्याचा परिणाम परदेशांतून माल कमी येऊं लागेल; व देशांत वस्तूंच्या उत्पादनांत खर्च (येनचे उदाहरण)

कमी झाल्यामुळें निर्यात मालाला उत्तेजन मिळेल, माल परदेशीं जास्त जाऊं लागेल, व शेवटीं सर्व आयातनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी त्यांच्या किंमतींत होईल. व हा मेळ बसतांना हें सर्व सुवर्ण परिमाण असल्यामुळें आपोआप होतें; चलनांत ढवळाढवळ करून हा मेळ बसविण्याचें कारण पडत नाहीं.

प्रत्यक्ष व्यवहारांत सोन्याचें नाणें चालू आहे असें क्वचितच आहे. देशांतील सोनें मध्यवर्ती बँकेजवळ सांठलेलें, व व्यवहारांत मात्र कागदी नोटा चलन म्हणून चालू असतात, पण जर परदेशी व्यवहाराची बाकी द्यावयाची असेल व त्यासाठीं सोनें धाडणें प्राप्त असेल तर, तें त्यांना धाडावें तरी लागेल, नाहीं तर अन्य मार्गानें आयात-निर्यात व्यवहाराची त्यांचे किंमतींत तोंडमिळवणी करण्याकरितां मेळ घडवून आणण्याकरितां प्रयत्न करावे लागतील. म्हणजे निर्यात व्यवहार वाढवावयाचे व त्याकरितां पैशाचे दृष्टीनें देशांतील उत्पन्न कमी करावयाचें, उत्पादन खर्च कमी करावयाचा, व ही गोष्ट मध्यवर्ती बँक व्याजाचा दर वाढवून करूं शकते, त्याचप्रमाणें रोखे विकून करूं शकते. तात्पर्य, देशांतील चलन कमी करून निर्यात व्यापाराला उत्तेजन द्यावयाचें व आयात व्यापाराला आळा घालावयाचा याप्रमाणें मेळ घडवून आणावयाचा; उलट जर देशांत सोनें जास्त येऊं लागलें तर मध्यवर्ती बँक अगर सरकार, जें कोणी चलनविषयक धोरण ठरवीत असेल त्यानें बँक रेट—व्याजाचा दर कमी करावयाचा, व्यवहारांत पैसा वाढवावयाचा; त्याबरोबर पैशाचे दृष्टीनें उत्पन्न वाढतें व उत्पादन खर्च वाढतो. त्याबरोबर त्याचा परिणाम, निर्यात व्यापार कमी होतो व आयात माल जास्त येतो; कारण या देशांत पैसा वाढला व शेवटीं पुनः आयातनिर्यात व्यवहाराचा मेळ बसून सोनें येण्याचें कमी होतें. ज्या देशांत सुवर्ण विनिमय परिमाण आहे, त्या देशांत असेंच होतें, पण प्रसंगविशेषीं मेळ करण्याचा परिणाम सर्वस्वीं त्या देशाला भोगावा लागतो. उदाहरणार्थ इजिप्त देश घेऊं. इजिप्त देशामध्यें आयात माल जास्त आला, परदेशीं व्यापाराचा आढावा प्रतिकूल झाला, तर इजिप्तनें जी शिल्लक इतर देशांत बाकी देण्याकरितां ठेविली असेल त्यांतून परदेशांचें देणें द्यावें लागेल. इजिप्तनें इंग्लंडला बाकी द्यावयाची आहे. इजिप्तची जी शिल्लक लंडनमध्यें, व जी बहुतेक सुवर्ण रोख्यांत असेल ती कमी होईल. पण इंग्लंडमध्यें त्यामुळें व्यवहारांत पैसा वाढलच असें नाहीं, व तो न वाढल्यामुळें इजिप्त व इंग्लंड यांतील आयातनिर्यात व्यवहारांत मेळ बसणार नाहीं. जर इजिप्तनें हुंडणावळीचा दर जो निश्चित असेल तो कायम ठेवला तर, सर्व बाकी लंडनमधील शिल्लकेंतून इजिप्तला द्यावी लागेल. पण जर इजिप्तमध्यें सुवर्ण

विनिमय परिणामाऐवजीं, सुवर्ण परिमाण असतें तर, इजिप्तनें प्रत्यक्ष सोनें इंग्लंडमध्यें धाडलें असतें, व त्याचा परिणाम इंग्लंडमधील चलनांत भर घालण्यांत झाला असता. व मग आयातनिर्यात व्यापारांत मागें सांगितलेल्या पद्धतीनें मेळ बसला असता. देशांतील चलन सुवर्णपरिमाणाशीं जोडलेलें असलें म्हणजे, प्रत्यक्ष सोनें प्रत्येक देशांत किती असावें, हें त्या त्या देशांतील बँकांची व्यवहारपरंपरा, देवघेवीच्या पद्धति, व एकंदर देशांतील उत्पादनाच्या किंमतीवर अवलंबून राहील. जेथें देवघेवींत चेकचा उपयोग मोठ्या प्रमाणांत आहे, कागदी नोटा, व बँकेकडील ठेवी पण मोठया प्रमाणांत आहेत, त्या देशांत प्रत्यक्ष सोनें कमी असलें तरी भागतें. देशांतील उत्पादनाची किंमत अगर देशाचें उत्पन्न मोजतांना सर्व देशाचें कांहीं एका मापानें मोजतां येणार नाहीं. देशाचें उत्पन्न, म्हणजे देशांतील उत्पादनाची किंमत, व त्या देशांत परदेशांतून व्याजाबद्दल, अगर अन्य कारणांबद्दल जें उत्पन्न येतें तें मिळून. अर्थात् जर एखाद्या देशाचें उत्पन्न जास्त असल तर, त्याजजवळ जास्त सोनें असणें अवश्य आहे, व जर एखाद्या देशांत उत्पादन वाढलें तर त्या देशांत साहजिकच सोनें जास्त जाऊं लागतें. उलट जर देशांतील उत्पादन कमी होऊं लागलें तर सोनें बाहेर जाऊं लागतें, व याप्रमाणें सोन्याची ये जा, चालू असतेच.

वास्तविक सुवर्ण परिमाणाशीं चलन जोडल्यानें अनेक फायदे व सोयी असतात; मुख्य सोय म्हणजे सोन्याची आयातनिर्यात होऊन आपोआप देशादेशांतील आयातनिर्यात व्यवहारांत तोंडमिळवणी होते, मेळ बसतो. पण ही जी आपोआप मेळ बसण्याची क्रिया देशांतील मध्यवर्ती बँका, अगर सरकार, जें कोणी चलनविषयक धोरण ठरवीत असेल, तें पुष्कळ वेळां होऊं देत नाहीं. जर बँका नसत्या व सर्व पैसा म्हणजे सोन्याचीं नाणींच असतीं, तर परदेशाची बाकी चुकविण्याकरितां नाणीं धाडावीं लागलीं असतीं. देशांतून नाणीं, हा पैसा बाहेर गेला म्हणजे देशांतील वटचलन कमी झालें असतें, त्याचा परिणाम देशाचें वटउत्पन्न कमी होऊन आयात माल कमी झाला असता, व अखेरीस आयातनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी होऊन नाणें बाहेर जाणें बंद पडलें असतें, ही व्यवहाराची जुळवणूक आपोआप झाली असती. पण हल्लीं बहुतेक देशांत चलनावरील अधिकार मध्यवर्ती बँकांकडे आहेत व मध्यवर्ती बँक देशांत वटचलन काय प्रमाणांत असावें हें ठरविते. बाहेरून आलेलें सोनें, चालू चलनांत भर घालील व त्यामुळें किंमती वाढतील या कारणासाठीं मध्यवर्ती बँक हें सोनें, हा बाहेरून आलेला पैसा, व्यवहारांत येऊं देणार नाहीं. चलन वाढलें, वटपैसा वाढला तर पैशाचा पुरवठा मुबलक होईल व त्याचा परिणाम कांहीं काळ

भरमसाट तेजी होऊन किंमती वाढतील, व पुनः एकदम बाजार घसरेल ही आपत्ति असते. ती टाळण्याकरितां, मध्यवर्ती बँक पुष्कळ वेळां बाहेरून आलेलें सोनें, आलेला पैसा, व्यवहारांत येऊं देत नाहीं. पुष्कळ वेळां भांडवलवाले आपलें भांडवल परदेशीं गुंतवितात, त्या देशांतील सरकारी रोख्यांची खरेदी करतात, पण कोणत्या वेळीं हे लोक रोखे विकतील, व आपलें भांडवल काढून नेतील, याचा भरंवसा नसतो. म्हणून अशा तऱ्हेनें परदेशांतून आलेला पैसा व्यवहारांत चलन होऊं देणें व त्यामुळें किंमती वाढूं देणें धोक्याचें असतें. किंमतीबरोबर पैशाचे दृष्टीनें उत्पन्नहि वाढतें, हें सर्व जाणून बाहेरून आलेलें सोनें बँक अलग ठेवते. चलनाच्या दृष्टीनें तें निर्जीव ठरतें, कारण तें व्यवहारांत येत नाहीं अगर त्याच्या तारणावर बँक पत वाढवीत नाहीं. त्यामुळें त्याचा परिणाम नाणेंबाजारांवर कांहींच होत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी परदेशांतील भांडवलवाले आपली रोकड अमेरिकेंत मोठया प्रमाणांत रोख्यांत गुंतवूं लागले, त्याबरोबर साहजिकच परदेशांहून सोनें तेथें फार आलें पण त्याचा परिणाम नाणेबाजारांवर व देशांतील वटउत्पन्नावर होऊं दिला नाहीं; व हें करण्याकरितां तेथील बँकांना मध्यवर्ती बँकेनें जास्त रोकड शिल्लक ठेवण्यास भाग पाडलें व त्याचप्रमाणें सरकारनें सोनें खरेदी करून तें व्यवहारापासून अलग व अलिप्त ठेविलें, व नाणेबाजाराची स्थिति चलनाच्या दृष्टीनें कायम ठेवली, त्यामुळें वस्तूंचे भावहि व्यवस्थित राहिलें, देशांतील पैशाचे दृष्टीनें उत्पन्नहि स्थिर राहिलें. तीच गोष्ट इंग्लंडनें गेल्या कांहीं वर्षांत केली. कित्येक परदेशी भांडवलवाल्यांनीं राजकीय परिस्थितीमुळें आपली संपत्ति इंग्लंडमध्यें आणविली, त्यामुळें साहजिकच इंग्लंडमध्यें सोनें जास्त येऊं लागलें, तथापि, त्याचा परिणाम बँक ऑफ इंग्लंडनें बाजारावर फारसा होऊं दिला नाहीं. कारण या सोन्याचा मोठा भाग अलग करून निर्धास्त ठेवून चलनांत येऊं दिला नाहीं. त्याचप्रमाणें परदेशी व्यापाराचा आढावा प्रतिकूल असतो, त्यावेळीं वास्तविक सोनें बाहेरदेशीं जाणें व त्यायोगें देशांतील पैशाची मागणी कमी होणें, व त्याबरोबर आयात मालाची मागणी पण कमी होऊन शेवटीं मेळ बसणें हें आपोआप होतें. पण मध्यवर्ती बँकेला हें संकोचनाचें (Deflation) धोरण पसंत नसलें तर ती हें चालूं देणार नाहीं. देशांतील वटपैसा कमी झाला म्हणजे उत्पादन कमी होतें, बेकारी वाढते, म्हणून वरील मार्ग ती स्वीकारणार नाहीं. देशांतील पैशाची मागणी कमी न करतां अगर व्यवहारांतील वटचलन कमी होऊं न देतां मध्यवर्ती बँक प्रत्यक्ष सोनें देऊन परदेशी व्यापारांतील बाकी फेडील. पण जर परदेशी व्यापार सारखा प्रतिकूल राहत गेला तर सोनें फार वेळपर्यंत देऊन भागणार नाहीं. परदेशांत

कर्ज काढून तेथेंच मागील देण्याची वजावट करणें हा एक मार्ग आहे. तेथें मध्यवर्ती बँकेची शिल्लक असल्यास त्यांतून देणें हाहि एक मार्ग आहे. पण शिल्लकेला मर्यादा असते; व कर्जहि पुनः फेडावें लागतें. हे उपाय तात्पुरते ठरतात. जर परदेशी व्यापार सारखा प्रतिकूल राहत गेला, व देश सुवर्णपरिमाण सोडूं इच्छित नाहीं अगर चलन निर्मूल्य करूं इच्छित नाहीं; ( चलन निर्मूल्य करणें म्हणजे त्याचें सोन्याशीं ठरलेलें प्रमाण नाममात्र करणें ) अशा स्थितींत सरकारनें हस्तक्षेप करून देशांतील भांडवल परदेशीं जाण्याला बंदी केली पाहिजे, त्याचप्रमाणें परदेशांतून येणाऱ्या मालावर बंधनें घालून आयात व्यापार कमी केला पाहिजे; तरच तरणोपाय आहे, तरच आयात-निर्यात व्यवहाराची तोंडमिळवणी होईल व परदेशाची बाकी देण्याचा प्रश्न राहणार नाहीं. परदेशी व्यापाराचा आढावा प्रतिकूल झाला असतांना, सुवर्ण परिमाण कायम ठेवावयाचें असेल तर, एक संकोचनाचें ( Deflation ) धोरण स्वीकारलें पाहिजे, अगर परदेशांत जाणाऱ्या भांडवलाला बंदी केली पाहिजे व परदेशांतून येणाऱ्या मालावरहि बंदी घालून तो कमी केला पाहिजे. उत्पादन कमी होतें बेकारी वाढते, या भीतीनें पैशाची मागणी कमी करून संकोचनाचें धोरण स्वीकारण्यास पुष्कळ राष्ट्रें कचरतात. सुवर्ण परिमाण अजीबात सोडावें तर हुंडणावळीचे भावांत फेरफार होऊन तात्कालिक परिणाम तीव्र होतात, म्हणून तें न सोडतां आयात मालावर बंदी घालणें, तो कमी करणें व आपल्या देशांतील भांडवल परदेशांत न जाऊं देणें हें धोरण बहुतेक स्वीकारलें जात आहे.

सोनें परदेशीं जाऊं नये म्हणून प्रत्येक देशाचे प्रयत्न चालू असतात. तरी सुद्धां, मागें सांगितल्याप्रमाणें सोन्याची ये जा, देशादेशांतून चालू असते. हुंडणावळी-वर जेव्हां नियंत्रण नसतें, तेव्हां ज्या गोष्टींचा परिणाम हुंडणावळीवर होतो, त्याच गोष्टींचा परिणाम, सुवर्ण परिमाण नसलें तरी होतो, व त्यामुळेंहि सोन्याची ये जा देशांदेशांतून होते. चलनविषयक धोरण, भांडवलाच्या आंतराष्ट्रीय हालचाली, प्रत्यक्ष आयातनिर्यात मालांचा व्यापार वगैरे गोष्टींचा परिणाम जेव्हां हुंडणावळीवर नियत्रण नसतें तेव्हां होतो, हें मागें आपण विस्तारानें पाहिलें आहे. तसेंच, याहि गोष्टींचे परिणाम सुवर्णपरिमाण असतांना होतात. मात्र हुंडणावळ स्थिर असल्यामुळें तींत फरक होत नाहीं, तर त्या परिणामांचें स्वरूप सोन्याच्या आयातनिर्यातींत दिसून येतें. हुंडणावळ नियंत्रित नसली म्हणजे तिचे दरांत कमीजास्त होऊन त्याचा परिणाम अखेरीस आयातनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी होण्यांत कसा होतो, हें मागें आपण पाहिलें आहे. सुवर्ण परिमाण असलें म्हणजे अशीच तोंडमिळवणी प्रत्यक्ष

सोनें बाहेरून येऊन होते. हुंडणावळ नियंत्रित नसली म्हणजे तिच्या दरांतील होणारे फरकांमुळें तात्कालिक परिणाम तीव्र होतात, तसें सुवर्ण परिमाण असतांना मात्र होत नाहीं. त्याचप्रमाणें हुंडणावळ नियंत्रित असली म्हणजेहि होत नाहीं. समजा, सुवर्ण परिमाणाला जोडलेल्या देशानें पैसा मुबलक केला, त्याबरोबर पैशाचे दृष्टीनें उत्पन्न वाढलें, व खर्चेही वाढला, आयात मालाला मागणी वाढली, व तो जास्त येऊं लागला. उत्पन्न वाढलें याचा अर्थ उत्पादन सामग्रीचीहि किंमत वाढली. त्याबरोबर उत्पादनाची किंमत वाढली, याचा परिणाम बाहेरदेशीं जाणारा माल महाग झाला म्हणजे तो कमी जाऊं लागेल; त्यामुळें परदेशी व्यापार घटेल व परदेशी व्यापाराचा आढावा प्रतिकूल होऊन या देशाला सोनें बाहेर धाडणें जरूर पडेल. सुवर्णपरिमाणाशीं जोडलेल्या इतर देशांनीं आपलें चलनविषयक धोरण जर कायम ठेवलें तर या देशानें पैसा मुबलक करून जें धोरण स्वीकारलें होतें तें त्याला सोडावें लागेल; कारण अनियमित कालपर्यंत सोनें परदेशी धाडणें परवडणार नाहीं म्हणून स्वीकारलेलें धोरण बदलून, बाहेर जाणारा सोन्याचा प्रवाह थांबवावा लागेल, सुवर्ण परिमाणाशीं जोडलेल्या सर्व देशांनीं चलनविषयक एकच धोरण स्वीकारलें तर गोष्ट निराळी. सर्वांनीच पैसा मुबलक करण्याचें अगर पैसा कमी करण्याचें धोरण स्वीकारलें तर तेवढयामुळें सोनें इकडून तिकडे जाणार नाहीं; कारण सर्व देशांतील पैशाचे दृष्टीनें उत्पन्न सारख्या प्रमाणांत कमी अगर जास्त होईल. चलनविषयक धोरणांत एकाच देशानें फरक करून फार वेळ टिकविणें शक्य नाहीं; पण तें स्वीकारल्यामुळें त्याचा परिणाम सोन्याच्या आयातनिर्यातीवर तेवढयापुरता होतो हेंहि तितकेंच निश्चित आहे.

त्याचप्रमाणें देशांतील भांडवल परदेशीं जाऊं लागलें म्हणजे त्याचा परिणाम देशांतील आयातनिर्यात व्यवहारांवर होऊन आढावा प्रतिकूल होतो व सोनें बाहेर जाऊं लागतें. तो प्रवाह थांबवावयाचा म्हणजे, देशांतील पैशाची मागणी कमी करावयाची, संकोचनाचें धोरण स्वीकारावयाचें, त्याचा परिणाम परदेशांतून येणारा माल कमी येऊं लागतो; व परदेशी जाणाऱ्या मालाला उत्पादनखर्च कमी झाल्यामुळें उत्तेजन मिळतें; त्याची निर्यात वाढते. परदेशीं जाणारें भांडवल सोन्यांत जाऊं न देतां निर्यात मालांत धाडतां येतें. याप्रमाणें सोनें बाहेर जाणें थांबवितां येतें. तसेंच ज्या देशांत परदेशी भांडवल येतें, सोनें येतें, तेथें पैसा मुबलक होतो, त्यामुळें तो देश परदेशांतून जास्त जास्त माल मागवूं लागतो; व त्यामुळें सोन्याचा येण्याचा प्रवाह बंद होतो. पण हें सर्व जुळून येईपर्यंत सोन्याची ये जा चालू असते.

सुवर्ण परिमाणाशीं जोडलेल्या देशांदेशांतील आयातनिर्यात मालाचा व अन्य गोष्टींचा व्यापार वाढला कीं त्याचा परिणामहि सोनें इकडून तिकडे जाण्यांत होतो. एकाद्या देशांत लोकसंख्या वाढली कीं पैशाची मागणी वाढते. तुलनेनें त्या देशांतील उत्पन्न व वस्तूंचे भाव कमी होतील, भाव कमी झालें म्हणजे परदेशीं माल जास्त जातो, व आयात माल कमी येऊं लागतो, त्याचा परिणाम व्यापारी आढावा अनुकूल होऊन सोनें त्या देशांत येऊं लागतें. त्याचप्रमाणें देशांत भांडवल, इतर देशांचे मानानें वाढूं लागलें कीं, त्याचा परिणाम उत्पादनाची वाढ होण्यांत होतो. त्यामुळें त्या देशांतून माल बाहेर जाणें जास्त जास्त सुरू होतें. जास्त भांडवल झाल्यामुळें देशांत तयार होणाऱ्या व खपणाऱ्या वस्तूंच्या किंमती कमी होतील; पण आयात मालाच्या कमी होणार नाहींत. देशांतील निर्यात व्यवहार जास्त होईल व त्यामुळें देशांत सोनें येऊं लागेल. त्याचप्रमाणें यांत्रिक प्रगतीमुळें एकाद्या देशांत उत्पादन स्वस्त करणें शक्य झालें तर लागलीच त्या देशाचे निर्यात व्यापारावर परिणाम होऊन तो वाढेल, व परदेशांतून सोनें येईपर्यंत देशांतील पैशाचें उत्पन्न बदलणार नाहीं; व देशांतच खपणाऱ्या वस्तूंचे भाव कमी होतील; आयात मालांच्या किंमतींत बदल होणार नाहीं. आयातनिर्यात व्यवहारांत, निर्यात व्यवहार जास्त जास्त होऊं लागल्याबरोबर सोनें येऊं लागले, तें येऊं लागल्याबरोबर देशांत पैसा जास्त होऊन आयात मालाची मागणी वाढेल; ज्या देशांतून सोनें आलें तेथें उत्पादनखर्च कमी होऊन तेथून येणारा माल जास्त जास्त येईल; व शेवटीं पुनः आयातनिर्यात मालाची तोंडमिळवणी होईल, त्यांचा मेळ बसेल. पण तोंपर्यंत सोन्याची ये जा चालू राहीलच. तात्पर्य, हुंडणावळीचा दर कमीजास्त करून आयतनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी करणें हा एक मार्ग; हुंडणावळीवर नियंत्रण ठेवून तीच गोष्ट करणें हा दुसरा मार्ग; व सोन्याची आयातनिर्यात करून तेंच घडवून आणणें हा तिसरा मार्ग; पण या तिन्ही मार्गांनीं या आयातनिर्यात व्यवहारांचा किंमतींत मेळ बसत असतो. म्हणजे अखेरीस आयात मालाची फेड, त्यांच्या किंमतीइतका निर्यात माल धाडूनच करावी लागते. निर्यात माल धाडणें शक्य नसल्यास आयात माल कमी करूनच मेळ बसवावा लागतो; ही मुख्य मुद्द्याची गोष्ट आहे.

आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या सोयीचे दृष्टीनें सुवर्ण परिमाण सर्वत्र असणें हें सर्वांत चांगलें. आयातनिर्यात व्यापाराची तोंडमिळवणी सोन्याच्या आयातनिर्यातीनें आपोआप होतें. पण मध्यवर्ती बँका व सरकार हस्तक्षेप करतात, त्यामुळें ही क्रिया कशी कठीण होते हें वर पाहिलेंच आहे. जर या पद्धतीत हस्तक्षेप न होईल तर भाव वाढणें

अगर कमी होणें सर्वत्र सारख्या प्रमाणांत होईल कारण सोन्याचे पुरवठ्यावर व त्याचे किंमतीवर हें सर्व अवलंबून असणार, व सोनें हें तर या सर्व चलनांचा आधार; पण प्रत्यक्ष व्यवहारांत सुवर्णपरिमाणाशीं जोडलेलीं राष्ट्रें निरनिराळें धोरण स्वीकारतात; ही सर्व राष्ट्रें एकविचारानें चलनविषयक धोरण ठरवितील तरच हुंडणावळींत धोका उत्पन्न होणार नाहीं. चलनविषयक धोरण कोणतें कां असे ना; तें सर्वांनीं स्वीकारलें पाहिजे, म्हणजेच हुंडणावळ स्थिर राहील, व सोन्याच्या येण्यानें अगर जाण्यानें देशांतील उत्पन्नावर व बाजारावर तीव्र परिणाम होणार नाहींत. हल्लीसुद्धां जास्त आलेलें सोनें निर्जीव करून चलनांत येऊं न देतां परिस्थिति समतोल ठेवण्याचे प्रयत्न होत असतात. बहुतेक राष्ट्रांतून सोन्याच्या आयातनिर्यातीवर नियमन आहेच, पण हीच गोष्ट जास्त पद्धतशीर रीतीनें सुवर्णपरिमाणावर असलेलीं सर्व राष्ट्रें संघटना करून करूं शकतील. पण गेल्या २० वर्षांत सुवर्णपरिमाणावर असलेल्या राष्ट्रांनीं स्वार्थानें वारंवार चलनविषयक धोरणें बदलून सुवर्णपरिमाण यशस्वी होऊं दिलें नाहीं. सुवर्णपरिमाणाशीं जोडलेल्या राष्ट्रांत परस्परांतील हुंडणावळीचे दर हे निश्चित असतात, व ही सर्वांत माठी सोय, आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या दृष्टीनें आहे. हुंडणावळ स्थिर असली म्हणजे व्यापारी, व अन्य आंतरराष्ट्रीय व्यवहार करणारांना एकंदर वातावरण विश्वासाचें वाटतें. देशांतील नाण्याची किंमत जर दररोज बदलणारी असेल तर व्यवहारांत किती धोका आहे, हें सहज समजूं शकतें. निःशंकपणें माणसें चलन घेतात, तें देऊन वस्तू घेतात व वस्तू देऊन तें घेतात. कारण आजचा रुपया कांहीं उद्यांला सतरा आणे होणार नाहीं अगर पंधरा आणेहि होणार नाहीं हा विश्वास असतो. परदेशी व्यापारांत हुंडणावळीचे दर निश्चित असले म्हणजे व्यापाऱ्यांना नुसतें सोयीचें पडतें एवढेंच नव्हे तर त्यांना धोका नसतो. त्याचप्रमाणें सुवर्णपरिमाणावर असलेलीं राष्ट्रें एका दृष्टीनें एक चलन वापरणारीं राष्ट्रें मानिलें तरी तें अयोग्य नाहीं. कारण प्रत्यक्ष चलन जरी प्रत्येक राष्ट्राचें निराळें असलें तरी, त्याचें सोन्याशीं प्रमाण ठरलेलें असतें. यामुळें आंतरराष्ट्रीय व्यापार वाढण्याला मदतच होते. एका देशांत एकच चलन असलें म्हणजे जशी सोय होते, व जो फायदा होतो, तोच सुवर्ण परिमाण सर्व देशांत असल्यानें होतो. जगांत सर्वमान्य आंतरराष्ट्रीय चलन अगरपरिमाण नाहीं, परंतु त्यांतलेत्यांत सुवर्ण परिमाणच सर्वमान्य होण्यासारखें आहे.

सुवर्ण परिमाण अनेक दृष्टींनीं योग्य, तथापि तें टिकविलें जाईल, त्याला धक्का दिला जाणार नाहीं, हा विश्वास व्यापारी वर्गांत सदोदित असला पाहिजे; पण गेल्या २० वर्षांतील अनुभव अगदीं उलट आहे. कोणत्या वेळीं राष्ट्रें हें परिमाण ठेवतील

व सोडतील याचा भरंवसा राहिला नाहीं. सुवर्ण परिमाणामुळें आंतरराष्ट्रीय व्यापारांत वाढ होत जाते, त्याचा विस्तार वाढतो, हे सगळे फायदे तें कायम राहील हा विश्वास सर्वत्र असेल तर शक्य आहे. १९२९ पासून युरोपमधील जीं राष्ट्रें सुवर्ण परिमाणावर होतीं त्यांनीं एकसूत्री धोरण ठेविलें नाहीं. खुद्द इंग्लंडमध्यें अनेक वेळां चलनविषयक धोरण बदलण्यांत आलें. कोणी नाण्यांतील सुवर्णप्रमाण कमी करून कोणी वाटेल त्या वेळेस चलनाचें सोन्याशीं असलेलें प्रमाण बदलण्याचा हक्क मुद्दाम जाहीर करून, कोणीं सोनें खरेदी घेणें व देणें हे दर सारखे न ठेवून, त्यांत मुद्दाम तफावत ठेवून, अनेक प्रकारांनीं धोरणें बदलून सर्वत्र व्यापारी जगांत अविश्वास उत्पन्न केला. सुवर्णपरिमाण सोयीचें असेल त्या वेळीं तें स्वीकारावयाचें, असें असेल तर, त्यापासून कांहीं फायदा नाहीं. सर्वत्र सुवर्णपरिमाण हें कायदेशीर परिमाण झालें तरच त्यापासून होणारे फायदे, व्यापारविस्तार वगैरे, मोठ्या प्रमाणांत होणें शक्य आहे. नुसता एकादा-दुसरा देश, सुवर्णपरिमाण ठेवणारा असण्यापासून कांहीं उपयोग नाहीं. हुंडणावळीचे दर निश्चित असण्यापासून होणारा फायदा, जितके जास्त देश सुवर्णपरिमाणाशीं जोडलेले असतील तितका अधिक. सुवर्णपरिमाण निर्दोष आहे असें आजच्या अनुभवानें कोणी म्हणणार नाहीं. बँकांची जी परंपरा व व्यवहाराची पद्धत पडलेली आहे, त्यामुळें सोन्याच्या आयातनिर्यातीमुळें आयातनिर्यात मालांची तोंडमिळवणी होण्यापेक्षां, व्याजाचे दर कमीजास्त करून भांडवल जास्त कमी कसें गुंतवितां येईल हें पाहण्याकडे प्रवृत्ति असते. पैसा हा प्रतिनिधि आहे, साधन आहे, याकडे कमी लक्ष व तों साध्य आहे हें मुख्य धोरण सर्व भांडवलशाही व्यवहारांत प्रधान असल्यामुळें हा परिणाम होणें अगदीं साहजिक आहे. सोन्याचा आयातनिर्यात मालांच्या आयातनिर्यातींतील फरक सांधून घेण्याकरितां उपयोग व्हावयाचा; आणि हा तर मुख्य सद्गुण सुवर्णपरिमाणाचा; पण सोन्याची आयातनिर्यातच पुष्कळ वेळां वरील फरक वाढवीत असते, व त्याचें कारण भांडवलवाल्यांची व्याज मिळविण्याची आशा हें होय. भांडवल परदेशीं धाडलें म्हणजे जास्त व्याज मिळेल, तें धाडावयाचें म्हणजे सोनें धाडावयाचें म्हणजेच जास्त जास्त माल परदेशीं धाडावयाचा; तथापि हा दोष सुवर्णपरिमाणाचा नाहीं, त्याच्या दुरुपयोगाचा आहे. कांहीं देशांत सोनें जास्त व कांहीं देशांत त्याचा पुरवठा कमी आहे. हाहि दोष सुवर्णपरिमाणाचा नाहीं. तर कांहीं देश जरूरीपेक्षां सोनें जास्त ठेवतात, त्याचप्रमाणें कांहीं देशांतील सोन्याचें उत्पादन, इतर देशांतील उत्पादनापेक्षां जास्त यामुळें ही तफावत दिसते. सुवर्ण-रिमाणामुळें भाव वाढत नाहींत, हें म्हणणें पण बरोबर नाहीं. सुवर्णपरिमाणाशीं

जोडलेल्या एखाद्याच देशाला पैसा मुबलक करण्याचें धोरण स्वीकारून किंमती वाढवितां येत नाहींत. पण सर्वत्र सुवर्णपरिणामाशीं जोडलेल्या देशांना संघटितपणें हें करतां येईल हें उघड आहे. एकट्यानें करावयाचें म्हणजे अखेरीस त्यास तें धोरण सोडावें लागतें अगर सुवर्णपरिमाणाशीं संबंध सोडावा लागतो. सुवर्णपरिमाणीं देशांत जरी सोन्याचा पुरवठा हळुहळू वाढत असला तरी पुष्कळ वेळां, एखाद्या देशांत एकदम पैशाला जास्त मागणी येते. ती अल्प काळ टिकते ही गोष्ट निराळी, पण त्यामुळें त्या देशांत तेवढ्या काळापुरते वस्तूंचे भावांत बदल होतात व भाव वाढतात. सुवर्णपरिमाण असतांनासुद्धां चलनविषयक धोरणावर पुष्कळ गोष्टी अवलंबून असतात, हें मागें पाहिलेंच आहे. सुवर्णपरिमाण असलें म्हणजे वाटेल तें चलनविषयक धोरण स्वीकारतां येत नाहीं हें खरें. प्रसंगविशेषीं सवर्णपरिमाण ठेवावयाचें म्हणजे पैशाची मागणी कमी करून संकोचनाचें धोरण स्वीकारावें लागतें; हें धोरण स्वीकारलें म्हणजे उत्पादन कमी होतें, बेकारी वाढते, एकंदर व्यापारावर मंदीचा परिणाम होतो. हें होऊं नये म्हणून १९२९ चे मंदींत बऱ्याच राष्ट्रांनीं सुवर्णपरिमाण सोडून दिलें. जेथें सुवर्णपरिमाण नाहीं तेथें चलनाची किंमत इतर देशांचे चलनांत कमी होते, व आपोआप आयातनिर्यात व्यवहारांचा मेळ बसतो. तेथें मुद्दाम व्यवहारांतील पैसा कमी करून, उत्पन्न कमी करून, मेळ बसविण्याची अवश्यकता पडत नाहीं, पण या पद्धतींत काय नुकसान होतें, हें मागें आलेंच आहे. तात्कालिक परिणाम किती तीव्र होतात, व परदेशी व्यापारावर कसा परिणाम होतो याबद्दल विचार मागें झालाच आहे. आयातनिर्यात व्यवहाराची तोंडमिळवणी करण्याकरितां अनेक मार्ग स्वीकारले जातात. त्यांपैकीं, कांहींचें विवेचन मागें केलें आहे. हुंडणावळीचे दर बदलून, हुंडणावळीवर नियंत्रण ठेवून, पैशाची मागणी कमी करून, संकोचनाचें धोरण स्वीकारून हें कसें करतां येतें हें येथपर्यंत पाहिलें. त्याचप्रमाणें नाण्याची सोन्यांतील किंमत कमी करून, म्हणजे नाण्यांतील सोन्याचें प्रमाण कमी करून, व त्याचप्रमाणें परदेशी व्यापारावर निर्बंध घालूनहि, ही तोंडमिळवणी करतात. सुवर्णपरिमाण ठेवून नाणें निर्मूल्य करून हें कसें घडतें ह्याचेसंबंधीं या भागांत विचार करून व्यापारावर निर्बंध घालून हें कसें घडवून आणतात हें पुढील भागांत पाहूं. पैशाची मागणी देशांत कमी करून संकोचनाचें धोरण न स्वीकारतां सवर्णपरिमाण सोडावयाचें नसेल तर, नाण्यांतील सोन्याचें प्रमाण, चलनांची सोन्यांतील किंमत कमी करावयाची हा एक मार्ग आहे. अडचण उपस्थित झाल्याबरोबर एका क्षणांत हा मार्ग स्वीकारतां येण्यासारखा आहे. अगर सवर्णपरिमाण सोडून द्यावयाचें व नंतर कांहीं दिवसांनीं,

पुनः या सुवर्णपरिमाणाचा स्वीकार करावयाचा, मात्र त्या वेळेस चलनांतील सोन्याचें प्रमाण, चलनांची सोन्यांतील किंमत, नाममात्र ठेवावयाची असेंहि कांहीं वेळां झालें आहे. सुवर्णपरिमाणावर असलेल्या सर्व देशांनीं हें नाणें निर्मूल्य करण्याचें धोरण स्वीकारलें तर परस्परांतील हुंडणावळीचे दर बदलणार नाहींत. फक्त प्रत्यक्ष सोन्याची किंमत कमी करणें, म्हणजे सोन्याची किंमत नवीन नाण्यांत, नवीन चलनांत, जास्त वाढलेली असेल. नाणें निर्मूल्य करणें याचाच अर्थ त्याची सोन्यांत किंमत कमी करणें, म्हणजे सोन्याची किंमत नवीन नाण्यांत, नवीन चलनांत वाढणारच. समजा, एका पौंडांत $\frac{११}{१२}$ भाग सोनें असतें तें जर $\frac{१}{१२}$ केलें तर, पूर्वीं $\frac{११}{१२}$ भागांत जेवढें सोनें होतें त्याची किंमत एक पौंड होती, आतां तेवढ्याच सोन्याची किंमत या नवीन पौंडानें ज्यांत $\frac{१}{१२}$ च सोनें आहे त्यांत, निदान ११ पौंड तरी होईल. तथापि ही वाढलेली सोन्याची किंमत नाममात्रच आहे. कारण पूर्वींपेक्षां जास्त वस्तू सोन्यानें खरेदी होत नाहात, तथापि सोन्याची किंमत अशा रीतीनें वाढली म्हणजे त्याचा परिणाम सोन्याच्या उत्पादनावर मात्र होतो. कारण उत्पादनाचा खर्च त्या प्रमाणांत वाढत नाहीं म्हणून उत्पादन जास्त करणें फायद्याचें होतें. अर्थात् चढाओढींत शेवटीं सर्वत्र उत्पादनखर्च वाढतो व त्यामुळें किंमती वाढलेल्या असूनसुद्धां सोनें जास्त काढणें परवडत नाहीं.

गेल्या कांहीं वर्षांत बऱ्याच देशांनीं आपलीं चलनें याप्रमाणें निर्मूल्य केलीं, त्यांची सोन्यांतील किंमत कमी केली. पण हें एक धोरणानें न केल्यामुळें त्यांच्यांतील हुंडणावळीचे दरांत अनेक बदल झाले. जगांतील सोन्याची किंमत १९३१ नंतर या धोरणामुळें नवीन चलनांत दुप्पट झाली आहे. त्याचबरोबर जगांतील सोन्याचे पुरवठ्यांतहि ५० टक्के भर पडली आहे. तथापि ज्यांनीं आपलें चलन निर्मूल्य केलें त्यांनीं स्वतःचा फायदा पाहिला, कारण त्यांना आयातनिर्यात मालांची तोंडमिळवणी करावयाची होती व त्यासाठीं हें धोरण स्वीकारलें. एका देशानेंच हें धोरण स्वीकार-ल्याबरोबर सुवर्ण परिमाणावर असलेल्या दुसऱ्या देशांचे चलनाशीं तुलना करतांना या देशाचे चलनाची किंमत कमी झाली; त्याबरोबर हुंडणावळीवर त्याप्रमाणें परि-णाम झाला. त्यामुळें सुवर्ण परिमाणाशीं जोडलेल्या देशांत, या देशांतून जाणारा माल जास्त जाऊं लागला, कारण त्यांना त्यांचें थोडें चलन देऊन या देशाचें चलन जास्त मिळूं लागलें म्हणून या देशांतून माल नेणें जास्त फायद्याचें झालें. अशा रीतीनें निर्यात व्यापाराला या धोरणानें उत्तेजन मिळून, आयात व्यापाराला आळा बसतो. कारण परदेशांतून माल मागवावयाचा तर त्यासाठीं या देशांत पूर्वींपेक्षां जास्त चलन

द्यावें लागतें; म्हणून साहजिकच आयात माल कमी होतो, परदेशीं मालाची किंमत त्या देशाचे चलनांत द्यावी लागते; तें चलन विकत घ्यावयाचें म्हणजे आपलें चलन पूर्वीपेक्षां जास्त द्यावें लागतें. या रीतीनें आयातनिर्यात व्यवहारांची शेवटीं तोंड-मिळवणी होते; अर्थात् हा उपाय जर सुवर्णपरिमाणावर असलेल्या इतर देशांनीं, आपलीं चलनें कायम ठेविलीं तर उपयोगी पडतो. या उपायानें आयातनिर्यात व्यापाराची तोंडमिळवणी होते; व सुवर्णपरिमाणहि सोडावें लागत नाहीं. पण नाण्यांत, चलनांत, याप्रमाणें सोन्याचें प्रमाण कमी करतांना जनतेचा विश्वास कायम असावा लागतो; व्यापारीवर्गाचा विश्वास कायम असावा लागतो; नाहींतर एकदां हें सोन्याचें प्रमाण कमी करणें सुरू झालें म्हणजे हुंडणावळ स्थिर राहणें शक्य नाहीं; सुवर्ण परिमाणहि मग नाममात्रच राहतें.

# ३०. परदेशी व्यापारावरील बंधनें

परदेशी व्यापारावर बंधनें घालून आयातनिर्यात व्यापाराची व व्यवहाराची तोंडमिळवणी करणें हाहि एक मार्ग आहे, असा उल्लेख मागील भागांत आला आहे. परदेशी व्यापारावर बंधनें नाहींत असा देश हल्लीं राहिला नाहीं. बंधनांचें स्वरूप व त्यांचा व्याप देशागणिक कमीजास्त आहे; पण बंधनरहित व्यापाराचें, आंतरराष्ट्रीय व्यापाराचें युग संपलें, यांत आतां शंका उरली नाहीं. निरनिराळ्या स्वरूपाचीं बंधनें घालण्यांत येत आहेत, कोठें वाहतुकीचे दर कमीजास्त करून, कोठें सार्वजनिक आरोग्याचें निमित्त करून, आणि कांहीं देशांत तर हुंडणावळ नियंत्रित करून, परदेशी व्यापारावर नियंत्रण बसविलें जात आहे. तथापि आज जो परदेशी व्यापार नियंत्रित करण्याचा मुख्य उपाय अवलंबिला जातो तो म्हणजे आयात मालावर बसविला जाणारा कर हा होय. आयात कर म्हणजे परदेशांतून येणाऱ्या मालावर बसविलेली जकात अगर कर याचें स्वरूप दुहेरी असतें. जी वस्तु देशांत उत्पन्नच होत नाहीं म्हणून परदेशांतूनच मागविणें जरूर असते, त्यावर हा कर बसविला तर, तो उत्पन्न वाढविण्याचे दृष्टीनें बसविला असें म्हणतां येईल. कारण देशांत ती वस्तु होत नाहीं म्हणून त्या वस्तूचें उत्पादन करणाऱ्या धंद्याला, उत्तेजन देण्यासाठीं अगर चढाओढीपासून संरक्षण देण्यासाठीं हा कर बसविला असें म्हणतां येत नाहीं. केवळ सरकारचें उत्पन्न वाढावें एवढाच हेतु त्यांत असतो म्हणून हा कर उत्पन्न स्वरूपाचा म्हणतां येईल. त्याचप्रमाणें जी वस्तू देशांतहि होते व बाहेरूनहि येते या स्थितींत बाहेरून येणाऱ्या वस्तूंवर कर बसविला व तितकाच कर देशांत होणाऱ्या त्याच वस्तूंवर बसविला तर तो कर पण उत्पन्नाचे स्वरूपाचा असतो. कारण देशांतहि तयार होणाऱ्या त्या वस्तूंवर तितका कर बसविला म्हणजे, त्या धंद्याला उत्तेजन मिळालें अगर संरक्षण मिळालें असें होत नाहीं. देशांतील वस्तूंवर याप्रमाणें जेव्हां कर बसवितात, तेव्हां त्याला 'एक्साईज ड्यूटी' अगर देशांतील जकात म्हणतात. ज्या वेळेस येणाऱ्या परदेशी वस्तूंवर कर बसतो पण त्याच वस्तु देशांत होतात, त्यांवर

कर बसत नाहीं, अगर तितक्या प्रमाणांत बसत नाहीं, त्या वेळेस या आयात कराचें स्वरूप देशांतील धंद्यांना संरक्षण देणारें असतें; म्हणून असल्या करांना संरक्षक जकात म्हणतात. परदेशांतून माल कमी यावा व परदेशांत जास्त जावा, हें ध्येय सर्वांत चांगलें, हा समज फार दिवसांपासून प्रचलित आहे, व परदेशांतून माल कमी यावा, याकरितां त्या मालावर कर बसविणें हाहि मार्ग आतां जुना झाला आहे. निर्यात माल परदेशांत जातो व तेथील लोक तो विकत घेतात, आयात माल देशांत येतो व देशांतील लोक तो विकत घेतात, तो जास्त घेतला गेला तर संपत्ती म्हणजे सोनें बाहेर धाडावें लागतें. तेव्हां आयात माल कमी केला म्हणजे संपत्ती देशाबाहेर जाणार नाहीं अशी ही विचारसरणी आहे ! ! शिवाय आयात मालावर कर बसविला म्हणजे सरकारला उत्पन्नहि मिळतें. तेव्हां आयात कर बसविणें हें लोकांना नेहमीं पसंत पडत असतें. निर्यात माल देशाबाहेर जास्त गेला म्हणजे तेवढी संपत्ती, तेवढें सोनें देशांत जास्त येतें; व निर्यात माल जास्त व आयात माल कमी अशी परिस्थिति घडवून आणावयाची तर सोपा मार्ग म्हणून आयात जकात बसविणें हा स्वीकारला जातो. प्रसंगविशेषीं निर्यात मालाचे व्यापाराला उत्तेजन मिळावें म्हणून, बाहेर जाणाऱ्या मालावर सरकार मदत (Bounty) देत असतें. मदत (Bounty) देण्यांत सरकारला पैसे द्यावे लागतात; आयात करानें सरकारला पैसे मिळतात.

आयात मालावर संरक्षक जकात बसवावी, कारण त्यामुळें देशांतील व्यापार वाढतो, लोकांना उद्योग मिळून बेकारी कमी होते; शिवाय मजुरीचे दर चांगले राहतात वगैरे कारणें देण्यांत येतात. आयात जकात बसवून उद्योगधंद्यांना संरक्षण मिळतें, त्याला उत्तेजन मिळतें, हें अगदीं बरोबर आहे. हिंदुस्थानांत पोलाद व साखर या दोन वस्तूंवर आयात जकात, संरक्षक आयात जकात, बसविल्यामुळें हे दोन धंदें हिंदुस्थानांत स्थापन झाले व रुजले; त्यांत आज हजारों कारागीर काम करीत आहेत. शिवाय हे धंदे स्थापन झाल्यामुळें इतर धंदे कमी झालें असें झालें नाहीं; अगर देशांतील एकंदर उत्पादन कमी झालें असेंहि झालें नाहीं, अगर देशांतून बाहेर जाणारा माल अगर निर्यात व्यापार, यामुळें कमी झाला असेंहि झालें नाहीं. या परिस्थितींत संरक्षक जकात बसविणें हें अगदीं योग्य आहे. संरक्षक जकातीमुळें देशांतील एक धंदा वाढून दुसरा कमी झाला अगर त्याचा परिणाम निर्यात व्यापार कमी होण्यांत झाला तर संरक्षक जकात बसविणें हें योग्य ठरणार नाहीं. या स्थितींत एका धंद्याची वाढ होईल, त्यांतील कामगारांना जास्त मजुरी मिळेल, ते जास्त होतील. लोक या धंद्यां-तील मालावर जास्त खर्च करतील त्यामुळें परदेशांतून येणाऱ्या मालावर कमी खर्च

होईल. आयात माल कमी झाला तर ज्या देशांतून तो येई त्या देशांतील लोकहि त्यांच्या देशांत येणारा परदेशी माल कमी घेऊं लागतील; त्याप्रमाणें हें चक्र फिरेल, म्हणून सरसहा संरक्षक जकात बसविणें योग्य ठरणार नाहीं. कोणत्या परिस्थितींत तें योग्य ठरेल याचें थोडेसें दिग्दर्शन वर केलें आहे.

संरक्षक जकातीमुळें व्यापार वाढतो, व विशेषत: देशांत कांहीं वस्तूंना म्हणजे ज्यांचे बाबतींत संरक्षण मिळालें आहे त्यांना नवीन पेठ तयार होते असें सांगितलें जातें; वस्तुत: व्यापार वाढत नाहीं. समजा, संरक्षण मिळण्यापूर्वी जेवढी विक्री एकाद्या वस्तूची असते, ती संरक्षक जकातीमुळें जास्त वाढते असें नाहीं, तर ती वस्तू पूर्वी मोठ्या प्रमाणांत बाहेरून येत असे, त्याऐवजीं आतां कमी येऊं लागेल. कारण देशांत तयार होणाऱ्या वस्तूनें तिची जागा घेतली. व्यापार वाढला नाहीं अगर नवीन पेठहि झाली नाहीं. आळींत पूर्वी एक दुकान होतें, त्या ठिकाणीं दोन झालीं म्हणून आळींत गिऱ्हाइकें वाढलीं नाहींत अगर त्यामुळें तीं गिऱ्हाइकें जास्त खरेदी करूं लागलीं असेंहि होणार नाहीं. संरक्षक जकातीमुळें वस्तूंच्या किंमतीवर काय परिणाम होतो तें पुढें पाहूं. संरक्षक जकातीमुळें नवीन गिऱ्हाईक उत्पन्न होत नाहीं, एवढें उघड आहे. संरक्षक जकातीमुळें नवीन धंदा स्थापला गेला अगर पूर्वीच्याच धंद्यांत वाढ झाली तर अर्थात् जास्त जास्त लोक कामास लागतील, व त्या मानानें बेकारी कमी होईल हें उघड आहे. पण ही परिस्थिति तात्कालिक आहे, कां कायम स्वरूपाची आहे, हें पाहिलें पाहिजे. जर एक धंदा वाढल्यानें देशांतील उत्पादन वाढलें व निर्यात व्यापार कमी झाला नाहीं, तर मग हा परिणाम टिकाऊ होईल. जर वाढलेल्या धंद्यामुळें आयात व्यापार कमी झाला, व त्याचा परिणाम देशांतील निर्यात व्यापार कमी होण्यांत झाला तर ज्या वस्तु परदेशांत जात होत्या, त्यांना परदेशांत मागणी कमी झाल्यामुळें त्यांचें उत्पादन कमी होईल, व त्या धंद्यांतील कामगार बेकार होतील. या परिस्थितींत संरक्षक जकातीनें बेकारी क्षणमात्र कमी केली व वास्तविक एका धंद्यांतून ती कमी करून दुसऱ्या धंद्यांत केली असें तिचें परिणामीं स्वरूप दिसेल. म्हणून संरक्षक जकातीनें जास्त लोकांस काम मिळेलच, रोजगार वाढेलच, असें नाहीं. एकंदर परिस्थितीवर तें अवलंबून असतें. संरक्षक जकात बसविली म्हणजे देशांतील धंद्यांतील मजुरीचे दर चांगले राहतात असें सांगण्यांत येतें तेंहि बरोबर नाहीं. मजुरीचे दर हे आंतरराष्ट्रीय व्यापाराची परिस्थिति असेल त्याप्रमाणें निरनिराळ्या देशांत राहतात. आयात मालावर जकात असेपर्यंत, तो माल देशांत उत्पन्न होईल, तो जास्त किंमतीनें विकला जाईल, हें उघड आहे. आयात

मालाची जी किंमत करांसह असेल, त्या मानानें देशांत तयार होणारा माल विकला जाईल. त्याच धंद्यांत काम करणाऱ्या कांहीं कारागिरांची मजुरी जास्त होईल हें खरें. पण देशांतील एकंदर मजुरीचे दरांवर याप्रमाणें परिणाम होईल असें मात्र नाहीं. उलट संरक्षक जकातीमुळें ती वस्तु कमी भावानें मिळाली असती, ती तशी मिळत नाहीं, हें नुकसान मात्र सर्व जनतेचें होतें. त्याप्रमाणें संरक्षण मिळालेला धंदा जर, मक्तेदारांच्या हातांत असेल तर, जास्त किंमतीमुळें होणारा फायदाहि एका अगर थोड्या लोकांच्या हातांत जाईल, त्याचप्रमाणें संरक्षक जकातीमुळें आयात व्यापार कमी होईल, त्याचा परिणाम देशांतील निर्यात व्यापारावर होऊन तोहि कमी होईल. जें उत्पादन बाहेर जात असे तें कमी होईल, व त्यांतील मजुरांचे दरहि कमी होतील.

संरक्षणामुळें मजुरीचे दर वाढतात, हें खरें नाहीं. उलट, एकंदर देशी व्यापारावर परिणाम होऊन परदेशी व्यापारापासून होणारा मुख्य फायदा म्हणजे ज्या देशांपासून वस्तु विकत घेतल्या असतां स्वस्त मिळतील, त्या न घेतां त्यावर कर बसवून, त्या महाग करून घेण्यांत येतात. देशांत संरक्षणाचे छत्राखालीं तयार झालेल्या वस्तु पण महागाईतच पडतात. आंतरराष्ट्रीय व्यापार श्रम विभागावर आधारलेला आहे. ज्या देशांत जी गोष्ट विशेष सोयीनें व कमी खर्चानें उत्पन्न करतां येते तीं त्यानें करावी, व इतर देशांनीं घ्यावी. पण संरक्षक जकातीमुळें हें श्रमविभागाचें तत्त्व एका देशापुरतेंच मर्यादित होतें, व संरक्षक जकात बसवितांना पुष्कळवेळां देशांत ज्याला संरक्षण द्यावयाचें तो धंदा स्थापणें व यशस्वी करणें जास्त सोईचें व कमी खर्चाचें आहे कीं नाहीं अगर चालू असल्यास पुढें चालू ठेवावा कीं नाहीं हें तितकेंसें लक्षांत घेतलें जात नाहीं. देशांत कांहीं धंदे चालू असतात व त्यांतील योजकांना नफा मिळत नाहीं, नुकसान होत असतें, त्यांचा फायदा व्हावा म्हणून संरक्षक कर बसविले जातात. भांडवलवाल्यांचें संरक्षण जनतेच्या जिवावर व पैशावर करून राष्ट्रीय कामगिरी केल्याचें श्रेय मिळविण्याचा हा एक मार्ग आहे!! देशानें कोठल्याहि परिस्थितींत संरक्षक जकात बसवूं नये, असें कोणी म्हणणार नाहीं. जगाची हल्लींची राजकीय परिस्थिति लक्षांत घेतां देशाचें परचक्रांपासून संरक्षण करण्याकरितां कांहीं वस्तूंचें उत्पादन देशांतच होणें जरूर आहे. उदाहरणार्थ, शस्त्रास्त्रांना अवश्य असणारें लोखंड व पोलाद तयार करणारे धंदे देशांतच स्थापन झाले पाहिजेत, व ते स्थापण्याकरितां अगर चालू ठेवण्याकरितां संरक्षण दिलें पाहिजे; तथापि असल्या धंद्यांचा विचार करतांना सोय अगर खर्च याचा विचार करणें चुकीचें, असें कोणी म्हणणार नाहीं. यांत होणारा स्वार्थत्याग जनतेला करणें

भाग आहे. या कामीं खर्च होणारी उत्पादनसामग्री जनतेच्या सुखांत अधिक भर घालण्याचे दृष्टीनें उपयोगांत आणतां आली असती पण ती आणतां येत नाहीं, याला राजकीय परिस्थिति कारण आहे. अर्थशास्त्राचे दृष्टीनें नसलें तरी राजकारणाचे दृष्टीनें या बाबतींत संरक्षक जकात क्षम्य ठरते. अर्थशास्त्राच्या, व्यवहाराच्या, दृष्टीनेंहि प्रसंगविशेषीं आयात अगर निर्यात मालावर कर बसविणें योग्य ठरतें. आयातनिर्यात व्यवहाराची तोंडमिळवणी करण्याकरितां व्यापारावर बंधन घालणें जरूर होतें. एखाद्या देशांत एकादी वस्तु अशी उत्पन्न होत असते कीं त्या देशाला जवळ जवळ त्या वस्तूंचे बाबतींत मक्तेदारी प्राप्त झाल्यासारखी असते. त्यावर जर त्या देशानें निर्यात कर बसवून आपला आयातनिर्यात व्यापाराचा मेळ बसविला तर तें चुकीचें होणार नाहीं. हिंदुस्थानांतील तागावर निर्यात कर बसविला अगर मलायांतून बाहेर जाणाऱ्या रबरावर कर बसविला तर अयोग्य नाहीं. १९२९ चें मंदींत युरोपांतील बऱ्याच राष्ट्रांनीं बाहेरून येणाऱ्या शेती मालावर नियंत्रण घातलें, त्यामुळें त्या मालाच्या किंमती वाढल्या नाहींत, त्यांची आयात कमी झाल्यामुळें या देशांतील व्यापार सरस झाला. अर्थात् ज्या मानानें आयात व्यापार कमी होतो त्या मानानें निर्यात व्यापारावरहि परिणाम होतो, पण तो होईपर्यंत मिळालेला फायदा कांहीं कमी नाहीं. देशांत सुरू झालेले धंदे जम बसेपर्यंत मोठ्या बिकट परिस्थितींत असतात. अशा वेळीं त्यांना संरक्षण देणें जरूर असतें. त्यांत घातलेलें भांडवल वायां जाऊं नये, देशांत जास्त जास्त उद्योग वाढावेत या दृष्टीनें होतकरू धंद्यांना संरक्षक जकातीमुळें मदत होते. त्यांना संरक्षण द्यावयाचें म्हणजे गिऱ्हाइकांना वस्तु महाग करावयाची हें उघड आहे. मग जर सर्व जनतेच्या स्वार्थत्यागावर हे उद्योधंदे वाढणार असले, प्रगतिपर होणार असले तर त्यांच्यांत होणारा नफा, सर्व जनतेच्या मालकीचा असावा, त्या धंद्याची मालकीसुद्धां जनतेची असावी, असें जर कोणी म्हटलें तर तें न्याय्य आहे. पण असें झालें तर मग भांडवलशाही राहत नाहीं. आज असलेल्या धंद्यांना उत्तेजन दिलें जातें; संरक्षण दिलें जातें, राष्ट्रांत उद्योगधंदे जास्त वाढावे या दृष्टीनें तें धोरण क्षम्यहि ठरेल.

मागें सांगितल्याप्रमाणें आज पूर्णपणें मोकळा, कोठेंहि बंधन नाहीं, असें आंतरराष्ट्रीय व्यापाराचें स्वरूप राहिलें नाहीं. बहुतेक देशांतून संरक्षक जकातीच्या भिंती उभारल्या आहेत. एका देशानें संरक्षक कर बसविला कीं लागलाच त्याचा प्रतिकार दुसरा देश त्याचप्रमाणें आयात मालावर कर बसवून करतो. नवीन सुरू केलेले धंदे म्हणून दिलेलें संरक्षण वर्षानुवर्षें चालूच असतें. एकदां संरक्षण दिलें कीं पुनः संरक्षण मागितलें जातें. कारण अन्य देशांनीं धोरण बदललेलें असतें. धंद्यांतील भांडवलवाले

वजनदार असतात; देशांतील राजकारण, भांडवलशाही देशांतील राजकारण, त्यांच्या इशाऱ्यावर चालत असतें. सरकार त्यांच्या विरुद्ध जाऊं शकत नाहीं; अधिक संरक्षण देण्यांत येतें. जनतेनें किती स्वार्थत्याग करावा याला मर्यादा राहत नाहीं. एकाद्या धंद्याला संरक्षण द्यावयाचें तर, त्याला कांहीं तरी मर्यादा असल्या पाहिजेत. त्या धंद्याला अवश्य लागणारा कच्चा माल बऱ्याच प्रमाणांत तरी देशांत होत असला पाहिजे. अवश्य लागणारें भांडवल पण देशी पाहिजे. त्याचप्रमाणें धंद्यांतील तज्ज्ञ व कुशल कारागीर देशांतील पाहिजेत अगर थोड्या वेळांत देशांत ते तयार होतील याची खात्री पाहिजे. पण या सर्वांपेक्षां एका ठराविक काळांत तो धंदा स्वावलंबी झाला पाहिजे, म्हणजे त्याला संरक्षणाच्या पांगुळगाड्याची अवश्यकता राहतां कामा नये. वर्षानुवर्षें संरक्षण द्यावयाचें म्हणजे देशांतील जनतेनें स्वार्थत्याग करून मूठभर लोकांचा स्वार्थ व संसार भागवावयाचा असें होतां उपयोगी नाहीं. जर तो धंदा सरकारी मालकीचा असेल तर, अर्थात् वरील आक्षेप लागू पडणार नाहींत. भांडवलशाहि पद्धतींत काय होतें याला अनुसरून वरील विवेचन आहे. कोणी असें म्हणतात कीं, संरक्षणाखेरीज इतर कारणांनीं बसविलेल्या जकातींच्या बाबतींत जेवढी जकात परदेशी मालावर, तेवढीच त्या मालाचे देशी उत्पादनावर बसविली म्हणजे, तें उत्पन्न सरकारला मिळेल; म्हणजे एका अर्थानें जनतेचा स्वार्थत्याग कमी होईल. पण या तऱ्हेनें अंतर्गत जकात बसवून मूठभर योजकांना होणारा फायदा त्यांचेपासून फारसा हिरावून घेतला जात नाहीं. शिवाय संरक्षक जकात नसती तर जी वस्तु स्वस्त मिळाली असती ती संरक्षक जकातीमुळें महाग झाली ही गोष्ट कांहीं अंतर्गत जकात बसवून अन्यथा होत नाहीं. परदेशांतील व देशांतील तो माल सारखाच महाग मिळतो.

संरक्षणाचें तत्त्व योग्य परिस्थितींत स्वीकारलें तर व्यवहाराचे, अर्थशास्त्राचे दृष्टीनेंहि ठीक असतें; पण प्रत्यक्ष अनुभव असा आहे कीं, ज्यांना स्वीकारावयास पाहिजे त्यांनीं थोड्या प्रमाणांत स्वीकारलें आहे व ज्यांनीं तें धोरण स्वीकारावयास नको त्यांनीं आपापले देशाभोंवतीं संरक्षक जकातीचे किल्ले उभे केले आहेत. मोकळ्या व्यापाराचें तत्त्व वर्षानुवर्ष सांगून त्यायोगें मिळेल तेवढा फायदा घेऊन, इतर देशांत जास्त उद्योगधंदे वाढल्याबरोबर मोकळ्या व्यापाराचे तत्त्वाला सोडचिठ्ठी देऊन इंग्लंडसारखे देश आज संरक्षक जकातीचे कामीं पुढाकार घेत आहेत. तात्पुरता उपाय म्हणून संरक्षण स्वीकारलें जात आहे असें नाहीं; तर देशाचे औद्योगिक जीवनाचा एक भाग म्हणून हें होऊं लागलें आहे. व्यापारी आढावा प्रतिकूल आहे व आयातनिर्यात व्यवहारांचा मेळ बसवावयाचा आहे, या आपत्तींत आयात माल

बंद करणें अगर त्यावर कर बसवून तो कमी करणें व त्यायोगानें आयातनिर्यात व्यवहारांची तोंडमिळवणी करणें केव्हांहि क्षम्य ठरतें. हा मेळ बसवितांना देशाला अनेक मार्ग स्वीकारतां येतात. तथापि हाहि एक मार्ग आहे व तो स्वीकारला तर योग्यच ठरेल. तथापि हा उपाय तात्कालिक आहे, हें नजरेआड होतां कामा नये. पण वस्तुस्थिति अशी होते कीं, एकदां संरक्षण तात्पुरतें तात्कालिक उपाय म्हणून स्वीकारलें कीं तें कायमचें होतें. कांहीं औषधें, एकादा रोग बरा होण्याकरितां घेतात, व तीं घेत असतांना शरीरप्रकृति अशी होते कीं, तीं औषधें न घेतलीं कीं प्रकृति बिघडते, तसेंच संरक्षणाचें होतें. आपत्तींतून निसटण्याकरितां त्याचा स्वीकार होतो, व त्याग केला कीं आपत्ति येते; मंदींत संरक्षक जकातीचें धोरण स्वीकारण्याचा मोह होतो. कारण त्याच्यायोगें देशांतील त्या त्या धंद्यांना उत्तेजन मिळतें; बेकारी कमी होते. संरक्षित मालांच्या किंमती वाढल्या तरी चालेल, पण बेकारी कमी झाली पाहिजे म्हणून संरक्षण स्वीकारलें जातें आणि जर संरक्षणामुळें परदेशांतील धंदेवाल्यांना माल तयार करण्याचा व विक्री करण्याचा खर्च जास्त वाढला तर, संरक्षणाचें धोरण त्या त्या देशी धंद्यांना जास्तच फायदेशीर होतें. १९२९ नंतरच्या मंदीच्या काळांत युरोपमधील देशांनीं परदेशचा शेतीमाल फारसा येऊं दिला नाहीं, त्यावर बंधनें घातलीं व देशांतील शेतीमालाचे उत्पादनाला उत्तेजन दिलें. परदेशी माल जर पूर्वीसारखा आला असता तर देशी मालांच्या किंमती मातीमोल झाल्या असत्या; कारण परदेशी मालाच्याच किंमती ५७ टक्के उतरल्या होत्या. त्याचप्रमाणें तयार मालावरहि बंधनें सुरू झालीं पण तात्पुरती योजना म्हणून सुरू झालेलें हें धोरण सर्वत्र कायम झालें. देशामागून देश संरक्षक जकाती बसवूं लागले व कोणत्याहि देशानें ती बंद करण्याची छाती केली नाहीं. कारण संरक्षणामुळें नवीन नवीन हितसंबंध उत्पन्न झाले. ज्यांना उत्तेजन मिळालें ते धंदेवाले, ते शेतीमाल तयार करणारे, संरक्षण काढण्याविरुद्ध संघटित झाले. क्षणासाठीं आलेली गोष्ट युगाची ठरली. अधू स्थितींत चालतां यावें म्हणून घेतलेली काठी सोडतां येणें अशक्य झालें, ती सोडली कीं गति खुंटली, चाल खुंटली असें झालें, सर्वत्र व्यापाराचें स्वरूप बदललें. मुख्यत्वें शेती माल तयार करणारे देश, इतर माल तयार करूं लागले. कारण त्यांच्या शेती मालावर परदेशांत बंधनें पडलीं, कर बसले. त्याबरोबर त्यांनींहि संरक्षक जकाती बसवून देशांत नवीन उद्योगधंद्यांचें बस्तान बसविलें. जे देश पक्का माल तयार करीत, ते आपल्या देशांतील कच्चा माल व शेती माल यांना संरक्षणानें उत्तेजन देऊं लागले. तात्पर्य, आंतरराष्ट्रीय व्यापाराची घडण बदलली. जेथें जी वस्तु विशेष सोईनें होईल तेथें ती व्हावी व अन्य

ठिकाणीं ती विकावी, हें मुख्य सूत्र दृष्टीआड झालें. देशाला लागणाऱ्या सर्वच वस्तु देशांतच व्हाव्यात हें वातावरण सर्वत्र पसरलें. आर्थिक स्वावलंबन, राष्ट्रीय अर्थ-वाद, या नवीन युगाच्या घोषणा व गर्जना सर्वत्र ऐकूं येऊं लागल्या आहेत. मंदी नाहींशी व्हावी, तात्पुरती अडचण दूर व्हावी म्हणून स्वीकारलेलें धोरण, अंतिम ध्येयच ठरलें !!

संरक्षक जकातीचे परिणाम वस्तूंचे भावांवर काय होतात हें थोडक्यांत पाहूं. ही जकात म्हणजे एक अप्रत्यक्ष करच आहे, ज्या वस्तूवर हा कर बसविला जाईल तिची किंमत कर बसविणाऱ्या देशांत इतर देशांपेक्षां कराइतकी जास्त असणार हें उघड आहे. करापूर्वी ती वस्तु सर्वत्र सारख्याच भावानें विकली जाते, व कर बसला म्हणजे तिच्या किंमतींत कराचे रकमेची वाढ होते. परदेशांत खपणाऱ्या वस्तूंचे भाव, वहातुकीचा व विक्रीचा खर्च वजा केल्यास सारखेच असतात, हें मागें आपण पाहिलें आहे. कर बसला, आणि जर कर बसविणाऱ्या देशांत ही वस्तु जगांत जेवढी खपते त्या मानानें थोडी खपत असली तर, या आयात कराचा परिणाम त्या वस्तूचे जगांतील भावावर, कांहीं होणार नाहीं. कर बसल्यामुळें त्या देशांत कदाचित् खप कमी होईल, पण मुळांतच खप थोडा असल्यामुळें या गोष्टीचा एकंदर उत्पादनावर म्हणण्यासारखा परिणाम होणार नाहीं व त्यामुळें त्या वस्तूचे इतरत्र भावावरहि कांहीं परिणाम होणार नाहींत. पण ज्या देशांत कर बसला त्या देशांतील भाव मात्र कराचे पूर्ण रकमेइतके वाढतील, कराचें सर्व ओझें गिऱ्हाइकावर पडेल, उत्पादकावर नाहीं, हें स्पष्ट आहे. उलट, कर बसविणाऱ्या देशांत ती वस्तु एकंदर उत्पादनाचे मानानें जास्त खपत असेल तर, करामुळें खप कमी होईल, त्याचा परिणाम उत्पादनावर होऊन त्या वस्तूंचे भाव कायमचे कमीअधिक होतील. या स्थितींत कर बसविणाऱ्या देशांतील गिऱ्हाइकांवर कराचा बोजा सर्वस्वी न बसतां कांहीं बोजा उत्पादकांवरहि बसेल. कारण त्याला मागणी त्या देशांतील कमी होऊं नये म्हणून, पूर्ण कराइतकी किंमत वाढवितां येणार नाहीं. याचाच अर्थ, कराचा कांहीं बोजा उत्पादकावर व कांहीं गिऱ्हाइकांवर पडेल. त्याचबरोबर देशांत संरक्षणामुळें ती वस्तु उत्पादन करण्याचा धंदा निघेल; व देशांत तयार झालेल्या वस्तूची किंमत पण परदेशी वस्तूइतकीच राहील. देशी अगर परदेशी दोन्ही वस्तु सारख्याच भावांत विकल्या जातात, व गिऱ्हाइकांना मात्र संरक्षणामुळें जादा किंमत द्यावी लागते. देशी धंदा, देशांत मागणी असेल त्याप्रमाणें वाढेल, संरक्षण चालू असूनसुद्धां परदेशी माल येतच राहिला तर, त्याचा अर्थ देशांत देशांतील मागणी पुरी करण्याइतकें उत्पादन होऊं

शकत नाहीं; होऊं शकत नाहीं याचा अर्थ परवडेल, नफा मिळेल, अशा दृष्टीनें होऊं शकत नाहीं. मग देशांत जास्त उत्पादन वाढवावयाचें म्हणजे संरक्षक जकातीचा दर जास्त करावयाचा, म्हणजे वस्तूंच्या किंमती वाढतील व त्या वाढत्या भावांत देशांत जास्त उत्पादन करणें परवडेल, शक्य होईल. पण तसें झालें म्हणजे गिऱ्हाइकांना आणखीं जास्त किंमत द्यावी लागणार हें उघड आहे, व हें उत्पादन जर मक्तेदारी स्वरूपाचें असेल तर, हा सर्व स्वार्थत्याग, देशासाठीं नसून मूठभर भांडवलवाल्यांसाठीं, व मक्तेदारी नसली तरी सुद्धां हा जनतेचा स्वार्थत्याग देशासाठीं नसून त्या उत्पादनांतील योजकांसाठींच होतो. भांडवलशाहींत राष्ट्राचें हित म्हणजे शेवटीं खाजगी व्यक्तींचेंच हित, प्रसंगविशेषी कसें ठरतें हें संरक्षणाचे धोरणांत चांगलेंच प्रत्ययास येतें. आयात मालावर संरक्षक जकात बसविण्याचें धोरण स्वीकारलें नाहीं असें राष्ट्र जगांत क्वचितच उरलें आहे. संरक्षणाचें धोरण सर्वत्र अवलंबिलें गेल्यामुळें जगांतील व्यापाराची घडणच बदलून गेली आहे! संरक्षणाचें एक स्वरूप म्हणून परदेशांतून किती माल यावा याचें प्रमाण ठरविलें जाऊं लागलें. प्रत्येक देश दुसऱ्या देशाशीं शक्य तर कोणता माल किती घ्यावयाचा याचा करार करूं लागला आहे. आयात वस्तूंचें प्रमाण, हिस्सा ठरवावयाचा व तेवढाच माल येऊं द्यावयाचा, हें धोरण सरसहा सुरू झालें आहे. एकादी वस्तु, एकंदर जगांत कोणतीं राष्ट्रें किती उत्पन्न करतात, हें निश्चित करावयाचें, व जगांत त्या वस्तूला किती मागणी आहे हें निश्चित करावयाचें, व त्या त्या देशाला मागील सालांत ज्या मानानें, त्यानें निर्यात केली असेल त्या मानानें, हिस्सेरशीनें प्रमाण ठरवून द्यावयाचें, व तेवढें प्रमाण तो माल त्या देशाचा दुसऱ्या देशांत निर्यात व्हावयाचा. हें प्रमाण ठरविणारे करार राष्ट्राराष्ट्रांत, साखर, रबर वगैरे अनेक वस्तूंबाबत झालेले आहेत. एकाद्या देशांत या कराराप्रमाणें एखादी वस्तु यावयाची हें ठरल्यानंतर ती कोणत्या व्यापाऱ्यांना आणण्यास परवानगी द्यावयाची अगर सरकारनें आणावयाची हें त्या देशाचें सरकार ठरवितें. त्याचप्रमाणें त्या देशांत माल तयार होतो व कराराप्रमाणें त्याचा हिस्सा बाहेर देशी जावयाचा असतो, तो कोणत्या व्यापाऱ्यांनीं धाडावा, हेंहि त्या देशाचें सरकार ठरवितें.

आयात माल ठराविक येऊं द्यावयाचा असें ठरविलें म्हणजे, देशांतील तो माल तयार करणारांना बाहेरून किती माल येणार हें कळतें. संरक्षक जकात पद्धतींत मालावर जकात, पण मालाला बंदी नाहीं. त्यामुळें संरक्षक जकात असली म्हणजे सरकारला त्याचें उत्पन्न मिळतें. उलट, येणारे मालाचें प्रमाण कमी झालें म्हणजे,

देशांत होणाऱ्या मालाची किंमत परदेशचे मालाचे किंमतीपेक्षां जास्त असते, पण परदेशीं माल त्याच किंमतीला विकला जात असल्यामुळें, त्यांतील फरकामुळें, होणारा नफा, आयात माल मागविणारे व्यापारी कमवितात. देशांतली मागणी पुरेल इतका माल देशांत उत्पन्न होत नाहीं, व बाहेरून येऊं दिला जात नाहीं, त्यामुळें त्या वस्तूंचे भाव वाढतात व त्यामुळें त्या धंद्याला देशांत उत्तेजन मिळतें, संरक्षण मिळतें. वाढलेल्या किंमतींत उत्पादन करणें व वाढविणें परवडतें. मागणीपेक्षां पुरवठा कमी करून भाव वाढविले जातात, हा त्याचा अर्थ होतो, व भाव वाढला असल्यामुळें देशांत तें उत्पादन करणें शक्य होतें, पण तेंहि जनतेला पदार्थ महाग करून जनतेच्या जिवावरच ! या प्रमाण ठरविण्याचे पद्धतींत, हिस्सेरशीचे पद्धतींत, एक फायदा असतो, तो म्हणजे जनतेला समजूं न देतां, उद्योगधंद्यांना संरक्षण देऊन, त्यांतील योजकांचें कल्याण करतां येतें. संरक्षक जकात बसविली तर त्यासाठीं कायदा, वाद-विवाद, चर्चा व तो कर म्हणून जनतेच्या नजरेसमोर असतो. उलट, आयात मालाचें प्रमाण साध्या हुकमानें कमी करतां येतें, त्याबरोबर वस्तूंचा पुरवठा कमी होतो, व किंमती वाढतात, कर बसला नसल्यामुळें त्या करारामुळें वाढल्या असें लोकांना वाटत नाहीं. लोक पदार्थ महागले आहेत असें मानून चालतात. त्याचप्रमाणें आयात कर बसावयाचा नाहीं असा करार एकाद्या देशाशीं झाला असला व देशांत तर उद्योग-धंद्यांना संरक्षण द्यावयाचें आहे, अशा वेळीं आयात मालाचें प्रमाण ठरविणें हा एक सुटकेचा मार्ग आहे. आयात जकात नाहीं, पण आयात मालाचें प्रमाण कमी करून वर सांगितल्याप्रमाणें पुरवठा कमी करावयाचा व त्यामुळें भाव वाढून उत्पादन करणें अगर वाढविणें फायदेशीर करावयाचें. पुष्कळ वेळां एका देशांतून येणाऱ्या मालावर जकात कमी केली तर व्यापारी करारामुळें कांहीं वेळां तीं सवलत सर्व राष्ट्रांना म्हणजे ज्यांच्याशीं व्यापारी करार असतात त्यांना द्यावी लागते. कारण तशी शर्त बहुतेक करारांतून असते. देशांदेशांत, व्यापारी करारांत करार कर-णाऱ्या देशांनीं, जकातीबाबत विशेष सवलत कोणालाहि देऊं नये, अगर ती दिल्यास ती सर्वांना मिळावी अशा शर्ती असतात; यांतून पळवाट काढण्याला हीं आयात मालाचें प्रमाण ठरविण्याची पद्धति उपयोगीं पडते. आयात मालाची हिस्सेराशी ज्या देशांत तो माल तयार होतो त्याच्यांत होते, सरसहा सर्व देशांत होत नाहीं. या आयात मालाचें प्रमाण ठरविण्याचे पद्धतींत मोठा दोष म्हणजे, त्या देशाचा जगाचे व्यापारपेठेशीं त्या वस्तूपुरता संबंध तुटतो. मागणी व पुरवठा यांच्यावर त्या देशाची खरेदी न राहतां ठरलेलें प्रमाण तो देश घेतो. त्यामुळें

जगांतल्या वस्तूंचे भाव व या देशांतल्या वस्तूंचे भाव यांत कांहीं संबंध राहत नाहीं. जगांतील त्या वस्तूंचे भावाचा फायदा घेतां येत नाहीं. जगांत वस्तु स्वस्त झाली तरी तिची जास्त आयात करतां येत नाहीं. संरक्षक जकात असली व पर-देशांतून येणारा माल तयार होणारे देशांत स्वस्त तयार होऊं लागला तर तो बाहेर जास्त जाऊं लागतो म्हणजे या देशांत जास्त येतो व त्यामुळें या देशांतील त्या वस्तूंच्या किंमती उतरतात. पण हा फायदा आयात मालाचें प्रमाण ठरलेलें असेल तेथें होत नाहीं.

१९२९ चे नंतरच्या काळांत झालेल्या जागतिक मंदीनें जगांतील व्यापारांत उलथापालथ केली आहे. ज्या राष्ट्रांना इतर राष्ट्रांचें देणें होतें तें देण्याकरितां माल धाडणें जरूर होतें. ज्यांना पैसे घ्यावयाचे होते त्या त्या राष्ट्रांत आयात माल जास्त जास्त येऊं लागला. आयात मालाचे व्यापाराला बंदी घालण्याकरितां, हें प्रमाण ठर-विण्याचें धोरण त्यांनीं स्वीकारलें. त्याचा परिणाम ज्यांना देणें द्यावयाचें होतें त्या राष्ट्रांवर आणखी वाईट झाला. जो तो आपापल्यापुरतें पाहूं लागला, कोणी हुंडणावळीचे दरांत फेरफार केले व आपला निर्यात व्यापार वाढविला. त्याबरोबर इतरांनींहि तेंच केलें, हुंडणावळ सर्वत्र अस्थिर झाली. कोणी सुवर्णपरिमाणाला रामराम ठोकला. सर्वत्र गोंधळ माजला. हुंडणावळीचें विकृत स्वरूप पाहून भांडवल इकडून तिकडे जाऊं लागलें. शेवटीं प्रत्येक देश संरक्षणाचे धोरणाचा स्वीकार करून स्वावलंबी बनण्याकडे वळूं लागला. लागणारे सर्व पदार्थ देशांतच तयार करावेत, महाग पडले तरी चालेल, पण परदेशांतून मागविणें नको, व नाणेबाजारांतील, हुंडणावळींतील ते धोके पतकरणें नको, अशी प्रवृत्ति सर्वत्र दिसूं लागली. पण परदेशांतून माल मागविला नाहीं म्हणजे परदेशीं माल जाणेंहि कमी होतें. कारण इतर देश हेंच धोरण स्वीकार-तात. ते परदेशी माल देशांत येऊं देत नाहींत. त्याचा परिमाण परदेशांत जाणाऱ्या वस्तूंचे उत्पादनावर होतो. ते धंदे खचतात, बेकारी वाढते. इंग्लंड व इतर बऱ्याच देशांत नेमकी, निर्यात वस्तूंचे धंद्यांतच बेकारी वाढली, हा अनुभव आलेला आहे. या धोरणाचा परिणाम आंतरराष्ट्रीय व्यापार एकंदरीनें कमी होण्यांत होत आहे. हुंडणावळीचे नियंत्रणामुळें व या धोरणामुळें आंतरराष्ट्रीय व्यापाराचें मुख्य सूत्र जेथें विशेष सोईनें व कमी खर्चानें उत्पादन होत असेल तेथें तें करावें, व इतरत्र तें धाडावें, हें दृष्टीआड झालें आहे; किंबहुना आंतराष्ट्रीय व्यापार या धोरणा-वर आतां राहिलाच नाहीं. प्रत्येक देश आर्थिक स्वावलंबनाकडे वळला आहे व त्यामुळें सर्व घडण बदलली आहे. १९२९ ते १९३६ पर्यंतच्या कालांत जगांतील

उद्योगधंद्यांतील उत्पादन २० टक्के वाढलें पण आंतरराष्ट्रीय व्यापाराचें प्रमाण १९२९ चे प्रमाणापेक्षां १० टक्के कमी झालें आहे. आंतरराष्ट्रीय व्यापार दोन दोन राष्ट्रांतील सोयीप्रमाणें देवघेव या स्वरूपाचा होऊं लागला आहे. उत्पादनाचें प्रमाण वाढत आहे व व्यापार घटत आहे, याचे राजकीय परिणाम जे व्हावयाचे ते आज दिसत आहेत. पण त्याचें विवेचन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. भांडवलशाहींत आंतरराष्ट्रीय व्यापार केवढा वाढला व आज त्यांत केवढा मूलग्राही फरक झाला आहे, याचे परिणाम दूरवर होतील हेंहि उघड आहे.

---

# ३१. युद्धोत्तर जग

१९३९ चे सप्टेंबर महिन्यांत सुरूं झालेले महायुद्ध आगस्ट १९४५ मध्यें संपलें. युद्धकालांत आर्थिक दृष्ट्या जगांत व या देशांत काय घडामोडी झाल्या हे पाहणें अनेक दृष्टीनें इष्ट आहे. कारण युद्धकालांत व्यापार विषयक, औद्योगिक व श्रमविषयक ज्या प्रवृत्ति दिसून आल्या आहेत, त्याचा परिणाम भविष्य काळांत होणार आहे हें निश्चित आहे. या कालांत मजुरांची परिस्थिती संघटनेच्या दृष्टीनें, तसेंच संपत्तीच्या दृष्टीनें किती सुधारली, त्याचप्रमाणें त्यांना मिळणारें वेतन वाढलेल्या भावांशीं कोणत्या प्रमाणांत होते हेंहि पाहणें अवश्यक आहे. देशांतील उत्पादन व व्यापार किती वाढला, त्याचा परिणाम आंतरराष्ट्रीय व्यापारावर कोणत्या दृष्टीनें होणार याहि गोष्टीचा विचार करणें कमी महत्त्वाचें नाहीं.

प्रथमतः औद्योगिक क्षेत्रांत युद्धामुळें मजुरांची संख्या कशी वाढली हे पाहूं. युद्धापूर्वी खालीलप्रमाणें स्थिति होती.

| साल | | | | औद्योगिक क्षेत्रांत काम करणाऱ्या मजुरांची संख्या. ( आंकडे लक्षाचें आहेत ) |
|---|---|---|---|---|
| १९११ | ... | ... | ... | १७.५ |
| १९२१ | ... | ... | ... | १५.७ |
| १९३१ | ... | ... | ... | १५.३ |
| १९४१ | ... | ... | ... | १६.० |

वरील आंकड्यांवरून युद्धाचें सुरवातीपर्यंत औद्योगिक क्षेत्रांतील मजुरांचीं संख्या कमीच झालेली दिसते. मात्र युद्ध, सुरूं झाल्यानंतर किती वाढली हें खालील आंकड्यावरून दिसून येईल.

| धंदा | १९३९ | १९४२ | १९४४ |
|---|---|---|---|
| | ( आंकडे हजारीं ) | | |
| रेल्वे | ७०० | १००० | १०५० |
| कापड | ८१७ | ९६५ | ९७१ |
| एंजिनियरिंग | १४८ | २२४ | २३१ |
| धातू | ५५ | ८२ | ८३ |
| अन्न, तंबाखू, पेय वगैरे | ९७ | १२१ | १२४ |
| रंग व रसायन | ५६ | ७३ | ७६ |
| कागद व छापखाने | ४४ | ४९ | ४९ |
| कांच, लांकूड, अन्य शिल्प | ५२ | ८२ | ८४ |
| कातडीं | १३ | ३० | ३२ |
| एकूण | १९८२ | २६२६ | २७०० |

याशिवाय खाणीच्या धंद्यांत सुमारें एक लाख मजूर काम करणारें अलग आहेत. त्यांत वाढ झाली नाहीं. अन्य देशांशीं तुलना करतां झालेली वाढ विशेष म्हणतां येण्यासारखीं नाहीं. जी थोडी वाढ उद्योगधंद्यांत झाली, ती अल्प असण्याचें कारण परकी सत्ता हें तर आहेच. या कालांत अन्य देशांतील लोकांनीं औद्योगीकरणाचें बाबतींत केलेली प्रगति पाहतां, थोडासा दोष हिंदुस्थानांतील उद्योग–सूत्रधारांवर येतो हेंहि तितकेंच खरें आहे. युद्ध–कालांत हिंदी उद्योगधंद्यांत नफा कसा वाढत गेला व त्यामानानें, कामगारांनां वेतन कसें मिळालें नाहीं हें खालील आंकडयांवरून दिसून येईल.

नफ्याचा सूचक अंक साल १९२८=१००

| धंदा | १९३८ | १९३९ | १९४० | १९४१ | १९४२ |
|---|---|---|---|---|---|
| लोखंड व पोलाद | ३१६·७ | २८९·३ | ३००·७ | ३८७·३ | ४०३·३ |
| कापड, गिरण्या | २०८·३ | १५४·६ | २२०·१ | ४८९·१ | ७६०·७ |
| चहा | ७३·९ | ९६·२ | ९५·४ | १४१·३ | २१९·५ |
| कागद | १७२·१ | १५१·८ | ३५८·७ | ४३२·२ | ४८८·४ |
| साखर | १५७·७ | १७९·४ | १८०·० | २४७·३ | २१९·८ |

निव्वळ कापड–गिरण्यांचा नफा किती वाढला हें खालील आंकडयांवरून दिसून येईल.

| साल | कंपन्यांची संख्या | नफा रु. हजारांत | सूचक अंक १९२८=१०० |
|---|---|---|---|
| १९२८ | ५८ | १,२३,०२ | १००·० |
| १९३९ | ६१ | १,९८,६४ | १५४·६ |
| १९४१ | ६० | ६,८१,३५ | ४८९·१ |
| १९४२ | ७५ | ११,०९,७८ | ७०७·७ |

वरील आंकडयांवरून गिरणी मालकांचा नफा १९३९ मध्ये जो दोन कोटी रुपयांवर होता तो १९४२ साली ११ कोटी रुपयांवर वर गेला. याशिवाय काळ्या बाजारांत काय मिळविले असतील तें अलाहिदा !!

प्रमुख धंद्यांतून नफा सरासरीनें किती वाढला व कोणत्या प्रमाणांत वाढला, हें खालील आंकडयांवरून दिसून येईल.

| धंदा | १९३९ | १९४१ | १९४३ |
|---|---|---|---|
| ताग | १०८ | ६६७ | १०२ |
| कापूस | ६०८ | १२४९ | ३९२१ |
| चहा | ७३ | १५६ | २८६ |
| साखर | ४३० | ५२३ | ९३९ |
| कोळसा ( दगडी ) | १८५ | १९८ | २३० |
| एंजिनियरिंग | ४२८१ | ७६८१ | ९६३७ |
| बँका | ११०० | २४२० | २४४१ |
| किरकोळ | ४७२ | १५४२ | १८९१ |
| सर्व धंदे | ४२२ | ११९२ | १३८० |

१९३९ सालीं झालेला नफा हा शंभर सूचक-अंक धरला तर प्रमुख धंद्यागणिक पुढीलप्रमाणें वाढ झालेली दिसेल.

| धंदा | १९३९ | १९४१ | १९४३ |
|---|---|---|---|
| ताग | १०० | ६१७ | ९२६ |
| कापूस | ,, | २०५ | ६४५ |
| चहा | ,, | २१४ | ३९२ |
| साखर | ,, | १२२ | २१८ |
| कोळसा | ,, | १०७ | १२४ |
| एंजिनियरिंग | ,, | १८० | २२५ |
| किरकोळ | ,, | ३२६ | ४०१ |
| सर्व धंदे | ,, | २८२ | ३२७ |

वरील आंकडयांवरून महायुद्ध कालांत उद्योगधंद्यांतील लोकांनीं केवढा नफा मिळविला याची कल्पना येईल. त्याचबरोबर ज्या पटीनें प्रत्येक धंद्यांत नफा वाढला त्या मानानें मजुरांची मजुरी वाढली नाहीं, हें खालील आंकडयांवरून दिसून येईल.

माहिनावारं सरासरी मजूरी

| धंदा | १९३९ | १९४१ | १९४४ |
| --- | --- | --- | --- |
| कापड | रु. २४·५ | रु. २६·२ | रु. ५२·७ |
| कागद व छापखाने | रु. २७·७ | रु. २७·१ | रु. ३९·५ |
| एंजिनियरिंग | रु. २६·० | रु. ३१·० | रु. ४८·५ |
| धातू | रु. ३८·६ | रु. ३९·७ | रु. ४७·८ |
| कातडीं | रु. २४·२ | रु. २९·८ | रु. ४४·३ |
| किरकोळ | रु. २३·६ | रु. २१·८ | रु. ४२·८ |

सर्वसाधारणपणें औद्योगिक क्षेत्रांतील मजुरांची मजुरी ४५ टक्के वाढली पण ही वाढ पदार्थांच्या वाढलेल्या भावांत, त्यांना योग्य राहणीसाठीं पुरेशीं पडली नाहीं हें खालीं दिलेल्या पदार्थांचे भावांवरून सहज दिसून येईल.

अखिल भारतीय पदार्थ–विषयक भावांचें सूचक–अंक

( १९ ऑगस्ट १९३९ रोजीं असणाऱ्या भावांचा सूचक अंक = १०० )

| पदार्थ | १९४४ डिसेंबर | १९४५ जुलै | १९४५ नोव्हेंबर |
| --- | --- | --- | --- |
| तांदूळ | ३३३ | ३३५ | ३२१ |
| गहूं | ३८१ | ३५९ | ३६९ |
| साखर | १६७ | १६७ | १६७ |
| चहा | १५५ | १६० | १६४ |
| तंबाखू | ६५६ | ३८८ | ३६२ |
| खोबरें | ४९७ | ४८७ | ६०७ |

जर पदार्थांचे दोन भाग, म्हणजे मूळ (Primary) पदार्थ व तयार–पदार्थ असें केलें व त्याचप्रमाणें सर्वसाधारणपणें वस्तूंचे भाव किती वाढले हें पहावयाचें असल्यास खालीलप्रमाणें कोष्टक मांडतां येईल.

खालील कोष्टकांत आगस्ट १९३९ मधील भावांचा सूचक अंक = १००

| | १९४४ डिसेंबर | १९४५ जुलै | १९४५ नोव्हेंबर |
| --- | --- | --- | --- |
| मूळ पदार्थ | २५६·८ | २४४·८ | २४५·९ |
| तयार वस्तु | २५६·३ | २४२·८ | २३६·९ |
| सर्व वस्तु | २४९·२ | २४४·४ | २४३·६ |

वरील आंकड्यांवरून पदार्थांचे भाव ज्या प्रमाणांत वाढले त्या प्रमाणांत मजुरी वाढली नाहीं हें स्पष्ट आहे.

अखिल हिंदुस्थानांतील ठोक विक्रीचे आंकडे घेतले, तरी हीच गोष्ट अधिक स्पष्ट झालेली दिसेल.

आगस्ट १९३९ सूचक अंक = १००

| महिना | १९३९ | १९४० | १९४१ | १९४२ | १९४३ | १९४४ | १९४५ | १९४६ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ऑगस्ट | १०० | ११० | १४१ | १६० | २३८ | २४५ | २४४ | २५५ (मे) |

कामगार वर्गाच्या राहणीच्या खर्चाचें प्रमाण कसें वाढलें यावरूनहि मजुरांना मिळालेली मजुरी, कशी कमी होती, हें दिसून येईल.

खालील कोष्टकांत ही गोष्ट स्पष्ट होईल.

जुलै १९१० चा सूचक अंक = १००.

| साल | १९१४ | १९१६ | १९१८ | १९२२ | १९२७ | १९३० | १९३४ | १९३७ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राहणीचा सूचक अंक | १०० | ११० | १५४ | १६४ | १५४ | १३७ | ९७ | १०७ |

| साल | १९३९ | १९४१ | १९४३ | १९४५ | १९४६ जुलै |
|---|---|---|---|---|---|
| राहणीचा सूचक अंक | १०७ | १२५ | २३३ | २३७ | २५४ |

मजूर व शेतकरी यांची तुलना करतां युद्धकालांत शेतकऱ्यांची स्थिति बरी राहिली. शेतकी मालांचे भाव कसें वाढलें हें वर दिलें आहे. विशेषतः तांदूळ व गहूं यांचें भाव १९४३ पर्यंत विशेष वाढत गेलें. त्यानंतर, शिधा–पद्धतीमुळें बरेंच कमी झालें. पण अन्य तयार मालांचे भाव वाढल्यामुळें शेतकऱ्यांच्या वाढलेल्या उत्पन्नाचें खरें मूल्य अर्थात् त्यामानानें कमीच झालें. शेतांवर काम करणाऱ्या मजुरांची मजुरी औद्योगिकक्षेत्रांतील मजुरांचे मानानें थोडी अधिक वाढली. जर १९१३ सालीं शेतकरी मजुरांना मिळणाऱ्या मजुरीचा सूचक अंक १०० मानला तर १९३९ सालीं तो अंक ११५ येतो. १९४३ सालीं १९२ व १९४५ सालीं २०३ चें आसपास होता.

पैशांत मिळणारी मजुरी, राहणीच्या खर्चाचें मान विचारांत घेतां खरी मजुरी वस्तु–विषयक दृष्टीनें वाढली नाहीं हें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

यांत १९०० सालांतील वस्तुस्थितीचा सूचक अंक १०० धरला आहे.

| साल— | १९०० | १९१० | १९१४ | १९१९ | १९३० | १९३९ | १९४३ | १९४४ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| राहणीचा खर्च– | १०० | १०३ | १३० | २२८ | १७८ | १३९ | ३०३ | ३१० |
| पैशांतील मजुरी– | १०० | १२० | १२८ | १५९ | २२० | १८५ | २७६ | ३०४ |
| वस्तु–विषयक मजुरी– | १०० | ११७ | ९८ | ७० | १२४ | १३३ | ९१ | ९८ |

येथपर्यंत दिलेल्या आंकड्यांवरून मजुरांना मिळणारी मजुरी त्यांना पुरेशी

पडली नाहीं, ही गोष्ट उघड आहे. युद्ध चालू असतांना कायद्याच्या अंमलबजावणी-मुळें मजूर संपावर जरी मोठ्या प्रमाणांत गेले नाहींत तरी अनेक ठिकाणीं व अनेक वेळां, काम बंद पडलें. मजुरांमध्यें असलेला तीव्र असंतोष भारत-संरक्षक-कायदा असतांना कसा प्रकट होत होता हें खालील आंकडयांवरून दिसेल.

| साल | तंट्यांची संख्या | भाग घेतलेल्या मजुरांची संख्या | कामाचे बुडालेले दिवस |
|---|---|---|---|
| १९३९ | ४०६ | ४,०९,००० | ४९,९३,००० |
| १९४२ | ६९४ | ७,७२,६५२ | ५७,७९,९६५ |
| १९४५ | ५८६ | ४,२२,४२० | १७,३३,९५८ |

युद्ध संपल्यानंतर मजुरांच्या असंतोषाला अधिक वाचा फुटली व अधिक मजुरीसाठीं १९४६ च्या पहिल्या सहा महिन्यांत तंट्यांची संख्या ९३५ होती त्यांपैकीं ५३४ प्रसंग केवळ मजुरी वाढविण्यासाठीं घडले. या सर्व संपांत सुमारें १२,९७,००० मजुरांनीं भाग घेतला व सुमारें ६२,६४,००० कामाचे दिवस बुडाले. आजच्या स्थितींत हिंदुस्थानांतील मजूर फार मोठ्या प्रमाणांत संघटित झाले आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. आजच्या घटकेला सुमारें ७०० मजुरांचे संघ नोंदलेले असून त्यांच्या सभासदांची संख्या ६,८४,००० आहे. जर मजुरांमध्यें अधिक संघटन असतें तर युद्धकालांत व युद्धोत्तर कालांत त्यांनीं आतांपर्यंत अधिक न्याय खास मिळविला असता.

युद्धकालांत हिंदुस्थानांमध्यें ज्या प्रमाणांत उद्योगधंदे वाढावयास पाहिजे होते, त्या प्रमाणांत वाढले नाहींत. युद्धाचा फायदा घेऊन कांहीं देशांनीं आपल्या उत्पादनांत खूप वाढ केली आहे; व युद्धकालांत झालेली वाढ कायम करण्याचें दृष्टीनें जगांतील आंतरराष्ट्रीय व्यापाराची घडण विशिष्ट दृष्टीनें असावी, असें प्रयत्न चालले आहेत. जगांत शांतता नांदत नाहीं याचे मुख्य कारण रशिया सोडल्यास, जगांतील सर्व देशांत होणारे उत्पादन भांडवलशाही पद्धतीवर आहे हें आहे. देशांत होणारे उत्पादन परवडणारें न ठरलें म्हणजे परदेशांत ते खपवावें लागतें. देशाबाहेर वस्तूंना बाजार मिळवावा लागतो आणि बाजार अगर पेठ मिळविण्यांत होणाऱ्या चढा-ओढीचा परिणाम म्हणजे युद्ध हा आतांपर्यंतचा अनुभव आहे. परदेशी व्यापार, या मागील तत्त्वज्ञान म्हणजे नैसर्गिक व अन्य गोष्टी लक्षांत घेवून जेथें ज्या गोष्टीं अधिक सोईनें व कमी खर्चानें उत्पन्न करणें शक्य आहे तेथें त्या करावयाच्या व जगभर विकावयाच्या. युद्धपूर्वकालांत हें तत्त्वज्ञान झुगारून देऊन हुंडणावळीचें

सहाय्यानें संरक्षक जकातीच्या भिंती उभारून, हिस्सेराशीची प्रथा अमलांत आणून जगांतील बहुतेक राष्ट्रांनीं जागतिक व्यापाराचें स्वरूप कसें बदलून टाकलें याचा थोडा विचार पूर्वी येऊन गेला आहे. या धोरणाचा परिणाम एकंदर जागतिक व्यापार कमी होण्यांत कसा झाला, हें खालील आंकडयांवरून दिसून येईल.

तयार पदार्थांतील जागतिक व्यापार.

वार्षिक सरासरी,

| कालखंड | जुन्या भावांतील वटकिंमत दशलक्ष डॉलर्स | | | सन१९१३च्या भावांतील किंमत दशलक्ष डॉलर्स् | सूचक अंक १९१३=१०० | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | आयात | निर्यात | एकूण | | मूल्य सोन्यांत | प्रमाण | किंमत सोन्यांत |
| १९२१-२५ | १०,८८० | १०,४१० | २१,२९० | ११,६२१ | १४०·३ | ७६·६ | १८३·२ |
| १९२६-२९ | १२,९२० | १२,४०० | २५,३२० | १५,८२५ | १६६·९ | १०४·३ | १०७·० |
| १९३० | ११,३१० | १०,७७० | २२,०८० | १५,१२३ | १४५·६ | ९९·७ | १४६·० |
| १९३१-३५ | ५,३८० | ५,१३० | १०,५१० | ११,४४९ | ६९·३ | ७५·५ | ९१·८ |
| १९३६-३८ | ५,५०० | ५,२९० | १०,७९० | १३,९७७ | ७१·१ | ९२·१ | ७७·२ |

मूळ पदार्थांतील जागतिक व्यापार वार्षिक सरासरी

| कालखंड | जुन्या भावांतील वटकिंमत दशलक्ष डॉलर्स | | | सन१९३९च्या भावांतील किंमत दशलक्ष डॉलर्स् | सूचक अंक १९१३=१०० | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | आयात | निर्यात | एकूण | | मूल्य सोन्यांत | प्रमाण | किंमत सोन्यांत |
| १९२१-२५ | १६,९०० | १५,२५० | ३२,१५० | २१,७२३ | १२६·९ | ८५·८ | १४८ |
| १९२६-२९ | २१,३१० | १९,२१० | ४०,५२० | २८,५३५ | १०७·० | ११२·७ | १४२ |
| १९३० | १७,७७० | १६,२३० | ३४,००० | ३०,३५७ | १३४·२ | ११९·८ | ११२ |
| १९३१-३५ | ८,९१० | ७,९३० | १६,८४० | २७,१६१ | ६६·५ | १०७·२ | ६२ |
| १९३६-३८ | ९,०७० | ८,०६० | १७,१३० | २९,५३४ | ६७·६ | ११६·६ | ५८ |

वरील आंकड्यांवरून आंतरराष्ट्रीय व्यापार युद्धाच्या सुरवातीपूर्वी कसा कमी झाला ही गोष्ट स्पष्ट दिसून येते. हीच गोष्ट जागतिक व्यापाराची वाढ कशी होत गेली हें पाहिलें असतांना स्पष्ट होईल व हें पाहतांना जगाची लोकसंख्या कशी वाढली हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. १८७६ पासून १९३८ पर्यंतच्या कालांत जगांतील तयार मालांतील वाढ, जवळ जवळ सातपट झाली व मूळ पदार्थांतील व्यापार चार पटीनें वाढला व तयार पदार्थांतील व्यापार तीन पटीनें वाढला. याच कालांत जगांतील

लोकसंख्या ५० टक्के वाढली. पण ज्या प्रमाणांत व्यापाराची वाढ १९२९ पर्यंत दरसाल होत गेली त्या प्रमाणांत १९२९ ते १९३९ पर्यंत झाली नाहीं; व याचें कारण वर निरनिराळ्या राष्ट्रांनीं जे धोरण स्वीकारलें तें आहे.

युद्धकाळांत जें धोरण युद्धकालापूर्वी स्वीकारलें होतें तें चुकीचें आहे असें पटलें म्हणून अगर जी राष्ट्रें आज औद्योगिक क्षेत्रांत आघाडीस आहेत, त्यांचे नेतृत्व कायम रहावें म्हणून म्हणा, आंतरराष्ट्रीय व्यापारांत कांहीं शिस्त असावी, असे प्रयत्न सुरू झालें आहेत. राष्ट्रसंघ जागतिक शांतता ठेऊं शकला नाहीं. तथापि त्याचीच सुधारलेली आवृत्ति 'एकत्रित राष्ट्रांचे संघटन' ( U. N. O. ) ठरणार कीं काय असें अनेकांना वाटत आहे. आंतरराष्ट्रीयदृष्ट्या व्यापार, चलन, भांडवलाची पेरणी, अन्नधान्य व त्याची विभागणी, मजूर, विमानमार्ग वगैरे बाबतींत कांहीं संघटन असावें असें प्रयत्न सुरू झालेले आहेत. राष्ट्रांराष्ट्रांत होणाऱ्या व्यवहारांत जर सलोखा व समझोत्याचें वातावरण उत्पन्न झालें तर युद्धाचें प्रसंग टळतील हें उघड आहे. राष्ट्रांराष्ट्रांतील हितसंबंधांत जर समन्वय करतां आला तर जागतिक शांतता नांदेल हें खरें आहे. सर्व अनर्थांचे मूळ संपत्ति ही आहे. आंतरराष्ट्रीयदृष्ट्या ही संपत्ति मिळविण्याचा मार्ग म्हणजे परराष्ट्रीय व्यापार वाढविणें हा आहे. एका राष्ट्राचा व्यापार दुसऱ्या राष्ट्राशीं व्हावयाचा म्हणजे त्याहि राष्ट्राचा व्यापार वाढतो, हेंहि तितकेंच खरें आहे. व्यापार हा रोजगार, उत्पादन, उपभोग यांना जोडणारी व एकत्रित आणणारी शक्ति आहे. उत्पादनाशिवाय व्यापार नाहीं. वस्तु असतील तर व्यापार व वस्तूंचे उत्पादन करण्यास मानवी श्रम पाहिजेत म्हणजेच रोजगार. वस्तु निर्माण होतात त्या अखेरीस उपभोगासाठींच. वरील गोष्टी लक्षांत घेतां देशांतील व परदेशांतील, व्यापाराचें महत्त्व अतिशय आहे. देशांतील व्यापारांत असणारी स्पर्धा आंतरराष्ट्रीय व्यापारांतहि असते. मात्र आंतरराष्ट्रीय व्यापारांतील स्पर्धेचा परिणाम प्रसंगीं शांतताभंगांत होतो.

एकंदर जगांतील व्यापार वाढला तर सर्वच दृष्टीनें चांगले आहे. संरक्षक जकाती, हिस्सेरशी, हुंडणावळीचे नियंत्रण या मार्गानें हा व्यापार वाढत नाहीं हे स्पष्ट आहे. शास्त्रांची प्रगति लक्षांत घेतां उत्पादन मोठ्या प्रमाणांवर वाढणें शक्य आहे. जगांतील अज्ञान, दारिद्र्य व दुर्भिक्ष्य यांना प्रयत्नानें नाहींसे करणें अवघड नाहीं. सृष्टीनें सर्व दिलें आहे व तिजपासून अधिक मिळणें हें शक्य आहे. मनुष्यानें यत्न केलें पाहिजेत. ज्या धोरणांमुळें व्यापारवृद्धि होत नाहीं त्यांचा त्याग केला पाहिजे. प्रत्येक राष्ट्राची अशी उत्पादन व विभाजन संघटना आहे. राष्ट्रांराष्ट्रांतील

उत्पादनांतील व्यापार वाढला पाहिजे. त्यांच्यांत अधिक विनिमय झाला पाहिजे. जागतिक व्यापार हा एकच मार्ग आहे कीं, ज्यायोगें एका देशांतील उपयुक्त वस्तु दुसऱ्या देशांत जाऊं शकतात व सर्वत्र लोकांच्या गरजा भागूं शकतात. एकाची गरज म्हणजेच दुसऱ्यास रोजगार असा अर्थ आहे. अधिक जागतिक व्यापार म्हणजे अधिक उत्पादन, अधिक रोजगार, अधिक उपभोग. सरकारी नियंत्रण, खाजगी नियंत्रण, बाजारांतील अस्वस्थता व अव्यवस्था या कारणांनीं जगांतील व्यापार घटला आहे व ती कारणें दूर होणें अगर दुरुस्त होणें जरूर आहे. हें व्हावयाचें म्हणजे जगांतील राष्ट्रांराष्ट्रांत सहकार्य हवें.

वरील दृष्टि लक्षांत ठेवून आंतरराष्ट्रीय व्यापाराचें संघटन व्हावें म्हणून गेलीं दोन वर्षें अमेरिका, इंग्लंड वगैरे राष्ट्रांत प्रयत्न चालू झालें असून पुढील वर्षी जगांतील राष्ट्रांच्या प्रतिनिधींची परिषद पॅरिस येथें भरणार आहे. जी योजना तेथें मांडली जाणार आहे तिचें थोडक्यांत स्वरूप खालीलप्रमाणें आहे.

व्यापारासाठीं रोजगार हवा व तो अधिक व अधिक टिकाऊ असेल तर व्यापारवृद्धि अधिक होईल. रोजगार वाढल्यानें बेकारी नाहींशी होऊन राहणीचें मान वाढत जाईल. जगांतील व्यापारांत व उद्योगधंद्यांत प्रमुख असलेल्या राष्ट्रांत जर सर्वत्र रोजगार राहील व बेकारी नाहींशीं होईल तरच आंतरराष्ट्रीय व्यापार वाढेल व तो वाढला तरच या व अन्य देशांची भरभराट होईल, व ही भरभराट असावी म्हणून आंतरराष्ट्रीय व्यापारांत अडथळे नसावेत; व्यापारी धोरण, चलनाची स्थिरता, वस्तूंचे उत्पादनविषयक प्रश्न वगैरे बाबतींत योग्य करारमदार असलें पाहिजेत. जागतिक व्यापार जेवढा अधिक खुला राहील तेवढा चांगला कारण त्याचयोगें जगांत सुरक्षितता व शांतता राहील.

प्रत्येक राष्ट्रानें वरील दृष्टि ठेवून आपल्या देशांतील उत्पादन व रोजगार वाढवावा म्हणजे एका देशांत रोजगार वाढला म्हणजे दुसऱ्या देशांत कमी होणार नाहीं. तसेंच ब्रेटनवुडस् येथें ठरल्याप्रमाणें, निघालेल्या आंतरराष्ट्रीय बँक व निधि (International Bank of Reconstruction and Development and International Monetary Fund) या संस्थांमार्फत सर्व देशांतून उत्पादन व रोजगार वाढविणें शक्य होईल.

वरील योजना अमलांत आणण्यासाठीं एक संघटन निर्माण व्हावयाचे आहे. वरील योजना या देशाचे दृष्टीनें कशी आहे हें पाहिले पाहिजे. कारण कांहीं तरी योजना स्वीकारली जाईल व त्याप्रमाणें व्यापाराची घडण बसेल. हा देश निव्वळ

शेतीमाल करणारा राहिला नाहीं. किंबहुना देशांत झपाट्यानें उद्योगधंद्याची वाढ व्हावी म्हणून प्रयत्न चालू आहेत. हिंदुस्थान सरकारचें धोरण जे पूर्वी प्रसिद्ध झालें आहे त्यावरून देशांतील उद्योगधंद्याची वाढ व्हावी असेंच आहे. देशांतील साधन-सामग्रीचा जास्तींत जास्त उपयोग करून संपत्ति वाढविणें, देशाचें संरक्षण चांगले व्हावें, व देशांत अधिक व अधिक टिकाऊ रोजगार वाढावा यासाठीं देशांतील औद्योगिक प्रगति झपाट्यानें व्हावयास पाहिजे असें त्या धोरणाचें सामान्यतः स्वरूप आहे. हें अमलांत आणण्याचे दृष्टीनें अनेक गोष्टी कराव्या लागतील. कांहीं उद्योगधंदे राष्ट्रीय मालकीचे करावे लागतील. कांहीं अधिक नियंत्रणाखालीं आणावे लागतील. कांहींवरील नियंत्रणें कमी करावी लागतील. या गोष्टी योजनेशिवाय होणार नाहींत. योजनापूर्व आर्थिक व्यवहारांत, पूर्णता व यश येण्यासाठीं परराष्ट्रीय व्यापार हा सरकार-नियंत्रित असणें अपरिहार्य आहे. या दृष्टीनें विचार करतां सोयी-स्कर उत्पादनाच्या (Comparative efficiencies of Production) विचार प्रणालीला मुरड घालावी लागेल. संरक्षक जकातीचाहि स्वीकार प्रसंगी करावा लागेल. सर्वत्र व सरसहा प्रत्येक राष्ट्राला प्रत्येक राष्ट्रांतील कच्चा माल घेण्यास व व्यापार करण्यास सारखी संधी देणें मग अशक्य होईल. तथापि आंतरराष्ट्रीय व्यापार सर्व व्यापी (Multilateral) असावा हे तत्त्व या देशानें स्वीकारणें हिताचें आहे. सरकार नियंत्रित व्यापार, हा वर उल्लेखिलेल्या योजनेशी विसंगत आहे. तथापि या देशानें कांहीं बाबतींत तो ठेवणें इष्ट आहे, नव्हे अपरिहार्य आहे. इंग्लंड, अमेरिका, यानीं मांडलेल्या योजनेंत औद्योगिक दृष्ट्या मागासलेल्या राष्ट्रांचे औद्योगीकरण लवकर होण्याचे दृष्टीनें दोष आहेत. किंबहुना तींत विद्यमान व्यवस्था कायम करण्याचा प्रयत्न असावा असा संशय येतो. तथापि आंतरराष्ट्रीय परिषदेंत या देशानें भाग घेऊन जगाचें व्यापाराची घडण मागासलेल्या राष्ट्रांच्या दृष्टीनें हितावह होईल अशी व्यवस्था करावी. औद्योगीकरणाचे मार्गांत असलेले देश व त्यांत मागासलेले देश यांत अधिक औद्योगीकरण झाल्यानें, श्रेष्ठत्व पावलेल्या देशांचा व्यापार कमी होईल असें मानण्याचें कारण नाहीं. १९१३ पर्यंत पुढारलेल्या राष्ट्रांचा व्यापार, अन्यत्र उद्योगधंद्याची वाढ झाली म्हणून कमी झाला नाहीं. १९१४-१८ मध्यें त्यांचा व्यापारी आढावा कमी झाला तो युद्धांमुळें. १९३० नंतर जे परिणाम घडून आलें त्याचे कारण अन्य देशांत उद्योगधंदे वाढलें हें नसून, व्यापार हा सर्व व्यापी अगर बहुविध (Multilateral) न राहतां त्याचें स्वरूप दोघा दोघांत अदलाबदलीचें (Bilateral) असें झाले. सर्वत्र औद्योगीकरण झाल्यानें उत्पादन वाढेल व व्यापाराची घडण जर

बहुविध व सर्वव्यापी राहील तर योजनेचा मुख्य उद्देश म्हणजे जगांतील दुर्भिक्ष्य घालविणें हें साध्य होईल.

आंतरराष्ट्रीय बँक व निधि यांचे उद्देश लक्षांत घेतां आंतरराष्ट्रीय व्यापारांत समतोल वृद्धि होणें हेंच इष्ट आहे. किंबहुना अशा दृष्टीनें वाढ व्हावी म्हणूनच या संस्था काढल्या आहेत असें निदान त्यांच्या घटनेंतील कलमावरून दिसते. सभासद राष्ट्रांच्या उत्पादक साधनसामग्रीची वाढ करून राष्ट्रांत संपत्ति वाढविणें व टिकणारा रोजगार सर्वत्र मिळेल अशी व्यवस्था घडवून आणण्यास मदत करणें हे निधीचे मुख्य काम मानलें आहे. हे शक्य होण्यासाठीं सर्वत्र आंतरराष्ट्रीय व्यापार वाढला पाहिजे, व त्यांत समतोलपणा यावा या दृष्टीनें हुंडणावळींत स्थिरता आणणें, परस्परांतील चुकती बाकी करण्याची योग्य व्यवस्था ठेवणें, व चलनविषयक फेरफार करून जी व्यापाराची घडण बिघडविण्यांत येते ती बंद करणें, हे त्या निधीचे मुख्य काम आहे. परराष्ट्रीय व्यापारांतील अडचणी व अडथळे दूर करण्यासाठीं व्यापाराची घडण सर्वव्यापी व बहुविध राहील हे पाहणें हेंहि काम त्या निधीचे कक्षेंत येतें. उत्पादक गोष्टींसाठीं भांडवलाची व्यवस्था करणें, व सभासद राष्ट्रांनां त्यांच्या पुनर्घटनेसाठीं व अभिवृद्धिसाठीं सर्व तऱ्हेनें मदत करणें हा बँकेचा मुख्य उद्देश आहे. मागासलेल्या सभासद राष्ट्रांना जरूर ते भांडवल पुरविणें व त्यांच्या आर्थिक व औद्योगिक प्रगतीस मदत करणे हें बँकेचे एक काम आहे ही गोष्ट स्पष्ट केली आहे.मजुरांची स्थिति सर्वत्र चांगली व्हावी, राहणीचे मान वाढावें यासाठीं उत्पादक रोजगारांची वाढ होणें जरूर आहे. ही वाढ सर्वत्र होण्यासाठीं जरूर ती मदत बँकेनें करावयाची ही योजना बँक काढण्यांत आहे. बँक राष्ट्रांनां स्वतः कर्ज देईल अगर देववील, भांडवल कुठें गुंतवावे यासंबंधी सल्लामसलत देईल, थोडक्यांत जागतिक व्यापार वृद्धिसाठीं जरूर ते सहाय्य सभासद राष्ट्रांना करणें हे तिचें ध्येय आहे.

या दोन्ही संस्थेंत हा देश सभासद झाला आहे व ही गोष्ट प्रस्तुत लेखकाला पसंत आहे. आज हिंदुस्थान देश इंग्लंडचा धनको झाला असला तरी कर्ज कसें परत मिळवावयाचे हा प्रश्न या देशापुढें आहे. या देशाला औद्योगिक प्रगतीचे दृष्टीनें भांडवली मालाची, यंत्रें वगैरेंची, अत्यंत जरुरी आहे. आज जी व जशी एतद्विषयक सामग्री पाहिजे आहे ती इंग्लंडकडून मिळेलच असें नाहीं. या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय बँकेमार्फत कर्ज काढून अमेरिकेंत ती घेऊन योजिलेले कार्यक्रम पार पाडणें अधिक हितावह आहे. दुःख, व दारिद्र्य, दुर्भिक्ष्य व दुष्काळ, यांनीं हा देश गांजला आहे. जगांतील हुकूमशाहीचा नाश करण्यांत हिंदुस्थाननें आपला वांटा उचलला

आहे. ऐपतीबाहेर त्याग केला आहे. जग कसें चालावें हें ठरविण्यांत त्याला अधिकार असला पाहिजे. व्यापाराची घडण ठरविण्यांत त्याचा हात असला पाहिजे. संपन्न देश व विपन्न प्रजा हा विरोध या देशांत राहतां कामा नये. येथें रोजगार वाढल्यास अन्य देशांत कमी होईल हें खरें नाहीं. एके ठिकाणीं रोजगार वाढल्यास अन्यत्र रोजगार वाढतो हा व्यापारांतील खरा सिद्धांत आहे. एकाचे अमृत हे दुसऱ्याचे विष नाहीं. आजच्या जगांतील कोणतेहि राष्ट्र अलग अगर अलिप्त राहूं शकत नाहीं. जे जागतिक प्रवाह आहेत त्यांत भाग घेतला पाहिजे व त्यांना इष्ट ते वळण लावलें पाहिजे. हिंदुस्थान देश आशियाचें नेतृत्व घेऊं इच्छितो. राजकारणांतील नेतृत्व हे आर्थिक बाबतींत विसंगत असतां कामा नये. या दृष्टीनें विचार करतां परराष्ट्रीय व्यापार ही महत्त्वाची गोष्ट आहे व ती आज संक्रमणावस्थेंत आहे. राष्ट्रीय दृष्टीनें व जागतिक दृष्टीनेंहि जागरूक राहणें हे आजचें मुख्य कर्तव्य आहे.

---

# सूची